प्रकाशक :
मनोहर य. जोशी
बी. ए. बी. कॉम्.
'प्रसाद प्रकाशन'
१८९२, सदाशिव पेठ, पुणे ३०.

आवृत्ती :
शके १९०० गोकुळाष्टमी



किंमत : तीस रुपये



मुद्रक :
प्रमोद बापट
प्रमोद प्रिंटर्स,
१०१९, सदाशिव पेठ, पुणे ३०.

भक्तिप्रेमातील अवीट आनंद सर्वांना मिळावा म्हणून ज्यांनी उदारपणे आपली शब्द रत्ने उधळली त्या

**ज्ञानदेवतुकारामादि संतांच्या चरणीं**

कृतज्ञतापूर्वक अर्पण.

–धुंडामहाराज देगलूरकर

ॐ

॥ श्रीपांडुरंग प्रसन्न ॥

# पूर्वसूत्र

श्री देवर्षी नारदांची भक्तिसूत्रे भक्तीच्या सर्व अंगांचा विचार मोजक्या शब्दात आपल्यापुढे शास्त्रीय स्वरूपात मांडतात, तरीही ती अतिशय सोपी आणि रसाळ आहेत. सूत्रांसारख्या 'अल्पाक्षर' आणि 'असंदिग्ध' रचनेमध्ये रसाची अपेक्षा नसते, या नारदाच्या भक्तिसूत्रांमध्ये वरील गुण असूनही ती भावमधुर आणि श्रुतिमधुर आहेत ती म्हणत असता श्रीनारदांच्या ब्रह्मवीणेच्या तारांचे झंकार कानात गुंजन करीत असल्याचा भास होतो ! त्यामुळेच त्यांची ही भक्तिसूत्रे सर्व भावुकाना डोलावयास लावतात.

या सूत्रासंबंधी विचार केला म्हणजे हे जाणवू लागते की त्याच्यातील गोडी ही केवळ शब्दाची नाही ती गोडी त्यातील प्रेमरसाची आहे. नारदांच्या मताने भक्ती हा श्रेष्ठ प्रेमाचा सर्वश्रेष्ठ आविष्कार आहे. पण अशा परमप्रेमरूपा भक्तीचे स्वरूप शब्दांनी सांगणे कठीणच काम होय. प्रेमाच्या भावनेचा स्पर्शही न झालेला पण 'जिव्हे सकळ शास्त्राचा सरावो' असणारा एखादा शब्दांचा ठोक व्यापारी प्रेमाबद्दल बोलू लागला तर ती प्रेमाचा बाजारभाव ठरविण्यासारखी निरस चर्चा वाटेल ! पण एखादा प्रेमळ जर आपल्या प्रेमभावनेबद्दल बोलू लागला तर त्याचे शब्द थोडे असतील पण त्यातून बाहेर पडणारा प्रेमरस आपल्याला त्यात न्हाऊन काढील. तसे नारदांच्या भक्तिसूत्रांचे झाले आहे. त्यात सूत्रे केवळ चौऱ्याऐंशी, पण ती अशी प्रेमरस गोडीमध्ये ओथंबून बाहेर पडली आहेत की ती परमप्रेमरूपा भक्तीचे अमृतमय स्वरूप आपल्यापुढे सहज उभे करतात.

भक्ती म्हणजे भगवंताची उपासना असे मानून त्या उपासनेच्या तांत्रिक अंगांचा विचार नारदांच्याच नावावर असणाऱ्या नारदपंचरात्र या ग्रंथात विस्ताराने केला आहे. पण नारदभक्तिसूत्रांमध्ये कोणत्याही तांत्रिक उपासनापद्धतीचा किंवा विशिष्ट देवतेचादेखील उल्लेख नाही. आपले अंत.करण भगवंताला अर्पण करून त्याच्या दिव्यप्रेमाच्या स्पर्शाने आपले नित्याचेच जीवन कसे आनंदमय व तृप्त करावे आणि त्याच्या कृपेला पात्र व्हावे याचे थोडक्यात सुस्पष्ट मार्गदर्शन नारदांनी या सूत्रातून केले आहे. या दृष्टीने आपल्या मराठी संतांच्या वाङ्मयाशी या सूत्रांची अत्यंत जवळीक आहे. ही जवळीक किती आहे ते प्रस्तुत विवरणामध्ये आपल्याला पदोपदी जाणवेल.

नारदाच्या भक्तिविषयक मताला अनुसरून नंतरच्या काळात भक्तिशास्त्राचा एक वेगळ्या दृष्टीतून बराच विचार काही श्रेष्ठ विद्वान व चिकित्सक भगवद्-भक्तानीच केलेला आपल्याला दिसून येतो. नारदानी भक्तीची व्याख्या परमात्म्या-वरील परमप्रेम अशी केली आहे आणि प्रेम हे अंत.करणात प्रगट झाल्याबरोबर माणसाला आनंद देणारे असल्यामुळे ते रसरूप आहे. त्या भक्तिप्रेमरसाची मग साहित्यशास्त्रीय दृष्टीने विस्तृत व सूक्ष्म चिकित्सा केली गेली आहे भक्ती हा स्वतंत्र रस आहे काय ? असल्यास त्याचे विभाव, अनुभाव, व्यभिचारीभाव कोणते, किंवा भक्ती हा केवळ भाव मानल्यास सर्व नवरासाशी संलग्न झाल्यामुळे वेगवेगळ्या रसांमधून प्रगट होणारे तिचे स्वरूप, भक्तीच्या संबधात त्या प्रत्येक रसाचे आलंबन व उद्दीपन विभाव, नायक व नायिका भेद, व इतरही रसविषयक विपुल विचार श्री मधुसूदन सरस्वती यानी आपल्या 'श्रीभगवद्भक्तिरसायना'त व श्रीरूपगोस्वामी यानी 'भक्तिरसामृतसिंधू'त आणि 'उज्वलनीलमणी'मध्ये केला आहे. नारदांनी परमप्रेमरूपाभक्तीचे उदाहरण म्हणून ज्या व्रजगोपिकांचा उल्लेख केला त्यांच्या अंत.करणात निर्माण झालेल्या भगवान् श्रीकृष्णांविषयीच्या विविध भावाचा आपल्या भक्तीच्या रसचर्चेमध्ये श्रीरूपगोस्वामी यांनी आधार घेतला आणि त्यासाठी वृंदावनातील ती भगवत्प्रेमात रंगलेली सृष्टीच पुन्हा आपल्यापुढे उभी केली. आपल्याकडील संतांनी भक्तिरसाची अशी शास्त्रीय चर्चा केली नाही, पण तोच भक्तिप्रेमाचा आनंद, व त्यातील 'नवी नवी रुची' आपल्या गौळणीमधून प्रगट केली आहे या विवरणाच्या निमित्ताने बंगालमधील चैतन्य-संप्रदायी वाङमयामध्ये आढळून येणारी ही भक्तिविषयक चिकित्सा आणि गौळणीच्या रूपकाद्वारे प्रगट होणारे संताचे तत्सदृश अनुभव याचा उपयोग करून नारदांची सूत्रे तर स्पष्ट केली आहेतच पण त्याशिवाय त्या वाङमयातील भगवत्प्रेमाची गोडीही आपल्याकडील वाचकांना चाखविली आहे.

नारदांनी प्रवृत्त केलेल्या या सूत्रमय भक्तिशास्त्राचा आणि नंतर त्याच्या झालेल्या विस्ताराचा आधार श्रीमद्भागवतपुराणात आहे. नारदभक्तिसूत्रांमध्ये जे भक्तिशास्त्र सांगण्यात आलेले आहे ते आधी शास्त्र आणि नंतर त्याप्रमाणे आचार अशा स्वरूपाचे नाही, तर आधी भक्ताचा भक्तिप्रेमात रंगलेला आचार व त्यांचा अनुभव आणि त्यावरून भक्तिविषयक तत्त्वे ठरविली गेली आहेत. 'मुख्यतस्तु महत्कृपयैव'– मुख्यत: महात्म्याच्या कृपेनेच भक्तीची प्राप्ती होते असे नारद आपल्या सूत्रात म्हणतात याचा अर्थ हा आहे की भगवत्प्रेममग्न, अनुभवी व इतरानाही त्या दिव्य प्रेमरसाचा लाभ मिळावा यासाठी ज्यांना स्वाभाविक करुणा आहे अशा भक्त्याचार्यांकडूनच आपल्याला त्या भक्तीचे शुद्ध स्वरूप, तिच्यात निर्माण होणारे दोष, ती अंतरंगात ठसावी यासाठी अवलंबिण्याचे उपाय, भाव-

भदाने तिच्यात निर्माण होणारी विविधता व तिच्यात साठवलेल्या अपूर्व आनंदाची प्रतीति इत्यादी गोष्टी कळू शकतात. भक्ती ही 'अनुभवरूपा' आणि 'अनिर्वचनीय' असल्यामुळे ती शास्त्र वाचून वा अभ्यासून प्राप्त होणारी वस्तू नाही ! पण भगवद्भक्त महात्म्याचे अनुसरण करून शुद्ध, अविच्छिन्न, परमानंदस्वरूप भगवत्प्रेमाला पात्र होता येते किंवा आपल्या भाग्याने म्हणजेच 'भगवद्कृपालेशा'ने जर अंतःकरणात भक्तीचा उदय झाला तर संतानी सांगितलेल्या भक्तिशास्त्राच्या कसोटीवर आपल्या अंतःकरणातील भक्ती पारखून घेता येते. 'पै आपुलेचि रत्न थितें। घेपें पारखियाचेनि हातें।' असे ज्ञानदेव म्हणतात तसा या भक्तिशास्त्राचा उपयोग आहे. ज्या अशा भक्ताच्या भगवत्प्रेमातून भक्तिशास्त्र प्रगट होते त्या भक्ताची चरित्रे, त्याचे भक्तिविषयक उद्गार हे सर्व श्रीमद्भागवतामध्ये फार सुंदर रीतीने ग्रथित करण्यात आले आहेत किंबहुना भागवत हे नारदांनी प्रेरणा दिलेले आणि व्यासानी लिहिलेले विस्तृत भक्तिशास्त्रच होय. भागवताचे प्रसिद्ध टीकाकार श्रीधराचार्य यानी भागवताच्या 'जन्माद्यस्य यतः' या पहिल्याच श्लोकावरील टीकेत भागवताचे वर्णन 'श्रीमद्भगवद्गुणानुवर्णनप्रधान भागवतशास्त्रं' असे केले आहे. वर म्हटले आहे की भक्ती ही कोणत्या शास्त्राने शिकता येणारी वस्तू नव्हे, पण भागवत हे असे शास्त्र आहे की ते भक्तीच्या सर्व तात्त्विक अंगांचा विचारही माडते व भक्त व भगवान याच्या परस्पर प्रेमाचे आनदमय दर्शन घडवून अंतःकरणात भक्तीचा प्रवेश घडवून देते ! भक्ती शिकवणारे भक्तिशास्त्र कोणते असेल तर ते श्रीमद्भागवत होय

अद्वैततत्त्वज्ञानाचे निष्ठावन्त विवेचक व भक्तिरसाचे प्रसिद्ध व्याख्याकार श्री मधुसूदन सरस्वती यानी आपल्या भगवद्भक्तिरसायनात भक्तीची व्याख्या करीत असता प्रारंभीच म्हटले आहे की,

**द्रुतस्य भगवद्धर्मात् धारावाहिकतां गता ।**
**सर्वेशे मनसो वृत्तिर्भक्तिरित्यभिधीयते ।।**

'भागवतधर्माच्या आचरणामुळे (म्हणजे मुख्यतः भगवंताच्या गुणलीलादिकांच्या श्रवणामुळे) द्रवीभूत झालेल्या चित्ताची सर्वेश्वर भगवंताकडे सतत प्रवाहित झालेली वृत्ती म्हणजेच भक्ती.'

म्हणजे भक्तीचा उदय अंतःकरणात होण्यासाठी आधी भगवंताचे अलौकिक सामर्थ्य, त्याचे लावण्यसुदर रूप, त्याची भक्तवत्सलता, त्याच्या प्रेमातील अवीट आनंद यांचे श्रवण झाले पहिजे. त्यामुळे अंत.करणात त्याच्याजवळ जाण्याची, त्यांच्याशी एकरूप होण्याची, त्याच्या प्रेमानंदाचा लाभ हाऊन जीवन कृतार्थ करण्याची ओढ निर्माण होते. ही ओढ खऱ्या भक्तीमध्ये परिणत होण्यासाठी म्हणजे चित्तात प्रेमभक्ती दृढ होण्यासाठी ते चित्त इतरत्र गुंतलेले असेल व अशुद्ध

विपयात रंगल्यामुळे स्वत: अशुद्ध झालेले असेल तर त्यातून ते बाहेर काढले पाहिजे. त्यासाठी चित्ताच्या कामक्रोधादिक विकारावर नियत्रण ठेवले पाहिजे. म्हणजे भक्तीतही पुन्हा 'चित्तवृत्तिनिरोध' आणि 'शमदमादिषट्संपत्ती'चा खटाटोप आलाच का ? तर तसे नाही चित्तशुद्धीसाठी येथे वेगळे काही करावयास नको चित्तात उठणाऱ्या सर्व वृत्ती भगवंताशी जोडल्या म्हणजे आपोआप चित्ताची शुद्धीही होते पण चित्ताच्या सर्व वृत्ती भगवंताशी जोडणे म्हणजेच भक्ती करणे ! आणि भक्ती करा म्हणजे भक्तीची प्राप्ती होईल असे म्हणण्यासारखे हे घोटाळ्याचे आहे ! म्हणण्यासारखे नव्हे तर तसेच म्हणणे आहे, पण घोटाळ्याचे नाही हे कसे घडते, त्याचा मार्ग कोणता, त्यात किती श्रेष्ठ आनंदमय फलाची प्राप्ती आहे, किती कृतार्थत्व आहे याचा उदाहरणासहित, सप्रमाण विचार म्हणजे भक्तिशास्त्र श्रीमद्भागवत या सर्व दृष्टीनी परिपूर्ण आहे, 'स्वयंफलरूप' आहे.

विस्ताराने हे भागवतमाहात्म्य सागण्याचे कारण असे की श्रीमद्भागवताचे भक्तीच्या क्षेत्रातील हे अद्वितीय स्थान लक्षात घेऊन या विवरणामध्ये श्रीनारदांच्या सूत्रांमधील रहस्य श्रीमद्भावतातील उक्तीच्या साह्याने उकलून दाखविले आहे. इतरही पुराणवचनांचा जागोजागी उपयोग केला आहेच पण अधिक भर श्रीमद्-भागवतावर आहे

श्री नारदांनी आपल्या सूत्रामध्ये भक्तीचे स्वरूप, तिचे इतर साधनमार्गापेक्षा श्रेष्ठत्व, तिच्या प्राप्तीची साधने, तिचे फल इत्यादि सर्वांगांनी भक्तीचा विचार केलेला असला तरी ती सूत्रे रचताना त्यात त्यानी सूत्राची प्रकरणश: किंवा विषया-नुसार विभागणी केली आहे असे दिसत नाही. पण त्याच्या माडणीत एक सुसूत्रता आहे. या सूत्रांवर व्याख्या करणाऱ्या काही लेखकानी या सूत्राचे गट करून त्याचे वर्गीकरण केले आहे. या विवरणात सूत्राची अशी विभागणी केलेली नाही. पण नारदांनी कोणत्या पद्धतीने आपल्या सूत्रांची रचना केली आहे याची कल्पना येण्यासाठी ती विभागणी खालीलप्रमाणे करता येईल. सूत्राचे क्रमांक कंसात दिले आहेत.

**विषयप्रस्ताव** (१), **भक्तीचे स्वरूप** (२–३), **भक्तीचा प्रभाव** (४–६), **भक्तिमधील अनन्यता व अनन्यभक्ताचा आचार** (७–१४), **भक्ती दृढ झाल्याची लक्षणे व त्याबद्दलची इतरांची मते** (१५–१८), **नारदांचे मत व गोपिकांच्या उदाहरणाने त्याच्या स्वरूपाचे स्पष्टीकरण** (१९–२४), **इतर साधनमार्गापेक्षा भक्तीचे श्रेष्ठत्व व त्याची कारणे** (२५–३३), **भक्तिच्या साधनांसंबंधी नाना मते व त्याचा निर्णय** (३४–४२), **भक्तीच्या प्राप्तीला प्रतिकूल दु:संग व त्याचे परिणाम** (४३–४५), **मायातरण कुणाला शक्य व त्यासंबंधात भक्ताचे श्रेष्ठत्व** (४६–५०), **प्रेमस्वरूप पराभक्तीचे व्याख्यान** (५१–५५), **गौणी भक्ती, तिचे**

**प्रकार व त्यांच्यातील तरतमभाव (५६-५७), भक्तीचे इतर साधनसापेक्ष सुलभत्व व त्याची कारणे (५८-६०), भक्तीच्या प्राप्तीसाठी निषेधात्मक व विधायक कर्तव्ये (६१-६६), एकनिष्ठ भक्तांचे श्रेष्ठत्व व त्यांच्याद्वारे होणारे कार्य (६७-७३), साधकभक्तासाठी अकरणीय व करणीय साधना (७४-७९) भजनभक्तीनें भगवत्प्राप्ती (८०) भक्तीच्या सर्वश्रेष्ठतेच्या घोषणेने उपसंहार (८१), एकाच भक्तीची अकरा रूपे (८२), भक्त्याचार्यांचे भक्तीसंबंधी एकमत (८३), फलश्रुति (८४)**

यावरून नारदाच्या या सूत्रामध्ये भक्तीचा किती अंगांनी विचार केला आहे याची कल्पना येईल हा विचार सूत्ररूपाने मांडीत असता त्यांनी 'वादो नावलम्ब्यः।' हे त्यांच्याच एका सूत्रात सांगितलेले धोरण अवलंबिले आहे असे दिसते. पण कोणत्याही तत्त्वाचा विचार म्हटला की त्यात काही मतभिन्नता, वेगळी दृष्टी, असा प्रकार होणारच. त्याप्रमाणे नारदांनीही भक्तिनिष्ठेचे स्वरूप सांगत असता (सूत्रे १५ ते १८) आणि भक्तीच्या साधनांचा विचार करीत असता (सूत्र २८ ते ३७) इतरांच्या मतांचा निर्देश केला आहे. त्यातही थोडी आग्रही व खंडण-मंडणात्मक भूमिका भक्ती व ज्ञान याच्यामध्ये साध्यसाधन असा सबंध आहे काय या प्रश्नाचा विचार करीत असता त्यांनी घेतली असल्याचे दिसते (सूत्र २८ ते ३३). भक्तिमार्गात तसे फारसे मतभेदांचे मुद्देच नाहीत, असलीच तर आवड भिन्न असल्यामुळे भावभिन्नता असेल. पण इतर परमार्थमार्गांशी भक्तीची तुलना करीत असता काही मतभेद निर्माण होण्याची शक्यता असते. उदाहरणार्थ, या सूत्रांमध्ये 'सा तु कर्मज्ञानयोगेभ्योऽप्यधिकतरा।' असे २५वे सूत्र आहे. याचा विचार करताना मतभिन्नता होणारच. पण अशा मतभेदाच्या प्रसंगात त्या भिन्न तत्त्वांचा समन्मय कसा करावा याचे मार्गदर्शन आपल्याला श्रीमत्भगवद्गीता आणि ज्ञानेश्वरी व नाथभागवत या ग्रंथांमधून मिळते. म्हणून या विवरणामध्ये मोठ्या प्रमाणात त्या ग्रंथातील सुंदर विवेचनाचा आधार घेतला आहे. हे ग्रंथ प्रमाणभूत असल्यामुळे त्यांच्या साह्याने केलेले विवरण हे वरील मतभिन्नतेसंबंधी कुणाच्या शंका असल्यास त्यांचे यथोचित निरसन करू शकेल यात शंका नाही.

'वादो नावलम्ब्यः।' हा नारदांचा आदेश एकाप्रकारे या विवरणाच्या-संबंधातही पाळला गेला आहे. ही नारदभक्तिसूत्रे ही देवर्षी नारदांचीच आहेत का इतर कुणाची ? ही नारदांचीच असल्यास कोणत्या नारदाची ? त्यांचा काळ कोणता ? ही सूत्रे वल्लभसंप्रदायाची आहेत का बंगालमधील चैतन्यसंप्रदायाची ? इत्यादी जे प्रश्न या सूत्रांचे बहिरंग अभ्यासक उभे करतात त्यांतील कोणत्याच वादात ग्रंथकार पडलेले नाहीत व ग्रंथाचा जो वाचकवर्ग गृहीत धरून या ग्रंथाची रचना झाली आहे त्यांनाही त्यासंबंधीच्या वादात रस असेल असे वाटत नाही.

परंपरेने ही सूत्रे ब्रह्मकुमार देवर्षी नारदांची मानली गेली आहेत व शेवटच्या सूत्रामध्ये हे 'नारदप्रोक्त शिवानुशासन' आहे असा जो उल्लेख केला आहे त्यावर अविश्वास दाखविण्यासारखे कोणतेही कारण सूत्रांमध्ये दिसत नाही. त्याचप्रमाणे त्यात जे भक्तिसंबंधी विवेचन केले आहे ते तत्त्वतः गीता, भागवत व संतांचे वाङमय यांना धरूनच आहे. ही सूत्र प्रासादिक आहेत. तेव्हा इतर अनावश्यक वादात न पडता या भक्तिमार्गातील सर्वमान्य सूत्रग्रंथातील भाव व गूढार्थ सर्वांना कळावा व भक्तिशास्त्राच्या अभ्यासकांना आपल्याकडील संस्कृत ग्रंथातून आणि संतसाहित्यातून विखुरलेली त्या विषयाची भरपूर माहिती एकत्र मिळावी या दृष्टीने हे विवरण केलेले आहे.

नारदांच्या या भक्तिसूत्रांकडे संपूर्ण भारतातील अनेक भक्तिमार्गीय सत्पुरुष आणि विद्वान व्याख्याकार आकर्षित झाले व त्यानी गद्यपद्यात्मक टीका व विवरणे लिहिली आहेत. महाराष्ट्रातच या ग्रंथावर सात-आठ टीका आज उपलब्ध आहेत. वऱ्हाडातील प्रज्ञाचक्षु संत गुलाबरावमहाराज याच्या दोन टीका आहेत, एक संस्कृत व एक मराठी, पण दुर्दैवाने त्या दोन्हीही अपूर्ण राहिल्या आहेत. त्यांची मराठी टीका ओवीबद्ध आहे. त्याचप्रमाणे संतकवी श्री. दासगणू महाराज यांची व जुन्या पीढीतील ज्ञानेश्वरीचे नामवंत प्रवचनकार श्री. ह. भ. प. केशवरावमहाराज देशमुख यांच्याही ओवीबद्ध टीका या सूत्रावर आहेत.

संतवाङमयाचे प्रसिद्ध अभ्यासक श्री ल. रा. पांगारकर यांनी या सूत्रांचा अर्थ व संतवचनाधारे संक्षिप्त विवेचन प्रथम त्याच्या 'मुमुक्षू' मध्ये व नंतर पुस्तकरूपाने शके १८३६ मध्ये प्रसिद्ध केले. श्री. शिवाजीराव भावे यांचे सामाजिक संदर्भात भक्तिविचार प्रगट करणारे विवेचन प्रसिद्ध झालेले आहे. त्याचप्रमाणे अध्यात्म परिषद, सांगली याच्याकडून श्री. विनायक चिंतामण केळकर यांनी केलेले थोडे अधिक विस्तृत विवेचन साधारणपणे दहा-अकरा वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाले.

हिंदीमध्ये 'कल्याण' मासिकाचे मान्यवर संपादक स्व. श्री. हनुमानप्रसाद पोद्दार यांचे 'प्रेमदर्शन' हे या सूत्रांवरील भाष्य चाळीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध होऊन अत्यंत लोकप्रिय झाले. दुसरे एक विद्वान व थोर महात्मे मुंबई येथील श्री स्वामी अखंडानंद सरस्वती यांनी या सूत्रावर केलेल्या प्रवचनाच्या आधारे ग्रथित केलेले 'भक्तिदर्शन' हे पुस्तकही सूत्रांचे रसपूर्ण विवेचन करणारे आहे. इंग्रजीमध्ये स्वामी चिन्मयानंद यांचे एक पुस्तक व रामकृष्ण मिशन, मद्रास, यांनी प्रसिद्ध केलेले एक पुस्तक पाहण्यात आहे. भारतातील अनेक भाषांमधून इतरही अनुवाद, टीका, विवेचन या स्वरूपाने पुष्कळ ग्रंथ-निर्मिती नारदभक्तिसूत्रावर झाली असावी. वरील मराठी आणि हिंदी पुस्तकांपैकी काही पुस्तकामधील विवेचनाचा परामर्श आवश्यक तेथे या विवरणात घेण्यात आलेला आहे हे तत्संबंधी उल्लेखांवरून

वाचकाच्या ध्यानात येईलच. त्यावरून यापूर्वी नारदभक्तीसूत्रांवर प्रसिद्ध झालेल्या महत्त्वाच्या बऱ्याच ग्रंथांचा सारभूत भाग येथे एकत्रच अभ्यासूना उपलब्ध झाला आहे असे म्हटले पाहिजे.

नारदभक्तिसूत्रांवर एवढे वाङ्मय आधीच उपलब्ध असता व त्यात पुन्हा श्री महाराजांचे ' हरिपाठविवरण अर्थात भक्तिशास्त्र ' हे भक्तिशास्त्रावरील पुस्तक पूर्वीच प्रसिद्ध असता त्याच विषयावर पुन्हा हा दुसरा ग्रंथ लिहिण्याचे काय प्रयोजन असे कदाचित कुणाला वाटेल या सूत्रांवर बरेच विवेचनात्मक लिखाण उपलब्ध आहे खरे, पण एकतर भक्तीची गोडी अशी अवीट आहे की तिची कितीही चर्चा वेगवेगळ्या लोकांनी केली तरी ती भक्त-भाविकांना गोडच वाटते ! दुसरे असे की प्रत्यकाची विवेचनाची वेगळी दृष्टी असते. त्यामुळे विषय तोच असला तरी त्यात कांही वैचारिक नाविन्य हे असतेच. या विवरणाचा उगम साधारणपणे पंचवीस वर्षांपूर्वी नारदभक्तिसूत्रांवर केलेल्या श्री महाराजांच्या प्रवचनांमध्ये आहे. त्यांची विवेचनाची पद्धती अशी आहे की ग्रंथातील प्रमेयांचा गोळाबेरीज अर्थ न सांगता त्यातील प्रत्येक पदाचा अनेक अंगांनी सप्रमाण विचार करावयाचा. तो करीत असता श्रीमद्‌भागवत, गीता, पुराणे, भाष्य, पंचदशी, ज्ञानेश्वरी, नाथ-भागवत, गाथा व इतर अनेक ग्रंथातील प्रमाणे सहजपणे त्यांच्या पुढे येतात. विवेचनाचा विषय तर त्यामुळे निखरून प्रगट होतोच पण त्याबरोबर इतर अनुषं-गिक विषयाची भरपूर माहिती श्रोत्याना मिळते. त्याचा परिणाम या ग्रथावर-देखील झाला आहे व त्यामुळे यातही प्रमाणप्राचुर्य आहेच. पण त्यामुळे या विषयाच्या अभ्यासूची, विशेषत: कीर्तनकार, प्रवचनकार यांची चांगली सोय होते, कारण एखाद्या विषयाची समग्र माहिती त्याना भरपूर प्रमाणांसहित एकाच ठिकाणी मिळते. यामुळे हे विवरण आत्तापर्यंत प्रसिद्ध झालेल्या नारदभक्तिसूत्रां-वरील बहुतेक ग्रंथांपेक्षा खूपच विस्तृत आहे व वेगळेही आहे. येथे भागवतादी ग्रंथातील संस्कृत प्रमाणांबरोबर त्यांचा मराठी अर्थही दिलेला असल्यामुळे संस्कृत न जाणणाऱ्यांनादेखील विवेचन समजण्यात अडचण येणार नाही.

श्री महाराजांचे भक्तिशास्त्राशी संबंधित एक पुस्तक श्रीज्ञानदेवांच्या हरि-पाठावर पूर्वी प्रसिद्ध झाले व ते लोकाना आवडलेही. त्याच विषयावर म्हणजे भक्तिशास्त्रावर त्याचे हे दुसरे पुस्तक आहे. कांही प्रतिपादन हे दोन्हीतही सारखे असणार, तरीही हरिपाठविवरणामध्ये नाममाहात्म्य अधिक प्रमाणात आहे तर नारदभक्तिसूत्रात प्रेमरूपाभक्तीचे माहात्म्य आहे. त्यामुळे येथे भक्तीच्या संबंधात अनेक नव्या विषयाची सुसूत्र चर्चा आढळते. त्याची कल्पना ग्रंथारंभी असलेल्या विस्तृत विषयसूचीवरून येईलच. त्याचप्रमाणे नारदभक्तिसूत्रांवर स्वतंत्रपणे विचार करू इच्छिणाऱ्या लोकाना या ग्रंथामुळ एक चांगले संदर्भसाधन हाती आले आहे.

एक गोष्ट मात्र सांगितली पाहिजे की मुद्रिते तपासण्यात अडचणी आल्यामुळे काही प्रमाणात मुद्रणदोष राहून गेले आहेत. त्याचा वाचकांना जो त्रास होईल त्याबद्दल वाईट वाटते. पण शेवटी महत्त्वाच्या अशुद्धांचे शुद्धिपत्र दिले आहे त्यावरून वाचकांनी ग्रंथ शुद्ध करून घ्यावा ही अपेक्षा आहे.

या विवरणाचा बराचसा भाग चार वर्षापूर्वी ओळीने ' प्रसाद ' मासिकातून प्रसिद्ध झाला. पण मध्यंतरी श्री महाराजाना पाहिजे तसे प्रकृतीचे स्वास्थ्य नसल्यामुळे हे लेखन खंडित झाले. थोडे बरे वाटताच ' प्रसाद 'चे संपादक श्री. मनोहर जोशी यांच्या आग्रहामुळे व इतर अनेकांच्या विनतीवरून त्यांनी कार्यक्रमांच्या गर्दीतही उर्वरित भाग पूर्ण केला. पूर्वी प्रसिद्ध झालेल्या व नंतर लिहिलेल्या भागांचे पुनरावलोकन करून काही सूत्रावरील विवेचन पुन्हा नव्याने लिहिले गेले, काही आवश्यक संपादनाचे संस्कार केले गेले व आता ' प्रसाद प्रकाशना'कडून हा ग्रंथ प्रसिद्ध होतो आहे. एक मोठे काम चागल्या रीतीने पार पडले याचा आनंद ग्रंथकारांना तर होईलच पण या ग्रंथाची वाट पाहणाऱ्या अनेकांना होईल असा विश्वास वाटतो. याचे बरेचसे श्रेय श्री. मनोहर जोशी यांना आहे

श्री महाराजांची प्रकृती ठीक नव्हती तरीही सतत परिश्रम घेऊन त्यांनी हा ग्रंथ पूर्ण केला हा आमच्यासाठी एक चमत्कारच आहे. पण या परिश्रमाचा त्यांना बराच थकवा आला असावा असा तर्क करता येतो, कारण या ग्रंथाला प्रास्ताविक लिहिण्याचे काम त्यानी सरळ माझ्यावरच सोपवून टाकले ! आता ते कसे पार पडले आहे याचा विचार मला करण्याचे कारण नाही !

सूत्ररूपाने ग्रंथाची वैशिष्टये सांगावीत म्हणून हे पूर्वसूत्र लिहावयास घेतले. ती सांगण्याचा प्रयत्न करीत असता ते एवढे लांबले ! तरीही सर्व वैशिष्टये सांगून झाली किंवा नाही याची शंकाच आहे. पण एवढयावरूनदेखील ग्रंथाचे स्वरूप, त्याची मांडणी आणि त्याची या विषयाच्या अभ्यासकांसाठी उपयुक्तता वाचकांच्या लक्षात येईल असे वाटते.

' जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि दैवाचा पुतळा ।। ' असे संत अनुभवाने आपल्याला सांगतात. तसे ' सदैव सभाग्य ' होण्यासाठी भक्तीचा जिव्हाळा म्हणजे काय हे आपल्याला नारदभक्तिसूत्रांवरून आणि या विवरणावरून अधिक चांगल्या रीतीने कळावे व तो जिव्हाळा अंतःकरणात मुरावा हे या ग्रंथाचे मुख्य प्रयोजन आहे. ' भक्तिशास्त्राणि मननीयानि ' असे नारदमहर्षी सांगतात. या ग्रंथात भक्तिशास्त्रही आहे व त्याच्या मननाची वाटही दाखविली आहे असे सहृदय वाचकांना आढळून येईल असे वाटते.

भक्तिसूत्रांच्या चिंतनासाठी आता फार दीर्घसूत्रीपणा उपयोगाचा नाही म्हणून हे लांबत चाललेले पूर्वसूत्र येथेच गुंडाळतो !

**पंढरपूर : श्रीकृष्णजयंती : शके १९००.** **भानुदास देगलूरकर**

# अनुक्रमणिका

# नारद भक्तिसूत्र विवरण

## देवर्षी नारद

**अहो देवर्षिर्धन्योऽयं यत्कीर्ति शाङ्‌र्गधन्वनः ।**
**गायन्माद्यन्निदं तन्त्र्या रमयत्यातुरं जगत् ।।**

'अहो ! हे देवर्षी नारद धन्य आहेत. जे आपली वीणा वाजवीत भगवद्‌-गुणगायनात तल्लीन होतात व संसारदु:खाने तप्त जीवाना सदा आनदित करतात.

—श्रीमद्‌भागवत, स्कंध १–६–३९

**धन्य धन्य तो नारदु । ज्यासी सर्वां सर्वत्र गोविंदु ।**
**सर्वथा हरिनामाचा छंदु । तेणें परमानंदू सदोदित ।।**
**जो श्रीकृष्णाचा आवडता । ज्यासी श्रीकृष्ण आवडे सर्वथा ।**
**ज्याचेनि संगे तत्त्वतां । नित्यमुक्ततां जडजीवा ।।**

—एकनाथी भागवत, २–३७,३८

भारतीय सर्व दर्शने व शास्त्रावर त्या त्या दर्शनप्रणेत्यांनी सूत्रे रचली तशीच भक्तिशास्त्रावर नारद महर्षीनी सूत्रे रचली आहेत. त्याची सख्या चौऱ्याशी आहे. यात भगवद्‌भक्ती-प्रेमाची व्याख्या, प्रकार, भक्तीस साहाय्यक कोणकोणती साधने आहेत, प्रतिकूल कोण असतात, भक्तिविषयक अन्य मते इत्यादी विषयांचा सुत्र-रूपाने संक्षेपाने सर्व विचार केला आहे. या सूत्राचे प्रणेते देवर्षी श्रीनारद आहेत. याचे चरित्रही मोठे आहे. नारदाच्या नावावर अनेक कथा, उपकथा पुराणादिका-तून आढळतात, पण त्या एकाच ठिकाणी सापडत नाहीत म्हणून येथे प्रारंभी मिळेल तेवढी माहिती संग्रहित करून श्रीनारदाचे अल्पसे चरित्र दिले आहे.

### नारदांचा अधिकार व चरित्र :

देवर्षी नारदाचे व्यक्तिमत्त्व अलौकिक दिसून येते. चारही युगात, सर्व त्रिभु-वनात, सर्व समाजात, लौकिक, सामाजिक, राजकीय, धार्मिक, आध्यात्मिक क्षेत्रात नारदाचा संचार असे वैकुंठ, सत्यलोक, स्वर्ग, मृत्यूलोक, पाताळ, कैलासादि सर्व

लोकात त्याचा अप्रतिहत प्रवेश होता. आपल्या योगबलाने, संकल्पमात्राने ते कोठेही जात-येत असत. वेदोपनिषदे, स्मृती, पुराणे व आगमादि ग्रंथातून सर्वत्र त्यांचे वर्णन आढळून येते नारदाचे चरित्र विशेषत. पुराणांतून अनेक प्रकारे वर्णिले आहे. नारदाच्या नावावर बृहन्नारदीय नावाचा पचवीस हजार श्लोकाचा पुराण ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्या उपलब्ध नारद पुराणामध्ये सनत्कुमार नारद संवादाच्या द्वारे अनेक कथा सांगितल्या आहेत, पण त्यात नारदाचे विस्तृत चरित्र आढळत नाही. ब्रह्मवैवर्त व भागवत पुराणात त्याचे चरित्र थोडे विस्ताराने सापडते.

नारद हे नाव धारण करणाऱ्या अनेक व्यक्ती होऊन गेल्या असाव्यात असे पुराणातून दिसून येते. त्यापैका काही असे :

१) कोणी एक ब्रह्मर्षी, त्याच्या स्त्रीचे नाव सत्यवती होते यास अरुन्धती नामक भगिनी होती. ती त्याने मत्रावरुणी वसिष्ठास दिली होती. २) कश्यपऋषीस मुनी या भार्येपासून झालेल्या सोळा देवगंधर्वांपैकी कली नामक देवगधर्वाचा कनिष्ठ वधू, 'गधर्वौकलिनारदौ' ३) कुबेर सभेत राहणारा ऋषी. हा वरुण सभेतही असे ४) दाशरथी रामाच्या सभेतील आठ धर्मशास्त्र्यांपैकी एक. ५) पर्वत मुनीचा मामा ६) विश्वामित्र ऋषिपुत्रांपैकी एक जनमेजय सर्पसत्रातील एक सदस्य. ७) देवर्षी ब्रह्मपुत्र नारद. भक्तश्रेष्ठ भक्ताचार्य व्यास, वाल्मीक, ध्रुवप्रल्हादादिकाचे गुरू या स्वरूपाने ज्याची प्रसिद्धी आहे ते हेच होत.

देवर्षी नारद हे प्रस्तुत वाराहकल्पाच्या स्वयंभुव मन्वंतरात ब्रह्मदेवानी जे दशमानसपुत्र उत्पन्न केले त्यांत दहावे असून पित्याच्या माडीपासून उत्पन्न झाले. '**उत्सङ्गान्नारदोजज्ञे**' असे भागवतस्कंध ३–१२–२३ मध्ये म्हटले आहे. श्रीमद्भागवताच्या प्रथमस्कंध अध्याय तीनमध्ये तर नारदाना तिसरा अवतार मानले आहे.

**तृतीयं ऋषिसर्गंच देवर्षित्वमुपेत्य सः ।**
**तस्मै सात्वतमाचष्ट नैष्कर्म्यं कर्मणां यतः ॥**

–भागवत १-३-८

'ऋषीच्या सृष्टीत त्या भगवंताने नारदरूपाने तिसरा अवतार ग्रहण केला आणि सात्वत तंत्र ज्याला पाचरात्रागम किवा नारद पाचरात्र म्हणतात त्याचा उपदेश केला आहे. त्यात कर्म कशा प्रकारे कर्मबंधनापासून मुक्त करणारे होते याचे वर्णन केले आहे'

महाभारतात शांतिपर्वात धर्मराजाने भीष्मास–

**प्रियः सर्वस्य लोकस्य सर्वसत्वाभिनंदित ।**
**गुणैस्सर्वैरुपेतस्य कोन्वस्ति भुवि मानवः ॥**

'या भूमीवर सर्वांना प्रिय, सर्वांकडून पूजित, सर्व गुणांनी युक्त असा कोण मानव आहे ? असा प्रश्न केला असता भीष्मांनी नारदांचे उदाहरण देऊन परमेष्ठी स्थितीचे उत्कृष्ट विवेचन केले आहे. इतिहास पुराणादिकांतून नारदचरित्राकडे पाहिल्यास ते परमभागवतोत्तम, अज्ञानी जीवांस उपदेश करणारे श्रेष्ठ सद्‌गुरू, दीन जनांना संकटकाली योग्य मार्गदर्शन करणारे, प्रसंग विशेषी कुबेरपुत्रासारख्या श्रीमदाधास तपःसामर्थ्याने शिक्षा करून त्याना भक्तिमार्गास लावणारे, देवासुर-मनुष्यगंधर्वनागादिकांस सारखेच प्रिय, ब्रह्मांडातील यच्चयावत व्यवहार जाणणारे गुप्तवार्ता कळवून सुरासुर व मनुष्याना उद्योगप्रवण करणारे, त्रिलोकातील अभिमानग्रस्त जीवात कलह उत्पन्न करून त्यांचा अभिमान नष्ट करणारे, विश्वोद्धारार्थ क्षणभरही विश्रांती न घेता त्रैलोक्याचे परम कल्याण कसे साधता येईल याची रात्रंदिवस चिंता करून त्याकरिता सतत परिभ्रमण करणारे, असे दिसून येते. प्रस्तुत कल्पातील भगद्विभूती जे नरनारायण ऋषी याचीही उपासना करणारे ते होते असे श्रीमद्भागवत पंचमस्कंधात सांगितले आहे, ते असे—

'या भरत खडामध्येही ज्याचे स्वरूप लोकांना स्पष्टपणे कळत नाही असा भगवान, नरनारायणात्मक अशा दोन मूर्ती धारण करून, बदरिकाश्रमात कृपेने धैर्यवान पुरुषावर अनुग्रह करण्याकरिता, कल्प संपेपर्यंत धर्मवृद्धी, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, शाती आणि विषयत्याग इत्यादी ज्या साधनानी आत्म्याचा अनुभव मिळतो त्याचा आश्रय करून तप करीत राहिला आहे. त्या भगवंताची भगवत्प्रतिपादित साख्यशास्त्र व योगशास्त्र यासहवर्तमान ज्यामध्ये भगवताच्या पराक्रमाचे वर्णन केले आहे अशा पचरात्रागमाचा सावर्णी मनूला उपदेश करणारा भगवान नारद, वर्णाश्रमधर्माचे आचरण करणाऱ्या भरत खडातील प्रजासहवर्तमान उपासना करतो'

—भागवत, स्कं. ५–१९–९

ब्रह्मवैवर्त पुराणात नारदाचे चरित्र खालीलप्रमाणे आहे. पूर्वी नारद ब्रह्मदेवाच्या कंठापासून उत्पन्न झाल्यानंतर त्याना पित्याने गृहस्थाश्रम स्वीकारून सृष्टयुत्पत्ती करण्यास सागितले. ते त्याने मान्य न केल्याने पित्याने शाप दिला.

**भवति ज्ञानलोपस्ते मच्छापेन च नारद ।**
**क्रीडामृगश्च साध्यश्च योषिल्लुब्धश्च लंपटः ।**
**स्थिरयौवन युक्तानां रूपाढ्यानां मनोहरः ।**
**पञ्चाशत्कामिनीनां च भर्ताच प्राणवल्लभः ।**
**श्रृंगार शास्त्रवेत्ता च महाश्रृंगार लोलुपः ।**
**गंधर्वाणां च प्रवरः सुस्वरश्चसुगायनः ।**

**वीणावादन संदर्भ निष्णातः स्थिरयौवनः ।**
**भविष्यसि न सन्देहो नामतश्चोपबर्हणः ।**

—ब्रह्मवैवर्त, पु ८, श्लोक ४१ ते ४५

पन्नास स्त्रियाचा पती, अत्यंत कामुक, गायनवादननिपुण असा ‘ उपबर्हण ’ नावाचा गधर्वराज हो. असा शाप मिळाल्यानंतर त्याने कोणत्याही योनीत मला जन्म मिळाला तरी माझ्या ठिकाणी सतत हरिभक्ती राहावी असा वर मागून घेतला. पुढे गधर्व राजाच्या स्त्रीच्या पोटी हे जन्मले गंधर्वयोनीत त्यानी चित्ररथ गंधर्वांच्या पन्नास कन्याशी विवाह करून त्याच्यासह ते गधर्व राज्यातील दिव्य विषयाचा भोग घेऊ लागले एकदा ते ब्रह्मसभेत गायन करण्यास गेले असता तेथे रंभेला नृत्य करताना पाहून त्याना कामविकार उत्पन्न झाला व तिच्या अभिलाषेमुळे मूर्च्छा उत्पन्न झाली. ब्रह्मसभेचा हा अपमान पाहून ब्रह्मदेवाने याना—

**व्रजत्वं शूद्रयोनिञ्च गान्धर्वीं तनुमुत्सृज ।**
**काले वैष्णवसंसर्गान्मत्पुत्रस्त्वं भविष्यसि ।।१०।।**
**विना विपत्तेर्महिमा पुसां नैव भवेत्सुत ।।**
**सुखं दुःखं च सर्वेषां क्रमेण प्रभवेदिति ।।११।।**

ब्रह्मवैवर्त, पु. ब्रह्मखंड अ. १३

‘ हे गधर्व शरीर सोडून तू शूद्रयोनीत जा तेथे तुला भगवद्‌भक्तांचा समागम झाल्यावर तू त्याच्या पुढील जन्मी आगामी कल्पात माझा पुत्र होशील ’ यापुढील कथा भागवतात आहे [१]

महापुरुषाचा क्रोधही जीवाच्या कल्याणाकरिताच असतो ब्रह्मदेवाने उपबर्हण गंधर्वावर कृपा करण्याकरिताच शाप दिला होता. त्या शापफलाने ते सदाचारी, संयमी, वेदवादी, ब्राह्मणाची सेवा करणाऱ्या दासीचे पुत्र झाले.

भागवत प्रथम स्कंध अध्याय पाचमध्ये स्वत. नारदांनी आपले चरित्र व्यासाना सांगितले आहे. नारद म्हणतात, ‘ हे महामुने ! मी पूर्वकाली एक दासीपुत्र होतो. एक वेळीव र्षाऋतूत चातुर्मासाच्या निमित्ताने आमच्या गावी बरेच योगी सतमहात्मे आले. त्यावेळी मी लहान बालक होतो माझ्या मातेने मला त्या महापुरुषांच्या सेवेकडे सोपवून दिले. मी जरी लहान होतो तरी मी जितेंद्रिय होतो. त्या महात्म्यापुढे मी मुळीच खोडकरपणा करीत नव्हतो. शांतीने, संयमाने मी त्याच्याजवळ बसून राही व ते सांगतील ते काम करीत असे. यामुळे ते समदृष्टी होते तरी माझेवर विशेष प्रसन्न राहात होते, व कृपा करीत होते. त्या मुनीच्या

---

१ भागवत सप्तमस्कध अध्याय पंधरामध्ये श्रीनारदांनीच आपण पूर्वी उपबर्हण नामक गंधर्व होतो असे सागून वरीलप्रमाणेच आपले चरित्र कथन केले आहे.

आज्ञेने मी त्यांच्या पात्रातील उच्छिष्ट खात असे. त्या प्रभावाने माझे सर्व किल्मिष दूर झाले. असे करीत असता काही काळाने माझे चित्त शुद्ध झाले. ज्यामुळे त्यांनी कथन केलेल्या भागवत धर्मात मला गोडी निर्माण झाली. ते लोक नित्य श्रीकृष्ण-कथा गात होते व मी त्या संतांच्या अनुग्रहाने त्या मनोहर कथांचे श्रद्धेने श्रवण करीत होतो. यामुळे भगवंताचे ठिकाणी माझी बुद्धी जडली त्या विशुद्ध व दृढ बुद्धिप्रभावाने मी मायारहित शुद्ध परब्रह्म स्वरूपात समस्त प्रपंच कल्पित आहे असे पाहू लागलो. अशा रीतीने वर्षा व शरद ऋतू संपेपावेतो ते महात्मागण प्रतिदिन भगवताच्या निर्मळ यशाचे गायन करीत होते, ज्याच्या श्रवणाने माझ्या हृदयामध्ये रजोगुण–तमोगुणाचा नाश करणारी सात्त्विक भक्ती निर्माण झाली. मला अनुरागी, आश्रित, जितेंद्रिय, श्रद्धाळू, पापहीन बालक व दास समजून दीनांवर दया करणाऱ्या त्या महात्म्यानी ते स्थान सोडून ते निघाले असता माझ्यावर परम कृपा करून प्रत्यक्ष भगवंताच्याद्वारा सांगितले गेलेले गुह्यतम ज्ञान त्यांनी मला सांगितले. त्या ज्ञानाच्याद्वारा मी भगवान वासुदेवाच्या मायाप्रभावास जाणले.

यानंतर मला ज्ञानोपदेश करणारे महात्मागण दुसरीकडे निघून गेले. त्यानी सागितल्याप्रमाणे मी भजन करीत राहिलो. माझ्या मातेला मी एकच पुत्र असल्या-मुळे माझ्यावर तिचा फार स्नेह होता. एके दिवशी ती गोदोहन करीत असता एका कालसर्पाने तिला दश केला, त्यामुळे तिला मृत्यू आला. सत्संगतीने मला ज्ञान प्राप्त झालेले असल्याने भक्ताचे हित करणाऱ्या प्रभूनेही माझ्यावर कृपाच केली असे समजून मी ते स्थान सोडून उत्तर दिशेला प्रयाण केले. अनेक स्थळी परि-भ्रमण करीत मी एका घोर अरण्यात आलो. एका नदीतीरी पिंपळाच्या वृक्षाखाली बसून चित्त एकाग्र करून भक्तिपूर्वक भगवंताच्या चरणकमलाचे ध्यान करू लागलो. त्या वेळी प्रेमावेशाने माझ्या नेत्रात आनंदाश्रू आले व मला वाटले माझ्या हृदयात श्रीभगवत्स्वरूप प्रकट झाले. भगवद्दर्शन होताच प्रेमानंदाला पूर आल्यासारखा वाटला. माझ्या सर्वांगावर रोमाच उभे राहिले. मी आनंदसमुद्रात बुडून गेलो. मला सर्वांचाच पूर्ण विसर पडला.

प्रेमातिभर निर्भिन्न पुलकाङ्गोऽति निर्वृतः ।
आनंद संप्लवे लीनो नापश्यमुभयं मुने ।।

– भागवत,१–६–१८

या आनंदात भगवत्स्वरूपाचा अनुपम अनुभव घेत असताच ते सुंदर रूप माझ्या पुढून अंतर्धान पावले, तेव्हा मला फार दु.ख झाले. मी पुन्हा ते स्वरूप दिसावे असा प्रयत्न करू लागलो. मला सतत त्याचाच ध्यास लागला, तेव्हा आकाशवाणीतून मी ऐकले, हे बालका, या जन्मात तुला माझे दर्शन होणार नाही.

तुझ्या अंत करणात प्रेम वृद्धिंगत व्हावे म्हणून मी एक वेळ तुला दर्शन दिले आहे. अल्पकालीन सत्संगामुळे, हे नारदा ! तुझी माझे ठिकाणी दृढ भक्ती झाली आहे.

हन्तास्मिन्जन्मनि भवान् न मां दृष्टुमिहार्हसि ।
अविपक्वकषायाणा दुर्दशोऽहं कुयोगिनां ।।

'हे बालका ! खेद आहे की या जन्मात पुन्हा तुला माझे दर्शन होऊ शकणार नाही. ज्यांच्या वासना पूर्णतया शात झाल्या नाहीत, ज्याचे हृदय विशुद्ध नाही अशा पुरुषांना माझे दर्शन अत्यंत दुर्लभ आहे.'

'तू हे शरीर सोडून नंतर माझा निजजन होशील, माझ्या ठिकाणी तुझी निश्चल बुद्धी राहील व माझ्या कृपेने कल्पान्तातही तुला या जन्मातील गोष्टीचे स्मरण राहील.'

नारद व्यासांना म्हणाले, 'तेव्हापासून मी स्वतःला भगवत्कृपापात्र समजू लागलो. त्यानंतर मी लाज सोडून भगवंताच्या परमगुह्य कल्याणमय नामाचे व गुणांचे कीर्तन व स्मरण करीत अहंकारईर्ष्यादिकाचा त्याग करून संतोषपूर्वक निरपेक्ष असा या अवनीतलावर संचार करू लागलो मी श्रीकृष्णस्वरूपी मन ठेवून संसाराची आसक्ती सोडली. यथाकाल माझे ते पूर्वशरीर नष्ट झाले व मला शुद्ध, दिव्य अशा भगवत्पार्षदस्वरूप अशा तऱ्हेची प्राप्ती झाली. तदनंतर कल्पाच्या अंती सर्व संसाराला स्वस्वरूपात लीन करून प्रलयावस्थेत शयन करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या हृदयात श्वासाबरोबर मी प्रवेश केला सहस्त्रयुगे गेल्यानंतर जेव्हा ब्रह्मदेवाला प्राणिकर्मे फलोन्मुख झाली असता जगन्निर्माण करण्याची इच्छा झाली तेव्हा मरीची आदि दहा ऋषीबरोबर ब्रह्मदेवापासून माझी उत्पत्ती झाली. तेव्हापासून अखंड ब्रह्मचर्यव्रत धारण करून मी तिन्ही लोकात आतबाहेर स्वेच्छेने संचार करीत असतो. भगवंताच्या कृपेने मला कोठेही जाण्यायेण्यास प्रतिबंध नाही स्वतः भगवंताने दिलेली ही स्वरब्रह्मविभूषित वीणा वाजवीत हरिगुण गात मी सर्वत्र संचार करतो. भगवंताची माझ्यावर एवढी कृपा आहे की जेव्हा मी प्रेमगद्गद वाणीने भगवल्लीलाचे गायन करतो तेव्हा मंगलकीर्ती पूज्यचरण श्रीभगवान एखाद्याने बोलावल्याबरोबर जसे यावे त्याप्रमाणे येऊन दर्शन देतात. जे लोक भोगाच्या इच्छेने व्यग्र चित्त होऊन विषयभोगात आसक्त आहेत त्यांना या संसारसागरातून तरून जाण्यास केवळ हरिगुणानुवाद गायन हीच दृढ नौका आहे.

एतद्धयातुरचित्ताना मात्रा स्पर्शेच्छाया मुहु ।
भवसिंधुप्लवो दृष्टो हरिचर्यानुवर्णनं ।।

—भागवत, १–६–३५

भगवान श्रीहरीच्या भजनाने विषयी पुरुषांचे चित्त जितके लवकर स्थिर

होते तितके योगादि साधनांच्या द्वारा होत नाही. म्हणून स्वतःच्या व लोकांच्या कल्याणाकरिता हेच सागत मी सतत सर्वत्र भ्रमण करीत असतो.

ब्रह्मवैवर्त पुराण ब्रह्मखंड ८ मध्ये कल्पभेदाने थोड्या वेगळ्या स्वरूपात नारदाची कथा आली आहे, ती अशी आहे–

ब्रह्मपुत्र झाल्यावरही पित्याच्या आज्ञेने यानी शिवाचा उपदेश घेऊन पुढे नारायणाच्या आज्ञेने पित्याच्या इच्छेस अनुसरून विवाह केला. नंतर हे त्या भार्येच्या सगतीत अहर्निश रममाण होत असता त्यांना सनत्कुमारांनी बोध करून कृष्णमंत्रोपदेश केला त्यानंतर सर्वसंगपरित्याग करून तपश्चर्या करण्यास गेले असता श्रीशंकराने याना कृष्णध्यानोपदेश केला. पुढे हे भारतवर्षात तप करून कृतार्थ झाले व योगप्रभावाने त्यांनी कलेवराचा त्याग केला.

श्रीनारदाना 'देवर्षी' असे संबोधले जाते. ऋषींत देवर्षी, राजर्षी आणि ब्रह्मर्षी असे दोन तीन मुख्य प्रकार आहेत. या शिवाय महर्षी, परमर्षी, श्रुतर्षी आणि काडर्षी असे चार प्रकार कोणी कोणी मानले आहेत ब्रह्मर्षी ,राजर्षी व देवर्षी यांची लक्षणे खाली लिहिल्याप्रमाणे आहेत.

कर्मज्ञानोभयपरा विप्रा ब्रह्मर्षयः स्मृताः ।
कर्मगौणा ज्ञानपरा देवर्षय' स्मृताः ।
तपश्चर्यां पुरस्कृत्य यथाशास्त्रं प्रजावनं ।
ये क्षत्रिया. प्रकुर्वन्ति ते तू राजर्षयः स्मृताः ।

–पुराणवाक्य

कर्मज्ञान उभय मार्गाचे आचरण करणाऱ्यांना ब्रह्मर्षी म्हणतात. कर्म गौण मानून ज्ञानप्राधान्य मानणारे ब्रह्मनिष्ठ नारद इत्यादी देवर्षी होत व तपश्चर्येचा पुरस्कार करून यथाशास्त्र प्रजेचे पालन करणारे जनक, अंबरीष इत्यादी राजर्षी होत.

प्रारंभी अनेक नारद होऊन गेले असे सांगितले असले तरी प्रस्तुत भक्तिसूत्रकार देवर्षी नारद हे ज्यांचे चरित्र वर दिले आहे तेच होत. श्रीविष्णूचे जे अवतार झाले त्यात प्रत्येक अवतारप्रसंगी नारदाचा संबंध कमी अधिक प्रमाणात आला होता असे पुराणांतून दिसून येते. तसेच अठराही पुराणांतून नारदांच्या अनेक प्रकारच्या रम्य कथा आढळून येतात. इतके अलौकिक सर्वंकांष व्यापक व्यक्तिमत्व लाभलेली व्यक्ती नारदाविना अन्य दिसून येत नाही.

नारद एक का अनेक या वादात पडण्याचे येथे कारण नाही. उपनिषदे, भारत, भागवतादि पुराणे व संतांच्या ग्रंथात ज्यांचे वर्णन केले आहे, भगवंताच्या अवतारकार्यांत वेळोवेळी ज्यांचे साहाय्य झाले आहे, ज्यांनी जगात सर्व युगात वेळोवेळी

भगवद्भक्तीचा प्रसार केला आहे, असे ब्रह्मपुत्र नारद हेच सर्वमान्य समजले जातात. नारद पुराणात त्यांचे वर्णन आहे –

**गायन् नारायण कथां सदा पापभयापहाम् ।**
**नारदो नाशयन्नेति नृणामज्ञानजं भयम् ।।**

' पापरूपी भय नष्ट करणाऱ्या नारायणाच्या कथांचे गायन करणारे मानवांचे अज्ञानजन्य संसारभय नष्ट करीत नारद संचार करतात. '

महाभारतात हरिवंशपर्वामध्ये नारदाचे खालीलप्रमाणे विस्तृत वर्णन केले आहे.

' ज्या नारदमुनीची अंगकाती जळत्या अग्नीप्रमाणे जाज्वल्य असून त्यांची दृष्टी बालसूर्याप्रमाणे तेजस्वी होती, मस्तकी डाव्या बाजूकडे वळविलेले असे विपुल जटांचे मंडळ होते, अंगावर चंद्रकिरणांप्रमाणे शुभ्र वस्त्रे असून एखाद्या प्रियसखी-सारखी बगलेला चिकटून वीणा घेतली होती, उत्तरीय वस्त्राला जोडून एक कृष्णाजिन व सुवर्ण यज्ञोपवीत होते, तो चारही वेदांचा पाठ करीत असून आद्य-ऋत्विजापैकी उद्‌गाता होता. त्याची महर्षीत गणना असून तो मोठा ज्ञाता व गायनकलेत निपुण होता हा चिरंजीव असून याचा ब्रह्मलोकापर्यंत सर्व लोकांत अप्रतिहत संचार आहे. '

–हरिवंशपर्व, अ. ५४

छांदोग्य उपनिषदाच्या सातव्या अध्यायात नारदांना सनत्कुमारांनी आत्मज्ञान दिले व त्यांना सांसारिक शोकातून मुक्त केले असा प्रसंग आहे.

पद्मपुराणातर्गत भागवत माहात्म्यांत या देवर्षीस लोकविग्रहयुक्त अस्थिर, योगनिधी, योगभास्कर, मुनिसत्तम, विरक्तशिरोमणी, कृष्णदासाग्रणी, महात्मा, भगवत्प्रिय, वैष्णवोत्तम, इ. इ. महत्त्वपूर्ण विशेषणे दिली आहेत. भागवतातही देवर्षिवर्य, ब्रह्मवित्तम, महाभागवत, देवदर्शन, महामुनी, भागवतमुख्य, अमोघदर्शन इ. इ. विशेषणांनी गौरविले आहे. नारदांचे एक महत्त्वाचे वैशिष्टय म्हणजे व्यासांनी अठरा पुराणांची रचना केली त्यात ईश्वराच्या अवतारांचेच विशेष चरित्र वर्णन केले आहे. तसेच सर्ग-प्रतिसर्ग, वंश-मन्वंतरादिकाचे स्वरूप विस्ताराने सांगितले. ईश्वराविना अन्य कोणाच्या नावाने पुराणरचना दिसत नाही. त्याला अपवाद श्रीनारदाचा दिसून येतो. नारदाच्या **नावाने** बृहन्नारदीयपुराण रचलेले आहे याचे कारण बहुश: व्यासाना नारदोपदेशानेच शांती मिळाली हे असावे. श्रीभागव-ताच्या पहिल्या स्कंधातच व्यास व नारद याचा यासंबंधी संवाद आहे.

व्यासांनी एका वेदाचे चार विभाग केले. अठरा पुराणे रचली. महाभारता-सारखा सव्वालक्ष श्लोकात्मक अलौकिक इतिहासग्रंथ निर्माण केला, उपनिषद्‌तात्पर्य

सांगणारी ब्रह्मसूत्रे रचली. त्यांच्या नावावर व्यासस्मृती प्रसिद्ध आहे. 'व्यासोच्छिष्ट जगत्त्रय' म्हणावे एवढी वाङ्मयनिर्मिती त्यानी केली शुकाचार्यांसारखे महापुरुष त्यांच्या पोटी जन्मास आले. एवढे महत्त्वाचे कार्य, तसेच एवढी तपश्चर्या केली, अशा व्यासांना एवढे करूनही चित्तप्रसन्नता वाटली नाही. अशा खिन्न स्थितीत ते सरस्वतीतीरावरील आपल्या शम्याप्रास नामक आश्रमात विषण्ण अवस्थेत बसले असता अकस्मात नारदऋषी तेथे ब्रह्मवीणा वाजवीत उपस्थित झाले व्यासानी त्याचा आदर करून विधिपूर्वक पूजन केले श्रीनारदही त्यावेळी शांततेने तेथे बसले व हसत हसत त्यानी व्यासाना विचारले, 'हे व्यास महर्षी! तुम्ही फार भाग्यवान आहात. तुमचे शरीर व मन आपल्या कर्माने व चिंतनाने सतुष्ट आहे ना ? तुम्ही जी महाभारताची रचना केली ती अद्‌भुत आहे त्यात सर्व काही आहे सनातन ब्रह्मतत्त्वाचाही तुम्ही ब्रह्मसूत्राच्याद्वारा पुष्कळ विचार केला आहे व ते जाणलेही आहे. असे असताही तुमच्याकडे पाहिले असता असे वाटते की, तुम्हाला जेवढी प्रसन्नता वाटावयास पाहिजे आहे तेवढी वाटत नाही. तुम्ही अकृतार्थ अशा संसारी मानवाप्रमाणे शोकग्रस्त दिसता हे आश्चर्य नव्हे काय ?' यावर व्यासमहर्षी म्हणाले, 'नारदा ! तुम्ही म्हणता ते खरे आहे. मी सर्व केले आहे पण माझे हृदय संतुष्ट नाही. याचे काय कारण असावे मला कळत नाही. तुम्ही ब्रह्मदेवाचे साक्षात मानमपुत्र आहा तुमच्यापासून चोरून काय ठेवावयाचे आहे ?'

त्वं पर्यटन्नर्कइव त्रिलोकीमन्तश्चरो वायुरिवात्म साक्षी।
परावरे ब्रह्मणिधर्मतो व्रते स्नातस्य मे न्यूनमलं विचक्ष्व ॥

— भागवत, १-५-७

'तुम्ही त्या पराणपुरुष परमात्म्याची पूर्ण उपासना केली आहे. तुम्ही सूर्याप्रमाणे तिन्ही लोकात भ्रमण करीत असता व योगबलाने प्राणवायूसमान सर्वांच्या आत प्रवेश करून सर्वांच्या अतःकरणाचे साक्षी आहात '

'मी ब्रह्मज्ञानी व वेदज्ञ असूनही योगानुष्ठान व अनेक नियमद्वारा परब्रह्म व शब्दब्रह्म दोघाची प्राप्ती करून घेतली असताही असमाधानी, अशात का आहे ? माझ्यात कोणती न्यूनता आहे हे आपण कृपा करून सांगा.' यावर नारद महर्षींनी उत्तर दिले, 'व्यासा ! तुम्ही सर्व काही केले, पण भगवंताच्या निर्मल यशोगुणाचे गायन फार कमी केले आहे. मी असे समजतो की, ज्या ज्ञानाने भगवान प्रसन्न होत नाही ते ज्ञान अपूर्ण आहे. तुम्ही धर्मादिकाचे जसे वर्णन केले आहे तसे भगवान श्रीकृष्णाच्या महात्म्याचे वर्णन केले नाही. जे निर्मळ ज्ञान मोक्षप्राप्तीचे साधन आहे ते भगवद्‌भक्तिविहीन असेल तर तेवढी शोभा देत नाही, मग जे साधन व सिद्धी या दोन्हीकरिता सदा अमंगळरूप आहे असे काम्य कर्म व जे भगवंतास

समर्पण केले नाही असे अहेतुक कर्मही कसे शोभा देईल ? हे महाभाग्यवान व्यासा ! तुमची दृष्टी अमोघ आहे. तुम्ही पवित्र कीर्ती आहात. तुम्ही सत्यपरायण दृढव्रती आहात. आता तुम्ही सर्व मानवाना बन्धनातून मुक्त करण्याकरिता भगवंताच्या अचिंत्य लीलाचे समाधिद्वारा चिंतन-स्मरण करून प्रेमाने त्याचे कीर्तन करा. तुम्ही जन्मादिधर्मरहित असूनही जगत्कल्याणाकरिता जन्म घेतला आहे, म्हणून तुम्ही विशेष रूपाने भगवत्लीलाचे कीर्तन करा. कारण विद्वानानी ही गोष्ट महत्त्वाची म्हणून मागितली आहे की, मनुष्याची तपश्चर्या, वेदाध्ययन, यज्ञानुष्ठान, स्वाध्याय, ज्ञान व दानाचे एकमात्र प्रयोजन हेच आहे. त्याची सफलता यातच आहे की, भगवान श्रीकृष्णाच्या लीलाचे, गुणाचे कीर्तन केले जावे ' असा उपदेश नारदांनी केल्यानंतर मग श्रीव्यास महर्षींनी श्रीभागवत-रचना केली व त्यामुळे त्यांना समाधान प्राप्त झाले.

श्रीएकनाथमहाराजानी नारदानी व्यासाला ब्रह्मदेवाने मागितलेला चतुःश्लोकी भागवताचा बोध दिला असे म्हटले आहे.

तो ब्रह्मवीणावाहतु । ब्रह्मपदे गीती गातू ।
तेणे ब्रह्मानंदे नाचतू । विचरे डुल्लतू भूतळी ।।
तो आला सरस्वती तीरा । तंव देखिले व्यास ऋषीश्वरा ।
तो संशयाचिया पुरा । अतिदुर्धरामाजी पडिला ।।
वेदार्थ सकळ पुराण । व्यासे केलें निर्माण ।
परी तो न पवेचि आपण । निजसमाधान स्वहिताचे ।।
तो संशय मुद्रा आतू । पडोनि होता बुडतू ।।
तेथे पावला ब्रह्मसुतु । नाभी म्हणतु कृपाळू ।।
तेणे एकाती नेऊनि देख । व्यासासि केले एकमुख ।
मग दाविले चाऱ्ही श्लोक । भवमोचक निर्दुष्ट ।।

— एकनाथी भागवत, अ १–१४९ ते ५३

श्रीमद्भगवतामध्ये नारदांचे उल्लेख स्कंधास्कंधातून आले आहेत. भागवत, स्कंध २ अ. ५ मध्ये नारद ब्रह्मदेव संवाद असून नारदांनी ब्रह्मदेवास महत्त्वाचे असे आध्यात्मिक विषयांत नऊ प्रश्न विचारले आहेत. त्याची उत्तरेही ब्रह्मदेवाने सविस्तर दिली आहेत. यात सर्व ब्रह्मांडाची उत्पत्ती कशी झाली, तसेच विराट स्वरूप व विभूतीचे वर्णन, भगवंताच्या लीलावतारांचे वर्णन इ. अनेक विषय आले आहेत. यावरून ब्रह्मदेवाच्या कृपेने नारदांना अलौकिक ज्ञान झाले होते असे दिसते. शेवटी ब्रह्मदेवाने नारदाला लोकांचा उद्धार करण्याकरिता मी सांगितलेले हे भागवत धर्माचे स्वरूप समाजात भक्ती वाढेल अशा स्वरूपाने विस्तार करून वर्णन कर असे सांगितले आहे.

इदं भागवतं नाम यन्मे भगवतोदितम् ।
संग्रहायं विभूतीना त्वमेतद्विपुली कुरु ।। ५१ ।।
यथाहरौ भगवति नृणां भक्तिर्भविष्यति ।
सर्वात्मन्यखिलाधारे इति संकल्प्य वर्णय ।। ५२ ।।

— भागवत, २–७

भागवताच्या चतुर्थस्कधामध्ये नारदानी ध्रुवाला भगवत्स्वरूपाचे उत्कृष्ट वर्णन करून ध्यानप्रकार सांगितला व 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' या महामंत्राचा जप करण्यास सागितले आहे. त्याच्या प्रभावाने सहा महिन्यातच त्यास भगवद्प्राप्ती झाली तसेच त्याच स्कधात पुढे प्राचीनबर्हीराजासही नारदांनी अध्यात्माचा उपदेश दिला आहे, त्यात विस्तृत रूपाने पुरञ्जन कथेच्या रूपकाने चारपाच अध्यायांत मानवी जीवनाचे संपूर्ण स्वरूप स्पष्टपणे सांगितले आहे. तो सर्व विचार अध्यात्म दृष्टीने महत्त्वाचा आहे. तो प्राचीनबर्हिराजा प्रथम अतिकर्ममार्गी होता. अनेक यज्ञांत त्याने फार पशुहिंसा केली होती, ती परिणामी कशी घातक आहे हे नारदानी त्यास पटवून दिले आहे यानंतर याच प्राचीन बर्हिराजाचे शतद्रुतीपासून झालेले दहा पुत्र प्रचेता या नावाने प्रसिद्ध होते. त्यानी अनतकालपावेतो जलात उभे राहून तपश्चर्याही केली व त्यांना भगवान विष्णूचे दर्शनही झाले होते.त्या प्रचेत्याना नारदानी भक्तिमार्गाचा उत्कृष्ट उपदेश केला आहे नारद म्हणतात, हे प्रचेतसानो ! या लोकात मानवाचे तेच कर्म सफल आहे, तोच जन्म, तीच वाणी व तेच मन सफल आहे की, ज्याच्याद्वारा सर्वात्मा सर्वेश्वर श्रीहरीची सेवा केली जाते. ज्यांच्याद्वारा श्रीहरीला प्राप्त करून घेतले जाणार नाही अशा शौक्ल (विशुद्ध मातापित्याच्या अंशापासून उत्पन्न होणाऱ्या) सावित्र (उपनयन संस्कारजनित) आणि याज्ञिक (यज्ञदीक्षेने होणाऱ्या), तीन प्रकारच्या जन्मांचा वेदोक्तकर्माचा, देवतासमान दीर्घ आयुष्याचा, शास्त्रज्ञान, तप, वाणीचे चातुर्य, धारणशक्ती, तीव्रबुद्धी, बल, योग, सांख्य, संन्यास, वेदाध्ययन, व्रत, वैराग्यादि अन्य साधनाचा पुरुषास काय उपयोग आहे ? ज्या प्रकारे वृक्षाच्या मुळास पाणी घालण्याने शाखा–उपशाखा या सर्वांना ते पाणी पोहोचते, अथवा भोजनद्वारा प्राणाना तृप्त करण्याने सर्व इंद्रियांचे पोषण होते त्याप्रमाणे या भगवंताची आराधना करण्याने सर्व देवतांचे आराधन केल्यासारखे होते. कारण सृष्टिकाळी सर्व विश्व त्याच्यापासूनच उत्पन्न होते व त्याचेच ठिकाणी लीन होते. यास्तव सर्व प्राणिमात्रांचा आत्मा, जगाचे निमित्त व उपादानकारण, कर्ता, ब्रह्मादिकाचाही नियंता असा जो भगवान त्याचीच अखंड सेवा करा. ज्यांच्या सर्व कामनांचा निरास झाला आहे अशा साधूंच्या पवित्र अंत:करणामध्ये निरंतर असणाऱ्या भक्तिभावाने स्थिर झालेला भगवान मी भक्तजनाच्या स्वाधीन आहे, असे म्हणतो व या साधूच्या हृदयातून केव्हाही निघून जात नाही.' असा उपदेश

प्रचेत्याना केल्यानंतर ते नारद ब्रह्मलोकास गेले, व ते प्रचेतागणही भक्तिभावसंपन्न होऊन वैकुंठलोकास गेले.

— भागवत स्कंध, ४–३१

भागवत स्कंध पाचच्या पहिल्या अध्यायात प्रियव्रत नावाच्या महान सामर्थ्य-वान राजास नारदांनी बोध दिला, अशी कथा आहे

भागवन षष्ठ स्कंधात दक्षप्रजापतीने ब्रह्मदेवाच्या आज्ञेने, जगात प्रजावृद्धी व्हावी म्हणून तपःसामर्थ्याने दहा हजार पुत्र निर्माण केले होते त्यांना नारदाने आपल्या उपदेशाने संमाराचे सर्व दोष पटवून देऊन अध्यात्माचा उपदेश केला व निवृत्तिमार्गी बनविले. ते संसारापासून परावृत्त झाले त्याना हर्यश्व अशी संज्ञा होती. त्यानंतर दक्षप्रजापतीस फार क्रोध आला व शोकही झाला ब्रह्मदेवाने त्याचे सान्त्वन केले. नंतर त्या दक्षाने पुन्हा तप सामर्थ्याने शबलाश्व नावाचे सहा हजार पुत्र उत्पन्न केले. त्यांनाही नारदमुनीने तत्त्वज्ञानाचा उपदेश करून निवृत्तिमार्गी प्रपंच-पराङ्मुख बनविले यावरून नारदाच्या वाणीत केवढे अद्‌भुत सामर्थ्य होते, ती किती प्रभावी होती, हे सिद्ध होते. तेही पुत्र परत आले नाहीत व ध्यानधारणा करीत बसले हे पाहून त्या दक्षाला फार क्रोध आला व त्याने नारदास शाप दिला की, हे संतानछेदका ! ज्या अर्थी तू आमचे अकल्याण केले आहेस, त्या अर्थी लोकामध्ये भ्रमण करीत असता तुला एका ठिकाणी कोठेही निश्चल स्थान प्राप्त होणार नाही

**दक्ष शापू नारदासी पाही । मुहूर्त राहूं नये एके ठायीं ।**
**तो शापू हरिकीर्तनीं नाहीं । या लागीं तो पाही कीर्तननिष्ठु ॥**

— नाथभागवत २–२६

या षष्ठ स्कंधातच अध्याय चौदा व पंधरामध्ये नारदांनी पुत्रमरणामुळे अत्यंत दुःखित झालेल्या चित्रकेतू राजाला आध्यात्मज्ञानाचा उपदेश करून शोक-मुक्त केले, अशी विस्तृत कथा आहे.

भागवताच्या सातव्या स्कंधात युधिष्ठिर व नारद यांचा संवाद आहे. त्यात नारदांनी प्रल्हादाचे सर्व चरित्र सांगितले आहे. हिरण्यकश्यपू तपश्चर्येस गेला असता त्याची पत्नी कयाधू हिला इंद्र नेत असता, श्री नारदांनीच इंद्रापासून तिला सोडवून आपल्या आश्रमात आणून ठेवले. त्यावेळी प्रल्हाद तिच्या गर्भात होता. तेथे नारदाचे नित्य भजन-संकीर्तन व भक्तिमार्गाचा उपदेश सतत कानावर पडत असल्याने त्या गर्भावर त्याचे उत्तम संस्कार घडले व त्याचाच परिणाम पुढे प्रल्हादाचे जीवन भक्तिप्रेममय बनण्यात झाला. प्रल्हादाने आपल्या सर्व सहाध्यायी असुरबालकांस जो व्यापक असा भक्तितत्त्वाचा बोध केला त्यावेळी तो त्यांना

म्हणाला की, हे ज्ञान मला नारदानी दिले, ते त्याना नरनारायण ऋषीपासून प्राप्त झाले होते.

**ज्ञानंयदेतदमलं दुरवापमाह नारायणो नरसखः किल नारदाय।**
**एकांतिनां भगवतस्तदकिंचनानां पादारविंदरजसाप्लुतदेहिनां स्यात् ॥२७॥**

—भाग ७–६–२७

याच स्कंधात धर्मराजाच्या प्रश्नाला अनुसरून नारदानी वर्णधर्म तसेच प्रत्येक आश्रमाचे धर्म विस्तृत रूपाने सांगितले आहेत. यावरून धर्मशास्त्रातही नारदमहर्षीचा अधिकार फार मोठा होता हे सिद्ध होते. त्याच्या नावावर 'नारद-स्मृती' ही आहे व तिच्यातही सर्वच धार्मिक विषय व सदाचार, नीती, कर्तव्ये, इत्यादी विचार विस्तृतपणे केला आहे.

भागवत अष्टमस्कंधामध्ये देवाना अमृत प्राप्त झाले, पण असुराना यत्न करूनही ते मिळाले नाही तेव्हा सर्व असुर एक झाले व त्यानी देवाबरोबर युद्ध आरंभिले. त्यात कित्येकवेळी देवाचा पराभव तर असुराचा विजय होई, तर कित्येक वेळी असुरांचा पराभव तर देवाचा विजय होई मात्र उभयपक्षाची फार हानी होऊ लागली असता नारद तेथे गेले व त्यानी देवाना स्पष्टपणे उपदेश करून ते युद्ध बंद करविले, यावरून नारदाचे देवावरही किती वर्चस्व होते, हे कळून येते.

भागवत दशम स्कंधात आरंभीच नारद व कंस याची भेट झाली आहे व नारदानीच कंसाला वसुदेव-देवकी, अन्य यादव, नंद-यशोदा इ. गोकुळवासी हे सर्व देवांश आहेत असे सांगितले. त्यामुळे कंसाने त्याना फार त्रास देण्यास प्रारंभ केला. श्रीकृष्णाचाही फार द्वेष करू लागला. श्रीकृष्णाला मारण्याकरिता कंसाने अनेक राक्षस निरनिराळ्या वेषाने गोकुळात पाठविले, पण त्या सर्वांना श्रीकृष्णाने मोक्ष दिला, हे पाहून श्रीकृष्णाच्या अगाध शक्तीचे त्यास भय वाटू लागले व त्या भयाने त्याला श्रीकृष्णाचा ध्यास लागला. कोणत्याही निमित्ताने भगवद्ध्यास लागणे हे उद्धाराचे साधन होय. म्हणून ही कंसावर नारदांची कृपाच झाली!

कुबेरपुत्र नलकुबर व मणिग्रीव हे दोघे एकवेळी अप्सरांसहवर्तमान जलक्रीडा करीत असता अकस्मात नारदऋषी तेथून जात होते. त्यांना पाहून अप्सरानी लज्जेने आपली वस्त्रे परिधान केली, पण हे दोघे मदिराप्राशनाने आणि धनमदाने अंध होऊन उन्मत्त झालेले तसेच वस्त्रहीन क्रीडा करू लागले. तेव्हा नारदांना क्रोध आला व त्यानी तुम्ही असे नग्न व उन्मत्त आहा तर तुम्हास वृक्षयोनी प्राप्त होवो असा शाप दिला पुढे ते जेव्हा पश्चात्तापाने शरण आले तेव्हा पुन्हा श्रीकृष्णावतारात तुमचा उद्धार होईल व तुम्ही पूर्वपदाला प्राप्त व्हाल असा आशीर्वाद दिला. यावरून नारदाचे निग्रहानुग्रह सामर्थ्य किती होते, हे लक्षात येईल.

श्रीकृष्णाच्या नाशाकरिता कंसाने निरनिराळ्या वेषाने अनेक राक्षस. पाठविले, त्यात केशीनामक एक राक्षस महाभयंकर अश्वाचा वेष घेऊन आला. त्याचाही कृष्णाने वध केला. त्यावेळी नारद गोकुळात आले व त्यानी श्रीकृष्णाचे आध्यात्मिक स्वरूपाने वर्णन केले व यापुढे तुम्ही अमुक अमुक लीला करणार आहा, असे श्रीकृष्णाचे भावी कार्य मागून गेले यानतर कृष्णपुत्र प्रद्युम्न यास शबरासुराने जन्मानतर दहा दिवसाच्या आत चोरून नेले व आपल्या मायावती नामक दासीस साभाळण्यास दिले ती पूर्वीची मदनाची स्त्री रती होती शकराने मदनास क्रोधाने जाळले. त्यानंतर तो कृष्णपुत्र म्हणून सर्वांग सुदर असा रुक्मिणीचे उदरी जन्मला तोच शंबरासुराने चोरून नेऊन समुद्रात टाकला. तेथे तो कोळयाच्या जाळयात सापडला तेव्हा त्या कोळयानी घाबरून राजा जो शंबरासुर त्यास नेऊन दिला याने मायावतीस साभाळण्यास दिला त्या बालकाचे ते अलौकिक लावण्य पाहून तिला फार आश्चर्य व आनंद झाला व विचार करू लागली की, हा बालक कोण असावा ? तितक्यात नारद तेथे आले व त्यानी तिला सागितले की, हा तुझा पती कामदेवच आहे. त्यामुळे तिचा संशय दूर झाला.

एकदा श्रीकृष्ण द्वारकेत आपल्या सोळा हजार एकशे आठ स्त्रिया व पुत्र-पौत्रासह आनंदाने राज्य करीत असता तेथे अकस्मात नारदऋषी आले तेव्हा श्रीकृष्ण भगवताने आपल्या सिहासनावरून उठून अतिनम्रतेने किरिटासहवर्तमान त्याच्या चरणावर मस्तक ठेवून अर्घ्य-पाद्यादिकानी पूजा केली व त्याचे पुढे हात जोडून त्याना आपल्या सिहासनावर आदराने आणून बसविले नारदाचे चरणतीर्थ श्रीकृष्णाने भक्तीने आपल्या मस्तकावर धारण केले. नारदाना यशश्री, औदार्य, ज्ञानवैराग्य, ऐश्वर्यादि षड्विध गुणानी युक्त ' भगवान असे विशेषण देऊन आणखीही अनेक स्तुत्यर्थक वचनानी नारदांचे वर्णन श्रीकृष्ण भगवताने केले आहे.

भागवत स्कंध सहा अध्याय पंधरामध्ये अगिरा ऋषीनी नारदाना ' भगवान ' असे म्हटले आहे.

**एष ब्रह्मसुतः साक्षान्नारदो भगवान् ऋषिः ॥६–१५–१७.**

श्रीकृष्णाचा मोठा प्रपंच-परिवार व त्यात सर्वत्र प्रतीत होणारे त्याचे अस्तित्व व योगैश्वर्य नारदानी अवलोकिले आहे बाणासुराच्या येथे श्रीकृष्णाचा नातू अनिरुद्ध आहे व बाणासुर त्याचा वध करण्यास उद्युक्त झाला आहे, हे वृत्तही नारदानेच द्वारकेत येऊन श्रीकृष्णास सागितले. त्यानतर श्रीकृष्णाने शोणितपुरास जाऊन बाणासुराचा पराभव करून अनिरुद्धास परत आणले. श्रीकृष्णाच्या बहुतेक लीलातून नारद ऋषीचा सबंध आला आहे

पुढे तर नारद श्रीकृष्णाचे अखंड सान्निध्य प्राप्त व्हावे म्हणून नित्य द्वारकेत वास्तव्य करू लागले. तेथे मुहूर्तभर तू एके ठिकाणी राहणार नाहीस हा दक्षशापही

चालत नव्हता 'दक्षशाप न बाधी कृष्णापाशी । म्हणोनि नारद वसे द्वारकेसी ।। (एकनाथी भागवत १-२८०) असेच श्रीनारद द्वारकेत असता एकदा वसुदेवाच्या गेले. वसुदेवाला फार आनंद झाला. त्याने आदराने नारदाची पूजा केली व पुष्कळ वर्णनही केले वसुदेव म्हणतो 'भगवन्भवतो यात्रा स्वस्तये सर्व देहिनां । कृपणाना यथा पित्रोरुत्तमश्लोकवर्त्मनाम् ।।' (भा. ११-२-४.) 'हे ऋषिवर्य, आपले भ्रमण सर्व जीवाच्या कल्याणार्थ असते मातापिता जसे बालकाच्या कल्याणाची काळजी घेतात तसेच महाभागवत आपल्यासारखे संतसज्जन दीनाची काळजी घेऊन त्याच्या कल्याणार्थ सतत झटत असतात.' या श्लोकावरील आपल्या टीकेत श्री. नाथमहाराज म्हणतात

नारदा तूं भगवद्रूप । तुझी भेटी करी निष्पाप ।
तुवां कृपा केलिया अल्प । स्वये चित्स्वरूप ठसावे ।। ४९ ।।
नारदा तूं देवा समान । हेही उपमा दिसे गौण ।
तेचि विषयी निरूपण । वसुदेव आपण निरूपी ।। ५३ ।।
देवापासूनि भूतसृष्टी । सुखदु:खें शिणे पोटी ।
अतिवृष्टी कां अनावृष्टी । भूतकोटी आकांतू ।। ५४ ।।
त्या देवा परिस साधू अधिक । हे साचचि मज मानले देख ।
देव चरिते उडी सुखदु:ख । साधू निर्दोख सुखदाते ।। ५५ ।।
त्याही माजी तुजसारखा । जोडल्या कृपाळू निजात्म सखा ।
तै पेठपिके परमार्थ सुखा । हा महिमा लोकां कदा न कळेचि ।।५६।।

यानतर नारदाच्या समत्व स्थितीचे वसुदेव वर्णन करतो

तू देवांचा आप्त होसी । दैत्यही विश्वासती तुजपाशीं ।
रावण तुज नेऊनि एकांतासी । निज गुह्यासी स्वयें सांगे ।।६०।।
देव रावणे घातले बंदी । तो रावण तुझे चरण वंदी ।
शेखी रामाचा आप्त तूं त्रिशुद्धी । विगम तुजमधी असेना ।।६१।।
जरासंध कृष्णाचा वैरी । तुझी चाल त्याच्या घरी ।
आणि कृष्णाचे सभेमाझारी । आप्तत्वें थोरी पै तुझी ।।६२।।
नाम घेऊंनेदीं देवाचे । हे ब्रीद हिरण्यकशिपूचें ।।
त्यासी कीर्तन तुझे रुचें । विषमत्व साचे तुज नाही ।।६३।।
तुवा व्यास देखोनि सज्ञान । उपदेशीलें गुह्यज्ञान ।
ध्रुवबाळक अज्ञान । म्हणोनि जाण नुपेक्षिसी ।।७२।।
प्रल्हाद उपदेशिला जेव्हां । दैत्य पुत्र न म्हणसी तेव्हां ।
तुझिया कृपेचा हेलावा । तो निर्जावसांवा दीनांसी ।।७३।।

**वरिवरी दाविसी मिथ्या कोप । कोपोनि सांडविशी त्याचे पाप ।**
**शेखी सायुज्याचे दीप । दाविशी सद्रूप दयाळुवा ।।७५।।**

——नाथभागवत २.

एवढे नारदाचे वर्णन केल्यावर वसुदेवाने नारदास भागवत धर्म विस्ताराने मागण्याची विनंती केली. नारदाना अश्चर्य वाटले, प्रत्यक्ष परमात्मा याचे पोटी कृष्णरूपाने अवतरला असता मला हे विचारतात यावर वसुदेव म्हणाला, आम्ही पूर्वी देवाची पुष्कळ आराधना, तप इत्यादी केले. पण ते आमचे भजन ममतेमुळे वाया गेले देव आमच्या तपाने प्रसन्न झाला असता त्या देवमायेने मोहित आम्ही त्याला तू आमचा पुत्र हो असे मागितले त्याप्रमाणे तो पुत्ररूपाने आमच्या उदरी आला व तो नेहमी आम्हालाच मोठेपणा देतो.

**तो हा माझा पुत्र श्रीकृष्ण । परी मज न सांगे ब्रह्मज्ञान**
**तोचि वंदी माझे चरण । म्हणे बाळकपूर्ण मी तुझे ।।**

——नाथभागवत २–८८

म्हणून आपण संतश्रेष्ठ आहा आपण मला भागवतधर्म सविस्तर सागा, असे वसुदेव वचन ऐकून नारदास फार संतोष वाटला श्रीनाथमहाराज म्हणतात :

**यालागी मुक्त मुमुक्षु विषयीजन । भागवतधर्मे निवती संपूर्ण**
**तोचि वसुदेवे केला प्रश्न । तेणें नारद पूर्ण सुखावला ।।**२–१२८

नारदानी एका पुरातन इतिहासाचा अवलंब करून विदेह नवयोगेश्वर याच्या सवादाच्याद्वारे भागवतधर्माचे विस्तृत निरूपण केले. विशेषत तोच भागवतधर्म या भक्तिसूत्रातून पटवून दिला आहे

पद्मपुराणात एक कथा अशी आहे की श्रीशंकरानी भगवताच्या गुणलीला-रसिक देवर्षी नारदाला श्रीराधा-कृष्णाची उपासना, त्याचे स्वरूप व मत्रादिकाच्या बाबतीत बऱ्याच रहस्यमय व महत्त्वाच्या गोष्टी सागितल्या, श्रीकृष्णाचे 'मत्रचिता-मणी' नामक दोन अत्युत्तम मंत्र एक षोडशाक्षर व दुसरा दशाक्षर हे त्यानी सागितले. त्यापैकी षोडशाक्षर मत्र म्हणजे **गोपी जनवल्लभ चरणान् शरणं प्रपद्ये** ।' हा व दशाक्षर '**नमो गोपी जनवल्लभाभ्याम्**' हा होय, हे सागून व्रजमहात्म्य व श्रीकृष्ण-राधा-ध्यान-उपासनाही सागितली आहे.

स्कंद पुराण माहेश्वर खंड कुमारिका खडात एका ठिकाणी श्रीसूर्यदेवतेने नारदाचे वर्णन 'देवर्षी नारद हे सर्व प्रकारे धन्य आहेत. ते त्रैलोक्याच्या यावत्स्वरूपाला पूर्णपणे जाणतात.' असे केले आहे

नारदांचे एवढे महत्त्वपूर्ण वर्णन सर्वत्र केले असता नारद हे कळलावे आहेत, निष्कारण दोन पक्षात भाडणे लावतात, त्यामुळे अनेक युद्धे झाली आहेत, असे कोठे

कोठे म्हटले जाते. या विषयात स्कंदपुराणात स्पष्ट उल्लेख सापडतो. तेथे प्रत्यक्ष अर्जुनानेच नारदास प्रश्न केला आहे, 'हे देवर्षे, आपण सर्व प्राणिमात्रांविषयी समान भाव ठेवणारे, जितेंद्रिय, रागद्वेषरहित आहा तथापि तुमच्या ठिकाणी कलह लावण्याची जी प्रवृत्ती आहे तिच्यामुळे अनेक युद्धे झाली व अनेक देवता, गंधर्व, राक्षस, मुनी नष्ट झाले. महाराज, अशी आपली लीला का होते? माझ्या या संशयाचे निवारण आपण केले पाहिजे.' अर्जुनाच्या मुखातून हे ऐकल्यावर नारद हसले. तेथे बाभ्रव्य नावाचे एक हारीत कुलात ज्यांचा जन्म झाला असे मुनी होते, त्यांच्या मुखाकडे पाहून नारदांनी संकेत केला. नारदांचे अंतःकरण जाणून ते बाभ्रव्य अर्जुनास म्हणाले, 'हे अर्जुना, तुम्ही नारदाना विचारले ते सर्व खरे आहे. या विषयात भगवान श्रीकृष्णाच्या तोंडून ज्या गोष्टी आम्ही ऐकल्या त्या तुम्हास सांगतो. एकदा भगवान श्रीकृष्ण सर्व यादवांसमवेत महीसागरसङ्गम या क्षेत्री यात्रेकरिता आले होते. त्याचे समागमे वसुदेव, उग्रसेन, प्रद्युम्न, बभ्रू हेही होते. तेथील तीर्थात स्नानदानादि विधी केल्यानतर श्रीनारद महर्षी तेथे आले असता त्यांचीही श्रीकृष्णाने पूजा केली सर्व यादवही तेथे उपस्थित होते. तेव्हा उग्रसेनाने श्रीकृष्णास म्हटले, 'हे जगदीश्वरा, मी एक संशय विचारतो, त्याचे आपण समाधान करावे. ज्याची आपण पूजा केली हे महाबुद्धिमान नारद आहेत व सर्व जगात याची ख्याती आहे पण हे एवढे चंचल का? वायूप्रमाणे सतत सर्व जगात भ्रमण करीत असतात? तसेच परस्परात भाडणे लावणे याना का आवडते? तसेच आपल्या ठिकाणी याचे अत्यंत प्रेमही कसे आहे?' यावर श्रीकृष्ण म्हणाले, 'तुम्ही विचारले ते खरे आहे. मी याचे कारण सागतो. पूर्वी दक्षप्रजापतीने नारदाला दोन शाप दिले होते. त्याचे कारण दक्षपुत्राना नारदांनी निवृत्तिमार्गाचा उपदेश केला होता. (ही कथा आरभी आली आहे) त्यात पहिला शाप असा होता की तू सदा या जगात भ्रमण करीत राहशील, तुला एका ठिकाणी स्थान राहणार नाही व दुसरा शाप, तू इकडच्या चहाडचा तिकडे सांगत राहशील, म्हणजेच कलह लावीत राहशील. या दोन्ही शापांचा नारदांनी जशाचा तसा स्वीकार केला. कारण साधुत्व हेच आहे की स्वतः समर्थ असूनही दुसऱ्याच्या अपराधाची क्षमा करणे.' श्रीकृष्ण म्हणाले, 'नारदऋषी प्रथम हे पाहतात की अमूक दैत्यराक्षस याचा विनाशकाल प्राप्त झाला आहे, तेव्हा ते त्याची कलहभावना वाढवितात. चहाडी म्हणून खोटे न बोलता खरीच गोष्ट त्याला सांगतात. म्हणून हे त्या पापाने लिप्त होत नाहीत. सर्वत्र भ्रमण करीत असूनही याचे मन ध्येयापासून विचलित होत नाही. म्हणून भ्रमणदोषाने हे भ्रात होत नाहीत?' श्री एकनाथ महाराजही सांगतात :

**पाहे पां देवर्षि नारदु । विनोदे न मोडे समाधिबोधू ।**

—नाथभागवत २–४३०

'माझ्यावर त्याचे निरतिशय प्रेम असण्याचे कारण माझेही त्याच्यावर तसेच प्रेम आहे. अहो ! मी देवराज इंद्राने जे नारदाचे स्तोत्र केले आहे त्याच स्तोत्राने दिव्यदृष्टिसपन्न नारदाची सदास्तुती करीत असतो.'

**अहं हि सर्वदास्तौमि नारदं देवदर्शनम् ।**
**महेंद्रगवितेनैव स्तोत्रेण शृणुतन्नृप ॥**

यानंतर नारदस्तुतीचे वीस श्लोक आलेले आहेत. प्रत्येक श्लोकाचे शेवटी **'नारदं प्रणमाम्यहम्'**, 'मी नारदाला प्रणाम करतो' असे श्रीकृष्णानी म्हटले आहे व या वीस श्लोकातून नारदाचे पुष्कळच वर्णन केले आहे 'जे ब्रह्मदेवापासून उत्पन्न झाले, जे अहंकाररहित आहेत, ज्याचे शास्त्रज्ञान व चरित्र कोणापासून झाकलेले नाही. उद्वेग, क्रोध, भय याचा ज्याच्या ठिकाणी सर्वथा अभाव आहे, जे धीर असूनही दीर्घसूत्री नाहीत. जे कामना वा लोभवश मिथ्याभाषण करीत नाहीत, समस्त भाविक ज्यांची उपासना करतात अशा नारदाला आम्ही नमस्कार करतो. जे अध्यात्म तत्त्वाला जाणणारे आहेत, जितेंद्रिय, ज्यांच्या ठिकाणी सरळता व्यापून आहे, जे यथार्थ भाषण करणारे आहेत जे तेज, बुद्धी, यश, नय-विनय, जन्म, तसेच तप इत्यादी सर्व गोष्टीनी महत्त्वाला प्राप्त झाले आहेत, ज्याचा स्वभाव सुखमय वेष सुदर, प्रकाशमय, पवित्र, शुभ दृष्टिसपन्न, सुदर भाषण करणारे, जे उत्साहपूर्वक सर्वाचे कल्याण करणारे असून ज्याचे ठिकाणी पापाचा लेशही नाही, सतत परोपकारनिरत, महान पंडित, आलस्यरहित, भोगात लिप्त होत नाहीत असे असून ज्यांच्या मुखातून अनेक विचित्र अशा कथा ऐकावयास मिळतात.

**नार्थे क्रोधे च कामे च भूतपूर्वोऽस्ति विभ्रमः ।**
**येनैते नाशिता दोषाः नारदं तं नमाम्यहम् ॥**

म्हणजे लोभ-काम-क्रोधादिकामुळेही ज्याना कधी भ्रम झाला नव्हता, ज्यांनी या दोषांचा संपूर्ण नाश केला आहे, जे कल्याणस्वरूप, भगवान व भागवतधर्माचे ठिकाणी दृढ श्रद्धा ठेवणारे आहेत, जे सर्वसङ्गापासून तत्त्वतः दूर आहेत, पण संगात आहेत असे वाटतात, ज्याच्या ठिकाणी कोणत्याही संशयाला जागा नाही, जे उत्कृष्ट वक्ते आहेत, जे कोणत्याही शास्त्राचे ठिकाणी दोषदृष्टी ठेवीत नाहीत, तपश्चर्या हेच ज्यांचे जीवन आहे, भगवतचिंतनाविना ज्याचा काल जात नाही, जे आपल्या मनास ताब्यात ठेवतात, ज्याना अर्थलाभ झाला असता हर्ष होत नाही, व न झाला तर खेदही होत नाही, ज्याची बुद्धी स्थिर व आत्मा अनासक्त आहे.

**तं सर्वगुणसंपन्नं दक्षं शुचिमकातरम्।**
**कालज्ञं च नयज्ञं च शरणं यामि नारदम् ।।**

स्कंदपुराण माहेश्वर कुमारिका खंड ५४–२७–४६

जे सर्वगुणसंपन्न, दक्ष, पवित्र, भयरहित व नितिज्ञ आहेत अशा नारदांना मी शरण जातो.' 'अशा प्रकारे नारदावर माझी श्रद्धा आहे म्हणूनच त्यांचेही माझ्यावर निरतिशय प्रेम आहे इतकेच नव्हे, जे कोणी या स्तोत्राचा पाठ करून वरील गुण अंगी आणण्याचा प्रयत्न करतील तेही नारदाच्या कृपेस पात्र होतील !'

श्रीनारद महर्षींनीच दत्तात्रेयास ज्ञानोपदेश केला अशी कथा वायुपुराणात आहे अत्री ऋषीच्या येथे तिन्ही देव श्रीदत्तात्रेयरूपाने अवतरले. पण जसे जसे ते मोठे होऊ लागले तशी तशी त्याची संसाराविषयी अप्रीती होऊन ते उदास राहू लागले. बालोन्मत्त पिशाच्चवत् त्याची वृत्ती होती. त्यावेळी अत्री ऋषी व अनुसूया दोघांनाही फार चिंता निर्माण झाली अत्री हे ब्रह्मदेवाच्या आज्ञेने जगत्सर्जनाच्या कार्यास लागले. त्या कर्माचा त्याना अभिनिवेश होता व पुत्रानेही ही कर्मपरंपरा चालवावी असे त्याना वाटत होते पण दत्तात्रेयाची वृत्ती प्रारंभापासूनच उदासीन होती. एके दिवशी अकस्मात देवर्षी नारद तेथे आले तेव्हा अत्री व अनुसूया या उभयतांना आपली पुत्रविषयक चिंता त्याना निवेदन केली नारदाने दत्तात्रेयाची उदास वृत्ती पाहून त्याना सांगितले की, हा पुत्र सृजन कार्य करू शकणार नाही याची वृत्ती अध्यात्मप्रवण आहे तुम्ही याच्यापासून ती अपेक्षा करू नका. याच्या इच्छप्रमाणे हा ब्रह्मज्ञानी होऊन जगदुद्धार करील व मी त्याला हे अध्यात्म ज्ञान शिकवीन. असे म्हणून त्यांनी श्रीदत्तात्रेयाला ब्रह्मज्ञान सांगितले. वायुपुराणातील वरील कथेचा उल्लेख भागवत दशम स्कंधावर ज्यानी विस्तृत व प्रसादगर्भ 'हरि-वरदा' नामक टीका लिहिली, श्रीएकनाथमहाराजाच्या कृपेने ज्याना आरोग्य, भक्तिज्ञान व कविताशक्ती प्राप्त झाली त्या कृष्णदयार्णवांनी आपल्या हरिवरदा ग्रंथात अध्याय शेहेचाळीसात केला आहे.

एकदा श्रीनारद महर्षी हे हिमालयावर गेले असता हिमवानाने व त्याच्या पत्नीने त्याचा आदर करून पूजन केले. त्यावेळी पर्वतकन्या पार्वती तेथेच होती. ती वयात आली होती. उभयताना तिच्या विवाहाची काळजी होती. त्यानी नारदांना विचारले की, हिचा विवाह कोणाबरोबर होईल ? तेव्हा नारदानी तिचे हस्तसामुद्रिक पाहून सांगितले की, हिला श्रीशंकर हे वर म्हणून लाभणार आहेत. हे ऐकून उभयतांना काही विशेष आनद झाला नाही. कारण शंकर म्हणजे स्मशा-नात नग्न राहणारे. भूत, प्रेतगणांच्या सहवासात रमणारे असे आहेत. पण पार्वतीला मात्र फार आनंद झाला. नंतर नारदाच्या सांगण्यावरून पार्वतीने अरण्यात जाऊन घोर तपश्चर्या केली व शंकरांना प्रसन्न करून घेतले. म्हणजे शंकर-पार्वतीच्या

मीलनास नारद ऋषीच कारण झाले, ही कथा पुराणाच्या आधारे श्रीवाल्मीकी अवतारस्वरूप श्रीतुलसीदास यानी आपल्या मानसरामायण बालकांडात विस्ताराने सागितली आहे.

स्कंद पुराण माहेश्वर कुमारिका खंडात नारद व अर्जुन याचा संवाद विस्तृत सागितला आहे. अर्जुनाने नारद महर्षींना योगमार्गाच्या तात्त्विक स्वरूपाचा प्रश्न केला. त्यावर नारदांनी संपूर्ण योगमार्गाचे विवेचन केले आहे. योगमार्गातील यम-नियमाचे सर्व प्रकार, आसनाचे विविध प्रकार, प्राणायामाचे लघु, मध्यम, उत्तरीय असे तीन प्रकार व त्या तीन प्रकाराने म्हणजे लघुप्राणायामाने स्वेद, मध्यमाने कम्प व उत्तरीय ( उत्तम वा तृतीय ) प्राणायामाने विषादाला जिकले जाते. तसेच पूरकादी जे प्रकार योग-ग्रंथात सागितले आहेत, त्याचाही विचार केला आहे व शेवटी या उत्तम प्राणायामाने शान्ती, प्रशान्ती, दीप्ती व प्रसाद हे क्रमशः दिव्य गुण प्राप्त होतात असे म्हटले आहे. स्वाभाविक तथा आगन्तुक पापाची निवृत्ती व पापवासनाचे शमन यास शांती हा गुण मानला आहे. मानवबुद्धीद्वारा लोभ व मोह या दोषांचा पूर्णपणे निरास होणे हे ' प्रशाती ' चे लक्षण सागितले आहे. भूत-भविष्य, दूरस्थ व अदृश्य पदार्थांचे ज्ञान होणे म्हणजे ' दीप्ती. ' संपूर्ण इंद्रियाची प्रसन्नता, बुद्धी व प्राणांची शुद्धी म्हणजे ' प्रसाद ' होय. ही प्राणायामाची चार फले सागितली आहेत. अशा रीतीने प्राणायाम, प्रत्याहार, धारणा इत्यादी योगांचाच फार विस्तारपूर्वक विचार केला आहे. तसेच शरीरात षट्चक्रस्थाने कोठे कोठे आहेत, त्या चक्रांचे स्वरूप, त्याची दले सागून त्या प्रत्येकाचे ठिकाणी धारणा करून त्याच्या द्वारा षट्चक्राचे शोधन होऊन तो योगी अक्षरस्वरूपास प्राप्त कसा होतो, हे सांगून समाधिस्वरूपाचा विचार सागितला आहे यानंतर नारदांनी अर्जुनास या योगमार्गात प्रातिभ, श्रावण, दैव, भ्रम व आवर्त हे पाच उपसर्ग कसे येतात तेही सविस्तर प्रत्येकाच्या लक्षणासह सागितले आहे. सपूर्ण शास्त्राची प्रतिभा (ज्ञान) होणे, हा प्रातिभ उपसर्ग आहे कारण या योगाने अहंकार वाढतो, तो योगी योगमार्गापासून च्युत होतो. दुरून शब्दाचे श्रवण होणे श्रावण, हा जरी सात्त्विक असला तरी गर्वास कारण म्हणून उपसर्ग आहे. देवतांच्या अष्टयोनीचे ज्ञान होणे ही शक्ती प्राप्त होणे हा ' दैव ' उपसर्ग होय. पाण्याच्या भोवऱ्यात सापडलेला माणूस जसा व्याकुळ होतो तसे सहसा प्रकट झालेल्या विविध विज्ञानाच्या आवर्तामध्ये सापडून जी चित्ताची व्याकुळता होते तो ' आवर्त ' नामक उपसर्ग आहे; हा रजोगुण प्रधान आहे. यानंतर मृत्यू ओळखण्याची साधने ही पुष्कळच दाखविली आहेत. तसेच, पंचतत्त्वावर विजय मिळविण्याने सिद्धी कशा प्राप्त होतात व त्याचे चौसष्ट प्रकार कसे सिद्ध होतात तेही सविस्तर प्रतिपादिले आहे. शेवटी हा योगी ब्रह्मस्वरूपास कसा प्राप्त होतो याचाही विचार केला आहे.

योगविषयक एवढा व्यापक विचार योगग्रंथातूनही सापडत नाही. त्याचे अनेक सूक्ष्मातिसूक्ष्म भेद नारदानी अर्जुनास दाखविले. यावरून योगमार्गातही नारद महर्षींचा अधिकार किती श्रेष्ठ होता, हे कळून येते

भविष्य पुराणातील श्रीराधाष्टमीव्रत कथनप्रसगी श्रीकृष्णानी नारदास श्रीराधादेवीचा व आपला अत्यंत प्रेमभाव कसा आहे व राधेची भक्ती किती श्रेष्ठ आहे, हा सविस्तर विचार सागितला आहे तसेच सनत्कुमार संहितेमध्येही नारद महर्षींना सनत्कुमारांनी प्रेमभक्तीचा विशेष प्रकार सांगितला आहे.

पद्मपुराण भागवतमहात्म्याच्या प्रारंभी अशी कथा आहे की, श्रीनारद महर्षी एकदा कलियुगारंभी फिरत फिरत यमुनेच्या काठावर आले. तेथे त्यांनी एक आश्चर्यकारक दृश्य पाहिले. तेथे एक तरुण स्त्री अत्यंत दुःखी मनाने विषण्ण स्थितीत उभी आहे, तिच्या पुढे दोन वृद्ध पुरुष निश्चेष्ट अवस्थेत पडलेले आहेत, त्याची स्थिती अगदी अचेतनवत झाली आहे, ती त्यांची सेवा करीत आहे व त्याना उठविण्याचा प्रयत्न करीत आहे. असहाय अवस्थेत कोणी आपले रक्षण करणारा भेटेल की काय म्हणून चहूकडे पाहत आहे, अशा स्थितीत नारद तेथे गेले. त्यांना पाहून ती स्त्री म्हणाली, ' हे साधो ! क्षणभर येथे थांबा. माझी चिंता दूर करा. तुमच्या संतांच्या कृपेने माझे दुःख दूर होईल, असे मला वाटते. जेव्हा भाग्य उदित होते तेव्हा आपल्यासारख्या साधूचे दर्शन होते. ' नारदानी त्या स्त्रीला विचारले, ' हे स्त्रिये ! तू कोण आहेस ? व हे निश्चेष्ट पडलेले दोन पुरुष कोण आहेत ? याची अशी स्थिती का झाली ? व तू स्वत. अशी दुःखी का दिसतेस ?' हे ऐकून ती स्त्री म्हणाली, ' महाराज ! मी भक्ती या नावाने प्रसिद्ध आहे व हे दोघे माझे पुत्र आहेत व या कलिकालाच्या दोषामुळे हे वृद्धावस्थेने जर्जर झाले आहेत. मीही अशीच वृद्ध झाले होते, पण फिरत फिरत वृंदावनास आले, त्यामुळे मला पुन्हा पूर्ववत तारुण्य प्राप्त झाले. पण हे माझे पुत्र, तसेच वृद्ध व दुर्बल राहिले. कारण ज्ञानवैराग्याचा ग्राहक कोणी भेटला नाही. ' यावर नारदांनी सध्या कलियुग आहे, त्याचा हा परिणाम आहे म्हणून कलियुगाचे विस्तृत स्वरूप व परिणाम समाजावर कसा अनिष्ट होत आहे, हे सांगून नंतर ते म्हणाले, असे जरी हे पापी युग आहे, तरी यातही एक महत्त्वाचे वैशिष्टय आहे की, येथे केवळ नामस्मरणभक्तीने मानवाचा उद्धार होतो, अशी पुष्कळ वचने आहेत. तुला घाबरण्याचे कारण नाही. कृतत्रेतादी युगामध्ये ज्ञानवैराग्य हे मोक्षाचे साधन मानले जात होते, ' कलौ तु केवला भक्तिर्ब्रह्मसायुज्यकारिणी ' (२-४) येथे केवळ भक्तीनेच ब्रह्मसायुज्य प्राप्त होते. म्हणून भगवंताने तुला एवढे सुंदर रूप देऊन निर्माण केले आहे. तू त्यावेळी त्या भगवंताला विचारलेस की, देवा ! मी आता काय करावे ? तेव्हा भगवान म्हणाले, माझ्या भक्तांचे तू पोषण कर. त्यांना विसंबू

नकोस.ज्यावेळी तू त्याच्या आज्ञेचा अंगीकार केलास तेव्हा तो **श्रीहरी प्रसन्न झाला** व तुझ्या सेवेकरिता मुक्ती ही दासी दिली व ज्ञान-वैराग्य पुत्रत्वाने दिले. **पण या** घोर कलियुगाच्या प्रभावामुळे त्यांची ही अवस्था झाली. पण तू चिंता करू नकोस. मी माझ्या मामर्थ्याने, हे भक्तिदेवी ! घरोघरी तुझी स्थापना करीन.

**तस्मिन्स्त्वां स्थापयिष्यामि गेहे गेहे जने जने** ।। २-१३,

' जर मी हे न करीन तर, मी हरिदास म्हणवून घेणार नाही. कारण कलि-युगात भक्ती हेच साधन श्रेष्ठ आहे ' आणखीही या भक्तियोगाचे महात्म्य सागून व आपली प्रतिज्ञा व्यक्त करून नारदानी त्या भक्तिदेवीला आश्वासन दिले. तेव्हा ती म्हणाली, ' हे नारदा ! तू धन्य आहेस तुझ्या ठिकाणी माझी निश्चल श्रद्धा राहील. तू कृपा करून माझी चिता दूर केलीस. पण माझे हे ज्ञानवैराग्य पुत्र अद्यापी अचेतनच आहेत, त्यांना तू जागे कर ' तेव्हा नारदांनी आपल्या हाताने त्यांना हालवून जागे केले व कानातही मोठ्याने ओरडून सांगितले, ' हे ज्ञान, हे वैराग्या, लौकर जागे व्हा ' त्या बरोबर ते दोघे जागृत झाले. त्यावेळी नारदाना अकस्मात सनत्कुमारांची भेट झाली. त्यांनीही नारदाचे वर्णन केले आहे. ते म्हणतात,

**अहो नारद धन्योऽसि विरक्तानां शिरोमणिः ।**
**सदा श्रीकृष्णदासानामग्रणीर्योगभास्करः** ।। २-५४.

' हे नारदा ! तू धन्य आहेस, सर्व विरक्तांचा शिरोमणी आहेस, तसेच श्रीकृष्णभक्तांमध्ये सर्वश्रेष्ठ आहेस योगाचा सूर्याप्रमाणे प्रकाशक आहेस '

—प. पु. भागवत महात्म्य, अ. २.

श्रीवाल्मीकी ऋषीचे गुरूही श्रीनारदच होते, ही कथा सर्वत्र प्रसिद्धच आहे. श्रीएकनाथमहाराज सांगतात,

**केवळ वाट पाडा देख । भजनेवीण एकाएक ।**
**महाकवी केला वाल्मीक । अमर अवश्यक वंदिती त्यासी** ।। ७० ।।
**देखोनि ज्याचिया ग्रंथासी । सुख वोसंडे सदाशिवासी ।**
**ऐसा तू कृपाळ होसी । अनाथासी कुवांसा** ।। ७१ ।।
**वरिवरी दाविसी मिणधाकोप । कोपोनि सांडविशी त्याचे पाप ।**
**शेखी सायुज्याचे दीप । दाविसी सद्रूप दयाळुवा** ।। ७२ ।।

—नाथभागवत, अ. २.

अध्यात्म रामायणामध्ये स्वतः वाल्मीकी ऋषीनेच श्रीरामचंद्राजवळ नारद-कृपेनेच माझा उद्धार झाला, असे आपले विस्तृत चरित्र सांगितले आहे.

पाच पांडवांचा एकाच द्रौपदीशी विवाह झाला असता त्यांच्यात परस्पर

वैमनस्य उत्पन्न होण्याचा संभव आहे, हे पाहून श्रीनारदऋषी तेथे गेले व त्यांना एकाच स्त्रीविषयी परस्परात द्वेष निर्माण झाल्याने सुंदउपसुंद या दोन भावांचा कसा नाश झाला, ही कथा विस्तृत रूपाने सागून फार सावध राहण्याविषयी सर्वांना बोध केला. त्याला अनुसरूनच पांडवानी आपल्या वर्तनाचे नियम बनविले व एक बंधू द्रौपदीशी एकान्तात असला व त्या वेळी चुकून जरी दुसरा तेथे गेला-तर त्याने बारा वर्षे तीर्थयात्रेस गेले पाहिजे, अशा नियमाने स्वतःस बांधून घेतले. एका ब्राह्मणाच्या गाई चोराने रात्री पळवून नेल्या असता तो अर्जुनाकडे आला. तेव्हा अर्जुन शस्त्रे आणण्याकरिता धर्मराजाचे मंदिरात गेला. तेथे दोघे एकान्तात असलेले त्याने पाहिले शस्त्रे घेऊन ब्राह्मणाच्या गाई चोरापासून सोडवून आल्यावर त्याने पूर्वनियमाप्रमाणे बारा वर्षे तीर्थयात्रा केली. तेव्हा धर्मराजाने त्याला पुष्कळ सांगितले की, तू काही मुद्दाम आला नव्हतास. शस्त्राच्या निमित्ताने आला होतास तेव्हा हा नियम तू नाही पाळलास तरी हरकत नाही. पण अर्जुन म्हणाला, धर्माचरणात पर्याय नसतो. तो जसाच्या तसाच आचरला पाहिजे. यावरून पांडवांवरही नारदांचा किती प्रभाव होता त्याच्यात परस्पर प्रेम राहावे याची किती कळकळ त्यांना होती हे सिद्ध होते.

नारदाच्या नावावर सर्व पुराणांतून, तसेच महाभारतातील पर्वापर्वातून अनेक कथा उपलब्ध आहेत त्यात व्यवहार, धर्मशास्त्र, नीतिबोध, राजकारण, अध्यात्म; सामाजिक न्याय हे सर्वच विषय जरी आले आहेत. तरी विशेषरूपाने त्यांनी अनेकांना भक्तिमार्गाला लावले. भक्तीचा भारतातच नव्हे तर सर्व ब्रह्माण्डात प्रचार ते करीत असत हे स्पष्टरूपाने सिद्ध होते. अठरा पुराणे व भारतादी ग्रंथांतून त्यांच्या संबंधी ज्या अनेक कथा दिसून येतात, त्या सर्वच संग्रहित करून लिहावयाच्या म्हणजे ते एक महापुराणच होईल !

भारतातील सर्व युगात झालेल्या ऋषिमुनींनी व साधुसंतांनी देखील नारदाचे अनेक प्रकारे वर्णन केले आहे हे त्याच्या वाङ्मयात आपणास आढळते.

## नारद नावाचा अर्थ

सामान्यत. नारद चरित्राचा विचार केल्यानंतर ' नारद ' शब्दाच्या अर्थाचा विचार करू. पुराणादिकांतून नारद शब्दाचे अनेक अर्थ केलेले आढळून येतात.

१. ' नरे परमेश्वरे सदा तिष्ठतीति नारं ज्ञानं तद्दाति व्यासादिभ्य इति नारदः '

नर म्हणजे परमेश्वर त्याच्या ठिकाणी सदैव असणारे ते नार म्हणजे ज्ञान, ते व्यासादिकांना देतो म्हणून त्यास नारद म्हणतात.

२. ' यद्वा नरेषु जीवेषु तिष्ठतीति नारमज्ञानं द्यति खंडयति इति नारदः'

नर म्हणजे जीव त्यांचे ठिकाणी असणारे नार म्हणजे अज्ञान, त्याचे खंडण करतो म्हणून तो नारद होय.

३. ' अरदो दोषदो न भवतीति वा नारदः '

अर म्हणजे दोष देणारा होत नाही म्हणून नारद.

४. ' यद्वा ऽ ऽ रः शस्त्रभेदस्तद्वदायुः खंडको न भवति इति नारद.'

अर म्हणजे शस्त्र, ते जसे दुसऱ्याच्या आयुष्याचा नाश करते तसा ' अरद ' म्हणजे नाशक जो होत नाही म्हणजे सर्वांचा रक्षण करणारा होतो तो नारद.

५. ' नारं नरसमूहं दयते पालयति ज्ञानदानेनेति नारद :'

नार म्हणजे नरसमूह त्याचे ज्ञानदानाने पालन करतो म्हणून नारद.

६. ' नार म्हणजे नरांच्या, मानवाच्या अंतर्यामी असणाऱ्या परमात्म्याची अथवा नराकृती परब्रह्म भगवान श्रीकृष्ण, त्याची जनमानसात सर्वांच्या हृदयात भक्तीच्या उपदेशाने स्थापना करतो तो नारद ' म्हणजे येथे निर्गुण व सगुण स्वरूपातील परमात्म्याच्या भक्तीचा ते प्रसार करतात हा अर्थ अपेक्षित आहे

७. ब्रह्मवैवर्त पुराणात ' नारद ' शब्दाची खालील प्रमाणे व्याख्या केली आहे.

ददाति नारं ज्ञानंच बालकेभ्यश्च बालकः ।<br>
जातिस्मरो महाज्ञानी तेना ऽ यं नारदाभिधः ।।

' नार म्हणजे ज्ञान, ते जो ध्रुव प्रल्हाद इत्यादि बालकांना देतो व पूर्वजन्मातील स्मृती ज्याला असून जो महाज्ञानी आहे त्यास नारद ही संज्ञा आहे. '

तात्पर्य, नारद या नावावरूनही या पुरुषाचे श्रेष्ठत्व सिद्ध होते.

श्रीएकनाथमहाराज आपल्या भावार्थ रामायणनामक प्रासादिक ग्रंथात नारदाचे श्रेष्ठत्व सांगतात.

**ब्रह्मपुत्र श्रीनारद । सर्वेंद्रियी ब्रह्मबोध ।**<br>
**ब्रह्मवीणा सुस्वरनाद । नित्य आनंद ब्रह्मपदी ।। ३ ।।**<br>
**ब्रह्मानंदे डुल्लत । ब्रह्मसृष्टी विचरत ।**<br>
**भुवने भुवन हिंडत । स्वेच्छा विचरत ब्रह्मांड ।। ४ ।।**

भावार्थ रामायण यु. का. ७५.

## नारदांच्या नावावरील वाङ्मय :

आतापावेतो आपण श्रीनारद ऋषीचा अधिकार केवढा थोर आहे हे पाहिले, सर्व युगांत, सर्व लोकांत, सर्व शास्त्रांत, सर्व समाजांत, व सर्व कार्यांत त्यांचा प्रवेश आहे. सत्ययुग, त्रेता, द्वापार किंबहुना या घोर कलिकालातही अधिकारी भक्तांना त्याचे दर्शन होत असते. गोलोक, वैकुंठ, सत्यलोकापासून पातालादि सर्व लोकांत

मनात येताच योगबलाने कोठेही अप्रतिहत संचार ते करू शकतात. वेद, स्मृती, पुराणसंहिता, ज्योतिष, संगीत, इत्यादी सर्वांत त्यांची गती असून अनेक शास्त्रांवर अधिकृत असे त्यांच्या नावावर वाङ्मयही आहे. त्यांचे चरित्र पाहिल्यास ते स्वतः-करिता काहीच करीत नव्हते. ज्या कार्यात एखाद्याचे कल्याण होत असेल अथवा भगवंताची काही अद्‌भुत लीला प्रकट होत असेल तेच कार्य करीत असत. त्यांचे कलह लावणे इत्यादी चेष्टादेखील लोकहितार्थ व भगवल्लीलासमाधानार्थ होत होत्या.

देवर्षी नारदाच्या नावावर ' नारदपांचरात्र ' नामक मोठा आगम ग्रंथ प्रसिद्ध आहे. तो फार विस्तृत आहे. महाभारत शांतिपर्वात व्यासांनी या पांचरात्राविषयी ' इदं महोपनिषदं चतुर्वेदसमन्वितम् ' असे म्हटले आहे. श्रीशंकरांनी हे नारदाना सांगितले. तसेच '**यथानिपीय पीयूषं न स्पृहाचान्यवस्तुषु। पञ्चरात्रमभिज्ञाय नान्येषुच स्पृहा सताम् ॥**' म्हणजे ' अमृतप्राशन केल्यानंतर अन्य वस्तूची इच्छा होत नाही त्याप्रमाणे पञ्चरात्राचे ज्ञान झाल्यावर संताना दुसऱ्या वस्तूची स्पृहा होत नाही. ' येथे ' रात्र ' शब्द ज्ञानवाचक आहे ' पंच ' म्हणजे विस्तारपूर्वक, ' रात्र ' म्हणजे ज्ञान ज्यात सांगितले आहे त्यास पाचरात्र म्हणतात. तत्त्व, मुक्ती, भक्ती, योग, विषय ही त्याची पाच अंगे आहेत. तसेच पांचरात्रे एकूण ब्राह्म, शैव, कौमार वशिष्ट, कापिल, गौतमीय व नारदीय अशी सात आहेत. नारदानी इतर सहा पाचरात्रे, वेद, पुराण, इतिहास, धर्मशास्त्रे इत्यादिकाचे मंथन करून ज्ञानामृतरूप हे नारदीय पंचरात्र प्रस्तुत केले आहे, असे नारदपंचरात्रातील खालील श्लोकात सांगितले आहे.

**षट्पञ्चरात्रं वेदांश्च पुराणानि च सर्वशः ।**
**इतिहासधर्मशास्त्रं शास्त्रं च सिद्धियोगजम् ॥**
**दृष्ट्वा सर्वं समालोक्य ज्ञानं संप्राप्य शंकरात् ।**
**ज्ञानामृतं पञ्चरात्रं चकार नारदो मुनिः ॥**
**सारभूतं च सर्वेषां वेदानां परमाद्भुतम् ।**
**नारदीयं पंचरात्रं पुराणेषु सुदुर्लभम् ॥**

—नारदपञ्चरात्र, १–१–५८.

प्राचीनतम वैष्णवसाहित्याचे नारद पंचरात्रागम हे एक महत्त्वाचे अंग आहे. यात जन्म, मृत्यू, सुखदु:ख, इह व पारलौकिक समस्यांवर विचार केला आहे. यात धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचाही सविस्तर विचार केलेला दिसून येतो. विशेषतः सविशेष मोक्ष म्हणजे वैकुंठलोकप्राप्ती यावर विशेष भर दिला आहे. उपासनामार्गांचा विस्तृत असा अनेक अंगोपांगांनी यात विचार केला आहे, तसेच राधाकृष्ण प्रेमाचे विस्तृत माहात्म्य वर्णिले आहे. नारदपंचरात्रात शुकाचार्यांजवळ व्यासमहर्षी म्हणतात, ' हे शुका ! प्राचीनकाली गोलोकांतर्गत शतश्रृंगपर्वतावर

भगवती विरजेच्या तटावर पवित्र वटवृक्षातळी श्रीराधेच्या समक्ष ब्रह्मदेवास प्रत्यक्ष श्रीकृष्णाने नारदपंचरात्र सांगितले. ब्रह्मदेवाने ते ऐकून भगवती गंगेच्या तटावर शंकरापुढे याचे वर्णन केले. शंकराने ते सर्व नारदाला सांगितले व नारदाने सूर्य-ग्रहणाच्यावेळी पुष्कळ तीर्थाचे ठिकाणी माझे समक्ष याची पुनरावृत्ती केली. (ना. पा. १–१–३८.)

श्रीनारदऋषी स्वतःच याचे वर्णन करतात.

**वेदेभ्यो दधिसिंधुभ्यश्चतुर्भ्यः सुमनोहरम् ।**
**तज्ज्ञानमंथदण्डेन संनिमंथ्य नवंनवम् ।।**
**नवनीतं समुद्धृत्य नत्वाशंभोः पदाम्बुजम् ।**
**विधिपुत्रो नारदोऽहं पंचरात्रं समारभे ।।** १–१–१०, ११

वेदरूपी दधिसिंधूचे हे नवनीत आहे, ज्ञानसिंधूचे हे अमृत आहे. भगवल्लीला विस्ताराकरिता शंकराज्ञेने नारदाने हे पाञ्चरात्रशास्त्र नारायणांश व्यासदेवांना दिले असे आणखीही पुष्कळ वर्णन या ग्रंथात केले आहे. भागवतात दिग्दर्शिलेल्या सात्वतसंहितार्गत चतुर्व्यूहोपासनेचे मूळ या नारद पाञ्चरात्रागमातच आहे असे म्हटले जाते. यासच भागवतमत म्हणतात यात वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न, अनिरुद्ध अशा चार व्यूहांची कल्पना करून त्याची उपासना सांगितली आहे. यात वासुदेव पर-मात्म्यापासून संकर्षण म्हणजे जीव उत्पन्न होतो असे म्हटले आहे. श्रीशंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रावरील आपल्या भाष्यात अनेक द्वैतमताच्या खंडणप्रसंगी याही मताचे खंडण केले आहे. कारण उपनिषदात जीवाची उत्पत्ती मानली तर द्वैतापत्ती येते, ती शंकराचार्यांना मान्य नाही. पण या पाञ्चरात्रात जी उपासनेची अभिगमन, उपादान, ईज्या, स्वाध्याय, योग अशी पाच अंगे सांगितली आहेत.[१] त्याचा निषेध आम्ही करीत नाही, असे शंकराचार्यांनी तेथे स्पष्ट म्हटले आहे कारण नारद या व्यक्ती-बद्दल त्यांच्या ठिकाणीही पूर्ण आदर होता.

नारदांच्या नावावर ‘नारदस्मृती’ ही उपलब्ध आहे. त्यात सर्व आचार धर्मांचा सांगोपांग विचार केला आहे. आणि सामान्य व विशेष नीतीही विस्ताराने सांगितली आहे. नारदपुराण, नारदस्मृती, नारदपाञ्चरात्रागम व सर्व पुराणांतून, महाभारत-रामायणादि ग्रंथांतून नारदांच्या नावावर अनेक आख्याने, उपआख्याने व चरित्रभाग सापडतो. यावरून नारद या व्यक्तीचे श्रेष्ठत्व मान्य करावे लागते. नारदांच्या नावावर एक उपनिषदही प्रसिद्ध आहे.

---

१ अभिगमन– उपास्याकडे श्रद्धेने जाणे, उपादान– पूजा–उपचार गोळा करणे, ईज्या-पुजा, स्वाध्याय उपास्यविषयक स्तोत्रादिकांचे पठण, योग-ध्यान.

**सूत्रग्रंथ :**

नारद ही व्यक्ती धर्मनीतिव्यवहार, राजकारण,' तत्त्वज्ञान इत्यादी सर्व विषयांत प्रवीण होती असे जरी दिसून येते तरी विशेषत: नारदांचे श्रेष्ठत्व भक्तिमार्गातच मानले जाते, हे मागील अनेक पुराणांतर्गत पुराव्यांवरून सिद्ध होते. अनेक अभक्त, भक्त, साधक, विषयी, पामर जनांना भक्तिमार्गाकडे प्रवृत्त करण्याचे कार्य नारदऋषींनी केले आहे. त्यानही त्यानी ' भक्तिसूत्र ' रचना केली, हे परमोपकारक असे त्यांचे कार्य मानावे लागते. एखादी व्यक्ती मूर्तस्वरूपाने या जगात नांदते तोपावेतो ती आपले अगीकृत कार्य करीतच राहते पण ते कार्य तात्कालिक न राहता सर्वकालोपयोगी व्हावयाचे असेल तर ते वाङ्मय निर्मितीद्वारेच होऊ शकते. त्याचा उपयोग चिरकालिक स्वरूपाचा असतो. उदाहरणार्थ, व्यासांची पुराणे; वाल्मीकीचे रामायण, योगवासिष्ठ, श्री. ज्ञानेश्वर महाराजांची ज्ञानेश्वरी, श्रीएकनाथांचे भागवत हे ग्रंथ आजही साधक भक्तांना योग्य प्रकारे मार्गदर्शन करणारे आहेत. भिन्न भिन्न दर्शनकारही आपापली मते प्रतिपादन करणारे वाङ्मय निर्माण करीत असतात. त्यात दोन प्रकार दिसून येतात. एक विस्ताराने आपल्या मताचे प्रतिपादन करणारे, व दुसरे संक्षेपाने आपल्या मतातील सिद्धान्त पटवून देणारे. हा जो दुसरा प्रकार आहे यास सूत्रग्रंथ म्हटले जाते. सर्व शास्त्रावर त्या त्या शास्त्रकारांनी सूत्रे रचिली आहेत. वेदाच्या काही शाखावर ही सूत्ररचना केलेली आहे. त्यास श्रौतसूत्रे, गृह्यसूत्रे, धर्मसूत्रे, अशा संज्ञा आहेत. यांनाच कल्पसूत्रेही म्हटले जाते.

वेदाच्या पूर्वभागावर महर्षी जैमिनी यानी सूत्ररचना केली आहे त्याचे बारा अध्याय आहेत. त्यास पूर्वमीमामाशास्त्र असेही संबोधले जाते. ' अथातो धर्म जिज्ञासा ' हे त्याचे पहिले सूत्र आहे, तर वेदाच्या उपनिषदभागास प्रमुख मानून महर्षी वेद व्यासांनी ' ब्रह्मसूत्रे ' रचिली आहेत. ज्याचे समन्वयाध्याय, अविरोधाध्याय, साधनाध्याय व फलाध्याय असे चार अध्याय असून, पाचशे पंचावन्न सूत्रे आहेत. त्यावर अद्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, द्वैताद्वैत, द्वैत इत्यादी मते प्रतिपादन करणाऱ्या सर्वच आचार्यांची भाष्ये, त्यावर टीका-उपटीका, विवरणे इत्यादी उपलब्ध आहेत. व्याकरणशास्त्रावर पाणिनी ऋषींची सूत्रे आहेत. योगशास्त्रप्रवर्तक पतञ्जली यांची योगशास्त्रावर सूत्रे प्रसिद्ध आहेत. कणाद-गौतम ऋषिप्रणीत न्यायशास्त्रावरील सूत्रेही प्रसिद्ध आहेत सांख्यशास्त्रावरही सांख्यसूत्रे सापडतात शैवागम मतात शिवसूत्रे आहेत. सारांश, सर्वच लहान-मोठ्या दर्शनकारांनी शास्त्रकारांनी आपले मत सिद्ध करण्यास्तव सूत्ररचना केल्या आहेत. जसे पूर्वमीमांसा, उत्तरमीमांसा, योग, साख्य, न्याय इत्यादी दर्शने आहेत, तसे भक्ती हेही एक महत्त्वाचे दर्शन– शास्त्र– आहे. कारण नारदानीच आपल्या सूत्रात पुढे ' भक्तिशास्त्राणि मननीयानि । ' असे स्पष्ट म्हटले आहे. भक्ती हे जर स्वतंत्र दर्शन आहे तर त्यावरही सूत्ररचना होणे

अवश्य होते. ती करण्यास योग्य अधिकारी व्यक्तीच पाहिजे. वेदशास्त्रे-दर्शने यात सर्व प्रमेयांचा फार विस्तार केला गेला आहे. तो सर्व पाठ करणे, ध्यानात ठेवणे कठीणच काय पण अशक्यच आहे. याकरिता त्यातील जी महत्त्वाची प्रमेये लक्षात राहणे आवश्यक आहे तेवढी वेगळी काढून संक्षिप्तरूपाने पण कोणताही महत्त्वाचा आशय वगळू न देता सूत्रात मणी ओवावेत किंवा फुले ओवावीत त्याप्रमाणे ओवली जातात ' वेदान्तवाक्य कुसुमग्रथनार्थत्वात् सूत्राणा ।' असे ब्रह्ममीमासेत वेदान्तसूत्रा-बद्दल म्हटले आहे या रीतीने भक्तिशास्त्रावरही सूत्रे रचण्याचे महत्त्वाचे कार्य नारद-महर्षींनी केले आहे. या विषयात श्रीनारदाएवढा अधिकारी पुरुष अन्य सापडणे शक्य नाही भक्तिप्रचार हा त्यांच्या जीवनाचा स्थायीभावच होऊन बसला होता. भक्ती हे स्वतंत्र शास्त्र आहे ते पुरुषार्थप्रयोजक आहे, ही भावना त्यांची होती म्हणूनच त्यांना ही सूत्ररचना करावी वाटली. सूत्र या शब्दाची पारिभाषिक व्याख्या खालील प्रमाणे आहे.

**अल्पाक्षरमसंदिग्ध सारवद्विश्वतोमुखम् ।**
**अस्तोभमनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः ॥**

सूत्ररचनेत अक्षरे थोडी असतात. अक्षरे थोडी असली तरी अर्थामध्ये संशयही न राहिला पाहिजे म्हणून असंदिग्ध म्हटले आहे. विस्तृत ग्रंथात सागितलेल्या सर्व विषयाचे सार या थोडया शब्दांत आले पाहिजे. अल्पशब्दांतून अर्थही पुष्कळ निर्माण झाला पाहिजे. म्हणून विश्वतोमुखम् हे सूत्राचे विशेषण आहे तसेच त्यातील कोणतेही अक्षर निरर्थक नसले पाहिजे. काही वाक्यात च, तु, वै, इत्यादी निरर्थक अक्षराची योजना करण्यात येते. सूत्रात अशी निरर्थक अक्षरे नसतात व रचना निर्दोष असते. हे जे सूत्राचे लक्षण पूर्वसूरींनी केले आहे ते संपूर्णपणे नारदाच्या या भक्तिसूत्रास लागू पडते.

## इतर भक्तिसूत्रे :

श्रीनारदमहर्षींच्या पूर्वीही भक्तिशास्त्रावर दोन सूत्रग्रंथ लिहिले गेले होते, असे दिसून येते. एक अङ्गिरस–मध्यमीमासादर्शन (दैवीमीमासादर्शन) होय. महर्षी अङ्गिरसांचे दैवीमीमांसा किंवा मध्यमीमांसादर्शन हे युक्तियुक्त आहे. त्यात अनेक युक्तींच्याद्वारे भक्ती हे मानवाचे मुख्य कर्तव्य आहे हे पटवून दिले आहे. पण ते दर्शन विशेष प्रचारात नाही. दुसरे, शांडिल्य यांचे भक्तिदर्शन हे सूत्रात्मक आहे. नारदभक्तिसूत्रात शांडिल्याचा 'आत्मरत्यविरोधेनेति शांडिल्यः' म्हणून निर्देश केला आहे. पण ती सूत्रे भक्तिसंप्रदायात विशेष रूढ झाली नाहीत. तसेच समजा-वयास क्लिष्टही वाटतात. भक्तियोगाच्या सर्वच विषयाची सांगोपांग चर्चा त्यात दिसून येत नाही. त्या सूत्रांची संख्या एकशे दोन आहे. त्याचे तीन अध्याय असून,

प्रत्येक अध्यायात दोन दोन आन्हिके आहेत. त्या सूत्रातही नारदांच्या नावाचा उल्लेख पहिल्या अध्यायातील द्वितीयान्हिक, सूत्र अकरामध्ये केला आहे. या शाडिल्यांच्या भक्तिसूत्रावर श्रीस्वप्नेश्वरकृत भाष्य, श्रीभवदेव मिश्रकृत अभिनव-भाष्य, नारायणतीर्थकृत भक्तिचंद्रिका टीका इत्यादी उपलब्ध आहेत. त्यात भक्ति-चंद्रिका ही टीका विस्तृत व ग्रंथातरातील अनेक प्रमाणादिकांनी युक्त आहे. तीतही भक्तिशास्त्राचा विस्तृत ऊहापोह केला आहे.

'भक्तिमीमासा' या नावाने काशीमध्ये प्रकाशित एक पुस्तक उपलब्ध आहे. तोही सूत्रग्रंथच आहे. शाडिल्य सूत्रांप्रमाणे ती एकशे दोन सूत्रे आहेत. मात्र त्याचे चार अध्याय असून प्रत्येक अध्यायाचे दोन पाद आहेत. बोपदेवकृत मुक्ताफल नावाचा जो भक्तिशास्त्रावर ग्रंथ आहे त्याच्या आधारे ह्या सूत्राची रचना झाली असावी असे वाटते. कारण मुक्ताफल ग्रथाप्रमाणेच या सूत्रात भक्तिविषयक विचार आढळतात. इसवी सनाच्या तेराव्या शतकात बोपदेवाचा काल येतो. त्यानतर कोणीतरी ही सूत्रे रचली असावीत असे मानावे लागते. सूत्रकर्त्याचे नाव प्रसिद्ध नाही. बहुतेक ग्रंथाच्या शेवटी ग्रथकर्त्याचे नाव असते, पण भक्तिमीमासेच्या शेवटी तसा कोणाचा नामनिर्देश नाही, म्हणून वरील अनुमानाने ही सूत्रे अलीकडची असावीत असे वाटते. पण याही सूत्रातून भक्तिविषयक चागला विचार केलेला दिसून येतो. भक्तीचे विहित–निषिद्ध असे भेद कल्पून निषिद्धातील व विहितातील अनेक प्रकार कल्पिले आहेत. भक्ती हा भाव नसून रस आहे असे स्पष्ट म्हटले आहे. भक्तिविषयक अभ्यासूना हाही सूत्रग्रंथ चागला उपयुक्त होणारा आहे.

तशीच 'परभक्तिसूत्राणि' या नावाने श्रीस्वामी हरिहरानंदारण्यप्रणीत भक्तिसूत्रे उपलब्ध आहेत त्याची सख्या अवघी सव्वीस एवढीच आहे. 'अथ भक्तितत्त्वानुशासनम् ।' हे प्रथम सूत्र आहे शश्वच्छांती व कृतकृत्यता हे भक्तीचे फल शेवटच्या दोन सूत्रातून सागितले आहे या सूत्रकाराची विशेष माहिती व निश्चित काल मिळत नाही भक्तिमीमासासूत्रे व ही परभक्तिसूत्रे नारदभक्ति-सूत्राहून अर्वाचीन आहेत असेच मानावे लागते.

## नारदांची भक्ति सूत्रे :

नारदाना भक्तिसूत्रे रचण्याचे कारण काय घडले असावे याचा विचार केला तर असे वाटते की, जीव मनुष्यदेहात येतो तो स्वोद्धाराचा अधिकारी होऊन येतो. अनेकाना उद्धाराची आवश्यकताही वाटते व त्याकरिता शक्य ते प्रयत्नही केले जातात. पण उद्धार हा काही प्रत्यक्ष इंद्रियादिकांनी प्रतीत होणारी वस्तू नाही. ती शास्त्राप्रमाणेच अनुभवास येणारी अवस्था आहे. त्याकरिता साधक शास्त्राकडे धाव घतो तेव्हा अनेक साधनाचा पसारा त्याच्यापुढे उभा राहतो. कित्येक साधने

स्वरूपानेच कठीण आहेत. कृच्छ्चांद्रायणादि व्रते, तपे इत्यादी. कित्येकदा अधिकाराची अपेक्षा असते, कित्येक विशिष्ट देशकालव्यक्तीपुरती मर्यादित असतात. अशा स्थितीत प्राप्त अशा कलिकालात सर्वांना सर्वकाळी सुलभ असे भक्ती हेच साधन व्यासादि ऋषिमुनींनी निश्चित केले. त्याच्या सुलभतेचा विचार पुढे सूत्र ५८ च्या विवेचनाचे वेळी होईलच. पण या भक्तिमार्गातही मतामताचा गलबला होऊन अनेक पंथ, उपपथ, उपासना पद्धती, भिन्नभिन्न आचार, तसेच भिन्न प्रयोजने निर्माण झाली. त्यातही भेदाभेदांचा वादग्रस्त प्रश्न निर्माण केला गेला. भज्य-भक्ती भक्त याच्या स्वरूपात संदेह निर्माण झाले, तसेच भक्तीच्या आत्यंतिक प्रयोजनाचा विसर पडून ऐहिक-पारत्रिक फलाकरिताच भक्ती करणाऱ्या आर्तअर्थार्थींची संख्याच अधिक झाली खऱ्या भक्तीचे स्वरूप व प्रयोजन दृष्टीआड केले जात होते. अशा वेळी भक्त-भाविक समाजाला खऱ्या भक्तिमार्गाचे यथार्थ स्वरूप कळावे, भक्तीचे माहात्म्य कळावे याकरिता श्रीनारद महर्षींनी भक्तिसूत्राची रचना केली. ती अल्पाक्षर असून बह्वर्थप्रतिपादक आहेत.

कोणत्याही विषयाचा स्वरूप, साधन व फल असा तीन प्रकारे विचार करण्याची विद्वानाची पद्धत आहे या सूत्रातूनही या तिन्ही गोष्टीचा निःसंदिग्ध विचार श्रीनारदमहर्षींनी केला आहे ही सूत्रे अवघी चौऱ्यांशीच आहेत, पण फार सारगर्भ अशी आहेत. प्रामुख्याने भक्तियोगाच्या सर्वच अगाची व्याख्या त्या चौऱ्यांशी सूत्रांतून नारदमहर्षींनी केली आहे.



## सूत्र १ :

## अथातो भक्तिं व्याख्यास्यामः ।

**अर्थ :**

अथ (आता) अतः (म्हणून) भक्ति (भक्तीचे) व्याख्यास्यामः (आम्ही व्याख्यान करीत आहो.)

**विवरण :**

कोणत्याही ग्रंथाच्या आरंभी तो ग्रंथ निर्विघ्न रीतीने परिसमाप्त व्हावा म्हणून मंगलाचरण करण्याचा शिष्ट संप्रदाय आहे, त्याला अनुसरून सूत्राच्या आरंभी ' अथ ' या शब्दाचा उपयोग केला आहे. कारण ' अथ ' शब्द मंगलवाचक आहे. त्याचे कारण खालील श्लोकात सांगितले आहे.

**ॐकारश्चाथ शब्दश्च द्वावेतौ ब्रह्मणः पुरा ।**
**कंठं भित्त्वा विनिर्यातौ तेन माङ्गलिकावुभौ ।।**

सृष्टीच्या प्रारंभी भगवंताच्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवाच्या कंठातून प्रथम ' ॐ ' आणि ' अथ ' हे दोन शब्द निर्माण झाले म्हणून ते दोन्ही मंगलवाचक मानले गेले.

अथ शब्दाचा अर्थ कोशात मंगल असा नाही, पण अथ शब्दाचा उच्चार होताच मंगलवाद्य ध्वनिश्रवणाप्रमाणे मंगलभाव प्रकट होतो. म्हणून अनेक दर्शनांची जी सूत्रे आहेत त्याचा आरंभ ' अथ ' या शब्दाने झाला आहे. ' अथातो ब्रह्मजिज्ञासा ' ' अथातो धर्मजिज्ञासा ', ' अथातो धर्मं व्याख्यास्यामः ', अथ योगानुशासनम् ' इ.

वास्तविक भक्तवर्य नारद महर्षीसारखे व्याख्याते व भक्तिसूत्रासारखा विषय, येथे अमंगल काही राहणारच नाही हे खरे. पण शिष्ट संप्रदाय पालन व शिष्यांना मार्गदर्शन व्हावे या हेतूने अथ शब्दाचा प्रयोग करून मंगल साधले आहे.

अथ शब्दाचे आरंभ, अधिकार व अनंतर असे तीन अर्थ आहेत. अधिकार असा अर्थ घेतला तर इतर साधनांना जसा पूर्वी काही साधनाचरण होऊन अधिकार प्राप्त होतो, उदाहरणार्थ, धर्माचरण करणाऱ्याला वेदाध्ययनाने अधिकार प्राप्त

होतो. ज्ञानाचा अधिकार विवेक-वैराग्यादि अंतरग साधनाचरणाने प्राप्त होतो. योगसमाधीचा अधिकार यमनियमादिकानी सिद्ध होतो, तसे भक्ती हे साधन करण्यापूर्वी इतर कोणत्याही साधनाची ती अपेक्षा ठेवीत नाही. विहित कर्मे करण्यास त्रैवर्णिक अधिकारी आहे. यज्ञयागादि करण्यास गृहस्थाश्रमी अधिकारी आहे तसा येथे वर्णआश्रम, जाति अवस्था, वय इत्यादी कोणताही अधिकार लागत नाही. मनुष्यदेहात आला तो भक्तीचा अधिकारी होतो. एखादा भक्ती करीत नसेल तर तो पुरुषापराध होय. पण तो अधिकारी नसतो असे नाही म्हणून 'अथ' पदाचा अर्थ अधिकार असा घेता येत नाही.

तसेच अनतर हाही अर्थ उपयुक्त नाही काही साधने प्रथमत. इतर साधनाचरण करूनच केली जातात. तसे भक्तीचे नाही. पुढे नारदानी भक्ती स्वयंफलरूप आहे असे म्हटले आहे. तप, यज्ञक्रिया इत्यादी साधनाची भगवद्भक्तिपूर्वी अपेक्षा असते असे नाही. कारण तप, यज्ञक्रियादिकाची पूर्तता नामस्मरणपूर्विका भक्तीनेच होते, हे पुराणादिकातून प्रसिद्ध आहे. सर्वसाधननिरपेक्ष भक्ती आहे. (या विषयाचा विचार पुढे सूत्र २८, २९, ३० च्या व्याख्यानाचे वेळी विस्तृत होणार आहे.) अथवा अथ शब्दाचा अनंतर असा अर्थ घेऊन खालीलप्रमाणे उपपत्ती लाविली तरी चालेल. श्रीनारदमहर्षींनी अनेक ग्रंथ, स्मृती, पांचरात्र इ. निर्माण केले, पण त्याच्याद्वारे सर्व मानवाचा उद्धार होणे शक्य नाही. कारण त्यात केलेला विचार सूक्ष्म व गूढ आहे व सांगितलेली साधने क्लिष्ट अशी आहेत म्हणून वरील ग्रथनिर्मितीनंतर सर्वजण सुलभ अशा भक्तियोगाचे रहस्य सर्वांना पटवून द्यावे, या हेतूने सूत्राची रचना केली, असा अर्थ होऊ शकेल. 'अथ' शब्दाचा आरभ असा अर्थही घेणे योग्य होईल. कारण श्रीनारदमहर्षी या सूत्रात आम्ही आता भक्तीचे व्याख्यान करतो अशी प्रतिज्ञा करतात. हे प्रतिज्ञासूत्र म्हटले जाते. योग्य व श्रेष्ठ व्यक्तीने केलेली प्रतिज्ञा प्रयोजन सिद्ध करणारी असते. ते प्रयोजन पुढील चौथ्या-पाचव्या सूत्रातून स्पष्ट केले आहे. म्हणून 'अथ' या शब्दाने आम्ही आता या भक्तीच्या व्याख्यानास आरंभ करतो असाही अर्थ घेणे योग्य होईल.

सूत्रातील दुसरे पद 'अत:' हे आहे. 'अत:' शब्दाचे दोन अर्थ संभवतात. ते 'अत.कारणात्' 'अत प्रयोजनात्' या कारणाने व या प्रयोजनाने अशा दोन अर्थात अत. शब्दाचा व्यवहार होतो. भक्तीच्या व्याख्यानाचा म्हणजे सर्व मानवाचा भगवद्भक्तीकडे प्रवृत्त करण्याचे कारण काय हा प्रश्न निर्माण झाला तर त्याचे उत्तर हे की, सर्व मानवप्राणी संसारात गुंतले आहेत, कोणाची कोणत्या ना कोणत्या सांसारिक भोगात आसक्ती दिसून येते. कोणी धन, कोणी ऐश्वर्य, कोणी पत्नीपुत्रादि तसेच कोणी जातिधर्म, समाज, राष्ट्र याची कोणत्यातरी हेतूने, कोणत्यातरी प्रकारे भक्ती करीत असतात. पण या भोगासक्ती, वैभवासक्ती, सत्तालालसा इत्यादिकानी कधी

कोणास सुखशाती प्राप्त होणे शक्य आहे काय ? ही भोगवासना कामक्रोधादि विकार वाढविते व ते किती बाधक आहेत हे श्रीनारदमहर्षी पुढे सूत्र ४४, ४५ मध्ये स्पष्ट सागणारच आहेत. 'अत.' -शब्दाने सूत्रकार हे सूचित करतात की, ऐहिक व पारत्रिक ब्रह्मलोकापावेतो भोग प्राप्त झाले तरी विनाभगवत्प्रेमाच्या मनुष्यास खरी शाती-वास्तवसुखाची प्राप्ती होणे शक्य नाही. मानव तर त्या शांतीचा भुकेलेला आहे 'अतः, या कारणास्तव– आम्ही भक्तीचे व्याख्यान करतो.

ससारात जे जे काही इंद्रियगोचर दृश्य पदार्थ आहेत ते क्षणविनाशी आहेत. क्षणाक्षणाला प्रत्येक वस्तू झिजत जात असलेली आपणास दिसते. कोणतीही वस्तू टिकणारी नाही. सताची वचने हे असत्यत्व पटवून देणारी अनेक आहेत, पण आपला अनुभवही असाच नाही काय ? सर्वच वस्तू परिच्छिन्न, असत्, जड, दु खरूप, सत्ताशून्य अशा आहेत केवळ परमात्मा हाच एकमेव सत–चित्–आनदस्वरूप आहे, हे श्रुति-स्मृतिसतवचनानी अनेक उपपत्तीच्या द्वारे स्पष्ट केले आहे. तो अविनाशी आहे. तो आमच्या हृदयाला सोडून कधीही राहत नाही, तो एकमेव सुखप्रदाता आहे 'अत.' या कारणास्तव विनाशी दु.खरूप अशा या ससारातून सुटून अविनाशी सत्य व सुखस्वरूप परमात्म्याची प्राप्ती व्हावी या प्रयोजनाच्या इच्छेने भक्तीच्या व्याख्यानास आरभ केला जातो येथे 'भक्ति व्याख्यास्याम' ' अशी प्रतिज्ञा आहे ही करण्याचे कारण असे की, वेद, उपनिषदे, धर्मशास्त्र, वेदान्तशास्त्रावरील सर्व दर्शनावर सूत्रे रचली गेली, पण भक्तिशास्त्रावर योग्य प्रकारची सूत्रे रचली गेली नाहीत. प्राप्त कलिकालात तेच एकमेव मानवमात्राच्या उद्धाराचे महत्त्वाचे साधन आहे जर त्यावर सूत्ररचना न केली तर त्या साधनाचे महत्त्व ठरणार नाही, त्याला सामान्यत्व प्राप्त होईल, म्हणून श्रीमहर्षी नारदऋषीनी प्रतिज्ञापूर्वक ही सूत्ररचना केली असावी असे वाटते कारण त्याचा अवतारच श्रीतुकाराम महाराजानी म्हटल्याप्रमाणे : 'वाढावया सुख भक्तिभाव धर्म ' याकरिता होता. देवर्षी नारदाचे पिते श्रीब्रह्मदेव यानी त्याना असा आदेशच दिला होता **यथा हरौ भगवतिनृणां भक्तिर्भविष्यति** ॥ 'तू असाच प्रचार कर, की ज्यायोगे मानवमात्राची भगवंताचे ठिकाणी भक्ती निर्माण होईल ' नारदानी भक्तिदेवीपुढे स्वतः अशी प्रतिज्ञा केली होती–

**अन्यधर्मान्स्तिरस्कृत्य पुरस्कृत्य महोत्सवान् ।**
**तदानाहं हरेर्दासो लोकेत्वां न प्रवर्तये ॥**

–श्रीभागवत माहात्म्य २. १४.

'अन्य सर्व धर्मांची उपेक्षा करून मी सर्व लोकांत मोठ्या उत्साहाने तुझी (भक्तीची) स्थापना न करीन तर मी श्रीहरीचा सेवक होऊ शकणार नाही ?

पित्याची आज्ञा, आपली प्रतिज्ञा, क्लेशमग्न जीवाच्या उद्धाराचे एकमेव क्लेशरहित हेच साधन आहे या वर विश्वास, यामुळे नारदांनी भक्तिसूत्रे रचली. श्रुतीही.

**भक्तिरेवैनं नयति । भक्तिरेवैनं दर्शयति । भक्तिरेवैनं गमयति ।**
**भक्तिवशः पुरुषः । भक्तिरेव भूयसि ।।**

–त्रिपाद्विभूति उप०

असे भगवद्भक्तीचे अगाध माहात्म्य उद्घोषपूर्वक सागत आहे, म्हणून 'भक्ति व्याख्यास्याम' असे नारद प्रतिज्ञापूर्वक सागतात. येथे 'व्याख्यास्याम.' म्हटले आहे, कथन करतो, सागतो असे म्हटले नाही. 'व्याख्यास्यामः' वि–आ–ख्यास्याम. वि–विशेषरूपाने, आ–योग्य प्रकारे, ख्यास्यामः–वर्णन निरूपण करीत आहो. असा विशेष अर्थ या पदातून निष्पन्न होतो. तसे भक्तीचे स्वरूप, प्रकार इ. अनेक ग्रंथातून सागितले गेले आहेत बहुतेक ठिकाणी कर्ममिश्रा, ज्ञानमिश्रा, सात्त्विक, राजस, तामस, आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू अशाप्रकारे भक्तीचे निरूपण केले आहे पण नारदानी विशेषरूपाने म्हणजे जिच्यामध्ये इतर कोणाचे मिश्रण नाही अशा शुद्धभक्तीचे व्याख्यान केले आहे जी कोणाचेही अङ्ग होत नाही, तसेच जी स्वत फलस्वरूप आहे, अशा भक्तीचे आम्ही व्याख्यान करू अशी ही प्रतिज्ञा आहे.

प्रथम सूत्रात भक्तीचे व्याख्यान करू अशी प्रतिज्ञा केली आहे, पण शास्त्र-सिद्धान्त असा आहे की, 'नहि प्रतिज्ञा मात्रेण वस्तुसिद्धि, अपि तु लक्षण प्रमाणाभ्या वस्तुसिद्धि.' म्हणजे एखादी वस्तू प्रकट करतो एवढे म्हणण्याने त्या वस्तूची सिद्धी होत नाही तर त्या वस्तूच्या (प्रमेयाच्या) लक्षण व प्रमाणानीच ती सिद्ध होते. 'असाधारणधर्मो लक्षणं' वस्तूचा असाधारण म्हणजे तेथेच राहणारा, अन्यत्र न दिसून येणारा जो धर्म त्यास लक्षण असे म्हटले जाते शास्त्रीय दृष्टीने कोणत्याही विषयाचे प्रथम लक्षण ठरवावे लागते म्हणजे त्याचा असाधारण धर्म सागावा लागतो जर तसा धर्म सागितला नाही तर त्या वस्तूचे सामान्य ज्ञान झाले तरी विशेषरूपाने यथार्थ ज्ञान होणार नाही केवळ सामान्य ज्ञान हे अकिंचित्कर आहे. तसेच प्रमाणही पाहिजे म्हणजे योग्य प्रमाणाने ती गोष्ट सिद्ध झाली तरच ती अबाधित, अर्थप्रतिपादक ठरते येथे नारदवचन हेच प्रमाण आहे प्रमाणे प्रत्यक्ष, अनुमान, शब्द इत्यादी अनेक मानली आहेत. त्यात अतीद्रियअर्थप्रतिपादनामध्ये प्रत्यक्षादी प्रमाणाची योग्यता नाही तेथे शब्दप्रमाणच उपयुक्त आहे. वेद, उपनिषद, पुराणे, सूत्रे, स्मृती इत्यादिकाना जसे प्रामाण्य आहे तसेच 'आप्तवाक्यालाही' प्रामाण्य आहे. 'आप्तस्तु यथार्थ वक्ता' असे आप्ताचे लक्षण आहे. लौकिक व अलौकिक असे आप्ताचे प्रकार संभवतात. लौकिक व्यावहारिक वस्तूचे ज्ञान करून देणारे ते लौकिक आप्त व अलौकिक म्हणजे अन्य लौकिक प्रमाणांना अगोचर असे ज्ञान, भक्ती, प्रेम, याचे यथार्थ कथन करणारे ते अलौकिक आप्त होत. श्रीनारद-

महर्षी असे यावन्मानवमात्राचे कल्याण चिंतणारे अलौकिक आप्त होत. अर्थात तेच या भक्तीचे लक्षण सांगू शकतील. श्रीनारद हे प्रत्यक्ष भगवद्विभूतिस्वरूप आहेत. 'देवर्षीणाच नारदः ।' असे गीता अध्याय दहाव्यात श्रीकृष्णच सांगतात. म्हणूनच नारदानी केलेल्या या भक्तिलक्षणाला महत्त्व आहे

तशी पुराणादिकांतून भक्तीचे अनेक प्रकार, भक्ताचे प्रकार, भक्तींची फले इत्यादी सांगितली आहेत. पण लक्षण या दृष्टीनी श्रीनारदानी केलेल्या भक्तीच्या व्याख्येला फार महत्त्व आहे. म्हणून पुढे दुसऱ्या सूत्रात श्रीनारद भक्तीचे लक्षण सांगतात.

## सूत्र २

## सात्वस्मिन्परमप्रेमरूपा

**सूत्रार्थ :**

सा–ती (भक्ती), अस्मिन् या, प्रत्यक्ष नित्यअपरोक्ष परमात्म स्वरूपाचे ठिकाणी, परमप्रेमरूपा-म्हणजे परमप्रेम असणे हेच तिचे स्वरूप (अशी आहे).

**विवरण :**

यद्यपि पुराणादिकातून आगम ग्रंथातून भक्तीचे अनेक प्रकार सांगितले गेले तरी ते शरीर किंवा मानस क्रियात्मक होत त्यात क्रियेला प्राधान्य प्राप्त होते. संसारामध्ये क्रियाप्रधानता असते. एखादा पाहुणा घरी आला असता मनातून त्याच्यावर प्रेम नसले तरी योग्य प्रकारे आदर दाखविला, त्याला सर्व साधने पुरविली की तो संतुष्ट होतो पण परमात्मा केवळ बाह्य उपचार किंवा क्रियेने संतुष्ट होत नाही. तो अवाप्तकाम आहे तो पूर्ण आनंदमय आहे. श्रीकृष्णभगवान अर्जुनास सांगतात,

**अर्जुना माझा ठायी । आपणपेनवीण सौरसु नाही ।।**
**मी उपचारी कवणाही । नाकळे गा ।। ज्ञा. ९–३६७ ।।**
**येर पत्र पुष्पफळ । हे भजावया मिस केवळ ।**
**वांचूनि आमुचालाग निष्कळ । भक्तितत्त्व ।। ज्ञा. ९–३९५ ।।**

उपचार किंवा क्रिया भक्तीत नको किंवा नसते असे नाही, पण त्याच्या मुळाशी जे प्रेम, जो भाव असतो त्याला महत्त्व आहे. तसेच ते प्रेमही सामान्य असून भागत नाही तर परमप्रेम पाहिजे. म्हणून नारद 'सात्वस्मिन्परमप्रेमरूपा' असे लक्षण सागतात शास्त्रात एखाद्या महत्त्वाच्या साधनाची दोन प्रकारची लक्षणे सागितली जातात. १ बहिरग व २ अतरग. इतरत्र पुराणादिकात जी क्रियात्मक लक्षणे सागितली आहेत ती लक्षणे नाहीत असे नाही, पण ती बहिरग होतील. अतरग लक्षणामुळे बहिरगाला महत्त्व येते. जर मुळात प्रेम असेल तरच श्रवण अर्चन-वदन इत्यादी क्रियाना भक्तीमध्ये बहिरग स्वरूपाने का होईना स्थान मिळेल नसता सर्व व्यर्थ. श्रीभगवान कृष्ण म्हणतात,

**एक भाव नाही माझा । तरी पाल्हाळ ते ।। ज्ञा. ९–४३२.**

शून्याला गणितात मूल्य प्राप्त होते, पण त्याचे मागे जर एखादा अक असेल तर, नसता ते व्यर्थ होते. तसे भक्तीच्या क्रियेत प्रेम मागच्या अंकासारखे आहे. प्रेम ही एक महत्त्वाची वृत्ती आहे तिला कोणी तरी विषय लागतो. म्हणजे कोणास तरी विषय करूनच प्रेम होऊ शकते. या सूत्रातील 'अस्मिन्' हे पद विषय दर्शविणारे आहे. येथे 'तस्मिन्' असे न म्हणता 'अस्मिन्' म्हटले आहे जो आपणाहून दूर परोक्ष असतो त्याला 'तो', 'त्याच्या ठिकाणी' असे म्हटले जाते, पण जो आपल्या नित्य सन्मुख, इतकेच नव्हे तर प्रत्यक्ष, अपरोक्ष असतो त्याकरिता 'अस्मिन्' म्हणजे 'याच्या ठिकाणी' असा शब्दप्रयोग केला जातो कोणी म्हणेल, 'अस्मिन्'–'हा'-असा सामान्य प्रयोग झाला. केवळ 'हा,' 'तो' म्हणण्याने एखाद्या वस्तूचा विशेष बोध होत नाही. तेथे नामरूपगुणादिकानी युक्त विशेष स्वरूप सांगावे लागते याचे उत्तर हे की बहुतेक भक्ती करणारे भज्य जो भगवान त्याला स्वहून भिन्न, परोक्ष, अशा रूपाने जाणूनच त्याची भक्ती करतात. पण तसा जर परोक्ष मानला तर तो परमप्रेमाचा विषयच होणार नाही. तसेच जो नित्य अपरोक्ष आहे त्याला परोक्ष भिन्न मानणे हे अज्ञानाचे लक्षण आहे वास्तविक देहादिक स्वहून भिन्न, परोक्ष, आहेत, पण जीव त्याना स्वहून अभिन्न मानून तादात्म्याने व्यवहार करतो व या भ्रातिजन्य तादात्म्यामुळेच ते प्रेमाचे विषय बनतात व ही भ्रांती त्या नित्य अपरोक्ष परमात्म्यास आवृत करते. म्हणून खरे प्रेम हे ज्यावर होते तो प्रत्यक्ष, अपरोक्ष, वाटला पाहिजे. सर्व भक्त भगवंताला अपरोक्ष, प्रत्यक्षच, मानतात. गोपिकाना देखील त्याचे अपरोक्ष ज्ञान होते हे नारदच पुढे सूत्रातून सागणार आहेत. 'तो 'हा' विठ्ठल बरवा । तो 'हा' माधव बरावा ।।' 'तो हा रे श्रीहरी पाहिला डोळेभरी' इ श्रीज्ञानेश्वरमहाराजाची वचने प्रसिद्ध आहेत. परमात्मा हा सर्वांना नित्य अपरोक्ष आहे. इतकेच नव्हे, तो कधीच परोक्ष होत नाही. सांसारिक देहादि कधी परोक्ष तर कधी अपरोक्ष भासतात. तो परमात्मा

तिन्ही अवस्थेत तिन्ही देहात असून सर्वांचा साक्षी आहे. **श्रीज्ञानेश्वर महाराज** 'ईश्वरः सर्वभूताना हृद्देशे ऽर्जुन तिष्ठति।' (गी १८. ६१.) या श्लोकावरील व्याख्यानात सांगतात–

**सकळ भूतांच्या अंतरीं। हृदयमहाअंबरीं।**
**चिद्‍वृत्तीच्या सहस्रकरीं। उदयला असे जो॥** –ज्ञा. १८. १२९९.

म्हणून नारदांनी त्याला 'अस्मिन्' म्हटले आहे. भगवान भक्तइच्छेने सगुणमाकार जरी झाला, परोक्षाप्रमाणे जरी भासला तरी त्याचे अपरोक्षत्व बाधित होत नाही कारण त्याही वेळी तो आवरणरहितच, संसारधर्माहून अलिप्तच असतो म्हणूनच 'आणि आकारा आलिया जयाचे। निराकारपण न वचे॥ ( ज्ञा. ८. १८० ) असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. जर तो परोक्ष होईल तर परमप्रेमाचा विषय होणारच नाही.

तेथ प्रियाची परमसीमा। तो भेटे माऊली आत्मा॥
तये खेवी आटे डिंडिमा। सासारिक हे॥ – ज्ञा. १६. ४४३.

असे श्रीज्ञानेश्वरमहाराज त्याचे लक्षणच एकप्रकारे सांगतात. अशा या नित्य अपरोक्ष परमात्म्यावर परमप्रेम असणे हीच भक्ती.

येथे सूत्रात 'तु' असे एक अव्यय वापरले आहे. सूत्राचे लक्षण करताना निरर्थक पद त्यात नसते असे मागे सागितलेच आहे. 'तु' हे पद प्रेमाचे आलंबन असणाऱ्या अन्य वस्तूची म्हणजे अन्य प्रिय विषयाची व्यावृत्ती करणारे आहे. अपरोक्ष परमात्म्याहून अन्य जे प्रेमाचे विषय होतात त्यांच्या प्रेमाला भक्ती म्हटली जात नाही किंवा म्हणू नये, असा त्यातून अर्थ निष्पन्न होतो.

नित्य अपरोक्ष अहंप्रत्ययवाच्य आत्म्याचे प्रेम असणे म्हणजे भक्ती, असे भक्तीचे लक्षण केले तर, कोणी म्हणेल, असे प्रेम तर आपल्या अपरोक्ष आत्म्यावर सर्वांचे असतेच. श्रीविद्यारण्यस्वामी पंचदशीत म्हणतात,

**इयं आत्मा परानंद परप्रेमास्पदं यतः**
**मानभूवं हि भूयासमिति प्रेमात्मनीक्ष्यते॥**
**तत्प्रेमात्मार्थमन्यत्र नैवमन्यार्थमात्मनि,।**
**अतस्तत्परमं ते न परमानंदतात्मनः॥ पंचदशी १**

'ही आत्मरूप संवित परानंदरूप आहे. कारण तीच परमप्रेमास्पद आहे. म्हणून मी नसावे असे कोणास वाटत नाही तर मी अखंड असावे असेच वाटते; हेच आत्मप्रेम होय. जीव आत्म्यावर प्रेम करतो ते अन्याकरिता नसते पण अन्यावर

जे प्रेम करतो ते आत्म्याकरिताच असते म्हणून आत्माच परमश्रेष्ठ आनंदस्वरूप आहे.'

तमेच बृहदारण्य उपनिषदामध्ये याज्ञवल्क्यमुनीनी या विषयाचा विस्तृत विचार व ऊहापोह अनेक उपत्तीनी केला आहे. ते म्हणतात, ( न वा अरे सर्वस्य कामाय सर्वं प्रियं भवति। आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति।) मनुष्य सर्वांवर जे प्रेम करतो ते सर्वांकरिता नाही. इतर सर्व प्रेमाचे शेष (अंग) आहेत. आत्म्याच्या अपेक्षेनेच सर्व प्रिय वाटते. म्हणजेच आत्मा हाच प्रेमाचा शेषी (अंगी)– प्रमुख विषय– आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजही सागतात,

**आणि निरुपचारा प्रेमा। विषय होय जे प्रियोत्तमा।**
**तें तुजे नव्हे की आत्मा। ऐसेंचि जाणावे॥** –ज्ञा. १८. १३४१

इत्यादी प्रमाणावरून अपरोक्ष आत्मा प्रेमास्पद आहे हे सिद्ध झाले म्हणजे सर्वांच्या परमप्रेमाचा विषय तो आहे, असे जरी आहे तरी हे शास्त्रत मानले जाते. अपरोक्ष आत्म्यावर प्रेम असते हे मानले तरी ते ज्ञान सर्वांचे भ्रमस्वरूप आहे, कारण आत्म्याचा आत्मत्वाने तर नाहीच मग परमात्मस्वरूपाने बोध सर्वांना कसा राहणार? अज्ञानामुळे आत्म्याच्या ठिकाणी देहेंद्रियादिकांचा व त्याच्या धर्मांचा आरोप केला जातो 'देहखडा नाम आत्मा॥ आत्मा तव म्हणिजे। देहासीचि॥' (ज्ञा.) असाच बोध असतो हे सर्वांच्या अनुभवावरून सिद्ध होते. त्यामुळे ते आत्मप्रेमही देहादि अनात्म तत्त्वावरच केले जाते देहादिक व त्याचे धर्म तसेच इंद्रियादि पंचविषय हे सर्व व्यभिचारी, दोषवान असतात म्हणून त्याच्यावर केलेले प्रेम तेही व्यभिचारी, सदोष बाधकच असते. त्यास प्रेमही म्हणता येत नाही. खरे प्रेम हे एकआलम्बनात्मक असते. त्यास अनेक विषय खपत नाहीत. खरा प्रेमी नित्य अपरोक्ष, अव्यभिचारी, सर्व अवस्थांचा साक्षी एक परमात्मा श्रीहरीच आहे, अन्य सर्व तुच्छ आहे, कारण अन्य सर्व क्षयातिशय दोषस्वरूप असत् जड, दु:खस्वभाववान् आहे. ते अहंप्रत्ययाचा विषय होत नाही ते नित्यपरोक्षच असते. तेथे भ्रांतीने अपरोक्षत्व प्रतीत होते. खऱ्या भक्ताची भूमिका '**तेथे बोला कैंची उरी। माझे मीपण झाला हरी**॥ (तु०) ही असते. नित्यप्रत्यक्ष अस्मत्प्रत्ययविषय परमात्माच आहे, हे जाणून त्याच्यावर प्रेम करणे ही भक्ती होय.

पुढे प्रेमाचे विशेषण 'परम' असे केले आहे. त्याचे कारण

**देखे मनुष्यजात सकळ। हे स्वभावता भजनशीळ।**
**झाले असे केवळ। माझा ठायी॥** –ज्ञा. ४–६७

असे श्रीकृष्ण भगवान म्हणतात. भक्ती करणे हा जीवाचा स्वभाव आहे. कारण

जीव स्वतः अपूर्ण आहे. ज्या अंशातील अपूर्णता ज्याच्याकडून नष्ट होईल त्याची भक्ती जीव करीत असतो. त्यात कामना, गुण, विकार, अज्ञान, मोह, भेदबुद्धी इ. सर्वांचे मिश्रण असते. जरी ईश्वरभाव सामान्यत्वाने भासत असला व मनोकामना-पूर्तीकरिता अल्पभावनेने, श्रद्धेने, पूजा-अर्चा इत्यादी काही क्रिया होत असल्या तरी त्या खऱ्या भक्तीच्या लक्षणात समाविष्ट होत नाहीत. शास्त्रामध्ये भक्तीचे विविध प्रकार वर्णिले आहेत. अर्थार्थी, आर्त, यानाही भक्त म्हटले आहे. भागवता-मध्ये सात्विकी, राजसी, तामसी असेही भक्तीचे प्रकार सांगितले आहेत. कोठे कोठे उत्तम, मध्यम, अधम असे भेद कल्पिले आहेत. 'भक्तिरसामृतसिंधू' नावाच्या भक्तिशास्त्रावरील महत्त्वाच्या ग्रथात रूपगोस्वामी यानी साधनभक्ती, भावभक्ती प्रेमभक्ती असे तीन प्रकार सांगितले आहेत तसेच वैधी, रागानुगा असे दोन प्रकारही स्पष्ट केले आहेत. नारदानीही पुढे गौणी भक्ती सांगून तिचे तीन प्रकार सांगितले आहेत. पण खरी भक्ती म्हणजे 'परमप्रेमरूपा' हीच होय. श्रीशांडिल्य महर्षींनीही आपल्या भक्तिसूत्रात

**सा परानुरक्तिरीश्वरे** ।– शां. भ. सू. २.

असे परा अनुरक्ति (प्रीती) हेच लक्षण केले आहे. नारदपाञ्चरात्रातही असेच भक्तीचे लक्षण सांगितले आहे

**अनन्य ममता विष्णौ ममता प्रेमसंगता ।**
**भक्तिरित्युच्यते भीष्म प्रल्हादोद्धवनारदैः ।।**

नारदपाञ्चरात्र.

'भगवान महाविष्णूच्या ठिकाणी प्रेमयुक्त अनन्य ममत्व म्हणजेच भक्ती असे भीष्म, प्रल्हाद, उद्धव, नारद म्हणतात.'

भक्तश्रेष्ठ श्रीनामदेव महाराज अशा प्रेमालाच भक्ती म्हणतात.

**सर्वांहुनि निराळा रजतमा वेगळा । भोगी प्रेमकळा तेचि भक्ति ।।**

'प्री' धातूपासून प्रेम शब्द बनतो. या 'प्री' धातूचे गणभेदाने तीन प्रकारचे पाठ सिद्ध होतात. 'प्रीङ 'प्रीतौ' (दिवादि), 'प्रीञ् तर्पणे कान्तौच' (क्र्यादि), 'प्रीञ् तर्पणे' (चूरादि) याचौ पाणिनीय व्याकरणानुसार लट् लकाराची प्रथम-पुरुष एकवचनाची सर्व मिळून सात प्रकारची रूपे होतात. प्रीयते, प्रीणाति, प्रीणीते प्रीणयति, प्राययति, प्रयति व प्रयते. 'प्रियस्यभावः प्रेम अथवा प्रेमा। परमः प्रेमा-रूपं यस्याः सा परमप्रेमरूपा' प्रियत्वाचा जो भाव (अस्तित्व) ते प्रेम परम प्रेम आहे स्वरूप जिचे ती परमप्रेमरूपा भक्ती होय.

**प्रेम्णस्तु प्रथमावस्था भाव इत्युच्यते बुधैः ।।**

भ. र. सि.

'प्रेमाच्या प्रथमावस्थेसच ज्ञाते लोक भाव असे म्हणतात.' कित्येक ठिकाणी भाव, प्रेम, भक्ती हे शब्द एकाच अर्थाने घेतलेले सापडतात, पण भक्तिशास्त्रकारांनी याच्या वेगवेगळया व्याख्या केल्या आहेत. भाव ही प्रेमाची प्रथम अवस्था व प्रेम ही भावाची परिणत स्थिती आहे अशी 'भक्तिरसामृतसिंधू' मध्ये भाव व प्रेम यांची व्याख्या केली आहे

**शुद्धसत्त्वविशेषात्मा प्रेमसूर्यांशुसाम्यभाक् ।**
**रुचिभिश्चित्त मासृण्य कृदसौभाव उच्यते ॥**

भ. र. सि.

रजतममिश्रणरहित शुद्धसत्त्वगुणात्मक अंत.करणात प्रेमरूपी सूर्याच्या किरणाप्रमाणे असणारी व भगवद्रुचीमुळे चित्ताची होणारी जी द्रवावस्था तिला भाव म्हणतात.

ही झाली भावाची व्याख्या यानंतर ते प्रेमाची व्याख्या करतात

**सम्यङ्मसृणितः स्वान्तो ममत्वातिशयाङ्कितः ।**
**भावः स एव सान्द्रात्मा बुधैः प्रेमा निगद्यते** ॥ ४–१

'योग्य रूपाने जे हृदय स्निग्धत्वाला प्राप्त झाले आहे, व भगवंताविषयी अतिशय ममत्व ज्यात निर्माण झाले आहे, असा जो अंत करणातील पूर्णभाव त्यासच प्रेम म्हटले जाते.'

म्हणून भावभक्ति व प्रेमभक्ती असे दोन प्रकार भक्तीचे पडतात. महाराष्ट्रातील संताच्या ग्रंथांतून मात्र भाव व प्रेम हे पर्यायच मानलेले दिसतात. श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात–

**भावेंवीण भक्ति भक्तिवीण मुक्ति ।**
**बळेंवीण शक्ति बोलूं नये ॥**

–ज्ञानेश्वर हरिपाठ ४

श्री एकनाथ महाराज म्हणतात–

**शुद्ध भावेवीण जे भक्ती । तेचि दांभिक जाण निश्चती ।**
**ते अपक्वचि राहे प्राप्ती । जेवी कांकड जाती मुगांची ॥**

–ना. भा. २४-४१८

**भक्ति नामाचा इत्यर्थ । माझे स्वरूपीं निज भावार्थ ।**
**येणेंचि लाभे परमार्थ । सुफळ शास्त्रार्थ या नाव ॥**

–ना. भा २५-४४९

असे श्रीकृष्ण उद्धवास स्पष्ट सांगतात.

या सूत्रात 'परमप्रेमरूपा' असे पद आहे. प्रेमास परम हे विशेषण दिले आहे. विशेषण हे व्यावर्तक असते. परम प्रेम म्हणण्याने अन्य सामान्य प्रेमाची व्यावृत्ति होते. यावरून प्रेमातही काही प्रकार आहेत की काय असे वाटते.

याचा विचार श्रीएकनाथ महाराजानी आपल्या एकादशस्कंधावरील टीकेत विस्तृत रूपाने केला आहे, तेथे प्रेमाचे लौकिक दृष्टया सात्त्विक, राजस, तामस व शुद्ध सात्त्विक असे भेद केले आहेत

**श्रवणी ध्यानी हे अवगुण । तैसाचि त्रिविध प्रेमा जाण । तो बोळखती विचक्षण । ऐक लक्षण सांगेन ।। महावीरांचे शौर्यपण । ऐकोनि युद्ध दारूण । अत्यंत हरिखे उल्हासे मन । तो प्रेमा जाण राजस ।। दुःख शोकांची अवस्था । का गेल्या मेल्यांची वार्ता । अत्यंत विलापाची कथा । ज्यासी ऐकता न संठे ।। नेत्री अश्रूंचिया धारा । स्फुंदने कांपे थरथरा । प्रेमविलाप अवसरा । तो जाण खरा तामसू ।। सगुण मूर्तीची संपदा । शंखचक्र पद्मगदा । पीतांबर धारी गोविंदा । ऐकोनि आनंदा जो भरे ।। नेत्री आनंद जोवन । हृदयी न संठे स्फुंदन । कृष्णमय झाले मन । तो प्रेमा जाण सात्त्विक ।। या वरी जो प्रेमा चौथा । आतर्क्य तर्केना सर्वथा । उद्धवातू मज लागी पढियंता । तोही आता सांगेन ।। श्रीकृष्ण म्हणे सावधान । ऐकोनि निर्गुण श्रवण । ज्याचे चिन्मात्री बुडे मन । उन्मज्जन होऊ नेणे ।। चित्त चैतन्य पडता मिठी । सुटता लिंगदेहाची गाठी । नेत्री अश्रूंचा पूर दाटी । रोमाञ्च उठी सर्वांगी ।। जीव भावाची दशा आटे । अनिवार बाष्पकंठीदाटे । काही केल्या शब्द न फुटे । पूर लोटे स्वेदाचा ।। नेत्र झाले उन्मिलित । पुंजाळले जेथीचे तेथ । विस्मयाचे भरते येत । वोसंडत स्वानंदे ।। हा जाण पा प्रेमा चौथा । उत्तम भागवत अवस्था तुज म्या सांगितली तत्त्वता । इचा जाणता मी एकू ।। निर्गुणी जो प्रेमा जाण । ते शोधीत-सत्त्वाचे लक्षण । हे मी जाणे उणखूण । कां ब्रह्मसंपन्न जाणती ।।**

नाथ भागवत ११-७१३ ते ७०६

भगवदवतारचरित्रश्रवणातून श्रोत्याच्या अधिकाराप्रमाणे गुणात्मक व निर्गुण प्रेम निर्माण होते, असे वरील प्रमाणावरून दिसते. श्री नारद ऋषी आपल्या परम-प्रेमाचे विस्तृत लक्षण पुढे चौपन्नव्या सूत्रात विशद करणारच आहेत, तेथे त्याचा अधिक विचार करू.

## सूत्र ३

# अमृतस्वरूपा च

**अर्थ :**

आणि (ती भक्ति) अमृतस्वरूपा (ही) आहे.

**विवरण :**

द्वितीय सूत्रात परमप्रेम हे भक्तीचे यथार्थ स्वरूप आहे, असे स्पष्ट केल्यानंतर या सूत्रात त्या प्रेम भक्तीचा एक महत्त्वाचा विशेष श्री नारदमहर्षि सांगतात, ती प्रेमरूपा भक्ती 'अमृतस्वरूपा' आहे. अमृत म्हणजे मरण-विनाश-बाधरहित अवस्था अथवा स्वरूप होय

तसे अमृत शब्दाचे कोशात अनेक अर्थ सांगितले आहेत व्योम (आकाश), देवान्न, यज्ञशेष, रसायन, अयाचित, जल, दुग्ध, मोक्ष, अन्न, सुवर्ण, गोरस इ. अनेक पदार्थांना अमृत असे म्हटले जाते साहित्यात वरील अनेक पदार्थांचा वाचक म्हणून अमृत पदाचा उपयोग केला आहे. तसेच शास्त्रकारांनी आपल्या शास्त्रात जे जे साध्य म्हणून ठरविले आहे त्यासाठी अमृत शब्दाचा प्रयोग केला आहे. मीमासक कर्मकांडी वेदातील 'अपामसोमममृता अभूम' हे वाक्य घेऊन 'यज्ञातील सोमरस प्राशन करून आम्ही अमर होऊ' असे म्हणतात, योगी समाधिसुखासच अमृत समजतात. पंचदशी या वेदात ग्रंथात श्री विद्यारण्य स्वामीनी त्यांच्या मताचा अनुवाद केला आहे.

**धर्ममेघमिमं प्राहुः समाधिं योगवित्तमाः ।**
**वर्षत्येष यतो धर्मामृतधाराः सहस्रशः ।।** – पंचदशी, १-६०

'योगात निष्णात असणारे पुरुष या निर्विकल्प समाधीस धर्ममेघ म्हणतात. कारण हा धर्ममेघ धर्मामृताच्या सहस्र धारांनी वर्षाव करतो.'

वेदान्तशास्त्रात ब्रह्म, मोक्ष, या अर्थी 'अमृत' शब्दाचा उपयोग केलेला आढळतो. **'ब्रह्मैवेदममृतं' 'तद्विद्वानमृतइह भवति, 'ब्रह्मसंस्थोमृतत्वमेति' 'अमृतत्वस्य नाशास्ति वित्तेन' 'यज्ज्ञात्वामृत मश्नुते' विद्यया अमृतमश्नुते** अशी अनेक प्रमाणे आहेत.

श्रीएकनाथ महाराजांनी आपल्या भावार्थ रामायणात लौकिक अशा पाच प्रकारच्या अमृतांची नावे व त्यांची स्थानेही सांगितली आहेत.

**स्वादामृत उन्मादामृत । सुप्त्यमृत तृप्त्यमृत ।**
**ये अमृतेप्रलोभार्थ । परमामृत पांचवे ।।**
**स्वादामृत अप्सरांसी । तेणें त्या स्वादिष्ट सर्वांसी ।**
**तृप्त्यमृत ते देवांसी । क्षुधात्यासी बाधीना ।।**
**उन्मादामृत दैत्यासी । तेणें ते उन्मत्त अहर्निशी ।**
**सुषुप्त्यमृतते दिग्गजांशी । तेणें ते सुखेसीं डुल्लत ।।**
**डुकल्या येती निद्रितासी । तेवी डुल्लणे दिग्गजांसीं ।**
**ये तंव अमृतें वायसी । देवें सर्वांसीं चाळविलें ।।**
**समुद्र मथिला समस्तीं । झाली अमृताची प्राप्ती ।**
**कलहो करितां देवदैत्यीं । मोहिनी हातीं दिधलें ।।**
**मोहिनीरूपे श्रीविष्णुजाण । तेणें अमृत विभागून ।**
**इतरा अमृत वाढोन । राखिलें आपण परमामृत ।।**
**जेणें चुके जरामरण । तें परमामृत विष्णू आधीन ।।**

अरण्यकांड ६–१११ ते ११७

वास्तविक हे जे अमृताचे अनेक प्रकार कोठे कोठे सांगितले जातात हे सर्व गौण आहेत. अमृतातील काही धर्माचा त्याच्यावर आरोप करून त्यास अमृत अशी संज्ञा दिली आहे. वास्तविक देवदानवानी क्षीरसागराचे मथन करून जे अमृत काढले व ज्याला पुराणादिकातून अमृत अशी मुख्य संज्ञा दिली जाते ते देखिल खरे अमृत नव्हेच. कारण स्वर्गस्थ देव अमृत प्राशन करतात पण त्यानाही मरण चुकत नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजानी ज्ञानेश्वरीच्या दहाव्या अध्यायात त्या अमृताचे बेगडीस्वरूप स्पष्ट करून दाखविले आहे. ते म्हणतात

**जे काळकुटाचे सहोदर । मृत्युभेणे प्याले अमर ।**
**तरी दिहाचे पुरंदर । चौदा जाती ।।**
**ऐसा कवण एक क्षीराब्धीचा रसु । जया वायाचि अमृतपणाचा आभासु ।**

ज्ञा. १०–१९२, ९३.

'एका ब्रह्मदेवाच्या दिवसात एकूण चौदा इंद्र बदलत असतात, मग त्या अमृतप्राशनाचा काय उपयोग ? म्हणून त्या द्रवपदार्थावर अमृतपणाचा आभास आहे ते खरे अमृत नाही.'

जे समुद्रमंथनोद्भुत असे स्वर्गीय अमृत ते देवभोग्य आहे. ते जरा रोगनाशक आहे, दीर्घायुष्यप्रद आहे पण देवानी केलेल्या पुण्यास क्षीण करणारे आहे, देवलोकातील प्राणी अमृतप्राशन करून स्वर्गात जोपावेतो पुण्य क्षीण होत नाही. तोपावेतोच राहतात. 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोके विशन्ति' (९–२१) हे गीतावचन प्रसिद्ध आहे.

तसेच चंद्रात अमृत आहे असे म्हटले जाते पण तेही असे गौणच आहे. श्री एकनाथ महाराज म्हणतात.

**म्हणती चंद्रामृत जो आरोगी । तो होय नित्य निरोगी ।**
**मुख्य चंद्रचि क्षयरोगी । त्याचें अमृत निरोगी करीं केवीं ।।**

—नाथभागवत, ७ २४६

चंद्रकिरणातील अमृत वनस्पतीचे पोषण करणारे व तद्वारा–प्राणिमात्रांना भोगावयास मिळणारे आहे म्हणजे गहू इ. धान्याचे त्या चद्रामृताने पोषण होऊन ते प्राणिमात्रांचा आहार होत असते ते देहास पुष्ट करिते. क्षुधानिवारक आहे. पण जरा-मरण-शोकादि निवारक नाही, म्हणून ते खरे अमृत नव्हे.

धर्मयोगज्ञानादिक याना अमृतत्व अशी संज्ञा दिली जाते असे मागे म्हटले आहे, पण ती साधने फलकाली अमृतत्वास प्राप्त होतात. स्वरूपाने नाही. 'अपाम-सोमममृता अभूम' 'यज्ञयागादिकरून स्वर्गात जाऊ व अमृत प्राशन करून अमर होऊ.' म्ह. अमृतत्व हे त्या धर्माचे कदाचित् फल होईल. धर्म अनुष्ठान कालात अमृतस्वरूप नाही. अनुष्ठानकाली तर कायक्लेश, संयम, तितिक्षा इत्यादिकांचे कष्टच असतात

हीच गोष्ट योगाकरिताही आहे. समाधि धर्मामृतधारांचा वर्षाव करते असे वर म्हटले आहे, पण तो अमृतवर्षाव योगाचा आरभ केला असताना होतो असे नाही. आरंभी यमनियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यानादि साधने करावी लागतात ती अत्यंत क्लेशस्वरूप आहेत पुढे ते योगी अनाहत नादाच्या श्रवणाकडे प्रवृत्त झाले तरी प्रथम नाडीशोधन सयम, तीन बंध, कुंडलिनीजागृती इत्यादि झाली पाहिजेत व तो मार्ग किती कठीण व क्लेशप्रद आहे, हे योग ग्रंथातून स्पष्ट सांगितले आहे पुढे ५८ व्या सूत्राच्या विवरणात हा विषय येणारच आहे.

आत्मज्ञानाच्या बाबतीत पाहिले तरी ज्ञानाच्या प्रारंभी विवेक, वैराग्य, शमदमादिषट्कसंपत्ति, तीव्र मुमुक्षुत्व हे पाहिजे. तेव्हाच ज्ञानाचा अधिकारी होतो. वैराग्य, शमदम, तितिक्षादि साधनाचे काठिण्य उघडच आहे. अधिकारी झाल्यावर पुन्हा श्रवण मनन निदिध्यासनादिकांची अपेक्षा असते. नंतर महावाक्यजन्य ब्रह्माकार वृत्तीचा उदय झाल्यावर अविद्यानिवृत्ती होऊन मग अमृतत्वाची प्राप्ती होते.

सर्वांचे तात्पर्य हे की ज्ञानसाधन कालात अमृत नाही पण 'भगवद्भक्ती' ही सर्व कालात अमृतस्वरूपा आहे.

भगवान स्वतः अमृतस्वरूप आहे, म्हणून त्याच्याशी संबंध आलेली प्रत्येक वस्तू अमृतस्वरूप मानली जाते. चरणामृत, प्रसादामृत, नामामृत इ. साधनात्मिका भक्तीची जर ही अवस्था तर तीच पराभक्ती या स्वरूपास प्राप्त झाली. म्हणजे तिच्या अमृतत्त्वाचा संशय घेण्याचे कारण नाही.

ती भक्ती फलकाली तर अमृतस्वरूपा आहेच पण साधन काली ही ती अमृतरूपा आहे 'तुका म्हणे भक्ति। सुखरूप आदि अती ।।' श्रीकृष्ण भगवान स्वत च गोपिकाना उपदेश करतात व भक्तीचे अमृतत्व सागतात.

**मयि भक्तिर्हि भूतानाममृतत्वाय कल्पते ।।**

श्रीमत् भागवत १०.८२.४५

'माझी भक्ती प्राणिमात्राना अमृतत्वप्राप्तीस कारण होते.' येथे जरी भक्ती आणि अमृतत्वप्राप्ती याचा कार्यकारण भाव दिसून येतो, तरी तो अभेदस्वरूपच आहे. श्रीकृष्ण भगवान अर्जुनाला भक्तीचे स्वरूप सागतात.

**येऱ्हवी तिजी ना चौथी । पहिली ना सरती ।**
**पै माझिये सहज स्थिती । भक्ति नाव ।।**
**ऐसा हा सहज माझा । प्रकाशु जो कपिध्वजा ।**
**तो भक्ति या वोजा । बोलिले जें गा ।।**
**ज्ञानी इयेते स्वयंवित्ति । शैव म्हणती शक्ति ।**
**आम्ही परम भक्ति । आपुली म्हणो ।** — ज्ञा १८.

'अमृत' या शब्दाचा मृतिरहित, मृत्युराहित्य असा अर्थ केला जातो. पण बहुधा केवळ स्थूल देहपात होणे म्हणजेच मृत्यू असा मृत्यू शब्दाचा सामान्य अर्थ केला जातो. पण जोपावेतो वासना, शुभाशुभ कर्माचे संस्कार, सचितप्रारब्धादिकर्मे अवशिष्ट आहेत. तोपावेतो एक देह गेला तरी दुसरा पुन्हा प्राप्त होतच असतो म्हणून केवळ स्थूळ देहपात हाच मृत्यू असे मानणे योग्य नाही. मृत्यू अनेक प्रकारचा मानला गेला आहे आत्मघात, आत्महत्या यासही मृत्यू मानले गेले आहे

**'जया देहसंबंधा आंतु । प्रतिपदी आत्मघातु ।**
**भुंजतां उसंतु । काहीच नाही ।।** (ज्ञा. १८.१२७६)

श्री भागवत एकादश स्कधात भगवान श्रीकृष्ण म्हणतात.

**पावोनि श्रेष्ठ नरशरीर । जो नुतरेचि संसार पार ।**
**तो आत्महत्यारा नर । सत्य साचार उद्धवा ।।**

(नाथ भागवत २००–१८९)

आत्मा जीवदशेत येणे, संसारी बनणे, विकारवश होणे, त्यास लौकिक वासनेत जखडून पडावे लागणे हाच मृत्यू आहे. आत्म्याची परतंत्रता हाच त्याचा मृत्यू आहे. कामक्रोधाना ज्ञानेश्वर महाराजांनी कृतात म्हटले आहे. **असे मृत्यूचे मुख्य** गौणरूपाने अनेक प्रकार ग्रथात प्रसिद्ध आहेत. या सर्व प्रकारच्या मृत्यूपासून मुक्त करण्याचे सामर्थ्य भगवद्भक्तीतच आहे.

भगवान अमृतरूप आहे, भक्ती हे त्याचे स्वरूप आहे. इतकेच नव्हे ती भगवताला आवडणारी आहे, म्हणजे ते भगवद्भोग्य म्हणजे ज्या प्रेमभक्तीचा भोग केवल भगवान घेतो असे अमृत आहे.

परप्रेम तर अमृतस्वरूप आहेच, पण त्या प्रेमाङ्गभूत होणाऱ्या ज्या अन्य गोष्टी त्यानाही अमृत स्वरूप म्हटले आहे. भगवत्स्वरूप, भगवत्कथा, भगवन्नाम हे सर्व अमृतमयच आहे. नाम नामीचा अभेद असल्याने भगवान व त्याचे नाम ही अमृतस्वरूपच आहेत. देवर्षिनारद प्राचीनबर्हि नामक राजास सागतात

**तस्मिन्महन्मुखरिता मधुभिच्चरित्र पीयूषशेष सरितः परितः स्रवन्ति ।। ता ये पिबन्त्यवितृषो नृप गाढकर्णैस्तान्नस्पृशन्त्यशनतृड् भयशोक मोहाः ।।**
**–श्रीमत्** भागवत ४–२९–४०

नारद म्हणतात 'हे राजा ' ज्या ठिकाणी भगवद्भक्त वास्तव्य करतात तेथे भक्तश्रेष्ठानी गायिलेले मधुसूदनाचे चरित्ररूप अमृत ज्यांत भरलेले आहे अशा नद्या चोहीकडून वाहत असतात. जे श्रद्धेने एकाग्र अशा श्रोत्रेंद्रियानी त्या चरित्र कथारूप अमृताचे पान करतात त्याना क्षुधा, तृषा, भय, शोक, मोह हे कधीही बाधा करीत नाहीत रामायणात प्रत्यक्ष श्रीशंकरच या अमृताचे श्रेष्ठत्व व फल स्वानुभवपूर्वक सागतात

**श्रीरामनामाक्षर मंत्रबीजं जाप्यं मदीयं परमामृतं मे ।।**
**समुद्रजातं गरलं वृथाकृतं ध्येयं मदीयं सतु रामचंद्रः ।।** ३–७१

शकर पार्वतीस सागतात, श्रीरामनामाक्षर हा बीज मंत्र त्याचाच अखड जप मी करतो ते माझे परमामृत आहे त्याचा प्रभाव असा थोर आहे की क्षीरसमुद्र मंथनातून निघालेले हलाहल विष या परमामृताने व्यर्थ गेले म्हणजे हलाहल विषाचाही माझ्यावर काही परिणाम झाला नाही म्हणून माझे ध्येय एक श्रीरामचद्रच आहे '

या श्लोकावरील आपल्या प्रसादगर्भ टीकेत श्रीएकनाथ महाराज सागतात. :

**रामनामयुग्म अक्षर । वाचेसी येता एक वार । सर्वांगी अमृताचा पूर । वेगवत्तर चालिला । त्या अमृताचे नि तेजे देख । करपोनि गेले व्याळ विख । पन्नग झाले निर्विख । अलंकारे देख बाधतीना ।। अल्प पन्नगाची गरळ । त्याहूनि विशेष हलाहल । समुद्र मंथनी तत्काळ । उठले जगतीतल जाळीत ।। पीडित सकळ सुरगण । यक्ष किन्नर सिद्ध चारण । ऋषी आदि दीनजन । भूमंडळ जाण जाळीत ।। तेणे काळे म्या आपण । श्रीरामनामाच्या बळे जाण । न लगतां अर्धक्षण । कंठी जाण धरियले ।। अल्पहि त्याची बाधा नाही । त्याहूनि अपूर्व आणिक काही । प्रळयानळाते गिळी लवलाही । प्रतापे पाही रामाच्या ।। ऐसा श्रीरामनाथनाम प्रताप । जेणे विष हळाहळ ताप । भस्म झाला आपोआप । ते परमजाप्य जाण माझे ।।**

भावार्थ रामायण युद्धकाड. ३.११४–१२२

रामायणात आणखीही या अमृताचे स्वरूप वर्णिले आहे.

**ब्रह्माम्भोधि समुद्भवं कलिमलप्रध्वंसनं चाव्ययम् ।**
**श्रीमच्छंभुमुखेंद्र सुंदरवरं संशोभितं सर्वदा ।**
**संसारामयभषजं सुमधुरं श्रीजानकीजीवनम् ।**
**धन्यास्ते कृतिनः पिबन्ति सततं श्रीरामनामामृतम् ।।**

'ब्रह्मसमुद्रातून निघालेले, कलिमलाचा नाश करणारे, अविनाश श्री शकर प्रमुख देवानी श्रेष्ठ म्हणून गायिलेले, संसाररूपी महारोगावरील औषधच, श्री सीतादेवीचे मूर्तिमत जीवनच असे श्री रामनाममृत जे लोक सतत प्राशन करतात ते खरोखर धन्य होत.'

भक्तश्रेष्ठ प्रल्हाद श्रीनृसिहापुढे या अमृताचे स्वानुभवपूर्वक वर्णन करीत आहे.

**नैवोद्विजे परदुरत्ययवैतरण्यास्त्वद्वीर्यगायन महामृत ' मग्नचित्तः ।।**

'प्रल्हाद म्हणतो, हे प्रभो ! मला तरून जाण्यास दुस्तर अशा या ससाररूप वैतरणी नदीची मुळीच भीती वाटत नाही, कारण तुझ्या चरित्रगायनरूप महान अमृतामध्ये माझे अत:करण अगदी तल्लीन होऊन गेले आहे.'

भगवान श्रीकृष्ण स्वत.च उद्धवास आपल्या कथामृताचे महात्म्य सागत आहेत.

**अमृतरूपाया माझ्या कथा । श्रद्धायुक्त श्रवण करितां । फिके ज्या करूनिया अमृता । गोडी भक्तीपंथा तात्काळ लागे ।। अमर अमृतपान करिती । तेही शेखी मरोनि जाती । माझे कथामृत जे सेविती । ते नागवती कळिकाळा ।। सेविता कथामृत सार । मद्‌भावी रंगले अंतर । तै माझे गुण माझे चरित्र । गाती सादर उल्हासे ।।**

एकनाथी भागवत १९.२१७–२२०

अमृतामध्ये जीवास अमर करण्याचा जसा गुण आहे तसाच माधुर्य हाही एक मोठा गुण आहे. '**अमृतरसस्वादनी । रस सकळ ।।** (ज्ञा. १–२६) भक्ती ही देखील तशीच अमृतासारखी रसरूपा आहे किंबहुना सर्व रसाचा अतर्भाव भगवद्‌भक्तीत होतो याचा विचार भक्तिशास्त्रकारांनी विस्ताराने केला आहे. रस शब्द आनदवाचक आहे. '**रसौ वै सः रसं लब्ध्वानंदा भवति** असे श्रुतिवचन आहे, प्रेमरसाची माधुरी गोडी अलौकिक आहे ती भगवत्कथा, भगवत्स्वरूप सौदर्य-माधुर्य, भगवन्नम यातून प्रकट होते. त्या नाम माधुर्यापुढे या अमृताचे माधुर्यही फिके पडते असे संत सागतात.

**जिव्हे गोड तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिके पुढे ।। तुकाराममहाराज**
**गोड हे गोमटे अमृतासीवाड । केला कवाड माझ्याजीवे ।। तुकाराममहाराज**
**गंगोदकाहुनी निके । गोडी अमृत झाले फिके ।। ज्ञानेश्वरमहाराज**

एखाद्याला भगवन्नामातील ही गोडी, हा स्वाद, हे माधुर्य अनुभवास येत नसेल तर समजावे की तो रोगी आहे. ' रोग्या विषतुल्य लागे हे मिष्टान्न ।। (तु.) साखर स्वरूपाने मधुर असूनही पित्त झालेल्या रोग्यास गोड लागत नाही. पण तो पित्तरोग दूर करण्याचे औषधही ती साखरच आहे. तद्वत् नाममाधुरी अनुभवास येण्याचे साधनही अखंडनाम घेणे हेच आहे भगवन्नामात रस येण्याकरिता श्री-ज्ञानेश्वर महाराज हरिपाठात सागतात–

**नामामृत गोडी वैष्णवा लाधली ।** – (ज्ञानदेव हरिपाठ)

आणि वैष्णव तोच आहे की ज्याचे भगवन्नामावर निरतिशय प्रेम आहे.

**भगवद्‌भजनाचे सुख । भक्त जाणती भाविक ।**
**भावेवीण भजनसुख । अनोळख अभाविका ।।**

–एकनाथी भागवत, ५–३९२,

नाम हेच आपल्या अलौकिक सामर्थ्याने सर्व दोष दूर करते आणि आपलीच गोडी निर्माण करते, ती आवड एवढी वृद्धिगत होते की तो नामधारक देवालाही म्हणतो–

**तुझ्या नामाचा महिमा । तुज न कळे मेघश्यामा ।**
**तुका म्हणे आम्हा । जन्म गोडयासाठी ।।–तु. गा.**
**मधुर मधुर मेतन्मंगलं मंगलानाम् ।**
**सकल निगमवल्ली सत्फलं चित्स्वरूपं ।।** – पुराणवचन

' मधुराहूनही मधुर, मगलापेक्षा मंगल, सर्व वेदरूप वेलीचे फल व चित्स्वरूप हे कृष्णनाम आहे. '

' रसगगाधर ' या साहित्यशास्त्रावरील अपूर्व ग्रथाचे कर्ते जगन्नाथ पंडिताचा हा एक श्लोक पाहा

**मृद्वीकारसिता सितासमशिता स्फीतं च पीतं पयः ।**
**स्वर्यातेन सुधाप्यधायि कतिधा रम्भाधरः खंडितः ।।**
**सत्यं ब्रूहि मदीय जीव भवता भूयोभवे भ्राम्यता ।**
**कृष्णेत्यक्षरयोर्द्वयोर्मधुरिमोद्‌गारः क्वचिल्लक्षितः ।।**

हे जीवा ! अनेकवेळा या संसारातील नाना योनीत भ्रमण करीत असता तू मधुर द्राक्षे खाल्ली आहेस. साखरेचा आस्वादही घेतला आहेस, उत्तम दूधही प्याला

आहेस, अनेकवेळा स्वर्गात जाऊन तेथे रम्भादी अप्सराचे अधरामृतही प्राशन केले असेल. पण खरे खरे साग की ' कृष्ण ' या दोन अक्षरात जे माधुर्य आहे, तसे अलौकिक माधुर्य तुला कोठे अनुभवास आले आहे काय ? भक्तिरसाचा पूर्णप्रकर्ष ज्यात आहे अशा ' भक्तिरसामृतसिधू ', ' उज्ज्वलनीलमणी ', ' ललित माधव ', ' विदग्ध माधव ', ' श्री भागवत बृहत्तोषणी ' इ. अलौकिक ग्रंथाचे कर्ते भक्तश्रेष्ठ रूपगोस्वामी हे एक ठिकाणी श्रीकृष्णनाम माधुर्याचे अत्यत सुंदर वर्णन करतात.

**तुण्डे ताण्डविनी रतिं वितनुते तुण्डावली लब्धये ।**
**कर्णक्रोड कदम्बिनी घटयते कर्णार्बुदेभ्यःस्पृहाम् ।**
**चेतःप्राङ्गणसङ्गिनी विजयते सर्वेन्द्रियाणां कृतिं ।**
**नो जाने जनिता कियाद्भिरमृतैः कृष्णेति वर्णद्वयी ।।**

—विदग्धमाधव.

श्रीरूपगोस्वामी म्हणतात, ' आम्ही हे जाणू शकत नाही, की ' कृष्णही वर्णद्वयी ( दोन अक्षरे ) जेव्हा जिव्हेवर येते तेव्हा मन आतुर होऊन उठते. त्याला वाटते की, हे नाम सतत घेण्याकरिता मुखामध्ये अनंत जिभाच्या पक्तीच्या पंक्ती उत्पन्न व्हाव्यात व त्याच्याद्वारे या नामाच्या माधुर्याचा रस घेत असावा जेव्हा ही दोन अक्षरे कानामध्ये पडतात तेव्हा अशी उत्कंठा होते की, अनंत कान असते तर त्याच्याद्वारे या माधुर्यश्रवणाचा लाभ घेता आला असता. चित्तात जेव्हा या कृष्णनामाचे स्मरण होते तेव्हा सर्व इद्रियाचे व्यवहार तेथेच बंद पडतात, अन्य काही पाहावे किवा ऐकावे, कोणास स्पर्श करावा, काही सुगंध सेवावा किवा रसनेने अन्य कोणत्या रसाचा आस्वाद घ्यावा, किवा कोठे जावे – यावे, काही करावे असे वाटतच नाही. '

तुकाराम महाराजाच्या अनेक अभगातून या भक्तिप्रेमरसालाच ब्रह्मरस अशी संज्ञा दिली आहे

**लाऊनी मृदंग श्रुतीटाळ घोष । सेवू ब्रह्मरस आवडीने ।।**

**जेथें तुझ्या कीर्तनाचा घोष । जळती पापे पळती दोष ।**
**काय ते उणें आम्हां आनंदास । सेवू ब्रह्मरस तुका म्हणे ।।**

अशा या ब्रह्मरसात भक्त निमग्न झाला म्हणजे त्याच्या इद्रियानाही अन्य काही कसे आवडणार ?

भक्तिप्रेमामृताचे श्रेष्ठत्व किती आहे, हे श्रीएकनाथ महाराज एका ओवीतून सांगतात.

**धर्मअर्थकाम मुक्ती । चहू पुरुषार्थाही वरती ।**
**श्रीकृष्णें सारामृत-निजभक्ती । उद्धवाहाती अर्पिली ।।**

ना भा. २९ ९७६

भक्ती अमृतस्वरूपा आहे, याचा आणखीही एका दृष्टीने विचार करता येण्यासारखा आहे भक्ती ही अमृतस्वरूपा म्हणजे अखड राहाणारी आहे. कोणतेही साधन फल उत्पन्न करून नष्ट होत असते, म्हणजे त्यास ' मृति ' आहे. उदाहरणार्थ, यजन करणारा यज्ञ करून स्वर्गास गेला म्हणजे मग यज्ञ राहत नाही. धर्मकर्माचे फल प्राप्त झाले म्हणजे कर्म संपते. योगरूप साधनही फलनिर्मितीनतर नष्ट होते. योगाने निर्विकल्प समाधी सिद्ध झाली असता पुन्हा योगसाधनाची आवश्यकता नाही. आत्मज्ञान हे साधनही फलरूपवृत्ती निर्माण करून नष्ट होते. महावाक्य श्रवणाने व मननिदिध्यासनोत्तर ब्रह्माकारवृत्तीचा उदय झाला असता ती अविद्यावृत्तीचा नाश करून ती वृत्तीही नष्ट होते. श्रीशकराचार्य म्हणतात—

**अज्ञानकलुषं जीवं ज्ञानाभ्यासाद्विनिर्मलं ।**
**कृत्वाज्ञानं स्वयंनश्ये ज्जलं कतकरेणुवत् ।।**

अविद्येने कलुषित झालेला जीव ज्ञानाभ्यासाने शुद्ध होतो. जसे पाणी गढूळ झाले म्हणजे ते स्वच्छ करण्यास त्यात निवळीच्या बीजाचे चूर्ण करून टाकतात. ते बीजचूर्ण त्या पाण्यातील गाळ खाली तळास नेते व आपणही तळास जाते. त्याप्रमाणे ते वृत्तिज्ञानही अज्ञान दूर करून आपणही नष्ट होते, ' **अज्ञान ज्ञाने नेले । तेही आपणपे वस्तू देऊनि गेले** ।। असे श्रीज्ञानेश्वर महाराजही म्हणतात म्हणजे त्या स्थितीत ज्ञानसाधने कशी राहू शकतील ? पण भक्तिप्रेमाचे तसे नाही. भक्तीने भगवत्प्राप्ती झाल्यावर ती भक्ती नष्ट होईल काय ? भगवतप्राप्तीने तर भक्तिप्रेमाची वाढ झालेलीच दिसून येते. एक जन्मच काय, अनेक जन्म प्रेममय जीवनाचा भोग घ्यावा असेच त्या भक्तास वाटत असते. पुढील सूत्रातून याचा विशेष विचार केला जाणार आहे.

ही भक्तिप्रेमामृत धारा, गगेचा ओघ समुद्रास मिळाला तरी पुन्हा मिळतच असतो, त्याप्रमाणे अखंड प्रवहितच असते. ती कधीच खडित होत नाही.

**मिळोनि मिळतचि असे । समुद्री गंगाजळ जैसे ।**
**मी होऊनि मज तैसे । सर्वस्वे भजती ।।**

—ज्ञा० १३—६०७

याच आशयाने श्री नारद महर्षी ' अमृतस्वरूपाच ' असे परमप्रेमस्वरूपा भक्तीचे विशेष स्वरूप सागतात.

## सूत्र ४ :

# यल्लब्ध्वा पुमान्सिद्धो भवति, अमृतो भवति, तृप्तो भवति ॥४॥

**अर्थ :**

ज्या (परमप्रेमरूपा अमृतरूपा) भक्तीची प्राप्ती (लाभ) झाला असता तो पुरुष सिद्ध होतो, अमर होतो, तृप्त होतो.

**विवरण :**

दुसऱ्या सूत्रात अस्मिन्पदवाच्य परमात्मस्वरूपाच्या ठिकाणी परमप्रेम असणे असे ज्या भक्तीचे लक्षण सांगितले आहे व जी भक्ती अमृतरूपा आहे असे मागील तिसऱ्या सूत्रात सागितले गेले, तिचे आणखीही अधिक फल या सूत्रात सांगितले आहे.

त्या परमप्रेमरूपा भक्तीचा लाभ झाला असता तो पुरुष सिद्ध होतो. येथे 'पुमान्' (पुरुष) असा शब्द वापरला आहे. तो मनुष्य देहधारी जीव या अर्थानेच वापरला आहे, स्त्री-पुरुष या लिङ्गभेदाने वापरला नाही. कारण प्रेमलक्षणा भक्तीत पुरुष, स्त्री, बालवृद्ध सर्वांचाच अधिकार आहे, म्हणून 'पुमान्' हा सूत्रातील शब्दाचा मनुष्य देहवान असाच अर्थ करावा हे योग्य आहे तसेच पुढे सूत्रातच 'यथाव्रजगोपिकानाम्' म्हणून गोपीचे–स्त्रियांचे–उदाहरण दिले आहे.इतर काही यज्ञयागादी तसेच संन्यासादी साधनात स्त्रियाना, शूद्रादिकाना शास्त्रात अधिकार सागितला नाही, पण भक्तिसाधनात, सर्वांनाच समान अधिकार आहे. तसेच येथे मनुष्य, शरीरी, पुरुष या शब्दाचा उपयोग न करता 'पुमान्' शब्द वापरला आहे. 'पुम्' म्हणजे पुरुषार्थ, जो पुरुषार्थ सिद्ध करतो तो पुमान् होय. धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे सामान्यत. चार पुरुषार्थ सागितले जातात, तसेच 'भक्ती' हाही पाचवा पुरुषार्थ सर्व सतानी, शुक-सनक-व्यास-नारदादी मुनीनी व. भक्तिशास्त्रकारानी मानला आहे. म्हणून परमप्रेमरूपा पंचम-पुरुषार्थरूपा भक्तीचा ज्या पुरुषाला लाभ झाला आहे, त्याचे हे वर्णन आहे. तसेच येथे 'लब्ध्वा' असे पद आहे. 'लब्ध्वा म्हणजे ज्या प्रेमाचा लाभ झाला असता असा अर्थ होतो. जगात ऐहिक–पारत्रिक असे अनेक लाभाचे प्रकार सांगितले जातात. पण ते खरे लाभ नव्हेत. कारण मूळविषयच जर मृगजळाप्रमाणे आभासिक आहेत तर त्यांचा लाभही आभासिक असाच राहणार, तो खरा नाही. विषय हे क्षयातिशयदोषाने युक्त असतात व केवळ अज्ञानी पुरुषांनाच तो लाभ वाटतो. 'भ्रातासी काम । विषयावरी ॥' (ज्ञा.९. ६०)म्हणून

तो खरा लाभ नव्हे. उलट भक्तिप्रेम हे पुरुषार्थस्वरूप आहे. पुढे सूत्र साठमध्ये भक्ती ही शातिरूप व परमानदस्वरूप आहे असे म्हटले आहे. ऐहिक-पारत्रिक विषयाच्या लाभाने या सूत्रात व पुढील सूत्रात सागितलेली सिद्ध होणे, अमृत होणे, तृप्त होणे ही फळे प्राप्त होणे शक्य नाही. म्हणून भक्तिप्रेमाचा लाभ श्रेष्ठ असल्यामुळे त्याचे फळ सागतात. ज्याला हा लाभ होतो तो पुरुष 'सिद्ध' होतो. जगात असिद्ध व सिद्ध असे दोन प्रकारचे मानव असतात विशिष्ट साध्याची ज्याना प्राप्ती झाली नाही, त्याना असिद्ध म्हटले असता चालेल व ज्याना ते साध्य प्राप्त झाले आहे त्यांना सिद्ध म्हणतात, किंवा सिद्धी प्राप्त झाली म्हणजेही सिद्ध म्हटले जाते. भगवद्‌गीतेमध्ये तर सिद्धी शब्द अनेक अर्थाने आला आहे

योगशास्त्रात आणिमा,महिमा इत्यादी मुख्य अष्टसिद्धी व आणखी अनुर्मिमत्व, दूर-श्रवणादी दहा गौण सिद्धी तसेच त्रिकालज्ञत्वादी पाच क्षुद्रसिद्धीही सागितल्या आहेत. भागवतात याचा सविस्तर विचार सागितला आहे व कोणकोणत्या साधनाने कोणकोणत्या सिद्धी प्राप्त होतात, त्याचाही विचार केला आहे भागवत स्कंध ११, अ. १५, श्लोक ५–८ पातञ्जलयोगदर्शनातही सिद्धीचा विचार केलेला आहे. पण या सर्व सिद्धीना परमार्थमार्गात अतराय (विघ्न) म्हटले जाते. भगवान श्रीकृष्णच उद्धवास सागतात,

**अंतरायान्वदन्त्येता युञ्जतो योगमुत्तमम् ।**
**मया संपद्यमानस्य कालक्षपण हेतवः ॥**

– भागवत स्क. ११–१५–३३

'माझी प्राप्ती करून घेण्यासाठी निष्काम असा उत्तम योगाचा अभ्यास करणाऱ्या भक्ताला या सिद्धी म्हणजे मोक्षमार्गातील अडथळेच आहेत, असे ज्ञानी लोक म्हणतात, या सिद्धी म्हणजे काळाचा व्यर्थ अपव्यय आहे.'

या श्लोकावरील आपल्या टीकेत श्रीएकनाथ महाराज म्हणतात :

**अहेतुक करिता माझे भजन । तेणे शीघ्र माझी प्राप्ती जाण ।**
**तेथे सिद्धीवरी घालिता मन । आली नागवण मत्प्राप्तीसी ॥**
**ज्यासी विषयभोग लागे गोड । तोचि सिद्धीची वाहे चाड ।**
**ज्यासी माझे प्राप्तीचे कोड । तो वांछीना बंड ऋद्धिसिद्धीचे ॥**
**माझे स्वरूप अद्वैतता । तेथे सिद्धींच्या नानावस्था ।**
**ते मायेची व्यामोहकता । जाण तत्त्वता उद्धवा ॥**
**माझे प्राप्ती आड सिद्धीचे विघ्न । हेचि तुज कळावया जाण ॥**
**म्या सर्व सिद्धीचे निरुपण । समूळ संपूर्ण सांगितले ॥**

**माझ्या ठायी धरिता ध्यान । एकाग्रता होता मन ।**
**तेथ भोगलिप्सा सिद्धी जाण । करिती नागवण साधका ।।**

— नाथ भागवत, १५–१८५–९

या सिद्धी परमार्थमार्गात विघ्नस्वरूप असतात खरा भक्त या **सिद्धींच्या मा** लागत नाही सिद्धीच्या मागे कोण लागतो त्याबद्दल श्रीकृष्ण **भगवान उद्धवा** सांगतात :

जे नेणती माझे निजसुख । ऐसे जे का केवळ मूर्ख ।
त्यासीच सिद्धीचे कौतुक । अलोकिक भोगलिप्सा ।।

**— नाथ भागवत, १५. २३५**

एखादा भक्त अनन्यभक्ती करू लागला म्हणजे तेथेही **सिद्धी प्रकट** हो असतात. पण भक्त त्यांच्याकडे तुच्छतेनेच पाहत असतो.

ज्या साधावया महासिद्धी । योगी शिणताती नाना विधी ।
त्या प्रगटल्या त्रिशुद्धी । भक्त सद्‍बुद्धी नातळती ।।
त्या आणिमादि सिद्धीच्या माथा । मद्‍भक्ती हाणोनि लाथा ।।
लागले माझ्या भक्तिपंथा । जाण तत्त्वता उद्धवा ।।

— नाथ भागवत, १४. १२६. २७

श्रीतुकाराममहाराज देवाजवळ बोलतात :

ऋद्धिसिद्धी तुम्हा मुख्य भांडवल । आम्हासी ते फोल भक्तीपुढे ।। १ ।।

या सर्व सिद्धी भौतिक असून क्षयातिशयदोषाने युक्त आहेत, म्हणूनही भक्त त्यांना सिद्धी समजत नाही.

अध्यात्मशास्त्रात मोक्ष, कैवल्य, निर्वाण यांच्या प्राप्तीस **सिद्धी** म्हणतात. त ज्यांना प्राप्त होते,त्याम सिद्ध म्हणतात. श्रीमद्‍भगवतगीतेमध्ये '**नैष्कर्म्यसिद्धि परम संन्यासेन अधिगच्छति** ।।' (गीता १८–४९). 'ज्याचे अंत:करण कोठेच आसक नाही, किंबहुना ज्याचे ताब्यात ते आहे, ज्याची इच्छा नि:शेष नाहीशी झाली आहे अशा पुरुषांस संन्यासाच्या योगाने उत्कृष्ट अशी नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त होते. तिच्या बद्दल 'संसिद्धी', 'परासिद्धी' असे शब्द गीतेने योजले आहेत. श्रीज्ञानेश्वर महाराज वरील अठराव्या अध्यायातील एकोणिसाव्या श्लोकावरील आपल्या टीके म्हणतात : 'देवळाच्या कामाला जशी कळस ही शेवटची मर्यादा आहे, अथव गंगेला जसा समुद्रप्रवेश ही शेवटची हद्द आहे. जसा सोन्याचा सोळावा हा शेवटच कस आहे, त्याप्रमाणे जे ज्ञान आत्मस्वरूपाचे अज्ञान नाहीसे करते ते ज्ञानही गिळू असणे अशी जी अवस्था, त्या नैष्कर्म्यसिद्धीच्या पलीकडे या जगात काही मिळ विण्याचे राहात नाही, म्हणून सर्व सिद्धीत ही नैष्कर्म्यसिद्धी श्रेष्ठ म्हटली जावे (ज्ञानेश्वरी, अ. १८–९८१–८३.)

श्रीनारद महर्षी येथे 'यल्लब्ध्वा पुमान्सिद्धोभवति' असे म्हणतात. जर सिद्ध शब्दाने योगातील सिद्धी प्राप्त किंवा मोक्षनिर्वाणसिद्धी प्राप्त असा अर्थ घेतला तर 'यल्लब्ध्वा' यातील यत् शब्द नपुसकलिंगी आहे. येथे भक्तीने तो सिद्ध होतो असा अर्थ केला तर भक्ती हे पद स्त्रीलिंगी आहे व म्हणून 'यालब्ध्वा' असा प्रयोग करावयास पाहिजे होता. पण 'यल्लब्ध्वा' असा प्रयोग केला आहे म्हणून येथे 'यत्' म्हणजे 'जे' व 'जे' म्हणजे 'प्रेम', असा अर्थ केला पाहिजे कारण वरील दुसऱ्या सूत्रात 'प्रेम' व तिसऱ्या सूत्रात त्याचा 'अमृतस्वरूप' असा उल्लेख आहे.

प्रेम हे कधी साधन होत नाही व साधन हे अमृतस्वरूप नसते. प्रेम हे साध्यच आहे. शिवाय खरा प्रेमीभक्त मोक्षासकट सर्व सिद्धीच्या संबंधात निरपेक्ष असतो. श्रीकृष्ण भगवान उद्धवास सागतात .

**माझे अतिशये शुद्ध भक्त । ते मुक्तीसी दूर दवडित ।**
**माझेनि भावार्थे नित्य तृप्त । ते पूज्य होत मजलागी ।।**
**जो सकळ सिद्धीचा ईश्वरू । तो मी लागे त्यांची पूजा करू ।**
**तेथिला जो सिद्धींचा संभारू । घेऊनि निजवेव्हारू पळताती ।।**
**सकळ सिद्धींच्या स्वामित्वेसी । मी भगवंत तिष्ठे भक्तापाशी ।**

—नाथ भागवत, अ. १५–२१८–१९

म्हणून भक्तिप्रेमप्राप्ती हीच फार मोठी सिद्धी आहे.

भागवत एकादश स्कंधाच्या एकोणिसाव्या अध्यायात उद्धवाने श्रीकृष्णास जे अनेक प्रश्न विचारले आहेत, त्यात लाभ कशास म्हणावे हा एक प्रश्न आहे त्याचे उत्तर श्रीकृष्णांनी 'लाभो मद्भक्तिरुत्तमः' 'माझी भक्ती हाच उत्तमोत्तम लाभ आहे' असेच दिले आहे. यावरील टीकेत श्रीएकनाथमहाराज सांगतात :

**तुवां पुसिला लाभ तो कोण । ऐक त्याचेंही लक्षण ।**
**माझी उत्तमभक्ति जाण । 'लाभ' संपूर्ण त्या नांव ।**
**माझी करिता उत्तम भक्ती । चारी मुक्ती पाया लागती ।**
**सुरवर लोटांगणी येती । लाभ श्रीपति मी लाभे ।।**

—नाथभागवत १९-५०२-३.

भगवान प्रसन्न असल्यावर त्यापेक्षा मोठ्या सिद्धी कोणत्या आहेत ? नारद-पांचरात्रामध्ये म्हटले आहे :

**हरिभक्ति महादेव्यः सर्वामुक्त्यादि सिद्धयः ।**
**भुक्तयश्चाद्भुतास्तस्याश्चेटिकावदनुव्रताः** ।।—नारदपांचरात्र.

'मुक्ती आदि सिद्धी आणि अनेक प्रकारच्या भुक्ती (भोग) दासीप्रमाणे हरिभक्तरूप महादेवीच्या सेवेत तत्पर असतात.'

हरिप्रेमाने युक्त होऊन सिद्धीची अपेक्षा केली तर प्रेमातील अनन्यता कशी राहणार ? तेथे प्रेम हे साधन होईल. अनन्य प्रेम हेच एकमेव प्रेमीचे साध्य असते, म्हणून ते प्राप्त होणे हीच सिद्धी आहे, व ही सिद्धी प्राप्त होणाराच 'सिद्ध' म्हटला जातो अनेक भक्ताच्या चरित्रातून काही सिद्धीचे चमत्कार झालेले दिसून येतात. त्यामुळे या भक्तानी सिद्धिसंपादन केल्या असाव्यात असे वाटणे स्वाभाविक आहे. पण हे चमत्कार भक्ताकरिता भगवान करीत असतो. श्रीज्ञानेश्वर महाराजांनी भिंत चालविली हे प्रसिद्ध आहे, पण श्रीतुकाराम महाराज सांगतात ती देवाने ओढली, म्हणजे चालविली. 'ज्ञानियाची भिंत अंगे ओढी ॥'

सिद्ध हा शब्द पूर्णत्वाचा वाचकही आहे. ज्याला काही साध्य प्राप्त करून घ्यावयाचे राहिले नाही असा कृतकृत्यताप्राप्त पुरुष सिद्ध म्हणविला जातो व ही सिद्धी केवळ भक्तिप्रेमानेच त्यास प्राप्त झालेली असते, यावरून प्रेमही पूर्णच आहे हे सिद्ध होते

सूत्रातील यापुढील पद 'अमृतो भवति अमर होतो' हे आहे. तिसरे सूत्र 'अमृतरूपाचे' हे आहे प्रेमभक्ती ही स्वरूपाने अमृतरूपच आहे, मग ती प्राप्त होणारा पुरुष अमृतरूप अमर का होणार नाही ? प्रेमी भक्त तन्मय होतो. 'यतस्तन्मयाः' असे पुढे सतराव्या सूत्रात म्हटले आहे म्हणून अमृतस्वरूपा भक्तीशी तन्मय होणारा भक्तही अमृतच होतो.

शांडिल्य भक्तिसूत्रातही 'तत्संस्थस्य अमृतत्वोपदेशात्' असे तिसरेच सूत्र आहे त्याचाही हाच अभिप्राय आहे 'तत्संस्थस्य' म्हणजे द्वितीय सूत्रात 'सापरानुरक्तिरीश्वरे'– ईश्वराचे ठिकाणी परम प्रेम हे भक्तीचे लक्षण सांगून, त्या ईश्वराच्या ठिकाणी संस्था म्हणजे निष्ठा, म्हणजे त्यागपूर्वक अनुरक्ती ज्याची आहे त्या प्रेमी भक्तास अमृतत्व हे फल सांगितले आहे. जेव्हा भक्त आपल्या हृदयनाथाशी एकरूप होतो तेव्हाच तो अमृतरूप होऊन जातो. **'अमर तू खरा । नोहे कैसा मी दातारा ॥'** असा प्रश्न तुकाराममहाराज देवाला करतात.

कोणी म्हणेल, अमृत होणे याचा अर्थ काय ? देहाच्या द्वारा का आत्मस्वरूपाने ? देहाच्या द्वारा कोणीही अमृत बनू शकणार नाही ? कारण देहाला उत्पत्ती आहे त्याला आयुष्य देणाऱ्या कर्माचा भोगाने क्षय झाला की देह मरणार. देहाने कोणी अमर झाला नाही. **'जातस्यहि ध्रुवो मृत्युः ध्रुवं जन्म मृतस्यच ।'** ( गीता, २.२७) 'जो जन्माला आला त्याला निश्चयाने मृत्यू आहे व जो मृत झाला त्याला निश्चयाने जन्म आहे.' हे भगवद्वाक्य स्पष्ट देहाचा मृत्यू सांगते. आत्म्याला अमरत्व प्राप्त होते म्हणावे तर आत्मा अमर आधीच आहे. तो शाश्वत, नित्य, अविकारी म्हणजे षड्भावविकाररहित आहे. हा उपनिषदे, गीता यांचा सिद्धान्त आहे.

या प्रश्नाचे थोडक्यात उत्तर असे की, आत्मा अमर आहे, देह विनाशी आहे हे जरी खरे असले तरी अनादिकालापासून जीव अज्ञानवश होऊन देहालाच मी म्हणतो व देहाचे जन्म-मृत्यूच काय, सर्व अवस्था, सर्व विकार, इंद्रिये, विषय, देहेंद्रिया-दिकाच्या द्वारे होणारी कर्मे, त्याची सुखदु:खादी फळे इत्यादी सत्यच मानतो. याचा परिणाम आत्मस्वरूपाचा त्यास विसर पडतो. त्याला संसारच प्रिय वाटतो व त्या सांसारिक भोगप्राप्तीकरताच इष्टानिष्ट कर्मे तो करीत असतो. त्याचा परिणाम जन्म व मरण अखंड भोगावे लागते. तत्त्वत. जीव जन्मणारा, मरणारा नाही. कारण तो चेतन आत्मा आहे. अनादिकालापासून जीवाला या देहसंबंधामुळे पुनः पुन्हा जन्म व मरण भोगावे लागते. एखाद्या जीवास महत्सुकृताने मनुष्यदेह लाभला, पूर्वपुण्याईने सद्‌बुद्धी प्राप्त झाली, भाग्यविशेषाने सद्‌भक्तांची संगती घडून सच्छास्त्र-श्रवण झाले म्हणजे त्यायोगाने त्याला या संसाराच्या यथार्थ रूपाची जाणीव होते, विषयभोगातील दोष कळू लागतात विषयाचे सुखही परिणामी दु:खच आहे व जन्ममरण फार त्रासदायक-दुःखस्वरूपच आहे, असे वाटू लागते. हळूहळू सत्संगतीने भगवद्‌भाव जागृत होऊ लागतो, सर्व अनार्थांचे कारण हा देह व तन्मूलक संसार आहे व विनाभगवत्कृपेच्या यातून तरणोपाय नाही असे वाटू लागते.

'तेषामहंसमुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।। (गीता, १२ ७) 'माझ्या अनन्य भक्ताचा संसारसागरातून उद्धार करणारा मीच आहे,' हे भगवंताचे प्रतिज्ञावाक्य आहे, हे जाणून त्याच्या अंत.करणात भक्ती निर्माण होते. अनित्य दुःखरूप संसार आहे म्हणून यातून मुक्त होण्याकरिता भगवद्‌भक्ती हेच योग्य श्रेष्ठ साधन आहे (अनित्यमसुखंलोकमिमंप्राप्यभजस्वमाम् ।– गीता, ९.३३) हे कळून तो भगवद्-भक्तीकडे प्रवृत्त होतो जशी जशी भगवद्‌भक्तीची गोडी लागू लागते तसतसा तो भगवदेकशरण होऊ लागतो. पश्चात्तापदग्ध अंतःकरणाने भगवंताची प्रार्थना करू लागतो. भक्तवर्य प्रल्हादाचे उद्‌गार पाहा :

**यस्मात्प्रियाप्रिय वियोग सयोग जन्म शोकाग्निना सकलयोनिषु दह्यमानः ।**
**दुःखौषधं तदपि दुःखमतद्धियाऽहं भूमन्भ्रमामि वदमेतवभक्तियोगम् ।।**

—भागवत, ७–९–१७.

प्रल्हाद म्हणतो, 'हे अनंता ! मी ज्या ज्या योनीत फिरलो त्यात प्रियाचा वियोग व अप्रियाच्या सयोगापासून होणाऱ्या शोकाग्नीमध्ये जळत होतो. त्या दुःखा-करिता जे औषध म्हणजे साधन करावे तेही दुःखासच कारण होते. मला कळत नाही की मी केव्हापासून तुमच्याहून अतिरिक्त वस्तूना आत्मा समजून इकडेतिकडे भटकत आहे. तुम्ही कृपा करून तुमच्या भक्तियोगाचे स्वरूप सांगा.'

भगवत्कृपेने भक्तियोगाचा लाभ ज्याला झाला आहे असा भक्त देहाकडे ढुंकूनही पाहत नाही. 'तुका म्हणे तुम्ही आइकाहो मात। आम्ही हो अतित

देहाहुनी ।। श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधाच्या दुसऱ्या अध्यायात जनक-नवयोगेश्वर संवादात म्हटले आहे .

**देहेंद्रिय प्राणमनोधियां यो जन्माप्ययक्षुद्भयतर्षकृच्छ्रैः ।**

**संसारधर्मैरविमुह्यमानः स्मृत्याहरेर्भागवतप्रधानः ।।२–४९।।**

'देह, इंद्रिये, प्राणमन याचे विशिष्ट धर्म जे जन्ममृत्यू क्षुधातृष्णा, भय, भोगेच्छा व कर्म, ते ससारात प्रतिक्षणी उत्पन्न होत असताही त्या हरिभक्ताच्या हरिस्मरणामुळे ते धर्म बाधक होत नाहीत, त्यास भागवतप्रधान म्हणावे.'

या श्लोकावरील श्रीएकनाथ महाराजाची भावगर्भ टीका पाहा.

**देह इंद्रिये मनबुद्धिप्राण । हेचि बंधाचे पंचायतन ।**
**क्षुधातृषाभयक्लेशपूर्ण । जन्ममरण इत्यादि ।।**
**या पांचा स्थानी अपार श्रम । या नाव म्हणिजे संसारधर्म ।**
**निज भक्ता प्रसन्न आत्माराम । त्यांसी भवभ्रम स्वप्नीही नाही ।।**
**देह बुद्धी माजी जाणा । नानापरी उठती तृष्णा ।**
**ते बुद्धी निश्चये हरीच्या स्मरणा । करिता परिपूर्णा विनटली स्वये ।।**
**जन्म आणि मरण । हे देहाचे माथा जाण । भक्त देही विदेही पूर्ण ।**
**ध्याता हरिचरण । हरिरूप झाले ।।**
**यालागी देहाची अहंता । कदानुपजे भगवद्भक्ता ।**
**ते भक्तपूर्णतेची कथा । ऐक नृपनाथा सांगेन ।।**
**भक्त देहासि येता मरण । हेतुरहित हरीचे स्मरण ।**
**या लागी देह निमाल्या आपण । न मरता पूर्ण पूर्णत्वे उरे ।।**
**हरिभक्ता देहाचा अभावो । मा काळ कवणा घालील घावो ।**
**आता आम्ही ते आम्हीच आहो । ते आम्हीपणही वावो आमुचेनि आम्हा ।।**

नाथभागवत. २.६६४–९०

याचे तात्पर्य हे की भक्त देहाला अमर करण्याची अपेक्षा करीत नाही. मी भगवंताचाच जर अंश आहे, चेतन आहे तर भगवंताप्रमाणेच मलाही जन्ममरण नाही, हीच त्याची भावना असते. याच आशयाने 'मरण माझे मरुनी गेले। मज केले अमर ।।' हे तुकाराम महाराजांचे उद्गार सार्थ आहेत. भगवान श्रीकृष्ण अर्जुनास प्रतिज्ञापूर्वक सांगतात : **'न मे भक्तः प्रणश्यति'**–'माझ्या भक्ताचा नाश नाही. (गीता ९.३१.)

या श्लोकावरील आपल्या व्याख्यानात श्रीज्ञानेश्वर महाराज सांगतात :

**तो आता अवसरे मजसारिखा होईल । ऐसाही भाव तुज जाईल ।**
**हां गा अमृताआंत राहील । तया मरण कैचे ।।–ज्ञा. ९–४२५.**

प्रेमी भक्ताच्या मृत्यूचाच मृत्यू होतो. त्याचे जीवन, त्याचा व्यवहार सर्व भगवन्मय होऊन जातो. भगवंतावर जसा काळाचा प्रभाव पडत नाही तसाच भक्तावरही पडत नाही

**तेवी मी तया। जैसे असती तैसिया।**
**कळिकाळ नोकोनिया। घेतला पटा॥–ज्ञा. १२.८४**

असे श्रीकृष्ण भगवान अर्जुनास सांगतात.

**जगा काळ खाय। आम्ही माथा दिले पाय॥**–तुकाराम महाराज,

हे संताचे उद्‌गार हेच दर्शवीत नाहीत काय! देहतादात्म्यवानांनाच मृत्यूचे भय असते. भक्ताचे ते पूर्णपणे सुटलेले असल्यामुळे तो काळाला भीत नाही. श्रीज्ञानेश्वर महाराजाची सजीवन समाधी, श्रीतुकाराममहाराजाचे सदेह वैकुंठगमन, एकनाथांच्या देहाचे जलमय होणे इत्यादी गोष्टी अमृतत्वाच्या द्योतकच नाहीत काय?

काही उपलब्ध नारदभक्तिसूत्राच्या प्रतीत ‘अमृती भवति’ म्हणजे अमर होतो असा अर्थ केला आहे, ‘अमृती भवति’ याचा अर्थ भक्त स्वत ‘अमृत’ बनतो, म्हणजे अमृताचे दोन विशेष मानले जातात. एक, मृत्यूची बाधा दूर करणे व दुसरा, मधुरत्व. मधुरत्व म्हणजेच रसरूपता, रसशब्द वेदात आनंद या अर्थी वापरला आहे भक्त स्वभावाने किती मधुर असतो त्याचे वर्णन एके ठिकाणी खालीलप्रमाणे केले आहे.

प्रियप्रायावृत्तिर्विनयमधुरी वाचि नियम ।
प्रकृत्याकल्याणी मतिरनवगीत परिचय ॥
पुरोवापश्चाद्वा सविधमविपर्यासितरसं ।
रहस्य साधूनां निरुपधि विशुद्धं विजयते ।

‘प्राय: सर्वांच्या बरोबर सर्वांना प्रिय होईल असे आचरण, नम्रतेने युक्त, मधुर संयमित वाणी, स्वभावत सर्वांचे मंगल इच्छिणारी बुद्धी, आपला गुणगौरव झाकण्याची प्रवृत्ती, कोणी सन्मुख असो अथवा विमुख सर्वांसी समान भाव हा साधूचा उपाधिरहित शुद्ध स्वभावच होऊन गेलेला असतो’

कोणा एका व्यक्तीवर प्रेम करणे हा संसारी माणसाचा स्वभाव असतो. पण अग्नी प्रज्वलित आहे, वाटेल त्याने शीतनिवारण करून घ्यावे. चंद्रोदय झाला आहे, राजा-रंकानी त्या शीतल मधुर प्रकाशाचा आनंद लुटावा, कमल प्रफुल्लित झाले आहे, कोणीही त्याचा सौरभ सेवन करावा, तसे प्रेमी भक्ताच्या जीवनात विनयाचे माधुर्य असते. सर्वांचे कल्याण इच्छिणे हा त्याचा स्वभाव होऊन राहतो. कोणी त्यांना केव्हाही भेटा, त्यांची स्तुती करा किंवा निंदा, त्याना पीडा द्या

किंवा सुख द्या, कसेही झाले तरी त्याच्या हृदयातील रस एकरूपच असतो व ते सर्वांसी मधुरभावानेच प्रकट होतो. साखर स्वच्छ पाण्यात टाकली किंवा गलिच्छ पाण्यात टाकली तरीही त्या पाण्यास गोडच बनवील, तसे भक्ताच्याजवळ कटुत्वाला स्थानच नाही.

भगवान 'अमृतस्वरूप' आहे व भक्त आणि भगवान यांच्यात भेद नाही पुढे सूत्र एकेचाळीसमध्ये श्रीनारदमहर्षीच म्हणतात . 'तस्मिन्स्तज्जने भेदाभावात्' 'भगवान व त्याच्या भक्तामध्ये भेदाचा अभाव आहे.' म्हणूनही 'अमृतीभवति असे म्हटले आहे

या पुढील पद 'तृप्तो भवति'–'तो प्रेमी भक्त तृप्त होतो' असे आहे. तृप्ती संतोष, समाधान, तृष्णाराहित्यादि शब्दसमानार्थक आहेत. जीवाच्या सर्व क्रिय पर्यायाने तृप्तीकरिताच असतात. क्षुधेने व्याकुळ झालेला प्राणी अन्नाने तृप्त होतो व मी तृप्त झालो असे म्हणतो ती तृप्ती खरी नव्हे, कारण पुन्हा थोड्याच वेळात क्षुधेने पीडित होतो. मनुष्य अनुकूल विषयसेवनाकरिता प्रवृत्त होतो व इंद्रियाविना विषय सेवन होऊ शकत नाही म्हणून इंद्रियाधीन होतो. 'इंद्रिय' शब्दाचा अर्थच हा आहे- 'इंद्रस्य आत्मन विषयोपलब्धिकारणतया लिङ्गानि इंद्रियाणि' म्हणजे जीवात्म्यास विषयाच्या उपलब्धीस कारणीभूत असतात म्हणून इंद्रिये म्हटली जातात पण ती बहिर्मुख आहेत त्याना त्याचे त्याचे विषयच प्रिय असतात.

**या विषयावांचूनि कांही । आणीक सर्वथा रम्य नाहीं ।**
**ऐसा स्वभावोचि पाही । इंद्रियांचा ॥**
**हे विषय तरी कैसे । रोहिणीचें जळ जैसें ।**
**का स्वप्नींचा आभासे । भद्रजाति ।**

देखे अनित्य ते यापरी । म्हणऊनि तू अव्हेरी ॥ ज्ञा. २.१२०–२१

विषय हे मृगजळवत् भासमान मिथ्या आहेत, पण अत.करणही इंद्रियद्वारे विषयाकडेच सतत धावत असते व अंत.करण म्हणजेच प्रमाता जीव. कारण अंत.करणोपाधीमुळेच चैतन्यास जीवदशा प्राप्त होते.

वाया मन हे नाव । येऱ्हवी कल्पनाचि सावे ।
जयाचेनि सगे जीव । दशा वस्तु ॥ ज्ञा. १३–११०

असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात

म्हणजे जीव हा विषयाच्या सतत मागे लागतो. अनादी जन्म–जन्मातरीय सस्कारांमुळे विषयाच्या ठिकाणी सत्यत्व बुद्धी व अनुकूल बुद्धी, तसेच देहेंद्रियादि संघाताचे तादात्म्य असल्यामुळे स्वत.च्या सुखरूपतेस विसरून जीव तृप्ती, संतोष समाधानाकरिता विषयाच्या मागे लागतो. त्या विषयप्राप्तीकरिता अहर्निश प्रयत्न

करतो व प्राप्त विषयाचा भोग घेतो. पण विषय हे जीवाची सुखवासना तृप्त करू शकत नाहीत. कारण ते अनित्य म्हणून स्वरूपाने दुःखरूपच आहेत.

**तेवीं विषयाचें जें सुख । तें केवळ परम दुःख ।**
**परी काय कीजे मूर्ख । न सेवितां न सरे ।। –ज्ञा. ९-४९९.**

असे श्रीज्ञानेश्वर महाराज स्पष्ट म्हणतात.

विषय जड आहेत. सुख हा जडाचा धर्म होऊ शकत नाही. केवळ भ्रमामुळे म्हणजे परमात्मा हाच सुखरूप आहे हे न कळल्यामुळे त्याच्या आनंदाचा प्रत्यय न आल्यामुळे सुखरूप भासतात. देहाहंकारामुळे आनंदाचे आवरण होते, परमात्मस्वरूपाचे अज्ञान वाढते. श्रीएकनाथ महाराजांनी एका दृष्टांताच्याद्वारे ही गोष्ट सांगितली आहे.

जेवी कूर्मीचिया पिलिया । चक्षुरमृते तृप्ती तया ।
तेचि मातेसी चुकलिया । मग भुकेलिया कर्दमू सेवी ।।
तेवी खुटलिया आनंदाभिव्यक्ति । जीवासी वाढे विषयासक्ती ।
कामिनी कामापंगिस्त होती । चिंता चित्ती विषयांची ।।
विसरला आपुलें पूर्णपण । धनालागी अति हीनदीन ।
मी देहवंत परिच्छिन्न । ऐसा देहाभिमान दृढ होय ।।
– नाथभागवत १३.४३४–३६

कासवीच्या पिलाची तृप्ती केवळ मातेच्या दृष्टिक्षेपानेच होते. पण ते जर मातेस चुकून दूर गेले तर मात्र त्याला भूक लागली तर मातेची तृप्त करणारी दृष्टी प्राप्त होत नाही. मग क्षुधापीडानिवारणार्थ चिखल खावा लागतो, पण त्याने पूर्ण तृप्ती होणे शक्य आहे काय ? तद्वत् जीवालाही परमात्मा माऊलीच्या प्रेमानेच खरी तृप्ती प्राप्त होणे शक्य आहे. पण देहेंद्रिय तादात्म्यामुळे त्या शुद्ध प्रेमाला मुकल्यामुळे विषयाचा चिखल खावा लागतो. पण त्या विषयसेवनामुळे कोणाची तृप्ती झाली आहे काय ? मृगजळामागे धावणाऱ्या हरिणांची कधी तरी तृषा नाहीशी होईल काय ? शुक्राचार्यांच्या शापाने जराग्रस्त झालेल्या ययाति राजाने पुन्हा पुत्राने दिलेल्या नवतारुण्याने एक हजार वर्षे यथेच्छ विषयोपभोग भोगले. पण तृप्ती झाली नाही. तेव्हा त्याच्या पश्चात्तापदग्ध अंतःकरणातून असे उद्‌गार निघाले की,

यत्पृथिव्या व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः ।
न दुह्यन्तिमनः प्रीतिं पुंसः कामहतस्यते ।। १३ ।।
न जातु काम. कामानामुपभोगेन शाम्यति ।
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ।। १४ ।।
**– भागवतस्कंद ९–१८.**

'या पृथ्वीमध्ये जेवढे म्हणून धान्य, सुवर्ण, स्त्रिया इत्यादी भोग्य पदार्थ आहेत, ते सर्व जरी एखाद्याला प्राप्त झाले तरी कामनाभिभूत पुरुषाच्या मनाला संतुष्ट करू शकत नाहीत. कारण विषयोपभोगाने कामना शांत तर होत नाहीच, पण घृताच्या आहुतीने अग्नी कमी न होता वृद्धिगतच होत जातो, त्याप्रमाणे तो काम वाढतच जातो'

विषयात जर तृप्ती नाही तर जीव तिकडे प्रवृत्त का होतो ? तसेच अनुकूल विषयसेवनाने सुख झाल्यासारखे का वाटते ?याचे उत्तर हे की, देहेंद्रिय तादात्म्यवान अज्ञानी पुरुषाची वृत्ती बहिर्मुख होते निसर्गत.च तिला सुखेच्छा असते. खऱ्या सुखाचे ज्ञान नसल्यामुळे ती विषयाकडे अनुकूल बुद्धीने इद्रियद्वारा जाते. इष्ट विषय प्राप्त झाला असता क्षणैक बहिर्मुखता दूर होऊन ती वृत्ती अतर्मुख होते व त्या वृत्तीत आत असणाऱ्या आत्मस्वरूपाचा आनंद प्रतिबिंबित होतो जसे एखादे कुत्रे वाळलेले हाड आपल्या दाताने फोडीत बसते त्याच हाडाचा तुकडा त्याच्या हिरड्यास घासून त्यातून रक्त येते. ते त्याच्या जीभेवर पडले म्हणजे त्यास वाटते हे त्या हाडातूनच आले तसाच प्रकार वृत्तीचाही आहे म्हणजे आनद हा विषयाचा नसून, इच्छावृत्ती अतर्मुख झाली त्याचा आहे तसेच ती अतर्मुखताही तिचे साधन जो विषयलाभ तो क्षणिक असल्याने तो विषय नष्ट झाला, किवा त्यापेक्षा दुसरा श्रेष्ठ विपय समोर आला किवा त्या विषयाचे दोषदर्शन झाले, किवा काही प्रतिबध आला तर नष्ट होते म्हणून भोगलेल्या सुखाचाही नाश झाल्यासारखा वाटतो व पुन्हा सुखाकरिता अन्य विषयाकडे धावत जातो त्यात एखादा इहलोकातील सुखे तुच्छ समजून पारलौकिक स्वर्गादी सुखाच्या प्राप्तीकरिता यज्ञयागादी करण्याकरिता प्रवृत्त होतो ती क्लेशकारक कर्मे करतोही व त्याला कदाचित् स्वर्गसुख प्राप्तही झाले तरी तेही शेवटी विषयाचेच असते जे दोष ऐहिक विषयात असतात तेच त्या पारत्रिक विषयातही आहेत.

श्रुतच दृष्टवद्दुष्ट स्पर्धासूयाऽत्ययव्ययै. ।<br>
बव्हन्तराय कामत्वात्कृषिवच्चापि निष्फलम् ।।

— भागवत, ११–२१

'श्रुतीने सागितलेले स्वर्गफलही इहलोकाप्रमाणे दु.खरूपच आहे तेथेही स्पर्धा, द्वेष, सुख न्यून होण्याची भीती, नष्ट होण्याची भीती वगैरेने ते दूषित असतेच. त्याचप्रमाणे ते मिळविण्यास अनेक प्रकारची विघ्ने असल्यामुळे शेतकऱ्याची शेती ज्याप्रमाणे निश्चित फलदायी नसते, त्याप्रमाणे स्वर्गफलही निश्चित मिळेलच असा विश्वास नाही' असे श्रीकृष्णानी उद्धवास उपदेश करताना स्पष्ट सागितले आहे. या श्लोकावरील श्रीएकनाथ महाराजांची विस्तृत टीका मुळातच पाहावी.

या विषयाचा एवढा विस्तार करण्याचे कारण तृप्ती सर्वांनाच अपेक्षित आहे व जी सर्वांना अपेक्षित आहे ती अयोग्य आहे असे म्हणता येत नाही ती मिळालीच पाहिजे, हेही खरे आहे पण जगाकडे दृष्टी टाकल्यास सामान्य माणसेच काय इंद्रादिकही अतृप्तच दिसून येतात अमृत प्राशन करणारा, दिव्यभोगसंपन्न, अनेक अप्सरांचा उपभोग घेणारा इंद्रही पुन्हा अहिल्येची अपेक्षा ठेवतो !

तृप्ती म्हणजे एकप्रकारे कृतकृत्यताच होय कारण मनुष्य जे काही कर्म करतो ते तृप्तीकरिताच करतो तृप्त झाल्यावर त्याला कर्माची गरज नसते (तृप्ती झालिया जैसी । साधने सरती आपैसी ।। —ज्ञा ३-१४८) पण प्रत्येक प्राणी सतत कर्मे करीतच आहे, हे स्पष्टच आहे तसेच कोणीही स्वत:स तृप्त समजत नाही. तृप्ती ही पूर्णतेत असते वेदांतशास्त्रात तृप्ती ही जीवाची ज्ञानाने प्राप्त होणारी शेवटची भूमिका सांगितली आहे जीवाच्या अज्ञान, आवरण, विक्षेप, परोक्ष ज्ञान, अपरोक्ष ज्ञान, शोकनाश व तृप्ती अशा सात अवस्था मानल्या आहेत

**अज्ञानमावृतिस्तद्वद्विक्षेपश्च परोक्षधी ।**
**अपरोक्षमति शोकमोक्षस्तृप्तिर्निरंकुशा ।।**

— पंचदशी तृप्तिदीप, ३३

या सात अवस्थातील प्रथम तीन अवस्था अज्ञानाच्या आहेत व पुढील चार अवस्था ज्ञानाच्या आहेत यात शेवटची अवस्था निरंकुशा तृप्ती ही सांगितली आहे विषयभोगापासून जी तृप्ती झाल्यासारखी वाटते ती सांकुशा म्हणजे अन्य विषयाची कामना झाली असता ती तृप्ती कुंठित होते म्हणजे राहात नाही, पुन्हा अतृप्ती येते पण अपरोक्ष ज्ञानजन्य तृप्ती अन्यविषयक कामनेच्या अभावामुळे कुंठित होत नाही, ती अखंड, अबाधित राहते याच तृप्तीचे श्रीभगवद्गीतेमध्ये **'यस्त्वात्मरतिरेवस्यादात्मतृप्तश्च मानव.** ।। (गीता ३.१७) तसेच **'नित्यतृप्तो निराश्रय '** (गीता ४ २०) असे वर्णन केले आहे या तृप्तीतच 'धन्योऽहं धन्योऽहं ' असे उद्‌गार त्या ज्ञानी पुरुषाच्या मुखातून बाहेर पडतात 'जे ज्ञानगंगे न्हाले । पूर्णता जेऊनि धाले ' (ज्ञा ९-१९०) असे त्याचे वर्णन श्रीज्ञानेश्वर महाराज करतात

प्रेमी भक्ताची तृप्तीदेखील अशी निरंकुशा, प्रतिबंधरहित, अखंडच असते, पण तिचा उगम भगवत्प्रेमातून होतो तो सर्वांगाने प्रेमात रंगून जातो, प्रेममय बनतो श्रीकृष्ण भगवान अर्जुनाजवळ त्या प्रेमाचे वर्णन करतात.

**ऐसे प्रेमाचेनि बहुवसपणे । नाहीं राती दिवो जाणणे ।**
**केलें माझें सुख अव्यंगवाणें । आपणपेया जिहीं ' ।।**

— ज्ञा. १०-१२९

एका दृष्टीने पाहिल्यास प्रेमात अतृप्तीही दिसून येते. कारण प्रेम कोठे थाबत नाही

**'तृप्ती भुकेली काय करू माये । जीवनी जीवन कैसे तान्हेजत आहे ।।'**

— ज्ञा. अभंग-

' पोट सेवीता न धाये । भूक भुकेलीच राहे ।।
विटे ऐसे सुख नोहे भक्तिरस । पुढता पुढती आस सेवावी हे ।।

— तुकाराम महाराज

पण या अतृप्तीतच भक्त तृप्तता मानतो तो भगवद्विरहातही जेवढे सुख, जेवढा आनद प्राप्त करून घेतो, विषयी पुरुषाला विश्वातील सर्व विषयभोग प्राप्त झाले तरी तो आनंद, ती तृप्ती लाभणार नाही या प्रेमी व्यक्तीचे सयोगातही वियोगोपलालन असते तर वियोगातही संयोगच असतो म्हणून त्याची तृप्ती अखड आहे. जोपावेतो जगातील पदार्थांना ईश्वरलीलेहून भिन्न अशी पृथक् सत्ता मानली जाते तोपावेतोच त्याना सुखप्रद किवा दु.खप्रद मानून मनुष्य निरतर नवीन नवीन सुखप्रद विषयाची इच्छा करीत अतृप्त राहतो जेव्हा सर्वांचे मूल, सर्वांचे यथार्थ पूर्ण स्वरूप त्या प्रेमी मानवाला प्राप्त होते, तेव्हा या अपूर्ण पदार्थाकडे त्याचे मन जात नाही व तो पूर्णत्वास प्राप्त होऊन तृप्त होतो श्रीएकनाथ महाराज म्हणतात.

**भक्तीपाशी नित्यतृप्ती । भक्तीपाशी नित्यमुक्ति ।**
**भक्तीपाशी भगवत्प्राप्ति । माया निवृत्ति हरिभजने ।।** ६२० ।।

— नाथभागवत, अ ३

सूत्रात ' यल्लब्ध्वा पुमान्सिद्धोभवति अमृतोभवति तृप्तोभवति असा ' भवति ' शब्द तीन वेळा का आला ? ' यल्लब्ध्वा पुमान्सिद्धो ऽ मृतो तृप्तो भवति ' असेही सूत्र होऊ शकले असते, अशी कोणी शका करील. त्याचे उत्तर असे की, जर वरीलप्रमाणे एकवेळाच शेवटी ' भवति ' असे म्हटले असते तर या फलाचा पूर्वापरभाव सिद्ध झाला नसता तर त्यात समुच्चयार्थ आला असता. तसेच ' सिद्धोभवति ' ' अमृतोभवति ', ' तृप्तोभवति ' अशी तीन सूत्रे वेगळी केली असती तर, त्यात उत्तरोत्तर अमृत व तृप्ती याना गौणत्व आले असते व मुख्य सूत्र ' सिद्धोभवति ' हे झाले असते. वास्तविक सिद्धी, अमृतत्व, तृप्ती यात एकत्व असूनही सूत्रातील क्रमामुळे येथे सिद्धोपेक्षा अमृतत्व, त्यापेक्षा तृप्ती हे येथे मुख्य आहे. यामुळे एका सूत्रात तीनवेळा, ' भवति ' शब्द आणावा लागला आहे.

चौथ्या सूत्रात प्रेमभक्तिलाभाचे विधायक लक्षण सागितल्यावर पुढील पाचव्या सूत्रात निषेधक लक्षण सागतात.

# सूत्र ५ वे

## यत्प्राप्य न किञ्चिद्वाञ्छति, न शोचति, न द्वेष्टि, न रमते, नोत्साही भवति ।। ५ ।।

**अर्थ :**

जे ( भक्तिप्रेम ) प्राप्त करून ( तो पुरुष ) अन्य ( कशाचीही ) किंचितही इच्छा करीत नाही ( कोणाकरताही ) शोक करीत नाही, ( कोणाशीही ) द्वेष करीत नाही, ( कोणत्याही विषयात, वस्तूत किंवा व्यक्तीमध्ये ) रममाण (आसक्त) होत नाही, कोणत्याही ( लौकिक कार्यात) उत्साहयुक्त होत नाही.

**विवरण :**

प्रेमी भक्ताच्या ठिकाणी संसारी माणसापेक्षा बऱ्याच अलौकिक गोष्टी सिद्धी, अमृतत्व, तृप्ती इत्यादी असतात तसेच संसारी लोकाजवळ जे जे दोष असतात, जे जीवास परतंत्र-दु:खी बनवितात ते भक्ताजवळ नसतात. तेच निषेध मुखाने या पाचव्या सूत्रात सांगितले आहे इच्छा, शोक, द्वेष इत्यादी जेथे असतात तेथे सिद्धी, अमृतत्व, तृप्ती राहू शकतच नाहीत. याकरिता इच्छा, शोक, द्वेष, उत्साह इत्यादिकाचा निषेध केला आहे. सूत्रारंभी ' यत्प्राप्य ' ( ' म्हणजे भक्तिप्रेम प्राप्त झाले असता ' ) असे पद आहे. त्या भक्तीची प्राप्ती कशी होते ? याचा विचार केला असता तीन प्रकाराने होते, असे दिसून येते.

१ पूर्वपरंपराप्राप्त म्हणजे उत्तर अधिकाराने मिळालेली. उदाहरण– प्रल्हादानंतरचे त्याच्या वंशातील बळी इत्यादी भक्त बनले. तुकाराममहाराज म्हणतात,

माझ्या वडिलाची मिराशी गा देवा । तुझी चरणसेवा पांडुरंगा ।।

सहज वडिला होती सेवा । म्हणुनि पूजीतो या देवा ।।

एकनाथाचे पूर्वज भानुदास हे महान्भगवद्भक्त होऊन गेले, अशी काही उदाहरणे आहेत, पण भक्ताचे वंशज सर्वच भक्त निपजतात असे नाही.

२. एखाद्या संताने वा गुरूने कृपा करून भक्तीचा मार्ग दाखविला म्हणजे ही भक्ती प्राप्त होते. श्री ज्ञानेश्वर महाराज सांगतात,

श्रीगुरु निवृत्तीने दिधले । ते प्रेम कोणे भाग्ये लाधले ।।

किंवा भगवत्कृपा भगवत्प्रेरणेने हृदयात अकस्मात भक्तिप्रेमाचा संचार कोणा कोणाचे ठिकाणी झालेला दिसून येतो.

३. भजन, ध्यान, कीर्तन इत्यादी साधने करण्यानेही चित्तात भक्तीचा उदय होतो.

यांपैकी कोणत्याही प्रकाराने भक्तिप्रेम प्राप्त झाले म्हणजे झाले अशा या भक्तिप्रेमात निमग्न पुरुष त्या भक्तीची प्राप्ती झाल्याने अन्य कशाचीही वांछा करीत नाही, असे श्रीनारद महर्षी म्हणतात. वाछा, अपेक्षा, इच्छा, कामना या सर्वांचा अर्थ एकच आहे ही एक जीवाची मूलभूत मनोवृत्ती आहे. जेव्हा जीवाचे शरीराशी तादात्म्य होते तेव्हा तो बहिर्मुख होऊन हे मला पाहिजे, ते मला पाहिजे असे म्हणतो. त्या वृत्तीस इच्छा, कामना म्हणतात एका इच्छेपासूनच पुढे द्वेष, शोक इत्यादी निर्माण होतात सर्व जीव कामबद्ध आहेत ही इच्छावृत्ती दृष्ट विषयप्राप्तीमुळे जरी क्षणिक अशी शात झाल्यासारखी वाटली तरी ती शांतता क्षणिकच असते. तसेच इच्छेचे विषय असणारे सर्वच पदार्थ प्राप्त होतातच असे नाही, कारण त्याकरिता लागणारे अनुकूल प्रारब्ध वा प्रयत्न किंवा अन्य साधन-सामग्री प्राप्त असतेच असे नाही ती इच्छा पूर्ण झाली नाही की पुन्हा तळमळ, अशांतता निर्माण होतेच यदाकदाचित एक इच्छा पूर्ण झाली तरी अनंत विषयांच्या अनंत इच्छा पूर्ण होणे शक्य नाही त्यामुळे वृत्ती सदैव बहिर्मुखच असते ही बहि-र्मुखताच सर्व अशातीचे बीज आहे भगवत्प्रेमात वृत्ती केवळ भगवदाकाररूप बनलेली असते. भगवत्प्रेमाचा आनद भोगणाऱ्या प्रेमी भक्तास सर्व ऐहिक– पारत्रिक भोग तुच्छ वाटतात खऱ्या भक्तास अन्य महत्त्वाच्याही भोगाची इच्छा कशी नसते याबद्दल भगवान श्रीकृष्ण उद्धवास सागतात–

**न पारमेष्ठ्यं न महेद्रधिष्ण्यं न सार्वभौमं न रसाधिपत्यम् ।**
**न योगसिद्धिरपुनर्भवंवा मय्यर्पितात्मेच्छति मद्विनान्यत् ।।**

– भागवत ११–१४–१४

'भगवान श्रीकृष्ण म्हणतात, 'उद्धवा ! ज्याचे चित्त माझ्या ठिकाणी अर्पिले गेले आहे. असा माझा अनन्यभक्त सामान्य भोगच काय पण ब्रह्मलोकाचीही इच्छा करीत नाही. स्वर्गातील इद्रपदाच्या भोगाचीही इच्छा करीत नाही. सार्वभौम राज्य प्राप्त झाले तरी त्याची त्यास अपेक्षा नसते. पाताळादी लोकाचे स्वामित्व त्यास तुच्छ वाटते अणिमादी सिद्धीकडे तो पाहतही नाही, इतकेच नव्हे तर तो जन्मभावस्वरूप मोक्षाचीही पर्वा करीत नाही. माझ्यावाचून तो कशाचीही इच्छा करीत नाही.'

इच्छा–आकाक्षा भक्तास का नसते याचे महत्त्वाचे कारण श्रीज्ञानेश्वर-महाराजानी बाराव्या अध्यायातील भक्तलक्षणाचे वर्णन करताना सागितले आहे.

**आणि जयापरौते काहीं नाहीं । तें आपणपेंचि आपुलां ठायीं ।**
**जाहला यालागीं जो कांहीं । आकांक्षी ना ।।**

ज्ञा. १२-१९३

बाह्यविषय दिसावेत, त्याच्या ठिकाणी सुखबुद्धी असावी, त्याच्या प्राप्तीविना जीवन अपूर्ण वाटावे, तरच त्याची इच्छा होते. पण प्रेमी भक्तास आपल्या प्रियतमाविना अतरबाह्य काही दिसतच नाही तर त्याच्या ठिकाणी अन्य विषयाची अनुकूल भावना कशी राहील ? प्रेमी भक्ताला बाह्य अतर आपला प्रियतमच दिसत असतो. पुढे पचावन्नाव्या सूत्रात नारद महर्षीच सागतात,

**तत्प्राप्य तदेव अवलोकयति, तदेव श्रुणोति तदेव भाषयति,**
**तदेव चिंतयति ।**

अशी स्थिती होते. 'विषय तो त्याचा झाला नारायण । नावडे जनधन मातापिता ।। असे या अवस्थेचे वर्णन श्रीतुकाराममहाराज करतात

सूत्रात 'किञ्चित्' असा शब्द आहे सर्वाना सर्व विषयाची इच्छा असतेच असे नाही. तरीही कोणत्या ना कोणत्या विषयाची सूक्ष्म का होईना इच्छा असतेच, पण भक्ताचे इच्छा करणारे मनच उरत नाही ते भगवन्मयच होऊन गेलेले असते म्हणून किचितही इच्छेचा प्रवेश त्याच्या ठिकाणी नसतो

तसेच पुढील पद 'न शोचति' हे आहे इच्छा हा जसा एक नैमित्तिक विकार आहे, तसाच शोक हाही एक नैमित्तिक विकार आहे पण जीवाच्या जीवनात अपरिहार्यरूपाने तो येतो ज्याच्याविषयी इष्ट बुद्धी असते अशा सचेतन वा अचेतन पदार्थाचा वियोग झाला म्हणजे आत्यतिक दु:ख होते त्यास शोक म्हणतात

**नश्वरा इष्टाचा नाश देख । तेणे देहाहंता मानी दुःख ।**
**या नांव गा शोक । सकळही लोक मानिती ।।१७९।।**

—नाथभागवत अ २८

असे शोकाचे लक्षण श्रीकृष्णभगवंतानी उद्धवोपदेश प्रसगी केले आहे. संसारात प्रिय—अप्रियाच्या सयोग-वियोगाचे प्रसंग येतच असतात म्हणजे अप्रियाचा संयोग व प्रिय वस्तूचा वियोग होतच असतो कोणी तो टाळू शकत नाही भगवान श्रीकृष्ण ज्याचा मामा, अर्जुनासारखा युद्धात प्रत्यक्ष शकराना जिकणारा पिता उपस्थित असताही अभिमन्यूच्या वियोगाचा शोक पाडवाना झाला कितीही सुखात ऐश्वर्यात — वैभवात असला तरी शोकाचा प्रसग आला की सर्व तुच्छ होते व जीवनही असह्य वाटते कित्येक शोकातिरेकाने आत्महत्त्याही करण्यास प्रवृत्त होतात.

शोकनाशाचे एक साधन आत्मज्ञान आहे, असे उपनिषदातून सागितले आहे.

**तत्र को मोहः क शोक एकत्वमनुपश्यतः ।।**

—ईशावास्य

'कोणताही विकार भेदात, द्वैत प्रतीतीत असतो जेथे आत्मैक्य बोध आहे, तेथे कुठला मोह व कुठला शोक सभवतो,' असे ईशावास्योपनिषदात म्हटले आहे श्रीकृष्ण भगवतानी तत्त्वज्ञान सागून अर्जुनाचा शोक दूर केला, हे प्रसिद्ध आहे. तसेच 'तरति शोकमात्मवित्' 'आत्मवेत्ता शोकातून तरून जातो' असे महर्षी नारद व सनत्कुमार याच्या सवादात छादोग्यउपनिषदामध्ये सागितले आहे तसेच भक्तही शोकरहित असतो श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या बाराव्या अध्यायात श्रीकृष्णानी अर्जुनास जी भक्तलक्षणे सागितली आहेत त्यात–

यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काक्षति । –गीता अ १२

'अर्जुना ! माझा जो प्रिय भक्त आहे तो कोणाचाही द्वेष करीत नाही. कोणत्याही वैषयिक भोगाची प्राप्ती झाली असता त्यास हर्ष होत नाही, तसेच तो कोणाहीबद्दल शोक करीत नाही व कशाचीही तो अपेक्षा करीत नाही'

इष्ट वस्तूचा नाश अथवा वियोग झाला असता शोक होतो असे वर म्हटले आहे, पण भक्त त्याला भगवत्कृपा समजतो ती एक माझ्याकरिता झालेली भगवल्लीला आहे असे मानतो याच दृष्टीने श्रीतुकाराम महाराजांचे हे उद्‌गार मननीय आहेत

**बरे झाले देवा निघाले दिवाळे । बरी या दुष्काळे पीडा केली ।।**
**बाईल मेली बरे झाले । देवे माया सोडविले ।।**

तसेच जी वस्तू आपली खरी आहे ती केव्हाही आपल्यापासून दूर होत नाही म्हणून तो गतवस्तूबद्दल शोक करीत नाही, असेही एक कारण श्रीज्ञानेश्वरमहाराज भक्तलक्षणावरील आपल्या व्याख्येत सागतात.

**पै आपुले जे साचे । ते कल्पांतीही न वचे ।**
**हे जाणोनि गताचे । न शोची जो ।।** ज्ञानेश्वरी अ. १२–१९२.

मागील सूत्रात भक्तलक्षणात तो सिद्ध होतो, अमृत होतो, तृप्त होतो असे सागितले आहे त्यात कामना, शोक हे विकार कसे सपादू शकतील ? परमप्रिय भगवान तर आपल्या हृदयातच असता आपण रडू लागलो दुसऱ्याकरिता, तर तो त्याचा एकप्रकारचा अपमानच नव्हे काय ? त्यामुळे भक्ताच्या अनन्यतेत बाध येणार नाही काय ?

वर शोकाच्या कारणात नश्वर इष्ट वस्तूचा वियोग हे शोकाचे कारण सागितले आहे. भक्ताच्या जीवनात इष्ट एक केवळ भगवानच आहे तो नित्य हृदयातच आहे त्याचा नाश होणेच शक्य नाही इतर नाशवान वस्तू भक्ताला

इष्ट वाटतच नाहीत 'सर्व सगे वीट आला । तू एकला आवडसी ।।' हीच त्याची भूमिका असते. म्हणून भक्त सासारिक कोणत्याही वस्तू अथवा व्यक्तीकरिता शोक करीत नाही व तसा शोक करणे हा भगवताचा अपमान समजतो शोक मनुष्याच्या चित्तात वर्तमानापासून परावृत्त करून भूतकाळात नेत असतो. व्यतीताकरिताच शोक होतो शोक मनुष्यास वर्तमानात राहू देत नाही म्हणून 'न शोचति' असे म्हटले आहे. कोणी म्हणेल गोपिकानी शोक केला, भगवद्वियोगाचे त्याना दु.ख झाले असे भागवतात वर्णन आहे, याचे उत्तर हे की त्या वियोगातही प्रेमप्रकर्षच होता. शुकाचार्य म्हणतात --

**रुरुदु:सुस्वरं राजन्कृष्णदर्शनलालसा ।।** --भागवत स्कं १०.

त्या वियोगात कृष्णदर्शन लालसा होती, वृत्ती कृष्णमयच झाली होती, कृष्ण-प्रेमाने अतरंग भरून गेले होते, सयोगापेक्षाही तो वियोग भक्तिशास्त्रात श्रेष्ठ समजला जातो. पूर्ण प्रेमप्रकर्ष त्या अवस्थेत झालेला असतो. सर्वत्र प्रियतमच प्रतीत होतो, म्हणून त्यास शोक म्हणू नये.

या पुढील लक्षण 'न द्वेष्टि' हे आहे. 'ज्याला या प्रेमाचा लाभ झाला आहे, तो कोणाचाही द्वेष करीत नाही' द्वेषाची उत्पत्ती कोठून होते याबद्दल श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात,

**आणि इच्छिलिया सांगडे । इंद्रिया अमिष न जोडे ।**
**ऐसा जो डाव पडे । तोचि द्वेष ।।** --ज्ञा.
**पसरिला अभिलाष । अपूर्ण होय तोचि द्वेष ।।** --ज्ञा.

इच्छित वस्तू एखाद्याकडे असली व त्याने ती दिली नाही की द्वेष निर्माण होतो, असा अनुभव आहे. पण जेथे इच्छेचाच अभाव आहे असे सूत्रात आरंभी 'न किंचिद्वाञ्छिति' म्हणून सागितले आहे तेथे द्वेषाचा प्रादुर्भाव कसा होणार ? गीतेच्या बाराव्या अध्यायात जी भक्तलक्षणे सागितली आहेत, त्यात प्रथम लक्षण 'अद्वेष्टा सर्वभूतानां' हेच आहे. भक्त 'अद्वेष्टा' असतो याचे कारण त्याचा जर एखाद्याने द्वेष केला तर त्याला त्याची कल्पनाही नसते प्रल्हादाला मारण्याकरिता शुक्राचार्यांचे पुत्र षण्ड व अमर्क यानी एक कृत्या निर्माण केली ती कृत्या जेव्हा प्रल्हादाला स्पर्शही करू शकली नाही. तेव्हा तिने आपल्याला उत्पन्न करणाऱ्याचा प्राण घेतला. पण त्यामुळे प्रल्हादाला फार दु.ख झाले. त्यावेळी प्रल्हाद म्हणाला, 'हे प्रभो ! ज्यांनी माझ्यावर शस्त्रप्रहार केले, विष दिले, पर्वतावरून खाली लोटून दिले, अग्नीत जाळण्याचा प्रयत्न केला त्या सर्वांविषयी माझ्या मनात यत्किंचित द्वेषभाव जर नसेल तर हे माझ्या गुरूंचे दोन्ही पुत्र जिवत होतील !' या अद्वेष्टा भावनेचा परिणाम असा झाला की दोन्ही गुरुपुत्र जिवत झाले श्रीएकनाथ महारा-जांचे अंगावर एक यवन अनेक वेळा थुकला पण त्याच्यावर त्याचा काही परिणाम

झाला नाही. मात्र पुन्हा पुन्हा त्यानी गंगास्नाने केली. पण शेवटी त्यास पश्चात्ताप झाला व तो पाया पडून रडू लागला, क्षमा मागू लागला. त्याला एकनाथ महाराज म्हणाले, 'अरे, तू तर माझ्यावर उपकार केलेस. तुझ्यामुळे आज मला शंभरवेळा गोदावरीच्या स्नानाचे पुण्य प्राप्त झाले.' श्रीज्ञानेश्वर महाराज सांगतात–

**जो सर्व भूतांचा ठायीं। द्वेषातें नेणेचि कहीं।**
**आपपरू नाहीं। चैतन्या जैसा॥** –ज्ञा. १२–१४५.

अनेक प्रेमप्राप्त भगवद्भक्ताचे जीवन 'न द्वेष्टि' या विशेषणाने सुशोभित असते. भगवत्प्रेमात रंगल्यामुळे शत्रु-मित्रभावाचा विचार करावयास त्यास अवसरच नसतो.

यानंतर 'न रमते', 'भक्त कोणत्याही सजीव–निर्जीव विषयात रममाण होत नाही' या पदाचा विचार करू. कोणत्याही अनुकूल विषयात रममाण होणे, आसक्त राहणे. मग तो चेतन, अचेतन कसाही असो, हा जीवाचा स्वभाव आहे. मानवच काय, पशू, पक्षी इत्यादीही आपल्या प्रिय विषयात रमत असतात. भ्रमर गंधविषयात, मृग हा नादविषयात, मत्स्य हा रसविषयात, गज स्पर्शविषयात पतंग रूपविषयात रमतो. हे सर्व आपआपल्या विषयात इतके रमत असतात की, त्यात त्याचा नाश होतो. मानव तर पचविषयात रममाण होत असतो हे उघड आहे. अपरिहार्य म्हणून, जीवनावश्यक म्हणून विहित विषयांचे सेवन करणे वेगळे व त्यात रममाण होणे वेगळे अज्ञ अभाविक मनुष्य भगवत्प्रेमाचे ज्ञान नसल्यामुळे विषयसेवन हाच पुरुषार्थ मानून विषयसंपादनातच आयुष्याचा वेच करतो. त्या विषयातच केवळ सुख मानून त्यात पूर्ण आसक्त होत असतो. श्रीएकनाथ महाराज हीच गोष्ट स्पष्ट करीत आहेत–

**इंद्रिया आणि विषयासीं। स्वयें अंतर्यामी प्रकाशी।**
**जीव सेवूनि त्या विषयासीं। पावे आसक्तीसी अहंभावें।**
**म्हणे हे विषय कैसे गोड। माझ्या देहाचें पुरे कोड।**
**तव इंद्रियांची खवळे चाड। विषयवाढ भोगावया॥**
**इंद्रिया विषयांची आसक्ती। भोगाभिमाने वाढे वृत्ती।**
**मावळोनि मुळीची स्फूर्ती। मोहममता स्थिती दृढ वाढे॥**

–नाथभागवत अ. ३.२३०–३२

ज्ञाता जीव ज्ञेय विषयांच्या आसक्तीने त्या विषयाच्या मागे कसा धावत असतो, याचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गीतेच्या अठराव्या अध्यायाच्या अठराव्या श्लोकावरील टीकेत अनेक दृष्टाताच्या द्वारे केले आहे. त्याचा भावार्थ खाली दिला आहे.

'श्रीकृष्णभगवान म्हणतात, अर्जुना ! इंद्रियद्वारा ज्ञाता जो जीव त्याला ज्ञान तो विषय जरा दाखविते न दाखविते तोच तो ज्ञाता त्या विषयाचा प्रिय असल्यास स्वीकार किंवा अप्रिय असल्यास त्याग करण्यास प्रवृत्त होतो. माशाला पाहून बगळा त्याला पकडण्यात जसा त्वरेने झडप घालतो, अथवा द्रव्याचा ठेवा पाहून तो घेण्यास दरिद्र मनुष्य जितक्या वेगाने धावतो, अथवा सुंदर स्त्रीला पाहून कामुक जसा तिला धरण्यास पुढे सरसावतो किंवा ज्याप्रमाणे पाणी उतारावर धावते, अथवा भ्रमर फुलाच्या सुगंधाकडे धाव घेत असतो, अथवा धार काढावयाच्या वेळेला सोडलेले वासरू जसे गाईकडे धावते, वा आकाशात उंच चढलेला पारवा पक्षी पारवीला पाहून ज्याप्रमाणे आपले सगळे अंगच तिच्याकडे लोटून देतो, किंवा मेघाच्या गडगडाटाबरोबर मोर जसा आकाशाकडे कौतुकाने उडण्याचा प्रयत्न करतो, त्याप्रमाणे विषयाला पाहून ज्ञाता जीव तिकडे धाव घेत असतो '

—ज्ञानेश्वरी, १८.४७९–४८४.

वास्तविक अनित्य, जड, दु:खरूप विषयाचा सुख हा धर्मच होऊ शकत नाही· तसेच परिणामी ते सुख दुःखरूपच होते. श्रीज्ञानेश्वरमहाराजानी अनेक उदाहरणाने ही गोष्ट स्पष्ट केली आहे.

**येऱ्हवी इंद्रियाचिया अर्था। सारिखा विषय पोखिता।**
**संतोष कीर चित्ता। आपजेल ।।**
**परी तो संवचोराचा सांगातु। जैसा नावेक स्वस्थु।**
**जंव नगराचा प्रांतु। सांडिजेना ।।**
**बापा विषाची मधुरता। झणे आवडी उपजे चित्ता।**
**परी तो परिणाम विचारता। प्राणुहरी ।।**
**देखे इंद्रियी कामु असे। तो लावी सुख दुराशे।**
**जैसा गळी मीनु अमिखे। भुलविजे गा ।।**

—ज्ञानेश्वरी ३ २१०–१३

या विषयसुखात कोण फसले जातात, असा प्रश्न उपस्थित करून ज्ञानेश्वरीच्या पांचव्या अध्यायात भगवान श्रीकृष्ण त्याचे विस्ताराने उत्तर देतात. 'अर्जुना ! ज्याप्रमाणे भुकेने पीडित झालेला दरिद्री पुरूष कोंडा खातो, त्याप्रमाणे ज्यांनी आत्मस्वरूपाचा अनुभव घेतला नाही तेच या विषयात रमतात अथवा तहानेने व्याकुळ झालेली हरणे भ्रमाने खऱ्या पाण्याला विसरून मृगजळाच्या मागे लागतात, तसेच ज्याला आत्मस्वरूपाचा अनुभव नाही, अर्थात ज्याच्या ठिकाणी स्वरूपानंदाचा पूर्ण अभाव असतो, त्यालाच हे विषय सुखरूप वाटतात येऱ्हवी विषयात सुख आहे ही भाषा तरी योग्य आहे काय ? विजेच्या क्षणिक चमकण्याने जगातील सर्व अंधार नाहीसा होईल काय ? ज्याप्रमाणे विषाच्या कांद्याला मधुर

म्हणावे त्याप्रमाणे विषयात सुख आहे असे म्हणणे म्हणजे विषयाचे खरे स्वरूप न जाणता व्यर्थ केलेली बडबड आहे. अर्जुना, तूच सांग, सर्पाच्या फणाची सावली आहे ती उदराला कितपत शांत करणारी होईल ? गळाला लागलेल्या अमिषाचा पिंड मासा गिळीत नाही तोपावेतो ठीक, त्याप्रमाणे विषयाचा सर्वसंग आहे हे तू निःसंशय समज. विरक्त पुरुषाच्या नजरेने पाहिले तर हे विषय पांडुरोगामध्ये आलेल्या लठ्ठपणाप्रमाणे घातक आहेत असे समज म्हणून अर्जुना! विषयाच्या उपभोगामध्ये जे सुख असते, ते प्रारंभापासून शेवटपावेतो दुःखच आहे परंतु काय करावे, जे मूर्ख असतात, अज्ञानी असतात त्यांचे विषयसेवन केल्याशिवाय चालतच नाही.' —ज्ञानेश्वरी. ५.११०–२०

श्रीकृष्ण भगवानच स्पष्ट सांगतात–

**येहि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**
**आद्यन्तवन्त कौंतेय न तेषु रमते बुध ॥**

—गीता ५–२२.

'विषय व इंद्रिये यांच्या संयोगाने उत्पन्न होणारे भोग दुःखालाच कारण होतात. त्यांना आदि व अंत आहे ज्ञानी पुरुष त्यांचे ठिकाणी रममाण होत नाही ' प्रेमी भक्ताला विषयाच्या अनित्य व दुःखरूपाचे हे ज्ञान असते, म्हणूनच नारदमहर्षींनी 'न रमते' असे म्हटले आहे. जीवाने जेथे अखंड रमावे, भक्त जेथे अखंड रममाण होतात असा एक श्रीहरीच आहे.

**पांडुरंगी मन रंगले ।** —ज्ञा अ...

**रंगला या रंगे । तुका विठ्ठल सर्व अंगे ।**

**तुका म्हणे मना श्रीरंगाचा रंग । बैसला अभंग एकविध ॥**

या पुढील पद 'नोत्साही भवति' हे आहे

मन हे एकच आहे ते भगवत्प्रेमात रंगले आहे, मग तद्व्यतिरिक्त अन्य कर्मे करण्यात त्या भक्तास उत्साह कसा राहणार ? जो आपल्या देहावरही उदास आहे, ज्याची सर्व कर्मे भगवत्प्रीत्यर्थच होत असतात, त्यास सर्वस्वाचा विसर पडला आहे, त्याचा भगवद्भक्तीव्यतिरिक्त अन्य कार्यांत उत्साह राहणे शक्यच नाही. हे कर्म मी करीनच या प्रकारच्या निश्चयात्मक बुद्धीला उत्साह असे म्हटले जाते पण भक्तलक्षणामध्ये बाराव्या अध्यायाच्या सतराव्या श्लोकात भगवंतानेच 'शुभाशुभ परित्यागी' हे एक महत्त्वाचे लक्षण सांगितले आहे तो भक्त शुभ-अशुभ सर्वांचाच त्याग करतो असे म्हटले आहे. दुसरी गोष्ट ही की, कोणत्या तरी सुखाच्या इच्छेनेच त्या सुखाची प्राप्ती करून देणाऱ्या कर्मात मनुष्याचा उत्साह असतो. भगवान श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात–

**तयापरी जो अशेषा । विश्वाचिया अभिलाषा ।**
**पाय पाखाळणिया दोषा । घरटा केला ॥**
**म्हणोनि फळाचा लागु । देखे जिये असलगु ।**
**तिये कर्मी चांगु । रोहो मांडी ॥**

ज्ञा. १८.९५१-५२

पण प्रेमी भक्त हा अमृतरूप, तृप्त झालेला असतो. त्याच्या ठिकाणी लौकिक कार्याचा उत्साह मुळीच निर्माण होणार नाही म्हणूनच 'शुभा-शुभ परित्यागी' असे भगवान श्रीकृष्णांनी म्हटले आहे, तोच आशय 'नोत्साही भवति' या वाक्यात आहे. उत्साही होत नाही याचा अर्थ भक्तिव्यतिरिक्त अन्य कर्मांत त्याचा उत्साह नसतो. भक्तिविषयक सर्व व्यवहार, जप, पूजा, श्रवण, स्मरण, कीर्तनादिकात त्याचा विशेष उत्साह असतो. प्रेमाने अखंड भगवत्संकीर्तनादिक तो करीत असतो

## सूत्र ६

## यज्ज्ञात्वा मत्तो भवति, स्तब्धो भवति, आत्मारामो भवति ॥ ६ ॥

**अर्थ :**

ज्या (प्रेमरूपा भक्तीला) जाणून मनुष्य उन्मत्त (आनंदभरित) होतो, स्तब्ध (शांत) होतो, (आणि) आत्माराम होतो.

**विवरण :**

मागील चौथ्या व पाचव्या सूत्रात भक्तीची प्राप्ती, भक्तीचा लाभ सांगितला. या सूत्रात भक्ती जाणली असता म्हणजे भक्तीच्या ज्ञानाने काय फळ प्राप्त होते ते नारदमहर्षी सांगतात. कित्येक भाविक भक्तीचे आचरण करीत असलेले दिसतात, पण त्यांना भक्तीचे खरे स्वरूप ज्ञात नसते. भक्तीचे स्वरूप ज्ञात असणे म्हणजे भक्ती ही ज्याची करावयाची त्या परमात्मस्वरूपाचेही ज्ञान असणे अवश्य आहे. उपास्यज्ञानाधीन उपासना असते.

नारदपंचरात्रामध्ये भक्तीचे हेच लक्षण केले आहे.

**माहात्म्यज्ञानपूर्वस्तु सुदृढः सर्वतोऽधिकः ।**
**स्नेहो भक्तिरिति प्रोक्तस्तया मुक्तिर्नचान्यथा ।।**

'ज्ञान शब्दाने सेव्यस्वरूपाचे माहात्म्यज्ञान अभिप्रेत आहे. माहात्म्य-ज्ञान-पूर्वक सर्वांहून अधिक व सुदृढ अव्यभिचारी स्नेहविशेष म्हणजे भक्ती' असा श्लोकाचा अभिप्राय आहे जर हे ज्ञान नसेल तर श्रीकृष्णांनी नवव्या अध्यायात त्यांना मूढ म्हटले आहे

**अवजानन्तिमां मूढाः मानुषींतनुमाश्रितम् ।**
**परंभाव मजानंतो मम भूतमहेश्वरम् ।।** –गीता ९–११

'श्रीकृष्ण म्हणतात, माझे श्रेष्ठ व उत्कृष्ट स्वरूप न जाणणारे मूढ सर्व भूतांचा ईश्वर असलेल्या पण मानवदेह धारण करणाऱ्या मला मनुष्य समजून, मनुष्यधर्म माझ्यावर आरोपित करून माझी अवहेलना करतात.' या श्लोकावरील श्रीज्ञानेश्वरमहाराजाची विस्तृत व मार्मिक टीका मुळातच पाहावी जसे भज्य जो भगवान याचे ज्ञान पाहिजे तसेच भक्तीच्या स्वरूपाचेही यथार्थ ज्ञान पाहिजे. भक्तीच्या फलाचेही यथार्थ ज्ञान पाहिजे. असे ज्ञान झाले, भक्तीचे महात्म्य पटले तर तो सतत त्या भक्तिप्रेमसागरातच डुंबत राहील त्यास अन्य सर्वांचा विसर पडेल, लोकव्यवहाराकडे पाहणारही नाही तो भक्त लोकबाह्यवृत्तीचा म्हणजे अलौकिक वृत्तीचा होतो, या स्थितीस 'मत्त' असे म्हटले जाते. मत्त होणे हा एक उन्मादाचाच प्रकार आहे. उन्माद अनेक प्रकारचा असतो भ्रमानेही एखाद्यास उन्माद होतो तो मत्त होतो धनाचा, विद्येचा, सत्तेचा पिशाच्चामुळे येणारा, शरीरबलाचा, मदिरादि सेवनाने येणारा असा अनेक प्रकारचा उन्माद दिसून येतो पण हा क्षणिक, तुच्छ इतकेच नव्हे तर परिणामी बाधक असतो भक्तिप्रेमाच्या अवस्थेत प्राप्त होणारा हा 'दिव्योन्माद' आहे यात अलौकिक आनंदावस्था असते. या अवस्थेचे वर्णन भागवत एकादश स्कध दुसऱ्या अध्यायात नवयोगेश्वरांनी केले आहे.

**एवंव्रत स्वप्रियनामकीर्त्या जातानुरागो द्रुतचित्त उच्चै. ।**
**हसत्यथो रोदिति रौति गायत्युन्मादवन्नृत्यति लोकबाह्यः ।। ४० ।।**

'स्वत ला अत्यंत प्रिय अशा भगवन्नामाचे संकीर्तन करून व्रतानुष्ठान करणारा आणि प्रेमाधिक्याने ज्याचे चित्त भरलेले आहे असा लोकविलक्षण महात्मा मोठ्याने हसतो, रुदन करतो, गात बसतो, ओरडतो आणि बेभान होऊन उन्मत्त पुरुषाप्रमाणे नाचू लागतो.'

या श्लोकावरील श्रीएकनाथाची विस्तृत टीका मुळातच पाहणे योग्य आहे. व्याख्यानाच्या शेवटी श्रीएकनाथ महाराज सागतात–

**जो मोलें मदिरा खाये । तो मदिरानंदे नाचे गाये ।**
**जेणें ब्रह्मानंदु सेविला आहे । तो केवीं राहे आवरला ।।**
**यालागीं तो लोकबाह्यता । स्वयें नाचो ब्रह्मउन्मादतां ।**
**लोक मानिती तया पिशाचता । हा बोधू पंडिता सहसा न कळे**

— नाथभागवत २ ५७८-७९

हा प्रेमोन्माद कसा असतो, याविषयी शुकाचार्य प्रल्हादाचे वर्णन करीत असता त्याची अवस्था कशी झाली होती ते सांगतात

**न्यस्तक्रीडनको बालो जडवत्तन्मयस्तया ।**
**कृष्णग्रहगृहीतात्मा न वेद जगदीदृशम् ।।**
**आसीनः पर्यटन्नश्नञ्छयान प्रपिबन्ब्रुवन् ।**
**नानुसंधत्त एतानि गोविंदपरिरम्भित ।।**
**क्वचिद्रुदति वैकुंठचिंताशबलचेतन ।**
**क्वचिद्धसति सच्चिंताल्हाद उद्गायति क्वचित् ।।**
**नदति क्वचिदुत्कण्ठो विलज्जो नृत्यति क्वचित् ।**
**क्वचित्तद्भावनायुक्तस्तन्मयोऽनुचकार ह ।।**

— भागवत ७-४-३७ ते ४०

' शुकाचार्य म्हणतात, भक्त प्रल्हाद हा बालक असताही भगवंताचे ठिकाणीच चित्त आसक्त झाल्यामुळे त्याने अनेक प्रकारची खेळणीही टाकूनच दिली होती. जसे काही श्रीकृष्णरूपी ग्रहाने (पिशाचाने) त्याचे चित्त ग्रासले होते, जगाला तो या रूपाने पाहतच नव्हता बसता, उठता, फिरता, खाता, झोपता, पिताना, बोलताना, त्या प्रल्हादाला त्या कार्याचे भानच राहत नव्हते कारण त्याला वाटत होते की, गोविंदाने त्याला चहूकडून घेरलेले आहे. कधी भगवंताचा वियोग झाला असे समजून रडत असे, कधी प्रभूच्या मीलनाचा आनंद वाटून हसत असे कधी कधी भगवद्यश तसेच लीलाचे गायन करीत असे, कधी मोठमोठ्याने हाक मारीत असे, कधी लाज सोडून नाचत असे, कधीकधी तर तन्मय होऊन स्वतःस श्रीकृष्ण मानून त्या शामसुदराच्या लीलाचे अनुकरण करीत असे.'

संतवाङ्मयात विराण्या (विरहिणी), सौरी (स्वैरिणी) इत्यादी रूपकाचे जे अभंग आहेत ते ' मत्त ' या स्थितीतीलच आहेत. भगवत्प्रेमात रंगलेले हृदय असेल तेथे कोणाचीही भीड-पर्वा नसते. श्रीज्ञानेश्वरमहाराजाचे उद्गार पाहा—

**नगमेहा संसारू म्हणुनि केला भ्रतारू । लोक अनाचरु म्हणती मज ।।**
**चंचळ झालिये म्हणतील मज । कवणा सांगू जिवीचे गुज ।।**

तुकाराम महाराजांचे उद्गार पाहा–

**नाहीं काम माझे काज तुम्हासवें । होते गुप्त ठावे केलें आता ।।**
**व्यभिचार माझा पडला ठाऊका । न सरती लोका माजी जाले ।।**
**न धरावा लोभ काही माझे विशी । झाले देवपिशी तुका म्हणे ।।**
**पुण्यपापा ठाव नाहीं सुखदु खा । हानिलाभ शंका नासलिया ।।**
**जितामरण आले आपपर गेले । मूळ ते पुसिले संसाराचे ।।**

सर्वच सताच्या काव्यातून असे ‘ मत्त ’ स्थितीतील उद्गार सापडतात

भक्तश्रेष्ठ प्रल्हाद असुरबालकापुढे भक्तांच्या ‘ मत्त ’ अवस्थेचे वर्णन करून सांगत आहे–

**यदाग्रहग्रस्तइव क्वचिद्धसत्याक्रन्दते ध्यायति वन्दते जनम् ।**
**मुहु श्वसन्वक्ति हरे जगत्पते नारायणेत्यात्ममतिर्गतत्रपः ।।**

– भागवत, ७–७–३५.

‘ प्रल्हाद म्हणतो ! जेव्हा तो भक्त एखाद्या भूतपिशाच्चादिकाचा संचार झालेल्या पुरुषाप्रमाणे कधी हसतो, कधी सारखा रडत असतो, कधी ध्याननिमग्न स्वस्थ बसतो, कधी समोर आलेल्या कोणासही नमस्कार करीत राहतो, वारवार दीर्घश्वास घेत हे हरे ! जगत्पते ! नारायणा ! असा आक्रोश करतो तेव्हा बुद्धी श्रीहरीकडेच लागलेली असल्याने त्याची सर्व लोकलज्जा सुटलेली आहे.’ या मत्त अवस्थेचे महत्त्वाचे फलही प्रल्हाद सागतो–

**तदापुमान्मुक्त समस्त बंधन स्तद्भावभावानुकृताशयाकृति ।**
**निर्दग्धबीजानुशयोमहीयसा भक्तिप्रयोगेण समेत्यधोक्षजम् ।।**

– भागवत, ७–७–३६

‘ प्रल्हाद म्हणतो, हे असुरबालकानो ! ज्या वेळी वरील श्लोकात सागितल्या-प्रमाणे त्या भक्ताची उन्मत्तवत् अवस्था होते त्या योगाने तो समस्त संसारबधनापासून मुक्त होतो. निरंतर भगद्भावनायुक्त असल्याने त्याचे चित्त भगवदाकारास प्राप्त होते अंत करणातील सर्व कर्मबीजे दग्ध होतात या महान भक्तीचा अंगीकार केल्याने तो अतर्यामी परमात्मस्वरूपाची प्राप्ती करून घेतो ’

यानंतर सूत्रातील पुढील पद ‘ स्तब्धो भवति ’ हे आहे स्तब्धता म्हणजे देहव्यापारराहित्य, शातता, अविकारता प्रेमभक्तीमध्ये रंगलेला भक्त असा असतो गोकुळवासी भक्तांची कशी अवस्था झाली होती, त्यांना स्तब्धता कशी आली होती हे तुकाराम महाराज सांगतात–

**तयासी आवडे वैकुंठ नायक । गेली सकळिक विसरूनि ।।**
**निंदास्तुती कोणी न करी कोणाची । नाही या देहाची शुद्धि कोणा ।।**
**मने हरिरूपी गुंतल्या वासना । उदास त्या सूना गौळियांच्या ।।**

श्रीकृष्ण प्रेमात रंगलेल्या गोपिकांना कसा स्तब्धीभाव प्राप्त झाला होता त्याचे वर्णन स्वतः श्रीकृष्णच भक्तवर्य उद्धवापुढे करतात

**ता नाविदन्मय्यनुषङ्ग बद्धधियः स्वमात्मानमतस्तथेदम् ।।**
**यथा समाधौ मुनयोऽब्धितोये नद्यः प्रविष्टा इव नामरूपे ।। १२ ।।**

—भागवत ११–१२–१२

'समाधी अवस्थेमध्ये ज्याप्रमाणे योग्यांना कशाचेही भान नसते, तो निश्चल असतो, महासागरात प्रविष्ट झालेल्या नद्यांना निराळे अस्तित्वच राहत नाही, त्या-प्रमाणे श्रीकृष्ण म्हणतात, प्रेमातिशयाने ज्यांची अंत.करणे माझ्याच ठिकाणी एक-रूप झाली आहेत अशा गोपी आपला देह, आपला जीव व हे जगत् माझ्याशिवाय सर्व काही संपूर्ण विसरल्या होत्या.' या श्लोकावरील श्रीएकनाथमहाराजांची टीका पाहा.

**ऐशी अनन्य ठायीच्या ठायी । गोपिकांसी माझी प्रीति पाही ।**
**त्या वर्तताही देहगेही । माझ्या ठायी विनटल्या ।।**

—एकनाथी भागवत, अ १२ १८२

श्रीमद्भागवताच्या अकराव्या स्कंधातील तिसऱ्या अध्यायात भागवत धर्माचे आचरण करणारा भक्त कसा असतो याचे वर्णन नवयोगेश्वरांपैकी 'प्रबुद्ध' नामक योगीश्वर विदेह राजापुढे करीत आहे–'

**क्वचिद्रुदंत्यच्युतचिंतया क्वचिद्धसन्ति नन्दन्ति वदन्त्यलौकिकाः ।।**
**नृत्यन्ति गायन्त्यनुशीलयन्त्यजं भवन्ति तूष्णीं परमेत्य निर्वृता. ।।**

—नाथभागवत ३–३२

'अलौकिक भक्ती करणारे हे एकातिक भक्त भगवत्चिंतनाने तन्मय होऊन कधी रडतात, हसतात, आनंदाने बेहोष होतात, बोलतच राहतात, नाचतात, भगवद्गुणगान करीत राहतात व भगवत्स्वरूपाशी तन्मय होऊन आनंदाने शांत राहतात.' या श्लोकात प्रथम तीन चरणात भक्ताची 'मत्त' स्थिती सांगून चौथ्या चरणात तो 'स्तब्ध' कसा असतो हे सांगितले आहे. श्रीनाथमहाराज त्या प्रेमी भक्ताच्या स्तब्धतेचे वर्णन करतात–

**सद्भावे भगवत्परिचर्या । करितां पारुषे कर्मक्रिया ।**
**अहंसोऽहं निरसोनिया । वृत्तीही लया जाय तेथें ।।**
**एवं सप्रेम भक्ति संभ्रमु । तेणे निरसे साधन भ्रमु ।**
**फिटे निःशेष भवभ्रमु । वाचांसी उपरमु इंद्रिया होय ।।**
**तेथे एक ना दुसरे । सन्मुख ना पाठिमोरे ।**
**जेथ सुखही निजसुखामाजी विरे । ते स्वरूप निर्धारे निजशिष्यं होती ।।**

—नाथभागवत, अ. ३. ६०४-६

वरील विवेचनाच्या आरंभी भक्तश्रेष्ठप्रल्हादाच्या ' मत्त ' अवस्थेचे वर्णन केले आहे. त्याच्या पुढील श्लोकात त्याच्या ' स्तब्ध स्थितीचे वर्णन केले आहे. '

**क्वचिदुत्पुलकस्तूष्णीमास्ते संस्पर्शनिर्वृत ।**
**अस्पन्दप्रणयानंद सलिला मीलितेक्षणः ।।** –भागवत ७-४-४१

' कधी त्याच्या शरीरावर रोमाच दाटून आले आहेत, तो शात बसला आहे, बाह्यस्पर्शशब्दादिकाचा त्याला प्रत्ययच येत नव्हता, स्पदनहीनस्थिरकाय, नेत्र मिटलेले असतानाही त्यातून प्रेमाश्रू स्रवत आहेत ' यापेक्षा स्तब्धतेचे अधिक लक्षण कोणते होईल ? प्रेमभक्तीने गोकुळातील गोपिकाना प्राप्त झालेल्या ताटस्थ्य अवस्थेचे म्हणजेच स्तब्ध स्थितीचे वर्णन तुकाराम महाराजानी आपल्या अभगातून उत्कृष्ट असे केले आहे.

**दिवस राती कांही नाठवे तयासी । पहाता मुखासी कृष्णाचिया ।।**
**याच्या मुखे नये डोळियासी वीट । राहिले हे नीट तटस्थचि ।।**

–श्रीतुकारामगाथा–बाळक्रीडा अभग.

भक्तिशास्त्रकारानी या स्तब्धतेसच ' प्रेमसमाधी ' असे म्हटले आहे.

यानतर सूत्रातील ' आतमरामो भवति ' या लक्षणाचा विचार करू भक्तीच्या यथार्थ ज्ञानाने तो भक्त मत्त होतो, स्तब्ध होतो, असे सूत्रात प्रारभी म्हटले आहे. कोणाला वाटेल ही मत्तता, स्तब्धता कदाचित अन्य काही कारणाने ही प्राप्त होऊ शकते, पण भक्ताची ही स्थिती का होते, याचे कारण शेवटच्या या लक्षणात दिले आहे. ' आत्मारामो भवति ' आत्माराम होणे म्हणजे आत्मस्वरूपी रममाण होणे. मागील सूत्रात ' नरमते ' असे म्हटले आहे. जीवाचा स्वभाव कोठे तरी रमण्याचा आहे अज्ञ जीव जड विषयात रमतो पण भक्त केवळ आत्म्याच्या ठिकाणीच रममाण होतो हे सिद्ध करण्याकरिता ' आत्मारामो भवति ' असे म्हटले आहे. मानव कोठे ना कोठे रममाण होतच असतो. बहुधा देहादिकाच्या ठिकाणी तादात्म्य ठेवणारा जीव इंद्रियद्वारे अनुकूल विषयाच्या ठिकाणी तादात्म्य ठेवतो इंद्रियाचा गुलाम होतो उपनिषदात म्हटले आहे, पराञ्चिखानिन्यतृणत्स्वयंभू तस्मात्पराङ्-पश्यतिनान्तरात्मन् ।।' ' ही इंद्रिये परमात्म्याने बहिर्मुख बनविली आहेत. म्हणून इद्रियाच्या आधीन झालेला जीव बाह्यविषयच पाहतो. अंतरात्म्यास पाहू शकत नाही. ' अशा पुरुषास गीतेत ' इंद्रियाराम ' म्हटले आहे.

**अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति** ।।–गीता, अ. ३–१६

या इद्रियाराम इंद्रियलंपट पुरुषास ' अघायु म्हणजे त्याचे आयुष्य सर्व पापरूप आहे व त्याचे जिणेही व्यर्थ आहे, म्हणजे पुरुषार्थ-प्रयोजक होऊ शकत नाही. या श्लोकावरील व्याख्यानात श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

**तो पातकांची राशी । जाण भारभूमीसी ।**
**जो कुकर्मे इंद्रियासी । उपेगागेला ।।**

**ते जन्मकर्मसकळ । अर्जुना अति निष्फळ ।**
**जैसे की अभ्रपटळ । अकाळीचे ।।**

**का गळास्तन अजेचे । तैसे जियाले देखे तयाचे** ।। ज्ञा. ३.१८०.४१

इद्रियाराम होण्यात ती इद्रिये सामान्यासच काय पण मोठमोठयानाही कसा त्रास देतात, हे श्रीभगवानकृष्ण अर्जुनास सागतात.

**यततोह्यपि कौंतेय पुरुषस्यविपश्चित ।**
**इंद्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मन** ।।–गीता, २.६०

' इद्रियदमनार्थ प्रयत्न करणाऱ्या विद्वानाचे देखील मन ही बलवान इद्रिये बलात्काराने भलतीकडे ओढून नेतात. '

इद्रियराम होणे किती घातक आहे याविषयी श्रीज्ञानेश्वर महाराज स्पष्टच सागतात

**म्हणोनि इंद्रिये एके । जाणतेनि पुरुखे ।**
**लाळावी ना कौतुके । आदिकरूनी** ।।२०२।।

**हांगा सर्पेसी खेळी येईल । व्याघ्र संसर्ग सिद्धी जाईल ।**
**सांगे हलाहल जिरेल । सेविलिया काई** ।।२०३।।

**देखे खेळता अग्नि लागला । मग तो न सांवरे जैसा उधवला ।।**
**तैसा इंद्रिया लळा दिधला । भला नोहे** ।।२०४।।

––ज्ञानेश्वरी, अ. ३

इंद्रियाराम झाला की तो विषयातच रममाण होतो व विषय आले की त्याच्याबरोबर विकार येतातच

**देखे इंद्रियी काम असे । तो लावी सुखदुराशे ।**
**जैसा गळी मीन अमिषे । भुलविजे गा** ।। ज्ञा. ३

हे विकार किती बाधक असतात याचा पुढे सूत्र ४४ मध्ये विस्तृत विचार येणार आहे.

मानव हा केवळ बहिर्मुखतेमुळेच आत्माराम न होता विषयाराम ( म्हणजे विषयातच रममाण होणारा ) होतो पण त्यापासून मनुष्यास परिणाम, ताप, सस्कार, दु खादी भोगावे लागतात. म्हणून भक्त इंद्रियाराम विषयराम होत नाही, तो केवळ ' आत्माराम ' होतो. आत्मा हा शब्द गौण मुख्य लाक्षणिक भेदाने अनेक अर्थाने वापरला जातो. एका गीतेत आत्मा शब्द अंत.करण, जीव, परमात्मा इत्यादी

अर्थाने वापरला आहे पण या सूत्रात आत्मा हा शब्द परमात्मा श्रीहरी याच अर्थाने घेतला आहे

श्रीमद्भागवतात श्रीशुकाचार्यांनी परीक्षितीस सांगितले आहे.

**कृष्णमेनमवेहित्वमात्मानमखिलात्मनाम् ।।**
**जगद्धिताय सोऽप्यत्र देहीवा भाति मायया ।।** –भा. १०–१४–१५

'या श्रीकृष्णास तो सर्व प्राणिमात्राचा आत्मा आहे, असे समज तो या गोकुळात 'जगत्कल्याणाकरिता' आपल्या मायेने देहधारी झाल्यासारखा वाटतो.' तो परमात्माच एकमेव आनंदस्वरूप असल्याने त्याच्या ठिकाणी अखंड रममाण होणाराच 'आत्माराम' म्हणविला जातो विषय इंद्रिये ही असत्, जड, दु खस्वरूप असल्याने तेथे भ्रमानेच जीव रमत असतो

श्रीमद्भगवदगीतेच्या पाचव्या अध्यायात '**योऽन्त:सुखोन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव य ।**' 'बाह्यसुखाची अपेक्षा न करिता अन्त:सुखी आत्मसुखानेच सुखरूप झाला तसेच. अतर्ज्ञानमय ज्योतीनीच जो प्रकाशित झाला असे त्या योगी पुरुषाचे वर्णन केले आहे. या श्लोकावरील टीकेत श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**म्हणोनि असो हें आघवे । एथ न बोलणे काय बोलावे ।**
**जे खुणाचि पावेल स्वभावें । आत्माराम ।।**
**जे ऐसेनि सुखे मातले । आपणपांचि आपण राहिले ।**
**ते मी जाणे निखिल वोतले । सामरस्याचे ।।**
**ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर ।**
**की महाबोधे विहार । केले जैसे ।।** – ज्ञा ५ १३६–३८

ही आत्मारामपद प्राप्त झालेल्या पुरुषाची लक्षणे होत. आत्मा हा नित्य समीप आनंदमय आहे. विषय हे दूर आहेत व प्रारब्ध-साध्य आहेत. सर्वांनाच अनुकूल विषयाचे प्रारब्ध सिद्ध असते असे नाही तसेच ते विषय प्राप्त झाले तरी त्याच्या भोगात अनेक प्रतिबंध असतात त्यात आराम मिळणे अशक्यच असते म्हणूनच गीतेत तिसऱ्या अध्यायातही,

**यस्त्वात्मरतिरेवस्यादात्मतृप्तश्चमानव: ।**
**आत्मन्येवच सतुष्टस्तस्यकार्य न विद्यते ।। १७ ।।**

'जो केवल आत्म्यातच रत, आत्म्यातच तृप्त आणि आत्म्याच्या ठिकाणीच संतुष्ट झाला त्याला कोणतेही कार्य उरत नाही.'

उपनिषदातही 'आत्मक्रीड आत्मरति.' असे या अवस्थेचे वर्णन आढळते. अशा परम सुखमय परमात्म्यास सोडून जे पुरुष केवळ इंद्रियाराम वा विषयाराम होतात. त्याचा निषेधच गीता, भागवतादी ग्रंथातून केला आहे. श्रीमद्भागवताच्या

एकादशस्कंधातील आठव्या अध्यायात पिंगलाख्यान आहे. पिंगलेच्या पश्चात्तापदग्ध अंत करणातून निघालेले उद्गार पाहा–

**संतं समीपे रमणं रतिप्रदं वित्तप्रदं नित्यमिमं विहाय ।**
**अकामदं दुःखभयादिशोकमोहप्रदं तुच्छमहं भजेऽज्ञा ।।**

– भा ११–८–३०

'सदासर्वदा अत्यंत समीप असणारा, शाश्वत सुख देणारा, नित्यद्रव देणारा अशा रमणस्वरूप आत्म्याला सोडून महामूर्ख अशी मी इच्छापूर्ती न करणारा, दुःख, भय, शोक आणि मोह इत्यादी देणारा अशा क्षुद्र पुरुषाची इच्छा करीत आहे.'

या श्लोकावरील आपल्या टीकेत श्रीएकनाथ महाराज लिहितात–

**संत पुरुषांची प्राप्ती । जवळी असतां नेणे आसक्ती ।**
**ज्यासी केलिया रति । काम निवृत्ती तत्काळ ।।**
काम निवर्तवूनि देख । अनिवार पुरवी नित्य सुख ।
वित्त दाता तोचि एक । अलौकिक पैं देणे ।।
सकळ ऐश्वर्य निजपदेसी । संतोषोनि दे रतीसी ।
रमवू जाणे नरनारीसी । रमणु सर्वांसी तो एक ।।

नाथभागवत ८. २१९. २१

अशा परमानदस्वरूप परमात्मस्वरूपात जे रममाण होतात त्यानाच 'आत्माराम' म्हटले जाते ही अवस्था भक्तिप्रेमप्रकर्षानेच प्राप्त होते ज्याने अनन्यत्वाने हे प्रेम जाणले तोच आत्माराम होतो व जो आत्माराम होतो तोच मत्त, स्तब्ध होतो, याचा विचार पूर्वी केला गेलाच आहे

## सूत्र ७

# सा न कामयमाना निरोधरूपत्वात् ।। ७ ।।

**अर्थ :**

ती ( भक्ती ) कामनायुक्त नाही; कारण ती निरोधस्वरूपा आहे.

**विवरण**

ती भक्ती प्रेमस्वरूप, अमृतस्वरूप, सिद्धिस्वरूप आहे, असे या पूर्वीच्या सहा सूत्रातून स्पष्ट केल्यानंतर पुन्हा ती कामनायुक्त नाही हे सांगण्याचे प्रयोजन काय ?

त्याचे उत्तर हे की, मागील पाचव्या सूत्रात 'यत्प्राप्य न किञ्चिद्वाञ्च्छति, न शोचति, न द्वेष्टि न रमते, नोत्साही भवति असे भक्तीचे निषेधक रूप सांगितले आहे, त्याचेच स्पष्ट स्वरूप दाखविण्याकरिता 'सा न कामयमाना' हे सूत्र आले आहे. भक्ती ही कामनायुक्त नसावी हे आवर्जून सांगण्याचे कारण हे की, बहुधा ईश्वरभक्ती करणाऱ्यांच्या ठिकाणी ऐहिक- पारत्रिक कोणती ना कोणती कामना दिसून येते. श्रीभगवानकृष्ण अर्जुनास सागतात--

**कांक्षन्तः कर्मणां सिद्धि यजन्तइहदेवताः ।।** --गीता ४.१२.

'कर्मफलाची इच्छा करणारे लोक कर्मफल या लोकी लौकर प्राप्त व्हावे म्हणून इहलोकी देवदेवतांची पूजा करीत असतात.'

येर बहुत जोडती किरीटी । जयांची भजनें भोगासाठी ।
जे आशा तिमिरें दृष्टी । मंद जाले ।। -ज्ञा. ७.१३८

अशा फलासक्तिपूर्वक भक्ती करण्याने हृदयात कामाचा प्रवेश होतो व त्याच्या संबंधाने ज्ञानाचा दिवा मालवला जातो.

आणि फळाचिया हावा । हृदयी कामा जाला रिगावा ।
की तयाचिये घसणी दिवा । ज्ञानाचा गेला ।। ज्ञा ७--१३९.

कामाचे ज्ञानाशी किती वैर आहे याचा विचार गीतेच्या तिसऱ्या अध्यायाच्या शेवटी आलाच आहे. काम हा जीवाला खऱ्या प्रेमापावेतो जाऊ देत नाही. 'कामे नेले चित्त नेदी अवलोकू मुख । बहू वाटे दुःख फुटो पाहे हृदय ।।' असे श्रीतुकाराम-महाराज म्हणतात

काम हा एक राजस मनोविकार आहे. तो इंद्रियद्वारा अनुकूल विषय प्राप्तीत तृप्ती मानतो. तो देवापावेतो जीवास पोहोचू देत नाही. गीता, भागवतादी, ग्रंथामध्ये अनेक स्थळी या कामाच्या परिणामाच्या बाधकतेचा विचार केला आहे. ( पुढे ४३--४४ या सूत्राच्या विवरणप्रसंगी या विषयाचा सविस्तर विचार आहे.)

महर्षी अङिगर याच्या दैवी मीमांसादर्शनातही एक सूत्र भक्तिविषयक आहे. 'अकाम्या सा' भक्तीत कामना अन्य असेल तर भक्तीचा विषय जो भगवान तो साधन ठरतो म्हणजे गौण ठरतो. ते परमप्रेम ठरू शकत नाही. कामनेत स्वसुखाभिलाषा असते व प्रेम ज्यावर केले जाते, त्याच्या सुखाची अपेक्षा ठेवीत असते. पुढे चोविसाव्या सूत्राच्या विवरणप्रसंगी या विषयाचा विचार येणार आहे आरंभीच्या सूत्रातून ज्या भक्तिलक्षणाचा विचार केला आहे त्यात 'न किञ्चित् वांञ्छति' ( सूत्र ५ ) असे स्पष्टच म्हटले आहे. वांछा म्हणजेच काम.

'न कामयमाना' याचा अर्थ भगवद्व्यतिरिक्त अन्य कामना भक्तीत खपत नाही असा आहे

श्रीहरीचे ठिकाणी ज्याची बुद्धी जडलेली आहे अशा पुरुषाचा काम हा काम म्हणविला जात नाही त्यासच प्रेमही म्हटले आहे **'प्रेमैव गोपरामाणां काम इत्योगमत्प्रथाम् ।।'** असे भक्तिशास्त्रात सांगितले आहे म्हणजे 'गोपिकांच्या विशुद्ध प्रेमालाही कोठे कोठे काम अशी संज्ञा दिली जाते'

परमात्म्याने नृसिहावतार घेऊन हिरण्यकश्यपूचा वध केला. तो आवेशावतार असल्याने व भक्त प्रल्हादाचा हिरण्यकश्यपूने फार अनन्वित छळ केलेला असल्याने नृसिंहास फार क्रोध आलेला दिसत होता. तो शांत करण्यास देव, ऋषिमुनी कोणीही पुढे जाण्यास समर्थ होईना सर्वांनी मिळून प्रल्हादास नृसिंहापुढे केले तेव्हा प्रल्हादाने आपल्या भावपूर्ण शब्दात नृसिंहाचे पुष्कळच वर्णन केले त्या वर्णनाने नृसिंह संतुष्ट होऊन भक्त प्रल्हादास म्हणाले,

**प्रल्हाद भद्रभद्रं ते प्रीतोऽहं तेऽसुरोत्तम ।।**
**वरं वृणीष्वभिमतं कामपूरोऽस्म्यहं नृणाम् ।।** –भागवत ७–१०

'हे भक्तश्रेष्ठ प्रल्हादा ! तुझे कल्याण असो ! मी तुझ्यावर संतुष्ट आहे, तसेच सर्व मानवाच्या कामनेची पूर्णता करणारा मी आहे, तू मला वाटेल तो वर माग, मी तुझी इच्छा पूर्ण करीन'

**एवं प्रलोभ्यमानोऽपि वरैर्लोक प्रलोभनैः ।**
**एकांतित्वाद्भगवति नैच्छत्तानसुरोत्तमः ।। ७–१०**

'सर्वांना लोभ निर्माण व्हावा अशा वराने प्रल्हादालाही लोभ निर्माण व्हावा अशी भाषा जरी नृसिंहाने वापरली तरी प्रल्हाद हा एकान्त भक्त असल्याने त्याने त्या वराची इच्छा केली नाही.'

प्रल्हाद नृसिंहास उत्तर देतो–

**अहंत्वकामस्त्वद्भक्त स्त्वंतु स्वाम्यनपाश्रय. ।**
**नान्यथेहावयोरर्थो राजसेवकयोरिव ।। ७–१०**

'प्रभो ! मी तुमचा निष्काम भक्त आहे व तुम्ही माझे अनन्याश्रय स्वामी आहा. राजा व त्याच्या सेवकाप्रमाणे आमच्या ठिकाणी काही स्वार्थाचा संबंध नाही. तुमची भक्ती करून जो काही लौकिक पदार्थाची कामना ठेवतो तो तुमचा भक्त नसून व्यापारी आहे'

**यःस आशीष आशास्ते न स भृत्यः सवै वणिक् ।।** –भागवत ७–१०

नृसिंहाने काही माग असा जास्तच आग्रह केल्यानंतर भक्तवर्य प्रल्हाद म्हणतो–

**यदिरासीश मे कामान्वरांस्त्वं वरदर्षभ ।**
**कामानां हृद्यसंरोहं भवतस्तु वृणे वरम्** ।। भा. ७-१०

'हे वरदान देणाऱ्यात श्रेष्ठ देवा ! जर तुम्ही मला काही वरदान देण्याची इच्छाच करीत आहा, तर मी तुम्हाला हाच वर मागतो को, माझ्या अंतःकरणात कोणतीही कामना निर्माणच होऊ देऊ नका.'

म्हणून सूत्रात भक्ती ही 'कामयमाना' नाही असे म्हटले आहे. आरंभी भक्ती ही 'अमृतरूपा' आहे असे म्हटले आहे. म्हणजे ती निर्विकार आहे, काम हा एक विकार आहे. तो अमृतरूप कसा होईल ? विकार अनित्यच असतात.

भक्ती ही 'कामयमाना' नाही याचे कारणही श्रीनारद महर्षी सूत्रातच स्पष्ट करीत, आहेत 'निरोधरूपत्वात ।' निरोध हेच तिचे स्वरूप आहे. कामादिकात निरोध म्हणजे सयम किवा त्याग नसतो. ते स्वैर भटकत असतात. कामादिकाचे विषय व इद्रिये, सस्कार, भोग हे संयमित नसतात. ते प्रतिक्षणी बदलत असतात. यास व्यभिचार दोष म्हणतात. भक्तीत हा व्यभिचार खपत नाही.

या सातव्या सूत्रावर विदर्भातील प्रसिद्ध सत प्रज्ञाचक्षू श्रीगुलाबराव महाराज यानी आपल्या नारदभक्तिसूत्रावरील 'नारदीय भक्तिसूत्र भाष्यम्' नामक संस्कृत टीकेत खालीलप्रमाणे विचार प्रकट केले आहेत.

शका ही भक्तिरागरूपिणी आहे का नाही ? कारण राग व प्रीती हे पर्याय शब्द आढळून येतात म्हणून भक्ती ही रागरूपिणीच मानावी.

उत्तर . रागरूपिणी मानली तर ती राजसी (रजोगुणी) ठरते. 'रजोरागात्मकं विद्धि' असे गीतावचन आहे, पण भक्ती ही राजस (रजोगुणी) होऊ शकत नाही. 'सा न कामयामानानिरोधरूपत्वात्' असे सूत्रात नारदानी म्हटले आहे

प्रीती व राग यात साख्य व वेदान्त मताप्रमाणे भेद आहे. गुणाचा विचार विस्तृत करणाऱ्या साख्यशास्त्रकारानी प्रीती हा सत्त्वगुण प्रकार आहे, असे सागितले आहे. भगवंतानी गीतेच्या चौदाव्या अध्यायात सत्त्वगुण हा सुखरूप आहे असे प्रतिपादन केले आहे. 'सत्त्व सुखे संजयति, इ. वाक्याने व प्रीतीही सुखरूप असल्याने तिला सात्त्विकत्व आहे प्रीतीविना सुखाचा प्रत्यय येत नाही. वेदान्तशास्त्रातही परमप्रेमास्पदत्व या हेतूनेच आत्मा परमानंदस्वरूप आहे असे सागितले आहे म्हणून सत्त्वोपहित जीवलक्ष्य जो परमात्मा त्याच्या परमानंदाची अभिव्यक्ती हीच प्रीती होय. ती रागात्मिका नाही कारण 'निरोधरूप' असल्याने साख्यमताप्रमाणे तिला सात्त्विकत्व आहे व वेदात मताप्रमाणे ब्रह्मानंदरूपत्व असल्याने प्रीती रागस्वरूप म्हणता येत नाही कारण राग हा अध्यासाचा पुरस्कार करून 'इद मे स्यात्' 'हे मला मिळावे' असा इच्छास्वरूप आहे तो राग जो मानवाचे ठिकाणी दिसून येतो तो स्वभोगार्थच असतो. भक्तीमध्ये भोक्तृत्वाभिमानही नष्ट होतो. केवळ

परमात्मविषयिणी प्रीतिधाराच अवशिष्ट राहाते. यालाच ' निरोध ' म्हणतात. यालाच योगशास्त्रात घेरंडाचार्य यांनी ' समाधी ' शब्दाने सूचित केले आहे.

**स्वकीये हृदये ध्यायेदिष्टदेवस्वरूपकम् ।**
**चिंतयेद्‌भक्तियोगेन परमाल्हादपूर्वकम् ।।**
**आनंदाश्रु पुलकेन दशाभाव प्रजायते ।**
**समाधिः संभवेत्तेन संभवेच्च मनोन्मनी ।।**

' आपल्या हृदयामध्ये इष्ट देवतेच्या स्वरूपाचे ध्यान करावे. त्यायोगे अष्ट-सात्त्विकभावाची दशा प्राप्त होते. त्यायोगे समाधी संभवतो. त्या योगाने ' मनोन्मनी ही महत्त्वपूर्ण अवस्था सिद्ध होते.'

ज्ञानाने तूर्यावस्था प्राप्ती होते व भक्तीने मनोन्मनी सिद्ध होते हा विशेष आहे ' रामकृष्णनामी उन्मनी साधली ।। असे श्रीज्ञानेश्वरमहाराज हरिपाठात म्हणतात. योगशास्त्राचे प्रयोजन केवळ चित्तवृत्ती निरोध हे आहे व त्याचे साधन अभ्यास व वैराग्य हे योगशास्त्रात सांगितले आहे. ' **अभ्यास वैराग्याभ्यां तन्निरोध** ।।' पण भक्तिशास्त्रात एवढेच निरोधाचे स्वरूप मान्य नाही. म्हणून पुढील आठव्या सूत्रांत नारदमहर्षी आपल्या निरोधाचे स्वरूप स्पष्ट सांगत आहेत.

## सूत्र ८

# निरोधस्तु लोकवेदव्यापारन्यासः ।।

**अर्थ :**

लौकिक आणि वैदिक (समस्त) व्यापारत्याग म्हणजेच निरोध होय.

**विवरण :**

साधारणतः श्रद्धावान मानव दोन प्रकारच्या व्यापाराने (कर्माने) बांधला गेलेला असतो. १) लौकिक, २) वैदिक. लौकिक व्यापार म्हणजे दृष्ट प्रपंचातील काही विषयाच्या प्राप्तीकरिता कर्मे करीत राहणे. 'सायास करिसी प्रपंची दिननिशी' असे ज्याबद्दल श्रीज्ञानेश्वरमहाराज हरिपाठात सांगतात तो लौकिक व्यापार !

बहुतेकाची बहिर्मुखतेमुळे अशीच प्रवृत्ती असते. तर कित्येकांची अदृष्ट

स्वर्गातील दिव्य विषय संपादन करण्याकरिता वेदात सांगितलेली यज्ञयागादी वैदिक कर्मे सतत करण्याची प्रवृत्ती असते, तो वैदिक व्यापार. किंवा, थोडक्यात ऐहिक अभ्युदय हेच ज्याचे फल मानले जाते तो लौकिक व पारलौकिक स्वर्गादी भोग ज्याचे फल मानले जाते तो वैदिक. भगवद्‌भक्त्याविष्ट पुरुष दोघांचाही त्याग करीत असतो.

कोणतेही कर्म लौकिक अगर वैदिक असो, ते देह, वर्ण, आश्रम यांचा अभिमान घेऊनच होत असते व विशेष भोगप्राप्तीच्या इच्छेनेच होत असते, हे स्पष्ट आहे भक्तीत ही भोगासक्ती खपत नाही. याचा मागे पाचव्या सूत्रामध्ये विचार झालाच आहे भगवान श्रीकृष्ण उद्धवास सांगतात–

**साधुनि माझिया अनुसंधाना । परलोक नातळे वासना ।।**
**धिक्कारी पैं ब्रह्मसदना । इतर गणना कोण पुसे ।।**

– एकनाथी भागवत, १४. ८६, ८७.

लोक–वेद–व्यापार–न्यास (त्याग) कसा झाला पाहिजे, याबद्दल भगवान श्रीकृष्ण उद्धवास स्पष्ट सांगतात–

**सांडूनि स्त्रीपुत्र विषयध्यान । सांडूनि योग योग्यता शहाणपण ।**
**सांडूनि कर्मठता कर्माभिमान । मजलागी शरण रिघावे ।।**
**सांडूनिया वेदाध्ययन । सांडूनिया शास्त्रश्रवण ।**
**सांडूनि प्रवृत्ति निवृत्ति जाण । मजलागी शरण रिघावे ।।**
**सांडूनिया वैदिक लौकिक । सांडूनि आगम तांत्रिक ।**
**मज शरण रिघालिया देख । माझे निजसुख पावसी ।।**

– नाथ भा. १२. २३५–३७.

तसेच भक्ताच्या हृदयात भगवत्प्रेमाचा उदय झाला असता त्याच्या कामाचा सहजच निरोध होत असतो खऱ्या भक्तीचे हेच लक्षण आहे

**न काम कर्म बीजानां यस्यचेतसि संभवः ।**
**वासुदेवैक निलयः स वै भागवतोत्तमः ।।** भागवत ११.२.५०

'काम, कर्म, बीज, वासनांचा ज्याच्या हृदयात प्रवेश होत नाही, वासुदेव परमात्मा हाच एकमेव आश्रयस्थान आहे असे मानणारा तो भागवतोत्तम होय.'

या श्लोकावरील टीकेत श्रीनाथमहाराज सागतात–

हृदयी चिंतिता आत्माराम । तद्रुप झाला हृदयीं काम ।
त्यासी सर्व कर्मी पुरुषोत्तम । देवदेवोत्तम तुष्टोनि प्रगटे ।।
तेथे ज्या ज्या वासना हृदयवासी । त्याही पडिल्या हरिसुखासी ।
एवं वासना जडल्या हरिरूपाशी । हरी आश्रयो त्यासी दृढ झाली ।।

––नाथभागवत २. ६८०-८१

खऱ्या भक्तिप्रकर्षात लोक-वेद-व्यापार-न्यास सहजच होतो. कारण तो ज्या देहादिकांच्या वर्णआश्रमाभिमानाने होतो तो भक्ताचा केव्हाच विगलित झालेला असतो

देहाहंकृती विना लौकिक अथवा वैदिक क्रिया होऊ शकत नाही. तसे लौकिक व वैदिक कर्मांची गुतागुंत फार आहे त्या कर्मबंधनात अडकलेला पुरुष त्यातून बाहेर पडणे कठीण आहे. तो कर्मजड होतो.

श्रीज्ञानेश्वरमहाराज त्या कर्मजड पुरुषाचे वर्णन करतात—

**वेदाधारें बोलतीं केवळ कर्म प्रतिष्ठितीं ।**
**परी कर्मफळीं आसक्ती । धरूनिया ।।**
**म्हणती संसारी जन्मिजे । यज्ञादिक कर्म कीजे ।**
**मग स्वर्गसुख भोगिजे । मनोहर ।।**
**एथ हें वांचूनि कांहीं । आणिक सर्वथा सुखचि नाहीं ।**
**ऐसें अर्जुना बोलतीं पाहीं । दुर्बुद्धि ते** — ज्ञा. २ २४५-४७

नाथभागवतात भगवान श्रीकृष्ण उद्धवास उपदेश करताना म्हणतात—

**माझें स्वरूप नित्य निर्गुण । वेद तितुका त्रिगुण ।**
**त्या वेदाचें जें प्रेरण । तें गौण जाण मत्प्राप्ती ।।**
**त्या वेदार्थ श्रुतिस्मृति । नाना कर्मे करविती ।**
**त्या कर्माची कर्मगती । न कळे निश्चिती कोणासी ।।**
**कर्मस्वरूप परमगूढ । विधि निषेध अति अवघड ।**
**सज्ञानासी नव्हे निवाड । शास्त्रें दृढ विचारितां ।।**
**केवळ कर्मचि कर्माआत । एक प्रवृत्त एक निवृत्त ।**
**सकाम निष्काम अद्‌भुत । अंगी आदळत साधकां ।।**

— नाथभागवत १२.२१७—२०

कामनाभिभूत होऊन लौकिक वैदिक कर्मे करू लागला की, निरोध होत नाही व निरोध नाही की भक्ती नाही. कारण निरोध हेच भक्तीचे स्वरूप सातव्या सूत्रात सागितले आहे म्हणून खरा भक्त या कर्माच्या विधिनिषेधाच्या कचाटचात पडत नाही.

हीच अवस्था एका खेळियाच्या अभंगात श्रीतुकाराममहाराज सांगतात—

**वर्ण अभिमान विसरली याती एकएका लोटांगण जातीरे ।**
**निर्मळ चित्ते झाली नवनीते पाषाणा पाझर फुटती रे ।।**

अंत.करणाची अशी प्रेममय अवस्था झाल्याविना वरीलप्रमाणे लौकिक वैदिक कर्माचा न्यास होत नाही.

असा निरोध होणे फार कठीण आहे. एकदम सर्व लौकिक वैदिक कर्मे टाकणे शक्य नाही म्हणून भगवद्गीतेमध्ये सर्वकर्मसमर्पण सांगितले आहे. म्हणून 'लोक-वेद-व्यापार-न्यास' म्हणजे सर्व प्रकारची कर्मे भगवदर्पण करणे, असा न्यास शब्दाचा अर्थही कित्येक करतात 'न्यासो नाम भगवति समर्पणम् ।' न्यास पदाचा अर्थ आहे भगवंताला समर्पण म्हणजे लौकिक व वैदिक सर्व कर्मे भगवत्समर्पण करणें. तोच निरोध

लौकिक व वैदिक जितकी कर्मे आहेत, ती त्रिगुणात्मक प्रकृतीपासून होतात, मी कर्ता नाही, असग दृष्टा आहे, या कर्माशी माझा सबध नाही, असे मानणे हा सांख्यमताप्रमाणे त्याग समजला जातो कार्याला जोपावेतो कारणरूपाने न जाणले जाईल तोपावेतो खऱ्या रीतीने कार्याचा त्याग होत नाही. वेदान्तशास्त्रात कार्यास त्याचे कारण प्रकृती–माया–अज्ञान एतद्रूप मानले जाते व ती मिथ्या म्हणून तिचे कार्य लौकिक, वैदिक कर्मही मिथ्या असे समजणे हाच त्याग भक्तिमार्गात जगाचे मूळकारण, परमाणू, त्रिगुण प्रकृती इत्यादी नसून केवळ भगवानच आहे, अशी भावना असते. अतएव भगवंताच्या ठिकाणी सर्व कर्मं समर्पण हाच न्यास मानला जातो

या सर्व कर्मसमर्पणाचे रहस्य हे आहे की, काया-वाचा-मनाने होणारे कोणतेही कर्म भक्त मी करतो असे मानीत नाही.

श्रीएकनाथमहाराजांनी स्पष्ट सांगितले आहे–

**हेतुक अथवा अहेतुक । वैदिक लौकिक स्वाभाविक ।।**
**भगवंती अर्पे सकळीक । या नांव देख भागवतधर्म ।। ३३६ ।।**
**उदकीं तरंग अतिचपळ । जिकडे जाय तिकडे जळ ।**
**तैसे भक्ताचें कर्म सकळ । अर्पे तत्काळ भगवंती ।। ३३७ ।।**

— नाथभागवत अ. २

किंवा या सूत्राचा दुसरा अर्थ असा की, लौकिक कर्मे, नृत्य-संगीतादी, ती भगवंताचीच व्हावीत. मनात ही भावना ठेवली की भगवान हे श्रवण करीत आहे, पाहात आहे, या सेवेने तो सतुष्ट होवो. 'गाऊ नाचू विठू तुझा करू अनुवाद ।' 'निर्लज्ज होऊनि नाचेन रगणी ।'–तुकाराममहाराजांचे असे अनेक उद्गार आहेत. इतकेच नव्हे तर, 'जे जे काही करितो देवा । ते ते सेवा समर्पे ।।' अशी त्याची भावना आहे. व्यापार शब्दाचा अर्थ देहेंद्रियादिकानी होणाऱ्या चेष्टा असा आहे. त्याचे तात्पर्य इष्टप्राप्ती व अनिष्ट परिहारार्थ होणाऱ्या क्रिया हे आहे. स्नान, संध्या, यज्ञयागादी वैदिक कर्मे ही सस्कारवश होतच असतात; पण ती झाल्यावर 'कृष्णार्पणमस्तु', 'ब्रह्मार्पणमस्तु', 'अनेन विश्वात्मा भगवान् प्रीयताम्' अशी

समर्पणाची भावनाच ठेवली पाहिजे. आपल्या संस्कारातही ही भावना पूर्वीपासून ठेवलेली आहे. कन्येचे लग्न करीत असता असाच सकल्प केला जातो. 'इमा लक्ष्मी-रूपिणी कन्यां श्रीधररूपाय वराय तुभ्यमहं मप्रददे ।।' म्हणजे 'ही माझी कन्या लक्ष्मीस्वरूपिणी आहे. हिला मी श्रीधरस्वरूप वराला समर्पण करीत आहे.' लोकव्यवहारात संकल्पाचा केवल उच्चार केला जातो, पण भावना क्वचित ठेवली जाते. ही दृढभावना ठेवून सर्व लौकिक, वैदिक कर्मांचा भगवत्स्वरूपी न्याम (समर्पण) करणे हाच निरोध होय.

## सूत्र ९

### तस्मिन्ननन्यता तद्विरोधिषूदासीनता च ।।९।।

**अर्थ :**

आणि (निरोध म्हणजे) त्या भगवंताचे ठिकाणी अनन्यता आणि त्याच्या प्रतिकूल विषयाचे ठिकाणी उदासीनता ठेवणे.

**विवरण :**

मागील सातव्या व आठव्या सूत्रांत भक्तीचे लक्षण निरोध स्वरूपा हे सांगितले व निरोध म्हणजे लौकिक व वैदिक न्यास असे म्हटले आहे त्या निरोधाचेच पुन्हा विशेष रूपाने या सूत्रात व्याख्यान केले आहे. वरील सातव्या व आठव्या सूत्रांत निरोधांची निषेधात्मक व्याख्या सागून या नवव्या सूत्रात निरोधाचे विधायक स्वरूप सांगितले आहे. निरोधाचे पर्यवसान त्या प्रियतम भगवंताच्या ठिकाणी अनन्यता निर्माण होण्यात झाले पाहिजे भक्ती ही अनेक प्रकाराने होऊ शकते म्हणजे केली जाते. पुढे सूत्रातच गौणी व परा या रूपाने तिचे भेद सांगितले आहेत. आणखीही भक्तीचे प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथांतून भक्तीचे अनेक प्रकार सांगितले आहेत. (त्याचा विचार छप्पन-सत्तावन्नाव्या सूत्रात येणार आहे.) तरी खरी भक्ती म्हणजे अनन्यता हीच आहे. श्रीमद्‌भगवद्‌गीतेमध्येही '**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्य-स्त्वनन्यया**' (८–२२), '**अनन्ये नैव योगेन मां ध्यायन्त उपासते**' (१२–६) **अनन्याश्चिंतयंतो मां** (९–२२) '**भक्त्यात्वनन्यया शक्य**' (११-५४) असे पूर्ण

अनन्यतेचेच महत्त्व प्रतिपादन केले आहे. या अनन्यतेचे ' नित्ययुक्त ', ' सततयुक्त ' या शब्दाने स्वरूप प्रतिपादिले आहे. पण ती अनन्यता निर्माण होणे सुलभ नाही. जन्मजन्मांतरीच्या गुणवासना, सस्कार, विषयासक्ती, विकार हे त्या अनन्यतेस विरोध करीत असतात. नामस्मरण, ध्यान, पूजा, सेवा इ. करीत असताही चित्तवृत्ती बहिर्मुख होऊन परमात्मस्वरूपाशी अनन्य राहू शकत नाही. कित्येकवेळी हे विकार इतक्या चोरपावलाने येतात की, ते आले केव्हा व चित्तवृत्ती परमात्मस्वरूपापासून दूर झाली केव्हा हे लक्षात येणेही कठीण जाते. भक्तिमार्गात ही मोठी आपत्ती आहे. श्रीतुकाराममहाराज म्हणतात,

**त्यागिल्याचे ध्यान राहिले अंतरी । अवघी ती परी विटंबना ।।**

जेव्हा एखादा वृक्ष लावला जातो तेव्हा त्याच्या मुळापासून लहान लहान फणगारे बाहेर पडतात. पण त्यामुळे तो वृक्ष शक्तिहीन होतो त्या उपशाखा वाढून त्या वृक्षास क्षीण करीत असतात. अशा वेळी कुशल माळी त्या वृक्षाच्या लहान लहान शाखा छाटून टाकतो नंतर तो वृक्ष पूर्णत्वाने वाढीला लागलेला दिसतो याचप्रकारे एखादा भाविक भक्तिमार्गाने चालू लागला तर त्याच्या भक्तीमुळेच त्याला सन्मान, प्रतिष्ठा, लाभ, प्रसिद्धी, पूजा, कीर्ती, यश आदीची प्राप्ती झालेली दिसून येते. या लहान लहान शाखा त्याच्या मूळ भक्तिचाच नाश करणाऱ्या सिद्ध होतात. अशी अनेक उदाहरणे आहेत श्रीएकनाथमहाराजानी आपल्या चिरंजीव-पदात या विषयाचा स्पष्ट विचार केला आहे

**जनस्तुती लागे मधुर । म्हणती हा उद्धरावया हरीचा अवतार ।।**

अशा रीतीने शब्द विषय आत शिरतो. मग हळूहळू ते लोक नाना प्रकारची फळे, मेवामिठाई, नैवेद्य, इत्यादी समर्पण करतात की रसविषयाचा अतःकरणात प्रवेश होतो अशाप्रकारे पाचही विषयाचा प्रवेश होतो. त्यामुळे तो भक्त विषयात गुरफटून जाण्याचा संभव असतो. अनादिकालीन विषयभोगाचे अनत जन्माचे संस्कार, विषयांच्या ठिकाणी असणारी आकर्षणशक्ती मोह-शक्ती त्याला आपल्याकडे खेचीत असते. तसेच सर्वच विषयाचा त्याग करू म्हटले तरी शक्य नाही. कारण देह निर्वाहाकरिता, शरीराचे योग्य प्रकारे सचलन होण्याकरिता, मन, प्राण, बुद्धचा-दिकाच्या कार्यक्षमतेकरिता काही तरी विषयाचे सेवन अपरिहार्य होते. केवळ 'रस' विषयाबद्दल श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात,

**येरां इंद्रियां विषय तुटे । तेथ नियमूं नये रस हटे ।**
**जे जीवनचि हें न घटे । येणेंविण ।।** –ज्ञा. २-३०७

गीतेतही युक्ताहार-विहार साधकाकरिता सागितला आहे. म्हणूनच सूत्रात ' तद्विरोधिषूदासीनता ' म्हणजे ज्या विषयापासून साधक भक्ताला भक्तिमार्गात

प्रतिबंध होण्याचा सभव आहे त्याना विरोधी म्हटले जाते राजस, तामस विषय हे बहुधा विरोधी असतात तसेच अशा विरोधी असणाऱ्या काही विषयाचा त्याग करताही येतो. पण काहीचा त्यागही करता येत नाही, कारण ते अंगभूत असतात. काही अंतरात असतात. कित्येक वेळा देहातच काही व्याधी निर्माण होऊन देहतादात्म्यसंबंधामुळे साधकाचे मन तिकडे खेचले जाते. भक्त प्रल्हाद भगवंताशी अनन्यच होता. त्याचा जन्मदाता पिताच त्याला विरोध करीत होता. भरत हा श्रीरामचंद्राच्या ठिकाणी अनन्यच होता. पण त्याची माताच विरोधी होती, अशीही उदाहरणे आहेत श्रीतुकाराममहाराजांच्या धर्मपत्नीस त्यांचे भजन आवडत नव्हते. अशा वेळी प्रल्हाद हिरण्यकश्यपूचा त्याग करू शकत नव्हता, भरत कैकयीचा त्याग करू शकत नव्हता किंवा श्रीतुकाराममहाराजांनीही पत्नीचा त्याग केला नाही. जेव्हा विरोधी विषय त्यागयोग्य नसतात पण बाधक होत असतात तेव्हा त्याच्यापासून भक्ताने आपला बचाव करण्याचा उपाय 'उदासीनता' हा नारद महर्षी सागतात. ज्या ज्या विरोधी गोष्टी असतील त्याचा भक्त विरोध करू शकत नाही. कारण ज्या ज्या गोष्टीचा आपण विरोध करीत असतो त्या त्या गोष्टी मनात अधिक येऊ लागतात. म्हणजे चित्तात अनेक वेळा अनेक विकार उठत असतात. श्रीतुकाराममहाराज म्हणतात.'

**काय काय करितों या मना । परी नायकें नारायणा ।**
**करूं नये त्याची करी विवंचना । नेऊ पतना आदरिलें ।।** –तु. महाराज.

असे होत असले तरी त्यांचा विरोधभावाने विचार घोळवू नये अशा वेळी तिकडे उपेक्षेने पाहून परमात्मभावनेचाच विचार जागृत ठेवणे, म्हणजेच उदासीनता ईश्वरविरोधी गोष्टीत यत्किंचितही रस न वाटणे अथवा त्या गोष्टीचा विरोधीभावाने मनात द्वेषविचार न येणे असाही उदासीन पदाचा अभिप्राय होऊ शकतो. उदासीन शब्दाचा अर्थ पाहिल्यास 'उत्–आसीनता.' उत् म्हणजे वर; आसीनता म्हणजे राहणे, जाणे. कमळ चिखलाच्यावर, गुलाब काट्यावर राहूनच खुलत असतो. ज्या ज्या विरोधी गोष्टी आहेत त्यांना त्याना विचाराने खाली घालून भक्ताने त्याच्यावर (पलीकडे) गेले पाहिजे.

**भक्त ऐसे जाणा जे देही उदास । गेले आशापाश निवारूनि ।।** –तु. म.

जे भगवद्भक्तीच्या विरोधी आहेत, त्यांचा भक्त विरोध करील, शत्रुत्व करील तर त्याचेच कार्य आपण केल्यासारखे होईल. कारण विरोध करीत रहाण्यात मन भगवद्विमुख होण्याचा संभव आहे. तसेच त्यांच्याशी विरोध करीत बसण्यात भक्ताचा वेळ व्यर्थ जाण्याचा संभव आहे. तसेच विरोधामुळे प्रतिकूल विकारांचा वेग वाढण्याचाही संभव असतो. म्हणून 'तद्विरोधिषूदासीनता' असे म्हटले आहे. भगवद्भाव वाढविण्याच्या प्रयत्नांत विरोधी गोष्टीविषयी औदासीन्य सहजच

निर्माण होते. या प्रकारे सावधानतेने वर्तन करीत राहणे हेही एक निरोधाचेच स्वरूप आहे, असे या सूत्राच्या द्वारे सिद्ध केले आहे

या नवव्या सूत्रात त्या भगवंताच्या ठिकाणी अनन्यता ठेवावी असे सागितले. त्या अनन्यतेचे विशेष स्वरूप स्पष्टरूपाने पुढील दहाव्या सूत्रात श्रीनारदमहर्षी सांगतात.

## सूत्र १०

## अन्याश्रयाणां त्यागोऽनंन्यता ॥१०॥

**अर्थ–**

(आपल्या प्रियतम भगवत्स्वरूपाला सोडून) दुसऱ्या आश्रयाचा त्याग (करणे) यासच अनन्यता म्हणतात.

**विवरण–**

जीवाचा स्वभाव कोणाशी तरी अनन्य होण्याचा आहे. अनादि अज्ञानाच्या प्रभावाने संसारात देहादिक स्वभिन्न विजातीय पदार्थांचे ठिकाणी तो अनन्य असतो. ‘देहोऽह’ असाच त्याचा प्रत्यय असतो. देहतादात्म्य संबंधामुळेच देहसंबंधी कलत्रपुत्र, इत्यादी अन्य वस्तूचे ठिकाणीही तो तादात्म्य ठेवीत असतो.

**अव्हांटलिया आस्थाबुद्धि । विषयसुखचि परमावधि ।**
**जीव तैसा उपाधि । आवडे लोकां ॥** –ज्ञा. ४.२१

असे त्याच्या सांसारिक अनन्यतेचे स्वरूप ज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे पण ही अनन्यता अज्ञानमूलक अतएव घातक आहे. या देहतादात्म्य संबधात एका दृष्टीने जीवाचा आत्मघात आहे.

**जया देह संबंधाआंतू । प्रतिपदी आत्मघातू ।**
**भुजता उसंतू । कांहीच नाही ॥** – ज्ञा १८-१२७६.

ज्या देहादिकाशी जीव अनन्य असतो तेच जन्मजरामरणधर्मांनी युक्त आहेत. त्याच्याशी तादात्म्य ठेवल्यामुळे जीवाला या दुःखक्लेशयुक्त जन्ममरणादी अवस्थांचा अध्यातिमक आधिदैविक, आधिभौतिक अशा विविध दुःखांचा भोग घडत असतो.

म्हणून विचारी पुरुष विवेकाने देहादिकाहून आत्म्याला वेगळा जाणतो. एकदा देहादिकाशी असणारे तादात्म्य सुटले की उरला देवच.

**देह नव्हे मी हे सरे । उरला उरे विठ्ठल ।।** –तुकाराममहाराज.

अध्यात्ममार्गात मुमूक्षु साधक ज्ञानस्वरूप आत्म्याशी अनन्य होतो. आत्मव्यतिरिक्त दुसरी कोणतीच सत्तास्वरूप वस्तू नाही आत्मा हा देशकाल-वस्तुपरिच्छेदरहित, अनत, परिपूर्ण आहे व तोच मी आहे, अशा सशयविपर्ययरहित अवस्थेत तो असतो. भक्तिमार्गातील अनन्यता नारद महर्षींनी या सूत्रात स्पष्ट केली आहे. आपल्या प्रियतमाचाच आश्रय घ्या, अन्य आश्रयाचा त्याग करा. मनुष्य कोणाचा ना कोणाचा आश्रय घेत असतो. कोणी धनाचा, कुळाचा, विद्धत्तेचा तपाचा, सत्तेचा, बलाचा इ अनेक आश्रय संसारात घेतले जातात. एकाचा आश्रय घेऊन संसार होत नाही. पण प्रेम हे एकआलंबन स्वरूप असते ते अव्यभिचारी असावे लागते.

अनादिकालीन देहादिकांच्या तादात्म्यसंस्कारामुळे भगवंतावाचून अन्य आश्रय पुढे पुढे येत असतात व ते याला आपल्याकडे ओढत असतात. अशा वेळी त्यांच्या यथार्थ स्वरूपाचा विचार करून त्याच्या क्षयातिशयरूपदोषाना ओळखून त्यांचा आपला यथार्थरीत्या कांही संबंध नाही असेच भक्त समजत असतो.

**कोण सुख धरोनि संसारीं । राहो सांग मज पा हरी ।**
**अवघ्या नाशिवंता परी । थिता तूंही दुरी अंतरसीं ।।**

असे तुकाराम महाराज देवालाच म्हणत आहेत.

एखादा भक्त अन्य आश्रयाचा आपल्या तीव्र निष्ठेने सहज त्याग करू शकेल. पण प्रथमच भक्तिमार्गात प्रविष्ट झालेल्या साधकास तो कठीण असतो. कारण अनादी सस्काराने संसारातील विषय पुनः पुन्हा त्यास आपल्याकडे ओढीत असतात. एखाद्या वेळेला त्याचा विजय झालेलाही दिसून येतो. अशा वेळी त्या भक्तास पुन्हा विचारावर आरूढ होऊन आपली चित्तवृत्ती त्या विषयापासून परावृत्त करावी लागते. श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात,

जे तो विषयाची दाट झाडी । माजी कामक्रोधाची सांकडी ।
चुकवोनि आला पाडी । सद्वासनेचिया ।।
मग साधुसंगे सुभटा । उजू सत्कर्माच्या वाटा ।
अप्रवृत्तीचा अव्हांटा । डावलूनि ।। –ज्ञानेश्वरी, ७.१२७-१२८

धन, भवन, वैभव, सत्ता ही मोठी नाहीत त्यांचा निर्माता व उपभोग घेणारा मोठा म्हटला पाहिजे. कारण हे सर्व जड आहेत. त्याचा आश्रय घेणे म्हणजे जडाचा आश्रय घेणे होय. आश्रय घेणारा जीव चेतन आहे. त्याने चेतन

परमात्म्यास सोडून जडाचा आश्रय घेणे कसे योग्य होईल ? काही लोक धनादिकाचा नाही तरी कर्माचा आश्रय घेतात. जीव स्वत ला कर्ता समजत असतो. तो कर्माश्रय द्विविध दिसून येतो. बहिरंग व अंतरग. शेती व्यापार, कारखाने, नोकरी इत्यादी बहिरंग कर्मे आहेत, त्याचा आश्रय हा बहिरग कर्माश्रय होय. योगाभ्यास, जप, तप, आदी अतरग कर्मे होत, त्याचा आश्रय हा अंतरंग कर्माश्रय होय. खरा भक्त या दोहोंचाही आश्रय घेत नाही. तो हा भरवसा ठेवीत नाही की, माझ्या या जपाने, तपाने, अनुष्ठानाने, व्रतादिकाने भगवान आम्हास वश होऊ शकेल. परमात्मा कोणत्याही कर्माचे मूल्य देऊन विकत घेता येत नाही. जप, तप, दान, व्रतादी हे भगवताचे मूल्य होऊ शकत नाही. साधनाच्या क्षेत्रात बहिरंग कर्मे दान, तप, यज्ञ विहितधर्माचरण इत्यादी आहेत. अंतरंग साधने कर्मयोग तथा उपासना ही होते पण या दोन्हीहि प्रकारच्या कर्माने भगवान प्राप्त होत नाही. स्वत: श्रीकृष्ण अर्जुनास स्पष्ट सागतात– सर्व धर्मान्परित्यज्य मामेक शरणं व्रज ।। 'अर्जुना ! सर्व धर्माचा परित्याग करून मला एकटचालाच शरण ये.' म्हणून धर्माश्रयाचा परित्याग करून भगवंतालाच शरण गेले पाहिजे. साध्य वा साधन म्हणून त्याचाच आश्रय घेतला पाहिजे 'श्रीकृष्ण शरण मम।' हीच भावना जागृत ठेविली पाहिजे. कोणी जीवाश्रय घेणारे दिसून येतात, अमुक एक व्यक्ती माझे कल्याण करील, अमका मला सोडवील इत्यादी पण कोणीही जीव स्वत: बद्ध, परतत्रच असतो तो दुसऱ्यास काय देऊ शकणार ? कोणी स्वबलाश्रयावर अवलबून असतात– मी इतका जप, तप, दान, व्रते इत्यादिकाच्या द्वारे भगवतास प्रसन्न करून घेईन, अशी भावना ठेवतात. भगवद्‌व्यतिरिक्त स्वबलाश्रय ही अन्याश्रयच आहे. खरा भक्त असेही म्हणत नाही. श्रीतुकाराममहाराजांची भावना पाहा, ते देवास म्हणतात,

**आता तुज कळेल तें करी । तारिसी तरी तारी मारी ।**
**जवळीं अथवा दुरी धरी । घाली संसारीं अथवा नको ।।**
**शरण आलो नेणतेपणे । भावभक्ति काहीच नेणे ।।**

काही काही सकाम भक्त अन्य देवताचा आश्रय घेत असतात. जसे गोकुळातील गोपमंडळी वर्षाव व्हावा म्हणून इंद्रदेवतेच्या प्रीत्यर्थ इंद्रयाग करीत होती. श्रीकृष्णानी त्याना सांगून इंद्रयाग बंद करविला. श्रीकृष्ण गीतेमध्ये अर्जुनास सागतात.

कामैस्तैस्तैर्हृतज्ञाना प्रपद्यन्तेऽन्यदेवता. ।। ७-२०.

'आपल्या आपल्या स्वभावाने विवश झालेले लोक अनेक कामनांच्या पूर्तीच्या ल भाने ज्ञानविमूढ होऊन कामनाच्या पूर्तीच्या अनुरूप नियमांचे पालन करीत अन्यान्य देवताना शरण जात असतात.' श्रीकृष्ण पुढे म्हणतात, त्यांनाही

त्या उपासनेचे फल देणारा मीच आहे, पण त्याना ते कळत नाही. अशा अन्य देवतांचा आश्रय घेणे भक्तीत बाधक आहे कारण अन्य देव हे तत्त्वत: जीवच आहेत. देव एकच आहे भगवान शंकराचा परम नैष्ठिक असा उपमन्यू भक्त होता. एकदा भक्ताची खरी निष्ठा व अनन्यता पाहण्याच्या इच्छेने भगवानशंकर हे उपमन्यूपुढे देवराज इंद्राचा वेष घेऊन गेले. उपमन्यूने अभ्यागत समजून त्याचा आदर केला. इद्राने उपमन्यूला अनेक प्रलोभने दाखविली. शकर हे तुला काही देऊ शकणार नाहीत मी तुला वाटेल ते देण्यास समर्थ आहे. मला वाटेल ते वरदान मागून घे असे ते म्हणू लागले तेव्हा उपमन्यू म्हणाला,

अपिकीट. पतंगो वा भवेयं शकराज्ञया ।।
नत्विद्राह त्वया दत्त त्रैलोक्यमपि कामये ।।

उपमन्यू म्हणतो, 'हे देवराज ' माझा स्वामी जो भगवान चंद्रमौली, त्याची आज्ञा होईल तर त्याच्या प्रसन्नतेकरिता मी कीटपतगादी कोणत्याही योनीमध्ये जाण्यास आनदाने तयार होईन, पण तू दिलेले त्रैलोक्याचे साम्राज्यही मला नको.' हे उपमन्यूचे भाषण ऐकून भगवान शंकर हे इंद्राचा वेष टाकून त्रिनयन-गंगाधर-नीलकंठ अशा शिवरूपाने त्याच्यापुढे प्रकट झाले अशी पुराणात कथा आहे

कोणी म्हणेल, अन्य आश्रयाचा त्याग झाल्यावर अनन्यता का भगवंताशी अनन्यता झाल्यावर अन्याश्रयाचा त्याग ? खरे म्हणजे माणूस जसा एका पायाने पुढे जमीन पकडून मगच दुसरा पाय उचलतो, तद्वत अगोदर भगवताचा आश्रय घेऊनच खऱ्या रीतीने अन्य आश्रयाचा त्याग होत असतो म्हणून भगवान श्रीकृष्ण अर्जुनास सागतात,

गा ऐसे करी । यया आठा पहारा माझारी ।
तरी मोटके निमिष भरी । देत जाई ।।

मग जे जे का निमिष । देखेल माझे सुख ।
तेतुले अरोचक । विषयी घेईल ।।

जैसे शरत्काळ रिघे । सरिता वोहटू लागे ।
तैसे चित्त काढेल वेगें । प्रपंचौनि ।।

तैसे भोगा आतूनि निगता । चित्त मज माजी रिगता ।
हळूहळू पडुसुता । मीचि होसील ।। ज्ञा १२ १०५–९

हा एक अनन्यतेचा अभ्यासच होय. अन्य आश्रयाच्या ठिकाणी विवेकाने मिथ्यात्वबुद्धी झाली तरी त्याचा त्याग होणे शक्य आहे. देवाचे ठिकाणी दृढ श्रद्धा निर्माण झालेल्या भक्तापुढे अनेक विषय प्रतिबंधरूपाने आले तरी त्याचे ठिकाणी येर ती मायिके दु.खाची जननी । नाही आदि अंती अवसानी ' (तु.म.) अशी मिथ्यात्व

वना झाली तर त्यांची आसक्ती राहत नाही व अनन्यत्वात बाधा येत नाही.
णून श्रीकृष्ण भगवान 'अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ।।' ९–३३
पे अर्जुनास स्पष्ट सागून ऐहिक विषयांचे अनित्यत्व व दुःखरूपत्व पटवून देत
हेत. प्रपंचाचे मायिकत्व पटले की त्याचे अधिष्ठान जो परमात्मा त्याचे सत्यत्व
टते व त्याचे ठिकाणी अनन्यता राहणे सुलभ जाते. 'विषय तो त्याचा झाला
रायण। नावडे जनधन मातापिता ।।' (तु. म)

अन्य आश्रयाचा त्याग या वाक्यातील अन्य पदात अतिनिकट व अपरोक्ष-
पाने प्रतीत होणारा देह हा देखील अन्यच ठरतो. पण देहाविना भक्ती कशी
णार ? याचे उत्तर देह हा साधन मानला जातो अज्ञान स्थितीत 'देहोह' असा
त्यय असतो त्या देहावरही भक्त उदास असतो

झालो उदासिन देही। एकाविणे चाड नाही ।।

हा तुकाराम महाराजाचा अनुभव आहे.

अनन्यतेचे खरे स्वरूप सांगणारा श्रीमद्भगवद्गीतेतील श्लोक प्रसिद्ध आहे

अनन्याश्चितयंतो मा ये जना पर्युपासते।
तेषा नित्याभियुक्ताना योगक्षेमं वहाम्यहम् ।। ९-२२

या श्लोकातील 'पर्युपासते' व 'नित्याभियुक्तानां' ही दोन पदे अनन्यतेचे
स्वरूप दाखविणारी आहेत. 'पर्युपासते' म्हणजे सर्वत्र भगवतालाच पाहतो, तद्-
व्यतिरिक्त दुसरी वस्तूच नाही असे मानतो

भगवान श्रीकृष्ण सागतात–

यो मा पश्यति सर्वत्र सर्वच मयि पश्यति।

गीता–६–३०.

'अर्जुना' जो भक्त सर्वत्र मलाच पाहतो व सर्वही माझे ठिकाणीच पाहतो
पर्युपासते' पदाने सर्व देशात (देशपरिच्छेदरहित) व 'नित्याभियुक्ताना'
दाने सर्व काळात (कालपरिच्छेदरहित) व अनन्य पदाने सर्व वस्तूमध्ये (वस्तु-
रिच्छेदरहित) भगवद्दर्शन होत असते असे सागितले आहे कोणी म्हणेल, जर
क्त असे सर्वदा सर्वत्र भगवत्स्वरूपच चितू लागला, कोणतेही सासारिक कर्म न
रील तर त्याचा ससार किवा निर्वाह कसा होईल ? याचे उत्तरही श्लोकातच
योगक्षेम वहाम्यहम्' या प्रतिज्ञावाक्याने दिले आहे भगवान म्हणतात, मी त्याचा
योगक्षेम वाहतो. अप्राप्ताची प्राप्ती म्हणजे योग व त्याचे रक्षण म्हणजे क्षेम.

त्याचा भार वाहे माथा। करी योगक्षेम चिता ।। तुकाराममहाराज.

योगक्षेम त्याचा जाणे जडभारी ।। – तुकाराममहाराज.

आवडीने भावे हरिनाम घेसी।
तुझी चिता त्यासी सर्व आहे ।। –एकनाथमहाराज.

अशी पुष्कळ प्रमाणे व उदाहरणेही आहेत ( योगक्षेम पदाचा विशेष विचार पुढे सत्तेचाळिसाव्या सूत्राच्या विवरणाच्या वेळी होईल. )

या अनन्यतेचे व्याख्यान श्रीज्ञानेश्वरमहाराजानी या श्लोकावरील टीकेत अनेक दृष्टांतपूर्वक उत्कृष्ट असे केले आहे

**पै सर्व भावेंसी उखितें । जें वोपिलें मज चित्तें ।**
**जैसा गर्भ गोळा उद्यमातें । कोणाही नेणें ।।**
**तैसा मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटेंचि नाही ।**
**मजचि नाम पाही । जिणेंया ठेविलें ।।**
**ऐसें अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसातें माते ।**
**जे उपासिती तयांतें । मीचि सेवि ।।**

—ज्ञानेश्वरी ९–३३५–३७

भगवान श्रीकृष्णानी उद्धवास उपदेश करतेवेळी अनन्यतेचे स्पष्ट लक्षण सागितले आहे.

**काया वाचा आणि चित्त । गृहदारा वित्त जीवित ।**
**निष्कामता मज अर्पित । अनन्यभक्त ते माझे ।।**

—एकनाथी भागवत—२९–४३

**माझिया आवडी तत्त्वतां । सर्वस्वें वेंचित जीविता ।।**
**कदा पालट नव्हें चित्ता । भावार्थता विश्वासी ।।**
**मीच एक देवाधिदेवो । सर्वभूतीं माझाची भावो ।**
**विकल्प विकृती संदेहो । घालिता पहाहो उपजेना ।।**
**नवल त्याची भजनख्याती । सायुज्जादि चारी मुक्ति ।**
**माझ्या नावावरूनि ओवाळितीं । भक्ति पढियंती येणे पाडे ।।**

माडल्या अति विघ्न साकडे । ग्लानी न करिती आणिकाकडे ।
जाणती रामनामापुढे । विघ्न बापुडे ते किती ।।
गगन पडो पाहे कडाडे । पृथ्वी उलथावया गडबडे ।
ऐसे माडिलिया साकडे । नाम पुढें श्रीहरीचे ।।

**ऐंसी देखोनि अनन्य प्रीती । मी सर्वस्वें भुलल्रो श्रीपती ।**
**मग न पहातां कुळजाती । त्याच्या घराप्रती मी धांवे ।।**
**त्यासी छळो ये जे जें दूषण । तें तें त्यासीं होय भूषण ।**
**माझें भक्तीचे प्रसन्नपण । जाण संपूर्ण या नाव ।।**

— ए. भा. २४–३३७-४८

जसे जसे भगवन्महात्म्य कळू लागते, जसे जसे भगवंताचे अनंत अलौकिक गुण पटू लागतात, भगवंताची प्रेममयता अनुभवास येऊ लागते तशी तशी अन्य पदार्थांच्या ठिकाणी भ्रमाने, मोहाने आलेले तादात्म्य नष्ट होऊन भगवत्स्वरूपाशी अनन्यता निर्माण होते.

अनन्यतेकरिता भक्तिशास्त्रात चकोर, चातक, भृग, मत्स्यक, कृपण, पतिव्रत इत्यादिकांची उदाहरणे घेतली जातात. चकोर अन्य सर्व पदार्थांचा त्याग करून चंद्रामृताचेच सेवन करीत असतो. हे प्रसिद्ध आहे. चातक हा नद्या, समुद्र, तळी इत्यादि भरलेले असले तरी तिकडे ढुकूनही न पाहता मेघाकडेच सतत दृष्टी ठेवून असतो मेघातून एखादा थेंब जरी प्राप्त झाला तरी त्यातच संतोष मानतो. कित्येक वेळ हा मेघाकडे टक लावून बसला असता त्यातून गाराचा वर्षाव होतो, या चातकाची चोच फुटण्याचाही प्रसंग येतो. पण याची अनन्यता नष्ट होत नाही. भृग हा मोठ मोठी काष्ठे आपल्या सामर्थ्याने कोरून टाकतो, पण कोवळ्या कमळात अडकू पडतो. तसेच अनन्यतेत मत्स्य हाही फार श्रेष्ठ मानला गेला आहे. पाणी हे मानव पशुपक्षी इत्यादी सर्वांनाच पाहिजे म्हणून त्यास जीवन अशी संज्ञा आहे. पण ते पाण्याशी अनन्य नाहीत. जलाविना काही काळ इतर प्राणी भागवू शकतीलही. ते फक्त जलप्राशन करतील पण जलात अखंड वास्तव्य करणार नाहीत पण मत्स्य हा जलाविना क्षणभरही राहू शकत नाही, श्रीज्ञानेश्वरमहाराजानी म्हटले आहे पाण्याहून तुपात पुष्कळ गुण अधिक आहेत एखाद्या मासोळीस म्हटले की, तू तुपा राहा तर ती तयार होईल का? तिला पाणीच पाहिजे. तुकाराममहारा म्हणतात,

जीव जिती जीवनासगे। मत्स्या मरण त्या वियोगे ।।

तसेच कृपणाचे उदाहरणही प्रसिद्ध आहे. त्याच्याजवळ धन असते संसारा सर्वांनाच धनाची गरज असते. धनाने अनेक वस्तूची प्राप्ती होत असते. पण साध म्हणूनच त्याचा सर्वजण उपयोग करीत असतात. एखाद्या वेळी दुर्दैवाने काह आपत्ती आली तर तिच्यातून पार पडण्याकरिता प्रसंगवशात सर्व धनाचाही त्या करण्यास ते प्रवृत्त होतात. पण कृपणाचे तसे नाही. तो धनास साध्य समजत असते प्राण गेला तरी तो धनाचा त्याग करीत नाही.

कृपण चित्तवृत्ति जैसी। रोवो निघाली ठेवयापासी।
मग नुसधेन देहेंसी। आपण असे ।। —ज्ञानेश्वरी ११. ६३३
सर्वभावें लोभ्या आवडे हे धन। आम्हां नारायण तैशापरी ।।

—तुकाराममहाराज.

भागवत एकादशस्कंधाच्या तेविसाव्या अध्यायात एका कृपणाचे विस्तृ

चरित्र सांगितले आहे. त्यावरील आपल्या टीकेत श्रीएकनाथमहाराजांनी कृपणाचे व त्याच्या कृपणतेचे विस्तृत वर्णन केले आहे, ते मुळातच पाहणे योग्य आहे. तसेच अनन्यतेकरिता पतिव्रतेचे उदाहरणही घेतले जाते.

पतिव्रतेचें हृदय जैसे । पतीवाचूनि न स्पर्शे ।। –ज्ञानेश्वरी

पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आम्हा नारायण तैशापरी ।।

– तुकाराममहाराज

श्रीतुकाराममहाराजाचा अन्य आश्रयाचा त्याग कसा व किती झाला होता हे त्याच्याच वचनावरून पाहा.

तुका म्हणे एक विठ्ठलचि खरा । येर तो पसारा वाऊगाची ।।

फळकट संसार । येथ सार भगवत ।।

विटले हे चित्त प्रपंचापासुनी । वमन ते मनी बैसलेसे ।।

सर्वच भक्ताना अन्य आश्रय त्यागपूर्वक ही भगवदनन्यता प्राप्त झालेली असते, त्याचे कारण वरील विवेचनावरून लक्षात येण्यासारखे आहे. म्हणूनच 'अन्याश्रयाणां त्यागोऽनन्यता' असे अनन्यतेचे लक्षण नारदमहर्षीनी सांगितले आहे.

निरोधनाच्या दुसऱ्या परिभाषेत हे सांगितले आहे की, भगवदनन्यता व विरोधी गोष्टीत उदासीनता हाच निरोध होय. अनन्यता म्हणजे काय हे या सूत्रात सांगितले, तद्विरोधी गोष्टीत उदासीनना म्हणजे काय हे पुढील अकराव्या सूत्रात श्रीनारद-महर्षी सांगत आहेत.

## सूत्र ११

## लोके वेदेषु तदनुकूलाचरणं तद्विरोधिषूदासीनता ।। ११ ।।

**अर्थ :**

(भक्ताच्या) लौकिक आणि वैदिक कर्मामध्ये भगवत अनुकूल कर्मे करीत राहणे (म्हणजेच) त्याच्या विरोधी (प्रतिकूल) विषयात उदासीनता (ठेवणे) होय.

**विवरण** ·

जीव मनुष्यदेहात आला म्हणजे तो लौकिक वैदिक कर्मांनी बाधला जात
केवल दृष्टफलक जी कर्मे, स्नानपान, अन्नभक्षण, शेती, व्यापार, राजसेवा इत्या
ती लौकिक कर्मे, म्हणविली जातात व वर्णआश्रमाना उद्देशून वेदात जी दृष्ट-अदृ
उभय स्वरूपाची फले देणारी कर्मे सागितली गेली आहेत व जी आवश्यक अ
मानली जातात, ती वैदिक कर्मे होत. या कर्मांचे विहित व निषिद्ध असे दोन प्रक
आहेत. वेदात जी कर्मे मानवाने करावीत असे सांगितले आहे, त्यांना विहि
म्हणतात जी कर्मे करू नयेत असे वेदात सागितले आहे, ती निषिद्ध कर्मे हो
कारण ती अनिष्ट फळ देणारी असतात. सर्वसामान्य मानवदेह धारण करणाऱ्या
हे कर्माचे विधान आहे. कारण देहधारी मनुष्य सर्वच कर्माचा त्याग करू शक
नाही. असे जरी आहे तरी सर्वच कर्मे सर्वांकरिता नाहीत. भक्तास इतर काम
नसतेच. तो अनन्य असतो म्हणून तो काम्य कर्माचा अधिकारी नाही. पापनिवृ
करिता भगवन्नाम हे साधारण प्रायश्चित्तशास्त्रात प्रतिपादिले आहे अ
प्रायश्चित्ताची त्यास आवश्यकता नाही, नित्यनैमित्तिक कर्मालाही फल आहे.
कर्मे तो भगवदर्पणबुद्धीनेच करीत असतो. त्यातही एखादे कर्म जर भगवद्भक्ती
प्रतिबधक होत असेल तर तेही भक्ताने टाकावे. जे भक्तीला अनुकूल नसेल अ
कोणतेही व कितीही महत्त्वाचे आणि शास्त्रप्रतिपादित असेल तरी ते कर्म भ
करीत नाही, अशी उदाहरणे आहेत पुत्राकरिता मातापित्याची, स्त्री-करिता पती
व शिष्याकरिता गुरूची आज्ञा प्रमाण मानणे लोकवेदधर्मानुसार अवश्य कर्तव्य आ
पण जर ती-आज्ञा भगवद्भक्तीस विरुद्ध असेल तर खरा भक्त त्याचा त्याग करत
भक्तवर्य प्रल्हादाने पित्याची आज्ञा मानली नाही भरताने मातेची, बळीने ग
शुक्राचार्यांची आज्ञा मानली नाही.

मागील नवव्या सूत्रातही ‘तस्मिन्ननन्यता तद्विरोधिषूदासीनताच’ अ
सागितले होते पुन्हा हीच गोष्ट का सागितली अशी शका येईल. त्याचे उत्तर
की, येथील उदासीनताही अकर्मण्यस्वरूप नाही, तर लौकिक-वैदिक कर्मे जी प्रे
भक्तीस अनुकूल असतील ती करीत राहणे हीच तद्विरोधी कर्माविषयी उदासीन
आहे. जर ती लौकिक वैदिक कर्मे भक्तिप्रेमात प्रतिबंधक होतील तर ती केल
पाहिजेत, असा आग्रह नाही. कारण पुराणात स्पष्ट म्हटले आहे–

स्मर्तव्यं सततं विष्णुः विस्मर्तव्यो न जातुचित् ॥
सर्वे विधिनिषेधाः स्युरेतयोरेव किङकराः ॥

‘सतत विष्णुस्मरण करावे, केव्हाही त्याचे विस्मरण होऊ देऊ नये. स
विधिनिषेध आहेत ते याच सिद्धान्ताचे किंकर आहेत.’ या विषयाचाच विशेष विच
श्रीमदभागवत एकादशस्कधातील जनक नवयोगेश्वर संवादात केला आहे. मानव

जन्माला येताना देव, पितृ, ऋषी ऋण घेऊन जन्मास येतो व ते त्याला यज्ञ, वेदाध्ययन व प्रजा निर्माण करून फेडावे लागते याकरिता वेदात विहित कर्मांचे विधान सांगितले आहे. पण जो भक्त अनन्यतेने श्रीहरीस शरण गेला तो कोणाचाही ऋणी नाही व किंकर नाही, असे अध्याय पाच, श्लोक एकेचाळीसमध्ये स्पष्ट म्हटले आहे. या श्लोकावरील टीकेत श्रीएकनाथमहाराज सांगतात–

जो विनटला हरिचरणी । तो कोणाचा नव्हें ऋणी ।
जेवी परिसाचिये मिळणी । लोह काळेपणी निर्मुक्त ।।
भावे करिता भगवद्भक्ति । सकळ पितर उद्धरती ।
ऋषीश्वरा नित्य तृप्ति । भगवद्भक्ति स्वानंदे ।।

–ए. भा. ५. ४६२-६४

इतकेच नव्हे तर अशा अनन्य भक्ताकडून कदाचित विकर्म झाले तरी त्यांच्या हृदयात असणारा हरी ते धुऊन नाहीसे करतो श्रीएकनाथमहाराज सांगतात–

राया म्हणसी भगवद्भक्त । विहितकर्मी नित्य निर्मुक्त ।
ते जरी विकर्म आचरत । तरी प्रायश्चित्त न बाधी त्यांसी ।।
जेवी पंचाननाचे पिले । न वचे मदगजांचेनि वेढिले ।
तेवी हरि प्रियी विकर्म केले । त्यासी नवचे बांधिले यमाचेनि ।।
हरिनामाचे ज्यासी स्मरण । वेद त्याचे वंदी चरण ।
मा जो हरीचा पढियता पूर्ण । त्यासी वेद विधान कदा न बाधी ।।
भक्तापासूनि विकर्म स्थिती । कदा न घडे गा कल्पांती ।
अवचटे घडल्या दैवगती । त्या कर्मा निर्मुक्ति अच्युत स्मरणे ।।

–ए. भा. ५. ४७३-७९

इतकेच नव्हे तर भगवान श्रीकृष्णही उद्धवाला सांगतात–

**माझेनि भजनप्रेमे जाण । विसरला कर्माची आठवण ।**
**कर्म बापुडे रंक कोण । बाधक जाण नव्हें भक्ता ।।**

**सप्रेम करिता भजनविधी । सर्व कर्मातें विसरली बुद्धि ।**
**ते जाणावी भजन समाधी । तेथ कर्म त्रिशुद्धी बाधेना ।।**

**ज्याची श्रद्धा कर्मावरी । तोचि कर्माचा अधिकारी ।**
**ज्याची श्रद्धा श्रीधरी । तो नव्हे अधिकारी कर्माचा ।।**

**जो जीवें प्राणें भक्तीसी विकला । तो तेव्हांचि कर्मावेगळां झाला ।**
**त्याच्या भावार्था मी विकिला । तो कर्मी बांधला केवी जाये ।।**

ए. भा. अ. ११–१०८५–८८.

लौकिक-वैदिक कर्मे सर्वच भक्तीला अनुकूल असतातच असे नाही. तसेच ती वर्ण, आश्रम, देह इत्यादिकांच्या अभिमानानेच होतात, बरीच अन्य फलासक्तीने होतात. भक्ताचा तो अहंकार व फलासक्ती नष्ट झालेली असते. तो केवळ भगवत्परायण असतो. जोपावेतो देह आहे तोपावेतो कर्मे होतच असली तरी ती भगवद्भक्तीस अनुकूल अशीच होतात त्यामुळे प्रतिकूल विषयात किंवा ते प्राप्त करून देणाऱ्या कर्मात सहजच उदासीनता निर्माण होते. भक्तांच्या ठिकाणी या सहा गोष्टी असतातच किंवा असाव्यात असे भक्तिशास्त्रकार सांगतात.

**आनुकूल्यस्य संकल्पः प्रातिकूल्यस्य वर्जनं ।**
**रक्षिष्यतीति विश्वासः गोप्तृत्वेवरणं तथा ।**
**आत्मनिक्षेप कार्पण्य षड्विधा शरणागतिः ॥**

१. भगवंताला अनुकूल असतील तीच करण्याचा संकल्प, २. भगवद्भक्तीस जे प्रतिकूल होईल ते कितीही मोठे असेल तरी त्याचा त्याग, ३ संकटकाली भगवान अवश्य रक्षण करील असा पूर्ण विश्वास, ४. कदाचित काही संकटे, आपत्ती आली तर त्या भगवंतालाच रक्षक म्हणून हाक मारणे, धावा करणे, ५. स्वतःला सदैव भगवत्चरणावर समर्पित करणे, ६ कोणत्याही गोष्टीचा अभिमान न धारण करणे, दीनता राखणे, या त्या सहा गोष्टी आहेत. यातच भगवद्भक्तिविरोधी गोष्टीत उदासीनता सहज साधत असते. सूत्रामध्ये लौकिक व वैदिक कर्मे सोडावयास सांगितली नाहीत. भक्ताला मुलगा असेल तर त्याचे उपनयन संस्कार, चौल आदी संस्कार केले पाहिजेत. जीविका चालविण्याकरिता शेती, व्यापार वा परंपराप्राप्त व्यवसाय केला पाहिजे. अनेक भक्त करीतच होते, पण करावयास पाहिजे ते केवळ भगवदाज्ञा म्हणून, शास्त्रमर्यादानुसार व भगवंताला अर्पण करण्याकरताच. वेदामध्ये तर अनेक हिंसादि कर्माचे, सकाम कर्माचे, जारण-मारणादी कर्माचेही विधान आहे. ' त्रैगुण्यविषयावेदा . ।' असे गीतेमध्ये सांगितले आहे. त्रिगुणात्मक जीवांचा स्वभाव व अधिकार पाहून वेदाचे विधान असते. वेदाचे खंडण किंवा वेदाची निंदा ही भक्तांना अभिष्ट नसते, तर वेदामध्ये भक्तीला प्रतिकूल असे जर काही विधान प्रतीतीस आले तर ते आपल्याकरिता नाही, अन्य अधिकाऱ्यांकरिता आहे असे समजून त्या कर्माविषयी त्याने उदासीन राहावे. श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात–

जरी वेदें बहुत बोलिलें । विविध भेद सूचिले ।
तरी आपण हित आपुलें । तेचि घेपें ॥ ज्ञा. २.२६०.

श्रीतुकाराममहाराज सागतात–

वाचा बोलू वेद नीती । करू संती केले तें ॥

याच आशयाने भक्तिविरोधी कर्माविषयी उदासीनता ठेवण्यास सूत्रात सांगितले आहे.

## सूत्र १२ व १३

**भवतु निश्चयदार्ढ्यादूर्ध्वं शास्त्ररक्षणम् ।।१२।।**

**अन्यथा पातित्याशङ्कया ।।१३।।**

**अर्थ :**

(अलौकिक अशा भगवत्प्रेमाचा मनात) निश्चय दृढ झाल्यानंतर शास्त्राचे रक्षण व्हावे. ।।१२।।

नसता पातित्याची संभावना आहे. ।।१३।।

**विवरण :**

या सूत्राच्या अर्थात विवाद दिसून येतो. मागील सूत्रात लौकिक व शास्त्रीय कर्मामध्ये भगवद्भक्तीस अनुकूल कर्मे करावीत व भगवद्भक्तीविरोधी व्यवहारात उदासीनता राखावी, असे म्हटले आहे. त्याचा विचार त्या सूत्राच्या विवरणात झाला आहे भक्ताचे विशेष कर्तव्य अंतःकरणात भगवान् व त्याच्या प्राप्तीचे साधन भक्तिप्रेम याच विषयाचा निश्चय दृढ राखणे हे आहे; हाच भक्तधर्म आहे. याविना अन्य धर्माचरणात भक्त बांधला जात नाही. श्रीतुकाराममहाराज हेच सांगतात–

**निष्ठावंत भावभक्ताचा स्वधर्म । निर्धार हे वर्म चुको नये ।।**
**निष्काम निश्चळ विठ्ठली विश्वास । पाहो नये वास आणिकाची ।।**

श्रीज्ञानेश्वरमहाराजही आपल्या अभंगातून सांगतात–

सकळ धर्माचें कारण । नामस्मरण हरिकीर्तन ।
दया क्षमा समाधान । संतजन साधिती ।।
निजधर्म हा चोखडा । नाम उच्चारूं घडघडा ।
भुक्तिमुक्तीचा संवगडा । हा भावसिंधु तारक ।।

श्रीमद्भागवतामध्येही–

सवै पुंसा परोधर्म· यतो भक्तिरधोक्षजे ।
अहैतुक्य व्यवहिता ययात्मा संप्रसीदति ।।–भा. १

असेच म्हटले आहे.

भक्त याविना अन्य साधनांचा विचार करू शकत नाही.

मागील सूत्रात अनन्यतेचे महत्त्व सांगितलेले आहे. ती प्राप्त करून घेणे व

ती घेण्याकरिता कोणत्याही इतर व्यवहारांत न पडता भगवदनुकूल कर्माचरण हाच एकमेव पर्याय सांगितला आहे. त्या दृष्टीने अनन्यतेचा निश्चय दृढ होणे हे प्रथम कर्तव्य आहे. लौकिक-वैदिक कर्मे सर्व अनन्यतेला अनुकूल असतातच असे नाही, म्हणून अनन्यता विरोधी कर्मांत उदासीनता ठेवावी असे द्विवार सागितले आहे. निश्चय दृढ होणे म्हणजे श्रीनामदेवराय म्हणतात त्याप्रमाणे स्थिती होणे.

**देह जावो अथवा राहो । पांडुरंगी दृढ भावो ॥१॥**
**चरण न सोडी सर्वथा । आण तुझी पंढरीनाथा ॥२॥**
**वदनी तुझे मंगल नाम । हृदयी अखंडीत प्रेम ॥३॥**
**नामा म्हणे केशवराजा । केला निश्चय चालवी माझा ॥४॥**

ही एकनिष्ठा राहणे कठीण आहे. त्यात इह वा पूर्वजन्मीचे अनेक प्रतिबंध आडवे येतात. अनेक प्रलोभने पुढे येतात ते प्रतिबंध, ती प्रलोभने दूर सारून केवळ आपली भगवन्निष्ठाच साभाळणे हे खऱ्या भक्ताचे लक्षण आहे. या स्थितीचे वर्णन भागवत एकादशस्कंधात जनक–नवयोगेश्वर संवादात केले आहे

**त्रिभुवन विभव हेतवेऽप्यकुण्ठस्मृतिरजितात्म सुरादिभिर्विमृग्यात् ।**
**न चलति भगवत्पदारविन्दाल्लवनिमिषार्धमपि यः स वैष्णवाग्र्यः ॥**

भागवत, ११–२–५३.

'त्रैलोक्याचे ऐश्वर्य प्राप्त होत असले तरी ज्याचे भगत्स्मरण अखंड असते, ज्या भगवत्पद कमलाच्या शोधात इंद्रादिक देवही असतात त्या भगवच्चरणकमला पासून जो लवमात्रसुद्धा दूर होत नाही तो वैष्णव श्रेष्ठ होय'

या श्लोकावरील आपल्या रसाळ व्याख्यानात श्रीएकनाथमहाराज सांगतात–

सप्रेमभावें करितां भक्ति । हरिचरणी ठेविली चित्तवृत्ति ।
निजस्वर्थाचिये स्थिती । अतिप्रीती निजनिष्ठा ॥
तेथे त्रैलोकीच्या सकळ संपत्ति । कर जोडूनि वरूं प्रार्थिती ।
तरी क्षणार्ध न काढी चित्तवृत्ति । भक्तपरमार्थी अति लोभी ॥
एवं हरिचरणापरते । सारामृत नाही येथे ॥
यालागी चित्ते वित्तें जीवितें । जडले सुनिश्चिते चरणारविंदीं ॥

एकनाथी भागवत २, ७४५–६०.

श्रीमद्‌भगवद्‌गीतेतील बाराव्या अध्यायात जी भक्तलक्षणे सांगितली आहेत. त्यांत 'यतात्मा दृढनिश्चयः' असे एक महत्त्वाचे लक्षण आहे. म्हणजे भक्तजीवनात निश्चयदार्ढ्य हा महत्त्वाचा भाग येतो, येथे 'निश्चयदार्ढ्य' याचा भगवंताचे ठायी पराकोटीची अनन्यता असाच अर्थ आहे. परमात्मा हाच माझा खरा आश्रय, इतर कुणी नव्हेत असा मनाचा दृढ निश्चय होणे म्हणजे 'निश्चयदार्ढ्य' असा

निश्चय झाल्यानंतर सर्व आचरण भगवत्पर होते. मग शास्त्राने सांगितलेल्या आचरणाचे काय ? ते करावे की नाही ?

तो निश्चय झाल्यानंतर, नारदमहर्षी सांगतात, शास्त्ररक्षण व्हावे. म्हणजे करावे.

प्रेमाची पूर्ण अवस्था प्राप्त झाली आहे, म्हणून निश्चय दृढ झाला आहे. अशा अवस्थेत तो पुरुष भाविक जगाच्या पूज्यतेचा विषय होतो, जग त्याच्याकडे आदर्श म्हणून पाहत असते, अशा वेळी तो नवीन भक्तांना अलौकिक न वाटता आदर्शस्वरूप वाटला पाहिजे, त्याकरिता भगवद्नुकूल अशी शास्त्रोक्त विहित कर्मे आचरली पाहिजेत. श्रीकृष्णभगवान सागतात–

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ।। ३.२१ ।।**

'श्रेष्ठ पुरुष जसे वर्तन करतील तसेच सामान्य लोक त्याचे अनुकरण करीत असतात तो जे प्रमाण मानून व्यवहार करतो, इतर लोक तदनुसार वागत असतात.

एथ वडिल जें जें करिती । तया नाम धर्मु ठेविती ।
तेचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ।।
मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें ।
अलौकिक नोहावें । लोकाप्रति ।। ज्ञा. ३.१५८–७१

भक्त, संत यांनीही लोकसंग्रह सांभाळला पाहिजे.

येथे श्रीनारदांनी 'भवतु...शास्त्ररक्षणम् ।' असा प्रयोग केला आहे. 'करोतु' असा केला नाही. त्याचा ध्वनी असा आहे की शास्त्राने सांगितलेल्या नित्य नैमित्तिक कर्माचे आचरण भगवत्प्रेमात रंगल्यामुळे व त्यात देहभानही विसरल्यामुळे त्याच्याकडून होईल किंवा नाही हे सांगता येत नाही ! त्यामुळे ते त्याच्यावर बंधनकारकही नाही. त्याने भक्ती बाजूला ठेऊन शास्त्ररक्षण केलेच पाहिजे असे कुणी म्हणणार नाही. पण त्याच्याकडून ते होणे चांगले ! भगवदैक वृत्ती व आचरण झाल्यानंतरही शास्त्राने सागितलेली व भक्तीला बाधक न होणारी कर्मे भक्ताकडून व्हावीत, होवोत, होणे चांगले, असा 'भवतु'चा आशय आहे ! का होवोत ? तर 'अन्यथा पातित्याशंकया !' हे त्याचे उत्तर होय.

निश्चय-दृढतेनंतर शास्त्ररक्षण होवो. म्हणण्यात त्या पूर्वी शास्त्राविरुद्ध वागावे असा आशय नाही. कारण पूर्वी सूत्र अकरामध्ये 'लौकिक व वैदिक कर्मात भगवत्-अनुकूल कर्मे करावीत' (काम्यादिक करू नयेत) असे स्पष्ट म्हटले आहे. शास्त्रानुसार भगवदर्पण-बुद्धीने भगवद्नुकुल नित्यनैमित्तिक कर्मे व श्रवणकीर्तनादि करीत करीतच भगवत्प्रेम प्राप्त होऊ शकते.

असे जर न होईल तर 'अन्यथा पातित्याशंकया' असे तेराव्या सूत्रात नारदमहर्षी स्पष्ट सागत आहेत. ज्या ईश्वराचे प्रेम संपादन करण्याचा प्रयत्न करावयाचा त्या ईश्वराचीच आज्ञा पाळणे म्हणजेच शास्त्ररक्षण. ते न केले जाईल तर पतनाचा संभव आहे. गीतेतच स्पष्ट म्हटले आहे–

**यः शास्त्रविधीमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ।।** गीता १६-२३

'जो शास्त्रविधीचा त्याग करून मनाला वाटेल तसे वर्तन करतो, स्वेच्छाचारी होतो त्याला सिद्धी तर प्राप्त होत नाहीच; पण परलोकप्राप्ती किंवा परमगती प्राप्त होत नाही, इतकेच नव्हे तर सुखही मिळत नाही.'

जाणूनबुजून शास्त्रविहित कर्माचा त्याग करणे हा भक्तिप्रेमाचा आदर्श होऊ शकत नाही. उच्छृंखलता, स्वेच्छाचार हे नरकाचे साधन होत असते, असे गीतेमध्ये स्पष्ट म्हटले आहे.

भक्तिप्रेमाच्या निर्मितीपूर्वीही तदनुकूल विहितकर्माचरण विहितच आहे व निश्चयदार्ढ्यानंतरही ते विहितच आहे शास्त्ररक्षण याचा अर्थ शास्त्रविहित कर्माचरण करीत राहणे. मात्र ते अनासक्त बुद्धीने, भावदर्पण बुद्धीने करीत राहणे हा भक्तियोगाचा एक महत्त्वाचा भाग आहे. श्रीकृष्ण अर्जुनास आपल्या बाराव्या अध्यायातील भक्तियोगाच्या विवेचनात हेच सांगतात.

येतु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।
अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ।। १२-६.

'जे सर्व विहितकर्मे मला अर्पण करून मत्पर होऊन अनन्य योगाने माझे ध्यान करीत उपासना करतात,' असे भक्तांचे लक्षण तेथे केले आहे, या श्लोकावरील व्याख्यानात श्रीज्ञानेश्वर महाराज सांगतात–

कर्मेंद्रिये सुखे । करिती कर्मे अशेखें ।
जियें का वर्णविशेखें । भागा आली ।।
विधी तें पाळीत । निषेधातें गाळीत ।
मज देऊनि जाळीत । कर्मफळें ।।
या परी पाही । अर्जुना माझा ठायी ।
सन्यसूनि नाही । करिती कर्मे ।। –ज्ञानेश्वरी १२.७६–७८

असे जर न होईल म्हणजे शास्त्रविहित कर्माचे भगवदर्पण बुद्धीने रक्षण (आचरण) न होईल तर पातित्य प्राप्त होण्याचा संभव आहे. तो भक्त पतित होईलच असे नाही, पण संभव मात्र आहे! अशी जपून भाषा नारदमहर्षी वापरतात. मग साधक भक्ताने हा धोका स्वीकारावाच का? त्यापेक्षा शास्त्राने

सांगितलेली नित्यनैमित्तिक कर्मे व सदाचार याचे आचरण याद्वारे त्याचेकडून शास्त्ररक्षण होणेच चागले खरा भक्त जाणूनबुजून विहित कर्माचा त्याग कधीच करीत नाही. या विषयात संतश्रेष्ठ श्रीएकनाथ महाराजाचा एक अभंग महत्त्वाचा आहे.

हरिनाम स्मरतो म्हणोनि आचरसी दोष ।
श्रवणस्मरण भक्ति तेणे पडली वोस ।। १ ।।
हरिनामाचेनि बळे करिसी अधर्म ।
देवाचे नि तुमचे शुद्ध नोहे कर्म ।। २ ।।

याच दृष्टीने नारद महर्षींनी 'अन्यथा पातित्याशंकया' असे सूत्रात म्हटले आहे. विहित कर्माचरण सुटले, अधर्मप्रवृत्ती वाढली तर कदाचित भक्तिमार्गापासूनही तो भक्त पतित होण्याचा संभव आहे; असाही अर्थ वरील सूत्राचा होतो

## सूत्र १४

## लोकोऽपि तावदेव किंतु भोजनादिव्यापारस्त्वाशरीरधारणावधि ।।१४।।

**अर्थ** :

लौकिक व्यवहारही तोपावेतो ( म्हणजे जोपावेतो शास्त्ररक्षणाची मर्यादा पाळली जाते तोपावेतो ) (व्हावा) परंतु भोजनादी (लौकिक) व्यापार मात्र शरीरादिकांचे (केवळ) धारण होईतोपर्यंत (व्हावा.)

**विवरण :**

निश्चय दृढ झाल्यानंतर जोपर्यंत मागील सूत्रात सांगितल्याप्रमाणे प्रेमीभक्ताकडून शास्त्ररक्षण होते तोपर्यंत त्याच्याकडून लौकिक व्यवहाराचे पालनदेखील होणे योग्य होय. कदाचित भक्तिप्रेमाच्या उत्कटतेमध्ये 'यज्ज्ञात्वा मत्तो भवति, स्तब्धो भवति, आत्मारामो भवति।' ( ना. भ. सू. ६ ) अशी बाह्यज्ञानशून्य अवस्था झाली तर शास्त्रिय व लौकिक सर्वच व्यापार बाजूला राहील ! पण साधक भक्त हा लोकांमध्ये राहणारा देहधारी मनुष्यच असतो. जोपर्यंत त्याचे

प्रारब्ध आहे तोपर्यंत देहधारण आहे जोपर्यंत देहधारण आहे तोपर्यंत देहशुद्धी, आहार, निद्रा, स्नान, वस्त्रधारण हे त्याला करावे लागणार त्यासाठी त्याला घरदार, अन्नवस्त्र, धनधान्य इत्यादींची आवश्यकता राहणारच म्हणजे माणसाला समाजात राहावे लागले की कांही प्राथमिक वस्तूंची गरज ही राहणार. ती पूर्ण करण्यासाठी त्याला उद्योग, व्यवसाय काही तरी करावाच लागणार अनेक भक्त हे असा आपला लौकिक व्यवहार सांभाळून भक्तीत रंगलेले होते असे दिसून येईल श्री गोरोबा कुंभार, सावतामाळी, सेना न्हावी इत्यादी संतांनी अंत करणात अनन्य भक्तीचा उदय झाल्यानंतरही लौकिक व्यवहार सांभाळलेला दिसतो निश्चयदार्ढ्यानंतर ज्याप्रमाणे भक्ताकडून शास्त्ररक्षण होवो असे नारदमहर्षींना वाटते त्याप्रमाणे त्याच्याकडून लौकिक आचाराचेही पालन व्हावे असे त्याना वाटते असे यावरून दिसते. भक्ती करणे म्हणजे कामधंदा सोडून काही तरी लोकापेक्षा वेगळा, विचित्र किंवा विक्षिप्त आचार करणे नव्हे ! 'अलौकिक नोहावे। लोकाप्रति ॥' असे श्री ज्ञानदेव म्हणतात ते याच अर्थाने 'मन हे गोविंदी देह काम करी वो।' असे गोपिकाच्या आचाराचे वर्णन श्रीतुकाराममहाराज करतात तेही हाच उद्देश प्रगट करण्यासाठी भक्त म्हणजे कुणी योगी, तपी, संन्यासी नव्हे. तो व्यवहारात राहतो पण व्यवहार त्याला बाधू शकत नाही कारण तो त्याच्या लौकिक आणि वैदिक सर्व व्यापाराचा न्यास भगवंताच्या चरणाजवळ करतो मग लोकसंग्रहासाठी योग्य लौकिक व्यवहारही त्याच्या हातून भक्ती दृढ झाल्यानंतर घडला तर तो समाजरक्षणासाठी आवश्यकच आहे.

मागील सूत्रातील 'भवतु' हे पद त्याच अर्थाने या सूत्रातही अध्याहृत गृहीत– आहे 'भवतु... शास्त्ररक्षणम्।' तसेच 'भवतु लोकोऽपि' 'लोकव्यवहाराचे आचरण भक्ताकडून होवो' असे म्हणण्यात ते त्याच्यावर बंधनकारक आहे असे नाही, तर ते शक्यतो होणे ठीक. अगदी अशीच भाषा ज्ञानदेवानीही वापरली आहे. ते म्हणतात,

तो शरीराचेनि मेळे। करू का कर्में सकळें।
परि आकाश धुये न मैळे। तैसा असे ॥

ज्ञा. १३. १०३२

पतित होऊ नये म्हणून त्याने शास्त्ररक्षण करावे आणि जोपर्यंत शास्त्ररक्षणाचे भान, भक्तिप्रेमाच्या उन्मादात त्याचा विसर होईतोपर्यंत, त्याला राहील तोपर्यंत लौकिक व्यवहाराचे भान त्याने सांभाळले पाहिजे. 'तावत एव' या पदाचा हा अर्थ होतो. नाही तर शास्त्ररक्षण म्हणून स्नानसंध्या चालू आहे, पण भक्तीमुळे लोकांचे उसने आणलेले पैसे मात्र परत करण्याचा विसर पडला, असे ढोंग त्यात शिरावयाचे !

लौकिक व्यापार म्हणजे केवळ आहारनिद्राच नव्हे. समाजाचा आणि कुटुंबाचा घटक म्हणून रूढ, योग्य आणि आवश्यक सर्व कर्तव्यकर्मांचे पालन म्हणजे लौकिक व्यापार. भगवत्भक्तीने अंतःकरण व्यापले की सामाजिक आणि कौटुंबिक दृष्टीने मनुष्य वायाच गेला पाहिजे (!) असा भ्रामक अर्थ श्रीनारदांचा आणि महाराष्ट्रातील साधुसंतांचाही दिसत नाही.

श्रीनारदमहर्षींनी लौकिक व्यापाराचा उल्लेख करताना 'भोजनादि' असा केला आहे. शरीररक्षणासाठी आवश्यक असणारा भोजन हा अगदी प्राथमिक असा व्यापार आहे. पण त्यापुढे 'आदि' जोडले आहे! भोजनासारख्या प्रारंभिक आवश्यक लौकिक कृत्यापासून सुरुवात करून ते इतर सर्व आवश्यक व योग्य व्यवहारांचा त्या 'आदि' मध्ये अंतर्भाव आहे कारण पुढेही 'आशरीरधारणावधि' असे त्यांनी म्हटले आहे 'आ–शरीर' म्हणजे शरीरापासून ते इतर ज्या उपाधी कुटुबात आणि समाजात कमीतकमी आवश्यक आहेत त्यांच्यापर्यंत

पण मग भक्त आणि इतर संसारी पुरुष याच्यात काय भेद राहिला? कारण 'भोजनादि' मध्ये सर्व कर्मे व 'आशरीरामध्ये' संसारातील घरदार, पैसा सपत्ती, कुटुब-मुले, या सर्वांचा समावेश होतो! या सर्वांची जबाबदारी जर भक्ताने स्वीकारली तर त्याने भक्ती केव्हा आणि कशी करावी? कारण संसारातील या उपाधी सतत वाढतच राहणार. त्याच्या लौकिक व्यापाराला काही मर्यादा आहे किंवा नाही?

ती मर्यादा 'धारणाविधी' या शब्दानी सूत्रात सांगितली आहे. लौकिक व्यवहार भगवंताविषयी अनन्यता दृढ झाल्यानतर भक्ताकडून होवो, पण तो हव्यासाने नव्हे, किंवा सासारिक वस्तूच्या विषयीच्या आकर्षणाने त्यांची वाढ करण्याच्या उद्देशानेही नव्हे तर केवळ त्याचे 'धारण' व्हावे या मर्यादेतच. शास्त्राचे आचरण ज्याप्रमाणे शास्त्र 'रक्षणा' पुरतेच मर्यादित काम्यकर्मे करून अधिक काही मिळविण्यासाठी नव्हे, ह्याप्रमाणे भोजनादी व्यापारही लौकिकासाठी अपरिहार्य असणाऱ्या शरीरादीच्या 'धारणा' पुरतेच मर्यादित ठेवावयाचे, 'पोषणा' साठी करण्याकडे प्रवृत्त व्हावयाचे नाही! लौकिक विषयांची हाव वाढवून त्याचा अधिकाधिक संग्रह भक्ताने करू नये हा भाव 'धारणावधि' या पदांनी सुचविला आहे.

काही अर्थकारांनी या व यापूर्वीच्या 'भवतु निश्चयदार्ढ्यात...' या सूत्रांचे अगदी वेगळे अर्थ केले आहेत. कुणी या दोन सूत्रांचा अर्थ, 'निश्चय दृढ झाल्यानतरमगचशास्त्ररक्षण करावे, नसता भक्तिमार्गातून पतन होईल. त्याप्रमाणे लौकिक व्यापारही निश्चय दृढ झाल्यानंतरच) करावा पण भोजनादी लौकिक व्यापार तर

शरीर असेपर्यंत करावे लागतात ( म्हणजे त्यासाठी निश्चय दृढ होण्याची मर्यादा नाही ) असा अर्थ केला आहे

कुणी, ' दृढ निश्चय झाल्यानतरदेखील शास्त्ररक्षण करावे, नसता पतन होईल व लौकिक कर्मेही जोपर्यंत बाह्यज्ञानाचे प्रेमोत्कर्षामुळे विस्मरण होणार नाही तोपर्यंत करावीत, पण भोजनादी कर्मे मात्र त्या लोकव्यवहार विस्मरणाच्या अवस्थेतही होत राहतात कारण जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत त्याच्या धारणेसाठी ती आवश्यक आहेत असा केला आहे.

या वरील अर्थामध्ये ' आशरीरधारणावधि' या पदाचा अर्थ योग्य रीतीने लागत नाही वरील अर्थ होण्यासाठी एकतर ' आशरीरधारणम् ' असे (म्हणावयास पाहिजे होते किवा ' शरीरधारणावधि ' असे) म्हटले असते तरी पुरेसे होते. पण सुरुवातीस ' आ ' हा उपसर्ग आणि शेवटी ' अवधि ' असे शब्दयोगी अव्यय हे दोन्ही एकाच अर्थाने जोडण्याचे काय कारण असावे ? सूत्ररचनेमध्ये हे अपेक्षित नाही

श्री स्वामी अखडानद सरस्वती यानी आपल्या 'नारदभक्तिदर्शना' मध्ये ही शका व्यक्त केली आहे. पण त्यांनी या शंकेचे समाधान वेगळचा रीतीने केले आहे. ते म्हणतात, ' आशरीरधारणावधि ' म्हणजे जन्मापासून मृत्यूपर्यंत ' आ ' शरीराचा प्रारंभ सुचवितो आणि 'अवधि' त्याच्या धारणाचा शेवट ! या दोन टोकामध्ये भोजनादी लौकिक व्यापार करावेच लागतात पण हाच अर्थ ' आशरीरधारणम् ' किवा ' शरीरधारणावधि ' यापैकी कोणत्याही संक्षेपाने सुचवला जातोच

' आ ' या उपसर्गाचे दोन अर्थ होतात एक अर्थ ' पर्यंत ' असा आहे जसे आचद्रसूर्य किवा आकर्ण या ठिकाणी चंद्रसूर्य असेपर्यंत किवा कानापर्यंत असा अर्थ होतो. दुसरा अर्थ ' पासून ' असा आहे. जसे, आबालवृद्ध किवा आनखशिखाग्र येथे बालापासून वृद्धापर्यंत किंवा नखापासून शेडीच्या टोकापर्यंत असा अर्थ होतो. येथे ' आशरीर ' मध्ये तो दुसऱ्या अर्थाने आला आहे. ' आशरीर ' म्हणजे शरीरापासून प्रारंभ करून ते इतर आवश्यक व योग्य लौकिक विषयांपर्यंत असा अर्थ होतो. पण नारदांना येथे हे अपेक्षित आहे की या आशरीर सर्व विषयाचे केवळ धारणहोईल इथपर्यंतच त्याने लौकिक व्यवहार करावा, अधिक करू नये

लौकिक व्यवहाराचा भार भक्ताने कशासाठी वहावा ? तो देवावर टाकून त्याने त्या संसाराच्या उपाधीतून मुक्त का होऊ नये ? परमात्मा त्याचा योगक्षेम चालविणार नाही काय ? अशा शंका यावर कदाचित येतील. भक्ताचा योगक्षेम भगवान चालवितो, हे खरे पण म्हणून जाणूनबुजून भक्ताने तो देवावर टाकणे म्हणजे देवाला आपल्या संसाराचे साधन बनविणे आहे. तसे करणे म्हणजे ती भक्ती ' कामयमाना ' होईल. पण ' कामयमाना ' झाली की ती भक्ती राहत नाही !

'मा न कामयमाना' ( ना भ. सू. ७ ) असे पूर्वी म्हटलेच आहे. त्याचप्रमाणे केवळ लोकव्यवहार टाकणे म्हणजेही भक्ती नव्हे, तर 'लोकवेदव्यापारन्यास.' ( ना भ सू ८ ) हे तिचे एक लक्षण आहे केलेली कर्मे भगवदर्पण करणे हे भक्तीचे त्यागमय स्वरूप आहे.

नको गुफो भोगी नको पडो त्यागी । लावुनि सरे अगी देवाचिया ॥

असाच उपदेश श्रीतुकाराममहाराजही करतात

## सूत्र १५

## तल्लक्षणानि वाच्यन्ते नानामतभेदात् ॥१५॥

**अर्थ**

आता नाना मतानुसार त्या भक्तीची लक्षणे सांगितली जातात

**विवरण**

कोणतीही गोष्ट लक्षणानी सिद्ध झाली पाहिजे असा शास्त्रकाराचा दंडक आहे लक्षणाविना लक्ष्य स्वरूपाचा बोध यथार्थ रूपाने होऊ शकत नाही येथे भक्ती हे लक्ष्य आहे. कोणी म्हणेल भक्तीचे लक्षण तर पूर्वी सूत्र दोनमध्ये 'परम-प्रेमरूपा' असे सांगितलेच आहे. पुन्हा लक्षण सांगण्याचे प्रयोजन काय ? लक्षण हे सामान्य; विशेष अशा दोन रूपाने कोठे कोठे सांगितले जाते. 'परमप्रेमरूपा' हे भक्तीचे सर्वसामान्य लक्षण आहे. पण तेच प्रेम अभिव्यक्त होण्यास कोणती तरी क्रिया कारण होत असते त्या क्रियेच्या मागे काही विशिष्ट भावना असते. म्हणूनच भक्तिशास्त्रामध्ये भक्तीचे विविध प्रकार सांगितले गेले आहेत श्रीमद्भागवतामध्ये प्रल्हादचरित्रात नवविविधा भक्तीचा निर्देश आहे तर कोठे आणखीही अनेक प्रकार ग्रथांतरी वर्णिले आहेत. भक्तिरसामृतसिंधुनामक भक्तिशास्त्रावरील ग्रथात साधन-भक्तीची चौसष्ट अंगे सांगितली आहेत. प्रेम हे एकच असले तरी त्याची अभिव्यक्ती अनेक अगानी होत असते. कोणी कोणी भक्त आपआपल्या आवडीनुसार एखाद्या अगालाच महत्त्व देऊन ह्या क्रियेचाच प्रामुख्याने भक्तीमध्ये समावेश करतो. अनेक भक्तश्रेष्ठ, संतसत्पुरुष, ऋषिमुनी, भक्त्याचार्य होऊन गेले, त्यापैकी कोणी कोणी एका एका अंगाला महत्त्व दिले व त्याच क्रियेला प्रामुख्याने भक्तिस्वरूपात स्थान

दिले आहे, अशा काही श्रेष्ठ भक्तवर्यांचा निर्देश करून त्यानी कोणते अग महत्त्वाचे मानले व त्याच क्रियेस भक्ती असे मानले त्याचा निर्देश पुढील सूत्रातून केला आहे एकएका अंगाला महत्त्व दिले गेले म्हणून त्यात नाना मतभेद निर्माण झाले हे मतभेद विरोधातून निर्माण झाले नाहीत, तर ज्याचा पुढे नामनिर्देश केला आहे, त्याच्या विशिष्ट भावनातून निर्माण झाले आहेत. कारण भक्तीचे मूळ रूप जे प्रेम त्यात कोणाचाही मतभेद नाही. वास्तविक खऱ्या प्रेमाचे स्वरूप अनिर्वचनीय आहे असे पुढे सूत्र एक्कावन्नमध्ये सागितले आहे. असे मानले तर सामान्य जनास भक्तिप्रेमाचे यत्किंचितही ज्ञान होणार नाही. तसेच प्रेमाची अभिव्यक्ती कोणकोणत्या रूपाने होते हे न कळल्यामुळे सामान्य भाविकांचा भक्तिप्रेमाचा मार्ग कुठित होण्याचाही सभव आहे. तसेच अनेक प्रेमी भक्त होऊन गेले त्यानी विशिष्ट अगाने भक्ती केल्याची उदाहरणे आहेत. श्रवण कीर्तनादी भक्ती कोणी कोणी केली त्याची नावे पुराणादिकातूनही आढळून येतात. जसे–

> श्रीविष्णो. श्रवणे परीक्षितभवद्वैयासकि. कीर्तने ।
> प्रल्हाद स्मरणे तदङ्घ्रिभजने लक्ष्मी पृथु पूजने ।
> अक्रूरस्त्वभिवन्दने च हनुमान दास्ये च सख्येऽर्जून ।
> सर्वस्वाऽऽत्मनिवेदने बलिरभूत् कैवल्यमेषा समम् ।।

'श्रीविष्णुच्या कथा श्रवणभक्ती परीक्षितीने केली कीर्तन शुकाचार्याने, स्मरण प्रल्हादाने, चरणसेवा लक्ष्मीने, पूजाभक्ती पृथूने, वंदन अक्रूराने, दास्य हनुमताने, सख्यभक्ती अर्जुनाने व आत्मनिवेदनभक्ती बळीने केली, पण या सर्वांना कैवल्याची प्राप्ती मात्र सारखीच.'

वरीलप्रमाणे अनेक अंगाने भक्ती होत असते, त्यात कित्येक भक्त म्हणविणाऱ्याच्या काही विवक्षित स्वतंत्र भावना असतात त्या भावनेप्रमाणेच तो तो त्या त्या क्रियाना भक्ती म्हणत असतो. म्हणून या विषयात नाना मते निर्माण झाली आहेत या मतांचे प्रतिपादन करणारे सर्व मोठे भक्त पदवीप्राप्त झालेले पुरुषच आहेत. ते फार श्रेष्ठ पुरुष होते म्हणून त्याच्या त्याच्या मताप्रमाणे त्यानी त्यानी प्रतिपादिलेल्या भक्तिस्वरूपाचा नारदऋषीनी अनुवाद केला आहे श्रीनारद-ऋषीनीही ही भक्ती मूळ एकरूपा असूनही अकरा प्रकारची होते असे सूत्र ब्याऐंशी मध्ये सागितले आहे. नाना मतभेदाने त्या निश्चयदृढ झाल्यानतर केलेल्या भक्तीची जी लक्षणे होतात ती सागितली जातात, अशी या सूत्रात नारदमहर्षी प्रतिज्ञा करीत आहेत.

या सूत्राच्या अर्थाबद्दलदेखील मतभेद आहे 'तल्लक्षणानि वाच्यन्ते' असे येथे म्हटले आहे. पण ती लक्षणे कुणाची वर सागितल्याप्रमाणे ती भक्तीची आहेत असे बहुसंख्य टीकाकारानी मानले आहे. पण काहीच्या मताने भक्तीचे लक्षण

' सातु अस्मिन् परमप्रेमरूपा ' आणि ' अमृतस्वरूपा च ' या दोन सूत्रामध्ये सांगितले आहे या सूत्रामध्ये ज्याच्या लक्षणाचा उल्लेख केला आहे ती लक्षणे प्रत्यक्ष भक्तीची नाहीत तर ' निश्चयदार्ढ्यां'ची म्हणजे भक्ती अंतःकरणात दृढ झाल्याची आहेत पुढे जी वेगवेगळ्या आचार्यांची मते सांगितली आहेत ती मते अंत.करणातील भक्तीचे व्यक्त स्वरूप सांगणारी आहेत. सूत्राचा हा अर्थही स्वीकारण्यासारखा आहे.

या पुढील सूत्रात प्रथमतः श्रीव्यासमहर्षींचे मत सांगतात.

## सूत्र १६

## पूजादिष्वनुराग इति पाराशर्यः ।।१६।।

**अर्थ :**

पराशरऋषीचे पुत्र श्रीव्यास महर्षी याच्या मताप्रमाणे भगवंताच्या पूजा (व्रते पर्व महोत्सव) आदी विषयात अनुराग (प्रेम) म्हणजे भक्ती होय.

**विवरण :**

श्रीनारदमहर्षी प्रथम पराशरसुत व्यासमहर्षींचे भक्तिलक्षण सांगतात. श्रीव्यास हे भगवदवतार समजले जातात. अनेक पुराणातून व्यासमहर्षींचे श्रेष्ठत्व वर्णिले आहे.

कृष्णद्वैपायनं व्यासं विद्धि नारायणं प्रभु ।।
कोऽह्यन्यः पुडरीकाक्षान्महाभारतकृद्भवेत् ।। —विष्णुपुराण, ३-४-५

' कृष्णद्वैपायन व्यास म्हणजे प्रत्यक्ष नारायणच होत. कारण त्याच्याशिवाय कोण बरे महाभारतासारखा ग्रंथ रचू शकेल ?'

व्यास शब्दाचा अर्थ महाभारतामध्ये खालीलप्रमाणे सांगितला आहे.

विव्यास वेदान्यस्मात्स तस्माद्व्यास, इति स्मृत· ।।

—महाभारत आदिपर्व, ६३—८८.

' वेदाचा विस्तार ज्याच्यापासून झाला म्हणून त्यास व्यास असे म्हटले जाते. महाभारताच्या आदिपर्वात ६३ व्या अध्यायात व्यासांचे चरित्र आले आहे.

चालू वैवस्वत मन्वंतरात प्रत्येक चौकडीच्या द्वापरयुगात एक एक व्यास झाला असून अठ्ठाविसाव्या चौकडीत कृष्णद्वैपायन हा अठ्ठाविसावा व्यास झाला आहे. पराशर ऋषीपासून सत्यवतीचे पोटी व्यासाचा जन्म झाला. जन्म होताच मातेची आज्ञा घेऊन ते तपश्चर्येला अरण्यात निघून गेले तपश्चर्येने दिव्यज्ञान-संपन्न व सामर्थ्य-सपन्न होऊन आल्यानतर त्यानी प्राप्त कलियुगात पुरुष मंदबुद्धीचे आहेत असे जाणून एका वेदवृक्षाच्या चार शाखा करून त्या आपल्या चार शिष्यास शिकवल्या. नंतर अठरा पुराणे, स्मृती, सूत्रे इत्यादी रचना केली. महाभारता-सारखा सव्वालक्ष पद्यात्मक अलौकिक ग्रंथ रचला.

व्यासमहर्षी हे भगवदवतार आहेत, असे श्रीकृष्णच उद्धवास सागतात.

वेदविभागी राजहस । जो का द्वैपायन व्यास ।
तो मी म्हणे हृषीकेश । निवडुनि द्विजास दिधले वेद ।।

ना. भा. १६. २२४,

व्यासाना वेदव्यास ही पदवी कशी प्राप्त झाली याविषयी श्रीकृष्ण सागतात–

हयग्रीव वेदमूर्ती । तेथे श्रीव्यासे करोनि भक्ति ।
वेदव्यास पदप्राप्ती । हे केली ख्याती तिही लोकी ।।

ना भा. १६–२४८

श्रीनारदमहर्षीनीच व्यासाना भागवताचा उपदेश केला होता, हे प्रथम सागितलेच आहे तोच भगवताचा उपदेश व्यासानी आपला ज्ञानी पुत्र जो शुक त्याला केला.

नारदानी व्यासाना भक्तिमार्गाचा उपदेश केल्यामुळे एका दृष्टीने व्यास हे नारदाचे शिष्यच होत असे असताही भक्तिलक्षणाचा विचार करताना व्यासाचे मत प्रथम सागितले आहे व्यासाच्या श्रेष्ठत्वाची नारदाना पूर्ण कल्पना होती हेच याचे कारण असावे. भक्तीमध्ये भज्य, भजक व भजन (सेवा) अशी त्रिपुटी मानली जाते भक्ती करणारा भक्त आपल्या भावनेप्रमाणे भज्य, सेव्य जो असेल त्याच्या अधिकाधिक सेवेचा लाभ कसा मिळेल हे पाहून सेवेची पद्धती स्वीकारीत असतो. या दृष्टीने व्यासाना सेवेमध्ये पूजापद्धती श्रेष्ठ वाटली कारण त्या सेवेत कर्मेंद्रिये, ज्ञानेंद्रिये, मनबुद्धि, चित्तप्राणादि सर्वांचा समावेश होत असतो सर्वांगाने सेवा घडते एकादशस्कधाच्या सत्ताविसाव्या अध्यायात उद्धवाने श्रीकृष्णास पूजा-मार्ग सागण्याबद्दल प्रश्न केला आहे त्यात या मार्गाचे प्रवर्तक कोणकोण होऊन गेले त्याचाही त्याने निर्देश करून त्यानीही हा पूजामार्ग सागितला असे म्हटले आहे.

**जो व्यास सत्यवती सुत । जो का नारायण मूर्तिमंत ।**
**जेणें प्रगट केला वेदार्थ । जो विख्यात महाकवि ॥२०॥**
**पुराण कविकर्ता तो सांग । यालागीं व्यासोच्छिष्टमिदं जग ॥**
**तेणें ही भगवत्पूजा मार्ग । हा क्रिया योग बोलिजे ॥२१॥**

या पूजेचे विविध प्रकार व्यासकृत पुराणादिकातून प्रतिपादिले आहेत.

भक्तिरसामृत सिंधुनामक चैतन्यसप्रदायाचे श्रीरूपगोस्वामी याच्या भक्ति-शास्त्रावरील,महत्त्वपूर्ण ग्रंथामध्ये भक्तीचे एकांगा व अनेकागा असे दोन भेद दाखविले आहेत. पधराव्या सूत्रावरील विवेचनात नवविधाभक्ती कोणी कोणी केली हे एका श्लोकाच्याद्वारे दाखविले आहे. तो प्रकार एकाङ्गभक्तीविषयक होय म्हणजे कोणी कोणी केवल श्रवण, केवल कीर्तन, केवल स्मरण इत्यादी एका क्रियेला प्राधान्य देऊन भक्ती करतात. पण पूजा (अर्चन) भक्ती ही अनेकागा आहे. म्हणजे वर लिहिल्या-प्रमाणे सर्व अंतर्बाह्य साधनाचा उपयोग तिच्यात होतो म्हणून तिला अनेकांगा म्हटले आहे. पूजा, अर्चन यांचे लक्षण भक्तिरसामृतसिधूमध्ये सागितले आहे

**शुद्धिन्यासादि पूर्वाङ्गकर्मनिर्वाहपूर्वकम् ।**
**अर्चनं तूपचाराणां स्यान्मंत्रेणोपपादनम् ॥** २-२७.

'देहशुद्धी, षडंगादिन्यासपूर्वक मंत्रोच्चारद्वारा सर्व उपचाराचे समर्पण म्हणजे अर्चन होय.'

श्रीहरी कोणाची पूजा घेत नाही याविषयी भागवतामध्ये नारदप्रचेतस् सवादात नारदानीच सागितले आहे :

**न भजति कुमनीषिणां सइज्यां हरिरधनात्मधनः प्रियोरसज्ञः ।**
**श्रुतधन कुलकर्मणां मदैर्ये विदधति पापमकिंचनेषु सत्सु ।**

– भागवत, ४–३१–२१.

'भगवान तर आपल्याला सर्वस्व मानणाऱ्या निर्धन पुरुषावरच प्रेम करतो, कारण तो परम रसज्ञ आहे. त्या अकिचन पण अनन्याश्रय भक्तांच्या अहैतुकी भक्तीमध्ये किती माधुर्य असते हे तो प्रभू चागल्या प्रकारे जाणतो जे लोक आपल्या शास्त्र, ज्ञान, धन, कुल व कर्माच्या मदाने उन्मत्त होऊन उपर्युक्त लक्षणाने युक्त संताचा तिरस्कार करतात अशा दुर्बुद्धी पुरुषाची पूजा भगवान स्वीकारीत नाही.'

शुद्ध पवित्र अत.करणाने, परम श्रद्धेने पूजाविधीचे पूर्ण ज्ञान सपादन करून यथाशक्ती यथामिलित उपचाराने पूजा केली पाहिजे. तत्रग्रथ पुराणग्रंथातून पूजा-विधी अनेक प्रकारचा सागितला आहे.

शाडिल्य भक्तिसूत्रावरील स्वप्नेश्वर भाष्यात एकोणसत्तराव्या सूत्रावरील टीकेत देवाच्या पूजेत बत्तीस अपराध वर्ज्य करावेत असे वराह पुराणातील एक वचन उद्धृत करून सागितले आहे.

देवपूजापराधास्ते द्वात्रिंशत्परिकीर्तिता. ।।

—वराहपुराण, अ. १२४–२५.

तसेच या अपराधातून मुक्त होण्याकरिता प्रायश्चित्ते सांगितली आहेत. पण ंतःकरणात खरी भावना जर असेल तर कोणताही अपराध झाला तरी श्रीभगवान यातून मुक्त करतो. तसेच पूजेच्या उपचाराच्या बाबतीतही आहे. तत्रग्रंथातून वतेच्या उपचाराचे कोठे चौसष्ट प्रकार सागितले आहेत.तर कोठे कोठे अठरा, कोठे ोळा. कोठे पाचच सागितले आहेत. पूजक ज्या अधिकाराचा असेल, त्याला जे जे ंपादन करता येतील ते ते संपादन करून पूजाविधी पूर्ण केला पाहिजे पंचोपचार : ंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य हे आहेत. षोडशोपचार पाद्य, अर्घ्य, आचमनीय नानीय, वस्त्र, आभूषण, गध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, ताबूल, पुनः आचमनीय, तोत्रपाठ, तर्पण, वदन इत्यादी आहेत. प्रत्येक उपचार समर्पणाचे मत्रही आहेत. ़जाविधी सागणाऱ्या ग्रंथातून ते सर्व प्रसिद्ध आहेत.

या अर्चनभक्तीचा विशेष विचार श्रीमद्‌भागवताच्या एकादशस्कंधातील त्ताविसाव्या अध्यायात श्रीकृष्ण-उद्धव सवादात व्यासानी केला आहे. भक्तवर्य द्धवाने श्रीकृष्णास तुझी आराधना (पूजा) ज्या कर्माच्या आचरणाने होते तो क्रयायोग मला सविस्तर साग अशी प्रार्थना केली. तेव्हा श्रीकृष्णाने वैदिक, तात्रिक ा मिश्र असा त्रिविध यज्ञ आहे असे म्हटले आहे. यज्ञ शब्दातील 'यज्' धातू हा यज पूजाया' पूजा या अर्थाचा आहे. हा पूजामार्ग तीन प्रकारचा सागून त्या ़जेची अनेक स्थाने सागितली आहेत. प्रतिमा, यज्ञकुंड, अग्नी, सूर्य, जल, हृदय, ाह्मण व गुरु अशी आठ स्थाने सागितली आहेत. तसेच प्रतिमाही शिलाप्रतिमा, ाष्ठाची, लोहादी धातूची, मृत्तिकेची, चित्राची, वालुकेची, मनाने हृदयात साठ- वलेली व रत्नाची अशा आठ प्रकारच्या सागितल्या आहेत. पूजाविधीच्या आरभी ारीरशुद्धी कशी करावी तेही स्पष्ट केले आहे यानंतर पूजेचे उपचारही सर्व ागितले आहेत सर्व गोष्टीचा विस्ताराने विचार केला आहे. तेथे श्रीकृष्ण स्पष्ट हणतात, भक्ताने पूजेच्या निमित्ताने प्रेमाने केवळ पाणी जरी मला समर्पण केले री ते पुष्कळ आहे. पण अभक्ताने अनेक उपचाराने जरी माझी पूजा केली तरी ो व्यर्थ आहे, ती माझ्या संतोषाला कारण होत नाही. या दृष्टीने एकादशस्कंधाचा ा सत्ताविसावा अध्याय फार महत्त्वाचा आहे. विशेष माहितीकरिता तो मुळातून ाहावा.

तसेच याच एकादशस्कंधाच्या तिसऱ्या अध्यायात जनक-नवयोगेश्वर ंवादातही हा पूजाविचार आला आहे. तेथे पूजकाने आपल्या गुरूपासून पूजाविधी मजावून घ्यावा, श्रीगुरू-अनुग्रहपूर्वक त्यांनी सांगितल्याप्रमाणे पूजा करावी म्हणजे ो सफल होते असे म्हटले आहे. तसेच हा पूजाविधी करीत असता ज्याची पूजा

करीत आहो तो सर्वभूतातर्यामी आहे अशी भावना ठेवली पाहिजे अशी भावना न ठेवता जी पूजा केली जाईल ती मला पोहोचत नाही असे भागवताच्या तृतीय स्कधात स्पष्ट सागितले आहे ' जो सर्व भूतातर्यामी अशा मला जाणत नाही, व भेददृष्टी ठेवून मूढपणाने माझी पूजा करतो, ती त्याची पूजा म्हणजे राखेत हवन केल्याप्रमाणे व्यर्थ होय, त्याचे ते कृत्य म्हणजे पूजा नसून ते विडंबन होय, असे स्पष्ट म्हटले आहे ' (भागवत स्कध ३–२९–२१) पूजाविधीचा विचार फार विस्तृत आहे व अनेक ग्रंथातून तो सागितला आहे, तसेच साप्रदायभेदाने त्यात काही वेगळेपणाही दिसून येतो तात्पर्य, पूजाअर्चन हे भक्तियोगाचे प्रधान अग आहे भक्तिमार्गीय सर्वच पंथात पूजापद्धतीचा अगीकार केला आहे. सर्वागाने होणारी ती भक्ती आहे.

अनेक भाविक श्रद्धावान म्हणविणारे आपआपल्या इष्ट देवतेची पूजा करीत असतात पण ते विशिष्ट कामना ठेवून करीत असतात

लौकिक कामना चित्तात धरून केलेली पूजा ही भक्तीत समाविष्ट होत नाही कारण यात पूज्यावर खरे प्रेम नसते म्हणून ' पूजादिष्वनुराग ' असे 'अनुराग' पद सूत्रात घातले आहे कारण परमप्रेम म्हणजेच भक्ती हे मागे सागितलेच आहे. त्यावरून भक्तीविषयक कोणतीही क्रिया झाली तरी तिच्यात परमप्रेम अनुराग असणे अवश्यच आहे. अनुरागाविना पूजा करण्यात काही उपयोग नाही कारण श्रीकृष्ण भगवान म्हणतात–

अर्जुना माझा ठायी । आपणपेनवीण सोरसु नाही ।
मी उपचारी कवणाही । नाकळे गा ।। ३६७ ।।
म्हणोनि मद्याजी जे जहाले । ते माझिया सायुज्या आले ।
जिही उपचारमिषे दिधले । आपणपे मज ।। –ज्ञानेश्वरी, ९ ३६६

अर्चनभक्तीत पत्र-पुष्प-फळादी उपचार हा केवळ निमित्तमात्र आहे, त्याच्या आत भक्ती पाहिजे. श्रीकृष्णच सागतात–

**येर पत्र पुष्पफळ । हें भजावया मिस केवळ ।**
**वांचूनि आमुचा लाग निष्कळ । भक्तितत्त्व ।।**

– ज्ञा. ९-२६-३९५.

अनुरागाविना भगवद्विषयक पूजा इत्यादी क्रिया होतील तर त्यात रस निर्माण होणार नाही. रोज तोच पूजा करणारा, तोच देव, तेच मंत्र, तीच पूजाक्रिया होत राहील तर ती क्रिया यंत्रवत् होईल. मन एकीकडे व नित्य क्रियेची सवय किंवा नियम म्हणून पूजा एकीकडे होत राहील. पण खऱ्या भक्तीत तिचा प्रवेश होणार नाही. तुकाराममहाराज म्हणतात–

**देवापायी नाही भाव । भक्ती वरीवरी वाव ।**
**समर्पिला जीव । नाही तो हा व्यभिचार ।।**

भागवत एकादशस्कध दुसऱ्या अध्यायात जनक-नवयोगेश्वर संवादात स्पष्ट सागितले आहे .

**प्रेमेवीण श्रुतिस्मृतिज्ञान । प्रेमेवीण ध्यानपूजन ।**
**प्रेमेवीण श्रवणकीर्तन । वृथा जाण नृपनाथा ।।**

– एकनाथी भागवत, २.३३३

अनुराग म्हणजे जो रागाच्या पश्चात होतो तो असाही अर्थ केला जातो. रागाचे लक्षण योगसूत्रात ' सुखानुशायी राग. ' असे आहे जेथे सुख वाटेल तेथे राग, आसक्ती, प्रेम होते. वास्तविक खरा रागी भगवान आहे, तो जीवावर सतत प्रेमवर्षाव करीत असतो. जीव जरी त्याला विसरत असले तरी तो जीवाला कधीच विसरत नाही. जीवाला सत्ता-प्रकाश-आनद देणारा तो आहे म्हणूनच आपण जीवनात आनंद भोगत असतो, असे जाणून केवळ त्या भगवंतावर जे प्रेम केले जाते त्यास अनुराग म्हणावा जेथे अनुराग असतो तेथे चित्ताची सहजप्रवृत्ती होते, आवड असते. स्नेह, प्रणय, प्रेम ही एका भावाचीच नावे आहेत. तरी एका उसाच्या रसापासून गूळ, राब, साखर, खडीसाखर बनने, याप्रमाणे त्यात थोडे तारतम्य आहे. पूजेमध्ये नित्यनवीन रस, नवीन उत्साह, नवीन सतत ओढ राहील तर तो अनुराग म्हटला जाईल त्यात कंटाळा न आला पाहिजे

यदाकदाचित पूजासाहित्य उपलब्ध न होईल, काही प्रतिबंध येईल, पण अंत:करणात जर पूजाविषयक अनुराग असेल तर मनाने ही सर्व पूजा करता येते व ती देवाला फार गोड लागते, ' मनोमय पूजा । हेचि पढिये केशवराजा ।।' असे तुकाराममहाराज म्हणतात व ' करावी ते पूजा मनेचि उत्तम ।' असा आदेशही देतात. एका भक्ताची मानसपूजेमध्ये किती तन्मयता झाली होती याची कथा ब्रह्मवैवर्त पुराणात आली आहे.

प्रतिष्ठानपूर नामक गावात एक ब्राह्मण राहत होता, तो दारिद्र्याने पीडित झाला असताही आपल्या अदृष्टाप्रमाणेच सर्व होते असे समजून समाधानाने राहात असे. केवळ आपण दरिद्री असल्याने भगवत्सेवा आपल्याकडून योग्यप्रकारे होत नाही याचा त्याला सतत खेद होत असे. एके दिवशी एका विद्वान अशा ब्राह्मणाचे घरी त्याने वैष्णवधर्माचे श्रवण केले व ते धर्म मनाने आचरले तरी फलद्रूप होतात, असे ऐकून त्याने तसे मनानेच ह्या भागवतधर्माचे निष्ठेने आचरण करण्याचे ठरविले. नित्य गोदावरीचे स्नान व नित्यक्रम आटोपून एकान्तात शांतचित्ताने तो श्रीमहाविष्णूची मानसिक पूजा करीत असे. मनानेच पूजा करावयाची असल्याने तो त्यात कोणतीही उपचाराची न्यूनता ठेवीत नसे. मनाने श्रीविष्णुमूर्तीची एका

सुंदर सुवर्णमंदिरात रत्नजडित सिंहासनावर स्थापना करून त्या मूर्तीस सुवर्णघटानी गंगादी सर्व तिर्थांच्या जलांनी अभिषेक करीत असे. अनेकानेक पूजाद्रव्यादिकांच्या-द्वारा राजोपचाराप्रमाणे तो अर्चनसेवा करी. त्या आनंदात किती वेळ गेला हेही त्याला कळत नसे. असा नित्य पूजाविधी त्याचा चालू असता एके दिवशी त्या श्रीहरीच्या नैवेद्याकरिता मनानेच गोदुग्धाची उत्तम खीर, त्यात साखर, वेलदोडे, केशर इत्यादी द्रव्ये घालून आटवून तयार केली. त्या खिरीचा सुवर्णपात्रातून नैवेद्य समर्पण करीत असता त्याला ती फार उष्ण वाटली, म्हणून त्याने आपल्या उजव्या हाताची दोन बोटे सहज त्या पात्रात घालून पाहिली असता ती इतकी उष्ण लागली की त्याची दोन्ही बोटे भयंकर भाजली. त्याला त्याचे फार वाईट वाटले. इतकी उष्ण खीर मी देवाला नैवेद्यात खाऊ घातली, ती त्याला किती पोळली असेल, त्याला किती त्रास झाला असेल असे वाटून तो दुःख करू लागला. त्याचा परिणाम असा झाला की, तो ब्राह्मण त्या भावसमाधीतून बाहेर आला व पाहतो तो बाहेरून त्याची दोन बोटे भाजलेली दिसून आली. हे पाहून वैकुंठात लक्ष्मीसह बसलेले श्रीमहाविष्णू तेथेच हसले. श्रीलक्ष्मीदेवींनी त्यांना विचारले की, महाराज! आपल्या अकस्मात हसण्याचे कारण काय ? तेव्हा त्या भावनातिरेकाने ब्राह्मणाची केलेली अर्चनभक्ती दाखविण्याकरिता महाविष्णूंनी विमान पाठवून त्यास वैकुंठास नेले व त्याची अवस्था दाखवली. नंतर आपल्याजवळ त्यास अखंड स्थान दिले अशी अनुरागपूर्वक पूजा केवळ मनानेही होऊ शकते. सूत्रात 'पूजादिषु' असे म्हणून आदिपदाने स्तोत्र, जप, ध्यान याचाही पूजाविधीतच अंतर्भाव केला आहे.

अलौकिक प्रतिभासंपन्न प्रज्ञाचक्षु थोर संत श्री गुलाबराव महाराज आपल्या 'नारदभक्तिसूत्रभाष्यम्' या संस्कृत भाष्यात या सूत्रावरील विवेचनात म्हणतात, 'पूजाभक्तीचा यद्यपि गौणी भक्तीत समावेश होतो तरी सूत्रात अनुराग पद असल्यामुळे येथे पराभक्तीतच ती समाविष्ट केली पाहिजे. कारण अनुराग हा प्रेमस्वरूप आहे. गौणी भक्तीमध्ये पूजादिकात पूजकाची श्रद्धा, प्रेम असतेच पण ते फलावसायी असते.' या विषयावर आणखी एक शंका त्यांनी घेतली आहे. तिचा आशय असा की, 'पूजादिकांत अनुरागच संभवत नाही, पुष्पादीजडसामग्रीअधिकृत पूजा ही एक बाह्य प्रवृत्ती आहे.' यावर ते उत्तर देतात की, 'असे नाही. ज्याप्रमाणे आनंदरूप अशी भगवन्मूर्ती ध्यानादिरूप अंतःकरणातील सात्त्विक गुणांनी अलंकृत होते तशीच बाहेरही उपलब्ध असणारी भगवन्मूर्ती ही भक्तदृष्टीने चिन्मात्रस्वरूप असून प्रेमाने संपादन केलेल्या सात्त्विक उपचारानी अलंकृत होते. ह्या अलंकरणासच पूजा म्हणतात. तिच्या ठिकाणी जो अनुराग तो बाह्य जडानुरागाप्रमाणे नाही. तसेच 'पूजादिषु' येथील 'आदि' पदाने पूजाभक्त्यनुकूल व्रत, उत्सव इत्यादिकांचे ग्रहण करावे. महाभारत व अन्यपुराणादिकांतून तापनीय श्रुत्यनुसार व्यासांनी भक्तिप्रेमपोषक

असे अनेक व्रत-उत्सव सांगितले आहेत. श्रीमद्भागवत एकादशस्कंधामध्ये अकराव्या अध्यायात उद्धवास भक्तियोगाचा विचार श्रीकृष्णानी चार श्लोकातून सांगितला आहे.

मज्जन्मकर्मकथनं मम पर्वानुमोदनम् ।
गीतताण्डववादित्रगोष्ठीभिर्मद्गृहोत्सवः ।। ३६ ।।
यात्रा बलिविधानंच सर्ववार्षिकपर्वसु ।।
वैदिकी तांत्रिकी दीक्षा मदीयव्रतधारणम् ।। ३७ ।।
ममार्चास्थापने श्रद्धा स्वतः सहृत्य चोद्यमः ।।
उद्यानोपवनाक्रीडपुरमंदिरकर्मणि ।। ३८ ।।
संमार्जनोपलेपाभ्यां सेकमंडलंवर्तनै : ।
गृहशुश्रूषणं मह्यं दासवद्यदमायया ।। ३९ ।।

भगवान श्रीकृष्ण उद्धवास सांगतात, माझ्या जन्माच्या त्याचप्रमाणे माझ्या लीलांच्या कथा सांगणे, माझे जयन्त्यादी उत्सव करणाऱ्यांत आनंदाने सर्व प्रकारे भाग घेणे, गायन, नर्तन, वादन व कथा यांच्या साह्याने माझ्या मंदिरात उत्सव करणे, सर्व वार्षिक पर्वकालामध्ये तीर्थयात्रा करणे, मला तुळसी, फुले, नैवेद्य अर्पण करणे, वेदविहित व तंत्रोक्त दीक्षा घेऊन त्यात सांगितल्याप्रमाणे मत्प्रीत्यर्थ नाना प्रकारच्या व्रतांचे अनुष्ठान करणे, माझी मूर्तिस्थापना करण्याविषयी पूर्ण श्रद्धा ठेवणे, सामर्थ्य असल्यास स्वत. नाहीतर अनेक भक्तांनी मिळून फुलांची बाग, फळझाडाचा मळा, क्रीडास्थान, नगरात एखादे सुंदर मंदिर निर्माण करण्याविषयी उद्योग करणे, केर काढणे, सडा घालणे, सारवणे, चित्रविचित्र रांगोळ्या काढणे इत्यादिकाच्या योगे एखाद्या दासाप्रमाणे निष्कपटपणे माझ्या मंदिराची सेवा करणे, इत्यादी वर सांगितलेल्या गोष्टी सर्व पूजाभक्तीची अंगेच असल्यामुळे व श्रीव्यास महर्षींनीही ती अंगीकारली असल्याने ' आदि ' शब्दाने वरील गोष्टींचे ग्रहण करावे.

यानंतर श्रीगर्गमहामुनीचे भक्तिलक्षण या पुढील सूत्रात सांगत आहेत.

## सूत्र १७

## कथादिष्विति गर्गः ।। १७ ।।

**अर्थ** :

भगवत्कथाआदिकांमध्ये अनुराग ठेवणे (हीच भक्ती होय,) असे गर्गाचार्य मानतात.

**विवरण** :

व्यासाचे मत सागितल्यावर नारद गर्गाचार्यांचे मत सागतात. गर्गाचार्य हे यादवाचे पुरोहित होते, असे श्रीमद्भागवत दशम स्कध अध्याय आठमध्ये म्हटले आहे. ते महातपस्वी व मोठे ज्योतिषशास्त्रज्ञ होते, असेही तेथे वर्णन आहे. देवीभागवतामध्ये याच्या नावावर एक कथा आहे. देवकीला मुले झाल्याबरोबर त्याना मारण्याचा कसाने सपाटा चालविला, तेव्हा वसुदेवाने याना पुत्र दीर्घायू होण्याचा उपाय विचारला, म्हणून यानी देवीभागवत श्रवण करण्याचा उपाय सागितला. पण ते तुरुंगात शक्य नव्हते म्हणून गर्गमुनीनी स्वत देवीभागवताचा पाठ केला. त्यामुळे देवीने लवकरच कृष्णावतार होईल, असा वर दिला. (दे. भा. १।२) वसुदेवाने याना मथुरेत सागितले की, गोकुळात नंदाच्या येथे जो पुत्र जन्मला आहे, तो वास्तविक माझाच आहे. मीच कसभयाने त्यास तेथे नेऊन ठेविले आहे. पुत्रोत्पत्तीनतर जातकर्मादी संस्कार अवश्य आहे आपण आम्हा यादवांचे कुलोपाध्याय आहा तेव्हा आपण तेथे जाऊन त्याचा नामकरण सस्कार करावा. त्याप्रमाणे गर्गाचार्य गोकुळात गेले व त्यानी नंदगृही प्रवेश करून बलराम आणि श्रीकृष्ण याचा नामकरण विधी केला व श्रीकृष्णाचे भविष्यकथनही केले. ही कथा भागवत दशमस्कंधाच्या आठव्या अध्यायात आहे गर्गसंहितानामक बारा हजार श्लोकाचा श्रीकृष्णचरित्रपर ग्रंथ उपलब्ध आहे, तो याचाच आहे, असे मानले जाते. त्यात इतर पुराणात उपलब्ध न होणाऱ्या अशा कृष्णचरित्रातील बऱ्याच कथा उपलब्ध होतात. यावरून हे मोठे कृष्णभक्त असावेत, असे म्हणावयास हरकत नाही.

ज्योतिष्यात यांची प्रसिद्धी बरीच दिसून येते पंचागातून गर्गाचार्यांचा मुहूर्त प्रमाण मानला जातो. ज्योतिषावर याची एक संहिता आहे. तसेच काही धर्मशास्त्रग्रंथातून गर्गस्मृतीचे उतारे सापडतात [1] मात्र गर्ग अनेक झाले असावेत असे दिसून येते ज्या अर्थी नारदमहर्षींसारख्यानी त्यांच्या मताचा अनुवाद केला आहे, त्या अर्थी भगवद्भक्तिविषयक त्याचा अधिकार थोर असला पाहिजे, असे म्हणावयास हरकत नाही

व्यासमहर्षींच्या मतात पूजादिकाविषयी अनुराग म्हणजे भक्ती तर गर्गाचार्य यांच्या मते श्रीभगवत्कथादिकात अनुराग म्हणजे भक्ती असे मानले जाते. पूजादिकांमध्ये उपचाराकरिता फार खटाटोप करावा लागतो जर तो उपचार प्राप्त न झाला तर पूजेत वैगुण्य निर्माण होते. भगवान श्रीकृष्णांच्या चरित्रात एक कथा

---

१ मयूरचित्रक नावाचा एक ग्रंथ तसेच जलविद्या आणि वास्तुशास्त्र या विषयावरही गर्गांच्या नावावर ग्रंथ आहेत पण ते अन्य कुणी गर्ग असावेत असे मानले जाते.

आहे. भगवान श्रीकृष्ण श्रीशंकराची आराधना नित्य सहस्रकमलांनी करीत होते. पण शेवटच्या दिवशी एक कमळ कमी पडले, त्यामुळे पूजेत न्यून्यता निर्माण झाली. तेव्हा ती न्यूनता दूर करण्यासाठी श्रीकृष्णानी आपले नेत्रकमल समर्पण केले ! असा पूजाविधी कठिण आहे. तसेच पूजेस योग्य स्थलकालादिकाची आवश्यकता असते. तशी कथाकीर्तनश्रवणभक्तीकरिता अन्य साधनाची अपेक्षा असतेच असे नाही. वीणा, मृदग, तालादी वाद्ये उपलब्ध झाली तरी ठीक, नसता काही अडत नाही· तसेच कलियुगामध्ये अन्य साधनापेक्षा कीर्तनभक्तीलाच श्रेष्ठत्व दिले आहे. नवयोगेश्वर जनक सवादात सागितले आहे–

कलिं सभाजयन्त्यार्या. गुणज्ञा. सारभागिन. ।
यत्र संकीर्तनेनैव सर्व स्वार्थोऽभिलभ्यते ।। भा ११–५–३६

'गुणज्ञ सारभूत वस्तूचा अंगीकार करणारे श्रेष्ठ पुरुष कलियुगाचा आदर करतात, कारण या युगात केवळ भगवत्कथा संकीर्तनानेच सर्व प्रकारचे इष्ट पुरुषार्थ प्राप्त होतात '

या श्लोकावरील टीकेत श्रीएकनाथमहाराज सांगतात–

ऐक राया सर्वज्ञा । धन्य धन्य कलियुग जाणा ।
जेथ सर्व स्वार्थ हरिकीर्तना । नामस्मरणासाठी होती ।।४०३।।
कलियुगी दोष बहुत । केवी कीर्तनें होय स्वार्थ ।
तेथे दोषत्यागें जे गुण घेत । ते नित्यमुक्त हरिकीर्तनी ।।
–।।४०४।। अ. ५

पण खरा कथारसिक भक्त विशिष्ट हेतूने कथाकीर्तन करीत नाही. कथेपासून सर्व अभीष्ट प्राप्त होऊ शकेल. पण तेथे 'अनुराग' शब्द आहे कथेत रंगलेला भक्त तन्मय होत असतो, तो कोणत्याही फळाची अपेक्षा ठेवीत नाही.

भक्तिशास्त्रामध्ये भगवत्कथा प्रेमाने गाणे, प्रेमाने श्रवण करणे या क्रियेला फार महत्त्वाचे स्थान आहे. श्रीमद्भागवताच्या प्रथमस्कंधात नारद–व्यास संवादात प्रत्यक्ष नारदमहर्षीच कीर्तनभक्तीचे श्रेष्ठत्व वर्णन करीत आहेत.

इद हि पुसस्तपसः श्रुतस्य वा स्विष्टस्य सूक्तस्यच बुद्धिदत्तयो ।
अविच्युतोऽर्थ कविभिर्निरूपितो यदुत्तमश्लोकगुणानुवर्णनम् ।।
भागवत –१–५–२२

'विद्वानांनी विचार करून हेच निरूपण केले आहे की, भगवद्गुणानुवादकीर्तन हे तप, वेदाध्ययन, योग्यप्रकारे केलेले यज्ञ, मंत्र, ज्ञान व दानादिकाचे अविनाशी फल आहे, म्हणजे वरील सर्व साधनांपेक्षा कथा–कीर्तन भक्तीचे श्रेष्ठत्व सिद्ध होते.

कथेचे स्वरूप कसे असावे, कथा–कीर्तनांमध्ये किती गोष्टींचा समावेश होतो याचे श्रीएकनाथमहाराज स्वरूप सागतात :

हरिचरित्रे अगाध । ज्ञानमुद्रापदबंध ।
कीर्तनी गातां विशद । परमानंद वोसंडे ।।
वानिती अजन्मयाची जन्मे । वानिती अकर्मयाची कर्मे ।
स्मरतीं अनामियाची नामें । अति मप्रेमे डुल्लत ।।
साधावया निजकाज । साडूनि लौकिकाचें काज ।
कीर्तनी नाचती भोज । अतिनिर्लज्ज निःशंक ।।

भगवंताचे स्वरूपभूत असणारे यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्यादी षड्गुणांचे कीर्तन, तसेच भगवताच्या अलौकिक लीलाविशिष्ट अवताराची चरित्रे गायन करणे, त्याचा जन्म, कर्म, रूप इत्यादिकाचे वर्णन करणे, अशा सर्वच गोष्टीचा कथा शब्दात समावेश होतो.

**हरिनामगुणकीर्तनकीर्ति । अखंड आवडे जागृति ।**
**स्वप्नीं होतेचि स्थिती । दृढ हरिभक्तीं ठसावें ।।**
**ऐसियापरी भक्तियुक्त । दृढतर जाहले ज्याचे व्रत ।**
**तंवतंव होय आर्द्रचित्त । प्रेम अद्भुतहारिनामकीर्ती**

एकनाथी भागवत. २.५५७–५८

मागील सूत्रात व्यासाची पूजाभक्ती सांगितली. पण त्याच व्यामांनी–

**यज्ञैः संकीर्तनंप्रायैयजन्ति हि सुमेधसः ।। भाग. ११–५–३२.**

'शुद्ध बुद्धीचे लोक कथासकीर्तनरूप यज्ञानीच यजन (पूजा) करतात. म्हणजे नामसंकीर्तन ही एक मोठी पूजाच आहे, असे म्हटले आहे. या श्लोकावरील टीकेत श्रीएकनाथमहाराज सागतात–

**मधुपर्कादिकविधान । खड्ग केलें जें पूजन ।**
**तेंही मानोनिया गौण । आवडे कीर्तन कलीयुगीं कृष्णा ।।**
**नवल कैसें राजाधिराजा । कीर्तन तेंचि महापूजा ।**
**ऐशी आवडी अधोक्षजा । कीर्तनें गरुडध्वजा उल्हासुसदा ।।**
कीर्तनी हरीची आवडी कैशी । वत्सालागी धेनू जैसी ।
कां न विसंबे जैसी माशी । मोहळासीं क्षणार्ध ।।
यालागी हरिकीर्तनी गोडी । जयासी लागली धडफुडी ।
त्यासीं नाना साधनाच्या वोढी । सोसावया सांकडीं कारण नाहीं ।।
ज्यासी कीर्तनी कथाकथनी। चौगुण आल्हाद उपजे मनी ।
तो उद्धरला सर्व साधनी । पवित्र अवनी त्याचेनि ।।

ए. भा. ५.३४५–५७

भागवतादी पुराणग्रंथांतून तसेच संतांच्या वाङ्मयातून अशी आणखीही पुष्कळ प्रमाणे सापडतात. कोणतेही साधन श्रीहरीच्या संतोषाकरिता किंवा स्वतःच्या चित्तशुद्धीकरताच करावयाचे असते. ते फल हरिकथेच्या ठिकाणी ज्याचे खरे प्रेम आहे, त्याला अनायासेच प्राप्त होते.

कथा म्हणजे काय व कथेचा विषय कोणता असावा, याबद्दल संतश्रेष्ठ श्रीएकनाथ महाराजाचा एक अभंग प्रसिद्ध आहे.

सगुणचरित्रे परमपवित्रें सादर वर्णावीं ।
सज्जनवृंदे मनोभावें आधी वंदावीं ॥ १ ॥
संतसंगें अंतररंगें नाम बोलावें ।
कीर्तनरंगी देवासन्निध सुखें डोलावें ॥ २ ॥
भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या ।
प्रेमभरें वैराग्याच्या युक्ति विवराव्या ॥ ३ ॥
जेणेंकरूनि मूर्ति ठसावें अंतरी श्रीहरीची ।
ऐशी कीर्तनमर्यादा आहे संतांच्या घरची ॥ ४ ॥
अद्वयभजनें अखंड स्मरणें वाजवी करताळी ।
एका जनार्दनी मुक्त होय तत्काळी ॥ ५ ॥

भक्तवर्य श्रीतुकाराममहाराज हे कथेविषयी अतिशय अनुराग ठेवणारे होते, ते देवाजवळ स्पष्ट म्हणतात–

सांडुनि कीर्तन न करी आणिक काज ।
नाचेन निर्लज्ज तुझ्या रंगी ॥ १ ॥

ते हरिकथेच्या आनंदाला ब्रह्मानंद, ब्रह्मरस म्हणतात.

सोपे वर्म आम्हा सांगितले संती ।
टाळ दिंडी हाती घेऊनि नाचा ॥ १ ॥
समाधीचे सुख साडा ओवाळून । ऐसा हा कीर्तनी ब्रह्मरस ॥ २ ॥

कथेचे स्वरूप, कथेचे फल, कथेची मर्यादा, देवाला कथा किती आवडते, कथेत कसा रस निर्माण होतो, या सर्वच विषयाचा त्याच्या अभंगात विचार सापडतो कथेचे एवढे महत्त्व का ? तर कथा ही भगवंताला अतिशय आवडणारी भक्ती आहे. भगवान श्रीकृष्ण भक्तवर्य उद्धवास सागतात,

आळस दवडूनि दुरी । अभिमान घालूनिया बाहेरी ।
अहर्निशी कीर्तन करी । गर्व न धरी जाणिवेचा ॥ ७३८ ॥
गाणीव जाणीव शहाणीव । वोवाळुनि सांडावे सर्व ।
सप्रेम सावडी कथा गौरव । सुख अभिनव तेणें मज ॥ ७३९ ॥

मूळ सूत्रात 'कथादिष्वनुराग' असे म्हटले आहे. येथे कथा आदी शब्दाने

कथा म्हणजे भगवद्गुण, लीला, माहात्म्य हे सर्व प्रेमाने गीत, वाद्य व प्रेमी भक्तां-सह गाणे असा अर्थ होतो. आदी शब्दाने कथाश्रवण हा अर्थ घेणे योग्य होईल. कारण श्रीमद्भागवतादी भक्तिशास्त्रावरील ग्रंथातून भगवत्कथा गायनाचे जेवढे माहात्म्य सांगितले आहे तेवढेच चरित्रगुण लीलाश्रवणाचेही सांगितले आहे

स्वर्गस्थ इंद्रादिक देव भगवंताची स्तुती करताना म्हणतात.

शुद्धिर्नृणा नतु तथेड्य दुराशयाना विद्याश्रुताध्ययनदानतप क्रियाभिः ।
सत्त्वात्मनामृषम ते यशति प्रवृद्धसच्छ्रद्धया श्रवणसभृतया यथा स्यात ।।

—भागवत ११–६ ९

'देव म्हणतात, हे पुरुषोत्तमा, वारंवार तुझ्या लीलांचे श्रवण करून तुझ्या सत्त्वप्रधान भक्तीच्या योगाने भक्ताना जसे समाधान प्राप्त होते, तसे समाधान व मानसिक शुद्धी विषयवासनेने ज्याची अंतःकरणे दूषित झालेली आहेत, अशा पुरुषांना वेदातज्ञान, ग्रथश्रवण, अध्ययन दान, तप इत्यादी कर्मांनी होत नाही.' या श्लोकावरील टीकेत नाथमहाराज म्हणतात,

एवं तुझे किर्तीचे श्रवण ।। तेचि परमशुद्धीसी कारण ।
या वेगळें जे साधन । ते केवळ जाण प्रयास ।।
चित्तशुद्धीसी कारण । प्रेमयुक्त कीर्तन श्रवण ।
येथ सच्छ्रद्धाचि प्रमाण । अकारण साधनें ।।

—नाथभागवत, ६.८९–१०५

कथादिकात अनुराग ठेवणे म्हणजे भक्ती असे लक्षण श्रीगर्गमुनीनी केले आहे, ही गोष्ट अन्य भक्तियोगाचा विचार करणाऱ्या भागवद्भक्तानाही मान्यच आहे हेच आतापावेतो केलेल्या वरील विवेचनावरून सिद्ध होते. भक्तश्रेष्ठ गोपिकाचे कथाप्रेम किती होते, भगवद्वियोगकाळी त्यानी त्या कथामृताचेच महत्त्व गाईले आहे, हे 'कथादिष्वनुराग' याचे एक महत्त्वाचे लक्षण होय. भक्ताचा ज्या विषयात अनुराग असतो, तो विषयही तितकाच महत्त्वाचा असणे योग्य नाही काय ? गोपिका प्रत्यक्ष श्रीकृष्ण भगवंतालाच उद्देशून म्हणतात—

**तव कथामृतं तप्तजीवनं कविभिरीडितं कल्मषापहम् ।**
**श्रवणमङ्लं श्रीमदाततं भुवि गृणन्ति ते भूरिदा जनाः ।।**

'हे श्रीकृष्णा ! तुझी कथा इतकी मधुर वाटते की, तिला अमृताचीच उपमा द्यावी. तसेच ती भवतापसंतप्त मानवांना शांती देणारी, जीवन देणारी आहे, मोठे मोठे तत्त्वज्ञ देखील या कथेची स्तुती करतात, सर्व पापांचा नाश करणारी आहे. केवल श्रवणमात्रानेच सर्व मंगलाची सिद्धी करणारी आहे. अनंत वैभवाने संपूर्ण आहे. या पृथ्वीतलावर जे तुझ्या कथाचे वर्णन व गायन करतात, ते फार मोठे दानी म्हणविले जातात.' (श्रीभागवत १०–३१–९)

# सूत्र १८

## आत्मरत्यविरोधेनेति शांडिल्यः ॥१८॥

**अर्थ :**

आत्मरतीला अविरोधी (विरोधी नसलेल्या (विषयात) अनुराग) म्हणजे भक्ती, असे शाडिल्याचे भक्तिलक्षण आहे

**विवरण :**

महर्षी व्यास व गर्ग यानी केलेले भक्तिलक्षण सागून श्रीनारद आता शाडिल्याचे भक्तिलक्षण सागतात. शाडिल्य या नावाचेही अनेक पुरुष होऊन गेले असे दिसते. उपनिषदातील शाडिल्यविद्येचा उल्लेख ब्रह्मसूत्र भाष्यात श्रीशंकराचार्यांनी केला आहे. लाटचायन श्रौतसूत्रे व शतपथ ब्राह्मणात शाडिल्य नावाचा उल्लेख आहे महाभारत अनुशासनपर्वातही एका शाडिल्याचा उल्लेख सापडतो. पण वरील सूत्रात ज्याचा उल्लेख केला आहे, ते शाडिल्य वेगळे असावेत असे वाटते. बृहदारण्य उपनिषदाच्या चौथ्या अध्यायात वंशनिरूपक ब्राह्मणात 'कौण्डिन्यात् कौण्डिन्य । शाण्डिल्यात् शाण्डिल्य ।' अशा रूपाने शांडिल्याचे नाव सापडते तसेच शाडिल्यसंहिताप्रणेता ललितादेवीचा व व्यासाचा शिष्य मानला जाणारा एक शाडिल्यही आढळतो. 'शाडिल्य मर्वधर्मज्ञो नंदादीना पुरोहितः।' 'सर्व धर्म जाणणारा शाडिल्य हा नदादिकाचा पुरोहित आहे,' असे स्कदपुराणात म्हटले आहे. पाचरात्रमतामध्ये शाडिल्याचा ग्रथकर्ता या नावाने उल्लेख सापडतो, भक्तिसूत्रप्रणेता शाडिल्य हा पाचरात्र मतानुसारी आहे असे काही अर्वाचीन विद्वानाचे मत आहे. पण पाचरात्रमत द्वैतसिद्धान्त सागणारे आहे शाडिल्याची भक्तिसूत्रे ही तत्त्वज्ञानात अद्वैतमतास प्राधान्य देणारी आहेत. असे शाडिल्यसूत्रावर भक्तिचद्रिका नावाची जी विस्तृत टीका नारायणतीर्थनामक महान विद्वान अशा पंडिताने लिहिली आहे. तिच्यात सूत्रातर्गत प्रमाणावरून सिद्ध केले आहे. जयानामक सहितेचा कर्ता एक शाडिल्य आहे असे म्हटले जाते पण तो नारदानतर व नारदाचा शिष्य या रूपाने प्रसिद्ध आहे शाडिल्यसंहिता नावाचा ग्रथ प्रसिद्ध आहे. नारद आपल्या भक्तिसूत्रात ज्याचा आदराने उल्लेख करतात तो शाडिल्य नारदाच्या पूर्वीचा, श्रीमद्भागवत व गीता याच्यानंतरचा असावा असे वाटते. कारण शाडिल्यसूत्रात भागवत व गीता याचा उल्लेख सापडतो

असे अनेक शाडिल्य होऊन गेले असता भक्तिसूत्रकार शाडिल्य यापैकी कोणता घ्यावा ? कित्येकानी बृहदारण्यामध्ये ज्या शाडिल्य वशाच्या मूळ पुरुषाचा निर्देश

केला आहे; तेच सूत्रे करणारे असावेत असे विधान केले आहे. या विषयात एकमत नाही

शांडिल्यभक्तिसूत्रे संख्येने १०२ असून ती चार अध्यायात व प्रत्येक अध्यायात दोन पाद अशी विभागली आहेत त्यावर स्वप्नेश्वर भाष्य संस्कृतात प्रसिद्ध असून इतरही एकदोन टीका उपलब्ध आहेत. ती सूत्रे नारदीय भक्ति-सूत्राहून पूर्वीची आहेत. नारदानी या सूत्रात शांडिल्यमत सांगितले आहे, ते शांडिल्य भक्तिसूत्रापैकी एखाद्या सूत्राधारे सांगितले नसून त्याच्या सर्व भक्तिसूत्राचा निष्कर्ष म्हणून ते मत सांगितले असावे असे वाटते. आत्मरतीला विरोधी नसणाऱ्या विषयात अनुराग म्हणजे भक्ती असे शांडिल्यमत नारद सांगतात. म्हणजे आत्मविषयक रतीही अनुरागस्वरूपच आहे. कारण आत्मा परमप्रेमास्पद आहे.

मी नसावे असे कोणालाही वाटत नाही तर अखंड असावे असेच सर्वांस वाटते याचे कारण निरतिशय प्रेमविषय आत्माच आहे श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात,

आणि निरुपचारा प्रेमा । विषय होय जे प्रियोत्तमा ।।
ते दुजे नोहे की आत्मा । ऐसेचि जाणावे ।।– ज्ञा १८.१३४६.

असे जरी आहे म्हणजे सर्वांना आत्मा निरतिशय प्रेमविषय म्हणून वाटतो तरी त्या भावनेत अज्ञान मिसळलेले असते शुद्ध आत्मबोध नसतो म्हणून ती अवस्था आत्मरती म्हटली जाणार नाही. सर्वांना आत्मा म्हणून देहच प्रिय वाटतो.

तैं अज्ञान एक रूढे । तेणें कोहं विकल्पाचे माडे ।
मग विवरूनि कीजे फुडे । देहो मी ऐसे ।।– ज्ञा. १५ ३४२.

' देहखडानाम आत्मा ' अशीच सर्वांची प्रवृत्ती असते, म्हणूनच देहाला अनुकूल वाटणारे विषय आवडतात व त्यापासूनच सुख होते व प्रतिकूल विषयापासून दुःख होते असे मानीत असतो तसेच या देहासंबंधानेच आत्म्याच्या ठिकाणी कर्तृत्व-भोक्तृत्वादि धर्मांचा आरोप केला जातो व देहाचे जन्ममरण आत्म्याच्या ठिकाणी आरोपित करतो म्हणजे आत्म्याच्या आनंदास अज्ञानाचे आवरण पडल्याने व अज्ञानाच्या विक्षेपशक्तीने विषयभोगच सत्य व प्रिय वाटल्याने विषयातच सुख मानून ते संपादन करण्याचा योग्य-अयोग्य प्रयत्न करीत असतो. अशा बहिर्मुखते-मुळे तो विषयरत अथवा ससाररत म्हणविला जातो. येथे ' आत्मरती ' म्हटले आहे.

आता आत्मरती म्हणजे पाहू. सच्छास्त्रश्रवणाने, सत्संगतीने, विवेक-वैराग्यादी साधनानी विषयाचे दुःखरूपत्व देहाचे व देहधर्मादिकांचे मिथ्यात्व ज्यास पटले आहे व देहादिक दृश्य आहेत व आत्मा त्याहून भिन्न-द्रष्टा साक्षी आहे असे ज्याला कळते, त्यालाच आत्म्याचे यथार्थ ज्ञान होते. आत्मा सत्यज्ञानआनंदरूप, तसाच माझ्याहून

भिन्न नाही, कारण परमप्रेमास्पदत्वाचा अनुभव मला माझ्या आत्म्यात येतो म्हणून अन्य अनात्मे असत्, जड दुःखरूप असल्यामुळे काही काळ ते खरे व सुखरूप वाटले तरी अनादी अज्ञानामुळेच वाटतात, म्हणून खऱ्या रीतीने ते प्रेमाचे विषय नाहीत. अशा रूपाने ज्याच्या बहिर्मुखतेची बाधा होऊन जो अतर्मुख होतो, आत्म्याला आनंदरूप परमप्रेमास्पदत्वाने जाणतो त्याच्या त्या अवस्थेस 'आत्मरती' म्हणतात. अशा पुरुषाचे श्रीमद्‌भगवद्‌गीतेमध्ये वर्णन केले आहे

यस्त्वात्मरतिरेवस्यादात्मतृप्तश्च मानव ।
आत्मन्येव च सतुष्टस्तस्य कार्य न विद्यते ।। गीता ३. १७

'जो पुरुष आत्म्याच्याच ठिकाणी रत असतो आणि आत्म्याच्या योगाने तृप्त असतो आणि आत्म्यामध्येच संतुष्ट असतो, त्याला काही कार्य राहत नाही.'

जो आत्मरत, आत्मतृप्त वा आत्मसंतुष्ट नसतो त्याला रति, तृप्ती, संतुष्टी-करिता इंद्रियद्वारे विषयापावेतो जावे लागते पण सुख हा विषयधर्म नसल्यामुळे त्याला तृप्ती होत नाही असंतुष्टताच राहते. पण खरा ज्ञानी भक्त हा आत्मरती, आत्मतृप्त, आत्मसतुष्ट असतो. श्री ज्ञानेश्वरमहाराज याचे स्वरूप सागतात–

जया आपणपे साडूनि कही । इद्रियग्रामावरी येणे नाही ।
तो विषय न सेवी हें काई । विचित्र येथ ।। १०५ ।।
सहजे स्वसुखाचेनि अपारे । सुरवाडे अतरे ।
रचिला म्हणऊनि बाहिरें । पाऊल न घली ।। १०६ ।।
सागे कुमूद दळाचेनि ताटे । जो जेविला चंद्रकिरणें चोखटे ।
तो चकोर काई वाळवंटे । चुबितु आहे ।। १०७ ।।
तैसे आत्मसुख उपाइलें । जयासि आपणपाचि फावले ।
तया विषय सहज साडवले । सागो काई ।। १०८ ।।
जयाते बाह्याची भाष । नेणिजेचि निःशेष ।
अंतरी सुख । एक आथि ।। १३० ।।
परि तें वेगळेपणे भोगिजे । जैसे पक्षिये फळ चुंबिजे ।
तैसे नव्हे तेथ विसरिजे । भोगितेपणही ।।१३१।।
भोगी अवस्था एकी उठी । ते अहंकाराचा अचळु लोटी ।
मग सुखेसि घ आठी । गाढेपणे ।।१३२।।
तिये आलिंगनमेळी । होय आपेआप कवळी ।
तेथ जळ जैसे जळी । वेगळें न दिसे ।।१३३।।
का आकाशी वायु हारपे । तेथ दोनी हें भाष लोपे ।
तैसे सुखचि उरे स्वरूपे । सुरती तिये ।।१३४।।

–ज्ञानेश्वरी, ५. १०५-१३४

आत्मरतीचे स्वरूप लक्षात येण्याकरिता एवढा विचार केला आहे. ही आत्मरती म्हणजे भगवद्रतीच आहे, कारण आत्मा हा परमात्मस्वरूप आहे, वेगळा नाही.

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशय स्थित ।।

—गीता १० २०

श्रीकृष्ण म्हणतात, ' अर्जुना ! सर्व प्राणिमात्राच्या अत:करणात राहणारा आत्मा मीच आहे ' भक्तही भगवानच आपला आत्मा आहे असे मानतो व त्याच्याच ठिकाणी प्रेम ठेवतो हीच खरी आत्मरती होय.

अनादिकालीन देहवासनादिकाच्या सबधाने कामादि विकार कधी कधी डोके वर काढीत असतात. काही प्रतिबधही निर्माण होतात.

बहुजन्म दृढाभ्यासाद्देहादिष्वात्मधीः क्षणात् ।
पुन: पुनरुदेत्येव जगत्सत्यत्वधीरपि ।।१०३।।

—पचदशी, प्र. ७

असे विद्यारण्यानी पचदशीत म्हटले आहे याचा अर्थ अनेक जन्माच्या दृढ सस्काराने, श्रवणादिकाने देहबुद्धीचा निरास झाला तरी ती पुन पुन्हा निर्माण होते. तशीच जगाची सत्यत्वबुद्धीही डोके वर काढते देहात्मबुद्धी व जगत्सत्यत्वबुद्धी याच आत्मरतीला विरोधी आहेत अज्ञानी पुरुषाचा यावर अनुराग असतो, पण तो घात करणारा आहे, आत्मरतीला विरोधी आहे म्हणजे भगवद्विमुख करणारा आहे याचा परिणाम मागे सूत्र सहामध्ये भगवत्प्रेमाचे फल ' आत्मारामो-भवति ' असे सागितले त्या फलापासून च्युत करणारा आहे, नव्हे जीवनाचा सर्व नाश करणारा आहे म्हणून म्हणतात की, आत्मरतीला अविरोधी असलेल्या विषयात अनुराग म्हणजे भक्ती.

आता अविरोधी कोणत्या गोष्टी आहेत त्याचाही विचार करणे अवश्य आहे. मागे व्यास व गर्गाचार्यांचे मत सागितले की, पूजादिकात व कथादिकात अनुराग असणे म्हणजे भक्तिशाडिल्याचे मत असे असावे की, अनुराग पूजा वा कथादिकात असो, तो आत्मरतीचा विरोध करणारा न झाला पाहिजे, म्हणजे पूजादि करीत असता पूजादिकाच्या ठिकाणी जे बाह्य अवडंबर, जी सजावट, जी शोभा, पुष्प-धूपादिकाचा सुगध तसेच कथादिकात मृदुमंजुल सुस्वर गायन, नर्तनादी क्रिया होतात, तिकडे लक्ष जाणे शक्य आहे. त्यावेळी त्या भक्तास जो आनंदरस प्राप्त होतो, तो त्या बाह्यसामग्रीपासून न होता अतर्यामिचाच तो आनद, तो रस आहे, ही पूजा त्या हृदयस्थाचीच आहे, तोच प्रेमस्वरूप आहे, हे त्याचेच त्याला समर्पण होत आहे, तोच करीत आहे व करून घेत आहे, अशी सद्भावना हीच आत्मरती आत्मप्रीती होय. तेथे मीही पूजा करीत आहे व तो घेत आहे. मी कथा करीत आहे, तो ऐकत आहे, असा द्विधाभाव असेल तर ती परमात्मरती परमप्रेम

म्हटले जाणार नाही. कारण मी तो या भावनेत जो अहंकार, जे द्वैत आहे ते या आत्मरतीस विरोधी आहे. तुकाराममहाराज म्हणतात–

तुका म्हणे देवा अवघे तुझें नाम । धुपदीप रामकृष्ण हरि ।।
तुका प्रेमे नाचे गाय । गाणियात विरुनि जाय ।।

अहंकार आला की, त्याच्या पोटात आत्मरतीस विरोधी आणखीही काही विकार निर्माण होण्याचा संभव असतो. म्हणून आत्मरती सतत स्थिर राहिली पाहिजे. याकरिता शास्त्रात–

तच्चितनं तत्कथन अन्योन्य तत्प्रबोधनं ।
एतदेक परत्वंच ब्रह्माभ्यास विदुर्बुधाः ।।

–१३. ८३, पंचदशी.

'ह्या आत्मस्वरूपाचे चितन, कथन, परस्पराना त्याचेच विशेष ज्ञान करून देणे असे जे तदेकपरत्व यासच ज्ञाते ब्रह्माभ्यास म्हणतात.'

श्रीज्ञानेश्वरमहाराजानीही सागितले आहे–

बुद्धिनिश्चये आत्मज्ञान । ब्रह्मरूपभावी आपणा आपण ।
ब्रह्मनिष्ठाराखे पूर्ण । तत्परायण अहर्निशी ।। –ज्ञा. ५. ८७.

अशी वृत्तीची सतत जागृती राहिली तर इतर कोणताही विकार आत्मरतीस विरोध करू शकणार नाही म्हणून ज्या ज्या ध्यान, जप, धारणा, परमात्मस्वरूपाच्या, परमप्रेमास्पदत्वाचे सतत अनुसधान इत्यादी गोष्टी आहेत त्याच आत्मरतीस अविरोधी आहेत. इतकेच काय, या गोष्टीवरूनच खऱ्या आत्मरतीची कल्पना येऊ शकते. म्हणून या अतरगसाधनावरही अनुराग असावा, असे शाडिल्यऋषीचे मत आहे.

श्री शकराचार्यानीही एके ठिकाणी भक्तीसबंधी असेच म्हटले आहे.

मोक्षकारणसामग्र्या भक्तिरेव गरीयसी ।
स्वरूपानुसधानं भक्तिरित्याभिधीयते ।।

'मोक्षाला कारण असणाऱ्या साधनामध्ये भक्तीच श्रेष्ठ आहे व अखंड आत्मस्वरूपाचे अनुसंधान ठेवणे हीच भक्ती होय.'

## सूत्र १९

## नारदस्तु तदर्पिताखिलाचारिता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति ॥१९॥

**अर्थ :**

नारदाचे मत, आपल्याकडून होणारी सर्व कर्मे त्याला (भगवताला) अर्पण करणे आणि त्या भगवत्स्वरूपाचे थोडेही विस्मरण झाले असता परमव्याकुल होणे (हीच भक्ती, असे आहे.)

**विवरण** :

महर्षी व्यास, गर्ग, शाडिल्य याचे मत सागितल्यावर देवर्षी नारद आपलेही मत प्रदर्शित करीत आहेत. येथे नारद स्वत च सूत्रकार आहेत. सूत्रग्रंथात अनेकांची नाना मते सागितल्यानंतर स्वत सूत्रकार आपलेही मत सांगत असतो, असे अनेक-सूत्र ग्रथावरून दिसून येते. नारदही येथे आपले मत या सूत्राच्या द्वारा प्रदर्शित करीत आहेत.

सूत्रातील 'तु' हे पद पूर्वीच्या अन्य मतापेक्षा नारदांच्या मताचा वेगळेपणा प्रदर्शित करण्याकरिता असावे. म्हणजे पूजाकथादिकात अनुराग किंवा आत्मरत्य-विरोधी गोष्टीबद्दल अनुराग हे लक्षण मानूनही नारद आपले विशेष लक्षण साग-तात. पूजा, कथा इत्यादी भक्तीची अंगे मानली तरी त्यात त्या त्या विशेष कर्माचाच समावेश होतो नारदाचे लक्षण त्यापेक्षा व्यापक व सर्वाङ्गपरिपूर्ण असे आहे. जीव या देहाच्या द्वारे या लोकात येतो तेव्हा तो कर्ता बनून येतो, आपल्याच सत्तेने या देहेंद्रियादिकाकडून कर्म घडत असते असा अहंकारही तो बाळगीत असतो. व त्या कर्माच्या फलाची अपेक्षाही करत असतो. अहंकारामुळे त्या कर्मापासून प्राप्त झालेले सुखदु:खादिमूळ, जन्म, मृत्यू, इह परलोक ही भोगीत असतो. यासच जीवाचा संसार असे म्हटले जाते जीवाला असे वाटणे यासच अज्ञान म्हणतात. कारण जीव हा अश आहे तो स्वत: सत्ताशून्य आहे. अंश हा अंशीच्या सत्तेवर सर्व करीत असतो. तो परमात्मा अशी जीवाला सत्ता, ज्ञान, आनद देणारा आहे. श्रीतुकाराम महाराज सागतात.

चाले हे शरीर कोणाचिये सत्तें । कोण बोलविते हरीविण ॥१॥
देखवी ऐकवी एक नारायण । तयाचे भजन चुकू नका ॥२॥
मानसाची देव चालवी अहता । मीचि एक कर्ता म्हणोनिया ॥३॥

वृक्षाचेही पान हाले त्याची सत्ता । राहिली अहता मग कोठे ।।४।।

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्व मिवंततम् ।। गीता १८. ४६**

ज्याच्या मुळेच भुतांची सर्व कर्म प्रवृत्ति होते, व ज्याच्या योगे हे सर्व व्याप्त आहे असे गीतेमध्ये स्वतः भगवानच सागतात पण अज्ञ जीव सर्व कर्मे मीच करणारा आहे असे मानून संसारात अडकून पडतो सत्सगतीने जीवाचे खरे स्वरूप ज्याला कळाले आहे, सर्व जगाचा सूत्रचालक जो परमात्मा त्याच्या सत्तेनेच जीवाचेही कर्म होत असते म्हणून जीवाने कर्माहिकार न घेता

**करणें कां न करणे । हें आघवे तोचि जाणे ।**

**विश्व चळतसे जेणे । परमात्मेनि** ।। ज्ञा १२ ।।

या भावनेने आपली सर्व दैहिक, मानसिक, वाचिक कर्मे भगवदर्पण करण्याच जीवनाची सार्थकता आहे असे समजावे. खरा भक्त कोणत्याही कर्माचा अहकार घेत नाही. श्रीभगवान अर्जुनास हेच सागतात.

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**

**यत्तपस्यसि कौतेय तत्कुरुष्व मदर्पणम्** ।। –गीता ९. २७

'हे अर्जुना, तू जे करशील, जे भोगशील, जे हवन करशील, जे दान करशील जे तपाचरण करशील ते सर्व मला समर्पण कर.' या श्लोकावरील व्याख्यानात श्रीज्ञानेश्वर महाराज सागतात

जे जे काही व्यापार करिसी । का भोग हन भोगिसी ।
अथवा यज्ञे याजसी । नाना विधी ।।
ना तरी पात्र विशेषे दाने । का सेवका देसी जीवने ।
तपादि साधने । व्रते करिसी ।।
ते क्रियाजात आघवे । जे जैसे निफजेल स्वभावे ।
ते भावना करोनि करावे । माझिया मोहरा ।।
परि सर्वथा आपुला जीवी । केलियाची शका काहीचि नुरवी ।
ऐसी धुवोनि कर्मे द्यावी । माझिया हाती ।। ज्ञा. ९. ३९८. ४०१

गीतेमध्ये अनेक ठिकाणी कर्मसमर्पणाचा विचार सागितला आहे कोणास वाटेल अशा रीतीने सर्व कर्मे भगवदर्पण करण्याचा उपयोग काय ? अर्पण करण्याने कर्ता त्या कर्मफळापासून वचित होतो व ज्याला समर्पण करावयाची तो असग असल्याने त्यालाही उपयोग नाही या प्रश्नाचे उत्तर श्रीकृष्णानीच दिले आहे जीव अहंकाराने मी कर्ता म्हणून कर्मे करतो व त्या कर्मफळात अडकून पडतो. कर्तृत्वमद व कर्मफलास्वाद हाच कर्मबंध आहे मर्व ससार यामुळेच प्राप्त होतो. तसेच जीव खऱ्या रीतीने या कर्माचा कर्ता नाही.

**अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ।। गीता ३–२७**

'अहकाराच्या योगाने ज्याचे मन मोहित झाले आहे तो पुरुष मीच कर्ता असे मानतो' असे भगवान म्हणतात व यामुळेच तो कर्मबधात अडकतो. पण ही सर्व कर्मे देवास अर्पण केली की जीवास फळ देऊ शकत नाहीत

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि** ।। –गीता ९. २८

अर्जुना, कर्माची जी शुभाशुभ फले (बधनकारक) आहेत त्यापासून तू मुक्त होशील, व माझ्या स्वरूपास प्राप्त होशील'

मग अग्नि कुडी बीजे घातली । तिथे अकुर दशे जेवि मुकली ।
तेवी फळतीचि मज अर्पिली । शुभाशुभे ।।४०२।।
अगा कर्मी जै उरावे । तै तिही मुखदु:खी फळावे ।
आणि तयाते भोगावया यावे । देहा एका ।।४०३।।
ते उगणिले मज कर्म । तेव्हाचि पुसिले मरण जन्म ।
जन्मासवे श्रम । वरचिलही गेले ।।४०४।।

सूत्रात 'अर्पित' शब्द आहे दान, दक्षिणा, भीक, देणगी वेगळी व अर्पण वेगळे. दानादिक काही उद्देशाने ज्याला द्यावयाचे त्याला उपयुक्त म्हणून दिले जातात पण येथे अर्पण करणे म्हणजे ज्याचे त्याला समर्पण करणे होय हे समर्पण कशाचे ?

'अखिलाचारता' या पदाने ते सागितले आहे केवळ स्थूल देहाने होणारेच आचार एवढेच नव्हे तर सूक्ष्म देह, मन, बुद्धि प्राणादिकाकडून होणारे व्यवहारही त्या भगवतालाच समर्पण करणे ही भक्ती होय कारण मुळात त्याचाही प्रेरक तोच आहे गीतेमध्ये श्रीकृष्ण अर्जुनास 'मय्येव मन आधत्स्व मयिबुद्धि निवेशय' (१२-८) 'हे अर्जुना, तू आपले मन माझ्या ठिकाणीच ठेव, तसेच बुद्धीही माझ्या ठिकाणीच ठेव' असे अनेक ठिकाणी सागतात कोणास वाटेल की शारीरिक व मानसिक इत्यादी सर्व कर्मे समर्पण करणे ही भक्ती कशी होईल ? याचे उत्तर हे की विना प्रेमाच्या समर्पणाची क्रिया खरी होऊ शकत नाही. प्रेमावाचून काही कोणाला दिले तर ते दान, दक्षिणा असे होते व त्यात फलासक्ती असते जमिनीत बीज पेरले जाते तेथे अनेक पटीनी लाभाची अपेक्षा असते दानादिकात ऐहिक, पारत्रिक फलाची कीर्ती, मान इत्यादिकाची अपेक्षा असते पण प्रेमाने जे समर्पित केले जाते ते निरपेक्ष असते प्रेमात स्वार्थ नसतो, याचा विशेष विचार पुढे केला जाणार आहे.

केवळ अखिल कर्मे समर्पण करणे एवढ्यावरच नारदांचे लक्षण पूर्ण होत नाही. याच्यापुढे 'तद्विस्मरणे परम व्याकुलता' म्हणजे भगवद्विस्मरण झाले असता चित्तात फार व्याकुलता म्हणजे दु:ख निर्माण होते, असे भक्तीचे लक्षण नारद करीत आहेत. वास्तविक जो भक्त सतत सर्व कर्मे भगवतास समर्पण करीत असतो

त्याला त्याचा विसर कसा पडेल ? तसेच विसर पडला तर परम व्याकुलता कशी होईल व व्याकुलतेत विसर कसा पडेल ? केवल विसराने व्याकुलता का ज्याचा सतत आठव असतो, त्याची भेट न झाली तर व्याकुलता अशी शंका येईल.

भक्ताला सतत आठव असतोच ध्यानी, मनी देवाविना त्याला काहीच आठवत नसते.

श्रीएकनाथ महाराज सांगतात–

जाग्रती सुषुप्ती स्वप्न । तिही अवस्था होय भजन ।
तेथ अखंड अनुसंधान । निजबोधें पूर्ण ठसावलें अंगी ।।

एकनाथी भागवत, २.३५५

'विस्मरणात व्याकुळता' म्हटले आहे म्हणजे स्मरण असतेच असे सिद्ध होते. कारण जेथे विस्मरण असते तेथे विसरलेल्या विषया बद्दल कोण व्याकुळ होईल ? सामान्य विषयासक्त जीवास देवाचे विस्मरण सहज असतेच पण तो व्याकुळ होत नाही

**जे प्राणियाकामीं भरू । देहाचिवरी आदरू ।**
**म्हणोनि पडिला विसरू । आत्मबोधाचा ।।** ज्ञा ४.२०

असे श्रीज्ञानेश्वर महाराज सांगतात. या विसरात देहादिकांचा आठव असतो, या विसरात बहिर्मुखता असते या विसरात देवाची कल्पनाही नसते म्हणजे 'महात्म्यज्ञान' नसते आत्मीयता नसते हा विसर जीवाला भोगासक्त बनवितो. भोगासक्तीमुळे जी कर्मे तो मनुष्य करील ती फलासक्तिपूर्वकच करील. त्यातही निषिद्धाकडेच अधिक प्रवृत्ति होत असते, जेथे फलासक्तिपूर्वक कर्मे होतात, तेथे सर्व कर्मे देवाला समर्पण करण्याची भावना कशी असू शकेल ?

विसराचे दोन प्रकार कल्पावेत, एक स्वाभाविक व एक नैमित्तिक. वरील अज्ञानमूलक जो विसर तो स्वाभाविक आहे. त्या विसरात जीवाची सर्व प्रकारे हानीच आहे.

विसरली तया थोर झाली हानि । पचतील खाणी चौऱ्यांशीच्या ।। १ ।। तु

तुका म्हणे त्यांनी । मनुष्यपणा केली हानि ।
गेली विसरूनि । देवा म्हणता मी माझें ।। १ ।।

असे त्या विसरापासून होणाऱ्या हानीचे स्वरूप तुकाराम महाराजांनी सांगितले आहे. अशा विसरात व्याकुलता होणे शक्यच नाही. कारण जीवन भ्रांतीने भरलेले असते. हा विसर म्हणजे आठवसापेक्ष नसतो तर हा अखंड विसर म्हणजे अज्ञान होय. हा स्वाभाविक अनादिकालीन असतो. या विसराबद्दल संसारासक्तांना कधीच खेद होत नाही. किंबहुना हा विसर असतो म्हणूनच आसक्तिपूर्वक संसार होत असतो अशा

तिकडे दुर्लक्षच केले जाते.

'भजन नावडे श्रवण। धावे विषय अवलोकून ॥२॥ (तु.) त्या विसराबद्दल मुळीच खत वाटत नाही.

या सूत्रात जे 'विस्मरण' पद आहे त्याचा विशेष अर्थ घेतला पाहिजे. तो नैमित्तिक विसर म्हणावा लागेल. भगवद्भक्ताला सहसा विसर पडू नये व पडणारही नाही. पण ज्या अर्थी 'तद्विस्मरणे परम व्याकुलता' असे नारद म्हणतात, त्या अर्थी तो विसर गृहीत धरावा लागतो. श्रीतुकाराम महाराज देवाजवळच म्हणतात,

एकविध वृत्ति न राहे अंतरी। स्मरणीच हरी विस्मृति हे॥

अनेक अभंगांतून त्यांनी देवाची करुणा भाकली आहे

ध्यानी रूप वाचे नाम निरंतर। आपुला विसर पडो नेदी॥
तुझा विसर नको माझिया हो जीवा। क्षण एक केशवा माय बापा॥
हेचि दान देगा देवा। तुझा विसर न व्हावा॥

अशी पुष्कळ वचने सापडतात. देवाचा आठव होणे, देवाचे नाम मुखास येणे, देवाची भक्ती घडणे हे फार दुर्लभ आहे असे सांगितले जाते श्रीकृष्ण भगवान उद्धवास सांगतात—

ऐशी तुझी सुलभ भक्ति। तरी अवघेचि भक्ति का न करिती।
देवो म्हणे भाग्येवीण माझी भक्ति। न घडे निश्चिती उद्धवा॥

—एकनाथ भागवत ११ १५५०

अशा भाग्यवशात् भगवत्स्मरणाकडे चित्तवृत्ती प्रवृत्त झाली, सर्व कर्मे त्यालाच अर्पण केली गेली, अखंड अनुसंधान ठेवण्याचा प्रयत्न केला तरी पूर्व संस्काराने, सदोष प्रारब्धाने, क्वचित निमित्तवशात् विकाराचा अल्पही प्रादुर्भाव झाल्यामुळे विस्मृती होणे शक्य असते, अल्पही काळ ती विस्मृती झाली तरी सत्संस्काराने तत्काल पुन्हा तो भक्त स्मृतीवर येतो व आल्यानंतर क्षणैक का होईना जी विस्मृती झाली होती त्याबद्दल तो भक्त अतिशय व्याकुल होत असतो. भक्तवर्य श्रीनामदेव महाराज म्हणतात—

तुझिये चरणीचे तुटता अनुसंधान।
जाईल माझा प्राण तत्क्षणी॥ १॥

तुका म्हणे हानि। या वेगळी मना नाणी॥

सा हानिस्तन्महच्छिद्रं सा चांधजडमूढता।
यन्मुहूर्तंक्षणं वाऽपि वासुदेवो न चिन्त्यते॥

एक भक्त म्हणतो 'एक क्षण मुहूर्त श्रीवासुदेव चिंतनाविना रिकामा जाणे ही मोठी हानी आहे, ती जीवनातील मोठी हानी आहे, जीवनातील मोठे व्यंग आहे. ती अवस्था म्हणजे अंधपणा जडमूढपणाच होय.'

भक्ताला जसा भगवद्वियोग सहन होत नाही तसा विसरही खपत नाही. विस्मृती हाही एक मानसिक वियोगाचाच प्रकार आहे असे म्हटले तर काही बाधक नाही. तात्पर्य, मानापमान, लाभ हानि, सुख-दुःख इत्यादिकांची पर्वा न करिता कर्तृत्वाभिमान व फलेच्छा टाकून, शरीर व शरीरसंबंधी असतील त्यांचे ठिकाणी अहंता, ममतेचा त्याग करून एकमात्र भगवताला परमप्रियतम मानून त्यासच परमआश्रय, परमगती, परमसुहृद् समजून अनन्य भावाने अत्यंत श्रद्धायुक्त होऊन प्रेमपूर्वक तैलधारेप्रमाणे त्याच्याच नामगुण प्रभाव व स्वरूपाचे चितन करीत परमानंदात निमग्न राहाणे व केवल त्या प्रियतमाकरिता त्याच्या इच्छेनुसार त्याच्याच करिता निःस्वार्थ भावाने समस्त दैहिक, वाचिक, मानसिक कर्मांचे आचरण करीत राहाणे, काही प्रतिकूल निमित्ताने क्षणभरही त्याचे विस्मरण होईल तर पाण्यातून बाहेर काढलेल्या मासोळीपेक्षाही अधिक व्याकुलता उत्पन्न होणे हीच भक्ती असे नारद महर्षी आपले स्वतःचे मत सागतात.

## सूत्र २०

## अस्त्येवमेवम् ।। २० ।।

**अर्थ :**

(वरील सूत्रात म्हटल्याप्रमाणे भक्तिलक्षण) असेच आहे.

**विवरण :**

वरील एकोणिसाव्या सूत्रात नारदांनी व्यास, गर्ग यांचे भक्तिलक्षण सांगितल्या वर आपले भक्तिलक्षण सागितले आहे. त्यानंतर आणखी अनेक भक्त होऊन गेले असतील त्याचे कोणाचे भक्तिलक्षण सांगतील की काय असे वाटेल, पण अन्य कोणाचे भक्तिलक्षण न सागता आपण सांगितलेले भक्तिलक्षणच योग्य आहे, असे द्विरूक्तीने सांगतात. 'अस्ति एवम् एवम् अस्ति' हे क्रियापद दोन्ही एवंकडे लावावे. 'एवं अस्ति एवं अस्ति', असे आहे. म्हणजे आम्ही जे भक्तिलक्षण सांगितले तेच पूर्ण आहे यापेक्षा वेगळे किंवा श्रेष्ठ असे दुसरे लक्षण संभवत नाही असा वरील सूत्राचा आशय आहे.

## सूत्र २१

# यथा व्रजगोपिकानाम् ॥२१॥

**अर्थ :**

(आपल्या भक्तिलक्षणाकरिता नारदमहर्षी उदाहरण देतात)–जशी गोकुळातील गोपिकांची (अवस्था होती.)

**विवरण :**

स्वत:चे भक्तिलक्षण नारद सोदाहरण पटवून देतात. कोणतीही महत्त्वाची भावना किंवा ज्ञान हे अमूर्तच असते. त्याच्या अभिव्यक्तीकरिता एखाद्या व्यक्त-उदाहरणाची अपेक्षा असते. मूर्तात प्रविष्ट झाल्यावाचून अमूर्त प्रगट होऊ शकत नाही. नारदानी ज्या भक्तीचे स्वरूप एकोणिसाव्या सूत्रात सागितले ती भक्ती उत्कटतेने पूर्ण रूपाने कोठे प्रगट दिसली असेल तर ती नारदांना गोकुळात दिसली. गोकुळातील पुरुष, स्त्रिया, गोप, बालक सर्वच भगवान श्रीकृष्णावर प्रेम ठेवणारेच होते. पण नारदोक्त भक्तिलक्षणाचा पूर्ण आविष्कार गोपिकाच्याच ठिकाणी दिसला म्हणून त्यानी गोपिकाचेच उदाहरण घेतले आहे. नुसते 'गोपिकानाम्' म्हटले असते तर कोणत्याही मोठ्या नगरात गोप गोपिकाची वस्ती असते पण ते भक्त नसतात. केवळ गोकुळातील व्रज भूमीतील गोपिकाच भक्त होत्या. म्हणून 'व्रज-गोपिकाना' म्हटले आहे.

नारदांची सर्वत्र अप्रतिहत गती असल्यामुळे गोकुळात ते जातच होते. कारण त्यांच्या आराध्य दैवताचा गोकुळात अवतार झाला होता. ते वैभव, तेथील सर्वांचेच वात्सल्य, सख्य, मधुरभावातील प्रेम पाहिल्याविना त्याना समाधान कसे होणार ? व तेथे गेल्यानंतर गोपिकांच्या अलौकिक दिव्य प्रेमाचे स्वरूप पाहावयास मिळालेच असणार, तसेच त्या प्रेमाची परीक्षाही नारदाविना कोण करू शकणार? तसेच नारदांना अनेक भक्तांची भेट झाली असणार, पण सर्वांतून गोकुळातील गोपिकांची भक्तीच नारदानी सूत्र एकोणीसमध्ये केलेल्या भक्तिलक्षणाच्या कसोटीस उतरली म्हणूनच गोपिकांचे उदाहरण घेतले आहे.

भक्तशास्त्रात व्रजमहात्म्य फार सागितले आहे. व्रज शब्दाचे कोशात अनेक अर्थ आहेत. **व्रजो गोष्ठाब्द वृन्देषु** । पण येथे ज्या गोकुळात श्रीकृष्ण अवतार प्रगट झाला तेच मथुरासमीपवर्ती यमुनातीरावर असलेले गोकुळ व वृंदावन व्रज शब्दाने अभिप्रेत आहेत. अनेक पुराणांतून, पाञ्चरात्रादिकांतून, रुद्रयामल तापनीयादिकांतून व्रजमहात्म्य विस्ताराने वर्णिले आहे. स्कंद पुराण, वैष्णव खंड, भागवत

महात्म्यात, शांडिल्य ऋषी व परीक्षित याचा संवाद आहे, तेथे परीक्षितीने प्रश्न केला की, 'मला व्रजमहात्म्य सागा.' तेव्हा शांडिल्य ऋषी म्हणाले की, 'हे परीक्षित आता मी तुला ते सांगतो. व्रज शब्दाचा अर्थ व्याप्ती असा आहे. सत्त्व, रज, तम यांहून अतीत जे परब्रह्म तेच व्यापक आहे म्हणून त्यास व्रज म्हणतात ते सदानंद-रूप परमज्योतिर्मय व अविनाशी आहे. जीवन्मुक्त पुरुष त्यातच निवास करीत असतात. त्याच परब्रह्मस्वरूप व्रजात नन्दनन्दन भगवान श्रीकृष्णाचा निवास आहे. ते सच्चिदानंदस्वरूप आहेत, ते आप्तकाम आहेत. प्रेमरसात निमग्न रसिक भक्तच त्याचा अनुभव घेतात, काम शब्दाचा अर्थ कामना, अभिलाषा. व्रजामध्ये भगवान श्रीकृष्णाचे वाछित पदार्थ आहेत. तेथे गाई गोपि-बालक व गोपिका, यांच्याशी भगवान श्रीकृष्णाचा नित्य विहार होतो. श्रीकृष्णाची ही रहस्यलीला प्रकृतीहून पर आहे. भगवद्लीला दोन प्रकारची आहे वास्तवी व व्यावहारिक वास्तवी लीला स्वसंवेद्य आहे. कधी कधी भगवान व्यावहारिकी लीला करतात त्यावेळी भक्तजनाना तिचा अनुभव येतो. अठ्ठाविसाव्या द्वापारयुगाच्या शेवटी जेव्हा या रहस्यलीलाचे अधिकारी भक्तजन या लोकात एकत्र होतात त्या वेळी त्यांच्या-करिता भगवान आपल्या अतरंग प्रेमी जनाबरोबर अवतार घेतात, तेव्हा प्रेमीजनां-बरोबर प्रगट रूपाने व्यावहारिकी लीलाही करीत असतात.' (स्कंद पुराण)

**व्रजन्ति गो गोपावासार्थमत्रेति व्रजो गोपावासस्थानम् ।।**

जेथे गाई गोपाळ वास्तव्याकरिता राहतात त्या स्थानाला व्रज असे नाव आहे. तरी रूढ अर्थाने पुराणादिकांतून मथुरेच्या परिसरात यमुनेच्या तटावर बृहद्वन नामक एक सुदर वन होते या वनात अनेक व्रज म्हणजे गौळवाडे वसले होते. त्यात अगणित गोप राहत असत व त्याच्याजवळ अगणित गोधनही असे. याच पैकी नंदराज नामक एका श्रेष्ठ गोपाने विभूषित अशा व्रजात श्रीकृष्ण अवतार झाला. याच पवित्र भूमीत श्रीकृष्णाच्या बाललीला झाल्या. ज्याचे वर्णन भारता-तील सर्व प्रातातील साधुसंत, हरिभक्तांनी, कवीनी अनेक रूपाने केले आहे. या गोकुलात श्रीकृष्णाच्या वात्सल्यरसाचा स्वाद नंदयशोदा यांनी पूर्ण रूपाने भोगला सख्यभक्तीचा आनंद गोपाळास श्रीकृष्णाबरोबर यमुनातीरी गाई चारत असता भरपूर भोगावयास मिळाला. गोकुळात सर्वच भक्त होते; पण माधुर्य भक्तीचा पूर्ण आविष्कार गोपिकांच्याच जीवनात झाला होता. म्हणून श्रीनारद महर्षींनी मुद्दाम आवर्जून 'यथा व्रजगोपिकानाम।' म्हणून सूत्रात त्यांचे उदाहरण दिले आहे या व्रज भूमीचे वर्णन सर्वच पुराणांतून तंत्रग्रंथांतून केले आहे. गौतमीय तंत्रात श्रीकृष्णमुखातीलच वचन सापडते.

**भारते व्रजभूः श्रेष्ठा तत्र वृंदावनं परम् ।**

पाच योजनांचा ज्याचा विस्तार आहे असे हे वृंदावन म्हणजे माझा देहच आहे असे भगवान म्हणतात. जेथे भगवान श्रीकृष्णाच्या सर्व वैभवाचा आविष्कार झाला होता अशी ही लीलाभूमी आहे. या व्रजाच्या अंतर्गत यमुनापुलिन, गोवर्धन पर्वत, गव्हरवन, कदम्बखंडिया, नंदग्राम, बरसाना कामवन, चरणाद्रि इत्यादी अनेक स्थाने लीलाभूमीस्वरूप मानली जातात. स्वतः ब्रह्मदेव या भूमीत आपल्याला जन्म प्राप्त व्हावा अशी अपेक्षा करतो. श्रीकृष्णाजवळच ब्रह्मदेवाने म्हटले आहे.

**तद्भूरिभाग्यमिहजन्मकिमप्यटव्यांयद्गोकुलेऽपिकतमाङ्घ्रिरजोभिषेकम्**
**यज्जीवितं तु निखिलं भगवान्मुकुन्दस्त्वद्यापियत्पदरजः श्रुतिमृग्यमेव ॥**

—भागवत स्कंध १०–१४–३४.

तसेच नारद ज्या गोपिकांचे उदाहरण देतात त्यानीही व्रजाचे– गोकुळाचे– वर्णन केले आहे.

**जयति तेऽधिकं जन्मना व्रज श्रयत इंदिरा शश्वदत्र हि**

भा. १०–३१–१

गोपिका म्हणतात, हे दीनबन्धो ! तू जन्मल्यापासून हे गोकुळ अधिक उत्कर्षाला प्राप्त झाले आहे, येथे लक्ष्मी अखंड आश्रयाला आली आहे ! मुळात ती व्रजभूमी ही पुण्यभूमीच होती. पण श्रीकृष्णअवतारामुळे तिला फार श्रेष्ठत्व प्राप्त झाले. त्या व्रजवासी ज्या गोपिका होत्या, त्यांचे उदाहरण नारद आपल्या भक्तिलक्षणाच्या पुष्टीकरिता देतात. वास्तविक त्या गोपिका या सामान्य स्त्रिया नव्हेत ज्याचे वर्णन सर्व ऋषिमुनी, देवता, साधुसंत करतात त्यांना सामान्य म्हणणे कसे शक्य आहे ? गोपी, गोपिका याचा शब्दार्थ खालील प्रमाणे केला आहे.

**गाः इंद्रियाणि पान्ति इति गोप्यः ।**

ज्या आपल्या इंद्रियांचे ( विषयापासून ) रक्षण करतात त्या गोपी.

गां दृष्टिं पान्ति रक्षन्ति ( दुर्विषय गमन राहित्येनेति ) गोप्यः गां म्हणजे दृष्टी (ज्ञान) तिचे दुष्ट विषयाकडे न जाऊ देता ज्या रक्षण करतात त्या गोपी. आणखीही एक चांगला अर्थ सभवतो.

**गोभि. इन्द्रियैः पिबति श्रीकृष्णरसमिति गोपी ।**

‘ गो ’ इंद्रियांनाही म्हणतात, आपल्या इंद्रियांच्या द्वारे जी श्रीकृष्णभक्तिरसाचे पान करते ती गोपी.

‘ गोपायति ’ इति गोपी म्हणजे आपल्या भक्तिभावनेचे जी रक्षण करते ती गोपी.

येथे ‘ व्रजगोपिकानाम् ’ असे अनेकवचन आहे. विशेष म्हणजे गोकुळवासी सर्व स्त्रिया, सुना, लेकी, सास्वा सर्वच श्रीकृष्णावर निरतिशय प्रेम करणाऱ्या होत्या. पुराणातून त्यांची अनेक नावेही सापडतात. कित्येक पुराणादिकांतून गोपिकांचे

पूर्ववृत्तही आले आहे. काही देवता तप करून गोपीरूपाने भगवत्प्रेमाचा अनुभव घेण्याकरिता आल्या होत्या. काही ऋषीही तप करून गोपिकारूपाने अवतरले होते, तसेच श्रुतीही गोपिका रूपाने भगत्प्रेम सुख भोगण्यास अवतरल्या होत्या.

गोप्यस्तु श्रुतयो ज्ञेया. ऋषिजा गोपकन्यका: ।
देवकन्याश्च राजेंद्र न मानुष्या. कदाचन ।।

श्रीएकनाथ महाराज सागतात–

त्या जाण वेदगर्भीच्या श्रुती । श्रुतीरूपें नव्हें मत्प्राप्ती ।
तैं परतल्या म्हणोनि नेति नेति । माझी सुखसंगती न पवेंचि ।।
विषयबुद्धी तें मुख्य अज्ञान । तें असता मी न भेटे जाण ।
असता वेदोक्त जाण पण । तेणेंही संपूर्ण न भेटे मी ।।

जाणीव नेणीव गेलिया नि:शेख । माझे पाविजे निजात्मसुख ।
श्रुति जाणोनि हे निष्टंक । गोकुळी त्या देख सुखार्थ आल्या ।।

—एकनाथी भागवत १२. १६३–६५

दुसरीही एक कथा उपलब्ध होते. त्रेतायुगात श्रीरामचंद्राचा अवतार झाला. सीतास्वयवराकरता श्रीरामचंद्र मिथिला नगरीला आले, धनुर्भंग झाला, सीतेने रामचंद्राला माळ घातली, विवाहसोहळा समारंभपूर्वक पार पडला, तेथे ज्या मिथिला नगरीतील स्त्रिया जमल्या होत्या त्याही श्रीरामचंद्राचे ते कोटिकंदर्पदर्प-हारी लावण्य बघून मोहित झाल्या त्यांचीही उत्कट इच्छा झाली की आम्हांलाही हेच पती लाभले तर किती चागले होईल त्याकरिता आम्ही वाटेल तो त्याग करू. त्यानी आपली उत्कट वासनाही श्रीरामापुढे प्रगट केली, पण राम अवतार हा मर्यादापुरुषोत्तम होता, एकपत्नीत्वाची मर्यादा पाळणे अवश्य होते त्या मिथिला-निवासी स्त्रियांचा उत्कटभाव पाहून श्रीरामचंद्र त्यांना म्हणाले, 'तुम्ही शोक करू नका.'

**द्वापारांते करिष्यामि भवतीनां मनोरथम् ।**
**श्रद्धया परया भक्त्या व्रजे गोप्यो भविष्यथ ।।**

'द्वापारयुगाचे शेवटी श्रीकृष्ण अवतारात तुमचे मनोरथ पूर्ण करीन. तुम्ही परमश्रद्धावान आहात, त्या वेळी तुम्ही गोकुळात गोपी बनाल.'

पद्मपुराणात कथा आहे की श्रीरामचद्र दंडकारण्यात आले असता अनेक ऋषी त्यांच्या दर्शनास गेले. रामचंद्राचे अत्यंत सुंदर व लावण्यादिकाने युक्त स्वरूप पाहून त्यांच्या ठिकाणी स्त्रीभाव जागृत झाला. तेव्हा रामचंद्राने त्यांना गोकुळातही तुम्ही गोपीरूपाने द्वापारयुगात जन्म घ्याल व माझे सुख भोगाल असा वर दिला. नंतर त्या वराप्रमाणे ते ऋषी स्त्रीभावास प्राप्त झाले मात्र तो स्त्रीभाव प्राप्त

उदाहरणार्थ, उग्रतपानामक ऋषी अग्निहोत्री व तपस्वी दृढव्रती होता. त्याने पचदशाक्षर मंत्राचा जप अनत काल केल्यानंतर सुनंदनामक गोपाच्या पोटी सुनंदानामक कन्येच्या रूपाने जन्म घेतला. सत्यतपा नावाचा मुनी वाळलेल्या पानावर राहून दशाक्षर मत्राचा जप करून दहा कल्पानंतर सुभद्रनामक गोपाची कन्या सुभद्रानामक गोपी झाला. हरिधामा ऋषी निराहार राहून क्लीबीजयुक्त वीस अक्षरी मंत्राचा जप करून तीन कल्पानतर सारग नामक गोपाच्या पोटी रगवेणी या नावाच्या गोपीच्या रूपाने अवतरला तसेच जाबाली नावाचा ब्रह्मज्ञानी ऋषी विशाल अरण्यात विहरण करीत असता त्याने एक मोठी विहीर पाहिली त्या विहिरीच्या पश्चिम तटावर एका वटवृक्षाखाली एक तरुण स्त्री कठोर तपश्चर्या करीत बसलेली त्याला दिसली तिचा डावा हात आपल्या कमरेवर असून उजव्या हाताने तिने ज्ञानमुद्रा धारण केलेली होती जाबाली ऋषीने तिला नम्रतेने तू कोण आहेस असे विचारले असता ती म्हणाली,

**ब्रह्मविद्याहमतुलां योगींद्रैर्या च मृग्यते ।**
**साहं हरिपदाम्भोज काम्यया सुचिरं तप ।।**
**चराम्यस्मिन्वने घोरे ध्यायन्ती पुरुषोत्तमम् ।**
**ब्रह्मानंदेन पूर्णाहं तेनानंदेन तृप्तधीः ।।**
**तथापिशून्यमात्मानं मन्ये कृष्णरतिं विना ।।** पद्मपुराण.

ती म्हणाली, ‘ जिचा मोठमोठे योगी शोध करतात अशी मी ब्रह्मविद्या आहे. कृष्णप्रेमप्राप्तीकरिता या घोर वनामध्ये त्या पुरुषोत्तमाचे ध्यान करीत दीर्घकाल तप करीत आहे. मी ब्रह्मानंदाने पूर्ण आहे पण श्रीकृष्णप्रेम मला अद्यापि प्राप्त झाले नाही म्हणून स्वतःस शून्य समजत आहे. ’ हे ऐकून ब्रह्मज्ञानी जाबालीने तिच्या चरणावर मस्तक ठेवून तिच्यापासून श्रीकृष्णप्रेमदीक्षा घेतली. एका पायावर उभे राहून कठोर तप केले त्या कल्पानंतर प्रचंड नावाच्या गोपाचे घरी चित्रगंधा या गोपीच्या रूपाने अवतार घेतला. अशा अनेक गोपिकांच्या पूर्व जन्माच्या कथा सापडतात.

श्रीशुकाचार्यांमारखे महान ज्ञानीही गोपिकांना गुरुस्थानी मानीत होते असे वर्णन आढळते.

एवढा विचार करण्याचे कारण असे की ज्या अर्थी श्रीनारद महर्षींनी गोपिकांचे उदाहरण आपल्या भक्तिलक्षणाकरिता आवर्जून घेतले आहे त्या अर्थी त्याचाही अधिकार तसा श्रेष्ठ असला पाहिजे.

नारदाच्याही आधी ज्यानी भक्तिविषयक सूत्राची रचना केली, ते श्रीशाडिल्य महर्षीही आपल्या भक्तिसूत्रातून गोपिकांचेच उदाहरण घेतात.

**अतएव तद्भावाद्बल्लवीनाम्** ।। २–५

' भक्ती ही सर्वसाधननिरपेक्ष अनंतफलस्वरूप आहे. यावर उदाहरण बल्लवी म्हणजे गोपिकाचेच आहे. '

या सूत्रावरील आपल्या विस्तृत सस्कृत टीकेत श्रीनारायणतीर्थ यती, ज्यांनी अनेक शास्त्रावरील मोठमोठ्या ग्रथावर टीका केल्या आहेत व त्यावरून ते मोठे प्रकाड पंडित होते असे दिसून येते, यानी आदि पुराणातील गोपी महात्म्याचे-काही श्लोक उद्धृत केले आहेत–

**त्रैलोक्ये केभवद्भक्ता केत्वां जानन्ति मर्मणि ।**

भक्त अर्जुन श्रीकृष्णास त्रैलोक्यात तुमचे भक्त कोण आहेत व कोण तुम्हाला यथार्थ जाणतो असा प्रश्न करतो, त्याचे श्रीकृष्ण त्याला उत्तर देतात–

**न मां जानन्ति मुनयो योगिनश्च कथंचन ।**
**नच रुद्रादयो देवा यथा गोप्यो विदन्ति मां ॥**
**मन्माहात्म्यं मत्सपर्यां मच्छ्रद्धां मन्मनोगतिम् ।**
**गोप्य एवहि जानन्ति नान्यो जानाति मर्मणि ॥**
**वेदान्तिनोऽपि मुनयो न मां जानन्ति तत्त्वत. ।**
**यथा ता गोपसुदृशो मम जानन्ति वैभवम् ॥**
**अहमेव परं रुपं न्यान्ये जानन्ति केचन ।**
**गोप्य एवहि जानन्ति मद्रुपं मत्क्रियादिकम् ॥** आदिपुराण

' श्रीकृष्ण सागतात, अर्जुना, मला योगी, मुनी रूद्रादिदेवदेखील गोपिकाप्रमाणे जाणू शकत नाहीत माझे महात्म्य, पूजा, श्रद्धा, मनोगत केवळ गोपिकाच जाणतात. गोपिका जशा मला जाणतात तशा स्वरूपात वेदाती, मुनीही मला जाणत नाहीत. माझ्या खऱ्या रूपास व मद्विषयक ज्या क्रिया करावयाच्या त्या केवळ गोपिकाच जाणतात

भारतातील सर्व प्रातातील व सर्व भाषांतील भक्तिप्रधान काव्यातून व भक्तिमार्गीय सताच्या काव्यातून गोपिकाच्या भक्तीचे विशेष वर्णन आढळून येते. महाराष्ट्रातील भागवतधर्मीय सर्व सतानी आपआपल्या काव्यग्रंथातून, अभंगांतून गोपिकाचे, त्याच्या भक्तीचे अत्यंत प्रेमपूर्वक रसाळ वर्णन केलेले आढळून येते श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या वर्णनाची ' ज्ञानियाचा राजा, ' ' ज्ञानियाचा शिरोमणि, ' ' ज्ञानचक्रवर्ति ', ' गुरुमहारावो ' अशा अनेक श्रेष्ठ श्रेष्ठ विशेषणांनी सर्वच साधुसंत विद्वानपडितांनीही गौरव गाथा गाइली आहे. ज्ञानेश्वरी अनुभवामृतादिकांतून त्यानी पूर्णाद्वैताचे तत्त्वज्ञान पटवून दिले आहे, पण त्यांनीदेखील आपल्या अभगात गोकुळवासी गोपिकाचे वर्णन केले आहे त्याचे गौळणी, विरहिणी, सौरी अंबुला हे अभंग सर्व या गोपीभावाच्या महात्म्यानेच भरले आहेत त्याला मोठा अध्यात्माचा, प्रेमाचा साजही त्यानी चढविला आहे. विशेष म्हणजे त्यानी केवळ परोक्षरूपाने

गोपिकांचे वर्णन केले नसून स्वतःच्या वृत्तीमध्ये गोपीभावाचा अंगीकार करून गोपिकाचे जीवन साकार केले आहे. ते म्हणतात,

निवृत्तिप्रसादे मी गोवळिये वो ।
माझा भाव तो विठ्ठलु न्याहाळिये वो ।।

अशी अनेक वचने आहेत तसेच श्रीनामदेवराय, श्रीएकनाथ महाराज, श्रीतुकाराम महाराज, निळोबाराय यांच्या अभगाच्या गाथ्यात प्रारंभीच बाळक्रीडा हे प्रकरण आहे व त्यात सर्व कृष्णलीलाचे विस्तृत वर्णन केलेले आहे त्यात प्रामुख्याने गोपिकांच्या प्रेमाचे वर्णन केलेले आढळते

श्रीनारद आपल्या भक्तिलक्षणाकरिता ज्या गोपिकाचे उदाहरण घेतात त्याचे श्रेष्ठत्व आतापावेतो पाहिले. नारदाचे भक्तिलक्षण 'तदर्पिताखिलाचारिता तद्विस्मरणे परमव्याकुलता' हे गोपिकाच्या चरित्रात त्याना पूर्णरूपाने दिसून आले. स्वत· श्रीकृष्ण भगवानच गोपिकाच्या प्रेमनिमग्न अवस्थेचे वर्णन करतात

**तानाविदन्मय्यनुषङ्‌गः बद्धधिय. स्वमात्मानमथस्तथेदम् ।**
**यथा समाधौ मुनयोऽब्धितोये नद्य. प्रविष्टा इव नामरूपे ।।**

भा. ११-१२-१२

'समाधी अवस्थेमध्ये ज्याप्रमाणे योग्याना दृश्य नामरूपाचे भान राहात नाही, महासागरामध्ये प्रविष्ट झालेल्या नद्याना निराळे अस्तित्व राहात नाही त्याप्रमाणे प्रेमातिशयाने ज्याची अंत करणे माझ्याच ठिकाणी एकरूप झाली आहेत अशा गोपीना आपला देह, आपला जीव, पतिपुत्रादिक लोक-परलोक याचीही जाणीव राहिली नव्हती सर्वांचाच त्यांना पूर्ण विसर पडला होता.'

त्याचा सर्व आचार भगवत्पर कसा झाला होता याचे वर्णन श्रीएकनाथ महाराजांनी आपल्या टीकेतून विस्तृत आणि सुदर केले आहे.

ऐसिया मजलागी आसक्त । माझ्या ठायी अनन्यचित्त ।।
विसरल्या देहसुखें समस्त । अति अनुरक्त मजलागी ।।

करिता दळण काडण । माझे दीर्घस्वरें गाती गुण ।
की आदरिल्या दधिमंथन । माझे चरित्रगायन त्या करिती ।।

करितां सडासंमार्जन । गोपिकासी माझे ध्यान ।
माझेनि स्मरणे जाण । परिये देणे बालका ।।

गाईचें दोहन करिता । माझें स्मरणी आसक्तता ।
एवं सर्व कर्मी वर्ततां । माझ्या विसराची वार्ता विसरल्या ।।

करितां गमनागमन । अखंड माझ्या ठायीं मन ।
आसन भोजन प्राशन । करिता मद्धयान तयासी ।

ऐसी अनन्य ठायीच्या ठायी । गोपिकांसी माझी प्रीति पाही ।
त्या वर्तताही देहगेही । माझ्या ठायी विनटल्या ।।
या परी बुद्धी मदाकार । म्हणोनि विसरल्या घरदार ।
विसरल्या पुत्र भ्रतार । निज व्यापार विसरल्या ।।
विसरल्या विषयसुख । विसरल्या द्वंद्व दुःख ।
विसरल्या तहानभूक । माझेनि एक निदिध्यासे ।।
जेणें देहे पति-पुत्रांते । आप्त मानिले होतें चित्ते ।
तें चित्त रातलें मातें । त्या देहातें विसरोनि ।।
विसरल्या इह-लोक परलोक । विसरल्या कार्यकारण नि.शेख ।
विसरल्या नामरूप देख । माझे ध्यान सुख भोगितां ।।
जेवी का नाना सरिता । आलिया सिंधूतें ठाकिता ।
तेथे पावोनि समरसता । नामरूपता विसरल्या ।।
तेवी गोपिका अनन्यप्रीती । माझी लाहोनिया प्राप्ती ।
नामरूपाची व्युत्पत्ति । विसरल्या स्फूर्ती स्फुरेना ।।

नाथ भागवत अ. १३–१२

गोकुळामध्ये सहस्रावधी गोपिका होत्या त्याचे यूथ (संघ) होते. त्या प्रत्येकांची काही वैशिष्टचे होती त्या त्या संघाच्या प्रमुख नायिका ज्या त्यांची नावे ही भक्तिशास्त्रीय ग्रंथातून दिली आहेत गौडीय संप्रदायाचे एक श्रेष्ठ सत श्रीरूपगोस्वामी याच्या ‘ उज्ज्वल नीलमणी ’ नामक भक्तिशास्त्रावरील अपूर्व ग्रथात गोपिका प्रमुखाच्या काही नावाचा निर्देश केला आहे. राधा, चद्रावली, विशाखा ललिता, श्यामा, पद्मा, शैब्या, भद्रिका, तारा, विचित्रा, गोपाली, धनिष्ठा, पालिका मंगला, विमला, लीला, कृष्णा, विशारदा, तारावली, चकोराक्षी, शंकरी, कुंकुमा खञ्जनाक्षी, मनोरमा इत्यादी इत्यादी. एकएका यूथामध्ये अनेक गोपिका होत्या त्यात राधादी आठ या यूथप्रमुख मानल्या आहेत. म्हणून श्रीकृष्णही सागतात–

ज्यासी झाली माझी सगती । त्या एकदोन सांगो किती ।
शतसहस्र अमिती । निजपदाप्रती पावल्या ।।

एकनाथी भागवत १२–१३

स्वत: श्रीकृष्ण भगवान गोपिकांचा सर्व व्यवहार कृष्णमय कसा बनला होता हे उद्धवास गोकुळास निरोप देऊन पाठविताना सांगतात.

**ता मन्मनस्का मत्प्राणा मदर्थे त्यक्त दैहिकाः ।**
**मामेव दयितं प्रेष्ठ मात्मानं मनसागताः ।।** भागवत १०.४६.४

‘हे उद्धवा ! गोपिकाचे मन अखंड सर्व व्यवहार करीत असताही माझ्याच ठिकाणी अनुरक्त आहे. त्याचे प्राण, त्यांचे जीवनसर्वस्व मीच आहे, माझ्याकरिता

त्यांनी देहसंबंधी पति-पुत्र, सोयरे या सर्वांचा त्याग केला आहे, त्यांनी बुद्धीनेही मला आपला प्रियतम, एवढेच नव्हे तर, आपला आत्मा मानला आहे.' खरा भक्त तोच आहे की तो ज्या भज्य अशा प्रभूची भक्ती करतो त्याला ती प्रिय वाटली पाहिजे, या कसोटीस व्रजवासी गोपिकांची भक्ती पूर्ण रूपाने उतरते म्हणून नारद-महर्षींनी गोपिकाचे उदाहरण आपल्या भक्तीच्या लक्षणाकरिता स्वीकारले आहे. भगवद्भक्त श्रीतुकाराम महाराजानी आपल्या बाळक्रीडा प्रकरणातील अभगातून गोपिकाचा सर्व व्यवहार कृष्णमय कसा झाला होता याचे वर्णन केले आहे–

ज्यांचे कृष्णी तन-मन झाले रत । गृह-पति-सुत विसरल्या ॥
विष तया झाले धन-मान-जन । वसविती वन एकांती त्या ॥
क्षणभरी होता वेगळा तयांस । होती कासावीस प्राण त्यांचे ॥
त्याचे ध्यानी मनी सर्व भावे हरी । देह काम करी चित्त त्याचे ।
कृष्ण तया ध्यानी, आसनी, शयनी । कृष्ण देखे स्वप्नी कृष्णरूप ॥
तटस्थ राहिले सकळ शरीर । इंद्रियें व्यापार विसरली ॥
विसरल्या तहान, भूक, घरदार । नाही हा विचार असो कोठे ॥
विसरल्या आम्ही कोणीये जातीच्या । वर्णाही चहूंच्या एक झाल्या ॥

आणखीही अनेक अभंगातून गोपिकाच्या भक्तीचे वर्णन केलेले आढळते अखिल आचार भगवदर्पित होणे हे जे भक्तीचे नारदप्रोक्त लक्षण आहे ते व्रजवासी गोपिकाच्या ठिकाणी पूर्णत्वाने प्रतीत होते याबद्दल सर्व संताची एकवाक्यता आहे म्हणून सर्वानी भक्तिमार्गात त्याना फार श्रेष्ठ स्थान दिले आहे तसेच नारदांच्या भक्ति-लक्षणाचे दुसरे अंग ' तद्विस्मरणे परम व्याकुलता ' हेही गोपिकाच्या ठिकाणी पूर्ण दिसून येते त्याना कोणत्याही अवस्थेत श्रीकृष्णाचा विसर पडत नव्हता. मथुरा-निवासी कुलाङ्गना गोपिकाच्या अवस्थेचे वर्णन करितात व त्याना धन्य समजतात.

**या दोहनेऽवहनने मथनोपलेपप्रेंङ्खेङ्खनार्भरुदितोक्षणमार्जनादौ ।**
**गायन्तिचैनमनुरक्तधियोऽश्रु कण्ठ्यो धन्या व्रजस्त्रिय उरुक्रमचित्तयानाः ॥**

–भागवत, १०–४४–१५

' ज्या गोपिका गायीच्या दुधाचे दोहन करतेवेळी, साळी इत्यादी कुटताना, सडासंमार्जन करताना, बालकाना झोके देताना, दह्याचे विरजण घालताना, बालके रडत असताना गाणी म्हणत असता सर्व व्यवहारात प्रेमपूर्ण चित्ताने, अश्रुपूर्ण नेत्रानी श्रीकृष्णाचे गुणगान करतात, श्रीकृष्णाच्या ठिकाणी ज्याचे चित्त जडलेले आहे त्या धन्य आहेत.'

गोपिकांना क्षणभरही श्रीकृष्णाची विस्मृती पडत नव्हती; पण जर क्षणही त्याना श्रीकृष्णाचा वियोग झाला तर मात्र प्राणांतापेक्षाही त्यांना अधिक दुःख होत होते. रासलीलाप्रसंगी गोपिकांच्या प्रेमाची परीक्षा पाहण्याकरिता श्रीकृष्ण गुप्त

झाले तेव्हा त्याना त्या विरहाने किती दुःख झाले हा सर्व प्रकार भागवत दशमस्कंध अध्याय एकोणतीस ते तेहतीस (ज्याना रास पंचाध्यायी म्हणतात) यात विस्ताराने आला आहे त्या वेळी त्याची अवस्था कशी झाली होती याचे शुकाचार्यानी वर्णन केले आहे—

तन्मनस्कास्तदालापास्तद्विचेष्टास्तदात्मिका. ।
तद्गुणानेव गायन्त्यो नात्मागाराणि सस्मरुः ॥

भागवत १०–३०–४

'श्रीकृष्णाच्या ठिकाणीच ज्याचे मन लीन आहे, त्याचीच चर्चा, त्याच्याच लीलाचे अनुकरण करणाऱ्या, त्याच्याच ठिकाणी चित्ताची एकात्मकता प्राप्त केलेल्या, त्याच्याच श्रेष्ठ गुणाचे अहर्निश गायन करणाऱ्या त्या गोपिकाना आपल्या शरीराची किवा गृहादिकाची स्मृतीही नव्हती' श्रीकृष्णवियोगाने त्याच्या चित्तात किती व्याकुलता झाली होती हे गोपिकानी जे विरहगीत गायिले आहे, ज्यास भागवतामध्ये गोपीगीत अशी सज्ञा आहे त्यातून स्पष्ट होते प्रेमाची उत्कटता विरहात प्रतीत होते

त्या विरहाच्या व्याकुलतेत चिता, जागर, उद्वेग, कृशता, मलिनागता, प्रलाप, व्याधी, उन्माद, मोह, मृत्यू या दहा अवस्था प्रगट होतात श्रीशुकाचार्यानी गोपिकाच्या ठिकाणी या सर्वाची उत्कटता किती झाली होती याचे विस्तृत वर्णन या पाच अध्यायात केले आहे विरहाने व्यापलेल्या गोपी वृक्ष, पशू, पक्ष्याशीच बोलू लागल्या त्याच विरही अवस्थेतील श्रीज्ञानेश्वरमहाराजाचे अभग पुष्कळ आहेत. त्यापैकी प्रसिद्ध म्हणजे,

धनु वाजे घुणघुणा वारा वाजे रुणझुणा ।
भवतारकू हा कान्हा वेगी भेटवा का ॥ १ ॥
चांदवो चादणे चापे वो चंदनु ।
देवकीनंदनुविण नावडे वो ॥ २ ॥
चंदनाची चोळी माझे सर्व अंग पोळी ।
कान्ही वनमाळी वेगी भेटवा का ॥ ३ ॥
सुमनाची सेज शीतळ वो निकी ।
ओले आगीसारिखी वेगें विझवा कां ॥ ४ ॥

हा आहे श्रीसंत नामदेव, एकनाथ, तुकाराम, निळोबा याच्याही गाथ्यातून अशा विरहिणी भूमिकेवरील गोपिकाच्या प्रेमाचे वर्णन केलेले अभग आहेत. याचे तात्पर्य गोपिकांच्या व्याकुळतेच्या भूमिकेस सर्वानीच महत्त्व दिलेले आहे. भगवान श्रीकृष्णच उद्धवाजवळ त्याच्या व्याकुळतेचे वर्णन करीत आहेत.

बळिभद्रासमवेत तत्त्वता । अक्रूरें मज मथुरे नेता ।
तैं गोपिकासी जे झाली व्यथा । ते सागता मज न ये ।।
ते त्याची अवस्था सागता । मज अद्यापि धीर न धरवे चित्ता ।
ऐसे देवो सागता । कठी बाष्पता दाटली ।।
मज मथुरे जाता देखोनि । आसुवाचा पूर नयनी ।
हृदय फुटे मज लागुनि । प्रेमलोळणी घालिती ।।
पोटातील परमप्रीती । सारिता मागे न सरती ।
धरिले चरण न सोडिती । येती काकुळती मजलागी ।।
मजवीण अवघे देखती वोस । माझीच पुन पुन पहाती वास ।
थोर घालूनि निश्वास । उकसाबुकसी स्फुदत ।।
माझेनि वियोगे तत्त्वता । त्यासी माझी तीव्र व्यथा ।
ते व्यथेची अवस्था । बोली सागता मज न ये ।।

एकनाथी भागवत १२–१२५–३०

भक्तिशास्त्रकारानी तर सयोगातही वियोगोपल्लालन होत असणे ही भक्ति-प्रेमाची पराकाष्ठा सागितली आहे. श्रीसतश्रेष्ठ गुलाबराव महाराज यानी नारद-भक्तिसूत्रावरील आपल्या संस्कृत भाष्यात 'राधासुधानिधी' या काव्यातील एक श्लोक उद्धृत केला आहे

**अंकस्थितेऽपि दयिते कमपि प्रलापं हा मोहनेति मधुरं**
**विदधात्यकस्मात् ।**
**श्यामानुरागमदविव्हलमोहनांगी श्यामामणिर्जयतिकापि**
**निकुञ्जसीम्नि ।।**

'एका वेळी राधादेवी ही श्रीकृष्णाच्या अकावर असताही हे कृष्णा ! हे मोहना ! असा काही प्रलाप अकस्मात करू लागली याचे कारण शाम जो श्रीकृष्ण तद्विषयक अनुरागमदाने विव्हल झालेले तिचे हृदय हेच होय.

या विव्हलतेत भक्तीची पराकाष्ठा आहे; व हिचा व्रजवासी गोपिकामध्येच पूर्ण आविष्कार झाला होता म्हणून नारदानी आपल्या भक्तिलक्षणाकरिता गोपिकाचे उदाहरण घेतले आहे

यावर कोणी शंका घेईल की, गोपिका श्रीकृष्णाना परमात्मा समजत होत्या का ? त्या तर त्याला एक सुदर पुरुष म्हणून मानीत होत्या व जार बुद्धीने त्याच्या-वर प्रेम करीत होत्या, त्या कामासक्त होत्या, असे असता त्यांच्या त्या वैषयिक प्रेमाला भक्ती कसे म्हटले जाईल ? याच शकेचे उत्तर देण्याकरिता पुढील दोन सूत्राची रचना झाली आहे.

## सूत्र २२ व २३

### तत्रापि न माहात्म्यज्ञानविस्मृत्यपवादः ।। २२ ।।
### तद्विहीनं जाराणामिव ।।२३।।

**अर्थ :**

त्या अवस्थेमध्येही (गोपिकाना) माहात्म्यज्ञानाची विस्मृती होती असा अपवाद (कलक) देऊ नये ।।२२।।

तद्विहीन म्हणजे माहात्म्यज्ञानाविना (श्रीकृष्णास परमात्मा असे न जाणता केलेजा णारे प्रेम) जार प्रेमाप्रमाणे होईल ।।२३।।

**विवरण .**

भक्तिप्रेमाला महात्म्यज्ञानाची जोड असावी, नसता त्यात दोप निर्माण होण्याचा सभव असतो भेदबुद्धी, व्यभिचार, फलकामना, स्वसुखाभिलाष इत्यादी निर्माण होतात ' माहात्म्यज्ञानपूर्वक सुदृढ स्नेह विशेष म्हणजे भक्ती ' असे नारदाचे पाञ्चरात्रातील मत पूर्वी उद्धृत केले आहे श्रीज्ञानेश्वरमहाराज हीच गोष्ट दृष्टाताने सागतात—

पाहे पा शाखापल्लव वृक्षाचे । हे काय नव्हती एकाचि बीजाचे ।<br>
परी पाणी घेणे मुळाचे । ते मुळीचि घापे ।।<br>
का दहाही इद्रिये आहाती । इथें जरी एकेचि देहीची होती ।<br>
आणि इही सेविले विषय जाती । एकाचि ठाया ।।<br>
तरी करोनि रससोय बरवी । कानी केवि भरावी ।।<br>
फुले आणोनि बाधावी । डोळा केवी ।।<br>
तेथ रसु तो मुखेचि सेवावा । परिमळु तो घ्राणेचि घ्यावा ।<br>
तैसा मी तो यजावा । मीचि म्हणोनि ।।

ज्ञानेश्वरी ९ ३४६-४९

म्हणून गोपिकाना जर भगवत्तत्वाचे यथार्थ ज्ञान नसते तर ते प्रेम भक्ती या सज्ञेस प्राप्त झाले नसते तसेच मागील सूत्रात गोपिकाचे जे वर्णन केले आहे ते सर्व व्यर्थ झाले असते. सर्व ऋषी, मुनी, साधुसंत किंबहुना प्रत्यक्ष श्रीकृष्ण भगवान त्याच्या दिव्य व अलौकिक प्रेमाचे वर्णन करतो त्या अर्थी ते अलौकिक व माहात्म्यज्ञानयुक्तच प्रेम होते कित्येक बहिर्मुखाना संशय येणे शक्य आहे श्रीमद्भागवतामध्ये प्रत्यक्ष परिक्षिती राजानेच अशी शका घेतली होती, तिचे उत्तर शुकाचार्यांनी स्पष्ट दिले आहे.

**कृष्णं विदुः परं कांतं न तु ब्रह्मतया मुने ।**
**गुणप्रवाहोपरमस्तासां गुणधियां कथं ।।**

भागवत १०–२९–१२

परिक्षिती म्हणतो, गोपिका कृष्णास कात, पती समजत होत्या त्याना त्याच्या ब्रह्मरूपतेचे ज्ञान नव्हते, त्याचा गुणप्रवाहाचा बाध म्हणजे मोक्ष कसा झाला ?

याचे उत्तर शुकाचार्यांनी दिले आहे ते म्हणाले–

**उक्तं पुरस्तादेतत्ते चैद्यः सिद्धि यथा गतः**
**द्विषन्नपि हृषीकेशं किमुताधोक्षज-प्रियाः ।।१३।।**

' तुला पूर्वीच सागितले आहे की, चैद्य शिशुपालही श्रीकृष्णाच्या द्वेषाने मुक्त झाला, या गोपी तर त्या अधोक्षजाला प्रिय होत्या ' मानवाच्या आत्यंतिक कल्याणाकरिता भगवान व्यक्त स्वरूप धारण करतो गोपिकाना हे सर्व ज्ञात होते, म्हणून त्याना माहात्म्यज्ञान होते असे नारद म्हणतात माहात्म्यज्ञान म्हणजे भगवन्महत्त्व अनेक प्रकारचे असते रूप, गुण, माधुर्य, सत्ता, सामर्थ्य, ऐश्वर्य, व्याप्ती, भक्तरक्षण दुष्टनाश, दुरितनाश, शक्ती इत्यादि इत्यादि प्रकार सभवतात त्या सर्वांचे गोपिकाना ज्ञान सपूर्ण होते असे गोपीगीत व अन्य प्रसंगी त्याचे जे अनेक उद्‌गार व्यक्त झाले आहेत त्यावरून सिद्ध होते श्रीकृष्ण सामान्य मानव नव्हता तर परमेश्वर होता असे गोपिकानी म्हटले आहे (भा १०–२९–३३) तसेच गोपिका रासलीलाप्रसंगी वेणुनादाने मोहित होऊन श्रीकृष्णाकडे आल्या तेव्हा श्रीकृष्णानी त्याना परत घरी जाऊन आपल्या पतीची सेवा करा असा उपदेश केला असता गोपिकांनी श्रीकृष्णास उत्तर दिले की–

**यत्पत्यपत्यसुहृदामनुवृत्तिरंग स्त्रीणां स्वधर्म इति धर्मविदा त्वयोक्तम् ।**
**अस्त्येवमेतदुपदेशपदे त्वयीशे प्रेष्ठो भवान्स्तनुभृतां किल बंधुरात्मा ।।**

भा १०-२९-३२

' हे श्रीकृष्णा ! पती, पुत्र, बधू व स्वजनाची सेवा करणे हा स्त्रियाचा धर्म आहे असे तू म्हणतोस ते खरे आहे, पण हा उपदेश तर तुझीच सेवा करण्याची प्रेरणा देत आहे, तू भगवान आहेस, आमच्या पती, पुत्र, बंधू स्वजनादिकांचाही तूच आत्मा आहेस तुझ्यामुळेच त्याना पतीपणा प्राप्त झाला आहे. ' क्षीरसागरनिवासी लक्ष्मीही तुझ्या चरणरजाची इच्छा करते तुझा अवतार या व्रजात झाल्यापासून ही लक्ष्मी येथे कायमची वास्तव्य करून आहे तू या व्रजातील सर्वांचेच भय दूर करीत आहेस, तुझ्या सौंदर्याने त्रैलोक्याला शोभा प्राप्त होत असते. तू केवल गोपिका (यशोदा) नंदन नव्हेस तर अखिल प्राणिमात्राचा अंतरात्मा साक्षी आहेस. जे तुला अनन्यशरण होतात त्याना तू सर्व पातकांपासून मुक्त करतोस. ब्रह्मदेवाने या विश्वाच्या रक्षणाकरिता तुझी प्रार्थना केली होती, त्या प्रार्थनेवरून तू हा अवतार धारण केला आहेस, हे देवाधिदेवा, अनेक भक्त या दुःखमय संसारभयापासून मुक्त

होण्याकरिता तुझाच आश्रय घेतात. आणखीही गोपी असे वर्णन करतात की, हे श्रीकृष्णा ! तुझ्या लीलाकथाही अमृतस्वरूप आहेत. विरहाने तप्त झालेल्या लोकाना शांत करणाऱ्या आहेत मोठमोठ्या ज्ञानी पुरुषांनी त्यांचे गायन केले आहे. त्यांच्या महात्म्याचे वर्णन केले आहे. त्या कथा सर्व पाप तर नष्ट करतातच, त्याबरोबर परम मंगल कल्याणाचे दानही करतात जे तुमच्या या लीलाकथांचे गायन करतात. तेच या भूलोकात मोठे दान करणारे असे म्हणविले जातात. त्यांच्याच द्वारा जगावर सर्वांपेक्षा अधिक उपकार होतात तुमच्या कथेचे जर हे माहात्म्य आहे तर प्रत्यक्ष संगसौख्याचे वर्णन कोण करू शकेल ?

श्रीमद्भागवत दशमस्कंध, अध्याय एकोणतीस ते तेहतीसमध्ये जे रासलीलेचे वर्णन आहे त्यावरून व्रजवासी गोपिकांना महात्म्यज्ञान किती पूर्ण होते हे सहज सिद्ध होते.

गोपिकांच्या महात्म्यज्ञानाचे श्रीएकनाथमहाराज, श्रीकृष्ण-उद्धव संवाद प्रसंगी वर्णन करीत आहेत–

नवरसांचा रसिक । नवरंगडा मीचि एक ।
यालागी माझ्या कामी कामुक । भावो निष्टंक गोपिकांचा ।।
जीवा आतुलियें खुणें । मीचि एक निववू जाणे ।
ऐसें जाणोनि मज कारणें । जीवें प्राणें विनटल्या ।।
अंगी प्रत्यंगी मीचि भोक्ता । सबाह्य सर्वांगें मीचि निवविता ।
ऐसें जाणोनि तत्त्वतां । कामासक्तता मजलागी ।।
ऐसा सर्वकामदायक । पुरुषांमाजी मीचि एक ।
हा गोपिकी जाणोनि विवेक । भाव निष्टंक धरियला ।।

एकनाथी भागवत, अ. १२. १९७–२००

श्रीतुकाराममहाराजही म्हणतात–

लोका गोकुळीच्या झालें ब्रह्मज्ञान । केलिया वांचून जपतपें ।।
जपतपे काय करावी साधनें । जंव नारायणें कृपा केली ।।
सर्व जाणे एक विष्णु साच खरा । आणीक दुसरा नाही नाही ।।

व्रजवासी गोपिकांना सामान्य समजणे हे घोर अज्ञान आहे स्वतः चतुर्मुख ब्रह्मदेव श्रीकृष्णापुढे त्याचे वर्णन करीत आहे–

**अहोऽतिधन्या व्रजगोरमण्यः स्तन्यामृतं पीतमतीव ते मुदा ।।**
**यासां विभो वत्सतरात्मजात्मना यतृप्तयेऽद्यापि न चालमध्वराः ।।**

–भागवत १०–१४–३१.

' मोठमोठे यज्ञ तुमची तृप्ती करू शकत नाहीत, परंतु या व्रजातील गायी व गोपिकांची धन्य आहे, ज्यांची वासरे व बालके बनून तुम्ही मोठ्या आनंदाने त्यांचे

दुग्ध प्राशन केले आहे '

भक्तवर्य उद्धव तर आपली आत्यंतिक अभिलाषा प्रकट करून म्हणतो–

**आसामहोचरणरेणुजुषामहं स्यां वृन्दावने किमपि गुल्मलतौषधीनाम् ।**
**या दुस्त्यजं स्वजनमार्यपथं च हित्वा भेजुर्मुकुन्दपदवीं**
**श्रुतिभिर्विमृग्याम् ।।**

–भागवत १०–४७–६१

' माझ्याकरिता तर उत्कृष्ट गोष्ट हीच आहे की या वृंदावनामध्ये एखादे लहान झुडुप अवथा वेल बनून राहावे, म्हणजे या वृंदावनातील गोपिकाची चरणधूली माझ्यावर अखंड पडत राहील, या चरणधूलीत सुस्नात होऊन मी धन्य होईन, ज्याचा त्याग फार कठीण आहे, सर्व स्वजनांचा, लोक, वेद व आर्यमर्यादेचा सहज त्याग करून या गोपांगनांनी भगवान मुकुंदाच्या त्या पदवीची–प्रेममय स्वरूपाची–प्राप्ती करून घेतली आहे की ज्या स्थानाचा श्रुति अनादिकालापासून शोध घेत आहेत, पण त्याना ते सापडले नाही. ' शेवटी तर उद्धवाने त्या गोपिकाच्या पदरजासच नमन केले आहे.

**वन्दे नन्दव्रजस्त्रीणां पादरेणुमभीक्ष्णशः ।।**
**यासां हरिकथोद्गीतं पुनाति भुवनत्रयम् ।।**

भागवत १०–४७–६३

' नन्दाच्या व्रजामध्ये वास्तव्य करणाऱ्या व्रजस्त्रियांच्या चरणरजाना मी वारवार नमस्कार करतो, या गोपिकानी भगवताच्या लीलाकथाचे जे गायन केले आहे ते तिन्ही लोकांना पवित्र करीत आहे '

पूर्ण ब्रह्मस्वरूप स्थितीस प्राप्त झालेले श्रीशुकाचार्यंही या गोपिकाच्या भाग्याचे वर्णन करतात–

**नेमं विरिञ्चो न भवो न श्रीरप्यङगसंश्रया ।**
**प्रसादं लेभिरे गोपी यत्तत्प्राप विमुक्तिदात् ।।**

भागवत. १०–९–२०

' जो प्रसाद यशोदादिक गोपिकाना मिळाला तो ब्रह्मदेव, श्रीशंकर व अर्धांगिनी लक्ष्मीलाही प्राप्त झाला नाही. '

गोपिकाच्या श्रेष्ठत्वाची परिसीमा श्रीकृष्णानी रासलीला प्रसंगी गोपिकांशी बोलताना जी भाषा वापरली आहे त्यावरून पूर्णतया कळून येते.

**न पारयेऽहं निरवद्यसंयुजां स्वसाधुकृत्यं निबुधायुषापि वः ।**
**या माभजन्दुर्जरगेहश्रृंखलाः संवृश्च्य तद्व. प्रतियातु साधुना ।।**

भागवत १०–३२–२२

' श्रीकृष्ण भगवान गोपिकाना म्हणतात, तुम्ही माझ्याकरता गृह व गृहस्थ-

पणाच्या अभिमानाच्या सर्व अभेद्य बेडचा तोडून टाकल्या आहेत. वास्तविक मोठमोठे योगी-संन्यासीही त्या तोडू शकत नाहीत. माझ्याशी तुमचा हा आत्मिक संयोग सर्वस्वी निर्मल व निर्दोष आहे, मी जरी अमर अशा शरीराने अनंतकाल पावेतो तुमच्या प्रेमाचा, त्यागाचा नि सेवेचा मोबदला देण्याचा प्रयत्न करीन तरी ते शक्य नाही मी जन्मजन्मातरीचा तुमचा ऋणी आहे'

यापेक्षा त्या व्रजवासी गोपिकाच्या ठिकाणी असलेल्या परमात्मविषयक महात्म्यज्ञानाचे कोण विशेष वर्णन करू शकेल ? म्हणूनच श्रीनारद 'गोपिकांच्या ठिकाणी महात्म्य ज्ञानाची विस्मृती होती असा अपवाद देऊ नये, असा कलक लावू नये' असे अट्टाहासाने मांगत आहेत

संस्कृत भाषेत अपवाद शब्दाचा प्रयोग दोन अर्थात केला जातो असे व्याकरणामध्ये सामान्य विधि (उत्सर्ग) चा विशेष विधि द्वारा बाध वा संकोच होतो तेव्हा त्या विशेष नियमाला सामान्य नियमाचा अपवाद असे म्हटले जाते पूर्व मीमासा धर्मशास्त्रामध्येही अपवाद शब्दाचा याच अर्थामध्ये प्रयोग होत असतो असे वेदामध्ये 'मा हिंस्यात् सर्वाभूतानि' (कोणाही भूताची हिसा करू नये.) हा सामान्य नियम आहे, पण काही यज्ञात विधीने पशुहिंसा सागितली आहे, तो तेवढ्यापुरता अपवाद (म्हणजे सामान्य नियमाचा बाध) समजला जातो साहित्य-शास्त्रात अपवाद शब्द दुसऱ्याच अर्थाने योजिला जातो. असे परापवाद, मिथ्याप-वाद इत्यादी येथे अपवाद शब्द कलंक या अर्थाने योजिला आहे एक कथा आहे– एकदा भाद्रपद शुद्ध चतुर्थी तिथी होती, त्या दिवशी सायंकाळी पूजापात्रात दूर्वा, पुष्पे, अक्षता, चदन इत्यादी पूजासाहित्य घेऊन चंद्रावली नामक गोपी चद्राला अर्घ्य देण्याकरिता निघाली, रस्त्यात अकस्मात नारदमहर्षी भेटले. त्यानी विचारले की, अग ! तू आज हे काय करीन आहेस ? तुला वेड तर लागले नाही ? आज चतुर्थी आहे, आज चंद्रदर्शन निषिद्ध आहे. चंद्रावली म्हणाली, महाराज ! आज चंद्रदर्शन केल्याने काय होते ? नारद म्हणाले, निष्कारण कलंक लागतो– आळ येतो. चंद्रावली म्हणाली, तेच तर मला पाहिजे आहे. माझ्या अन्य सख्यांकडे श्रीकृष्ण पाहतात, हसतात व बोलतात. त्याच्या घरी जातात, पण या जगात मीच एकटी अशी भाग्यहीन कलंकिता आहे की माझ्याकडे ते पाहतही नाहीत मी अशी अपेक्षा करते की, सत्य भाग्यात नाही तर खोटा आळ तरी माझ्यावर यावा की श्रीकृष्ण भगवान माझ्याकडे पाहतात, बोलतात, माझा त्यांच्याशी सबंध आहे. असा खोटा आळ आला तरी त्यात माझा गौरवच आहे !

**मिथ्यापवादवचसाप्यभिमानसिद्धिः ।**

असो. येथे सूत्रात जो अपवाद शब्द आहे तो व्याकरण व धर्मशास्त्रातील अर्थाने नसून व्यावहारिक कलंक (दोष) या अर्थाने घ्यावा. भक्ताच्या जीवनात

प्रभूच्या महात्म्यज्ञानास विसरणे हा कलंक आहे पण असा कलंक गोपिकांच्या जीवनात मुळीच नाही, तर त्याना पूर्ण महात्म्यज्ञान होते हे वरील विवेचनावरून सिद्ध होते.

कित्येक वेळी गोकुळातील गोप-गोपी, नंद-यशोदा याच्या व्यवहारात त्यांना महात्म्यज्ञानाची विस्मृती झाली होती की काय असा भास होतो; पण तो भासच आहे, ती विस्मृती भगवानच मुद्दाम घडवून आणीत होता. असे जर न होईल तर दामबंधनादि लीलाच संभवल्या नसत्या पण एवढ्याने महात्म्यज्ञानाचा अभाव मानता येत नाही गोपिका वियोगावस्थेत जे गीत गायल्या त्यात पदोपदी महात्म्य ज्ञानाचा प्रत्यय येतो.

माझ्या अनन्य भक्ताना मी अज्ञानी ठेवीत नाही, मीच त्यांना बुद्धियोग देतो व त्यांच्या हृदयातील अज्ञानांधकार ज्ञान-दीपाने दूर करतो असे श्रीकृष्णांनी अर्जुनास गीतेच्या दहाव्या अध्यायात स्पष्ट सांगितले आहे श्रीमद्भागवत दशम-स्कंध अध्याय ब्याऐंशीमध्ये श्रीकृष्णानी स्वत· गोपिकाना अध्यात्मज्ञान सांगितले.

**अध्यात्मशिक्षया गोप्य एवं कृष्णेन शिक्षिता· ।।**
**तदनुस्मरणध्वस्तजीवकोशास्तमध्यगन् ।।** भागवत १०–८२–४८

'श्रीकृष्णानी गोपिकाना अध्यात्म शास्त्राचा उपदेश केला, त्या योगाने गोपिकाचा जीवकोश (जीवदशा) नष्ट होऊन त्याना श्रीकृष्णस्वरूपाची प्राप्ती झाली.' मात्र भक्ताना आत्मैक्यबोध झाला तरी यावदायुष्य प्रेमसुखाचा आस्वाद घेतच राहतात

कोणी म्हणेल, महात्म्यज्ञान नसले म्हणून काय बिघडले, ज्या वेळी श्रीकृष्ण या अवनीतलावर मूर्तरूपाने (द्वापारयुगात) वास्तव्य करीत होता तेव्हा तोच भगवान पूर्ण ब्रह्म होताच. त्याच्याशी काम, क्रोध, भय, स्नेह, द्वेष, सौहृद, ऐक्य कोणत्याही स्वरूपाने संबंध आला तरी त्याचा उद्धार होतो असे श्रीशुकाचार्यच म्हणतात.

**कामंक्रोधं भयं स्नेहं ऐक्यं सौहृदमेव च ।**
**नित्यं हरौ विदधतो यान्ति तन्मयतां हि ते ।।** भा. १०–२९–१५
**तमेव परमात्मानं जारबुद्ध्यापि संगताः ।**
**जहुर्गुणमयं देहं सद्यः प्रक्षीणबन्धना ।।** भा. १०–२९–११

'त्या परमात्म्याशी जारबुद्धीने जरी त्या रत झाल्या तरी त्याची सर्व बंधने सुटून त्यानी गुणमय देहाचा त्याग केला म्हणजे त्या मुक्त झाल्या.' देवाशी भिन्न भिन्न भावनेने ज्यांचा संबंध आला ते ते मुक्त झाले त्याची नावेही सांगितली आहेत. नारद युधिष्ठिर संवादात नारद म्हणतात–

**गोप्यः कामाद्भयात्कंसो द्वेषाच्चैद्यादयो नृपाः ।**
**संबंधाद्वृष्णयः स्नेहाद्यूयं भक्त्या वयं विभो ।।** भा. ७–१–३०

गोपिका कामभावनेने भयाने कंस, द्वेषाने शिशुपालादी राजे, संबंधाने यादव, स्नेहाने तुम्ही पांडव व भक्तीने आम्ही मुक्त झालो

हीच गोष्ट श्रीकृष्णमुखाने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही सांगितली आहे.

हेचि कवणें एकें मिसें । चित्त माझ्या ठायीं प्रवेशें ।
येतुलें हो मग आपैसे । मीचि होणे असे ।।
अगा वरी फोडावयालागी । लोहो मिळो का परिसाचे आंगी ।
कां जे मिळतिये प्रसंगी । सोनेचि होईल ।।
पाहे पा वालभाचेनि व्याजें । तिया व्रजांगनांची निजे ।
मज मीनलिया काय माझें । स्वरूप नव्हतीचि ।।
ना तरी भयाचेनिमिसें । मातें न पाविजेचि काय कंसे ।
की अखंड वैरवशे । चैद्यादिकी ।।
अगा सोयरेपणेचि पाडवा । माझें सायुज्य यादवा ।
की 'ममत्वे' वसुदेवा । दिकां सकळा ।।
नारदाध्रुवा अक्रूरा । शुका हन सनत्कुमारा ।
इया भक्ती मी धनुर्धरा । प्राप्यु जैसा ।।
तैसाचि गोपिकांशी कामे । तया कंसा भयसंभ्रमे ।
येरा घातकेया मनोधर्मे । शिशुपालादिका ।।
अगा मी येकु लाणीचे खागे । मग येवो ये भलतेनि मार्गे ।
भक्ती का विषये विरागें । अथवा वैरे ।। ज्ञा ९. ४६३–७०

एकादश स्कंधातही श्रीकृष्ण उद्धवास सागतात–

अंधारी गूळ खाता । कडू न लगे तो सर्वथा ।
तेवी नेणोनि माझी सच्छिदानंदता ।
माते सेविता मी झाल्या ।।
विष म्हणोनि अमृत घेतां । मरण जाऊनि ये अमरता ।
तेवी जारबुद्धी मातें भजतां । माझी सायुज्यता पावल्या ।।

–एकनाथी भागवत, १२. २०५–६

वरील शंकेचा आशय हा की, महात्म्यज्ञान नसले तरी केवल कामसंबंधाने भक्ती केली तरी उद्धार होतो हे खरे आहे; पण नारदांनी जे प्रेमाचे लक्षण सांगितले आहे व पुढेही ज्या प्रेमाचा विचार केला जाणार आहे त्या दृष्टीने पाहिल्यास महात्म्यज्ञान असणे आवश्यक ठरते. केवल कामसंबंधाने निरतिशय प्रेम प्रकर्ष संभवणार नाही, जसे भय, द्वेष इत्यादीसंबंधाने केवळ कंस शिशुपाला-

दिकांना मोक्ष मिळाला तसा कामसंबंधाने मोक्ष मिळेल, पण प्रेमयोगात मोक्ष-निरपेक्षता असते. भगवत्प्रेम प्रकर्ष हाच पुरुपार्थ मानला जातो. पुढे भक्ती हीच शांतिरूप व परमानदरूप आहे असे नारदानी म्हटले आहे. श्रीमधुसूदन सरस्वती फार मोठे अद्वैततत्त्वज्ञानी तसेच भक्तिशास्त्रकार होऊन गेले. त्यांचा भक्तिरसायन नावाचा भक्तिशास्त्रावर अपूर्व विवेचन करणारा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यात भक्तीच्या अकरा भूमिका त्यांनी सांगितल्या आहेत त्यात स्वरूपाधिगति म्हणजे परमात्म-स्वरूपाचे यथार्थज्ञान ही सहावी भूमिका मानली आहे व 'प्रेमपराकाष्ठा' ही शेवटची अकरावी भूमिका मानली आहे गोपिका या अंतिम भूमिकेवर आरूढ झालेल्या होत्या अतएव त्याना स्वरूपज्ञान यथार्थरूपाने झाले होते हे वरील विस्तृत विवेचनावरून समजण्यासारखे आहे.

जर त्याना महात्म्यज्ञान नसेल तर ते वैषयिक प्रेम होईल व ते निकृष्ट समजले जाते, म्हणून या पुढील सूत्रात 'तद्विहीनं जाराणामिव' म्हणजे महात्म्य-ज्ञानविहीन (रहित) प्रेम जारप्रेमाप्रमाणे निकृष्ट होईल असे नारद म्हणतात 'जरयति इति जार.' जो धर्माचा नाश करतो, पावित्र्याचा नाश करतो, नीतीचा नाश करतो तो जार. भगवत्प्रेमस्वरूप तर हृदयाला निर्मल पवित्र करणार आहे 'जाराणा' हे अनेकवचन अनेक घातक गोष्टी येथे एकत्रित आल्याप्रमाणे होईल हे सागत आहे सूत्रातील 'इव' हे पदही दृष्टान्त जसाच्या तसा अक्षरशः घेऊ नये हे सुचवीत आहे जार किंवा जारिणी हे केवल ऐंद्रिय सुखाची अपेक्षा करत असतात ते सुख मिळत राहील तोपावेतोच त्याचा समागम असतो, ते न मिळाल्यास परस्पराचा त्याग होतो, श्रीकृष्ण व गोपिकाचे अन्योन्य प्रेम अखंड, अबाधित व अव्यभिचारी होते, जार-प्रेम व वास्तव प्रेमातील भेद पुढील सूत्रामध्ये दाखविला आहे

## सूत्र २४

## नास्त्येव तस्मिंस्तत्सुखसुखित्वम् ।। २४ ।।

**अर्थ** :

त्यात (जार प्रेमामध्ये व महात्म्यज्ञानावाचून होणाऱ्या प्रेमामध्ये) प्रिय-तमाच्या प्रेमाने-सुखाने सुखी होणे हे नसते.

**विवरण** :

काम व प्रेम यांतील भेद या सूत्राच्याद्वारे स्पष्ट केला जात आहे. कामामध्ये

कामी स्त्री किंवा पुरुष स्वतःच्या सुखभोगाकडेच पाहत असतो. जारिणी जारापासून स्वतःला किंवा जार जारिणीपासून आपल्याला सुख व्हावे अशी इच्छा व प्रयत्न करीत असतो, व जोपावेतो ते सुख मिळत राहते तोपावेतोच अनुकूल संबंध राहतो. जर दुसऱ्याची सुख देण्याची शक्ती संपली किंवा प्रतिबंध आला तर परस्परांचा संबंधविच्छेद होतो हे कामाचे स्वरूप आहे. पण प्रेमात स्वसुखसुखित्वापेक्षा तत्सुख म्हणजे जो प्रेमविषय आहे त्याच्या सुखाने प्रेम करणारा सुखी होत असतो, किंवा स्वतःला सुखी समजत असतो. कामी पुरुष दुसऱ्याला भोग्य समजून स्वतःला भोक्ता समजतो. तसेच त्याचे प्रेम प्रेमविषयाच्या आत्म्यापेक्षा बाह्य स्वरूपावरच असते व त्या बाह्य विषयापासून ऐंद्रियिक सुखाचा भोग होत असतो. त्यासच तो श्रेष्ठत्व देतो. तो स्वतःला अंगी व ज्याच्यावर प्रेम करतो त्याला अंग समजतो. पण खरा प्रेमी स्वतःला अंग व प्रेमविषयाला अंगी समजत असतो; म्हणूनच त्याच्या ठिकाणी तत्सुखसुखित्व हे प्रेमाचे खरे लक्षण लागू पडते. 'उज्ज्वल नीलमणि' या ग्रंथामध्ये एक श्लोक आला आहे.

**स्यान्नः सौख्यं यदपि बलवत् गोष्ठमाप्ते मुकुंदे ।**
**यद्यल्पापि क्षतिरुदयते तस्य मार्गात्कदापि ।।**
**अप्राप्तेऽस्मिन्यदपि नगरादार्तिरुग्रा भवेन्नः ।**
**सौख्यं तस्य स्फुरति हृदिचेत्तत्र वासं करोतु ।।**

भक्तवर्य उद्धव गोकुळात श्रीकृष्णाचा निरोप घेऊन आला, काही दिवस तेथे वास्तव्य करून गोपिकांच्या दिव्य प्रेमाचा अनुभव घेतल्यावर परत जाताना वृषभानुकिशोरी राधेला त्याने संदेश मागितला. तेव्हा ती उद्धवाला म्हणाली, 'हे पाहा, प्रियतम शामसुंदर कदाचित येथे आला तर आम्हा सर्वांना अपार सुख होईल हे खरे. परंतु येथे येण्यामध्ये त्याला किंचितही क्लेश होत असतील तर त्याने येथे न आलेले बरे. त्याच्या न येण्याने आमच्या सर्वांच्या भीषण दुःखाला सीमा राहणार नाही, तरी तेथे वास्तव्य करण्यात त्याला सुख होत असेल तर तो आनंदाने तेथेच राहो. कारण त्याच्या सुखातच आम्ही सुखी होऊ.' हे वाक्य ऐकून भक्तवर्य उद्धवाचे तोंडून 'हे राधे ! तुझ्या दिव्य प्रेमाचा विजय असो' असे उद्गार निघाले.

अनेक भक्तांच्या मुखाने एक कथा ऐकण्यात येते ती अशी की, एकदा देवर्षी श्रीनारद द्वारकेत गेले, श्रीकृष्णाची भेट झाली, गोकुळातील काही जुन्या आठवणी निघाल्या, कारण श्रीकृष्णास त्या विसरणे शक्य नव्हते. नारद म्हणाले, 'देवा ! तुम्ही गोकुळवासी गोपिकांचे वारंवार स्मरण करीत असता त्यामुळे श्रीरुक्मिणीदेवी, सत्यभामादि आपल्या स्त्रिया या अप्रसन्न असतात, त्यांना वाटते आमचे श्रीकृष्णावर प्रेम नाही काय ? गोपिकांच्या प्रेमात अशी विशेषता काय आहे ?' यावर भगवान

श्रीकृष्ण म्हणाले, ' देवर्षे ! तुमच्या प्रश्नाचे उत्तर पुढे केव्हा तरी देईन, पण सध्या माझ्या मस्तकात फार वेदना होत आहेत, मला फार क्लेश होतात.' नारद म्हणाले, ' मी एखाद्या वैद्याला बोलावून आणतो.'

श्रीकृष्ण– वैद्याला आणणे व्यर्थ आहे. त्याच्या औषधाचा काही उपयोग होणार नाही.

नारद– मग कसे करावे ? आपणास बरे वाटण्यासाठी कोणता उपाय करावा ?

श्रीकृष्ण– उपाय आहे, औषध आहे, पण ते कोणी देईल तेव्हा ना ?

नारद– तुम्ही औषधाचे नाव तर सांगा, मी कोठूनही, कोणापासूनही आणीन.

श्रीकृष्ण– नारदऋषे, एखाद्या भक्ताची चरणधूली आणून ती मस्तकाला लावली तरच ह्या वेदना कमी होतील. ते औषध संपादन करण्याकरिता नारद बाहेर पडले. जो जो कोणी भक्त म्हणविणारा भेटेल त्याला नारदानी श्रीकृष्णाची वेदना सागावी व औषध मागावे. पण कोण असा सापडेल की आपली चरणधूळ देवाच्या मस्तकाला लावू देईल ? हे पाप करण्यास कोण तयार होईल ? द्वारकेत जाऊन पट्टराण्यानाही विचारले की, तुम्ही श्रीकृष्णाच्या पूर्ण भक्त आहा, पतिव्रता प्रेमी आहा, त्याच्याकरिता तुम्ही तरी ते औषध द्या. चरणधूली द्या. पण त्या म्हणाल्या, 'हरीहरी ! आपल्या पायाची माती त्या परमात्म्याच्या कपाळास लावावी, ज्याच्या पायावर ब्रह्मा, शिव, इंद्रादी तेहतीस कोटी देव आपली मस्तके नम्र करतात त्याच्या मस्तकास ही माती लावली तर कोणत्या नरकात जाऊन पडावे लागेल, नारदा, तुम्हाला विचारावे तरी कसे वाटते?' शेवटी निराश होऊन नारद परत श्रीकृष्णाकडे आले व सांगितले की, ' देवा ! पुष्कळ भक्त भेटले, पण कोणी पदरज देण्यास तयार नाही ' श्रीकृष्ण म्हणाले, ' नारदा, तुम्ही वृंदावनात गेला होता का ?'

नारद– त्या अडाणी खेड्यात राहणाऱ्या लोकांकडे जाऊन काय उपयोग ?

श्रीकृष्ण– एक वेळ तेथे जाऊन तर या !

देवर्षी त्या व्रजभूमित पोहोचले. त्यांना पाहताच सर्व गोपिका एकत्र झाल्या व आतुरतेने विचारू लागल्या, ' देवर्षे, तुम्ही कोठून आला ? तुम्ही सर्वत्र संचार करता, अशात कधी द्वारकेला गेला होता का ? आमचा हृदयनाथ जो श्रीकृष्ण त्याचा काही समाचार सांगू शकता काय ?

नारद– अहो, मी थेट द्वारकेहूनच येथे आलो, श्रीकृष्णाच्या मस्तकात फार पीडा होते आहे.

गोपिका– अरेरे, तेथे कोणी उपाय जाणणारा वैद्य नाही काय ?

नारद– वैद्य आहे, पण त्यानी सांगितलेले औषध उपलब्ध होत नाही.

गोपिका– असे न मिळणारे औषध तरी कोणते आहे ते ?

नारद– कोणी श्रीकृष्णाचा प्रेमी असेल त्याने आपली पदधूली दिली तर त्याची पीडा दूर होईल.

गोपिका– पाहिजे तेवढी धूळी घेऊन जा.

सर्वांनी आपल्या पायाची धूळ काढून दिली.

नारद– तुम्ही फार भोळया दिसता. आपण काय करतो याची कल्पना तरी तुम्हाला आहे काय ? श्रीकृष्ण साक्षात परब्रह्म परमात्मा आहे आपली चरणधूली त्याच्या मस्तकाला लावली तर नरकात जावे लागेल याचा विचार केला काय ?

गोपिका– ह्या सर्व गोष्टीचा विचार नंतर, प्रथम तुम्ही लगेच द्वारकेला ही घेऊन जा, त्याची वेदना दूर होऊ द्या, त्याला सुख झाले तर आम्ही अनंतकाल पावेतो नरकात राहू, तो नरकच आम्हाला स्वर्गापेक्षा श्रेष्ठ आहे. त्याला दुःख होत असता आम्ही स्वर्गात राहिलो तर तो स्वर्गही नरकच आहे !

हे खऱ्या प्रेमाचे स्वरूप आहे ! प्रेमात औदार्य असते. तेथे सर्वच दान आहे, तृप्ती आहे. 'यत्प्राप्य न किञ्चिद्वाञ्छति' असे आरंभीच सूत्र पाचमध्ये म्हटले आहे. प्रेमी मागेल तरी प्रेमच मागेल, देईल तर सर्वस्व देईल.

हृदयात अन्य कामना धारण करणारा भिक्षुक असतो. तो मागतच असतो. आपल्यात तो अभावच अभाव म्हणजे अपूर्णता पाहत असतो. तेथे तृप्ती नसते. प्रेम प्राप्त झाले असता तो प्रेमी सिद्ध होतो, अमृत होतो, तृप्त होतो, असे चौथ्या सूत्रात म्हटलेच आहे कामी हा भोग्य वस्तूपासून स्वत स भिन्न समजतो. प्रेमी त्या प्रेमविषयाला आपला आत्माच समजतो म्हणून त्याच्याच सुखाने तो सुखी होतो स्वसुख हे त्याच्या सुखाहून त्याला वेगळे वाटत नसते.

## सूत्र २५

## सा तु कर्मज्ञानयोगेभ्योऽप्यधिकतरा ।। २५।।

**अर्थ :**

ती (भक्ती) तर कर्म, ज्ञान व योगापेक्षाही श्रेष्ठतर आहे.

**विवरण :**

आतापावेतो ज्या भक्तीचे परमप्रेमरूपा, अमृतरूपा, अकामयमाना इत्यादी

विशेषरूपाने वर्णन केले आहे, ती भक्ती सामान्य नाही, तर कर्म, योग व ज्ञान या सर्व साधनापेक्षा श्रेष्ठ आहे हे या सूत्रात स्पष्ट सागितले आहे

मानवाच्या उद्धाराकरिता शास्त्रादिकातून जी साधने सागितली जातात त्याचे अधिकारपरत्वे तीन विभाग पडतात कर्म, ज्ञान व योग कोणास त्यापैकी कर्ममार्ग श्रेष्ठ वाटतो येथे कर्म म्हणजे ज्याच्या त्याच्या वर्ण-आश्रमादिकास जे विहित कर्म वेदात सागितले आहे ते भगवद्‌गीता, स्मृति इत्यादिकातून त्याचे स्वरूप विस्ताराने सागितले आहे. त्याचे चार प्रकार आहेत नित्य-नैमित्तिक, काम्य व निपिद्ध संध्या, वैश्वदेव, पचमहायज्ञादी नित्यकर्मे ती रोज योग्य रीतीने केलीच पाहिजेत, न केली तर प्रत्यवाय आहे श्राद्धे, अग्निहोत्रातील इष्टी, ग्रहणादिकातील कर्तव्ये ही नैमित्तिक कर्मे होत इहपर भोगप्राप्त्यर्थ पुत्रकामेष्टी इत्यादी काम्यकर्मे होत, व वेदात ज्याचा करू नये असा निषेध सागितला आहे अशी सुरापान, अविधीहिसा, मासभक्षणादी निषिद्ध कर्मे होत ती केली असता पाप निर्माण होते, या निषिद्ध कर्माचा विचार करण्याचे कारण त्याकडे मनुष्याची विकारामुळे सहज प्रवृत्ती असते, त्यात तामस सुखाचा भोग मिळतो, जरी परिणामी तो घातक असतो तरी प्रारभात सुख प्रतीत झाल्यामुळे अज्ञानी, अविवेकी पुरुषाची त्या निपिद्ध कर्मात प्रवृत्ती झालेली दिसून येते अशी निपिद्ध कर्मे अनेक प्रकारची असून मनुष्यास त्यापासून वाचवण्याकरिता त्याचा विचार वेदामध्ये केला जातो

वेदे न करिता प्रेरणा । विषयावरी सहज वासना ।
स्वभावे सकळ जना । सदा जाण सर्वांसी ॥
माससेवना मद्यपाना । मिथुनीभूत मैथुना ।
ये अर्थी सर्वजना । तीव्र वासना सर्वदा ॥
तेथे सेव्यासेव्य परवडी । विवचना कोण निवडी ।
लागली विषयाची गोडी । ते अनर्थ कोडी करतील ॥
हे विषयाचे त्रिविध विदान । मैथुन मास भक्षण सुरापान ।
यदर्थी निवृत्तीच प्रमाण । हे मनोगत पूर्ण वेदाचे ॥
विषयापासूनि निवृत्ति । वेद विभागे हेचि द्योती ।
परी धरावी विषयासक्ती । वेदोक्तीसर्वथा न घडे ॥

एकनाथीभागवत, ५.२०८-४०

कर्म चतुर्विध येथ । नित्य आणि नैमित्त ।
काम्य आणि प्रायश्चित्त । जाण निश्चित विभाग ॥
नित्य आणि नैमित्तिक । हे कर्म जाण आवश्यक ।
साडोनिया फळाभिलाख । विधिप्रमुख आचरावे ॥
काम्य कर्म आवश्यक । त्यजावेगा नि.शेख ।
जेवी का वमिले वमक । परतोनि लोक न पाहती ॥

नाथभागवत अ १० ४७-५२

असे हे कर्माचे विविध प्रकार आहेत त्यात देश, काल, वय, अवस्था, वर्ण, आश्रम, अधिकार अशा विविध अडचणी असतात केवळ प्रथम आचमन करावयाचे असते, त्यात पाणी आचमनाम किती घ्यावे एथपासून विधी सागितले आहेत श्रीनाथमहाराज सागतात–

कर्मी आचमन करावे । तेथ माष मात्र जळ घ्यावे ।
न्यूनाधिकत्वासवे । दोष पावे सुरापानसम ।। ६–९८

या कर्मातच मंत्रविद्या, यज्ञ, दान, तप इत्यादी साधनाचा अतर्भाव होतो, यात किती विघ्ने निर्माण होतात व ही साधने कडेला जाणे किती अवघड आहे, याचे विवेचन श्रीनाथमहाराज करतात–

मत्रविद्याग्रहण । विकळ उच्चारिता वर्ण ।
शुद्धी नव्हे परी दारुण । पातक पूर्ण अगी वाजे ।।
करिता शास्त्र-श्रवण । चौगुणा गर्व चढे पूर्ण ।
तो ज्ञातेपणाचा अभिमान । न निगे जाण चतुर्मुखा ।।
करिता वेदाध्ययन । विस्वर गेलिया उच्चारण ।
शुद्धी नव्हेचि परी मरण । अवश्य जाण वृत्रासुरा ऐसे ।।
दान देता नृग बहुवस । कृपी झाला कृकलास ।
प्राप्ती दूरी परी नाश । असमसाहस रोकडा ।।
तप करिता ऋष्यश्रृगासी । तो वश झाला वेश्यासी ।
श्रद्धा श्रवणाचिया ऐशी । शुद्धी आणिकासी पै नाही ।।
कर्म करावे यथानिनुती । तव त्या कर्माची गहन गती ।
प्राचीन बर्ह्याची कर्म स्थिती । नारदोक्ती साडविली ।।

नाथभागवत ६. ९२-७

सर्व देव श्रीकृष्णनिर्याणसमयी तेथे उपस्थित झाले, त्यानी श्रीकृष्णाची जी प्रार्थना अनेक प्रकारे संबोधने देऊन केली त्या प्रसंगी ते म्हणतात–

**एवं दुष्ट हृदय ज्यासीं । तपादिक साधनें त्यासीं ।**
**शुद्धि नव्हे हृषीकेशी । श्रवणें कीर्तीसी नायकतां** ।। ९९ ।। अ. ६

तात्पर्य, कर्माचे आचरण करीत असता अनेक प्रत्यवाय निर्माण होत असतात, श्रीतुकाराम महाराज स्पष्ट सागतात–

कर्म धर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन ।।

भक्तीमध्ये अशा अडचणी नसतात. तेथे देश, काल, जाती, आश्रम, वर्ण. व्यक्ती अधिकाराचा प्रश्नच नाही काही विघ्ने आल्यास भगवानच ती सर्व विघ्ने दूर करीत असतो.

तसाच ज्ञानमार्ग हाही श्रेष्ठ असा वेद, उपनिषदे, सूत्रादी ग्रथातून सांगितला

आहे. विना ज्ञानाच्या मोक्ष प्राप्त होतच नाही असा उपनिषदाचा सिद्धान्त आहे, **'तमेव विदित्वा अतिमृत्युमेति । नान्य. पथा विद्यतेऽयनाय'** त्या परब्रह्माला अपरोक्ष स्वरूपाने जाणूनच मुमुक्षू मृत्यूचे उल्लघन करून जातो, मोक्षाकरिता दुसरा मार्गच नाही, असा वरील वचनाचा अर्थ आहे कर्म-उपासनादिकाचा अज्ञानाशी विरोध नाही म्हणून ती अज्ञान दूर करून मोक्ष प्राप्त करून देऊ शकत नाहीत. ज्ञानाचा म्हणजे आत्मज्ञानाचात्र अज्ञानाशी विरोध आहे म्हणून अज्ञानमूलक संसारबधाची निवृत्ती होऊन मोक्ष प्राप्त होतो, असा वेदान्तशास्त्राचा सिद्धान्त आहे. भगवद्-गीतेमध्येही ज्ञानाचे महात्म्य पुष्कळ सागितले आहे पण त्या ज्ञानाचे फळ प्राप्त होण्यास अगोदर साधनचतुष्टय सिद्ध झाले पाहिजेत. नित्यानित्यविवेक, इहामुत्र-फलभोगबिराग, शम, दम, उपरती, तितिक्षा, श्रद्धा, समाधान, तीव्र मुमुक्षुत्व ह्याना साधनचतुष्टय म्हणतात, ही साधने सिद्ध होणे फार कठीण आहे. यानंतर मग श्रीगुरुशरणागती, योग्य ब्रह्मनिष्ठ श्रोत्रिय गुरूंची भेट होणेही सोपे नाही मग महावाक्याचे श्रवण, मनन, निदिध्यासन व मग साक्षात्कार. श्रवणाने प्रमाण प्रमेय असभावनादिकाची निवृत्ती होऊन साक्षात्कार होणेही कित्येकदा कठीण जाते कारण वर्तमान प्रतिबध विषयासक्ती, प्रज्ञामान्द्य, विपर्यय (विपरीत ज्ञान) दुराग्रह इत्यादी आडवे येतात, कदाचित भूतप्रतिबध, आगामी प्रतिबंधही आडवे येतात ते ज्ञानोत्पत्तीस अडथळे आणतात त्यातही महावाक्य श्रवणाचा अधिकार सस्कारवान् त्रैवर्णिकानाच कोठे कोठे सागितला आहे इतकेच नव्हे तर 'सन्यस्य श्रवण कुर्यात्' असा सन्यास आश्रमीयानाच श्रवणाचा अधिकार आहे व सन्यास आश्रमात फक्त ब्राह्मणच अधिकारी होतो असे म्हटले जाते म्हणजे 'अन्याना श्रवणाचा अधिकारच नाही, मग ज्ञान कोठले ? म्हणजे ज्ञानमार्गात फार अडथळ आहेत. अव्यांक्तोपासकाना

**तयामहेंद्रादिपदे । करिताति वटवधे ।**
**ऋद्धिसिद्धींचीं द्वंद्वें । पडोनि ठाती ।। ज्ञानेश्वरी १२–६१**

अशी विघ्ने येतात. महेद्रादिपदे वाटमारेपणा करीत असून ऋद्धिसिद्धीपासून प्राप्त होणारी सुखदु खादी द्वंद्वे ब्रह्मप्राप्तीच्या आड पडून राहतात, असे श्रीज्ञानेश्वरमहाराजानीही सागितले आहे. तसेच वेदान्तश्रवण, निर्गुणध्यान या साधनातही लय, विक्षेप, कषाय, रसास्वाद हे अंतराय निर्माण होतात असे वर्णन आहे.

श्रवणी ध्यानी अंतराय । लय विक्षेप कषाय ।
का रसास्वादुही होय । हे चारी अपाय चुकवावे ।। ए. भा.
११. ७०६

म्हणजे ज्ञानमार्गात किती विघ्ने, संकटे, काठिण्य असते व तो सर्वांकरिता नाही.

आता योगमार्गाचा विचार केला तर तो फारच अवघड म्हणून सांगितला

गेला आहे श्रीकृष्ण उद्धवास सागतात–

अष्टांग योगी दुर्जयो पवन । सर्वथा साधेना जाण ।
साधला तरी नागवण । अनिवार जाण सिद्धीची ।।

ए. भा. १२–४७

योगसाधनाचा आरंभ यमनियमापासून होतो. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधी अशा आठ अंगानी योग साध्य होत असतो. या प्रत्येकाचे प्रकार अनेकविध आहेत तसेच याही मार्गात अनेक प्रतिबध निर्माण होतात. त्याचे प्रकार योगशास्त्रात सागितले आहेत.

**व्याधिस्त्यानसंशयप्रमादालस्याविरतिभ्रान्तिदर्शनालब्ध।**
**भूमिकत्वानवस्थितत्वानि चित्तविक्षेपास्तेऽन्तरायाः ।।**

**पातंजल योगशास्त्र** १–३०

'व्याधी म्हणजे वातकफपित्तादी प्रकोपाने उत्पन्न होणारे ज्वरादी रोग, 'स्त्यान' म्हणजे योगानुष्ठान करण्यास चित्ताचे सामर्थ्य नसणे, सशय, प्रमाद, आलस्य, वैराग्य नसणे, विपरीत ज्ञान, अभ्यास करूनही योगमार्गातील भूमिकांची प्राप्ती न होणे, कदाचित एखादी भूमिका प्राप्त झाली तरी तेथे चित्त अखड स्थिर न राहणे असे नऊ चित्तविक्षेप चित्तास प्रतिबंध करणारे आहेत. शिवाय दुःख, इच्छेचा भंग झाल्याने चित्त चचल होणे, कप, श्वास-प्रश्वासात दोष हे त्या विक्षेपाबरोबर होणारे आणखीही काही विकार प्रतिबधक आहेत यामुळे योगमार्ग साधणे अशक्य होऊन जाते म्हणूनच, 'योग-याग विधी येणे नोहे सिद्धी । वायाचि उपाधि दभ धर्म ।।' असे आपल्या हरिपाठात श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात इतर साधनात जे प्रतिबध वा अडथळे निर्माण होतात, जी विघ्ने निर्माण होतात ती साधकास स्वसामर्थ्याने, स्वप्रयत्नाने दूर करावी लागतात. पण भक्तिप्रेमाचे श्रेष्ठत्व असे आहे की तो मार्ग निर्विघ्न आहे. श्रीकृष्ण उद्धवास सागतात–

एवं निर्विघ्न मजमाजी सरता । मार्ग नाही भक्तिपरता ।
त्रिसत्य सत्य गा सर्वथा । भक्ति तत्त्वता मज पढिये ।।

ए. भा. ११–१५८७

तसेच कर्म, ज्ञान, योग या मार्गाना भक्तीची अपेक्षा आहे, पण भक्तिमार्ग हा अन्य साधन निरपेक्ष आहे.

इतर साधने व्युत्पत्ति । दूरी साडूनि परती ।
श्रद्धायुक्त माझी भक्ती । धरिल्या हाती मी लाभे ।।

ए भा. १४–२६३

तसेच धर्म, तप, विद्या इत्यादिक साधने भक्तिरहित पुरुषाला पावन करीत

नाहीत असे श्रीकृष्ण भगवान स्पष्ट सांगतात.

**धर्मः सत्यदयोपेतो विद्या वा तपसान्विता।**
**मद्भक्त्यापेतमात्मानं न सम्यक् प्रपुनातिहि** ।। भागवत ११–१४–२२

'सत्य आणि दया यानी युक्त असलेला धर्म, किंवा तपश्चर्येने युक्त असलेली विद्या मद्भक्तिरहिताना पूर्णत्वाने पुनीत करू शकत नाही.'

माझे भक्तीवीण कर्मधर्म। जाण पा तो केवळ श्रम।
चुकले मत्प्राप्तीचे वर्म। तो धर्म अधर्म परिणमे ।।
माझे भक्तीवीण सत्यवादू। तो जाण पा जैसा गर्भांधू।
प्रतिपदी घडे प्रमादू। अध:पतन बाधू देखेना ।।
भक्तीवीण दयेची थोरी। जेवी पुरुषेवीण सुंदरी।
ते विधवा सर्व धर्मा बाहेरी। तैसी परी दयेची ।।
माझे भक्तीवीण जे विद्या। ते केवळ जाण पा अविद्या।
जेवीं वायस नेणती चांदा। तेवी माझ्या निजबोधा नोळखिती ।।
चंदन-भार वाहे खर। परि तो नेणे सुवासाचे सार।
माझेनि भक्तीवीण विद्याशास्त्र। केवळ भारवाहक ।।
माझे भक्तीवीण जे तप। शरीरशोषणादि अमूप।
तें पूर्वदृष्टे भोगी पाप। नव्हे सद्रूप तप:क्रिया ।।
माझे भक्तीवीण जे साधन। ते कोशकीटाच्या ऐसे जाण।
आपण्या आपण बंधन। भक्तिहीन क्रिया ते ।।

ए. भा. १४ २९९–३०५

याचे तात्पर्य हे की, कर्म, ज्ञान योगादी साधने भक्तीची अपेक्षा ठेवणारी आहेत. भक्ती ही मात्र स्वतंत्र व अन्यसाधननिरपेक्ष आहे. भगवान श्रीकृष्ण सांगतात–

**तस्मान्मद्भक्तियुक्तस्य योगिनो वै मदात्मनः।**
**न ज्ञानं नच वैराग्यं प्रायः श्रेयोभवेदिह** ।। भागवत ११–२०–३१

'अनन्यभक्तीने माझ्या ठिकाणी जो एकरूप झाला आहे अशा भक्ताला ज्ञान आणि वैराग्य यांचे फारसे प्रयोजन राहत नाही'

करू नेणे कर्माचरण। न साधिता वैराग्य ज्ञान।
भावें करितां माझें भजन। माझ्या स्वरूपी मन ठेऊनि ।। ३८७ ।।
तेथ ज्ञान कर्मादिकें जाण। मुख्य वैराग्यही आपण।
मद्भक्तीसी येती लोटांगण। चरणा शरण पैं येती ।। ३८८ ।।
एवं भक्ति आपुले अंकी जाण। करी ज्ञानादिकाचे लालन।
परमानंद पाजूनि पूर्ण। करी पालन निजांगे ।। ३९० ।।

ते आतुडल्या माझी भक्ती । ज्ञानदिकें कामारी होती ।
तेचिविखी उपपत्ती । स्वये श्रीपती सागत ।। ३९१ ।।
यत्कर्मभिर्यत्तपसा ज्ञानवैराग्यतश्चयत् ।
योगेन दानधर्मेण श्रेयोभिरितरैरपि ।। ३२ ।।
सर्वं मद्भक्तियोगेन मद्भक्तो लभतेऽञ्जसा ।
स्वर्गापवर्गंमद्धाम कथ चिद्यदि वाञ्छति ।। ३३ ।। **भागवत ११-२०**
जे पाविजे स्वधर्म कर्मादरे । जे पाविजे निर्बन्ध तपाचारे ।
जे साख्यज्ञानविचारे । पाविजे निर्धारे जे वस्तु ।। ३९२ ।।
जे पाविजे विषयत्यागे । जे पाविजे अष्टागयोगे ।
जे वाताबुपर्णाशनभोगे । जे दानप्रसगे पाविजे ।। ३९३ ।।
जे साधे वेदाध्ययने । जे साधे सत्यवचने ।
जे साधे अनेकी साधने । ते मद्भजने पाविजे ।। ३९४ ।।
हे न सोशिता साधन साकडे । नुल्लघिता गिरिकपाटकडे ।
ही सकळ फळे येती दारापुढे । जै माझी आतुडे निजभक्ती ।।
ए. भा. २०.३८७–९५

यावरून भक्ती ही सर्व मार्गापेक्षा 'अधिकतर' कशी आहे, हे कळून येते. महर्षी शांडिल्यानीही आपल्या भक्तिसूत्रात भगवद्गीतेचा आधार देऊन भक्तीचे श्रेष्ठत्व सिद्ध केले आहे

तदेव कर्मिज्ञानियोगिभ्य आधिक्य शब्दात् ।। १–२–१५

कर्मी, ज्ञानी, योगी याच्यापेक्षा ती प्रेमभक्ती श्रेष्ठ आहे; कारण भगवद्गीतेमध्ये तिच्याकरिता 'अधिक' शब्दाचा प्रयोग केला आहे. ते श्लोक असे आहेत

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिक. ।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन** ।। ४६ ।।
**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तराऽऽत्मना ।**
**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मत**ः ।। ४७ ।। गीता ६ ४६–७

'तपस्वी पुरुषापेक्षा योगी श्रेष्ठ, ज्ञान्यापेक्षाही योगी श्रेष्ठ व विहित कर्मानुष्ठान करणाऱ्यापेक्षाही योगी श्रेष्ठ आहे, म्हणून अर्जुना ! तू योगी हो तसेच सर्व प्रकारच्या योग्यांमध्येही माझ्या स्वरूपी ज्याचा अतरात्मा प्रविष्ट झाला आहे, व श्रद्धायुक्त जो माझी भक्ती करतो तो सर्व योग्यामध्ये युक्ततम, श्रेष्ठ, आहे, असे मला वाटते.

योगेश्वर भगवान श्रीकृष्णच सर्व मार्गांपेक्षा भक्तीचे आधिक्य श्रेष्ठत्व-प्रतिपादन करतो यापेक्षा अन्य कोणते प्रबल प्रमाण पाहिजे ? पुढे शेवटी एक्यांशीव्या सूत्रात अट्टाहासाने नारदमहर्षी

त्रिसत्यस्य भक्तिरेव गरीयसी भक्तिरेव गरियसी ।।

भक्तीच श्रेष्ठ आहे, भक्तीच श्रेष्ठ आहे असे सागतात.

या सूत्रात भक्तीचे जे श्रेष्ठत्व पटवून दिले त्याचे आणखी एक महत्त्वाचे कारण सागण्याकरिता पुढील सूत्राची रचना आहे.

## सूत्र २६

## फलरूपत्वात् ।। २६ ।।

**अर्थ** :

(ती भक्ती) फलस्वरूप आहे म्हणून (सर्व साधनापेक्षा श्रेष्ठ आहे )

**विवरण** :

मागील सूत्रात भक्ती ही कर्मज्ञान-योग याच्यापेक्षा श्रेष्ठ आहे असे सागितले. कर्म-ज्ञान-योग इत्यादि साधनाना भक्तीची अपेक्षा आहे, पण भक्ती ही स्वत: निरपेक्ष आहे. सहसा मनुष्याची स्वैर-विषय. सेवनाकडे प्रवृत्ती असते ती दूर करून मल म्हणजे पापवासना या दोषातून मुक्त होण्याकरिता वेदाने विहित कर्माचे विधान सागितले आहे. पण भक्ताचे चित्त सदैव भगवताच्या ध्यानात, चितनातच असते.

भक्ताचे विषयी नाही चित्त । त्याचा विषय तो मी भगवत ।
ते सदा मजमाजी लोलुप्त । नित्य मुक्त या लागी ।। ६६३ ।।

ए. भा. ११

असे श्रीकृष्ण उद्धवास सागतात. ज्याची सर्व कायिक, वाचिक, मानसिक कर्मे भगवंताप्रीत्यर्थच होतात त्याला पुन्हा वेगळे विहित कर्म करण्याची आवश्यकताच काय ? मागे सूत्र एकोणवीसमध्ये ' तदर्पिताखिलाचारता ' हे लक्षण सागितलेच आहे. तसेच योग हा चित्तवृत्तिनिरोधस्वरूप आहे, पण भक्ताचे चित्त सहजच भगवद्रूप बनलेले असते.

विषय तो त्याचा झाला नारायण । नावडे जनधन माता पिता ।।

तुकाराम महाराज

ज्याचा सहजयोग भगवत्स्वरूपाशी जडला आहे त्याला अन्य योग कशाला ? तसेच ज्ञान हे साधन भवबंधनाशाला उपयुक्त आहे. अज्ञानमूलक संसारबंध ज्ञानानेच नष्ट होतो व तत्द्वारा जीवाला आत्यंतिक दुःख निवृत्तिस्वरूप व परमानंदावाप्तिरूप मोक्षाची प्राप्ती होते. पण भक्ताला भवबंध आहेच कोठे ? जे प्रेम प्राप्त झाले

असता तो पुरुष सिद्ध होतो, तृप्त होतो, अमृत होतो असे आरंभाच्या सूत्रांतून नारदानी सांगितले आहे तेथे भवबंध कोठला ? अतएव भक्तांकरिता सर्व अनिष्ट निवृत्ती व इष्ट प्राप्ती घडवून आणणारी भक्ती आहे म्हणून ती सर्वांपेक्षा श्रेष्ठ असे सांगितल्यानंतर आता ती भक्ती फलरूपा आहे म्हणून तिचे श्रेष्ठत्व सांगत आहेत.

मागील सूत्रात सांगितलेली कर्म, ज्ञान व योग ही साधनेच राहतात, कारण याचे साध्य त्या साधनाहून वेगळे असते, ते साध्य प्राप्त झाल्यानंतर साधन म्हणून त्याचे महत्त्व उरत नाही. कर्म हे साधन चित्तशुद्धिरूप फलाचे आहे. (पण पुढे चित्तशुद्धी हेही साधनच होते ! ) योग हे साधन चित्तवृत्तिनिरोध किंवा सविकल्प; निर्विकल्प समाधीकरिता सांगितले आहे; व ज्ञान हे मोक्षाचे साधन आहे. साध्य-प्राप्तीनंतर साधन नाहीसे होते; पण भक्तिप्रेम हे साधन नसून फल आहे. त्यांत गौणी भक्ती ही साधनरूपा आहे, पण परा, मुख्या, प्रेमलक्षणा भक्ती ही फलस्वरूप आहे. जे अंतिम असते, ज्याच्या पुढे काही नसते त्यास फल असे म्हटले जाते. जसे वृक्षास पाने, फुले आल्यानंतर फळ येते पण फळापुढे काही येत नाही. वेदान्त-शास्त्रात ज्ञान ही अतिम स्थिती सागितली आहे, पण गीता, भागवत आदी भक्ति-शास्त्राचे प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथात ज्ञानोत्तरही भक्ती आहे असे स्पष्ट सांगितले आहे श्रीमद्भगवद्गीतेमध्ये

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥** गीता १८.५४

‘ ब्रह्मस्वरूप झालेला, प्रसन्न अंत.करणाचा, तो कोणाबद्दल शोक करीत नाही व कशाची इच्छाही करीत नाही सर्व भूतांच्या ठिकाणी समत्वभावाला प्राप्त झालेला तो पुरुष, श्रीकृष्ण म्हणतात, माझी श्रेष्ठ भक्ती प्राप्त करून घेतो. ’

म्हणून भक्ती ही फलरूपा असे म्हटले आहे. कित्येक ठिकाणी पुराण व अन्य संतवाङ्मयातून भक्ती ही मोक्षाचे साधन असे सागितलेले आहे. गीतेमध्ये–

**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ गीता ७**

‘ श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना, जे मला शरण येतात ते या मायानदीतून तरून जातात ’ पुढे सूत्र शेहेचाळीस ते पन्नासमध्ये या विषयाचा विचार येणार आहे. मोक्ष भक्त्यैक सिद्ध आहे. श्रीएकनाथ महाराज सांगतात–

**सायुज्यादि चारी मुक्ती । अंकीं वाढवी भगवद्भक्ती ।**
**ते न करितां अनन्यगती । शास्त्रज्ञां मुक्ती न घडे कदा । ४७४ ।**

ना. भा. २.४७४

**न करितां भगवद्भक्ती । सज्ञानाही नातुडे मुक्ती ।**
**तेचि अर्थीच्या दृष्टान्तीं । ब्रह्मयाची उक्ती दाविली येथे ॥ १८६ ॥**

ना. भा. ३.१८६

श्रीमद्‌भागवत दशमस्कंध अध्याय दोनमध्ये ब्रह्मदेव भगवत्स्तुती करताना म्हणतो–

**येऽन्येरविंदाक्ष विमुक्त मानिन त्वय्यस्तभावादविशुद्धबुद्धय: ।।**
**आरुह्य कृच्छ्रेण परंपदं तत पतन्त्यधोऽनादृतष्मदङ्घ्रय.** ।।

भागवत, १०.२

'हे कमलनेत्रा ! जे पुरुष स्वत स मुक्त समजून तुझ्या ठिकाणी भाव नसल्यामुळे ज्याची बुद्धी शुद्धतेला प्राप्त झाली नाही, कदाचित ते परमपदापावेतो कष्टाने गेले तरी तुझ्या चरणाचा अनादर केल्यामुळे अध पाताला जातात ' म्हणजे भक्तीवाचून अन्य साधनाने जीवाचा उद्धार होत नाही म्हणून भक्ती हे साधन आहे असे म्हटले जाते. हे जरी खरे आहे तरी तो मोक्ष प्राप्त करून देणारी भक्तीही उपासनास्वरूप सामान्य अशी आहे, ती पराभक्ती नाही श्रीनारद महर्षी 'परम-प्रेमरूपा' असे जिचे वर्णन करतात ती भक्ती स्वतत्र पुरुषार्थरूपा अशी आहे. शास्त्रात चारच पुरुषार्थ धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे सागितले आहेत भक्ति, योग ज्ञान ही सर्व साधने म्हटली आहेत. पण भक्तिशास्त्रप्रतिपादक भागवत ग्रथामध्ये मोक्षापेक्षाही भक्तीचे श्रेष्ठत्व अनेक ठिकाणी प्रतिपादिले आहे. भागवत एकादश स्कंधामध्ये श्रीकृष्ण उद्धवास सांगतात–

**न किञ्चित्साधवो धीरा. भक्तात्ह्येकान्तिनो मम ।**
**गृह्णन्त्यपि मया दत्त कैवल्यमपुनर्भवम्** ।। ११–२०–३४

'श्रीकृष्ण म्हणतात, उद्धवा ! जे साधु धीर व माझे आत्यतिक भक्त असतात ते मी दिलेल्या जन्ममृत्युरहित मोक्षाचीही इच्छा करीत नाहीत.' (त्याना माझ्या प्रेमभक्तीतच आनंद प्राप्त होतो, त्या आनदापुढे ते सर्व तुच्छ वाटते.) श्रीतुकाराम महाराज म्हणतात–

मोक्षपदे तुच्छ केली या कारणे । आम्हां जन्म घेणे युगायुगी ।।१।।
विटे ऐसे सुख नोहें भक्तिरस । पुढता पुढती आस सेवावी हे ।।२।।

श्रीमद्‌भागवत पुराणात प्रत्येक स्कंधातून अशी प्रेमभक्तीच्या श्रेष्ठत्वाची वचने सापडतात.

अद्वैतवेदान्ततत्त्वज्ञानात शिवावतार-जगद्‌गुरू श्रीशकराचार्य याच्यानंतर श्रीमधुसूदन सरस्वती या नावाने प्रसिद्ध एक थोर तत्त्वज्ञानी होऊन गेले. अद्वैत तत्त्वज्ञानावर श्रीशंकराचार्यानतर जे जे द्वैती शास्त्रकार होऊन गेले, ज्यानी आपली सर्व बुद्धिमत्ता व शास्त्रज्ञान पणाला लावून अद्वैताचे खंडण केले, त्या सर्वाचे अद्वैत-मतानुसार खंडण आपल्या 'अद्वैतसिद्धी' नामक अद्वितीय विद्वत्ताप्रचुर ग्रंथात त्यांनी केले आहे. अद्वैतवेदान्त शास्त्रात त्या ग्रंथाचे अनन्यसाधारण महत्त्व आहे. त्याच-प्रमाणे अनेक शास्त्रांवर महत्त्वपूर्ण अशा अनेक ग्रंथांची रचना त्यांनी केली आहे.

त्या मधुसूदन सरस्वतींनी 'भक्तिरसायन' नावाचा एक ग्रंथ भक्तिशास्त्रावर रचला आहे. त्यात अनेक उपपत्तीनी भक्तियोगाचा विचार केला आहे. साहित्याच्या अगानीही भक्तीचे अनेक प्रकार स्पष्ट केले आहेत. त्यांत साधनभक्ती व प्रेमलक्षणा पंचमपुरुषार्थरूपा भक्तीचा शास्त्रीय दृष्टीने फार सखोल विचार केला आहे. त्यात रसशास्त्राच्या दृष्टीने भक्ती हा स्वतत्र रस आहे, पूर्वीच्या रसशास्त्रज्ञांनी तो केवळ भाव ठरविला आहे पण भक्ती हा केवळ भाव म्हणजे रसनिर्मितीचे साधन नसून रस– आनंद– स्वरूप आहे असे अनेक उपपत्तीनी सिद्ध केले आहे, म्हणून भक्ती हा स्वतंत्र पुरुषार्थ आहे भक्तिरसायनाच्या प्रथम श्लोकात श्रीमधुसूदनसरस्वती म्हणतात–

नवरसमिलितं वा केवलं वा पुमर्थं परममिह मुकुंदे भक्तियोगं वदन्ति ।
निरुपमसुखसंविद्रूपमस्पृष्टदु:ख तमहमखिलतुष्टचै शास्त्रदृष्टचाव्यनज्मि ॥१॥

'सर्वत्र सत्तारूपाने विद्यमान मुकुंद (परमेश्वर) विषयक भक्तियोगास नवरसाने युक्त अथवा केवल स्वतंत्र रसरूपाने परमपुरुषार्थ असे म्हणतात, कारण अनुपम सुखाची प्राप्तिस्वरूप व दु:ख ज्याला स्पर्शही करू शकत नाही, अशा त्या भक्तियोगाचे सर्वांना संतुष्ट करण्याकरिता शास्त्र दृष्टीने विवेचन करतो.'

भक्तिशास्त्रावरील भक्तिरसामृतसिंधू व उज्ज्वलनीलमणी आदी ग्रंथांतून श्रीरूपगोस्वामी यानी प्रेमभक्ती हा स्वतंत्र रसच मानला आहे.

त्याचे तात्पर्य भक्ती ही स्वत:च सुखस्वरूप आहे, कारण–

**भगवान्परमानंदस्वरूप. स्वयमेव हि ।**
**मनोगतस्तदाकारो रसतामेति पुष्कलम्** ॥ भ. र १–१०

परमानंदस्वरूप भगवान स्वत: द्रवावस्था प्राप्त झालेल्या मनात स्थित होऊन स्थायीभावरूपाने पूर्ण रसस्वरूप होतो.

म्हणजे भक्ती ही केवळ आनंदाचे साधन नसून ती स्वत: आनंदरूपच आहे; म्हणजे साध्यस्वरूप, पुरुषार्थस्वरूप म्हणून फलस्वरूप आहे. पुढेही 'शांतिरूपा-त्परमानंदरूपाच्च' असे साठाव्या सूत्रात म्हटले आहे.

श्री तुकाराम महाराज ही भक्ती फलरूपा आहे असे सांगतात.

तुका म्हणे भक्ति । सुखरूप आदि अंती ॥

ज्ञानाने प्राप्त होणाऱ्या मोक्षापेक्षाही या प्रेमभक्तीत अधिक आनंद प्रतीत होतो म्हणूनच मोठे मोठे ऋषिमुनीही या भगवंताची अहैतुकी भक्ती करीत असतात, असे श्रीशुकाचार्य सांगतात.

आत्मारामश्च मुनयो निर्ग्रन्था अप्युरुक्रमे ॥
कुर्वन्त्य हैतुकीं भक्तिमित्थं भूतगुणो हरि: ॥ भागवत १।७।२०

'आत्मरूपाच्याच ठिकाणी रममाण होणारे, ज्यांचा हृदयग्रंथिभेद झाला

आहे असे मुनीही ज्याची अहैतुकी भक्ती अखंड करतात असा हा हरी आहे.'

पुढेही सूत्रात नारदानी 'स्वयंफलरूपतेति ब्रह्मकुमारा.' म्हणजे सनकादिकदेखील या भक्तीस फलरूप आहे, असे म्हणतात, असे मागितले आहे.

येथे फल शब्द वापरला आहे, फलामध्ये रस, माधुर्य, सौदर्य, पोषण, पुढील वृक्षाचे बीज अशा सर्व महत्त्वाच्या गोष्टी समाविष्ट असतात, तसेच फळ हे ज्या वृक्षाला ते लागले त्या वृक्षाचे सर्व मार आहे, तसेच भक्तिप्रेम हे आजपावेतो जन्मजन्मात जी काही अनेक साधने केली असतील त्या साधनवृक्षाचे फळ आहे. तिच्यात अनंत माधुर्य, सौदर्य पोषण आहे, इतर साधने साधकासच आकृष्ट करीत असतात, पण भक्ती ही भक्त व भगवान दोघानाही आकृष्ट करीत असते. अखिलाण्डकोटीब्रह्मांडनायक भगवानही भक्तिप्रेमाने मोहित होतो. इतकेच नव्हे तर भक्तांचे येथे राहून प्रेमाने त्यांची सर्व कामे करतो. श्रीकृष्णच म्हणतात—

जया भक्तिची येतुली प्राप्ती। जे कैवल्याते परते सर म्हणती। ज्ञा. ९

अशा भक्तिच्या श्रेष्ठत्वापुढे मोक्षालाही तुच्छ समजणाऱ्या प्रेमळ भक्ताकरिताच देव ही भाषा वापरत असतो.

भक्तिशास्त्रात भक्ती ही स्वतत्र पुरुषार्थरूप आहे, ती केवळ साधन नाही म्हणून श्रीज्ञानेश्वर महाराजानी 'चहू पुरुषार्था शिरी' असे म्हटले आहे पुरुषार्थस्वरूपा भक्ती असेल पण ती धर्म, अर्थ, कामादिकाप्रमाणे मोक्षाच्या पूर्वी असेल अशी कोणी कल्पना केली तरी तिला गौणत्व येईल म्हणून 'शिरी' असे म्हटले आहे. श्रीएकनाथ महाराजानी तर तिला 'पंचम पुरुषार्थ' असे स्पष्टच सूचित केले आहे.

चहूं पुरुषार्थाते त्यागिती। चारी मुक्ति उपेक्षिती।
पंचम पुरुषार्थाची भक्ती। मज पढियंती उद्धवा॥ ३७२॥
तंव श्रीकृष्ण म्हणे उद्धवा। हा माझा निजगुह्य गोप्य ठेवा।
तुज म्यां सागितला कणवा। पुरुषार्थ पाचवा या नांव॥४०१॥

ए. भा. अ. २४

सर्वच संतांचे असे भक्तिविषयक उद्गार प्रसिद्ध आहेत.

भगवत्पूज्यपाद श्री शंकराचार्यही श्रीकृष्णप्रेमात रंगून गेलेल्या अवस्थेत खालील उद्गार काढतात—

**काम्योपासनयार्थयन्त्यनुदिनं किंचित्फलं सेप्सितं।**
**केचित्स्वर्गमथापवर्गमपरैर्योगादि यज्ञादि भिः।**
**अस्माकं यदुनंदनांघ्रियुगुल ध्यानावसानायिनां।**
**किं लोकेन दमेन किं नृपतिना स्वर्गापवर्गैश्च किम्॥१॥**

'काम्य उपासनेने काही लोक सतत काही काही फलाची अपेक्षा ठेवतात व

अखंड काम्यकर्मे करत असतात. काही स्वर्गाची अपेक्षा यज्ञादी कर्मांच्या द्वारे करतात, काही योगाच्या मार्गाने मोक्षाची इच्छा धारण करतात, पण भगवान श्रीकृष्णाच्या चरणकमळाचे सतत ध्यान करीत आयुष्य घालविणाऱ्यांना लोकांतराशी, ऐहिक राजपदाशी, किंबहुना स्वर्ग व मोक्षाचेही काय प्रयोजन आहे ?' तात्पर्य, अनेक ऋषिमुनींनी तसेच भागवतधर्मीय सर्व संतांनी मोक्षनिरपेक्ष होऊन केवल प्रेमभक्तीचीच मागणी केली आहे श्रीमद्‌भागवतपुराणामध्ये शेकडो भक्ताचे असे उद्‌गार प्रसिद्ध आहेत. इतकेच नव्हे तर 'भक्तिरसामृतसिंधू' या भक्तिशास्त्रावरील ग्रंथात श्रीरूपगोस्वामी म्हणतात–

**ब्रह्मानंदो भवेदेष चेत्परार्धं गुणीकृतः ।**
**नैति भक्ति सुखाम्भोधे परमाणुतुलामपि ।।१–१९।।**

'ब्रह्मानंद हा उपनिषदातून सर्व आनंदापेक्षा श्रेष्ठ मानला आहे. त्या ब्रह्मानंदाची परार्धपट केली तरी तो या भक्तिसुख सागराच्या परमाणूएवढाही होणार नाही' भक्ती हे भक्ताच्या जीवनाचे अंतिम ध्येय आहे. हंसदूतनामक एका भक्तिविषयक ग्रंथात एक कथा आहे. एकदा देवर्षी नारद हे गोकुळात आले, तेथील तो सर्वांच्या ठिकाणी प्रवाहित होत असणारा भक्तिप्रेमानंदाचा पूर पाहिला. उपनिषत्प्रतिपाद्य ब्रह्मच श्रीकृष्णवेषाने तेथे नृत्य करीत आहे. गोप, गोपी, गोपबालक, गाई या सर्वच त्याचा तो अनिर्वचनीय आनंद लुटीत आहेत. त्या प्रेमात निमग्न होऊन नारद रुदन करू लागले. एका गोपीची दृष्टी त्यांच्याकडे गेली, तिला ते पाहून आश्चर्य वाटले. ती मनात म्हणाली की, हे तर ब्रह्मपुत्र भक्ताचार्य नारद आहेत ! अप्रतिहत यांची गती आहे. मनात येताच हे भगवद्धामास भगवच्चरणाजवळ पोहोचू शकतात. असे असता हे रडतात का ? जवळ जाऊन नम्रतापूर्वक नमस्कार करून तिने नारदाना त्यांच्या रडण्याचे कारण विचारले. तेव्हा तिला नारद म्हणाले, मला याकरता वाईट वाटते की, आतापावेतो जे जीव अनेक साधने करून मुक्त झाले ते फार भाग्यहीन होते, या गोकुळातील अलौकिक आनंदाचे त्यांना दर्शनही घडू शकले नाही, निदान हा आनंद भोगून ते मुक्त झाले असते तर त्यांची मुक्ती सफल झाली असती. हा आनद जो आज आम्ही भोगत आहो तो दुर्दैवाने त्यांना मिळाला नाही !

धर्माचे फल मेल्यानंतर किंवा परलोकाला गेल्यानंतर मिळते, ज्ञानाचे फल भवबंधनिर्मुक्ती आहे, पण भक्तीचे फल असे अगाध आहे की, ती नित्यशुद्धबुद्धमुक्त जो भगवान त्याला बद्ध करते. श्रीमद्‌भागवतात नवयोगेश्वर जनक संवादात म्हटले आहे–

**विसृजति हृदयं न यस्य साक्षाद्धरिरवशाभिहितोऽप्यघौघनाशः ।**
**प्रणयरशनयाधृतांघ्रिपद्मः स भवति भागवत प्रधान उक्तः ।।**

११–२–५५

'न समजता जरी भगवन्नाम स्मरण केले तरी त्याच्या पापप्रवाहाचा नाश करणारा असा भगवान आपल्या प्रेमी भक्ताच्या हृदयाचा कधीही त्याग करू शकत नाही, आपल्या प्रेमरूपी रज्जूनी भगवंताचे चरणकमळ ज्याने दृढ धरून ठेवले आहेत तोच भक्त श्रेष्ठ होय.'

हरिनाम प्रेमप्रीतीवरी । हृदयी रिगाला जो हरी ।
तो निगो विसरे बाहेरी । भक्त प्रीतिकरी कृपाळू ।।
भक्ते प्रणय प्रीतीची दोरी । तेणे चरण धरोनि निर्धारी ।
निज हृदयी बांधिला हरी । तो कैशापरी निघेल ।। ए. भा २८०.२

भक्ती केली, भगवान प्रसन्न झाला, प्रगट झाला, भक्ताचे मनोरथ पूर्ण झाले, आता भक्तीचे प्रयोजन राहिले नाही असे होत नाही भक्ती करून जो वैकुंठ, गोलोक वा साकेत लोकाची तसेच सालोक्य, सामीप्य, सारूप्य, सायुज्यादिकांची अपेक्षा करील तर ती मुक्ती होईल व तिचे भक्ती हे साधन होईल, व साधन झाली तर ती नीरस होईल कारण वृक्षाचा सर्व रस, गोडी फलात असते, वृक्षाच्या फांद्या, पाने, फुले यात नसते. भक्ती ही तर मधुरात मधुर आहे ती साधनरूप नीरस नाही. बहुतेक भक्त म्हणविणारे विशेष अशा वरील मोक्षादिकाच्या अपेक्षेनेच भक्ती करणारे असतात, पण त्याना भक्तिसुखाची खरी माधुरी व रस भोगावयास मिळत नाही. एका ठिकाणी म्हटले आहे–

**भुक्ति मुक्ति स्पृहायावत्पिशाची हृदि वर्तते ।**
**तावद्भक्ति सुखस्यास्य कथमभ्युदयो भवेत् ।।** भक्तिरसामृतसिंधू

'भोग वा मोक्षप्राप्ती कामनारूप पिशाची हृदयात जोपावेतो बसली आहे तोपावेतो हृदयात भक्तिप्रेमाच्या आनंदाचा अभ्युदय कसा होईल ?'

म्हणून सर्व भक्ताग्रणीनी सेवेचीच अपेक्षा केली आहे कारण तो सेवेचा आनंद अनिर्वचनीय आहे.

हा रस आनंदाचा । घोष करा हरिनामाचा ।
कोण हा दैवाचा । भाग पावे येथील ।।

असे श्रीतुकाराम महाराज स्पष्ट म्हणतात.

प्रेमभक्तीचे श्रेष्ठत्व एवढे आहे की, प्रत्यक्ष भगवानही त्याची अपेक्षा करतो श्रीकृष्ण अर्जुनास म्हणतात. 'आम्ही भावाचे पाहुणे । भलतेया ।। (ज्ञा). भक्तवर्य उद्धवास भगवान प्रेमाचे श्रेष्ठत्व सांगत आहेत. ते म्हणतात प्रेमाचे मोल माझ्यापेक्षाही श्रेष्ठ आहे.

प्रेम मजसी मोलें अधिक । सेवसाटी करितां नव्हे देख ।
यालागी वरीव देतां सुख । न ये तैं सेवक सेलेचा होय ।।

मज प्रेमळांची अति आवडी । ते लोकेषणा लाज दवडी ।
महत्त्वाच्या विसरवी कोडी । त्याच्या सेवेची गोडी मजलागी ।।
ऐसा प्रेमाचेनि अति पांगें । म्या पंगिस्त होईजे श्रीरंगे ।
यालागी तया पुढे मागे । सदा सर्वांगें तिष्ठत ।।

**एकनाथी भागवत,** २४–३७७–९

एकादशस्कंधाच्या सव्विसाव्या अध्यायात श्रीकृष्ण उद्धवास म्हणतात–

**भक्ति लब्धवतः साधोः किमन्यदवशिष्यतें ।**
**मय्यनन्तगुणे ब्रह्मण्यानंदानु भवात्मनि ।। ३० ।।** भागवत ११–२६–३०

'अनंतगुणपूर्ण, केवळ ब्रह्मरूप आणि आनंदानुभवात्मक असा जो मी त्या माझ्या ठिकाणी ज्याची भक्ती जडली आहे अशा साधुपुरुषाला आणखी काय मिळवावयाचे बाकी राहिले आहे ?'

भावे करिता माझी भक्ती । भाविका कोण पा अप्राप्ती ।
विवेकवैराग्यज्ञानसंपत्ति । पायां लागती भक्ताच्या ।।
देव सप्रेमें मुलाला । म्हणे मी त्याचाचि अकिला ।।
जीवेंभावे त्यासी विकिला । मी त्यांचा जाहला तिही लोकी ।।

ए. भा. २६–४०४–५

असे भक्तिप्रेमाचे श्रेष्ठ स्वरूप असल्याने तिला फलरूप म्हटले आहे. जरी फलाची उपमा दिली तरी उत्कृष्ट आम्रफलातही आतील कोय व वरील साल असा काही टाकाऊ भाग राहतो तसा प्रेमभक्तीत त्याज्यभाग मात्र काही नाही. ती सर्वच्या सर्व मधुररस स्वरूपच आहे.

## सूत्र २७

## ईश्वरस्याप्यभिमानद्वेषित्वात् दैन्यप्रियत्वाच्च ।। २७ ।।

**अर्थ :**

ईश्वराचाही अभिमानाशी द्वेषभाव आहे व दैन्याशी म्हणजे लीनतेशी प्रियभाव आहे.

**विवरण :**

मागील पंचविसाव्या सूत्रात भक्ती ही कर्म, ज्ञान व योग यांहून श्रेष्ठ आहे, असे सांगितले आहे आणि ती फलरूपा आहे असे पुढे सूत्र सव्वीसमध्ये म्हटले आहे

कर्म, ज्ञान व योग या साधनांत अहंकार उत्पन्न होण्याचा संभव असतो. कर्मठांना कर्माभिमान, ज्ञान्याना ज्ञानाभिमान, योग्याना योगाभिमान उत्पन्न झालेली उदाहरणे पुष्कळ आहेत. प्राचीन बर्हिनामक एका राजाने अनेक यज्ञ केले होते, त्यास जो अभिमान झाला होता तो श्री नारदमहर्षींनी दूर केला अशी कथा भागवतामध्ये आहे. श्री. शुकाचार्यांसारख्यांना ज्ञानाभिमान झाला होता व तो दूर करण्याकरिता श्री व्यासमहर्षींनी त्यांना जनक राजाकडे पाठविले होते असे वर्णन भावार्थ रामायणाच्या आरंभी आले आहे तुकाराममहाराजही सागतात–

**अभिमान लागे शुकाचिये पाठी । व्यासे उफराटी दृष्टी केली ।।**
**जनक भेटीशी पाठविला तेणे । अभिमान नाणे खोटे केले ।।**

चागदेवाला योगाचा मोठा अभिमान होता तो ज्ञानेश्वरमहाराजांच्या भेटीत नष्ट झाला हे प्रसिद्ध आहे.

कोणाला कदाचित भक्तिसाधनातही अभिमान उत्पन्न होऊ शकेल म्हणून श्री नारदमहर्षी मुद्दाम या सूत्राने धोक्याची सूचना देतात

साधनांचा विचार केला असता त्यात काही साधनात प्रमातृप्रामुख्य दिसते. उदाहरणार्थ, कर्मामध्ये प्रमाता तोच कर्ता प्रमुख असतो. मी कर्ता, असा अहंकार बाळगूनच तो कर्मामध्ये प्रवृत्त होत असतो. ज्ञान हे साधन प्रमाणप्रामुख्याने होते. श्रुति, स्मृति, उपनिषद्वाक्ये, गुरुवचन इत्यादिकांवर ते अवलंबून आहे. यानाच प्रमाण असे म्हणतात. भक्ती हे साधन प्रमेयमुख्यत्वाने होत असते. भक्तीचे प्रमेय जो भगवान त्याच्या प्रामुख्याने होत असते, म्हणजे त्याला ती कोणती व कशा प्रकारे केलेली भक्ती आवडते, त्यात कोणत्या गोष्टी प्रतिकूल असतात, कोणत्या अनुकूल असतात, त्याने भक्तीचे स्वरूप कसे सांगितले आहे इत्यादी गोष्टीचा विचार करावा लागतो. भक्ताने स्वतःला काय वाटते हे पाहावयाचे नसते तसा विचार केल्यास श्रीनारद या सूत्रात स्पष्ट सागतात की, ईश्वरालाही अभिमानी पुरुषाविषयी द्वेष वाटतो. ' अपि ' या अव्ययाचा उपयोग करण्याचा हेतू असा असावा की ईश्वर हा सर्वांविषयी समभाव ठेवणारा आहे. गीतेमध्ये श्रीकृष्ण स्वत.च सागतात–

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।।** गीता ९–२९

' मी सर्व भूताचे ठिकाणी समभाव ठेवणारा आहे; मला कोणी द्वेषी नाही वा प्रिय नाही.' असा जरी तो आहे तरी पुढील चरणातच श्रीकृष्ण पुन्हा म्हणतात, ' जे भक्तीने मला जसे भजतात ते माझ्या ठिकाणी आहेत व मीही त्यांच्या ठिकाणी आहे,' म्हणजे सामान्यरूपाने तो समस्वभाव आहे. सूर्य जरी सर्वांना सारखा प्रकाश देतो तरी सर्वच त्याच्या प्रकाशाचा सारखा अनुभव घेत नाहीत. सूर्यकांत मण्यातून ठिणग्या बाहेर पडतात, कमळ विकसित होते, तारांगणे लुप्त होतात, अंधकाराचा

नाश होतो, तसाच प्रकार येथे आहे पाणी जरी सर्व शेतात सारखे दिले गेले तरी बीजाच्या धर्माप्रमाणेच त्याचा परिणाम होतो– उसात गोड, मिरचीत तिखट तर चिंचेत आंबट.

**नाना बीजधर्मानुरूप । झाडा उपजवी आप ।**
**तैसें परिणमलें स्वरूप । माझें जीवां ॥** ज्ञा. १५–४१८

असाच भगवान आहे.

**पैं आघवां मीचि असे । येथ नाहीं कीर अनारिसें ।**
**परि प्राणियांचिया उल्लासें । बुद्धी ऐसा ॥** ज्ञा. १५–४१५

केवळ सर्वसमत्वाने व्यवहार होणार नाही व विषमता जी निर्माण होते ती जीवमात्राच्या गुण, स्वभाव व तद्नुरूप क्रिया इत्यादिकामुळे, म्हणून जीवात कोणी अभिमानी, गर्वोद्धत व त्या अभिमानात ईश्वरालाही न मानणारे व स्वतःच्याच बुद्धीप्रमाणे केवळ इतराना दुःख देऊन स्वतः एकटयाचेच सुख पाहणारे असे असतात त्याचे तसेच वर्तन चालू दिल्यास ' ईश्वर ' हा शब्द निरर्थक होईल. ' ईशितुं शीलं यस्य स ईश्वरः ' ' नियमन करणे हा ज्याचा स्वभाव आहे त्यास ईश्वर म्हणतात, नियमन करणे हा ईश्वराचा स्वभाव आहे.

अभिमान हा सर्व विकाराचे मूळ आहे, व तो घातक आहे, तसेच त्याची अत्यत घातकता ही आहे की, भक्तिप्रेमाला तो मोठा प्रतिबंधक आहे. अभिमान व प्रेम एका अधिकरणात राहू शकत नाहीत ससारातही एकाचा अभिमान दुसऱ्यास सहन होत नाही, तो प्रतिकार करतोच, पण त्यामुळे तो दूर होत नाही तर उलट वृद्धिगत होत असतो तो अभिमान अनेक प्रकारचा असतो देहाभिमान, वर्णाभिमान, आश्रमाभिमान, कुलाभिमान, पाडित्याभिमान, धनाभिमान, कर्तृत्वाभिमान, शूरत्वाभिमान, सौदर्याभिमान, ज्ञानाभिमान, गुणाभिमान इत्यादी त्याचे अनेक प्रकार असू शकतात. पण कोणत्याही प्रकारचा असला तरी तो भक्तीस प्रतिबधकच असतो गोपिकाना रासक्रीडाप्रसंगी भगवत्सुखाचा पूर्ण अनुभव मिळाला, त्या वेळी हा कोणालाही प्राप्त न होणारा आनंद आपण अनंतकाळ भोगला, असा आपल्या सौभाग्याचा त्यांना अभिमान झाला भगवंताला तो खपला नाही ! त्याचा तो अभिमान दूर करण्याकरिता श्रीकृष्ण तेथे अंतर्धानाला पावले. नतर मात्र त्या गोपिकाना त्या वियोगाचे फार दुःख झाले. त्या विरहात त्या अभिमानविगलित होऊन वृक्ष, पक्षी, पशू इत्यादिकाना विचारू लागल्या, ' श्रीकृष्ण कोठे आहे ?' व अत्यंत शोक करू लागल्या. अशा निरभिमान अवस्थेतील त्यांचे विरहगीत गोपी-गीत या नावाने प्रसिद्ध आहे. भक्तिशास्त्रात त्या गीताचा फार आदर आहे. निरभिमान होऊन देवाला कसे आळवावे त्याचे प्रत्यक्ष वर्णन त्यात आहे. अशा रीतीने विरह-वेदनानी पीडित होऊन अनेक प्रकारे त्या रुदन करू लागल्या असता

त्याच्या हृदयातील उत्कट श्रीकृष्णदर्शनलालसा व पूर्ण निरभिमानस्थिती झाली आहे हे पाहून पुन्हा श्रीकृष्णभगवान प्रगट झाले व त्याना दर्शनसौख्य दिले असे वर्णन आहे. म्हणजे भक्तीतही एखाद्या वेळी अहकार निर्माण होण्याचा सभव असतो, तोही देवाला आवडत नाही.

**न सापडे इंद्रचंद्रब्रह्मादिका । अभिमानें एका तिळमात्रें ।।**
**तिळमात्र जरी होय अभिमान । मेरु तो समान भार देवा ।।** तु.

अभिमान हा जीवाच्या ठिकाणी अनेक विकार निर्माण करीत असतो किंबहुना कोणताही विकार मुळात अभिमानापासूनच झालेला असतो. अभिमान हा आत्मघातकी आहे. ' करवितो आत्महत्या । नेदी सत्या आकळू ।। (तु. म )अभिमान हा ज्या ज्या विषयाचा असेल त्यालाच महत्त्व देतो, देवाला देत नाही. तो जीवाला उन्मत्त करतो, देवाकडे जाऊच देत नाही. ' न पाविजे कदा उन्मत्त झालिया । दंभ तोचि वाया नागवण ।। (तु. म.) अभिमान निर्माण झाला म्हणजे तो देवाशी कसे वैर करवितो याचे गीतेच्या सोळाव्या अध्यायातील आसुरी प्रकृतीच्या वर्णनातील ' अभिमान ' या पदावरील व्याख्यानात श्री ज्ञानेश्वरमहाराजानी विस्तृत वर्णन केले आहे.

कोणत्याही स्वरूपाचा अहंकार भगवद्विमुखता निर्माण करतो, मोठमोठ्याना भगवत्प्राप्तीकरिता आपले थोरपण सोडावे लागले, मग सामान्याची कथा ती काय? याबद्दल ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायात श्रीकृष्णमुखानेच ज्ञानेश्वरमहाराज सांगतात त्या ओव्याचा भावार्थ खाली दिला आहे

' श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना ! जो जाणिवेचा अहकार बाळगतो त्यास काही कळत नाही. जो सपन्नपणा मिरवतो तोच त्याचा कमीपणा आहे, जो, ' आम्ही कृतार्थ झालो ' असे समजतो तो काहीच झाला नाही. यज्ञ, दान किवा तप, यांच्या योगाने मी सहज भगवत्प्राप्ती करून घेईन, असा जर कोणास गर्वाचा फुंज असेल तर त्यात यज्ञ, दान, तप इत्यादिकाची माझ्याजवळ गवताच्या काडीइतकीही किंमत नाही. अर्जुना ! विचार कर, ज्ञानसपन्नतेच्याबाबतीत वेदापेक्षा श्रेष्ठ कोणीतरी आहे काय ? अथवा शेषापेक्षा अधिक तोंडाने बोलणारा कोणी आहे काय ? तो शेष माझ्या अथरुणाखाली लपून बसतो आणि वेद ' नेति नेति ' म्हणजे परमात्मा असा नाही तसा नाही असे म्हणून परत फिरतो. एवढे मोठे सनकादिक तेही वेडेपिसे झाले आहेत. तपस्व्याची निवड करू गेले तर महादेवाच्या पंक्तीला बसविता येईल असा कोण तपस्वी आहे? तो शिवदेखील अभिमान टाकून माझे चरणोदक मस्तकावर धारण करतो. ऐश्वर्याची मालकीण लक्ष्मी तिचीही येथे किमत नाही, मग ती जेव्हा आपल्या ठिकाणी असलेल्या ऐश्वर्य-अभिमानाचा त्याग करून सर्वस्वी माझी सेवा करू लागली त्यावेळी माझे पाय धुवावयाच्या भाग्यास प्राप्त

झाली. एवढ्याकरिता आपल्या ठिकाणचा मोठेपणा दूर टाकून द्यावा, शास्त्राध्ययनाचा गर्व सोडावा, अशा रीतीने सर्व प्रकारचा लहानपणा जेव्हा घ्यावा तेव्हा माझे सान्निध्य प्राप्त होते अर्जुना! हजारो किरण असलेल्या सूर्याच्या प्रकाशात चंद्र सुद्धा नाहीसा होतो त्या सूर्यापुढे काजव्यांनी आपल्या अल्पशा प्रकाशाचा डौल कशाला मिरवावा? त्याप्रमाणे लक्ष्मीचा मोठेपणा जेथे चालत नाही आणि शिवाचे तपही जेथे पुरे पडत नाही त्या माझ्या ठिकाणी या सामान्य व हेंदऱ्या (अजागळ) लोकांचा प्रवेश कमा होईल? याकरिता परमात्म्यावरून आपले शरीर ओवाळून टाकावे, आणि आपल्या अगी असलेल्या सर्व गुणाचे निबलोण करावे, तसेच सपत्तीचा फुंजही ओवाळून टाकून द्यावा.'

ज्ञानेश्वरी, ९ ३६७ ते ३८१.

वास्तविक कुळ, जाती वर्ण हे स्वरूपाने बाधक नाहीत, कारण प्रत्येकास ते जन्मत.च चिकटलेले असतात, त्याचा शुष्क अहकार बाधक आहे. म्हणून भगवान श्रीकृष्ण सागतात–

**अगा कुळाचिया चोखटपणा नलगा। अभिजात्य श्लाघा।**
**व्युत्पत्तीचा वाऊगा। सोस कां वहावा॥**
**का रूपे वयसा माजा। आथिलेपणें का गाजा।**
**एक भाव नाहीं माझा। तरी पाल्हाळ तें॥**

ज्ञानेश्वरी ९.४३१–३२.

एवढा विचार करण्याचे कारण बहुतेक लोक कोणत्या ना कोणत्या अभिमानाने युक्तच असतात तो संसारात कदाचित उपयोगी पडला तरी भक्तीमार्गात निरुपयोगीच नव्हे तर बाधक आहे अहकाराचा प्रभाव आपल्यापेक्षा जे कोण्याही प्रकारे न्यून आहेत त्याच्यावर पडतो. तो भगवतावर कसा पडेल? कारण तो एकमेव सर्वश्रेष्ठ आहे वर्ण, आश्रम, कुळ, शुरत्व, सौदर्य इत्यादी देहाभिमानावरच अवलंबून आहे व ह्यादेहाचेच चलनवलनादी व्यवहार करविणारा जर तोच आहे तर त्याच्या पुढे हा अभिमान कसा टिकेल? आपली सर्व प्रकारची अहंता ज्याच्या योगाने चालते त्याच्यापुढे अहंकार दाखवून काय उपयोग?

कित्येकाना स्वसौदर्याचा अभिमान असतो, पण भगवत्सौदर्यापुढे अन्य सौदर्य कसे शोभेल? श्री एकनाथमहाराज सांगतात–

श्रीकृष्णाचिया सौदर्यापुढें। लक्ष्मी भुलोनि झाली वेडे।
मदन पोटां आले बापुडें। तेथ कोणीकडे इंद्रचंद्र॥
त्रिलोकीचे बरवेपण। भुलोनि कृष्णापाशी आले जाण।
ना कृष्ण लेशे बरवेपण। शोभे सपूर्ण तिही लोकी॥

जो सकळ सौंदर्याची शोभा । जो लावण्याचा अतिवालभा ।
ज्याच्या अगसगप्रभा । आणिली शोभा जगासी ।।
ए भा. १.२४१–४३

म्हणून सौदर्याभिमानही तेथे उपयोगी नाही. कोणास आपल्या बळाचा अभिमान असतो. उदाहरण हिरण्यकश्यपासारखे आपल्या बळावर ईश्वराशीही द्वेष करणारे असे अनेक दैत्य, राक्षस होऊन गेले. पण त्याचाही अभिमान देवापुढे टिकला नाही श्रीकृष्ण अर्जुनास सागतात–

**नुघडतां बाळपणाची फुली । जेणें मियां अदानवी सृष्टि केली ।।**
**करीं गिरी धरोनि उमाणिली । महेंद्रमहिमा ।।** ज्ञानेश्वरी १०.२८९

आपल्या बळाच्या अभिमानाने हिरण्यकश्यपूने महाविष्णूची भक्ती करणाऱ्या प्रल्हादाचा अनेक प्रकारे छळ केला, नव्हे त्यास मारण्याचा अनेक प्रकारे यत्न केलाा पण देवाने त्याचे-प्रल्हादाचे-रक्षण तर केलेच पण हिरण्यकश्यपूच्या म्हणण्याप्रमाणेच स्तंभातून प्रगट होऊन त्याचाही वध केला.

कोणास वाटेल की सर्वसमस्वभाव अशा ईश्वराने असा द्वेष करावा काय ? पण याचे उत्तरही हेच आहे की ज्याचा अभिमान दूर करण्याकरिता ईश्वराने अनेक अवतार घेतले व त्याचा वध केला, त्याचा उद्धारच झाला. रावण, कुंभकर्ण, हिरण्याक्ष, हिरण्यकशिपू, कंस, शिशुपाल इत्यादिकाना मोक्षच मिळाला हे सर्व पुराणातून प्रसिद्ध आहे, वस्तुत. त्याच्या अनत दुष्कृत्यानी ते नरकलोकात कायमचे राहणार पण देवाने आपल भक्तरक्षणाचे ब्रीद खरे करण्याकरिता अवतार घेऊन त्याचा वध केला तरी त्यातही त्या सर्व असुराचा उद्धारच झाला ही गोष्ट सर्व साधुसंतांनी स्पष्ट केली आहे.

श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात–

**तुझें औदार्य जाणों स्वतंत्र । देतां न म्हणसीं पात्रापात्र ।**
**पैं कैवल्य ऐसें पवित्र । वैरियांही दिधलें ।।** ज्ञा.११–९८
**श्रीकृष्ण कोपोनि ज्यांसीं मारी ।**
**तो पावें परब्रह्म साक्षात्कारीं ।।** ज्ञा. ८–९

अशी अनेक प्रमाणे आहेत, सारांश, कोणताही अभिमान तेथे चालत नाही ईश्वरापुढेही जर अन्य कोणाचा अभिमान खपू लागला तर तोच ईश्वर होईल व याचे ईश्वरत्व-नियामकत्व-बाधित होईल. तसेच ईश्वराहून अन्य कोणीही जीवकोटीतच म्हणजे नियम्य या सदरातच येईल त्याला अभिमान करण्याचाच अधि. कार नाही. तो करील तर ते अज्ञान ठरेल व ते दूर करणे हे ईश्वराचे कामच आहे, म्हणून नारद ईश्वर हा अभिमानद्वेषी आहे असे म्हणत आहेत.

भक्तिप्रेमानंदाचा भोग घेण्याकरिता वृत्ती निरभिमान असणे अवश्य आहे. कोणताही अभिमान निर्माण होणे हे बाधक आहे हे वर सांगितलेच आहे. त्यांतल्या त्यात भक्तप्रेमास अत्यंत विरोध करणारा जर कोणी असेल तर तो ज्ञानाभिमान होय. अंतःकरणात शब्दज्ञानाचे अल्प जरी संस्कार निर्माण झाले, मी ज्ञानी असे वाटू लागले की मग भक्ती ही निरर्थक वाटावयास लागते. एकनाथमहाराज या विषयाचा विस्तृत विचार करतात. भागवत एकादश स्कंध अध्याय पाचमध्ये जनक-नवयोगेश्वर संवादात हा विषय आला आहे.

आलोडोनी वेदशास्त्रार्थ । ज्ञातेपणे जे पंडित ।
गर्वे हेळसिती भक्तिपंथ । अति उन्मत्त ज्ञातृत्वे ।।
जेवी ज्वरिताचें मुख । दूध मानी कडू विख ।
तेवीं ज्ञानगर्वे पंडित देख । ठेले विमुख हरिभजनी ।।
आम्ही मुक्त हे मानुनी । जे विमुख भगवद्भजनी ।
ते पचिजती अधःपतनी । तिर्यग्योनी जन्ममरणें ।।

ए. भा. ५.५७–६१

तात्पर्य, कोणताही अभिमान असणे हे भक्तिमार्गाच्या दृष्टीने घातक आहे. त्या अभिमानापासूनच पुढे सर्व विकारांची निर्मिती होत असते. देव अभिमानाचा द्वेष करतो याचे कारण भक्ताच्या भक्तीत तो अभिमान विघ्न आणणारा आहे. भक्तीत सकामता, व्यभिचारबुद्धी इत्यादी निर्माण करणारा हा अभिमानच आहे. भक्तीत केवळ परमात्म्याचाच मान असणे अवश्य आहे. इतर कोणालाही महत्त्व न दिले गेले पाहिजे. अभिमानाचा अर्थ 'अभित: मान.' म्हणजे जवळ असणाऱ्या अन्य पदार्थांना प्रमाणभूत मानणे, त्याचे महत्त्व वाढविणे. हे अभिमानाचे कार्य आहे. अन्याचे जर महत्त्व वाढले तर मग देवाचे कसे राहणार ? भक्तजीवनात जर देवाविना अन्याचे महत्त्व वाढले तर भक्ती कशी होणार ? म्हणून भगवान भक्तांचा अभिमान नष्ट करून भक्ताच्या भक्तीचे रक्षणच करतो. यातच भक्तांचे कल्याण आहे. अनेक भक्ताना कोणत्या ना कोणत्या प्रकारचा अभिमान झाला होता व देवाने काहीतरी निमित्त करून तो दूर केला. त्यासंबंधी पुराणात पुष्कळ कथा आहेत, अभिमानाची सर्व स्थाने देवास समर्पण करणे हे भागवत धर्मांचे लक्षण सांगितले आहे.

दारा सुत गृह प्राण । करावें भगवंतासी अर्पण ।
हें भागवत धर्म पूर्ण । मुख्यत्वें भजन या नाव ।।

ए. भा. २.२९९

ईश्वरास अभिमान खपत नाही, तो अभिमानाचा द्वेषी आहे, म्हणूनच तर

गीतेमध्ये अशा अभिमानी पुरुषाकरिता ' मूढ ', ' क्रूर ' ' नराधम ', ' असुर' अशी विशेषणे वापरली आहेत, ' अभिमान नाही तुका म्हणे त्यासी । नेदी आणिकांसी करू देव ।।' असे तुकाराममहाराज म्हणतात. प्रेम व मान एकाठिकाणी राहू शकत नाहीत. एका भक्ताचे उद्‍गार प्रसिद्ध आहेत 'चाखाचाहे प्रेमरस राखाचाहे मान । दो खड्‌ग एक म्यानमें देखे सुने न कान ।।' याबद्दल एक कथा प्रसिद्ध आहे.

जेव्हा धर्मराज हे कौरवाच्या बरोबर खेळलेल्या कपट द्यूतात हरले, दुःशासनाने सभेत द्रौपदीला फरफर ओढीत आणले, तिच्या केशपाशास हात घातला इतकेच नव्हे तर दुर्योधनाच्या आदेशाने तिच्या वस्त्राला हात घातला तेव्हा श्रीकृष्णाने अबर– वस्त्र– अवतार घेऊन तिचे रक्षण केले. पण हे करताना थोडा वेळ लागला. पुढे पाडव वनात असता एक वेळ श्रीकृष्ण त्याना भेटण्यास गेले. सहज बोलण्यात विषय निघाला. द्रौपदी म्हणाली, ' देवा ! कौरवसभेमध्ये तू माझी लाज तर राखलीस, पण एवढा वेळ का लावलास ? एवढे का रडविलेस ? एवढे सत्त्व का पाहिलेस ? ' श्रीकृष्ण म्हणाले, ' द्रौपदी ! ऐक, जेव्हा ' गोविद द्वारकावासिन ' म्हणून मला हाक मारलीस त्या वेळी ' गो ' शब्द कानावर पडताच मी निघालो व ' विंद ' म्हणेपर्यंत सभेजवळ आलो. पण मी काय करू ? पाहातो तो तू आपले वस्त्र दोन्ही हातांत धरून ठेवले होतेस. तुला असा अभिमान होता की, आपल्या हातांनी आपल्या लज्जेचे रक्षण होऊ शकेल म्हणूनच ते घट्ट पकडून ठेवले होतेस, मग मी कसा येऊ ? जेव्हा तू ते वस्त्र हातातून सोडलेस व ' हे नाथ, हे रमानाथ ' म्हणून टाहो फोडलास तत्काळ मी प्रगट झालो. ' म्हणजे एवढा अती सूक्ष्म अभिमान ही देवास सहन होत नाही. कारण तो देवास लहान करतो, किंवा प्रेमाची जागा इतकी अडचणीची असते की तेथे दोन गोष्टीचा– मान व प्रेम याचा– समावेश होत नाही. ' प्रेम गली अति साकडी । वामे दो न समाय ।। ' असे एका भक्ताचे उद्‍गार आहेत. एका लहानशा पिशवीत पर्वत कसा मावेल ? म्हणून भगवान हा अभिमान दूर करूनच भेटतो. म्हणून नारद या सूत्रात ईश्वरालाही अभिमानाचा द्वेष आहे असे म्हणतात.

या पुढील वाक्य ' दैन्यप्रियत्वाच्च ' हे आहे. अभिमानाचा जसा द्वेष तसा दीनाशी त्याचा प्रियभाव आहे. दैन्य शब्द व्यवहारात दरिद्री, दुःखी या रूढ अर्थाने वापरला जातो. पण त्या अर्थाने येथे दैन्य शब्द घेता येणार नाही. कारण आरंभी ' अभिमान द्वेषित्वात् ' म्हटले आहे. व्यवहारात जे दीन, दरिद्री वाटतात ते निरभिमानी असतात, असे नाही. त्यानाही कशाचा ना कशाचा अभिमान असतोच. ते स्वतःला दीन समजत नाहीत. तसेच ईश्वरावर त्यांची भक्ती असतेच असे नाही, ते आपले दैन्यदारिद्र्य दूर करण्याकरिता कोणत्याही श्रीमंत म्हणविणाऱ्या माणसाला शरण जातात. ते देवास मानीतही नाहीत, मानीत असलेच तर क्षुद्र देवतांना मानतात.

त्याच्या ठिकाणी अनन्यता नसतेच. म्हणून येथे दीन पदाने दीन म्हणजे ' निरभिमानी हाच अर्थ घेणे उचित आहे. भगवंतास ' दीनानाथ ', ' दीनवत्सल ' अशी संबोधने दिली जातात तसेच ससारात द्रव्यरहित पुरुषाला दीनदरिद्री दैन्यवाणा म्हणतात; पण मोठे मोठे राजे महाराजे देखील दीन झालेले दिसून येतात. कारण आधिव्याधी इत्यादिकानी ते पीडलेले असतातच. जन्ममरणादि संसारधर्मांनी ते युक्त असतात, तसेच जरी ते श्रीमंत असलेले इतराना वाटतात तरी त्याच्यापेक्षा कोणी श्रीमंत त्याना दिसला तर त्याला पाहून ते स्वत.ला हीनच समजतात. पर्यायाने त्यानाही दीनच म्हणावे लागेल श्रीमद्भागवतामध्ये दरिद्र कोणास म्हणावे या उद्धवाच्या प्रश्नास श्रीकृष्णानी ' दरिद्रो यस्त्वसंतुष्ट ', असतुष्टासच दरिद्र म्हणावे असे उत्तर दिले आहे.

ऐक दरिद्राचें लक्षण । गाठी असता कोटिधन ।
ज्याचे सतुष्ट नाही मन । परम दरिद्री जाण या नाव ।।

ए. भा. २९–५५८

जो जो असतुष्ट, पराधीन, त्रिविध दु खाने पीडलेला जीवदशेत अडकलेला, तो इद्र-चद्र-ब्रह्मदेव कोणी का असेना, दीन होय. एका दृष्टीने पाहिल्यास ईश्वरा व्यतिरिक्त कोणीही जीव दीनच म्हणावा लागतो. हे जरी खरे आहे तरी असे सर्व जीव ईश्वरप्रेमास पात्र होतात असे नाही कारण ते कोणत्या ना कोणत्या अभिमानाने घेरलेले असतात व स्वत.स दीन समजतही नाहीत. किबहुना स्वत.ला ते ईश्वरच समजत असतात. संसारातही स्वतः संसाराच्या पाशात अडकून जन्ममरणादिकाचे क्लेश भोगत असताही स्वत स ' ईश्वरोहं अह भोगी ' समजणारे अनेक लोक आहेत. ते स्वतःस दीन समजतच नाहीत. ईश्वरप्रेमाची अपेक्षाही ठेवीत नाहीत, तर त्याच्यावर तो प्रेम करील कसा ? व केले तरी काय उपयोग ? त्याना त्या प्रेमाची कल्पनाही येणार नाही. म्हणून दैन्यप्रियत्व याचा अर्थ हा होतो की जे स्वतःला दीन समजतात, व दैन्यातून मुक्त करणारा एकमेव परमात्माच असे समजून त्याच्यावरच अनन्यभाव ठेवतात. देह वा विद्या, शक्ती, धन, कुळ, जाती इत्यादि कशाचाही अहकार बाळगीत नाहीत. इतकेच नव्हे, तर इतके दिवस आपला काळ व्यर्थ गेला, काहीच भगवत्सेवा घडली नाही याबद्दल अत्यंत पश्चात्ताप जे धारण करतात व यातून आपणास सोडविणारा केवळ एकमेव भगवानच आहे, असे जे समजतात त्यानाच दीन समजावे.

दैन्याचे स्वरूप व ते दैन्य देवापुढे कसे प्रगट करावे, त्यास कसे आळवावे या विषयात श्रीएकनाथमहाराजाचे व्याख्यान महत्त्वाचे आहे. भक्त देवापुढे आपले दैन्य कसे प्रगट करतो याबद्दल ते सागतात.

मी पडिलो विषय बंदीखानी । वेगी पावे गरूडा वळंघवोनि ।
कृपाळुवा चक्रपाणी । मज लागूनि सोडवी ॥ ३४९ ॥
विषय महाग्रहाचे तोंडी । मी सापडलो बडिश पिंडी ।
गजेन्द्राचे परी तांतडी । घाली उडी मजलागी ॥ ३५० ॥
धांव पाव गा गोविंदा । निवारी माझी विषयबाधा ।
उपेक्षू नको मुकुंदा । घेऊनि गदा धाव वेगी ॥ ३५१ ॥
तू अडलियांचा सहाकारी । भक्तकाज कैवारी ।
मज बुडता विषयसागरी । वेगें उद्धरी गोविंदा ॥ ३५२ ॥
मी पडिलों विषयसागरी । बुडविलो काम लोभ लहरी ।
क्रोधें विसंचिलों भारी । अभिमान सुसरी गिळियेलो ॥ ३५३ ॥
तू दीनदयाळ श्रीहरी । आपुलें बिरुद साच करी ।
मज दीनातें उद्धरी । निजबोधकरी धरोनिया ॥ ३५४ ॥ए. भा. २०

हा दीन कोणा जीवापुढे आपले दैन्य प्रगट करीत नाही, कारण त्याला माहीत असते की ही जीवदशा जेथपावेतो आहे तेथपावेतो सर्व दैन्यच असते. दीनाने दीनापुढे दैन्य प्रगट करून काय उपयोग ? ते स्वत. दीन आहेत, दुसऱ्याचे दैन्य काय दूर करू शकतील ? तसेच तो ईश्वरापुढेंही आपले आर्थिक वा अन्य लौकिक दैन्य प्रगट करीत नाही, तर वर लिहिल्याप्रमाणे देवापुढे आपली दीनता, तीही आध्यात्मिक- प्रगट करत असतो, तो भक्तिप्रेमाचीच याचना करतो. तो हेच समजतो की, प्रेमभक्ति प्राप्त होणे हेच परमभाग्य आहे. याशिवाय जी अवस्था प्राप्त होईल ती केवढीही मोठी असली तरी ते दैन्यच आहे. अशा भक्तावरच देव प्रेम करतो म्हणून 'दैन्य प्रियत्वात्' असे नारद म्हणतात. श्रीतुकाराम महाराज हा भाव प्रगट करताना म्हणतात.

देव सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ॥ १ ॥
कृपावंत किती । दीन बहु आवडती ॥ २ ॥
त्याचा भार वाहे माथा । करी योग-क्षेम-चिंता ॥ ३ ॥
भुलोनेंदी वाट । करी धरोनि दावी नीट ॥ ४ ॥
तुका म्हणे जीवे । अनुसरतां एका भावें ॥ ५ ॥

'एतावान्हि प्रभोरर्थो यद्दीनपरिपालनम् ।' 'प्रभुत्वाचे प्रयोजनच दीनांचे परिपालन करणे हे आहे.' कृपा हा ईश्वराचा स्वभाव आहे. मेघाचा स्वभाव वर्षाव करणे, चंद्राचा शीतलता देणे, सूर्याचा प्रकाश, त्याप्रमाणे दयामय प्रभुचा स्वभाव दीनावर प्रेम करून त्याचे दैन्य दूर करणे हाच आहे. आर्त द्रौपदी, गजेंद्र दीन शबरी, सुदामा या सर्वांची उदाहरणे याची साक्षभूत आहेत. तत्त्वत: सर्व जीव स्वभावत: दीनच आहेत, परतंत्र आहेत ते त्या ईश्वराचे अंशभूतच आहेत. म्हणून परमात्म्याचे त्यांच्यावर सहज प्रेम असणारच, परंतु अनादी अज्ञानजन्य अभिमाना-

मुळे ते स्वत:स दीन व ईश्वराचा अंश समजत नाहीत व ईश्वरप्रेमाची अपेक्षाही करीत नाहीत. तो अभिमान हा आपल्या अंशभूत जीवांना घातक असतो. म्हणूनच ईश्वर त्या अभिमानाचा द्वेष करतो व तो दूर करतो. तसेच जीवास अभिमान बाळगण्याचा अधिकार नाही असे समजून जे स्वत:स दीन समजतात त्यांच्यावर प्रेम करतो असे नारदमहर्षी या सूत्राच्या द्वारे सांगत आहेत.

## सूत्र २८

## तस्या ज्ञानमेव साधनमित्येके ॥ २८ ॥

**अर्थ :**

त्या (भक्तीचे) ज्ञान हेच साधन आहे असे कोणी (आचार्य) म्हणतात.

**विवरण :**

भक्ती ही कर्म, ज्ञान, योग यापेक्षा श्रेष्ठ आहे. ती फलरूपा आहे असे मागील सूत्रात स्पष्ट सांगितले गेले आहे. जर ती फल म्हणजे साध्यच असेल तर तिला कोणत्या तरी साधनाची अपेक्षा असरणारच. साधनाविना साध्यप्राप्ती होऊ शकत नाही म्हणून त्या भक्तीच्या साधनांचा विचार या सूत्रापासून केला जात आहे.

प्रथम अन्य आचार्यांचे मत सांगतात. कोणी एक या विषयाचा विचार करणारे म्हणतात की, या भक्तीचे ज्ञान हेच साधन आहे. कारण ज्याची भक्ती करावयाची त्याचे प्रमाणसिद्ध ज्ञान असणे अवश्य आहे. तसेच जी भक्ती करावयाची तिच्या स्वरूपाचे ज्ञान असणेही अवश्य आहे. आणि भक्तीचे प्रयोजन कळणेही अवश्य आहे. श्रीमद्‌भगवद्‌गीतेमध्ये चार प्रकारचे भक्त सांगितले आहेत, आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू, ज्ञानी. त्यात ज्ञानी भक्तच श्रेष्ठ असे श्रीकृष्णांनीच म्हटले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अनेक ठिकाणी या विषयाचा विचार केला आहे. ज्ञान नसेल तर भक्ती होणार नाही.

हें आंत बाहेर मियां कोंदलें । जग निखिल माझेंचि वोतिले ।
की कैसें कर्म तया जालें । जें मीचि नाहीं म्हणतीं ॥
परि अमृतकुहां पडिजे । कां आपणियातें कडिये काढिजे ।
ऐसें आथी काय कीजें । अप्राप्तासि ॥
ग्रासा एका अन्नासाठी । अंधू धांवताहे किरीटी ।
आदळला चिंतामणि पायें लोटी । आंधळेपणें ॥

तैसें ज्ञान जैं सांडूनि जायें । तै ऐसी हें दशा आहे ।
म्हणोनि कीजे तें केलें नोहें । ज्ञानेविण ।।
आंधळेया गरुडाचे पाख आहाती । ते कवणा उपेगा जाती ।
तैसे सत्कर्माचे उपखे जाती । ज्ञानेवीण ।। ज्ञा. ९. ३०२–६
येर मातें नेणोनि भजन । तें वांयाचि गा आने आन ।
म्हणोनि कर्माचे डोळे ज्ञान । ते निर्दोष होआवे ।।३५०।। ज्ञा. ९.३५०

जर ज्ञान नसेल तर, भज्य तो भगवान त्याचे यथार्थ स्वरूप कळत नाही, महत्त्व पटत नाही. त्यामुळे व्यभिचारबुद्धी भेददृष्टी निर्माण होते अन्य क्षुद्र देव-देवतांची भक्ती करू लागतो. फलेच्छा इत्यादि दोप निर्माण होतात. भक्ती निर्दोष होण्यास ज्ञान पाहिजे असे त्याचे म्हणणे असते.

येथे ज्ञान हा शब्द संदिग्ध वाटतो भक्तीचे जसे स्वरूप घेतले जाईल तसे ते ज्ञान ठरणार निराकार, निर्गुण परमात्मस्वरूपाची भक्ती मानली तर त्या स्वरूपाचे ज्ञान उपनिषदादी प्रमाणांवरून होते, व सगुण साकाराची मानली तर त्याचे अनंत गुण. अनंत लीला, माधुर्य, सौंदर्य तसेच रूप, आकार, त्याचे अनेक प्रकार इत्यादिकांचे ज्ञान मानावे लागते. मागे पूजा, कथा तसेच गोपिकांचे उदाहरण दिले आहे. पुढे सगुण-साकार भक्ती सांगितली आहे, त्यावरून सगुण साकार स्वरूपाचे ज्ञान हे साधन त्या भक्तीचे असे म्हणावे लागते. पण सगुणस्वरूपाच्या लीला, गुण, माधुर्य इत्यादिकांच्या ज्ञानानंतर भक्ती होते असे म्हणता येत नाही, तर भक्तीप्रेमाच्या स्वरूपातच वरील सर्व गोष्टीचा समावेश होतो. कारण सूत्र सोळा-सतरामध्ये पूजा-कथा इत्यादिकात अनुराग म्हणजे भक्ती असे म्हटले आहे व व्यास-गर्ग-नारद याची मते म्हणून ती सांगितली आहेत. केवळ निर्गुण-निराकाराचे ज्ञान येथे अभिप्रेत असावे असे वाटत नाही. कारण त्या ज्ञानात मुक्ती हे साध्य आहे. भक्ती नाही.

जर ज्ञान हे त्या भक्तीचे साधन अवश्य म्हणून असते तर गीता व भागवत एकादश स्कंधामध्ये भक्तीमध्ये अन्य साधनांचा निषेध केला गेला नसता.

**नाहं वेदैर्न तपसा न दाने न चेज्यया ।**
**शक्य एवं विधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ।।**
**भक्त्यात्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप** ।। गीता ११.५३,५४

' श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना, जसे तू मला पाहिले आहेस तसे वेद, तप, दान यज्ञ इत्यादिकांनी मी पाहिला जात नाही. अनन्यभक्तीच्या द्वारेच याप्रकारे मला पाहता येते, तत्त्वत. जाणता येते, व माझ्यात प्रवेश करता येतो. उद्धवासही भगवान श्रीकृष्ण हेच सांगत आहेत–

**न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव।**
**न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथा भक्तिर्ममोर्जिता ॥** भागवत ११-१४-२०

जशी दृढ भक्ती मला वश करू शकते तसे मला योग, ज्ञान, धर्म, स्वाध्याय तप, त्याग इत्यादी साधने वश करू शकत नाहीत.' म्हणजे भक्ती ही निरपेक्ष आहे. ती स्वतंत्र आहे, ती अन्य साधनाची अपेक्षा ठेवीत नाही. असे जरी आहे तरी भगवत्स्वरूपाचे ज्ञान आंशिक स्वरूपात का होईना आवश्यक असते. भक्तिरसामृतसिंधू नामक भक्तिशास्त्रावरील ग्रंथात श्रीरूप गोस्वामी म्हणतात–

ज्ञानवैराग्ययोर्भक्ति प्रवेशायोपयोगिता ॥
ईषत्प्रथममेवेति नाङ्गत्वमुचितं तयो. ॥ १-२-४८

'ज्ञान,वैराग्य या साधनाना भक्तीमध्ये प्रवेश होण्यापुरतीच उपयोगिता थोडीशी प्रारंभी आहे, ती साधने अंग होऊ शकत नाहीत.' म्हणजे ज्ञान हे भक्तीचे साक्षात साधन नसून उपाग म्हणता येईल. ज्ञान शब्दाचे ब्रह्मज्ञान, ब्रह्मात्मैक्यज्ञान, सारासारविवेकज्ञान असे अनेक अर्थ संभवतात. सारासार विवेकज्ञान, आत्मज्ञान, अभेदज्ञान, नित्यानित्यज्ञान असा अर्थ घेतल्यास ते ज्ञान भक्तीला पोषक असू शकते. 'फळकट संसार । येथ सार भगवंत ॥' 'तुका म्हणे एक विठ्ठलचि खरा । येर तो पसारा वाउगाची ॥' इत्यादि वचने या ज्ञानाचे स्वरूप सांगणारी आहेत असे म्हणावयास काही हरकत नाही. श्रवणादिकाने, सत्संगतीने झालेले भगवत्स्वरूपाचे म्हणजे रूप-माधुर्य-सौदर्य-गुणादिकाचे ज्ञान हृदयात प्रेम निर्माण करण्यास उपयोगी पडते. रुक्मिणीस एका ब्राह्मणाच्या मुखाने श्रीकृष्ण गुणाचे श्रवण झाले, त्यामुळेच तिच्या हृदयात श्रीकृष्णाविषयी अनुराग निर्माण झाला, नंतर तिने श्रीकृष्णास पत्रिका पाठविली असे भागवतात वर्णन आहे. असे परोक्ष ज्ञान भक्तीस पोषक होते, असा या सूत्राचा अर्थ केला तर चालेल.

पण यावरही शांडिल्यसूत्रात शंका आहे. या महात्म्य ज्ञानाने भक्ती निर्माण होतेच असे नाही, कारण कित्येक देवांच्या शत्रूनाही असे ज्ञान होते? पण त्यापासून त्याच्या अंत:करणात प्रेम निर्माण झाले नाही. ज्ञान असूनही काही प्रतिबंधामुळे शत्रूच्या ठिकाणी भक्ती निर्माण झाली नसेल असे अनुमान करता येईल. पण महात्म्यज्ञान असणे ठीक आहे. पण यावर असाही एक आक्षेप येऊ शकतो की, कित्येक भक्तांचा विचार केला तर त्याच्याजवळ ज्ञानसाधनाचा अभाव असूनही ते भक्तकोटीत समाविष्ट झाले.

वृंदावनासमीप अरण्यात यज्ञादी श्रौत कर्माचे अखंड आचरण करणारे ब्राह्मण रहात होते. त्यांच्या अंतकरणांत कर्मठत्वाचा अभिमान असल्याने श्रीकृष्णाकरिता गोपालांनी अन्न मागितले असताही त्यांनी दिले नाही. त्यांच्या स्त्रिया मात्र अन्न घेऊन गेल्या व त्यांनी भगवंतास संतुष्ट केले, नंतर त्या ब्राह्मणांना पश्चाताप झाला व ते

म्हणू लागले,

**नासां द्विजाति संस्कारो न निवासो गुरावपि ।**
**न तपो नात्ममीमांसा न शौचं न क्रियाः शुभाः ।।**
**अथापि ह्युत्तमश्लोके कृष्णे योगेश्वरेश्वरे ।**
**भक्ति दृढा न चास्माकं संस्कारादिमतामपि ।**
**धिग्जन्म नस्त्रिवृद्विद्यां धिग्व्रतं धिग्बहुज्ञताम् ।**
**धिक्कुलं धिक् क्रियादाक्ष्यं विमुखायेत्वधोक्षजे ।। भागवत १०–२३**

'या ब्राह्मण स्त्रियांचे द्विजातियोग्य संस्कारही झाले नाहीत, गुरुगृही वास करून काही ज्ञानही संपादन केले नाही, तप, आत्मनात्मविचारही केला नाही. इतकेच नाही, तर यांचे ठिकाणी पूर्ण पावित्र्य नाही व शुभकर्मही नाही. तथापि उत्तम श्लोक योगेश्वरेश्वर भगवंताचे ठिकाणी यांचे दृढ प्रेम आहे. आम्ही संस्कारवान आहो, गुरुकुलांत वास करून ज्ञान मिळविले, तप केले, आत्मानुसंधान केले पण त्याचे ठिकाणी आमचे प्रेम जडले नाही. आमचा ब्राह्मण जन्म, वेदाध्ययन, व्रते, यज्ञादिक याचा काय उपयोग आहे ? जे भगद्विमुख आहेत त्यांचे सर्व व्यर्थ आहे म्हणून आम्हांला धिक्कार असो.'

एवढा साधकबाधक विचार करण्याचे कारण हे की, भक्तीचे ज्ञान हे साधन आहेच असे श्रीनारदऋषी आपले स्वतःचे मत येथे सांगत नाहीत तर 'एके' म्हणून अन्य कोणाच्या मताचा अनुवाद करतात. भगवान श्रीकृष्णही उद्धवास सांगतात–

माझें भजन करितां । न पडे ज्ञानाची पंगिस्तता ।
माझें भजनें नित्यमुक्तता । जाण मद्‌भक्तां मद्‌भावें ।।
ज्ञानेवीण भक्ति न घडे । म्हणती ते शब्दज्ञान धडफुडें ।
भक्तीस्तव जाण रोकडे । ज्ञान जोडे अपरोक्ष ।।
एकनाथी भागवत ११, ६५८–५९

असा जरी भक्तिशास्त्राचा सिद्धान्त आहे तरी ज्ञान हे भक्तीचे साधन आहे असे म्हणणाऱ्यांचा या सूत्रात अनुवाद केला आहे.

# सूत्र २९
## अन्योन्याश्रयमित्यन्ये

**अर्थ :**

अन्य कोणाचे मत भक्ती व ज्ञान यांत अन्योन्याश्रयत्व आहे (भक्तीस ज्ञान आश्रय व ज्ञानास भक्ती आश्रय आहे.) असे आहे.

**विवरण :**

या विषयात आणखीही एक मत श्री नारद सांगतात.काही लोकांच्या मते भक्ती व ज्ञान हे परस्पर एकमेकांस आश्रय आहे. या संबंधात खालील पक्ष निर्माण होतात. १ ज्ञान भक्तीला आश्रय २ भक्तिज्ञानाला आश्रय ३ साधन ज्ञान साध्य भक्तीला आश्रय ४ साधन भक्ती साध्य ज्ञानाला आश्रय ५ साधन ज्ञान हे साधन भक्तीला आश्रय ६ साधन भक्ती साधन ज्ञानाला आश्रय. जसा साध्यसाधनांचा आश्रयीभाव संबंध असतो तसा साधना– साधनातही असतो. बहिरंग साधन हे अंतरंग साधनाचा आश्रय असते. मृत्तिका हे घटाचे साधन आहे. त्या मृत्तिकेला घटरूपाचा आकार देण्याकरितां चक्रदंड इत्यादी साधनेही लागतात. मात्र या दोन्ही साधनानी प्राप्त साध्य मात्र या दोहोहून वेगळे असावे लागते, चक्रदंड व मृत्तिका याच्यापासून घटाची उत्पत्ती होते त्याप्रमाणे

कित्येक मतवादी भक्ती व ज्ञान यांत साध्यसाधनभाव मानतात. भक्तीने ज्ञान प्राप्त होते. मात्र ही जी भक्ती आहे ती पराभक्ती म्हटली जाणार नाही. कारण पराभक्ती ही साधनरूपा नाही. ती कर्मज्ञानयोग यांच्याहून श्रेष्ठ आहे असे मागील पंचविसाव्या सूत्रांत सांगितलेच आहे. जी भक्ती ज्ञानोत्पादक आहे ती साधनरूपाच मानावी लागते. या भक्तीचा विचार पुढे छप्पन्नाव्या सूत्रांत येणार आहे. भक्ती ज्ञानसाधन आहे या विषयात श्री एकनाथ महाराजांचा एक अभंग प्रसिद्ध आहे.

भक्तिचे उदरी जन्मलें ज्ञान। भक्तीनें ज्ञानासी दिधलें महिमान ।।
भक्ति ते मूळ ज्ञान तें फळ। वैराग्य केवळ तेथीचें फूल ।।
फूल फळ दोन्हीं एकएकापाठी। ज्ञान वैराग्य तेविं भक्तिच्या पोटीं ।।
भक्तिविण ज्ञान गिवसिती वेडे। मूळ नाहीं तेथे फळ केविं जोडें ।।
भक्तियुक्त ज्ञान तेथे नाहीं पतन। भक्ति माता तया करितसे जतन ।।
शुद्ध भक्तिभाव तेथे तिष्ठे देव। ज्ञानासी तो ठाव सुखवस्तीसी ।।
शुद्ध भाव तेथें भक्तियुक्त ज्ञान। तयाचेनि अंगें समाधि समाधान ।।

एका जनार्दनी शुद्ध भक्तिक्रिया । ब्रह्मज्ञान त्याच्या लागतसें पाया ।।

'भक्तिर्जनित्री ज्ञानस्य भक्तिर्मुक्ति प्रदायिनी ।।' असे अध्यात्म रामायणातही वचन आहे. म्हणून भक्ती हे ज्ञानाचे अंतरग साधन मानले आहे. वेदान्तशास्त्रात ज्ञान हे वेदान्त वाक्याने होते व ते शमादिषट्क साधनसंपन्न अधिकारी मुमुक्षूसच होते असे सांगितले आहे ज्ञान होणे म्हणजे असत्वापादक व आभानापादक आवरण जाणे असा अर्थ आहे. तसेच प्रमाणप्रमेय याच्याविषयाच्या असभावना विपरीत भावनादिकांची निवृत्ती हे त्या ज्ञानाचे फल आहे. जरी महावाक्य श्रवणाने ज्ञान होते तरी त्या योगे सर्वच प्रतिबंध दूर होत नाहीत, म्हणून जसे मनन, निदिध्यासन सांगितले जाते त्याप्रमाणे प्रतिबंध निवृत्तीकरिता भक्तीने प्राप्त होणारा भगवत्प्रसाही आवश्यक आहे असे म्हटले जाते. कारण

**यावन्नानुग्रहः साक्षाज्जायतेपरमात्मनः ।**
**तावन्न सद्गुरूं कंचित्सच्छास्त्रमपिनो लभेत ।।**

' जो पावेतो परमात्म्याची कृपा होत नाही तोपावेतो ज्ञान देणारा गुरू अथवा सच्छास्त्र यांचा लाभ होत नाही ' असे श्रुति वचन प्रसिद्ध आहे. याही कारणाने ज्ञान, भक्ति याचा असा आश्रय-आश्रयी भाव-संबंध आहे. मात्र ही ज्ञानास कारणस्वरूप भक्ती जिज्ञासू भक्ताची अतएव गौणीच समजली जाईल. एके ठिकाणी असे म्हटले आहे.

**यथा ज्ञानं विना मुक्तिर्नास्त्युपायशतैरपि ।।**
**तथा भक्ति विना ज्ञानं नास्त्युपायशतैरपि ।।**

'जसे शेकडो साधने केली तरी ज्ञानाविना मुक्ती प्राप्त होत नाही, तद्वत शेकडो उपाय केले तरी भक्तिविना ज्ञान प्राप्त होत नाही. ' याप्रमाणे भक्ती ही ज्ञानास आश्रय आहे, हे सिद्ध होते. पण सूत्रातील शब्दयोजनेप्रमाणे ज्ञान हे भक्तीस आश्रय आहे असे म्हणावे लागते. ज्ञान व भक्ती याचा आश्रयआश्रयीभाव साध्य-साधनभावसंबंध कसा नियत असतो याचा विचार मागील अठ्ठाविसाव्या सूत्रात झाला आहे. उपास्याचे यथार्थ ज्ञान नसेल तर त्याची भक्ती होणार नाही. ते ज्ञान सामान्य रूपाने वा विशेष रूपाने असणे अवश्य आहे ? कित्येकांच्या मते उपास्याच्या माहात्म्याचे रूप, गुण, सत्ता, सामर्थ्य इत्यादी जर अलौकिक स्वरूप आहेत असें सत्संगतीने वा सच्छास्त्र श्रवणाने कळेल तर त्याच्या ठिकाणी श्रद्धा निर्माण होते. अशा रीतीने पराभक्तीस ते ज्ञान कारण होते. अशी उभयविध प्रमाणे सापडतात म्हणूनच कित्येक लोक ज्ञान व भक्ती यांना अन्योन्याश्रयत्व आहे असे म्हणतात. म्हणजे ज्ञान हे भक्तीचे साधन व भक्ती हे ज्ञानाचे साधन. मात्र जेव्हा ज्ञान व भक्ती यांचा परस्पर आश्रयआश्रयीभाव संबंध येतो तेव्हा ज्ञान व भक्ती यांच्या व्याख्या भिन्न भिन्न कराव्या लागतात. नसता अन्योन्याश्रय दोष येतो. म्हणजे जे ज्ञान

ज्या भक्तीस आश्रय तीच भक्ती त्याच ज्ञानास आश्रय असे म्हटल्यासारखे होईल; स्वस्कंधारोहणन्यायाप्रमाणे म्हणजे आपणच आपल्या खांद्यावर आरूढ व्हावे तसे ते आहे. म्हणून ज्या वेळी ज्ञान साधन त्या वेळी भक्ती साध्य व भक्ती साधन त्या वेळी ज्ञान साध्य असे म्हणावे लागते व प्रत्येक वेळी त्याच्या लक्षणांत भेद करावा लागतो ज्ञान व भक्ती ही दोन्हीही साधने मानली तर त्यांचे तिसरेच एक साध्य मानावे लागते. पण भक्तिशास्त्रकार भक्ती हे एक साध्यच मानतात

एखाद्या विषयाचा सांगोपांग विचार करताना त्या विषयात अन्याच्या मताचाही परामर्ष घेणे ही शास्त्रकाराची रीत आहे तिला अनुसरून नारदांनी ही मते सांगितली आहेत. नारदमहर्षींना ज्ञान व भक्ती यांतील असा साध्य-साधनभाव (अथवा अन्योन्याश्रयत्व) मान्य नाही. म्हणून पुढील सूत्रात ते आपले स्वत.चे मत सांगतात.

## सूत्र ३०

## स्वयंफलरूपतेति ब्रह्मकुमाराः ।। ३० ।।

**अर्थ** :

ब्रह्मकुमार (ब्रह्मदेवाचे पुत्र सनकादिक तसेच नारद) भक्ती स्वयंफलरूप आहे (असे म्हणतात).

**विवरण** :

भक्ती ही साधन मानली तर तिचे महत्त्व राहणार नाही. तसेच तिला ज्ञानादिकाचे साध्य मानले तरी पारतंत्र्य प्राप्त होते किंवा अन्योन्याश्रयत्व दोष प्राप्त होतो हे पूर्वीच्या सूत्रावरील विवरणात सांगितले आहे. ही दोन्ही मते नारदांना मान्य नसावीत म्हणून या सूत्रात नारद म्हणतात, ती स्वयं फलस्वरूप आहे.

या सूत्राचे दोन पाठ सापडतात. काही प्रतींमध्ये 'ब्रह्मकुमारः' असा पाठ आहे; काही प्रतीत 'ब्रह्मकुमाराः' असा बहुवचनी पाठ आहे. आमच्यादृष्टीने हा बहुवचनी पाठ योग्य वाटतो, नारद हे जसे ब्रह्मदेवाचे पुत्र तसेच सनक, सनंदन, सनातन आणि सनत्कुमार हेही ब्रह्मदेवाचे पुत्रच आहेत व त्यांचाही भक्तिमार्गात मोठा अधिकार मानला गेला आहे. म्हणून त्यांचे मत नारदांनी सांगितले आहे असे म्हणणे योग्य आहे. शिवाय भक्तीची स्वयंफलरूपता नारदांनी सूत्र सव्विसाव्यात

'फलरूपत्वात्' म्हणून सांगितलीच आहे. सनकादिक व नारद या उभय ब्रह्मकुमारांच्या मते भक्ती ही कोणाचे साध्य नाही व कोणाचे साधन नाही; ती स्वतःच फलस्वरूप आहे, तीच साध्य व तीच साधन, ज्ञानाने भक्ती किंवा भक्तीने ज्ञान हे मत त्यांना मान्य नाही.

ती स्वयंफलस्वरूपा कशी आहे याचे विस्तारपूर्वक विवरण, सव्विसाव्या सूत्रावर केले गेलेच आहे. कोणी म्हणेल की कोणते तरी साधन केल्याविना भक्ती तरी कशी प्राप्त होणार ? याचे उत्तर हे की, एका मनुष्यास पित्तदोषामुळे साखर कडू लागायला लागली, पण पित्तविकारावर उपायही साखर हाच आहे. ती योग्य प्रमाणात, योग्य अनुपानात उपयोगात आणा; तीच पित्तनाशाचे औषधही होईल. मधुर असल्यामुळे गोडही लागेल व पुन्हा पुन्हा खाण्याकडे प्रवृत्ती होईल.

याचप्रकारे भगवद्विमुखता, विषयवासना, अश्रद्धा हे रोग आहेत. यामुळे भक्ती गोड लागत नाही. पूजेत, भजनात, ध्यानात आनंद होत नाही; रुची निर्माण होत नाही. याचे औषधही हेच आहे की नामस्मरण सतत करीत राहणे. ते नाम ते विकार दूर करते, हृदयशुद्धी होते. तुकाराममहाराजांचा अनुभव पाहा.

नाम घेता मन निवे । जिव्हे अमृतचि स्त्रवे ।
होताती बरवे । ऐसे शकुन लाभाचे ॥१॥

म्हणजे नाम हेच नामाची गोडी लावते. भक्तीनेच भक्ती मधुर वाटावयास लागते. तुकाराममहाराजांनी प्रथम आपल्या वाणीस प्रेरणा दिली.

घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचे ॥

सतत तिच्या मागे लागले, मनात नसेल तर नसो पण वाचे तरी वसो, म्हणून नामजप, भजन चालू झाले. पण त्याचा परिणाम पुढे कसा झाला याबद्दल तेच स्वानुभव सांगतात.

विषयी विसर पडला निःशेष । अंगी ब्रह्मरस ठसावला ॥१॥
माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥२॥

श्री ज्ञानेश्वरमहाराज या अवस्थेचे वर्णन करतात.

**जयाचें वाचेपुढां भोजे । अखंड नाम नाचत असे माझें ।**
**जे जन्मसहस्री बोळगिजे । एक वेळ यावया ॥ ज्ञा. ९–२०६ ॥**

भागवत एकादश स्कंध तिसऱ्या अध्यायातील जनक नवयोगेश्वर संवादात–

**भक्त्या संजातया भक्त्या बिभ्रत्युत्पुलकान्तनुम् ॥३१॥**

'साधन भक्तीपासून उत्पन्न झालेल्या साध्य-फल-स्वरूप भक्तीच्या अनुभवाने ज्यांच्या शरीरावर रोमांच उभे राहिले आहेत' असे उभय भक्तीचे वर्णन आले आहे. या श्लोकावरील आपल्या प्रसादगर्भ टीकेत एकनाथमहाराज सांगतात–

ज्याचिया नामस्मरण करी । सकळ पातकाते हरि हरी ।
तो स्वयें प्रगटला अंतरी । पातका उरी उरे कैंचीं ।।

साधनरूप भक्तीच्या युक्ती । पूर्ण सप्रेम उपजे भक्ती ।
ते भक्तीची निजस्थिती । ऐक चक्रवर्ती सज्ञाना ।।

सद्भावें निजभजन करी । हृदयी प्रगटता श्रीहरी ।
तव देहीची चिन्हें बाहेरी । क्षणामाझारी पालटती ।।

चित्त चैतन्या होतां भेटी । हर्षे बाष्प दाटे कंठी ।
पुलकाकित रोमांच उठी । उन्मिलित दृष्टी पुंजाळे ।।

तेणें कीर्तन कीर्ति गजरे । त्रैलोक्य सुखे सुभरे ।
परमानंदुही हुंबरे । सुखोद्गारें तुष्टोनि ।। ए भा. ५८८.६०१

स्वयंफलरूपता म्हणतात ती हीच एक अलौकिक अवस्था आहे.

## सूत्र ३१ व ३२

## राजगृहभोजनादिषु तथैव दृष्टत्वात् ।। ३१ ।।
## न तेन राजपरितोषः क्षुच्छांतिर्वा ।। ३२ ।।

**अर्थ :**

राजवाडा, भोजन इत्यादीच्या संबधात (जसे) पाहण्यामुळे तसे ।। ३१ ।।

त्यामुळे राजाचा आनंद होत नाही किवा भुकेचे शमन होत नाही ।। ३२ ।।

**विवरण :**

ज्ञान हे भक्तीचे साधन आहे हे जे काही लोकांचे मत मागे सागितले त्याचा प्रतिवाद करण्यासाठी व भक्ती ही स्वयं-फलरूपा आहे या आपल्या मताच्या पुष्टी-साठी सूत्रकार श्रीनारद येथे उदाहरणे किंवा दृष्टान्त देतात. वरील दोन्ही सूत्रांचा अन्वय असल्यामुळे त्याचा येथे एकत्रच विचार केला आहे.

सूत्राचे एक लक्षण 'सारवत्' असे असल्यामुळे सूत्रांमधून शक्यतो सिद्धान्त सागितले जातात. दृष्टान्त वगैरे बहुधा दिले जात नाहीत. तरीसुद्धा संदिग्धता दूर करण्यासाठी एखादेवेळी दृष्टान्त देणे आवश्यक होते. दृष्टान्ताचे यासंबंधातील महत्त्व योगवासिष्ठात वसिष्ठमुनी श्रीरामचंद्रांना सांगताना म्हणतात,

**येनेहाननुभूतेऽर्थे दृष्टेनार्थेन बोधनम् ।**
**बोधोपकार फलदं तं दृष्टान्तं विदुर्बुधाः ।।**
**दृष्टान्तेन विना राम नापूर्वार्थोऽवबुध्यते ।**
**यथा दीपं विना रात्रौ भाण्डोपस्करणं गृहम् ।।**

योगवासिष्ठ, १८–५०–५१

'ज्या दृष्ट पदार्थाने अननुभूत अशा पदार्थाचा बोध होतो त्या ज्ञानाचे सहाय्यक फल देणाऱ्या पदार्थाला ज्ञाते दृष्टान्त म्हणतात. ज्याप्रमाणे रात्रीच्या वेळी दिव्यावाचून घरातील भांडी वगैरे दिसत नाहीत त्याप्रमाणे दृष्टान्ताशिवाय, हे रामा, अदृष्ट अर्थाचा बोध होत नाही ' असे असल्यामुळे येथे राजगृह व भोजन याचा दृष्टान्त दिला आहे. उपनिषदामध्येही अशीच सिद्धान्त पटवून देण्यासाठी दृष्टान्त देण्याची पद्धती आहे.

या सूत्राचा अन्वयार्थ करण्यामध्येही मागच्या पुढच्या संदर्भाकडे लक्ष न गेल्यामुळे बऱ्याच टीकाकाराचा गोंधळ उडालेला आहे त्याचा अन्वय खालील-प्रमाणे केला तरच सूत्राचा एकमेकाशी संबंध व्यवस्थित लागतो भक्तीच्या प्राप्तीचे साधन ज्ञान आहे असे म्हणणे म्हणजे कसे ते वरीलपैकी पहिल्या सूत्रात सांगतात तसे म्हणणे म्हणजे ' (यथैव) राजगृहभोजनादिषु दृष्टत्वात् तथैव '। याचा अर्थ, ज्ञानाने भक्ती प्राप्त होते असे म्हणणे म्हणजे राजगृह किंवा भोजन पाहिल्या-मुळे त्याची प्राप्ती होते असे म्हणण्यासारखे आहे. राजवाडा किंवा अन्नपदार्थांनी भरलेले ताट याच्यासंबंधात (राजगृहभोजनादिषु) ते पाहिले गेल्यामुळे (दृष्टत्वात) त्याची प्राप्ती म्हणजे त्याचा भोग प्राप्त होतो असे म्हणण्यासारखे (तथैव) ज्ञानाने भक्तीची प्राप्ती होते असे म्हणणे आहे । पण तसे होत नसते. तेच पुढील सूत्रात सांगतात.

'न तेन (दृष्टत्वेन) राजपरितोषः क्षुतत् शांति वा।'

त्या राजवाडा पाहण्याने राजाला मिळणारा त्या राजवाड्याच्या सौख्य-विलासादिकाचा भोग आपल्याला पहायला मिळत नाही किंवा भोजनपदार्थ पाहण्याने भूक शांत होत नाही.

'राजपरितोषः' या पदाचा अर्थ बहुधा सर्व व्याख्याकारानी 'राजाची कृपा ' किंवा ' राजाचा संतोष प्राप्त करणे ' असा केला आहे. पण ' राजपरितोषः' याचा अर्थ ' राजाचा आनंद ' म्हणजे राजा जो आनंद (राजवाड्यातील वास्त-व्याने) मिळवतो तो ' असा अर्थ करणेच मागील आणि पुढील सूत्रातील श्रीनारदांचे प्रतिपादन पाहता योग्य होईल.

भक्तीच्या ज्ञानाने किंवा ज्याची भक्ती करावयाची त्याच्या ज्ञानाने भक्ति-सुखाची प्राप्ती होत नाही किंवा ती त्या ज्ञानावर अवलंबूनही नाही. भक्तीत ज्ञान

असेल आणि असावे हे ठीक आहे पण ज्ञान झाल्याने किंवा ज्ञानाच्याद्वारे भक्तीची प्राप्ती होतेच असे नाही म्हणून ज्ञान हे भक्तीचे साधन नाही. कारण भक्ती ही 'स्वयंफलरूपा' आहे भक्तीच भक्तीचे साधन आहे. भक्ती केल्यानेच भक्तीप्रेमानंदाचा लाभ होतो. जे जे साध्य असते त्याचे साधन त्याच्यापेक्षा वेगळे असते असा सर्व साधारण नियम असता भक्तीचे साधन भक्ती स्वत च कशी असू शकेल अशी त्यावर शंका येईल. त्यावर श्रीनारदाचे उत्तर असे की ती परमप्रेमरूपा आहे आणि प्रेम हे अनुभवरूप आहे– म्हणजे अनुभवानेच कळणारे आहे, शब्दज्ञानाने नव्हे. कोणतेही सुख हा अनुभवाचाच विषय असतो, ज्ञानाचा नसतो. 'भक्ति-प्रेमसुख नेणवे आणिका। पंडित वाचका ज्ञानियासी ॥' असे तुकाराममहाराजही त्यामुळेच म्हणतात. सुखाची साधने कळल्याने सुख होत नाही तर सुखाचा अनुभव घेतल्याने सुख होते. राजवाडा पाहून त्यातील सुखाच्या अनेक साधनाचे ज्ञान होऊन त्यापासून राजाला जे सुख होते ते आपल्याला होईल काय ? त्याचा अनुभव घेण्यानेच ते सुख आपणास कळेल. त्याचप्रमाणे भोजनाचेही. जेवणाचे ताट पाहून व त्यातील कोणते पदार्थ कसे करतात, त्यातील गुण कोणते हे केवळ कळून थोडीच तुष्टीपुष्टी होते ? त्यासाठी त्या पदार्थाचे सेवनच केले पाहिजे त्याप्रमाणे भक्तीतील श्रेष्ठ प्रेमानंदाने तृप्त व शात व्हावयाचे असेल तर भक्तीचाच आस्वाद घेतला पाहिजे. म्हणून पुढील सूत्रात 'तस्मात् सा एव ग्राहया'– म्हणजे त्यासाठी तिचाच अगिकार केला पाहिजे असे म्हटले आहे.

असे हे नारदमहर्षीचे प्रतिपादन आहे त्यादृष्टीने सर्वप्रकारे वर केलेले या सूत्राचे अर्थच त्याचा हेतू योग्य प्रकारे व्यक्त करतात असे दिसून येईल.

भक्तिप्रेमाच्या संबंधात हाच सिद्धान्त सर्व सताना मान्य आहे. ज्ञानेश्वर-महाराज म्हणतात, 'हे अनुभवाचिजोगे, नव्हे। बोला ऐसे ॥' तर तुकाराम-महाराज सागतात,

प्रेम नये बोलता दाविता सागता।
अनुभव चित्ता, चित्त जाणे ॥

## सूत्र ३३

## तस्मात्सैव ग्राह्या मुमुक्षुभिः ॥३३॥

**अर्थ** :

म्हणून मुमुक्षूनी ती ( भक्ती )च ग्रहण करावी.

**विवरण** :

भक्ती स्वयंफलरूप आहे म्हणून मुमुक्षुनेदेखील 'सा एव' म्हणजे तीच–भक्तीच–स्वीकारावी.

आता मुमुक्षू कोणास म्हणावे याचा विचार करणे आवश्यक आहे. संसारात जे मानवदेहधारी जीव आहेत यांचे बद्ध, मुमुक्षू व मुक्त असे तीन प्रमुख भेद शास्त्रकारानी कल्पिले आहेत बद्धालाच विषयी असेही म्हणतात किंवा बद्धात पामर व विषयी असे दोन वर्ग मानले जातात. ऐहिक विषयभोगाचा धर्माधर्म, योग्य-अयोग्य न पाहता स्वैररूपाने अंगीकार करणारा रागद्वेषलोभादिकानी युक्त अशा मनुष्यास पामर म्हटले जाते. ऐहिक भोगासक्त ते पामर व स्वर्गलोकातील म्हणजे पारत्रिक धर्म्य अशा पुण्यविशेषाने प्राप्त झालेल्या भोगात आसक्त पुरुषांना विषयी म्हटले आहे. पामर हा धर्माधर्म पाहत नाही, व विषयी धर्मानेच प्राप्त झालेल्या विषयाचे सेवन करीत असतो, त्यामुळे तोही बद्धच असतो. विषयासक्तीने रागद्वेषादिकानी देहतादात्म्यानी, कर्म व कर्मफलासक्तीने व तन्मूलक अहंकार अज्ञानादि अनेक बंधनांनी तो बांधला गेलेला असतो, त्या बंधनातून सहजरीत्या तो बाहेर पडू शकत नाही. यालाच संसारबंधन म्हणतात. या बद्धासच शास्त्रीय भाषेत 'बुभुक्षू', भोगासक्त असेही म्हटले जाते. या बुभुक्षूत दोन प्रकार संभवतात. मुमुक्षूत्व योग्य व अयोग्य एखादा भोगासक्त असला तरी पूर्वसुकृताने सत्संगतीत केलेल्या सच्छास्त्र श्रवणाने या भोगातील दोष अनुभवास आल्यामुळे त्यातील असारता जर कळू लागली तर यातून सुटावे असे वाटू लागल्यास त्यास मुमुक्षुत्वयोग्य म्हणावे, व असा विचारही ज्याच्या मनात कधी येत नाही, कोणी योग्य मार्गदर्शन केले तरी अश्रद्धा, दुराग्रह, कुतर्क, विपर्ययादी दोषांनी सन्मार्गाकडे न प्रवृत्त होणाऱ्याना मुमुक्षुत्व अयोग्य म्हटले जाते. ज्याचे पूर्वसंस्कार चांगले आहेत असे सद्बुद्धिवान पुरुष ज्यांना इहपरभोगातील दोषाची पूर्ण कल्पना आली आहे, या देहात, संसारात राहणे म्हणजे एकप्रकारचे बंधन आहे, कारण मुक्तपणाने आनंदाचा भोग येथे नाही, अनेक बंधने अंतर्बाह्य रूपाने आपणांस पीडा देतात त्यामुळे जो दुःखी होतो व त्याचे परिमार्जन करण्याचा जो सतत प्रयत्न करतो त्यासच मुमुक्षू असे म्हटले

जाते. श्री एकनाथ महाराज सांगतात

**नित्यानित्यविवेकव्युत्पत्ति । इहामुत्रार्थफलभोग विरक्ति ।**
**शमदमादि साधन संपत्ति । अढळ चित्ती दृढ होआवी ।।**
**येही अवस्था वरुतीं । निश्चये वांछी निजमुक्ति ।**
**या नांव मुमुक्षा म्हणती । चित्तशुद्धी चित्तीं मुमुक्षुत्व हें** ।। हस्तामलक

श्रीज्ञानेश्वर महाराजांनी मुमुक्षूची खालीलप्रमाणे व्याख्या केली आहे.

**पैं भवस्वर्गा उबगले । मुमुक्षू योगज्ञानां वळघवले ।**
**पुढती नयों इयें निघाले । पैजां जेथ** ।। ज्ञा. १५–२७७

तसे पाहिले असता अध्यात्ममार्गात प्रविष्ट होण्याची इच्छा करणाऱ्यास मुमुक्ष म्हणतात. अनासक्त बुद्धीने कर्मे करणाऱ्या पुरुषासही गीतेमध्ये मुमुक्षू म्हटले आहे.

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपिमुमुक्षुभिः** ।। ४–१५

मोक्ष मुक्ती म्हणजे संसाराच्या, दु.खाच्या पारतंत्र्यातून सुटका. कोणीही विचारी पुरुप पारतंत्र्यात राहू इच्छिणार नाही. भक्तदेखील संसारदु.खात राहू इच्छिणार नाही मागील सूत्र सत्तावीसच्या विवेचन प्रसंगी भक्त या संसार दु.खातून मुक्त करण्याकरिता देवाची कशी प्रार्थना करतो, आपले दैन्य कसे प्रगट करतो याचा विचार आलाच आहे कित्येक भक्त-भाविक साधुसंतांजवळ आपले पारतंत्र्य प्रगट करतात–

काय मी उद्धार पावेन । काय कृपा करील नारायण ।
ऐसे तुम्ही सागा संतजन । करा समाधान चित्त माझें ।।

असे अनेक अभंग सर्व संताचे आहेत. जोपावेतो तो संसारात अंतर्बाह्य गुंतून पडला आहे तोपावेतो त्याची स्थिती कशी असते याचे वर्णन तुकाराम महाराज स्वानुभवपूर्ण भाषेत करतात–

गुंतलों या संवसारें कैसा झालोंसे अंध ।
मी माझें वाढऊनि माया तृष्णेचा बाध ।
स्वहित न दिसेंचि केला आपुला वध ।
लागले काळ पाठी सवें काम हे क्रोध ।। १ ।।

अशा स्थितीत साधक भक्त मुमुक्षूने काय करावे याचे उत्तर नारदमहर्षी या सूत्रातून देतात. काही मुमुक्षू केवळ स्वप्रयत्नाने या संसारबंधनातून मुक्त होतात.

आपुलेनि पुरुषार्थे जिंकिला संसार ।
केला मदमत्सर देशधडी । –तुकाराम महाराज

ते ज्ञानयोगाचा अवलंब करतात, असे श्रीज्ञानेश्वर महाराजांनी मुमुक्षूचे जे लक्षण पंधराव्या अध्यायात केले आहे, त्यावरून सिद्ध होते; पण कित्येकांना तेवढे सामर्थ्य नसते त्यांच्याकरिता श्रीकृष्णानेही उद्धवास उपदेश करतेसमयी भक्ती हेच साधन सांगितले आहे.

**निर्विण्णानां ज्ञानयोगो न्यासिनामिह कर्मसु ।।**
**तेष्वनिर्विण्ण चित्तानां कर्मयोगस्तु कामिनाम् ।।**

ए. भा. २०.७

'सर्व लौकिक भोगापासून पूर्णपणे विरक्त असून विधिपूर्वक संन्यास घेऊन ज्यांनी कर्माचा त्याग केलेला आहे अशा विरक्तांकरिता ज्ञानयोग सांगितला आहे; आणि कर्मामध्ये आसक्त असणाऱ्या कामिक विषयेच्छू लोकांना सिद्धी देणारा कर्मयोग सांगितला आहे.'

**यदृच्छया मत्कथादौ जातश्रद्धस्तुयः पुमान् ।**
**न निर्विण्णो नाति सक्तो भक्ति योगोऽस्य सिद्धिदः ।।८।।**

'ज्याला पूर्वसुकृताने भगवंताच्या पवित्र कथालीलादि श्रवण करण्याची गोडी लागून श्रद्धा उत्पन्न झाली, तो विषयादिकांपासून फार विरक्त नाही व विषयी लोकांप्रमाणे अत्यासक्त नाही अशा पुरुषांकरिता भक्तियोगच इष्ट फल देणारा आहे. श्रीएकनाथ महाराज लिहितात–

एवं विषयी दोषदर्शन । सर्वदा देखे आपण ।
परि त्यागालागी जाण । सामर्थ्यपूर्ण असेना ।।८४।।
सेवकी राजा बंदी धरिला । तया स्त्रीचंदनादि भोग दिधला ।
परी तो त्यासी विषप्राय झाला । भोगी उबगला अगत्यता ।।८५।।
एवं भोगिता त्या भोगासी । नित्य पाहे निजनिर्गमासी ।
तेवी भोगिता हा विषयासी । अहर्निशी अनुतापी ।।८६।।
या परी जो नव्हे विषयासक्त । ना निधडा नव्हे विरक्त ।
त्या लागी माझा भक्तिपंथ । मी बोलिलो निश्चित वेदवाक्ये ।।८७।।
येही करिता माझी भक्ती । माझ्या स्वरूपी लागे प्रीती ।
सहजे होय विषय विरक्ति । एवं सिद्धिदाती भक्ति हे माझी ।।८८।।

अशा मुमुक्षू साधकाकरिता अन्य योगादी साधनांची आवश्यकता नाही म्हणून सूत्रात 'सा एव' शब्दाने इतर साधनांचा निरास केला आहे. सूत्रातील मुमुक्षू शब्द हा वरील अर्थाने घेणेच योग्य आहे. मागील सूत्रात भक्ती ही स्वयं फलस्वरूपा आहे, असे सांगितले आहे. कोणास वाटेल साधनाशिवाय फलापर्यंत कसे जाता येईल ? याचे उत्तरही दिले गेलेच आहे की भक्ती हेच साधन मुमूक्षूंकरिता आहे; याच मार्गाने अनेक संत गेले आहेत.

मार्गी बहुत । याचि गेले साधुसंत ॥ -तुकाराम महाराज

हा राजमार्ग आहे, म्हणूनच निश्चयपूर्वक सांगतात की अन्य साधनाचा अवलंब न करता या साधनाचा स्वीकार मुमुक्षूनी करावा.

## सूत्र ३४

## तस्याः साधनानि गायन्त्याचार्याः ॥३४॥

**अर्थ** :

आचार्यगण त्या भक्तीची साधने प्रेमाने कथन करतात.

**विवरण** :

त्या फलरूपा भक्तीची तसेच मागील सूत्रात मुमुक्षूने जिचे ग्रहण करावे असे सांगितले आहे त्या भक्तीची साधने भक्तीच्या यथार्थ स्वरूपाचा अनुभव घेणारे आचार्य सांगतात येथे आचार्य म्हणजे शेवटी त्र्याशीव्या सूत्रात नारदानीच जे भक्त्याचार्य म्हणून कुमार, व्यास, शुक, शाडिल्य, गर्ग इत्यादी तेरा आचार्यांची नावे सागितली आहेत ते व त्याच्याच योग्यतेचे आणखी काही भक्त्याचार्य पुराणादिकांमध्ये प्रसिद्ध असलेले होत एखाद्या महत्त्वाच्या विषयाचे स्वरूप, साधन व फल सांगण्याचा अधिकार त्या विषयातील अनुभवी श्रेष्ठ पुरुषासच प्राप्त होतो व त्यांनी त्या साधनाचा स्वतःपूर्ण अनुभव घेतला असल्यामुळे त्याच्या सांगण्याला महत्त्वही प्राप्त होते. आचार्य शब्दाचा अर्थ खालीलप्रमाणे आहे-

**आचिनोतिच शास्त्रार्थं आचारे स्थापयत्यपि ॥**
**स्वयमप्याचरेद्यस्तु स आचार्य इति स्मृतः ॥**

वेदांतील अनेक प्रमेयांचे एकत्रीकरण करून त्या सिद्धांताची जो स्थापना करतो म्हणजे बहुजन समाजाला पटवून देतो, व स्वतःही त्याचे आचरण जो करतो, त्यास आचार्य असे म्हटले जाते.'

सद्‌गुरूंनाही आचार्य म्हटले जाते. श्रीज्ञानेश्वर महाराजांनी आपल्या सद्‌गुरु श्रीनिवृत्तिनाथांचे आचार्य म्हणून वर्णन केले आहे.

**जय जय आचार्या । समस्त सुरवर्या ॥**
**प्रज्ञाप्रभात सूर्या । सुखोदया ॥** ज्ञा. १४-१

यावरून आचार्य ही किती महत्त्वाची श्रेष्ठ पदवी आहे हे कळेल. एखादी

महत्त्वाची गोष्टही योग्य अधिकारी पुरुषानी सागितली तरच तिला लोकव्यवहारात महत्त्व येते. म्हणून या भक्तीची साधने भक्त्याचार्य सांगतात असे नारद म्हणतात वास्तविक नारदाचा अधिकारही या विषयात श्रेष्ठ आहे ते स्वतः सर्व साधने करून या श्रेष्ठ पदवीस पोहोचलेले 'भक्त्याचार्यच' आहेत, त्याच्याविषयी कोणाचाही अनादर नाही हे खरे पण संतांचा स्वभाव अन्य श्रेष्ठ पुरुषाचा आदर करावा, त्यांना श्रेष्ठत्व द्यावे असा असतो. तदनुसार आदराने आचार्य म्हणून निर्देश केला आहे. या साधनविचारात अनेकाची मते सागितली नाहीत, तसे असते तर कोणी म्हणतात असे म्हटले असते व त्याची मते सागून नंतर पूर्वीप्रमाणे नारदानी आपलेही स्वतंत्र मत या विषयात सागितले असते.

या भक्त्याचार्यानी जे मत एकमुखाने सर्वमान्य असे सांगितले आहे, ते नारदाना मान्यच आहे असे पुढील सूत्रावरून म्हणावे लागेल. मागील सूत्रात भक्ती हेच साधन व भक्ती हेच फल असे सांगितल्यानतर पुन्हा तिची साधने भक्त्याचार्य सागतात—नव्हे गातात—असे म्हणण्याचे कारण काय अशी शका येईल. भक्ती हेच साधन भक्ती हेच फल जरी म्हटले आहे तरी साधनरूपा भक्ती अंतःकरणात प्रगट होण्याकरिता त्याच्या आड जे प्रतिबंध येतात ते दूर केलेच पाहिजेत. रोगनिवृत्तीकरिता योग्य औषध दिले तरी योग्य अनुपान व पथ्यकारक पदार्थाचे सेवन अवश्यच असते. वेदात शास्त्रात मोक्षाचे साधन ज्ञान हे सांगितल्यावर त्या ज्ञानाकरिता श्रवण, श्रवणाधिकार प्राप्त होण्याकरिता विवेक-वैराग्यादी व इतर काही अंतरंग व बहिरंग साधने सागितली आहेतच. फलस्वरूपा भक्तीचे पराभक्तीचे अपराभक्ती हे साधन मानले तरी ती भक्ती प्रत्येक मानवाच्या अंत.करणात उत्पन्न होतेच असे नाही. 'नराणां क्षीणपापाना कृष्णे भक्तिर्हि जायते।' 'ज्याची पापवासना नष्ट झाली आहे त्यांच्याच ठिकाणी कृष्णभक्ती उत्पन्न होते' अशी अनेक वचने आहेत. तसे नसते तर मागील सूत्रात 'मुमुक्षुभिः' असे पद घालण्याचे कारण नव्हते. पामर विषयी पुरुष भक्तीकडे वळतच नाहीत. साधने दोन प्रकारची असतात. साध्यप्राप्तीत काही अडथळे आले तर ते दूर करणारी, आणि साध्याला पुष्टी देणारी. प्रतिबंध दूर करणारी दोन साधने पुढील पस्तिसाव्या सूत्रात सागितली असून पुष्टी देणारी साधने छत्तीस व सदतिसाव्या सूत्रात दाखविली आहेत. तसेच आणखीही एका महत्त्वाच्या साधनाचा अडतीस ते चाळिसाव्या सूत्रात विचार केला आहे तो पुढे येईलच.

सूत्रात 'गायन्ति' असे पद आहे ते महत्त्वाचे आहे. साधने सागतात असे न म्हणता गातात असा शब्दप्रयोग केला आहे. त्यामुळे त्या साधनाचे श्रेष्ठत्व सिद्ध होते. साधनाची स्तुती केल्यासारखे होते. साधनात गोडी आहे हे सिद्ध होते. कारण जेथे गोडी, रुची निर्माण होते तेथेच गायन होते. तसेच साधनात उपदेश

किंवा आज्ञा नसून सूचकता असावी असे वाटते गायन हे श्रोत्यांच्या संतोषाप्रमाणे आत्मतुष्टीचेही साधन आहे असेही सूचित होते. म्हणून 'गायन्ति' या पदातून अनेक अभिप्राय प्रगट होतात. हृदयातील ज्या संवेदना असतात त्या जेव्हा प्रेमाचे स्वरूप धारण करून बाहेर पडतात तेव्हा त्यास गायन म्हटले जाते. प्रेमाची बोली संगीत म्हटली जाते व प्रेमाची चाल (गती) तिला नृत्य म्हणतात. हे भक्त्याचार्य भक्तीचे परमप्रेमी आहेत म्हणून भक्तिविषयक साधनाचे गायन करीत असतात.

## सूत्र ३५

## तत्तु विषयत्यागात्संगात्यागाच्च ॥३५॥

**अर्थ :**

ते (साधन) तर विषयत्यागापासून आणि संगत्यागापासून (सिद्ध होते.)

**विवरण :**

जेव्हा भक्ती हे साधन मानले जाते तेव्हा ते साधन सिद्ध होण्याकरिता म्हणजे त्या साधनाची योग्यता सिद्ध होण्याकरिता त्या साधनाकरिता प्रतिकूल अशा गोष्टी तेथे नसल्या पाहिजेत. एखादे धातूचे रसायन बनवण्यापूर्वी काही विशिष्ट प्रक्रियेने त्यातील दोषभाग नाहीसा करावा लागतो, तो त्या धातूत प्रथम एकरूप झालेला असतो, त्याप्रमाणे परमात्मस्वरूपाची भक्ती सिद्ध होण्यासाठी ज्या अतःकरणात ती भक्ती निर्माण होईल ते शुद्ध पाहिजे.

करुनिया शुद्ध मन । नारायण स्मरावा ॥ – तुकाराम.

ते शुद्ध कसे होईल याचा विचार करताना ते अशुद्ध का झाले हेही पाहिले पाहिजे. तत्त्वविचारात अंतःकरण तत्त्व हे पंचभूतांच्या मिलित सत्त्वांशापासून झाले असे मानले आहे; म्हणून ते शुद्ध असणे योग्य आहे. तसेच, विषय हे तमोगुणाचे कार्य आहे म्हणून ते अशुद्ध आहेत. अंत.करण म्हणजे मन हे शरीरांतर्वर्ती तत्त्व आहे. जसे अंतःकरण तसेच पंच ज्ञानेंद्रिय ही पंचभूतांच्या पृथक् सत्त्वांशाची कार्ये आहेत म्हणून एक एक इंद्रिय आपल्या नियत विषयालाच जाणते. उदाहरणार्थ, डोळा रूपाला, घ्राणेंद्रिय (नाक) गंधाला, रसना जिव्हा रसाला, कान शब्दाला व त्वचा स्पर्शविषयालाच जाणते. या मनाचा इंद्रियाशी निकटचा संबंध आहे म्हणजे शरीरांतर्वर्ती मन या इंद्रियाच्या साहाय्यावाचून बाह्य पदार्थापावेतो जाऊ शकत नाही.

इंद्रियांचा पंचविषयांशी अनादिकालीन संबंध आहे या इंद्रियांमुळे मन बाह्य पंचविषयापावेतो जाते ते विषय शब्द, स्पर्श रूप, रस, गंध असे पाच आहेत. अनादि कालीन संबंधामुळे इंद्रिये या विषयात रंगून गेलेली आहेत. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.

**या विषयावांचूनि कांही । आणीक सर्वथा रम्य नाहीं ।**

**ऐसा स्वभावोचि पाही । इंद्रियांचा ।।** ज्ञा. २-१२०

तसेच या विषयाच्या अनादिकालीन संस्कारामुळे इद्रियतादात्म्याला पावलेले मनही पूर्ण विषयासक्त झाले. विषयप्रवृत्तीचे कारण विषयाच्या ठिकाणी भ्रममूलक सुखबुद्धी हे होय. अंतःकरणतादात्म्यामुळेच प्रमाता जीव हा कर्ता-भोक्ता बनतो व विषयांना भोग्य समजतो. आत्म्याला त्याच्या स्वरूपसुखाचे तो अज्ञानाने आवृत्त झाल्यामुळे भान नसते. म्हणजे खरे सुख विसरतो. अनादि संस्काराने अथवा अज्ञानाच्या विशेष शक्तीमुळे विषयासच सुख समजून त्याच्या मागे लागतो

**तैसे आपणपें नाहीं विठे । जयाते स्वसुखाचे सदा खरांटे ।**

**तयासींचि विषय हे गोमटे । आवडती ।।** ज्ञा. ५-११२

वास्तविक सुख हे परमात्म्याचेच एकमेव स्वरूप आहे. पण अज्ञानामुळे ते दुरावले जाते. श्रीज्ञानेश्वरमहाराज दृष्टांन्ताने सांगतात– दूध पवित्र व गोड आहे व गाईच्या कासेत जवळ आहे पण गोचीड दूध टाकून रक्त पितो, कमलकंद व बेडकुळी जवळ आहेत पण कमळाचा पराग दुरून येणारा भ्रमर सेवन करतो व बेडकुळीस चिखल खावा लागतो. दुर्दैवी मनुष्याच्या घरात धनाच्या राशी पुरलेल्या आहेत. पण अज्ञानामुळे त्याला त्यापासून सुख न होता उपवास पडतात तद्वत् श्रीकृष्ण म्हणतात अर्जुना ! सर्वांच्या हृदयामध्ये सर्वसुखाचा आराम असा मी असूनही या भ्रांत अज्ञानी जीवांना विषयात सुख आहे असे वाटते व ते विषयाच्या मागे लागतात. म्हणजे सुखबुद्धीने विषयभोग भोगण्याकडे प्रवृत्त होतात. (ज्ञा ९-५७-६०) किंबहुना विषयसुख भोगणे हाच पुरुषार्थ वाटतो.

सामान्यांनाच काय पण मोठमोठ्या ऋषीमुनीनादेखिल विषयातून चित्त दूर काढणे कठीण जाते. श्रीकृष्णांनी उद्धवास सनकादिऋषी व ब्रह्मदेवाचा एतद्विषयक संवाद सांगितला आहे. सनकादिक ब्रह्मदेवास विचारतात–

**गुणेष्वाविशते चेतो गुणाश्चेतसि च प्रभो**

**कथमन्योन्य सन्त्यागो मुमुक्षोरतितितीर्षोः ।। ए.भा. अ.१३–१७ ।।**

' विषयांमध्ये स्वाभाविकपणे रागादि दोषामुळे चित्त आकृष्ट होते, ते विषय वासनारूपाने चित्तात प्रवेश करून घर करून राहतात, अशा स्थितीत मुमुक्षूस विषय आणि चित्त यांचा परस्परसंबंध कसा तोडता येईल ?

सनकादिक पुसत । विषयांचिया ठायी चित्त ।
स्वभावे असे विषयासक्त । ते विषयो सतत आवेशले ।।२७४।।
तैसेचि विषय पाही । प्रवेशले चित्ताच्या ठायी ।
वासनारूपे जडले तेही । निघो कही नेणती ।। २७५ ।।
पर्णिली कांता माहेरा जाये । चित्ती रिघाली दूरी न राहे ।
यापरी विषयो पाहे । जडला ठाये चित्तासी ।।२७६।। ए. भा. १३

याचे कारणही पुढे सांगितले आहे–

अनादि संसार माळेच्या ठायी । नित्य विषय भोगिले पाही ।
ते ठसावले चित्ताच्या ठायी । वारंवार देही सेविता ।। ३७८ ।।
चित्तासी विषयाची अतिप्रीती । तेणे वाढली विषयासक्ती ।
ते प्रवेशले विषयांप्रती । न निगे मागुती सर्वथा ।। ३७९ ।।
बुद्धीसी विषयांचे ध्यान । चित्ती विषयांचे चिंतन ।
विषयालागी तळमळी मन । विषयाभिमान तेणे झाला ।। ३८० ।।

अशा रीतीने चित्तचतुष्टय म्हणजे जीव हा पूर्ण रूपाने विषयासक्त झालेला आहे याचे कारण आरंभी सांगितल्याप्रमाणे अज्ञानामुळे देहतादात्म्य उत्पन्न होते, व त्यामुळे शुद्ध चैतन्याच्या ठिकाणी हा देहाहंकार म्हणजे मी देहच आहे असा अभिमान उत्पन्न होतो.

कोणास वाटेल की विषय भोगले तर काय बिघडले ? अनुकूल विषयापासून जर सुख प्राप्त होते तर सुखाकरिता विषयभोग घ्यावयास काय हरकत आहे ? याचे उत्तर हे की, विषयात सुख प्राप्त होते हा भ्रम आहे, कारण सुख हा जड विषयाचा धर्मच नाही.

**हे विषय तरी कैसे । रोहिणीचे जळ जैसे ।। ज्ञा. २-२२१**

मृगजळापासून तृष्णा शांत होईल काय ? अनित्य, जड, दुःखरूप विषय सुखास कारण कसे होतील ?

**येहि संस्पर्शजा भोगाः दुःखयोनय एवते ।**
**आद्यान्तवन्तः कौंतेय नतेषु रमते बुधः ।। गी.५–२२**

श्रीकृष्ण म्हणतात ‘अर्जुना ! विषयेंद्रिय संयोगापासून झालेले भोग दुःखासच कारण होतात. कारण ते उत्पत्ति विनाशवान आहेत. ज्ञाता त्या विषयात रममाण होत नाही.’ या श्लोकावरील ज्ञानेश्वरमहाराजांची विस्तृत टीका मूळातच मननपूर्वक वाचणे योग्य आहे. अनेक दृष्टान्तांनी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी विषयाचे अनित्यत्व अनुभवसिद्ध दुःखरूपत्व व अज्ञानमूलकत्व पटवून दिले आहे. विषयात जो सुखाभास होतो तो अनुकूल विषयप्राप्तीमुळे क्षणिक इच्छावृत्ती अंतर्मुख होते व तिच्यात क्षणिक आनंदाचे भान होते. वास्तविक तो आनंद हृदयस्थ परमात्माच आहे. पण भ्रमाने, श्वान अस्थी चघळत असता त्याच्या हिरड्यातून

रक्त येते पण त्याला वाटते की या अस्थितूनच ते आले व आपलेच रक्त अस्थीचे म्हणून प्राशन करून तो भ्रमाने समाधान मानतो. त्याप्रमाणेच हा विषयाचा आनंद जीव मानतो. म्हणून जोपावेतो भ्रममूलक विषयासक्ती आहे तोपावेतो जीव विषयावरच प्रेम ठेवील व तेच मिळविण्याकरिता तो अहर्निश कष्ट करील, कदाचित एखाद्या देवाची भक्ती तो करीत असलेला दिसला तरी ती देवाकरिता नसून ती विषयाकरिताच असते. श्रीकृष्ण अर्जुनास सागतात–

**येर तंव बहुत जोडती किरीटी । जयाची भजनें भोगासाठी ।**
**ते आशा तिमिरें दृष्टी । मंद झाले** ।। ७–१३८. ज्ञा.

ज्याच्या भक्तीत देव हा साधन असतो, ती भक्ती खरी नसतेच. मागील सूत्रांतून अनन्यप्रेम म्हणजे भक्ती असे सांगितले आहे. विषयाकरिता भक्ती करणाऱ्याच्या ठिकाणी अनन्यता असणे शक्य नाही. म्हणून विचाराने विषयांचे खरे स्वरूप लक्षात आणावे, त्याची अनित्यता, परिणामी प्राप्त होणारी दुःखरूपता जाणून त्यांचा त्याग करावा. कोणतीही भ्रमभावना विचारापुढे टिकत नाही. विचाराने विषयांचे दोषदर्शन होते. योगशास्त्रामध्ये विषयात विवेकी दुःख कसे जाणतो याबद्दल चागले विवेचन आले आहे.

परिणाम ताप संस्कार दुःखैर्गुणवृत्ति विरोधात् दुःखमेव सर्वं विवेकिनः ।।
साधनपाद १५.

' परिणाम, ताप व संस्कार या दुःखाने व परस्पर अत्यंत विरुद्ध अशा ज्या सुखदुःखमोहरूप गुणांच्या वृत्ती त्यांनी विवेकी पुरुषाला सर्वच दुःख म्हणजे प्रतिकूल वाटते. '

काही विषे रुचीला प्रथम गोड लागतात. परंतु परिणामी मारक होतात तसेच विषयांचे आहे. श्रीकृष्ण उद्धवास सांगतात–

ते हे पंचविषय प्रमाण । पांचचि परी अतिदारुण ।
ब्रह्मादिक नाडले जाण । इतरांचा कोण पडिपाडू ।। १६१ ।।
विषयाचे जे गोडपण । ते विखाहूनि दारुण ।
विष एकदा आणि मरण । पुन्हः पुनः मारण विषयांचे ।। १६२ ।।
पुढती जन्म पुढती मरण । हे विषयास्तव घडे जाण ।
संसाराचे सबळपण । विषयाधीन उद्धवा ।। १६३ ।।

श्रीकृष्ण म्हणतात, उद्धवा ! अशा विषयाचा जो विवेकाने त्याग करील तो मला फार प्रिय आहे.

जेथ विषयांचा विषयत्यागु । तेथे उन्मळे भवरोगु ।
त्याचा आंदणा मी श्रीरंगु । ज्यासी विषय भोगू नावडे ।।१६४।।
ए. भा. २२

श्रीभगवद्‌गीतेच्या दुसऱ्या अध्यायात श्रीकृष्णांनी केवळ विषयध्यानाने संग (आसक्ती) निर्माण होऊन त्यापासून काम, क्रोध, संमोह, स्मृतिभ्रंश, बुद्धिनाश व प्रणाश होतो असे स्पष्ट सांगितले आहे. (गी. अ. २ श्लोक ६२–६३) अशा रीतीने सर्वत्र विषयाची बाधकता सांगितली आहे. म्हणून विषयत्याग करावयास पाहिज असे श्रीनारद सांगतात. कारण जोपावेतो अंतःकरणात विषयप्रेम आहे तोपावेतो ईशप्रेम निर्माण होणे अशक्य आहे पण तो विषयत्यागही सोपा नाही कारण अनादिकालापासून जीव कोणत्याही योनीत भ्रमण करीत असला तरी तेथे विषय-संबंध आहेच. त्यामुळे विषय संस्कार बलवान झालेले असतात. तसेच इंद्रिय तादात्म्यामुळेही इंद्रियविषयाचा संबंध अखंड असतो, हे जरी खरे आहे तरी ज्याप्रमाणे मधुमेहग्रस्त मनुष्यास साखर प्रिय असली तरी आरोग्यास घातक म्हणून ती सोडावीच लागते त्याप्रमाणे साधक भक्ताने विवेक-वैराग्यद्वारा हळूहळू प्रतिकूल विषयाचा त्याग करावा. सत्संगतीने विषयात दोषदर्शन होते, त्यांचे अनित्यत्व विचाराने पटते, त्याचप्रमाणे भगवत्प्रेमाचा अंतःकरणात अल्पही प्रवेश होऊ लागला म्हणजे विषयत्याग होणे सुलभ जाते. विषयत्याग कसा करावा याविषयी श्रीएकनाथ महाराज सांगतात–

धरिता विषयाची गोडी । भोगाव्या जन्ममरण कोडी ।
येणे भये विषय वोसंडी । इद्रियाते कोडी अतिनेमें ।।
इद्रिये कोंडिता न कोंडती । विषय साडिता न साडती ।
पुढत पुढती बाधू येती । या लागी हरिभक्ती द्योतिली वेदे ।।
इंद्रिये कोंडावी न लगती । सहजे राहे विषयासक्ती ।
एवढे सामर्थ्य हरिभक्ती । जात निश्चिती नृपवर्या ।।
योगी इंद्रिये कोंडती । भक्त ती लाविती भगवद्‌भक्ती ।
योगी विषय जे त्यागिती । ते भक्त अर्पिती भगवंती ।।
योगी विषय त्यागिती । त्यागिता देह दु.खी होती ।
भक्त भगवती अर्पिती । तेणे होती नित्य मुक्त ।।

ए. भा. २. २९३-९७

अशाच रूपाने विषयत्याग करणे योग्य आहे. विषयातील सुख आभासमात्र अनित्य आहे, भगवत्प्रेम हेच जीवाला सुखमय बनविणारे आहे असे वाटल्याविना विषयासक्ती कमी होणार नाही.

विषयत्याग हा संपूर्ण विषयांचा होणे शक्य नाही, कारण काही विषयांचे सेवन शरीरनिर्वाहाकरिता होणे अवश्यच असते. अन्नपानादिकांचा संपूर्ण त्याग होणे शक्य नाही. विषयत्याग करणे म्हणजे निषिद्ध विषयत्याग असाही अर्थ केला जातो,

पण ज्या विषयसेवनाने रागद्वेषादि दुष्ट विकार अधिक वृद्धिगत होतात व जे शरीरधारणाला आवश्यक असतातच असे नाही अशा केवळ भोगवासना वाढविणाऱ्या विषयांचा त्याग तर आवश्यकच आहे, कारण ती विषयासक्ती परमार्थाला विरोध आहे ती विषयासक्ती दूर होऊन; चित्त शुद्ध होऊन हृदयात भक्तीचा उदय होण्याकरिताच भागवतादि ग्रंथांत अनेक साधने सांगितली आहेत. गोपिकांबरोबर भक्तश्रेष्ठ उद्धवांचा संवाद झाला, त्या वेळी तो त्याना म्हणतो–

**दान व्रत तपो होम जप स्वाध्याय संयमैः ।**
**श्रेयोभिर्विविधैश्चान्यैः कृष्णे भक्तिर्हि साध्यते ।।**

भागवत १०–४–२४

'दान, व्रत, तप, यज्ञ, जप, वेदाध्ययन, संयम (शमदम) तसेच अन्य अनेक प्रकारच्या कल्याणप्रद साधनानी श्रीकृष्णाच्या ठिकाणी भक्ती सिद्ध होते.' म्हणजे विषयत्यागपूर्वक भक्ती सिद्ध होण्याकरिता अधिकारपरत्वे व श्रद्धापरत्वे भक्तिसाधक स्वेच्छेने वरीलपैकी जे अनुकूल वाटेल त्या साधनाचा स्वीकार करीत असतो विषयत्यागाकरिता जो इंद्रियनिरोध लागतो त्याकरिता या साधनांचा उपयोग होणे शक्य आहे. पुढे अठ्याहत्तराव्या सूत्रात नारदांनीही या साधनाचे पालन करावयास पाहिजे असे सांगितले आहे.

या विषयात श्रीमधुसूदनसरस्वती यांनी आपल्या भक्तिरसायन नामक भक्तिशास्त्रावरील अपूर्व ग्रन्थात असे म्हटले आहे की, चित्तद्रव्य स्वभावतः लाखेप्रमाणे कठीण असून लाख जशी अग्नितापाने पघळते त्याप्रमाणे चित्त हे काम, क्रोध, भय, स्नेह, हर्ष, शोक इत्यादिक तापक विकाराच्या संयोगाने द्रवभावाला प्राप्त होते. आणि त्या अवस्थेत चित्ताला जो विषय दिला जातो त्याचा आकार चित्त ग्रहण करीत असते. अनादिकालीन कामादिकाच्या ससर्गाने द्रवत्वाला प्राप्त झालेले चित्त विषयाचाच आकारग्रहण करीत असते. यामुळे प्रिय-अप्रिय अशा अनेक विषयांनी व्याप्त होणे हा चित्ताचा स्वाभाविक धर्मच झाला आहे. अशा स्थितीत चित्तातून विषयाचा त्याग होणे कसे शक्य आहे, अशी शंका घेऊन त्याचे उत्तर दिले आहे ते असे : विषयाकार होणे हा चित्ताचा स्वाभाविक धर्म नाही. कारणा ज्या कारणांनी विषयाकारता होते ती सर्व कारणे क्षणिक व आगन्तुक आहेत. जसे जागृत अवस्थेमध्ये इंद्रियसंबंधाने विषयाकारता प्राप्त होते, स्वप्नावस्थेमध्ये स्थूल विषयांशी इन्द्रियसंबंध नसतो, केवळ मनोगत वासना राहिलेली असते म्हणून चित्ताची सूक्ष्मविषयाकारता असते. परंतु सुषुप्तीमध्ये इंद्रियसंबंधक आणि मनोगत वासना या दोहोंचाही अभाव असल्यामुळे चित्त निर्विषय असते. पुन्हा जागृतीत आल्यानंतर चित्ताला विषयाकारता प्राप्त होते. भगवदाकारता ही चित्ताल स्वाभाविक आहे. कारण चित्ताला हेतुभूत जी सूक्ष्म पंचभूते आहेत व त्यांचेही कारण

अनिर्वचनीय रूप विचित्र अनेक शक्तींनी युक्त जी माया, तिचेही अधिष्ठान विभु-सर्वांतर्यामी तो भगवान सर्वत्र अनुगत (व्याप्त) आहे. जसे घटाला जलादीकांनी पूर्ण करण्याकरिता कोणत्या तरी कारणाची (जल भरणाऱ्याची) अपेक्षा असते पण आकाशाने तो स्वतः पूर्ण भरलेलाच असतो, कारण आकाश सर्वत्र व्याप्त आहे, तद्वत् बुद्धीला सुखाकारता अथवा सुखसाधनाकारताही धर्माधर्मामुळे प्राप्त होते. परंतु स्वत.सिद्ध आत्मस्वरूपाची व्याप्ती वस्तूच्या स्वभावानुरोधानेच असते. अर्थात आत्मस्वरूप सर्वत्र व्याप्त असल्याने बुद्धीतही ते पूर्णपणे स्वभाविक असतेच. पण यावरही अशी शंका येईल, जर चित्तामध्ये भगवदाकरता स्वाभाविकरूपाने असेल तर ती उत्पन्न करण्याकरता अन्य ध्यान, भजन इत्यादीक साधनांची आवश्यकता काय ? याचे उत्तर हे की, चित्तातील जी सामान्य, स्वाभाविक भगवदाकारता आहे ती विषयाकारतेशी संयुक्त होऊन असते व तिला साधक असते. म्हणून ती विषयाकारतेचा विरोध करीत नाही. परंतु भक्तिशास्त्रानुसारी साधनाच्या आचरणाने ती वेगळी होते. क्रमाने अभ्यास करीत असता विषयाकारता हळूहळू लुप्त होऊन साधने संपूर्ण झाल्यानंतर ती भगवदाकारता विषयाकारतेला मुळासह उपटून फेकून देते. म्हणून भक्तिशास्त्रप्रतिपादित साधनाचा उपयोग आहे. शास्त्रानुसार जी भगवदाकारता चित्ताला प्राप्त होईल ती विषयाकारतेला पुन्हा चित्तात प्रविष्ट होऊ देत नाही. या अवस्थेसच 'विषयत्याग' असे म्हणणे योग्य आहे.

विषयत्याग हा दोन प्रकारचा होऊ शकतो. काही अनावश्यक व निषिद्ध विषयांचा साक्षात त्याग करणे योग्य आहे. पण जे विहित व शरीरनिर्वाहास आवश्यक असे विषय आहेत, प्रारब्धबलाने प्राप्त आहेत, त्याचा त्याग कसा होणार ? तसेच कित्येक लोक विषयांचा बाह्यत. त्याग करीत असलेले दिसतात पण अंतःकरणातून ते विषय गेलेले नसतात. गीतेच्या तिसऱ्या अध्यायात श्रीकृष्ण म्हणतात–

**कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**
**इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ।। ३–६**

' कर्मेंद्रियांचे नियमन करून म्हणजे इंद्रियांना विषयापासून परावृत्त करून जो मनात विषयाचे चिंतन करतो, तो अत्यंत मूढबुद्धी होय. त्याला मिथ्याचारी, दांभिक असे म्हणतात. ' त्याचा तो त्याग मानला जात नाही.

**ऐसे ते पार्था । विषयासक्त सर्वथा ।।**
**ओळखावे तत्त्वता । येथे भ्रांति नाही** ।। ज्ञा.३–६६.

कारण बाह्य विषयाचा त्याग झाल्यासारखा दिसत असला तरी आत राग-द्वेष धुमसत असतातच.

**म्हणोनि विषय हे आघवे । सर्वथा मनौनि सांडावे ।।ज्ञा२–३३१**

**ये-हवी बाह्य विषय तरी नाही । परी मानसी होईल जरी काही ।**

**तरी साद्यन्तूचि ह्या पाही । संसारु असे ।।**

**जैसा का विषाचा लेशु । घेतिलिया होय बहुवसु ।**

**मग निभ्रांत करी नाशु । जीवितासि ।।**

**तैसी या विषयाची शंका । मनी वसती देखा ।**

**घातु करीं अशेखा । विवेकजाता ।। ज्ञा. २. ३१८-२०**

एवढा विस्तार करण्याचे कारण सूत्रात 'विषयत्याग' एवढा शब्द आहे पण तो त्याग सिद्ध होणे काही विषयाच्या दृष्टीने अशक्य व काही विषयांच्या बाबतीत कठीण आहे. म्हणून याच सूत्रात मध्ये 'च' घालून 'संगत्यागात्' असे म्हटले आहे. सूत्रात 'तु' असे एक पद आहे. त्याचे कारण, साधन हे बहुधा विधायक स्वरूपाचे असावे लागते, पण येथे ते त्यागस्वरूप सांगितले असल्याने निषेधस्वरूपात आहे. यासाठी 'तु' म्हटले असावे असे वाटते.

सूत्राचे दोन विभाग पडतात. विषयत्याग आणि संगत्याग. संग म्हणजे आसक्ती. ती इंद्रियात नसून अंतःकरणात असते. बीजात असणारा अंकुरदशेस येणारा धर्म अनुकूल वृष्टी, माती, वायू, प्रकाश याचा संबंध येताच जसा प्रगट होतो तद्वत् अंतःकरणात आसक्ती असेल तर विषयेंद्रियांच्या संयोगाने ती वेगाने प्रगट होते.

**जरी हृदयीं विषयस्मरती । तरी निस्संगाही आपजे संगती ।**

**संगी प्रगटे मूर्ति । अभिलाषाची ।। ज्ञा. २० ३२१**

म्हणून संग म्हणजे आसक्तीचा त्याग सांगितला आहे. ही आसक्ती रागद्वेषादि विकारास निर्माण करते व ते भक्तीस पूर्ण विरोधी असतात म्हणून त्यांचे मूळ जो संग तो टाळला पाहिजे.

अनंत बुद्धीचे तरंग । क्षणक्षणा पालटे रंग ।

जो जो धरू जावा संग । तो तो होय बाधक ।। तु० ।।

असे तुकाराममहाराजानी सांगितले आहे. भक्तमार्गात एक भगवदासक्तीच अभिप्रेत आहे.

**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन् मदाश्रयः । गी. ७–१**

असे श्रीकृष्णांनी सांगितलेच आहे. ही भगवदासक्ती अनेक रूपाने भक्तिप्रेमात कार्य करीत असते. तिचे अकरा प्रकार पुढे ब्याऐंशीव्या सूत्रात सांगितले आहेत मन हे एकालंबनात्मक असते, म्हणजे एका वेळी एकाच विषयाशी संबद्ध होऊ शकते. भगवदासक्ती असेल तेव्हा विषयासक्ती 'संग' राहू शकत नाही व विषय हे विजातीय असल्याने त्यांचा संग बाधकच असतो, तो भक्तीस विरोधी असतो

म्हणून त्याचा त्याग सांगितला आहे. विवेक-वैराग्याने तो होणे शक्य आहे. संग ज्या ज्या विषयाचा होणे शक्य आहे त्यांच्या ठिकाणी असणाऱ्या दोषाचे चिंतन करीत गेल्याने आसक्ती हळूहळू कमी होते. तसेच पूर्णत्वाने नाही तरी थोडे थोडे हे चित्त भगवंताकडे लावण्याचा प्रयत्न केला तर हळूहळू विषयासक्ती कमी होईल् असे श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात--

**तरि गा ऐसे करी । यया आठा पहारा माझारी ।**
**मोटके निमिषभरीं । देतु जाय ॥१०५॥**
**मग जे जे का निमिख । देखेल माझे सुख ।**
**तेतुले अरोचक । विषयी घेईल ॥१०६॥**
**जैसा शरत्काळ रिगें । आणि सरिता वोहटू लागे ।**
**तैसा चित्त काढेल वेगे । प्रपंचौनि ॥१०७॥ ज्ञा. १२**

यावर कोणी शंका घेईल की, विषयत्यागाने भक्ती का भक्तीने विषयत्याग ? भक्ती करिता विषयत्याग हे साधन व विषय त्यागाकरिता भक्ती हे साधन मानले तर अन्योन्याश्रय दोष येतो. याचे थोडक्यात उत्तर हे की, नारदांनी सांगितल्या-प्रमाणे प्रथमत विवेकाने विषयत्याग व संगत्याग हळूहळू करण्याचा प्रयत्न करावा. हा करीत करीत भगवद्भक्तीकडे मन वळवीत जावे. ते जसे जसे वळेल व ती गोडी लागेल तसा तसा सवासना विषयत्याग पूर्णरूपाने होईल. हेच सांगण्याकरिता पुढील छत्तिसाव्या सूत्राची रचना केली आहे. विषय-त्यागास विवेक-वैराग्यादि साधने सांगितली आहेत पण तीही कठीणच आहेत. त्यातही अनेक विघ्ने येत असतातच. ज्याना ते शक्य आहे असे वाटते त्यानी आत्मविश्वासपूर्वक त्या साधनाचा अवलंब करावा पण ज्याना अशक्य किंवा कठीण वाटेल त्याच्याकरिता भक्तिसाधनाचा मार्ग बंद नाही. याकरिता पुढील सूत्रात आणखी एक महत्त्वाचे साधन सांगितले आहे.

# सूत्र ३६

## अव्यावृत भजनात् ॥

**अर्थ** :

(ते भक्तिसाधन) अव्यावृत– अखंड भजनाने (सिद्ध होते.)

**विवरण** :

मागील सूत्रात विषयत्याग व संगत्याग हे साधन सांगितले. आता या सूत्रात ती भक्ती सिद्ध होण्याचे ' अव्यावृत भजन ' हे साधन सांगतात. भजन हे प्रसिद्ध साधन आहे. सर्वच भाविक कोणत्या ना कोणत्या प्रकारे भजन करीतच असतात. पण ते भजन अनन्यभक्ती निर्माण करीलच असे नाही.

भजन हे भक्तीचे महत्त्वाचे अंग आहे पण ते अव्यावृत–अखंड- झाले पाहिजे. भजनात खंड पडण्याची देहभोगप्रवृत्ती, विषयवासना, विकाराधीनता, अश्रद्धा इत्यादी अनेक कारणे असतात, ती दूर करून पूर्ण भावनेने ते भजन झाले पाहिजे.

आम्हा नामाचे चिंतन । रामकृष्ण नारायण ।
तुका म्हणे क्षण । खाता जेवीता न विसंबो ॥

असे अनेक उद्‌गार श्रीतुकाराममहाराजाचे प्रसिद्ध आहेत

ज्ञानदेवा गोडी हरिनामाची जोडी । रामकृष्णी आवडी सर्वकाळ ॥

असा आपला अनुभव श्रीज्ञानेश्वरमहाराज हरिपाठामध्ये सांगतात. या अव्यावृत अखंड भजनाकरिता दृढभाव व नामनिष्ठा आवश्यक असते अखंड भजन तेव्हाच होईल की जेव्हा सर्वेंद्रियांच्या अंतःकरणाच्या वृत्ती एका ठिकाणी येतील. त्या कशा आल्या पाहिजेत या विषयी श्रीएकनाथमहाराज सांगतात–

अकराही इंद्रियवृत्ति । कैशा लावाव्या भगवद्‌भक्ती ।
ऐक राया तुजप्रती । संक्षेप स्थिती सांगेन ॥
मने करावे हरीचे ध्यान । श्रवणे करावे कीर्तिश्रवण ।
जिव्हेने करावे नामस्मरण । हरिकीर्तन अहर्निशी ॥
करी करावे हरिपूजन । चरणी देवालय गमन ।
घ्राणी तुलसी आमोद ग्रहण । जिही हरिचरण पूजिले ॥
नित्य निर्माल्य मिरवे शिरी । चरण तीर्थे अभ्यंतरी ।
हरिप्रसाद ज्याचे उदरी । त्या देखोनि दुरी भवभय पळे ॥
वाढतेनि सद्‌भावे जाण । चढतेनि प्रेमे पूर्ण ।
' अखंड ' ज्यासी श्रीकृष्ण भजन । त्यासी भवबंधन असेना ॥

भा. २. ३००-४

तसेच पुढे अकराव्या अध्यायात स्वतः श्रीकृष्णच अखंड भजनाचे स्वरूप सागतात

माझेनि भजने कृतकृत्यता । दृढ विश्वास धरोनि चित्ता ।
भजनी प्रवर्तावे सर्वथा । अविश्रमता अहर्निशी ॥
माझ्या भजनाच्या आवडी । नुरेचि अराणुकेसी याडी ।
वाया जावो नेदी अर्धघडी । भजन परवडी या नाव ॥

ए. भा. ११. ६५२-५३.

अखंड भजन होण्याकरिता कोणकोणत्या गोष्टी वर्ज्य असाव्यात हे श्रीकृष्ण सागतात–

आळस दवडूनि दुरी । अभिमान घालोनिया बाहेरी ।
अहर्निशी कीर्तन करी । गर्व न धरी जाणिवेचा ॥७३८॥
जाणीव जाणीव शहाणीव । वोवाळूनि साडावे सर्व ।
सप्रेम सावडी कथागौरव । सुख अभिनव तेणे मज ॥७३९॥
विसरोनि आन आठवण । अखंडता हरिस्मरण ।
या नाव भक्तीसी विकला प्राण । इतर भजन अनुमानिक ॥ १०८० ॥

ए. भा. ११

अशा अखंड भजनानेच खरी प्रेमभक्ती उत्पन्न होते. ध्रुव-प्रल्हादादिकानी अव्यावृत भजनच केले. ‘भजनं-भक्ति.’ भजन म्हणजेच भक्ती असा भजन शब्दाचा अर्थ आहे. पण ‘तुका म्हणे नाम । मागे मागे धावे प्रेम ।’असे श्रीतुकाराममहाराज म्हणतात. अत.करणात गुणकामनारहित परमप्रेम एकदम सहजासहजी उत्पन्न होणे कठीण आहे ती भक्ती या अखंड भजनाने उत्पन्न होते ‘आईआई’ या नावाने हाका मारतामारताच बालकाच्या ठिकाणी मातृप्रेम वृद्धिगत होत असते.

ही अनन्यता सिद्ध होण्याकरिता कामादि विकारांमुळे चित्त ज्या विषयासी तादात्म्याला पावलेले आहे त्याचा त्याग करूनच ती सिद्ध होते, असे श्रीज्ञानेश्वर-महाराजही सागतात.

**जें विषयांसि तिळांजळी देऊनि । प्रवृत्तीवरी निगड वाऊनि ।**
**माते हृदयी सूनि । भोगितातो ॥१२४॥**
**परी भोगितया नाराणुका । भेटणे नाही क्षुधाविका ।**
**तेथ चक्षुरादि रंकां । कवण पाडु ॥ १२५ ॥** ज्ञा. ८

श्रीकृष्ण म्हणतात, हे पार्था, जे भक्त विषयांना तिलांजली देऊन म्हणजे विषयांवर पाणी सोडून, सवासना विषयत्याग करून, यावत् प्रवृत्ती म्हणजे व्यव-हाराचा निरोध करून मला अंतःकरणात साठवून माझ्या स्वरूपाचा भोग घेतात.

त्यांचे माझ्या स्वरूपाचा कितीही भोग घेतला तरी समाधान होत नाही,' जास्त काय, भूक, तहान याचा त्याना पत्ता नसतो. तेथे डोळे इत्यादी इंद्रियाकडे कोण पाहील ?' असा वरील ओव्याचा आशय आहे. व्यावृत म्हणजे तेथून परतणे. भजन करता करता कोणत्याही अन्य कारणाने भजनापासून परत न फिरणे. श्रीभानुदासमहाराज सागतात--

जे हे आकाश वरपडो पाहे । ब्रह्मगोल भंगा जाये ।
वडवानळ त्रिभुवन खाय । तरि मी तुझीच वास पाहे गा विठोबा ।।
भलतैसे वर पडो भारी । नाम न टळो न संडो निर्धारी ।
जैसी पतिव्रता प्राणेश्वरी । विनवी भानुदास म्हणे अवधारी गा विठोबा ।।

अशा प्रकारे 'अव्यावृत्त भजन' हे त्या प्रेमस्वरूपा भक्तीचे साधन आहे.

## सूत्र ३७

## लोकेऽपि भगवत्गुणश्रवणकीर्तनात् ।।३७।।

**अर्थ** .

लोक व्यवहारातही भगवत्गुण श्रवण आणि कीर्तनाने ( भक्तीची प्राप्ती होते असे मानले जाते. )

**विवरण** :

मागील छत्तिसाव्या सूत्राचेच हे अधिक स्पष्टीकरण आहे असे म्हटले तरी चालेल. तेथे 'भजन' असे पद आहे भजनात श्रवण-कीर्तनादिकाचाही अतर्भाव होतो. लोकव्यवहारात भक्ती उत्पन्न होण्याकरिता भगवद्गुण श्रवण-कीर्तनादि साधनाचा अवलंब केला जातो सत्संगतीत श्रद्धापूर्वक हरिगुण श्रवण-कीर्तनादिकानेच अंतःकरणात भगवत्भाव निर्माण होतो व प्रेमवृद्धी होत असते असा सर्व भक्तिमान पुरुषाचा अनुभव आहे.

येथे गुणश्रवण व कीर्तन असे पद आहे. जगांत प्रत्येक चेतन ( जीव ) अचेतन वस्तूच्या ठिकाणी कोणता ना कोणता गुण असतो.किंबहुना प्रत्येक वस्तू गुणात्मकच आहे, परंतु जीव किंवा जडपदार्थाच्या गुणश्रवण- कीर्तनाने भक्ती निर्माण होणार नाही. किंबहुना ते गुणश्रवणकीर्तन भक्तीस प्रतिबंधक होत असते. याकरिता मूळ सूत्रांत 'भागवत्' हे पद योजिले आहे. तत्त्वतः परमात्मा जरी निर्गुण निराकार असा आहे तरी तो आपल्या भक्तांकरिता सगुण

साकार बनतो. गीतेच्या चौथ्या अध्यायांत श्रीकृष्ण स्वतःच सागतात.

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्म मायया ।। ४–६**

'अर्जुना ! मी जन्मविरहित, अव्ययस्वरूप आणि भूताचा अधिपती असूनही स्वकीय मायेचा अंगीकार करून आपल्या भक्तांकरिता अवतार घेतो.' ते वेळी आपुल्याचेनि कैवारे । मी साकार होऊनि अवतरे ।। ज्ञा० ४–५ पुढे भक्ति-सूत्र ऐशीमध्येही भगवंताचा आविर्भाव सागितला आहे. सूत्रात 'भगवद्‌गुण' असा शब्द आहे. ईश्वरवाचक जी अनंत नामे अथवा विशेषणे योजिली जातात त्यांचा त्यांचा काही विशेष अर्थात उपयोग असतो. काही नामे गुणबोधक, काही क्रियाबोधक, काही सामर्थ्यबोधक, काही लीलावाचक अशी अनेक प्रकारची आहेत. येथे देव, परमात्मा असा शब्द न वापरता 'भगवत्' असा शब्द वापरला आहे, तो फार महत्त्वपूर्ण अर्थ प्रतिपादन करणारा आहे. गीतेमध्येही श्रीकृष्ण उवाच असे न म्हणता 'भगवानुवाच' असे म्हटले आहे. 'भगवत्' शब्दाची व्याख्या विष्णुपुराणा-मध्ये खालील प्रमाणे केली आहे.

**शुद्धे महाविभूत्याख्ये परेब्रह्मणि वर्तते ।**
**मैत्रेय भगवच्छब्दः सर्वकारण कारणे ।।**

'शुद्ध परब्रह्म जे सर्व कारणांचे कारण आहे, अशा त्या महाविभूती या नावाने प्रसिद्ध परमात्मस्वरूपाकरिताच 'भगवत्' शब्द योजिला आहे. या नंतर 'भगवत्' या पदातील प्रत्येक वर्णाचा स्वतंत्र अर्थ श्लोकांतून सागितला आहे.

**संभर्तेति तथा भर्ता भकारोऽर्थ द्वयान्वितः ।**
**नेता गमयिता स्रष्टा गकारार्थस्तथा मुने ।।**
**ऐश्वर्यस्य समग्रस्य वीर्यस्य यशसः श्रियः ।**
**ज्ञानवैराग्ययोश्चैव षण्णां भग इतीरणा ।।**
**वसन्ति तत्र भूतानि भूतात्मन्यखिलात्मनि ।**
**सच भूतेष्वशेषेषु वकारार्थ स्ततोऽव्ययः ।।**

विष्णुपुराण ६।५।७२–७५

भगवच्छब्दातील प्रत्येक अवयवाचा अर्थ सागण्याकरितां प्रथम 'भ'कार अर्थ पाहू. 'भृ' धातूपासून 'ऊ' प्रत्यय लागला असता भू शब्द बनतो. त्याचा 'संभर्ता' 'भर्ता' अशा दोन अर्थात् प्रयोग होतो.

**'संभरणं उपकरण संविधानम्'**

प्रकृत्यादिकाना कार्योत्पत्तीयोग्य करणे म्हणजे संभरण, ते करणारा म्हणून संभर्ता व भर्ता म्हणजे स्वामी, सर्व जगाचे भरण-पोषण करणारा. 'विश्वश्रियेचा

भर्ता। मीचि गा एथ पंडुसुता ।। ज्ञा० ९. भगवत् शब्दातील दुसरा वर्ण ' ग 'आहे या गकाराचे तीन अर्थ ' नेता, गमयिता, सृष्टा ' असे आहेत. नेता म्हणजे स्थिती कर्ता. गमयिता म्हणजे संहारकर्ता. सृष्टा म्हणजे उत्पत्ती करणारा. गम् धातू हा उत्पत्ती स्थिती लयार्थक आहे. ' भग ' एवढा शब्द घेतला तर या दोन अक्षरांनी सिद्ध होणाऱ्या पदाचा अर्थ तिसऱ्या श्लोकांत सांगितला आहे. समग्र पद सर्व विशेषणाकडे लावले जाते. समग्र ऐश्वर्य म्हणजे संपूर्ण नियमन-शक्ती. गुणवान् या रूपाने जी प्रसिद्धी त्यास यश म्हणतात. श्री म्हणजे सर्व प्रकारचे भाग्य संपत्ती वैराग्य म्हणजे कोठेही आसक्ती नसणे. ज्ञान म्हणजे सर्व वस्तूचे यथार्थरूपाने विशेष ज्ञान, सर्वज्ञत्व तिसरा वर्ण ' व ' आहे. वस् धातूपासून ' व ' शब्द सिद्ध होतो.

' वसन्ति तत्र भूतानि भूतात्मन्य–खिलात्मनि ' भूतमात्राच्या आत अखिल शरीरामध्ये वास करणारा, असा ' व ' शब्दार्थ आहे. शेवटचा ' त् ' ' त्यजति हेय गुणान् ', हेय म्हणजे त्याज्य अशा गुणाचा त्याग या अर्थी त्यज धातूस क्विप् प्रत्यय लागून यकारादि भागाचा लोप होऊन व्यंजन मात्र ' त् ' कार रूप अवशिष्ट राहते तो ' भगवत् ' या शब्दातील अंतिम तकार होय. तात्पर्य भगवत् शब्द हा षड्गुणैश्वर्य संपन्नता वाचक आहे. आईका यश श्री औदार्य । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य । हे साही गुणवर्य । वसति जेथ ।। म्हणोनि तो भगवंत जो नि.संगाचा सांगात ।। ज्ञा ६–३७

असे श्री ज्ञानेश्वर महाराजही भगवंत शब्दाचे व्याख्यान करतात विशेषत निर्गुण, निराकार परमेश्वर स्वरूपास भगवंत हे विशेषण लावले जात नाही तर तोच जेव्हा भक्तांकरितां सगुण, साकार बनतो तेव्हां त्याला भगवान् अशी संज्ञा दिली जाते. परमात्म्याचा आविर्भाव अनेक अवतारांच्या रूपाने होतो, पण सर्वच अवतारांत पूर्णरूपाने षड्गुण प्रगट झालेले नाहीत रामकृष्णादि पूर्णावतारांतच हे सर्व गुण पूर्णरूपाने भक्तांना प्रचीतीस आले म्हणून त्यांना भगवान् अशी संज्ञा आहे. किंवा ज्या ज्या भक्ताला ज्या ज्या अवतारस्वरूपापासून लाभ झाला तो त्याला भगवान् म्हणू शकतो. ज्या ठिकाणी मनुष्याची श्रद्धा, भावना असते त्याचे रूप, गुण, लीला, चरित्र इत्यादि त्याला आवडू लागते, जसे जसे ते प्रिय वाटते तसे तसे ते ऐकण्यांत अथवा त्याचे गुणानुवाद गाण्यांत अधिक रुची निर्माण होते मातेला आपल्या प्रिय बालकाचे गुण आवडू लागतात व ती ते ज्याच्या त्याच्या जवळ गात असते.

तसे परमात्म्याचे अनंत गुण आहेत. षड्गुण हे आहेत पण त्याच्या गुणाचा पार कोणासही लागत नाही. प्रत्यक्ष ब्रह्मदेव कृष्णस्तुती करताना म्हणतो–

गुणात्मनस्तेऽपि गुणान्विमातु हितावतीर्णस्य कईशिरेऽस्य ।
कालेन यैर्वा विमिताः सुकल्पै भूं पांसव. खे मिहिका द्युभास; ।।
भागवत स्कं० १० अ० १४–७

ब्रह्मदेव म्हणतो, 'गुणाचा आत्मा व जगद्धिताकरिता अवतार घेणाऱ्या तुझ्या गुणांना कोण मोजण्यास समर्थ आहे ? पृथ्वीचे परमाणू मोजता येतील, आकाशातील नक्षत्रे मोजली जातील पण गुणांचा अंत लागणार नाही,' अशी पुष्कळ प्रमाणे आहेत जीवाच्या ठिकाणी काही गुण सांपडतात पण ते सर्व सद्-गुणच असतात व टिकणारे असतात असे नाही. पण भगवंताच्या ठिकाणी सर्व सद्गुणांचा समन्वय असतो व ते सर्व नित्यच असतात. श्रीमद्भागवतामध्ये अशा महत्त्वाच्या काही गुणाचा निर्देश केला आहे.

सत्यं शौच दयाक्षान्तिस्त्यागः संतोष आर्जवम् । शमो दमस्तपः साम्यं तितिक्षोपरतिः श्रुतम् ।। २६ ।। ज्ञानं विरक्तिरैश्वर्यं शौचं तेजोबलं स्मृतिः । स्वातन्त्र्यं कौशल कान्ति धैर्य मार्दवमेवच ।। २७ ।। प्रागलभ्य प्रश्नयः शीलं सह ओजो बलं भगः। गांभीर्यम् स्थैर्यमास्तिक्यं कीर्तिर्मानोह्यहङ्कृतिः ।। २८ ।। एते चान्येच भगवन्नित्या यत्र महागुणाः । भागवत स्कंध १ अ. १६

अर्थ स्पष्ट आहे याना महागुण म्हटले आहे जीव हा स्वरूपाने अंश– अल्प– असा असल्याने त्याच्या ठिकाणी नित्य असे हे महागुण असू शकत नाहीत.

भगवान श्रीकृष्ण आपल्या सगुण मूर्तीच्या ठिकाणी अनेक श्रेष्ठ गुणांचा समुच्चय कसा आहे हे उद्धवास सागतात.

धैर्य वीर्य उदारकीर्ती । गुण गांभीर्य शौर्य ख्याती ।
यासी कारण माझी सगुणमूर्ती । जाण निश्चती उद्धवा ।। १४९२ ।।

'भक्तिरसामृतसिंधु' नामक भक्तिशास्त्रावरील अपूर्वग्रंथात श्रवणाची व्याख्या । श्रवणं नामचरित गुणादीना श्रुतिर्भवेत् । २–३२ 'श्रवण म्हणजे नाम, चरित्र, गुण इत्यादि श्रद्धेने ऐकणे अशी केली आहे.

अशा अलौकिक गुणाच्या श्रवणाने हृदयात भगवद्विषयक प्रेमभक्ती निर्माण होते.

भगवद्गुण श्रवण हे अनेक अंगाने होत असते कीर्तीश्रवण, चरित्र-श्रवण, लीलाश्रवण, अवतारकथाश्रवण, भजनश्रवण, इ. श्रीमद्भागवत एकादश स्कंधामध्ये नवयोगेश्वर राजा जनकास श्रवण कोणते करावे व कसे करावे हे सांगतात.

तरावया भाळे भोळे जन । मुख्य चित्त शुद्धीच कारण ।
जन्मकर्म हरीचे गुण । करावे श्रवण अत्यादरे ।। ५२५ ।।
चुकल्या पुत्राची शुद्धिवार्ता । जेणे सादरे ऐके माता ।
तेणे सादरे हरिकथा । सार्थकता परिसावी ।। ५२६ ।।

हरिची जन्मकर्मे अनंत गुण । म्हणाल त्याचे नव्हेल श्रवण ।
लोक प्रसिद्ध जे जे पुराण । ते श्रद्धा संपूर्ण ऐकावे ।। ५२७ ।।
—एकनाथी भागवत २.

कोणी म्हणेल श्रद्धेविना श्रवण व्यर्थ आहे. पण श्रद्धा ही देखिल श्रवणावि कशी निर्माण होईल ? भगवान श्रीकृष्ण उद्धवास सागतात.

हरिकथा अवघेचि ऐकती । परी माझी श्रद्धा नुपजे चित्ती । कोणाए अभिनवगती । श्रद्धा उत्पत्ती श्रवणेचि होय ।। ७८ ।। आईक श्रद्धेचे लक्षण । जे करी कथा श्रवण । ते हृदयी वाढे अनुसंधान । सप्रेम मनन उल्हासे ।। ७९ नवल कथेची आवडी । दाटती हरिखाचिया कोडी । हृदयी स्वानंदाची उभवी गुढी एवढी गोडी श्रवणार्थी ।। ८० ।। —एकनाथी भागवत अ. २०

मुख्य भक्तीचे कारण । हरिचे जन्मकर्मगुण । पूर्णश्रद्धा करावे श्रवण हरिकीर्तन स्वानंदे ।। ए भा. ३-५४४ ।। असे नवयोगेश्वरापैकी प्रबुद्ध हे विदे चक्रवर्तीस सांगतात.

नवविधा भक्तीमध्ये श्रवणभक्ती ही प्रथम सागितली आहे. संसारात एखाद्या वस्तूचे नाम व त्या वस्तूचे विशेष गुण याचे ज्ञान त्या त्या वस्तूचा वाच जो शब्द त्याच्या श्रवणानेच होते. त्या वस्तूच्या ठिकाणी अनुकूल बुद्धी असल म्हणजे त्या वस्तूचे प्रेम निर्माण होते म्हणून कथाश्रवणानेच भगवद्भक्ती निर्मा होत असते श्रीभागवत अकराव्या स्कंधाच्या एकोणिसाव्या अध्यायांत श्रीकृष्णान भक्ती निर्माण होण्याची अनेक साधने (जवळ जवळ पंधरा) सांगितली आहे त्याच्या शेवटी स्पष्ट म्हटले आहे—

**एवं धर्मैर्मनुष्याणां उद्धवात्मनिवेदिनाम्**
**मयि संजायते भक्तिः कोऽन्योऽर्थोस्यावशिष्यते ।। २४ ।।**

'श्रीकृष्ण म्हणतात, उद्धवा ! याप्रमाणे मन, बुद्धी, इंद्रियादि सर्व प्रकारां जे माझ्या धर्माचे आचरण करतात त्या योगाने त्यांची माझ्या ठिकाणी अनन भक्ती निर्माण होते. यापेक्षा त्याला कोणता मोठा पुरुषार्थ मिळवावयाचा राहिला?

या भक्तिसाधनाच्या प्रकारांत प्रारंभीच भगवत्कथा श्रवण व कीर्तन हे हृदयांत भक्ति निर्माण होण्याचे साधन आहे असे म्हटले आहे.

श्रद्धामृतकथाया मे शश्वन्मदनुकीर्तनम् ।
भागवत ११— अ, १९—२

श्रीकृष्ण सांगतात, माझ्या अमृतासारख्या मधुर कथांवर श्रद्धा ठेवणे, सदै माझे गुणकीर्तन करणे (हेच भक्तिउत्पत्तीचे प्रथम साधन आहे.)

भागवत बाराव्या स्कंधात शुकाचार्य श्रीकृष्णाच्या ठिकाणी अमल

भक्ती व्हावी याची अपेक्षा करणाऱ्याला गुणानुवादाचे श्रवण हेच श्रेष्ठ साधन आहे असे स्पष्ट सांगतात.

**यस्तूत्तमश्लोकगुणानुवादः संगीयतेऽभीक्ष्णममङ्गल घ्नः ।**
**तमेव नित्यं श्रुणुयादभीक्ष्णं कृष्णेऽमलां भक्तिमभीप्समानाः ॥**

'उत्तमश्लोक जो भगवान् त्याच्या गुणाचा अनुवाद तत्काल सर्व अमंगलांचा नाश करणारा आहे, म्हणून श्रीकृष्णाच्या ठिकाणी अमलाभक्तीची अपेक्षा करणाऱ्यांनी त्या गुणांचेच अखंड श्रवण करावे' भगवद्गुण लीलादिकांचे श्रद्धापूर्वक श्रवण झाले म्हणजे हृदयशुद्धी होते. भागवतातील पहिल्या स्कंधाच्या दुसऱ्या अध्यायांत सूतानी म्हटले आहे, 'ज्याचे श्रवण व कीर्तन पुण्यरूप आहे असा भगवान श्रीकृष्ण आपल्या कथेचे श्रवण करणाऱ्या पुरुषांच्या हृदयांत राहून त्यांच्या कामादिवासनांचा व तज्जन्य पापांचा नाश करतो.' तसेच दुसऱ्या स्कंधातही या विषयाचा विचार करतांना म्हटले आहे.

**शृण्वतः श्रद्धया नित्यं गृणतश्च स्वचेष्टितम् ।**
**कालेन नातिदीर्घेण भगवान्विशते हृदि ॥४॥**
**प्रविष्टः कर्णरन्ध्रेण स्वानां भाव सरोरुहम् ।**
**धुनोति शमलं कृष्णः सलिलस्य यथा शरत् ॥५॥ स्कं. २-८**

'आपले चरित्र प्रीतीने श्रवण किंवा कीर्तन करणाऱ्या पुरुषाच्या हृदयामध्ये थोडक्याच कालात भगवान प्रवेश करतो आणि आपल्या भक्तांच्या हृदयकमलात कर्णाच्या द्वारे (म्ह. श्रवणाने) प्रविष्ट झालेला तो भगवान, जसा शरदृतू नदी तळी वगैरे सर्व ठिकाणच्या पाण्याचा गढूळपणा नाहीसा करतो, त्याप्रमाणे त्या भक्तांच्या हृदयकमळातील कामक्रोधादि सर्व पापांचा नाश करून टाकतो.'

हृदयशुद्धी हे भक्तिप्रेमाचे अधिष्ठान आहे. ती श्रवणानेच योग्यप्रकारे होते. म्हणून नारद लोकव्यवहाराचा अनुवाद करून भगवद्गुणश्रवण हे अंतःकरणांत भगवद्भक्ती निर्माण होण्याचे साधन आहे असे सांगतात.

गुणश्रवणाप्रमाणे कीर्तन हेही हृदयांत भक्ति निर्माण होण्याचे साधन आहे. भक्ति निर्माण झाल्यावरही नारदासारखे, शुक्राचार्यासारखे, भक्त कीर्तन करीतच असतात पण ती निर्माण होण्याकरिताही कीर्तन हे साधन सांगितले आहे. गुणलीलादिकांचे श्रवण झाले की वाणीच्या द्वारे ते कीर्तनरूपाने बाहेर पडतेच. श्रवणाप्रमाणे कीर्तनासही या मार्गात श्रेष्ठत्व आहे. नवविधा भक्तीत श्रवणानंतर कीर्तनाचाच क्रम सांगितला आहे. कीर्तनाची व्याख्या भक्तिरसामृतसिंधूमध्ये नामलीला गुणादीनामुच्चैर्भाषातुकीर्तनम् ॥ १-२-२९ 'नाम लीला गुणादिकांचे मोठ्याने गायन करणे म्हणजे कीर्तन होय' अशी केली आहे, यावरून कीर्तनाचेही श्रवणाप्रमाणे नामकीर्तन, गुणकीर्तन, लीलाकीर्तन असे तीन प्रकार संभवतात.

श्रीमद्‌भागवत स्कंध सहाव्यातील अजामिलोपाख्यानांतही एतावतालमघनिर्हरणा
पुंसा संकीर्तनं भगवतो गुणकर्मनाम्ना ।। भा० ६.२

' मनुष्यमात्राच्या संपूर्ण पापाच्या नाशाकरिता भगवंताच्या गुणकर्म व नामा संकीर्तन हेच साधन पुरेसे आहे, असे सांगितले आहे. श्रवणांत जसे गुणश्रव तसेच कीर्तनांतही गुणकीर्तन हे महत्त्वाचे आहे. तसेच भगवंतांनी अनेक अवतार धार करून ज्या अलौकिक अतर्क्य लीला केल्या त्यांचे कीर्तन हे भगवद्‌भक्ती व भगव त्प्रीती निर्माण होण्याचे श्रेष्ठ साधन आहे; म्हणूनच भागवतधर्मीय सर्व संतान श्रीकृष्ण भगवंताच्या बाललीला अत्यंत आवडीने गायिल्या आहेत.

श्रवण आणि कीर्तन यांत थोडेसे अंतर आहे गुणकीर्तिश्रवणांत योग्य अस वक्ता अपेक्षित असतो. सविवेक नैराश्य वक्ता । जोडल्या श्रद्धेने ऐकावी कथा ।। ना भा० ११. कीर्तनांत अन्य अंगउपागांची जोड असणे योग्य असते. म्हणजे राग, ता वाद्य, नृत्य गीत इत्यादि. श्रीकृष्णभगवान भक्तश्रेष्ठ उद्धवास सांगतात.

त्यजूनियां कामाचे बीज । सांडूनि लौकिकाची लाज । कीर्तनी नाचावे भोज गरुडध्वज स्मरोनि ।। रामकृष्ण हरि गोविंद । ऐशिया नामाचे प्रबंध । गाता ना पदें छद बंध । करावा विनोद कीर्तनी ।। श्रुति मृदंग टाळ घोळ । मेळऊ वैष्णवाचा मेळ । कीर्तनी करावा गदारोळ । काळ-वेळ न म्हणावा ।। दशमी दि जागरणे । आळस साडूनि गावे गाणे । हावभावो दाखवणे । कर्म स्मरणे माझेनि

एकनाथी भागवत ११–७३१–३

अलीकडे भाविक म्हणविणाऱ्या समाजातही कीर्तन हे एक करमणुकी साधन वाटते, कीर्तन ह भगवद्‌भक्ति निर्माण होण्याचे साधन न राहता ते ए कलेचे अंग मानले जात आहे, पण याला कीर्तन म्हणू नये.

श्रवणांत एकाच इंद्रियाचा म्हणजे श्रवणेंद्रियाचा उपयोग, होतो, पण कीर्तनां सर्वेंद्रियाचा विनियोग करता येतो. मुखाने कथालीलागुणगायन, हाताने टाळ पायाने नृत्य अशा स्थितीत देहभाव विसरला जातो. । कीर्तनें स्वधर्मु वाढे । कीर्त स्वधर्मु जोडे । कीर्तने परब्रह्म आतुडे । मुक्ती कीर्तनापुढे लाजोनि जाय ।। ए०भा ५–४१८ अशी कीर्तनाची योग्यता आहे.

भक्तिशास्त्रांत कीर्तन हे साधन व साध्य असे दोन प्रकारचे सागितले आ पराभक्तीची प्राप्ती होण्याकरितां जे कीर्तन, नामसंकीर्तन केले जाते ते साधन ती पराभक्ति प्राप्त झाल्यानंतर मग । ' माझी मज झाली अनावर वाचा । छंद य नामाचा घेतलासे ।।' तु० अशा स्थितीत सहज जे घडते ते कीर्तन पराभक्ती समाविष्ट होते. हीच गोष्ट श्रीकृष्ण उद्धवास सागतात. ' आवडी हरिकथा ऐकता नाना चरित्रे श्रवण करिता । माझी आत्मचर्चा हृदयी धरिता । पालटू चित्ता ते होय ।। तेणेचि उपजें माझी भक्ती । माझ्या भजनाच्या अतिप्रीती । आवडी माझ

नामे गाती। रंगी नाचती सद्भावें ॥' (ए० भा० १४–३०७, ३०८.) या श्रद्धेने केलेल्या कीर्तनानेच अंतिम अशी पराभक्ती देखील उत्पन्न होते असे श्रीशुकाचार्यांनी एकदशस्कंधाच्या शेवटच्या अध्यायात उपसंहारप्रसंगी सांगितले आहे। आवडी गातां श्रीकृष्ण कीर्ती। कीर्तिमंतां लाभे परम भक्ती। जीते परा ऐसे म्हणती। ते चौथी भक्ती घर रिघे ॥ आदरे जपता कृष्णकीर्ती। श्रीकृष्ण प्रकटे सर्वाभूती। महजे ठसावे चौथी भक्ती। परमात्मा स्थिती समवेत ॥ ए० भा० ३१–३५५, ५६.

भगवान श्रीकृष्ण भक्तवर्य उद्धवास भक्तिप्राप्ती कोणास होते व कोणत्या साधनाने होते हे स्पष्ट सांगतात.

**तार्ये श्रृण्वन्ति गायन्ति ह्यनुमोदन्ति चादृताः।**
**मत्पराः श्रद्दधानाश्च भक्तिं विन्दन्ति ते मयि ॥ २९ ॥**

भागवत ११–२६

'या माझ्या कथाचे जे श्रवण करतात, कीर्तन करतात त्यांना पूर्ण श्रद्धेने जे अनुमोदन देतात त्यांना माझी भक्ती प्राप्त होते.' या श्लोकावरील टीकेत श्री एकनाथ महाराज म्हणतात, निजभावे भगवतकथा गाता। स्वयंभ उपजे सादरता। तेणें अत्यादरे हरिकथा। होय सांगता अतिश्रद्धा ॥ जंव जंव कथा सांगे निवाडे। तव तंव श्रद्धा अधिक वाढे। प्रेमाचा पूर चढे। त्यामाजी बुडे निज श्रद्धा ॥ ए० भा० २६–३७८ ३७९

बंगालमध्ये अवतरलेले अत्यंत नामप्रेमी महान् संत भक्तवर्य श्रीगौराङ्ग ज्यांना 'चैतन्य महाप्रभु' अशी संज्ञा दिली गेली त्यांनी एका श्लोकांत श्रीकृष्णसंकीर्तनाचे माहात्म्य फार महत्त्वपूर्ण भाषेत सांगितले आहे.

**चेतोदर्पणमार्जनं भवमहादावाग्नि निर्वापणं।**
**श्रेयःकैरव चंद्रिका वितरणं विद्यावधू जीवनं ॥**
**आनंन्दाम्बुंधिवर्धनं प्रतिपदं पूर्णामृतास्वादनं।**
**सर्वात्मस्नपनं परं विजयते श्रीकृष्णसंकीर्तन ॥**

'चित्तरूपी दर्पण म्हणजे आरसा त्यावर विषयवासनादि विकारांचा जो मळ अनादि कालापासून चढलेला आहे, त्या चित्तरूपी आरशास स्वच्छ करण्याचे सामर्थ्य या भगवन्नाम संकीर्तनात आहे. तसेच संसार हा महान् दावाग्नी (अरण्यात लागलेल्या अग्नीस दावाग्नी म्हणतात) आहे यांत सापडलेले सर्व जीव त्रिविधी तापाने दग्ध होत आहेत. त्या दावाग्नीस शांत करणारे हे श्रीकृष्णनाम संकीर्तन आहे. तसेच श्रेय म्हणजे कल्याण हीच कोणी कुमुदिनी आहे. पण ती मिटलेली आहे. भगवन्नाम संकीर्तनरूपी चंद्रिका तिला प्रफुल्लित करते म्हणजे यावत् कल्याणाची नामधारकास प्राप्ती करून देते. तसेच विद्या (ज्ञान) हीच कोणी एक वधू आहे व तिचे जीवन आहे भगवन्नाम. भगवन्नामानेच तिला सौभाग्य प्राप्त होते. ब्रह्मविद्येचे भगवन्नाम सौभाग्यचिन्ह आहे. भगवन्नाम पावलोपावली आनंद सागराला भरती

आणणारे आहे म्हणजे अपूर्व आनंदाचा लाभ करून देणारे आहे. इतकेच काय पण पूर्ण अमृताचा आस्वाद देणारे ते आहे. आत्म्यास सर्व प्रकारे पवित्र करणारे असे आहे, असे श्रीकृष्णसंकीर्तन आमच्या जीवनात विजयाला प्राप्त होवो !

तात्पर्य, जीवनांत भक्तिसिद्ध होण्याकरिता नारदमहर्षींनी या सूत्रांत सांगितल्याप्रमाणे भगवत् गुणश्रवणकीर्तन हेच सुलभ सर्वोपयोगी व सर्व संताना मान्य असे साधन आहे.

## सूत्र ३८

## मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद्वा ।।३८।।

**अर्थ :**

परंतु प्रामुख्याने (ती भक्ति) महान् असे जे महात्मेपुरुष त्यांच्या कृपेनेच (प्राप्त होते) अथवा भगवंताच्या अंशमात्रकृपेनेही (प्राप्त होते).

**विवरण :**

मागील चौतिसाव्या सूत्रात त्या भक्तिप्राप्तीची साधने आचार्यगुण सांगतात असे सांगून पुढील सूत्रातून विषयत्याग संगत्याग, अव्यावृत भजन, भगवद्‌गुण-श्रवण, कीर्तनादि साधनांचा अनुवाद केला आहे. जेव्हा अनेक साधने सांगितली जातात तेव्हा त्यांत गौणमुख्यभाव निर्माण होतो, मग या साधनांत श्रेष्ठ व मुख्य कोण, असा संशय आला असता या अडतिसाव्या सूत्रात त्याचे उत्तर देतात. ही मागील साधनेही तत्त्वतः अमुख्यच आहेत. मुख्य साधन महात्मे जे संत त्यांची कृपा अथवा भगवतकृपेचा अंश का होईना पण तो प्राप्त होणे हे आहे. जे जे भक्तिमान् पुरुष म्हणविले गेले ते महात्म्यांच्या कृपेने किंवा भगवत्कृपेनेच प्रेमभक्तीचे अधिकारी बनले. इतर सर्व साधनांना फलद्रूप होण्याकरितादेखील महात्म्यांची कृपा लागते. उद्धवोपदेश प्रसंगी भगवान् श्रीकृष्ण सांगतात '**ते यमनियम बारा बारा**[1] **। आणि सकळ साधन संभारा । यावया माझिया नगरा । मार्ग पुढारा चालेना ।। ते गेलिया संतांच्या दारा । धरूनिसाधूंच्या आधारा । अवघी आली माझियाघरा । एवं परंपरा मत्प्राप्ति ।। एकनाथी भागवत** अ. १२–३८, ३९ **साधूने सांगता निर्धारी । नाना साधने हा काय करी ।**

---

१) या बारा यमनियमांची लक्षणे भागवत एकादशस्कंध, अध्याय एकोणीस श्लोक ३३–३४ मध्ये विस्ताराने सांगितली आहेत.

असे स्पष्ट म्हटले आहे. म्हणून मागे सांगितलेल्या साधनांना गौणत्व देऊन या सूत्रात मुख्यतः महत्कृपा हीच भक्ति निर्माण करू शकते असे स्पष्ट सांगतात व्यास, वाल्मिकी, ध्रुव, प्रल्हादादिकांना नारदकृपेनेच भक्तीची प्राप्ती झाली होती हे प्रसिद्धच आहे. महत् हे विशेषण आहे, पण येथे ते विशेष्यरूपाने घेतले आहे. महत् म्हणजे मोठे, जगात सर्वात मोठे– व्यापक– आकाश आहे, पण त्या आकाशाहूनही व्यापक परब्रह्म आहे असे उपनिषदात म्हटले आहे 'महतोमहीयान्' ही अनंत ब्रह्माण्डे ज्याच्या एका एका रोमरन्ध्रात सामावली जातात असे त्याचे वर्णन पुराणांतून आढळते गीतेच्या दहाव्या अध्यायात 'हे सर्व जग ज्याच्या एका अंशावर आहे' असे म्हटले आहे. सर्वांचे कारण सर्वांचे अधिष्ठान, सर्वांहून व्यापक त्यास महत् असे म्हटले जाते. सारांश 'महत्' शब्द परब्रह्मवाचक आहे असे असता नारद महत् शब्द संत-महात्मे या अर्थाने येथे घेतात. गीतेतील नवव्या अध्यायात 'महात्मानस्तुमां पार्थ दैवी प्रकृति माश्रिताः ।।' म्हणून दैवी प्रकृतीचा अंगीकार करून अनन्य भावाने भजन करणाऱ्यांना 'महात्मा' असे श्रीकृष्ण म्हणतात. अशा व्यापक परमात्मस्वरूपास जो आपल्या हृदयात कोंडून ठेवतो 'जयाचे चित्त गवसणी । व्यापका मज ।। 'जेवढी माझी व्याप्ति । तेवढीच तयांची प्रतीति ।।' माझे व्यापकपण आघवे । गवसले तयाचेनि अनुभवे । न म्हणता स्वभावे । व्यापक जाहला ।। असे त्या भक्ताच्या व्यापक महान्, अनुभवाचे ज्ञानेश्वरीत जागोजागी वर्णन आढळते । हे विश्वचि माझे घर । ऐसी मति जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला ।। ज्ञा. १२–२१३ असे त्याचे वर्णन ज्ञानेश्वर महाराजांनी केले आहे. अशा श्रेष्ठअनुभूतीने युक्त पुरुषाला 'महान्' असे म्हणतात. यानांच संत, साधु, सद्गुरु ही संज्ञा दिली जाते. भागवतामध्ये अनेक ठिकाणी अशा भक्तिमान पुरुषाला महान् अशी संज्ञा दिली आहे ! 'महान्तस्ते समचित्ताः प्रशांताः ।।' महत्सेवा द्वारमाहुर्विमुक्तेः । इ. श्री मधुसूदन सरस्वतीनी आपल्या 'भक्तिरसायन' या भक्तिशास्त्रावरील अपूर्वग्रंथात भक्तीच्या ज्या अकरा भूमिका सांगितल्या आहेत त्यांत भक्तिप्राप्ती होण्यास 'प्रथम महता सेवा तद्दया पात्रता तात ।।' म्हणजे प्रथम महान असे जे भक्त त्यांची सेवा, नंतर त्यांच्या कृपेला पात्र होणे, असे म्हटले आहे. श्रीमद्भागवतामध्ये कपिल देवहूति संवादात स्पष्टच सत्संगति हीच भक्ति प्राप्त करून देणारी आहे असे म्हटले आहे.

**सतां प्रसङ्गान्ममवीर्यसंविदो भवन्ति हृत्कर्णरसायनाः कथाः ।**
**तज्जोषणादाश्वपवर्गं वर्त्मनि श्रद्धारतिर्भक्तिरनुक्रमिष्यति ।।**

भागवत ३–२५–२५.

सत्पुरुषांच्या समागमाने माझ्या पराक्रमाचे यथार्थ रूपाने वर्णन करणाऱ्या आणि कानाला प्रिय लागणाऱ्या कथा होतात, त्याचे सेवन करण्याने मोक्षमार्गात

शीघ्र श्रद्धा, भक्ति, प्रेम यांचा क्रमशः विकास होत असतो.'

महान् श्रेष्ठ अशा संतांच्या संगतीतच भगवद्भक्ति निर्माण होणे का व कसे शक्य आहे याचा विचार श्री कृष्णांनी उद्धवास स्पष्ट सांगितला आहे.

तेषु नित्यं महाभाग महाभागेषुमत्कथा : ।
संभवन्ति हितानृणां जुषतां प्रपुनन्त्यघम् ॥२८॥
तायें श्रृण्वन्ति गायन्ति ह्यनुमोदन्ति चादृता· ।
मत्परा : श्रद्धधानाश्च भक्ति विन्दन्ति ते मयि ॥२९॥ ए. भा. २६

श्रीकृष्ण म्हणतात, हे भाग्यवान उद्धवा ! त्या महाभाग्यवान महापुरुषामध्ये लोकांचे हित करणाऱ्या माझ्या कथांचे नित्य गुणगान चालत असते. त्या योगाने त्या गुणगान करणाऱ्या पुरुषांचे सर्व पातक धुऊन जाते, सत्संगतीत त्या कथांचे निष्ठेने आदरपूर्वक श्रवण व गायन करून त्यात जे तल्लीन होतात त्यांची माझ्या ठिकाणी श्रद्धा तसेच श्रेठत्व बुद्धी असल्याने त्यांना माझी एकान्त भक्ती प्राप्त होते. नारद महर्षींनी जसे 'मुख्यतस्तु' असे पद घालून संतकृपा हेच ईशभक्तीचे मुख्य साधन आहे असे सांगितले आहे. तसेच श्री एकनाथ महाराजही स्पष्ट सांगतात—

मुख्यत्वे संतांची सेवा । हेचि साधन अवडे देवा ।
संतवचने निजभावा । देतुसे तेव्हा निजभक्ती ॥७८४॥
ज्याशी आवडे संत संगाचा मेळू । जो साधुवचनी अतिभुकाळू ।
जो पडिले वचन नेणे उगळू । तोचि पाथाळू निजभक्ती ॥७८५ ॥
एकनाथी भागवत अ. ११.

कोटी जन्मांची पुण्यसंपत्ती । जरी गाठी असेल आइती ।
तै जोडे माझ्या संताची संगती । सत्संगे भक्ती उल्लासे ॥१५२१॥
सत्संगे भक्तीची प्राप्ती । उद्धवा जाण तू निश्चिती ।
संतापाशी माझी भक्ति । वास पाहती उभी असे ॥१५२२॥
एकनाथी भागवत ११.

एकूण महत्कृपेने भक्तिलाभ होतो हे नारद महर्षींचेच मत सर्वमान्य आहे. म्हणून श्री तुकाराम महाराजांनी 'नवविधा काय बोलिली जे भक्ती । द्यावी माझे हाती संतजनी ॥' अशी संतांची प्रार्थना केली आहे. कारण महात्म्यांचा अवतारच जगात भक्तिप्रेम नांदावे, सर्वांनी भगवद्भजन करून आपल्या जीवनाचे सार्थक करून घ्यावे अशा भक्तिधर्माचा प्रसारकरण्याकरिताच झालेला असतो. भागवत-धर्माचे आचरण होऊन अंतःकरणात भक्तिप्रेमाचा उदय होण्याकरिता संत सद्गुरुंनाच शरण जावे व त्यांच्यापासून भागवत धर्माचे शिक्षण घ्यावे असे नवयोगेश्वरांनी जनकास उपदेश करीत असता भागवत एकादश स्कंधाच्या तिसऱ्या

अध्यायातील बाविसाव्या श्लोकात (तत्र भागवतान् धर्मान् शिक्षेत् गुर्वात्म दैवतः।) म्हणून स्पष्ट सागितले आहे. या श्लोकावरील टीकेत श्री एकनाथ महाराज सागतात. ' याचिलागी सद्‌गुरुपाशी । शरण रिगावे सर्वस्वेसी । तो संतोषोनिया शिष्यासी । भजनधर्मासी उपदेशी ।।३४९।। जेणे भजने भगवंत । भजोनि जाहले उत्तम भक्त । ते भागवतधर्म समस्त । शिकावे निश्चित सद्‌भावेसी ।।३५०।।' अ. ३

महात्मे दयासागर असतात, उदार असतात. परिसाचा संबंध आल्याबरोबर जसे लोखंडाला सुवर्णत्व प्राप्त होते तद्वत् त्याचा क्षणभरही समागम झाला तर जीवनात भक्तिप्रेम निर्माण होते. तसेच ' महत्कृपा ' असा सूत्रात शब्द आहे. कृपा, दया हा त्याच्या जीवनातील स्थायीभाव, केवढाही व कसाही पापी त्याच्यासमोर आला की तो कृपेचा अधिकारी बनतो. वाल्ह्या कोळयाचे उदाहरण प्रसिद्धच आहे.

महात्म्यांची कृपा होण्याचे साधन त्यांच्याविषयी आदरबुद्धी ठेवून त्यांची सेवा करणे, त्यांच्या मनोगताप्रमाणे वागणे हे आहे. ' जे स्वामीचिया मनोभावा । न चुकिजे हेंचि परम सेवा ।।' असे सेवेचे लक्षण ज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे. महात्म्या पुरुषाचे मनोगत म्हणजे यावत् मानवमात्रांनी भगवद्‌भक्तीत आपल्या आयुष्याचा वेच करावा व जीवन कृतार्थ करावे हेच असते. सूत्रात ' महत्कृपा ' असा शब्द आहे. वास्तविक कृपा ही केवळ महात्म्या पुरुषांच्या ठिकाणीच असते, इतर कोणी केवढाही मोठा पुरुष असला तरी त्याचे ठिकाणी काही स्वार्थ लोभ, मोह असतोच म्हणून तो कृपेचा अधिकारी नसतो. श्री एकनाथ महाराज म्हणतात, ' कृपेसी स्वतंत्र जन्म नाही । जेथे उपजे तो साधु पाही । कृपा वसे संतांच्या देही । त्यांचेनि ते पाही । दाटुगी जगी ।। ८३० ।। कृपा त्यांचेनि महिमे आली । दया त्यांचेनि जिवे ज्याली । कठिणत्वाची काटी काढिली । समूळी उपटिली निष्ठुरता ।। ८३१ ।।' ए. भा. अ ११. श्री भागवताच्या एकादश स्कंधाच्या दुसऱ्या अध्यायात नारद-वसुदेवसंवाद आला आहे, त्यात श्रीकृष्णपिता वसुदेव श्रेष्ठ महात्मे जे नारद त्यांच्याच कृपेचे वर्णन करीत आहे. त्यात देवाच्या कृपेपेक्षा संतांच्या कृपेचे श्रेष्ठत्व वर्णिले आहे. वसुदेव म्हणतो, देवाच्या कृपेत तारतम्य आहे. पण तुम्ही सर्वांवर समान कृपा करता. ' तुवां व्यास देखोनि सज्ञान । उपदेशिले गुह्यज्ञान । ध्रुवबाळक अज्ञान । म्हणोनि जाण नुपेक्षिसी ।। ७२ ।। प्रल्हाद उपदेशिला जेव्हा । दैत्यपुत्र न म्हणसी तेव्हा । तुझीया कृपेचा हेलावा । तो निज विसावा दीनासी ।। ७३ ।। केवळ वाट पाडा देख । भजनेवीण एकाएक । महाकवी केला वाल्मिक । अमर अवश्यक वंदिती त्यासी ।। ७४ ।। देखोनि ज्याचिया ग्रंथासी । सुख वोसंडे सदा-शिवासी । ऐसा तू कृपाळू होसी । अनाथासी कुवांसा ।। ७५ ।।' ए. भा. २ एवढा विचार करण्याचे कारण महात्म्यांच्या कृपेचे स्वरूप व त्या कृपेने भक्तीची प्राप्ती

शी होते हेच योग्य प्रकारे सिद्ध व्हावे हे आहे.

कोणास वाटेल महात्मे कृपा करून भक्ती प्रदान करतात हे खरे. ा असे महात्मे भेटणे कसे शक्य आहे? त्यांची भेट दुर्लभ आहे हे े नारदच सांगणार आहेत. भेटले तरी त्यांना ओळखावे कसे? बाह्य-न्हावरून त्यांना महात्मे म्हटले तर फसगत होण्याचा संभव आहे. अंतरंग न्हानी ओळखणे अशक्यप्राय आहे. '**तो महात्मा धनुर्धरा। दुर्लभ आथी ॥**' नेश्वरी ७-१३७. असे स्वतः श्रीकृष्ण भगवानच म्हणतात. म्हणून एखाद्याला र्भ अशी महात्म्यांची भेट, नंतर त्यांच्याकडून होणारी कृपा व त्या कृपेने भक्तीची र्मिती हे फार कठीण आहे असे वाटत असल्यास त्यांच्याकरिता 'भगवत्कृपा-ाद्वा.' जर महात्म्याची कृपा न झाली अथवा अशक्य वाटले तर भगवत्कृपा ानेही भक्तिसाधन होऊ शकेल. या दोन साधनांत क्रम मानण्याचे कारण नाही. ाच यात गौण मुख्य भावही नाही. सूत्रात 'मुख्यतः' हे पद आरंभी आहे त्याचा वय दोन्ही पदांशी म्हणजे महत्कृपा अथवा भगवत्कृपा यांच्याशी लावणे योग्य ईल. संतकृपेनेही भक्ती प्राप्त होते अथवा भगवत्कृपालेशानेही भक्तीची प्राप्ती ऊ शकते. तसेच 'लेश' पदाचा अन्वयही दोघांचेकडे लावला तरी शक्य आहे. ं जरी लेश शब्द आहे तरी तो न्यून अथवा अपूर्ण या अर्थी घेऊ नये. काही तूचे सामर्थ्य एवढे मोठे असते की त्याचा अंशही प्राप्त झाला तरी तो पूर्णाचेच र्य करतो. अमृताच्या सागरात जे सामर्थ्य असते तेच चूळभर अमृतातही असते. े ज्ञानेश्वर महाराजांनी दृष्टांन्तद्वारा सांगितले आहे. सूर्याचा एक किरणही ्णं अंधकार दूर करण्यास समर्थ असतो. त्याप्रमाणे संत अथवा देवाच्या कृपेचा ाही प्राप्त झाला तरी तो संपूर्ण भक्तिप्रेम संपादन करू शकतो. या दोहोपैकी णतीही गोष्ट भाग्यवशात घडली तरी भक्ती सिद्ध होते. म्हणजे संतकृपा किंवा ावत्कृपा याच्या द्वाराच भक्तीचा लाभ होतो.

भगवत्कृपेचा लाभ केव्हा व कसा होतो? कोणास वाटेल भगवान सर्वांच्या ःकरणात (हृदयात) वास्तव्य करणाराच आहे, तेव्हा सर्वांवरच तो कृपा करीत ालच. हे जरी खरे आहे तरी सर्वांना हृदस्थाची जाणीवही नसते व त्याच्या तीच्या प्राप्तीची आवश्यकताही वाटत नसते. याचे कारण देहाभिमान, इंद्रियता-म्य, विषयाच्या ठिकाणीच अनुकूल बुद्धी, सुखबुद्धी असते हे स्पष्ट आहे, श्रीकृष्ण णतात, मी जनासी सदा सन्मुख। परी जगचि मजसी विन्मुख ॥ यासी काही ाले देख। दाटूनि दुःख भोगिती ॥ १२-१६९. मागील तेहतिसाव्या सूत्रात मात्सैवग्राह्या मुमुक्षुभिः ॥ म्हणजे मुमुक्षूनी या भक्तीचा स्वीकार करावा असे रदांनीच सांगितले आहे. देहतादात्म्यामुळे भोगावे लागणारे जन्म-मृत्यू, इंद्रिय ्रय संयोगाने उत्पन्न होणाऱ्या विकारापासून भोगावी लागणारी अनंत दुःखे व्यापासून मुक्त होऊन भगवद्प्रेमाची तीव्र इच्छा ज्याला निर्माण झाली असेल

तोच भगवंताला अनन्य शरण जातो करुणा भाकतो, त्याच्यावरच भगवत्कृपा होऊ शकते. या विषयाचा विचार मागे सत्ताविसाव्या सूत्राच्या विवेचनात आला आहे असा जो अनुतापदग्ध मुमुक्षू आहे त्याच्यावरच ईश्वरकृपा होते, पर्जन्य जरी सर्वत्र पडतो तरी जी जमीन नागरून तयार केली आहे व जिच्यात बीज पेरले आहे त्याच जमिनीत पीक येते. भगवान् श्रीकृष्ण भक्तवर्य उद्धवास स्पष्ट सांगतात, उद्धवा जेथ अनुताप नाही । तेथ माझी कृपा नव्हे काही । कृपेचे वर्म हेचि पाही । जैं अनुताप देही अनिवार ।। ३५८ ।। माझे कृपेवीण निश्चिती । कदा नुपजे माझी भक्ती । माजी जालिया कृपा प्राप्ती । अनन्य भक्ती तो करी ।। ३५९ ।। माझे कृपेचे लक्षण । प्राप्त विषय भोगिता जाण । न तुटे माझे अनन्य भजन । पूर्ण कृपा जाणयानाव ।। ३६० ।। ए. भा. अ. २० तात्पर्य महात्मे, संत अथवा भगवान यांच्या कृपाप्रसादानेच ही भक्ती प्राप्त होऊ शकते. नारदाच्या स्वत:च्या जीवनातही त्यांना हाच अनुभव आला होता. भागवताच्या आरंभी त्याचे जे जीवनचरित्र त्यांनी सागितले आहे त्यावरून हे स्पष्ट सिद्ध होते.

## सूत्र ३९

## महत्संगस्तुदुर्लभोऽगम्योऽमोघश्च ।। ३९ ।।

**अर्थ :**

परन्तु महात्म्यापुरुषाची संगती दुर्लभ, अगम्य व अमोघ– ( कधीही व्यर्थ न जाणारी ) आहे.

**विवरण**

मागील सूत्रात महात्म्याची कृपा हे भक्तीप्राप्तीचे अंतरंग साधन आहे असे सागितले पण तो महत्संग दुर्लभ, अगम्य व अमोघ म्हणजे व्यर्थ न जाणारा आहे असे ते म्हणतात. एका सुभाषितकाराने म्हटले आहे, ' प्रत्येक पर्वतावर माणिक म्हणजे रत्न सापडत नाही. प्रत्येक हत्तीच्या गंडस्थळात मौक्तिक ( मोती ) नसतो. प्रत्येक वनात उत्तम चंदनवृक्ष असतो असे नाही, त्याप्रमाणे सर्वत्र साधू दिसतात, सापडतात असे नाही. ' बहुतेक संसारी जीव अनादि अज्ञानमूलक संस्काराने शुभाशुभ पापपुण्याचे फल भोगीत असतात. त्यातही बहुतेकांची ऐहिक पारत्रिक विषयभोगातच अधिक प्रवृत्ती असते. मनबुद्धयादिकाना तेच संस्कार असतात. म्हणून त्यांची धाव विषयापावेतोच जाते, विषयसंपादन हाच पुरुषार्थ होऊन बसतो. अशा बहिर्मुखते-

मुळे हृदयस्थ सच्चितानंद भगवंताचे यथार्थ ज्ञानही नसते म्हणून भक्तीकडे प्रवृत्ती होत नाही. एखादाच सत्त्वसंपन्न विचारी पुरुष पूर्वसुकृताने परमार्थमार्गात प्रविष्ट होतो, कारण सद्बुद्धि दुर्लभ आहे असे भगवान अर्जुनाला सांगतात.

**पार्थाबहुती परी। हेअपेक्षिजे विचारशूरी। जे दुर्लभ चराचरी सद्वासना ।। २३९ ।। आणिका सारिखा बहुवसु। जैसा न जोडे परिसु। का अमृताचा लेशु। दैव गुणे ।।२४०।। तैसी दुर्लभ सद्बुद्धि। जिये परमात्म्याची अवधि। जैसा गंगेसी उदधि। निरंतर ।।२४१।।** ज्ञानेश्वरी अ. २ ही सद्वासनासद्बुद्धी दुर्लभ असल्याने तिची प्राप्ती ज्याना पूर्णरूपाने झाली आहे असे पुरुषहि समाजामध्ये दुर्लभ समजले जातात. श्रीकृष्णांनी गीतेच्या सातव्या अध्यायामध्ये 'हजारो माणसात आत्मसिद्धीच्या प्राप्तीकरिता प्रयत्न करणारा एखादाच असतो, अशा प्रयत्न करणाऱ्यातही त्या प्राप्तीपावेतो जाणारा एखादाच असतो.' असे स्पष्ट म्हटले आहे. एकाद्या वस्तूची गरज नसेल, ज्ञान नसेल, साधनानुकूलता नसेल तर तिच्या प्राप्तीकडे प्रवृत्ती होत नाही. परमात्मा आत्यंतिक सुखरूप आनंदरूप आहे, म्हणून त्याची गरज नाही असे म्हणता येत नाही. साधने मानव देह, इंद्रिये, बुद्धी इत्यादी अनुकूल आहेत मग अपप्रवृत्ती का ? याचे उत्तर अज्ञान हेच आहे, भक्ताचा महिमा भक्तचि जाणती। दुर्लभ या गती आणिकासी ।। असे तुकाराम महाराज म्हणतात. जगात सत साधू नाहीत किवा नसतात असे नाही, पण त्याची भेट होणे कठिण आहे. सर्वच संतानी स्पष्ट म्हटले आहे.

श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

पूर्व जन्मी सुकृते थोर केली। ती मज आजी फळासी आली।
परमानंदु आजि मानसी। भेटी झालिया संतासी ।।ज्ञा. म.
पुण्यफळले बहुता दिवसा। भाग्य उदयाचा ठसा।
झालो सन्मुख तो कैसा। संतचरण पावलो ।।
भाग्याचा उदया। ते हे जोडी संत पाय ।।

असे संत तुकाराम महाराज म्हणतात. हीच गोष्ट जनक नवयोगेश्वर संवादात भागवतामध्ये सांगितली आहे. राजा जनक त्या नवयोगेश्वराना म्हणतो।

ज्यांसी भगवद्भक्तीची अतिगोडी। त्यावरी भगवंताची आवडी।
त्याची भेटी तै होय रोकडी। जै पुण्याच्या कोडी तिष्ठती ।।२४०
निष्कामता निजदृष्टी। अनंत पुण्ये कोटयानुकोटी।
रोकडया लाभती पाठोवाठी। तै होय भेटी हरि प्रियाची ।।२४३
व्याघ्र सिंहाचे दूध जोडे। चंद्रामृतही हाता चढे।
परी हरि प्रियाची भेटी नातुडे। दुर्लभ भाग्य गाढे मनुष्या ।।२४४

एकनाथी भा. २–

पण या वरून कोणास निराश व्हायचे कारण नाही. जर अंतःकरणात त्यांच्या भेटीची दर्शनाची तळमळ असेल तर ती तळमळच त्या संतांची भेट करून देते. ' कै हे बिरड फिटेल ' कै तो स्वामी भेटेल ।। ज्ञा. १३ अशी भावना वृद्धिगत झाली पाहिजे. श्री तुकाराम महाराजांना संत सद्गुरु भेटीची किती तळमळ होती. हे त्याच्या अनेक अभंगातून स्पष्ट होते.

माझिये जातीचे मज भेटे कोणी । आवडी धणी फेडावया ।।
आवडे ज्या हरी अंतरापासुनि । ऐसियाचे मनी आर्त माझे ।।

अशा तळमळीत असताच त्यांना स्वप्नात श्री बाबाजी चैतन्य यांची गाठ पडली. व त्यांनी आवडीचा मंत्र त्याना दिला हे प्रसिद्ध आहे. श्री निळोबारायाना तर तुकोबारायाचे निर्याण झाल्यानंतर तीव्र तळमळीने पुन्हा तुकोबारायांनी वेकुंठाहून येऊन दर्शन दिले असे त्यांच्या चरित्रात आहे. साधू केव्हां भेटतात. हे तुकाराम महाराजानी एका अभगातून सागितले आहे

अर्थकाम चाड नाही चित्ता । मानामान मोहमाया मिथ्या ।
वर्ते समाधानी जाणोनि नेणता । साधू भेट देती तया अवचिता ।।
मनी दृढधरी विश्वास । न करी साडीमाडीचा सायास।
साधूदर्शन नित्यकाळ त्यास । तुका म्हणे जो विटला जाणिवेस ।।

एवढा अधिकार सर्वांचा नसतो म्हणून त्याना संतांची संगती प्राप्त होत नाही. भागवताच्या दशमस्कंधात श्रीनारदाविषयीच एक कथा आली आहे. श्रीनारदमहर्षी एकवेळा हिमालयात प्रवास करीत होते, तेथे मदाकिनीच्या तीरावरून ते ब्राह्मणवीणा वाजवित भगवन्नाम सकीर्तन करीत आनंदाने चालले असता धनाध्यक्ष कुबेराचे लाडके पुत्र नलकुबर व मणिग्रीव हे उन्मत्तपणे त्या मंदाकिनीत आपल्या स्त्रिया समवेत जलविहार करीत होते, त्याच्या स्त्रियांनी नारदांना पाहिले. व त्या लाजल्या त्यानी काठावर येऊन आपापली वस्त्रे परिधान केली; पण या दोघांना मात्र काहीच वाटले नाही. हे स्वैरजलक्रीडाच करीत राहिले. शेवटी नारदानी त्यांचा अभिमान नष्ट करण्याकरिता त्यांना तुम्ही वृक्ष योनीस प्राप्त व्हाल असा शाप दिला व ते गोकुळात वृक्ष झाले (मागाहून श्रीकृष्णानी त्यांचा त्या वृक्षयोनीतून उद्धार केला) ही कथा प्रसिद्ध आहे. सूत्रात ' महा त्संग ' असा शब्द आहे भेट दर्शन असे शब्द नाहीत. एखाद्या वेळी भेट दर्शन होऊनही उपयोग होतोच असे नाही. महर्षी दुर्वासऋषी मार्गक्रमण करीत असता ऐरावतावर बसून इंद्र येत होता. त्याने याना पाहून शापाच्या भीतीने खाली उतरून नमस्कार केला. ऋषीनाहि इंद्राने आपला आदर केला. हे पाहून समाधान वाटून त्यांनी आपल्या गळ्यातील पुष्पमाला त्याला प्रसाद म्हणून दिली. ते थोडे पुढे जाताच इंद्राने ती माला हत्तीच्या सोंडेत दिली व हत्तीने चुरगळून फेकून दिली. दुर्वासानी मागे वळून पाहिले असता त्यांना तो अपमान

सहन झाला नाही तेव्हा ‘ तुझी सर्व संपत्ती नष्ट होईल ’ असा त्यानी शाप दिला ही कथा प्रसिद्ध आहे. संग तोच की ज्याचा अंत.करणावर परिणाम झाला पाहिजे. हृदयात भक्तिप्रेमाचा उदय झाला पाहिजे. त्याच्या संगतीविना भगवद्‌भक्ती निर्माण होणे अशक्य आहे.

**नैषांमतिस्तावदुरुक्रमांङ्घ्रि स्पृशत्यनर्थापगमोयदर्थः । महीयसां पादरजोऽभिषेकं निष्किंचनानां न वृणोतयावत् ॥ ३२॥ भागवत स्कं. ७–५**

भक्तश्रेष्ठ प्रल्हादाचे उद्‌गार आहेत, तो म्हणतो, ज्याची बुद्धिभगवच्चरण कमलाला स्पर्श करते. त्यांच्या जन्म मृत्युरूप अनर्थाचा सर्वथा नाश होतो, परन्तु जे लोक अकिंचन भगवतप्रेमी महात्म्याच्या चरण धूलीत स्नान करीत नाहीत त्याची बुद्धि काम्यकर्माचे आचरण करीत असताही भगवच्चरणाचा स्पर्श करू शकत नाही म्हणजे भगवच्चरणाचा लाभ होत नाही. हे प्रल्हादाचे उद्‌गार नारदानीच सागितले आहेत.

भक्तवर्य मुचकुद याचे उद्‌गारही या विषयात मननीय आहेत.

**भवापवर्गो भ्रमतो यदा भवेज्जनस्य तर्ह्यच्युत सत्समागमः ।**
**सत्संगमो र्यहितदैव सद्‌गतौ परावरेशेत्वयि जायते मतिः ॥५४॥**

भागवतस्क. १०–५१

‘ हे भगवन ! या संसारचक्रामध्ये भटकणाऱ्या प्राण्याचा जन्ममरणाचा अत निकट येतो, तेव्हा त्याला सत्संगाची प्राप्ती होते व सत्संग प्राप्त होताच सत्पुरुषाचा आश्रय व कार्यकारणाचा नियन्ता जो तू भगवंत त्या तुझ्या ठिकाणी प्रेम उत्पन्न होते. ’

ज्ञानी विद्वान् पुरुषाच्या सगतीत ज्ञान, विद्या प्राप्त होते. धनवान् पुरुषाच्या संगतीने त्याच्या कृपेने धनाची प्राप्ती होते तद्वत् संत महात्म्याच्या संगतीत भगवद्‌भाव प्राप्त होतो. साधूचा अकिला हरिभक्त । असे ज्ञानेश्वर महाराज हरि-पाठात सांगतात. असा सर्वोपकारी महात्म्या पुरुषाचा संग दुर्लभ आहे. तसेच दुसरे विशेषण ‘ अगम्य ’ असे दिले आहे. अगम्य म्हणजे तरी संत भेटले तरी त्यांना ‘सत’ या स्वरूपात जाणणे कठीण आहे. हे वर उदाहरणानी सागितले गेलेच आहे. वास्तविक ते जगात राहून जगासारखेच वागत असतात. पण त्याचा अंतरातील अध्यात्मिक अधिकार फार श्रेष्ठ असतो त्या अधिकाराचे दृष्टिने त्याना ओळखणे कठीण असते. श्रीकृष्ण भगवानच म्हणतात

तैसा संसर्गामाजि असे । सकळा सारिखा दिसे । जैसे तोयसंगे आभासे । भानुबिब ॥७२॥ तैसा सामान्यत्वे पाहिजे । जरी साधारणुचि देखिजे । येखी निर्धारिता नेणिजे । सोय जयाची ॥७३॥

ज्ञानेश्वरी ३

या अगम्यतेचे थोडे वेगळ्या दृष्टीने श्री एकनाथ महाराजांनी व्याख्यान केले आहे.

ऐसे पवित्र आणि कृपामूर्ति। भाग्ये लाधलो हे संगती। सत्संगाची निज ख्याती। सांगता श्रुति मौनावल्या ।।२५२।। ब्रह्मनिर्धर्म नेणे निजधर्मा। साधुमुखे ब्रह्मत्व ये ब्रह्मा। त्या सत्संगाचा महिमा। अति गरिमा निरुपम ।।२५६।। सत्संग म्हणो निधिसमान। निधी जोडल्या हारपे जाण। सत्संगाचे महिमान। साधका-संपूर्ण सद्रूप करी ।।२५७।। इद्रिया वीण स्वानंदु। विषयावीण परमानंदु। ऐसा करिती निजबोधु। अगाध साधु निजमहिमा ।। २५८ ।।

एकनाथी भागवत अ. २.

कित्येक भोळे भाविक लोक एखादा बाह्यवेषधारी म्हणजे संत चिन्हे धारण करणारा दिसला की त्याला भक्त, सत असे समजू लागतात. कित्येक काही अलौकिक चमत्कार दिसले की त्यास संत म्हणून मागे लागतात पण एवढ्याने त्याची फस-वणूकही होत असते तर कित्येक वरून सामान्य माणसासारखे भासतात पण अंतर्यामी ते फार श्रेष्ठ अशा अधिकाराप्रत पोहचलेले असतात. अशा स्थितीत त्याना ओळखणे अशक्य होऊन जाते. कित्येक तर जगाने आपल्याला ओळखू नये, उपाधी वाढू नये म्हणून जाणून बुजून वेडचासारखेही वागत असतात. म्हणून तुकाराम महाराज म्हणतात,

संतांचा महिमा तो बहु दुर्गम। शाब्दिकाचे काम नाही येथे ।।१।। बहुदुधड जरी झाली म्हैस गाय। तरी होईल काय कामधेनु ।।२।। तुका म्हणे अंगे व्हावे तैं आपण। तरीच महिमान येईल कळो ।।३।। उदाहरणाने सागावयाचे झाल्यास श्री ज्ञानेश्वर महाराजास अथवा श्री तुकाराम महाराजाना तत्कालीन किती लोकानी ओळखले. आळदीच्या ब्रह्मवृदानी ओळखले नाही. पैठण येथील लोकानीही प्रथम ओळखलेच नाही, कित्येकानी उपहासही केला. इतकेच नव्हे तर चांगदेवासारख्या आपल्या योगसामर्थ्याने चौदाशे वर्षे जगणाऱ्या योगिराजानेही प्रथम ओळखलच नाही. श्री तुकाराम महाराजाचा देहूत किती छळ होत होता हे प्रसिद्धच आहे. रामेश्वर भट्टासारख्या विद्वान ब्राह्मणाने तरी प्रथम ओळखले का? म्हणूनच सत्संग 'अगम्य' असे म्हटले आहे.

असा अगम्य असूनही भाग्यवशात् प्राप्त झाला तर तो 'अमोघ' म्हणजे व्यर्थ न जाणारा आहे. स्मृत्यादी ग्रंथातून अनेक साधने सागितली आहेत, त्या त्या साधनात अनेक प्रतिबध आडवे, येतात ते दूर न केले गेले तर त्या साधनाचे आचरण सर्व व्यर्थ जाते. सत्संगतीचे तसे नाही. ती साधने कशी व्यर्थ होतात या विषयी एकनाथ महाराजानी भागवत एकादश स्कंधाच्या बाराव्या अध्यायाच्या

प्रारंभीच विस्तारपूर्वक सांगितले आहे. त्याचा भावार्थ खाली देत आहो. एकना महाराज सांगतात,

मागा बोलिली जी साधने । ती अवघीचि मलिन अभिमाने ।।

उदाहरणार्थ अष्टांगयोग कठिण, कारण त्यात पवन म्हणजे प्राणवायुचा ज करणे कठिण आहे नित्यानित्यविवेकात पांडित्य अभिमान बाधक होतो, ध मानाची वांछा निर्माण होते. ते ज्ञान हेच त्याला विघ्न होते. तप केले तर बड बडया तपोनिष्ठांना क्रोधाने जर्जर केले व त्याचे तप व्यर्थ गेले सर्वस्व त्याग करू संन्यास घेतला तर तेथेही देहाभिमान जळत नाही. विरजा होम व्यर्थ होत मानाभिमान तेथेहि बाधक होतो. श्रौतस्मार्त साग कर्म केले, इष्टापूर्त कर्मे केल तर तेथेही स्वर्गभोग आडवे येतात. तात्पर्य ही साधने अमोघ नाहीत, तसेच य प्रत्येक साधनांच्या पूर्वी कांही साधने करावी लागतात. सत्संगाचे नसे नाही. य सत्संगाने कोणा कोणाचा कसा कसा उद्धार झाला ते सांगतात.

पहाता केवळ जडमूढ । रजतम योनी जन्मले गूढ ।
सत्संगती लागोनिदृढ । माते सुदृढ पावले ।।६४।।
दैत्य दानव निशाचर । खग मृग गंधर्व अप्सरा ।
सिद्धचारण विद्याधर । नाग विखार गुह्यक ।।६५।।
जे सकळ वर्ण धर्मावेगळे । ज्याच्या नामास कोणी नातळे ।
छाया देखोनि जग पळे । अत्यंत मैळे अत्यंज ।।६७।।
तिही धरोनि सत्संगती । आले माझिया पदाप्रती ।
देवद्विज तयाते वंदिती । अभिनव कीर्ती संतांची ।।६८।।
यमधर्म पाया लागती । तीर्थे पायवणी मागती ।
भावे धरिल्या सत्संगती । एवढी प्राप्ती पुरुषाशी ।।७२।।

यावरून महात्संग अमोघ कसा आहे हे लक्षात येईल. वर ज्याची उदाहर दिली आहेत त्यांनी वेदाध्ययन केले नव्हते, गुरुसेवाही केली नाही. चांद्रायणादिव्र अथवा उग्र तपश्चर्याही केली नव्हती. भगवान श्रीकृष्ण उद्धवास सांगतात.

तिही नाही केले वेदठपण । नाही गुरु केले केवळ शास्त्रज्ञ ।
व्रत तपादि नाना साधन । नाही जाण तिही केले ।।१०४।।
केवळ गा सत्संगती । मज पावल्या नेणो किती ।
एक भावे जे भावार्थी । त्यांसी श्रीपतीसुलभू ।।१०५।।

एकनाथी भागवत अ. १

एका क्षणाचाही सत्संग व्यर्थ जात नाही. ‘ निमीषार्थ होता सत्संग । तेणे संगे हो भवभंग । यालागी सत्संगाचे भाग्य । साधक सभाग्य जाणती ।।’ २–२५० ।। एव विचार करण्याचे कारण सत्संगाचे अमोघत्व, उपकारित्व पटावे हेच आहे.

वाल्याकोळयास क्षणभरच नारदाचा सग घडला होता, अजामिळाला ही भाग्याने मृत्युसमयी विष्णुदूताचे दर्शन झाले व त्याचा आणि यमदूताचा संवाद श्रवण करण्यास मिळाला, त्याचाच परिणाम त्याच्या जीवनात भगवद्भक्तीचा प्रवेश झाला राज्याची उपेक्षा करणाऱ्या ध्रुवास मधुवनात प्रवेश करताना क्षण-भरच श्री नारदाची संगती घडून त्यांच्याकडून नारायण मत्राची प्राप्ती झाली. तुकाराम महाराजाना तर स्वप्नात गगा स्नानाला जाताना श्री बाबाजी सद्गुरूंची भेट झाली व त्यांनी 'रामकृष्णहरी' मंत्र दिला. पण त्याचाच परिणाम तुका म्हणे सती दाखविला तारू। कृपेचा सागरू पांडुरंग ॥' येथ पावेतो झाला. अशी सहस्त्रावधि उदाहरणे साहेत. 'ससारेऽस्मिन्क्षणार्धोऽपि सत्संगः शेवधिर्नृणाम ॥' 'या ससारात क्षणभर जरी सत्सग घडला तरी प्राणिमात्राना संपूर्ण कल्याणकारी होतो' असे राजा जनक नवयोगेश्वराना म्हणतो. ए भा. २– ३०

लौकिक उदाहरण द्यावयाचे तर विजेचा प्रखर दाब जेथे साठविला गेला आहे त्या विद्युत घटाशी दूरतः जरी स्पर्श झाला तरी ती सर्वागात क्षणात प्रविष्ट होते, तसे संत हे ज्ञान, वैराग्य, भक्तिप्रेम यानी कायावाचामनाने सपूर्ण व्यापून गेलेले असतात. तसेच सर्वानी याचा आपल्या जीवनात उपयोग करून घ्यावा व आपले जीवन भगवन्मय बनवावे हीच त्याची धारणा व खटपट असते. याकरिता त्याच्या संगतीत कोणी कसा जरी आला तरी'गुण दोष याति न विचारिती काही। ठाव दिला पायी आपुलिया ॥ तु ॥' या उक्तीप्रमाणे त्याचा ते उद्धार करतात कोणी केवढाही अज्ञानी दुष्ट दुराचारी पापी असला तरी त्याची ती पापशक्ती सताच्या पापनाशक, तारक अशा करुणाशक्तीपुढे व्यर्थ होते म्हणून महत्सग 'अमोघ' आहे असे सूत्रात म्हटले आहे.

## सूत्र ४०

## लभ्यते ऽपि तत्कृपयैव ॥ ४० ॥

**अर्थ** :

त्या भगवंताच्या कृपेनेच (महापुरुषाचा) संगही मिळतो.

**विवरण** :

मागील सूत्रात महात्संग दुर्लभ आहे असे सागितले आहे. दुर्लभ म्हणजे अशक्य नव्हे, अशक्याचा विचारच करावयाचा नसतो. दुर्लभ म्हणजे सामान्य

प्रयत्नाने प्राप्त न होणारा. ज्याकरिता काही विशेष अधिकार, विशेष साध अपेक्षित असते, तसा महत्संग दुर्लभ म्हणजे अगदीच न प्राप्त होणारा असा म्हणत येत नाही, तर त्याचे जे साधन या सूत्रात सांगितले आहे त्यानेच प्राप्त होणा तो आहे. ते म्हणजे भगवत्कृपा. ' यावन्नानुग्रहस्साक्षाऽज्जायते परमात्मनः । ताव सद्गुरुं कंचित्सच्छास्त्रमपि नोलभेत् ।।' म्हणजे जोपावेतो भगवद्नुग्रह होत ना तो पावेतो सद्गुरू अथवा सच्छास्त्र प्राप्त होत नाही असे एक वचन आहे. भगव अनुग्रह कधी तो अंतर्यामी असल्याने आतून प्रेरणा देऊन करतो. तर कधी त प्रगट होऊन करतो. मिथिला नगरीत राहणाऱ्या पिंगलेस आतून अनुग्रह केला. त म्हणते, ' धन्य माझी भाग्य प्राप्ती । येचि क्षणी येचि राती । झाली विवेक वैराग प्राप्ती । रमापती तुष्टला ।। २५५ ।।' एकनाथी भागवत अ. ८

श्रीनामदेवरायांना श्रीपांडुरंगानेच विसोबा खेचर या संताची गाठ घालू दिली होती हे सर्वांना माहीतच आहे. म्हणूनच श्री तुकाराम महाराजांनी आपल्य अनेक अभंगांतून श्री पांडुरंगाचीच प्रार्थना सत्समागमाकरिता केली आहे.

'अखंड जया तुझी प्रीती । मज दे तयाची संगती । मग मी कमळापती तुज बा नाणी कांटाळा ।।१।। कोणपुण्ये याचा होईन सेवक । जिही द्वंद्वादि दुराविली ।।१।। ऐसे वर्म मज दावी नारायणा । अंतरीच्या खुणा प्रगटोनि ।।२ मागणे ते एक तुजप्रती आहे । देसील तरी पाहे पांडुरंगा ।।२।।' या संतासी निरव हेचि मज देई । आणीक दुजे काही न मागो देवा ।।२।। असे अनेक अभंग प्रसिद्ध आहेत. म्हणून भगत्कृपेनेच सत्संगतीचा लाभ होतो असे श्रीनारद म्हणतात. ये ' लभ्यते ' हे क्रियापद सहेतुक वापरले आहे. ' प्राप्यते ' ' साध्यते ' असे न म्हणत ' लभ्यते' म्हटले आहे. म्हणजे यात ' लाभ' होणे हा अर्थ ध्वनित होतो. प्राप्त या शब्दाचा उपयोग सुख-दुःख, लाभ-हानी या दोहोकडे करता येतो पण लाभ ह शब्द अनुकूल व प्रयोजनयुक्त वस्तूच्या प्राप्तीकडेच केला जातो ' तुका म्हण आतां । लाभ नाही या परता ।। ' सत्संगतीपेक्षा दुसरा श्रेष्ठ लाभच नाही ' वैराग्याचे भाग्य । संतसंग हाचि लाभ ।।' असे तुकाराम महाराज सांगतात.

या सूत्राचा वरीलपेक्षा थोडा वेगळाही अर्थ होऊ शकतो. सूत्रांत ' तत् हे सर्वनाम वापरले आहे. ' तत् ' म्हणजे संत हा अर्थ घेतला जातो. ' म्हणजे महा पुरुषाच्या मनात एखाद्यावर कृपा करण्याची इच्छा निर्माण झाली, त्याच्या कृपा दृष्टिक्षेपात जो आला तो कोणीही असला तरी त्याला त्याच्या कृपेचा लाभ होतो पण वरील पहिला अर्थच घेणे ठीक आहे असे आम्हास वाटते. देवाची कृपा झाल्या विना संत भेट वा दर्शन झाले तरी ते कित्येक वेळा व्यर्थ जाते. याबद्दल अर्जुनाने श्रीकृष्णाजवळ उद्गार काढले आहेत. अर्जुन म्हण'तोहे श्रीकृष्णा,माझे येथे असित देवल, नारद, व्यास हे सर्व येत असत पण त्यांच्या संगतीचा उपयोग झाला नाही.

पण ज्यावेळी तुम्ही कृपा केली तेव्हा मला ते सर्व आठवू लागले. ' येऱ्हवी नारदु अखंड जवळी ये । तोही ऐसेचि वचने गाये । परि अर्थ न बुझोनि ठाये । गीत सुखचि ऐको ।। ज्ञा. १०–१५५।।' 'हे देवा आंधळयांच्या गावामध्ये सूर्य स्वतः प्रगट झाला, तर त्यांना त्याच्या उष्णतेचाच अनुभव येणार. सूर्यप्रकाशाचा त्यांना अनुभव कोठून येणार ?'अर्जुन म्हणतो 'देवा, नारद ऋषी अध्यात्मावर गाणे गात असताना त्याच्या गाण्याच्या रागाच्या आश्रयाने असणारी वरवरची मधुरता, तीच आमच्या अनुभवाला येत होती, त्या गाण्यातील अध्यात्म चित्ताला काही कळत नव्हते. त्याचप्रमाणे असित व देवल या ऋषीच्या तोंडूनसुद्धा तुझे स्वरूप असे आहे म्हणून तुझ्याविषयी मी ऐकले परंतु त्यावेळी माझी बुद्धी विषयरूप विषाने व्यापली होती. महर्षी व्यासदेव हेही आमचे राजवाड्यात येऊन नेहमी तुझ्या संपूर्ण स्वरूपाचे वर्णन करीत असत, परतु त्याचा तो उपदेश म्हणजे अंधारात पडलेल्या चिंतामणी-सारखा होय. याप्रमाणे व्यासादिकाची भाषणे ही माझ्यापाशी ज्ञानरूपी रत्नाच्या खाणी होत्या, परंतु कृष्णा, तू जो सूर्य त्या तुझ्याविना त्यांचा अनादर केला जात होता, ' तैशी व्यासादिकाची बोलणी । तिया मजपाशी चिद्रत्नांचिया खाणी । परी उपेक्षिल्या जात होतिया तरणी । तुजवीण कृष्णा ।।१६२।।' ज्ञानेश्वरी अ. १२ श्लो. १६.भक्तवर्य अर्जुनासारख्या श्रेष्ठ पुरुषाच्या अनुभवावरून व अन्य सर्व प्रमाणावरून सत्संग हा भगत्कृपेनेच प्राप्त होतो हे सिद्ध होते.

भगत्कृपा व सत्संग याच्या प्राप्तीचा कार्यकारण संबंध सांगितला तो कसा सिद्ध होणार ? याचे उत्तर पुढील सूत्रात दिले आहे.

## सूत्र ४१

## तस्मिन्स्तज्जने भेदाभावात् ।। ४१·।।

**अर्थ :**

त्या भगवंताचे ठिकाणी व तज्जन, त्याचे जे भक्त आहेत त्यांचे ठिकाणी (परस्पर) भेदाचा अभाव आहे. (म्ह. भेद नाही.) (म्हणून भगवत्कृपेने सत्संगाचा लाभ होतो. )

**विवरण :**

मागील सूत्रात महत्संग दुर्लभ अगम्य अमोघ आहे पण तो भगवत्कृपेने प्राप्त होतो असे सागितले, तेव्हा भगवत्कृपा व महात्म्या पुरुषाच्या संगती प्राप्तीत कार्य-

कारण भाव सबंध कसा अशी शंका कोणी घेईल, त्याचे उत्तर या सूत्रात दिले आहे. येथेही 'तत्' शब्दाचा प्रयोग केला आहे तो 'भगवंत' वाचक आहे. (म्हणून मागील सूत्रातील 'तत्' शब्दही भगवद्वाचकच घेणे योग्य आहे.) त्या भगवंताचा व तज्जन म्हणजे सर्वस्वी त्याचेच झालेले (असलेले) भक्तजण यांचा भेद नाही. शास्त्रामध्ये अन्योन्याभावास भेद म्हणतात. अन्योन्याभावास प्रतियोगि व अनुयोगी लागतात. म्हणजे ज्याचा अभाव तो प्रतियोगी व ज्याचे ठिकाणी अभाव तो अनुयोगी म्हटला जातो. उदाहरणार्थ घट हा पट नाही, या वाक्यात घट हा प्रतियोगी पट हा अनुयोगी आहे. म्हणजे घटाचा अभाव पटाचे ठिकाणी दाखविला जातो. जर पट हा घट नाही अशी वाक्ययोजना केली तर पट हा प्रतियोगी व घट हा अनुयोगी होईल.

भेद हा अन्योन्याभावरूप असल्याने त्यातही हे असतातच. तत् शब्दवाच्य परमात्मा व तज्जन शब्द वाच्य संत ह्यांच्या ठिकाणी वरवर पाहाणाऱ्यांना भेद प्रतीत होतो. कारण जसे पटत्वधर्माने युक्त पट व घटत्व धर्माने युक्त घट हे भिन्न धर्मी असल्याने त्यांच्यात भेद आहे तसे भगवान् व भक्त हेही भिन्न धर्मी असून त्यांच्यात भेद असणे योग्य आहे असे वाटेल. वास्तव भेद व प्रातीतिक भेद असे भेदाचे दोन प्रकार असतात घट व पट यांच्यातील भेद व्यवहारात: वास्तव आहे पण घटाकाश आणि मठाकाश हा भेद वेदांत शास्त्रात वास्तव मानला नाही, जो पावेतो घट हा उपाधी आहे तो पावेतोच घटावच्छिन्न आकाश हे मठाकाशाहून वेगळे दिसेल पण जर घटाचा बाध झाला तर हे मठाकाशस्वरूपच असते, ज्यावेळी घट असतो व तदंतर्गत आकाश वेगळे दिसते त्याहीवेळी ते मठाकाशाहून अभिन्नच असते, तंतूपट, जलतरग इ. भेदही प्रातीतिक आहे. तात्त्विक नाही तसाच प्रकार परमात्मा व संत यांच्यात आहे 'ज्ञानीत्त्वात्मैव मेमत' हे गीतावचन प्रसिद्ध आहे. श्री ज्ञानेश्वर महाराज सांगतात 'परि जाणोनिया माते। जे पाहो विसरले मार्गाते। जैसे सागरायेऊनि सरिते मुरडावे ठेले ॥१२४॥ तैसी अंत:-करणकुहरी जन्मली। जयाची प्रतीतिगंगा मज मिनली। तो मी हे बोली। फार करू ॥१२५॥ एऱ्हवी ज्ञानिया जो म्हणिजे। तो चैतन्यचि केवळ माझे। हे न म्हणावे परी काय कीजे। न बोलणे बोलो ॥ १२६ ॥' ज्ञानेश्वरी अ. ७

बाह्य आकाराने प्रतीत होणारा भेद खरा नाही. एका सुवर्णाचेच अनेक अलंकार केले त्यांच्यात नामभेद, रूपभेद, आकारभेद, व्यवहारभेद दिसून येतात. पण सुवर्ण या दृष्टीने त्यांचा भेद नाही. देव व भक्त यांच्यातील अभेदाचे स्वरूप भगवान श्रीकृष्णच सांगतात,' ते वर्तत दिसती देही। परि ते देही ना माझ्या ठायी। आणि मी तयांचा हृदयी। समग्र असे ॥ सविस्तर वटत्व जैसे। बीज कणिके माजी असे। आणि बीज कणू वसे। वटी जेवी ॥ तेवी आम्हा तया परस्परे। बाहेरी

नामाचीच अंतरे । वाचुनि आतुवट वस्तु विचारे । मी तेचि ते ।।' ज्ञानेश्वरी अ. ९ ४०९, १०, ११.

श्रीमद्भागवतामध्ये अंबरीष उपाख्यानांत प्रत्यक्ष भगवान महाविष्णू दुर्वास ऋषीस सांगतात.

**साधवो हृदयं मह्यं साधूनां हृदयं त्वहं ।।**
**मदन्यत्ते न जानन्ति नाहं तेभ्यो मनागपि ।।६८।।** भा० ९–४

भगवान म्हणतात ' हे दुर्वास ऋषे ! साधू हेच माझे हृदय आहे व मीच त्यांचेही हृदय आहे. माझ्या विना तेही काही जाणत नाहीत व त्यांच्या वाचून मीही अन्य कोणास जाणत नाही ' आणखीही दोन श्लोकांतून भक्त व भगवान या उभयतामधील अनन्य प्रेम स्पष्ट केले आहे.

**अहं भक्त पराधीनः ह्यस्वतंत्र इव द्विज ।**
**साधुभिर्ग्रस्तहृदयो भक्तैर्भक्तजनप्रियः ।।**
**नाहमात्ममानमाशासे मद्भक्तैः साधुभिर्विना ।**
**श्रियं चात्यन्तिकीं ब्रह्मन् येषां गतिरहं परा ।।**

भागवत स्कं. ९-४-६३, ६४

' मी सर्वथा भक्ताचे आधीन असून अस्वतत्राप्रमाणे आहे' म्हणजे परतंत्र आहे. कारण माझ्या भक्तांनी माझ्या हृदयाचा ग्रास केला. आहे. म्हणजे माझे हृदय त्यांच्या ताब्यात आहे. कारण त्यांना मी सदाच प्रिय आहे. माझ्या भक्तांचा एकमात्र आश्रय मीच आहे, त्यांना अन्य कोणाचा आश्रय नाही, अतएव अशा भक्तांना सोडून मी माझ्या स्वत.चीही अपेक्षा ठेवीत नाही, म्हणजे माझा देहही मला प्रिय नाही. तसेच माझी अर्धांगिनी लक्ष्मीही मला प्रिय नाही. ' श्रीमद्भागवत, ज्ञानेश्वरी आदी ग्रंथातून अनेक स्थळी असा देव भक्तांचा तादात्म्य संबंध सांगितला आहे. कोणास वाटेल भक्त तर देवाची सेवा करतात व देव सेव्य आहे. भेद नसेल तर सेवा कशी होईल ? याचे उत्तर श्रीकृष्ण अर्जुनास देतात. त्याचा अनुवाद ज्ञानेश्वर महाराज करतात.

मग वाढतेनि प्रेमे । माते भजति जे महात्मे । परी दुजेपण मनोधर्मे । शिवतले नाही ।। ऐसे मीचि होऊनि पांडवा । करिती माझी सेवा । परी नवलाव तो सांगवा । असे आईक ।। ज्ञा. ९.१९५, ९६ देव ते संत देव ते संत । निमित्त त्या प्रतिमा ।। देव आणि भक्त दुजा नाही विचार ।। इत्यादी तुकाराम महाराजांची वचने हेच सांगतात.

सूत्रामध्ये भक्ताकरिता अथवा संत महात्म्याकरिता ' तज्जन ' हा शब्द वापरला आहे. केवळ संत भक्त भाविक महात्मा या शब्दाचे अनेक अर्थ होऊ शकतात. श्री नारदानी अभिप्रेत अर्थ दाखविण्याकरिता ' तज्जन ' शब्दाचा उपयोग

केला असावा असे वाटते. ' तज्जन .– तस्य एव जनः तज्जनः ' असा समास होतो म्हणजे त्या भगवंताचाच जो असतो तो आपल्याला इतराचा कोणाचा समजत नाही. कोणी म्हणेल तसे तर सर्व जीव देवाचे अंशभूत आहेत. म्हणून सर्वच ' तज्जन ' आहेत. पण हे म्हणणे बरोबर नाही. सर्वच जीव देवाचेच अंशभूत आहेत हे खरे पण सर्वांना तसे वाटते काय ? ' देव माझा मी देवाचा ' ही भाषा सर्व वापरीत नाहीत. श्रीकृष्ण भगवान अर्जुनाला सांगतात. 'तैसे भूत जात सर्व । हे माझेचि कीर अवयव । परि मायायोगे जीव । दशे आले ॥६६॥ म्हणोनि माझेचि मी नव्हती । माझेचि मज नोळखती । अहं ममता भ्रांति । विषयाध झाले ॥६७॥' ज्ञानेश्वरी अ. ७. देवाचे जन येथे षष्ठी विभक्तीचा उपयोग केला गेला आहे. षष्ठी विभक्ती ही संबंध दाखविते. म्हणजे देवाषीच ज्याचा सबंध आहे असा जन. जरी सर्वांचा देवाशी अनादि नित्य संबंध आहे तरी वरील ओव्यात सांगितल्याप्रमाणे तो अज्ञात आहे. अज्ञात संबंध अकिंचित्कर, निरूपयोगी असतो. जो भक्त आहे तो आपला सर्वस्वी संबंध देवाशीच आहे असे समजत असतो. इतर मानव आपला संबंध देह, स्त्री, पुत्र, पिता, माता, बंधू, मित्र, तसेच गृह,क्षेत्र इत्यादिकांशी आहे असे समजतात, म्हणून त्यांच्याशीच तादात्म्य ठेवतात व काही अनुकूल फलाच्या अपेक्षेने त्याचीच सेवा करीत असतात. देवाला पूर्णपणे विसरून जातात. म्हणून याना ' तज्जन ' म्हणता येत नाही. भक्त हा अन्य कोणाशीच ममत्व संबंध ठेवीत नाही. ' तुका म्हणे माझी नव्हती ही कोणी । एका चक्रपाणी वाचूनिया ॥' हे श्री तुकाराम महाराजांचे सर्व उद्‌गार याच भूमिकेवरील आहेत. असा भक्त भगवंताहून वेगळा कसा राहू शकेल ? श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात ' म्हणोनि तयाचिया चित्ता । माझी जवळीक पांडुसुता । तेव्हांचि तो तत्त्वता । स्वरूप माझे ॥ जैसा दीपे दीपुलाविजे । तेथ आदील कोण हे नोळखिजे । तैसा सर्वस्वे जो मज भजे । तो मी होऊनि ठाके॥, ज्ञानेश्वरी ९-४२७, २८.

ही अवस्था प्राप्त होणे ही ' तज्जन ' होणे आहे. अशा भक्ताचा व देवाचा भेद राहील कसा ? उभयतांमध्ये असा तादात्म्य संबंध आहे म्हणूनच मागील सूत्रात सत्संग हा भगवत्कृपेने लाभतो असे नारद म्हणतात. पुढे ही ' तन्मया ' असे सत्तराव्या सूत्रात म्हटले आहे.

## सूत्र ४२

## तदेव साध्यताम्, तदेव साध्याताम् ।।४२।।

**अर्थ :**

तोच (सत्संग) साधावा. तोच (सत्संग) साधावा.

**विवरण :**

मागील चौतिसाव्या सूत्रापासून भक्तिसाधनाचा विचार केला आहे विषयत्याग, संगत्याग, अव्यावृत भजन, भगवद्‌गुणश्रवण, कीर्तन इ. साधने सागितली. नंतर मुख्यत्वाने महत्कृपा हे साधन सांगितले व महत्संग दुर्लभ अगम्य व अमोघ आहे हेही स्पष्ट केले आणि भगवत्कृपेने सत्संग प्राप्त होतो, तत्त्वत. भगवान् व हे महात्मे यांच्यात भेद नाही. ज्याना भक्तीचा लाभ व्हावा असे वाटत असेल त्यानी महत्संगच साधावा असे आदराने द्विवार सागितले आहे. याचे कारण मागे सागितलेली विषयत्याग संगत्याग इ. साधने ही महत्संगाच्या द्वाराच सिद्ध होऊ शकतात. महत्संगच का साधावा ? याची कारणे खाली दिली आहेत.

भक्ति सिद्ध होण्याकरिता आवश्यक असा विषयत्याग होण्याकरिता सत्संगतीच पाहिजे विषयात दोषदर्शन, विषयाची अनित्यता, क्षयातिशयादि दोष युक्तता, त्यातील परिणाम, ताप, सस्कार, दु ख, गुणवृत्ती, विरोधादिदोष सत्संगतीनेच यथार्थ स्वरूपाने कळत असतात. श्री तुकाराम महाराज म्हणतात, 'बैसता संताचे सगती। कळो आले कमळापती। आपुली कोणीच नव्हती। निश्चय चित्त दृढ झाला ।। १ ।।' तसेच संगत्याग, संग म्हणजे आसक्ती. बाह्य विषयात दोषदर्शन होऊन कदाचित तात्कालिक त्याग झाला तरी अंतरातील विषयत्याग म्हणजे संग नष्ट होत नाही. ती आसक्ती नष्ट होण्याकरिताही सत्संगती उपयुक्त आहे

**तिसरे अव्यावृत भजन**– जे भजन भोगासाठी होते ते अव्यावृत म्हणजे अखंड कधी होत नाही. अव्यावृत भजनाकरिता संतकृपेचीच आवश्यकता आहे. ध्रुव, प्रल्हाद, वाल्मीकि याचे जे अखंड भजन होत होते श्री नारदाच्या कृपेमुळेच. तुकाराम महाराज म्हणतात, 'कृपा केली संतजनी। माझी अलंकारिली वाणी। प्रीत हे लाविली कीर्तनी। तुका चरणी लोळतसे ।।' म्हणून जी साधने मागील सूत्रांतून सांगितली आहेत ती ती सर्व सत्संगतीने सिद्ध होतात. म्हणून ती सत्संगतीच साधण्याचा साधकाने प्रयत्न करावा. त्यायोगे वरील सर्व साधने व साध्य प्राप्तीही अनायासेच सिद्ध होईल. सूत्रात द्विरुक्तीने सांगितले आहे त्याचे कारण 'भक्ती' हे येथे साध्य आहे व अन्य साधने आहेत, ते साध्य व ती साधने महत्संगानेच सिद्ध होतात हे सिद्ध करण्याकरिता द्विरुक्ती असावी असे वाटते.

## सूत्र ४३

## दुःसंगः सर्वथैव त्याज्यः ।।४३।।

अर्थ

दुष्ट संग हा सर्व प्रकारे (अंतर्बाह्य) टाकला पाहिजे.

**विवरण** :

मनुष्य हा संगप्रधान प्राणी आहे हे सर्वमान्य आहे संगाविना तो राहू शकत नाही. संसारातही संग असतोच व परमार्थातही सत्संग आवश्यक आहेच हे मागील सूत्रांतून स्पष्ट झालेच आहे.पण ती सत्संगती प्राप्त होण्याला प्रतिकूल अशी दु संगती असते. अनादि संसारात नित्य विषयसेवनाचेच संस्कार साचलेले असतात.इंद्रिय–तादात्म्य, विकार हे त्या दु.संगाचे प्रेरक असतात. जोपावेतो त्या दुःसगात साधक असतो तोपावेतो त्याची सत्संगाकडे प्रवृत्ती होत नाही कदाचित झाली तरी तिचा उपयोग होऊ शकत नाही. म्हणून प्रथम त्या दु.संगाचा त्याग करावयास नारद सागतात. कित्येक वेळी दु.संगांचे काही अनिष्ट परिणाम भोगावयास मिळाले असता काही दु.संग टाकले जातात असे दिसून येते पण तो खरा त्याग नव्हे. एका प्रकारचा टाकला तर अन्य प्रकारचा राहतोच. कारण दुःसंग एकच प्रकारचा नसतो. म्हणून सूत्रात ‘ सर्वथैव’ असे महत्त्वाचे पद घातले आहे संगाचा चांगलेपणा व वाईटणा त्या संगाच्या विषयावर अवलंबून असतो. दु संग हा बाह्य व आंतर असा दोन प्रकारचा आहे.

निषिद्ध शब्द स्पर्शादि पंचविषय हे बाह्य असतात पण ते तमोगुण कार्य म्हणून मोहशक्तीने युक्त असतात. अनादिकालीन विषय इद्रियतादात्म्यामुळे विषयाचे ठिकाणी अनुकूल बुद्धी निर्माण होते. अंतःकरण राग व द्वेषयुक्त असते, त्यामुळे ते सहज विषयाकडे प्रवृत्त होते. पण ते परिणामी किती बाधक असतात याचे विवेचन मागे सूत्र पस्तीसमध्ये आलेच आहे. त्यातही विशेषतः ते विषय स्त्रीदेहाच्या द्वारा जेव्हा पुढे येतात तेव्हा ते अधिक आसक्तीला कारण होतात. या बाह्य संगाचा त्याग करताना साधक भक्ताने दोन गोष्टींपासून आपल्याला फार सांभाळले पाहिजे असे श्रीकृष्ण उद्धवास उपदेश प्रसंगी भागवत एकादश स्कंध, अध्याय चौदा तसेच अध्याय सव्वीसमध्ये सांगतात. त्या दोन गोष्टी म्हणजे स्त्रीसंग व त्यापेक्षा बाधक असा स्त्रैणसंग. श्री एकनाथ महाराज अनुवाद करतात,

जो मजलागी आर्तभूत । तेणे सांडावी स्त्रीसंगाची मात ।
मी चिंतावा भगवंत। तेणें एकांत सेवावा ।। ३६० ।।

स्त्रियेच्याही परिस वोखटी । संगती स्त्रैणांची अति खोटी ।
त्यासी न व्हावी भेटीगाठी । न पहावे दिठी दुरोनि ।। ३६१ ।। अ. १४

साधकांस स्त्रीसंग कसा बाधक होतो, मोठे मोठे तपस्वीही या संगात अडकून पडले व त्यांचा तपोभंग कसा झाला याचे रसभरित वर्णन एकादश स्कंधाच्या सव्विसाव्या अध्यायांत केले आहे (एकनाथी भागवत-एकादशस्कंध, अध्याय सव्वीस श्लोक चोवीस वरील व्याख्यान पहा.) कोणास वाटेल स्त्री ही एवढी घातक आहे काय ? याचे उत्तर हेच की केवळ स्त्री ही बाधक नाही, येथे स्त्रीचा निषेध नाही. स्त्रीसंगाचा-आसक्तीचा निषेध आहे. विशेषता मनुष्य त्यात आसक्त होतो आणि सामान्यांना स्त्री ही केवळ भोग्य वस्तूच वाटते भोग्य या रूपाने स्त्री अथवा पुरुष यांची बाधकता समानच असते. एखादी व्यभिचारिणी स्त्री एखाद्या पर पुरुषास भोग्य या रूपाने पाहील तर तो पुरुषसंगही बाधकच झाल्याविना राहणार नाही. तो दु.संगच होईल. श्री एकनाथ महाराजानी स्त्रीसंगापेक्षा स्त्रैणाचा संग फार वाईट, घातक असतो असे म्हटले आहे. स्त्रीसंगतीने कित्येक तरूनही गेले अशी प्रसिद्धी आहे पण स्त्रैण संगतीने अधःपातच होतो.

स्त्रीसंगाच्या मोहमदा । सुटका आहे यदाकदा । परी स्त्रैण संगतीची बाधा । ते आपदा अनिवार ।। चुडाला स्त्रियेचे संगती । तरला शिखिध्वज भूपती । ना तरी मदालसेचे संगती । तरला नृपती कुवलयाश्व ।। हो का लीलेने करुनि भक्ती । प्रसन्न केली सरस्वती । तिचा उद्धरिला निजपती । हे बोलिले ग्रंथी वसिष्ठे ।। या परी स्त्री संगती । उद्धरिले ऐकिजेति । परी स्त्रैणाचे संगती । उद्धारा गती असेना ।।

एकनाथी भागवत १४-३७६-७९.

मनुष्य हा संगप्रधान प्राणी आहे असे आरंभी सांगितलेच आहे. मात्र तो एखाद्या वस्त्रासारखा आहे. महाभारत शांतिपर्वात भीष्म म्हणतात.

**यदि संतं सेवति यद्यसंतं तपस्विनं यदि वा स्तेनमेव ।।**
**वासो यथा रंगवशं प्रयाति तथा स तेषां वशमभ्युपैति ।।**

' मनुष्य संतांच्या संगतीत राहील तर तो तसाच बनतो. असंताच्या संगाने असंत, तपस्व्याच्या संगतीत तपस्वी व चोराच्या संगतीत चोर बनतो, वस्त्राला जो रंग द्यावा तो चढतो तसेच माणसाचे आहे.' असत्संग म्हणजे काय ? असंत कोणास म्हणावे हेही महाभारतात सांगितले आहे

दुर्विचारा दुर्विचेष्टा· दुष्प्रज्ञाः प्रियसाहसा : ।
असंतस्त्विति विख्याताः संतश्चाचार लक्षणा. ।।

दुष्ट विचार, दुष्ट आचार, दुर्बुद्धि, साहसप्रियता ही असंत लक्षणे होत. दु.संग किती व कशा प्रकारे पुढे येतो हे श्रीकृष्ण भगवानच भक्त श्रेष्ठ उद्धवास सांगतात.

जो मानीना वेदशास्त्रार्था । जो अविश्वासी परमार्था । ज्या माजी अति

विकल्पता। तोही तत्त्वता दु:संग ।। जो बोल बोल अतिविरक्त। हृदयी अधर्म कामरत। कामरोधे द्वेषा येत। तोही निश्चित दु:संग ।। स्वधर्म कर्म विनीतता। बाह्य दावी सात्विकता। हृदयी दोषदर्शी संता। हे दु:सगता अतिदुष्ट ।। जो मुखे न बोले आपण। परी देखे साधूचे दोष गुण। तेचि संवादिया दावी उपलक्षण। तो अतिकठिण दु:संग ।। एकनाथी भागवत अ. २६–ओ ३०३ ते ६. तसेच दु:संग हा सर्वथा त्याज्य का याचे उत्तर पुढील सूत्रांतून नारद महर्षी देणारच आहेत, पण भागवतामध्ये कपिल देवहूति संवादात कपिल दु.संगाचे बाधकत्व सागतात.

सत्यं शौचं दया मौनं बुद्धि. श्री र्‍हीर्यश. क्षमा ।।
शमो दमो भगश्चेति यत्संगाद्याति संक्षयम् ।। ३–३१–३३.

कपिल भगवान म्हणतात, ' दुष्ट संगाने सत्य, पावित्र्य, दया, मननशीलता, बुद्धि, लज्जा, श्री कीर्ति, क्षमा, मन:शाति, इंद्रिये ताब्यात राहणे आणि ऐश्वर्य इत्यादि सर्व गुणाचा नाश होतो.' भक्तिमार्गाच्या दृष्टीने अत्यंत त्याज्य असा दु:संग म्हणजे नास्तिक, अश्रद्धावान् तमोगुणी, रजोगुणी पुरुषांचा संग होय. अनेक तर्कदुष्ट अनुमाने, हेत्वाभास, कुतर्क, वितंडवाद, युक्त्याभास इत्यादिकाच्या द्वारा श्रद्धावान भक्तिमार्गीयांना सन्मार्गापासून च्युत करण्याचा त्यांचा अखड प्रयत्न चालू असतो. श्रीतुकाराम महाराजही स्पष्ट सांगतात.

तार्किकाचा टाका संग। पाडुरंग स्मरा हो ।।
नको दुष्टसग। पडे भजनामध्ये भंग ।।

येथे दु:संगाचा जो निषेध आहे तो सत्सगाच्या फलप्राप्तीकरता आहे. दु संग त्यागपूर्वक सत्संग झाला पाहिजे, श्रीकृष्ण भगवानही हेच सागतात.

ततो दु:सगमुत्सृज्य सत्सु सज्जेत बुद्धिमान् ।
संत एतस्य छिन्दन्ति मनोव्यासङ्गमुक्तिभि: ।।

ना. भा. २६.

' याकरिता बुद्धिमान पुरुषाने दुष्टांची संगती टाकून देऊन संतांची संगती धरावी. संत हे आपल्या संगतीत असणाऱ्याच्या मनातील विषयासक्तीचा आपल्या अमृतमय वाणीने नाश करतात.'

अशा रीतीने दु:संग सर्वथा त्यागावा हे सांगितले. पण त्याचा त्याग का करावा ? तर तो सर्वथा जीवाचा सर्वनाश करणारा आहे. तो कशा कशा प्रकारे मानवाचा सर्वनाश करण्यास कारण होतो हे सागण्याकरिता पुढील सूत्राची रचना केली आहे.

## सूत्र ४४

## कामक्रोधमोहस्मृतिभ्रंशबुद्धिनाशसर्वनाशकारणत्वात् ।।४४।।

**अर्थ .**

( तो दु.संग ) काम, क्रोध, मोह, स्तृतिभ्रश, बुद्धिनाश, (किंबहुना) सर्व· नाशाला कारण असल्याने (टाकावा).

**विवरण**

मागील सूत्रात दुःसग हा सर्व प्रकारे त्याज्य आहे व तो दु संग अंतर व बाह्य असा दोन प्रकारचा आहे असे म्हटले होते. बाह्य संग जरी अनेक प्रकारचे आहेत तरी मुख्यत पंचविषय तसेच इंद्रियाना भुरळ पाडणारी अशी स्त्री व स्त्रैणसगती बाधक कशी आहे याचा विचार केला. ती का त्याज्य आहे याचे स्पष्ट कारण या सूत्रात नारद महर्षी सागतात की. ती जीवाच्या सर्वनाशास कारण आहे. जीवाचा नाश म्हणजे तो पुरुषार्थापासून--स्वोद्धारापासून--च्युत होणे, आत्यंतिक दु.ख अनुभवावे लागणे, इहपर सुखापासून दूर जाणे, दुर्गती प्राप्त होणे, नर्काला जावे लागणे इत्यादी. वास्तविक मनुष्यदेहातच जीव आपला उद्धार करून घेऊ शकतो, म्हणजे जन्ममरणात्मक ससार बंधनातून त्याची सुटका होऊ शकते. पण हा दुःसग त्यास पुन्हा ससारातच अडकवितो. या सर्वनाशाला तो कसा कारण होतो, कोणाच्या द्वारा होतो हे या सूत्रातून स्पष्ट सागितले आहे. जीव हा अनादि अविद्येच्या संस्काराने देहत्रयाशी तादात्म्य ठेवतो म्हणजे केवळ हा देह म्हणजेच मी असे समजतो. तसेच इंद्रिये अंत करण प्राणादिधर्माशी तादात्म्य ठेवतो त्या वेळी त्याचा सच्चिदानद स्वरूप असा आत्मभाव हा तिरोहित होतो. त्यामुळे तो बहिर्मुख होतो. म्हणजे पूर्वपूर्व संस्काराने त्यास इच्छावृत्ती निर्माण होते. तिलाच काम असे म्हणतात. विद्यारण्यस्वामीनी पंचदशीत हेच कामाचे लक्षण केले आहे.

अहंकारचिदात्मानौ एकीकृत्याविवेकत. ।
इदं मेस्यादिदं मे स्यादितीच्छाः कामशब्दितः ।। पंचदशी १

' देहाहंकार आणि चैतन्यरूप आत्मा या उभयतामधील भेद न कळणे हाच अविवेक; त्यामुळे तो आत्मा देहाशी ऐक्याला प्राप्त होतो व हे मला पाहिजे, हे मला मिळावे अशी जी इच्छा धारण करतो तिलाच काम म्हणावे.'

श्रीकृष्ण अर्जुनाला या कामादिकापासून जीवाचा कसा नाश होतो हे सातव्या अध्यायात सागतात.

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।**
**सर्व भूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप ।। गीता ७–२७**

'हे शत्रुतापना, इच्छा व द्वेष यापासून उत्पन्न झालेल्या द्वद्वरूपी मोहाच्या योगाने या सृष्टीमध्ये सर्व मानव जन्ममरण भोगतात.' या श्लोकावरील टीकेत श्रीज्ञानेश्वर महाराजानी रूपकद्वारा एक छोटीशी गोष्टच सागितली आहे

आता थोडी ऐसी। गोठी सागजेल परियेसी। जे अहंकार तनुसी। वालभ पडिले १६५ ।। तै इच्छा हे कुमारी झाली। मग ते कामाचिया तारुण्या आली। तेथ द्वेषेसी माडली। वराडिक ।। ६६ ।। तया दोघास्तव जन्मला। ऐसा द्वद्वमोह जाला। मग तो आजेयाने वाढविला। अहकारे ।। ६७ ।। तो धृतीसी सदा प्रतिकूळ। नियमाही नागवे सळु। आशारसे दोदिलु। जाला साता ।। ६८ ।। असंतुष्टीचिया मदिरा। मत्त होऊनि धनुर्धरा। विषयाचा वोवरा। विकृतीसी असे ।। ६९ ।। तेणे भावशुद्धीचिया वाटे। विखुरले विकल्पाचे काटे। मग चिरिले अव्हाटे। अप्रवृत्तीचे ।। ७० ।। तेणे भूते भाबावली। म्हणोनि संसाराचिया आडवा माजी पडिली। महादु.खाचा घेतली। दाडेवरी ।। ७१ ।।

अर्थ स्पष्ट आहे. श्रीभगवद्गीतेच्या तिसऱ्या अध्यायात या विषयाचा विस्तृत विचार आला आहे स्वधर्माचे महत्त्व श्रीकृष्णानी अर्जुनास पटवून दिले. स्वधर्मानेच सुख, स्वातत्र्य सर्व काही प्राप्त होते. अधर्म अथवा परधर्म हा जीवाच्या सर्वनाशास कारण होतो असे स्पष्ट सागितल्यावर अर्जुनाने प्रश्नच केला आहे की, देवा ! असा अधर्म (पाप) सर्वनाशास कारण आहे तर स्वत.ची इच्छा नसताही बलाने नियुक्त केल्याप्रमाणे हा पुरुष कोणाकडून प्रेरित होत्साता पापाचरण करतो व दु.ख भोगतो ?

या प्रश्नावर जे उत्तर श्रीकृष्णानी अर्जुनास दिले आहे ते महत्त्वाचे आहे. कित्येकाना असे वाटते की, ईश्वरच सर्व कर्माचा प्रेरक असल्याने ईश्वरप्रेरणेनेच पाप होते कित्येकाची अविवेकमूलक भावना अशी असते की अदृष्टाने पाप होते. ईश्वर जर पापप्रेरक होईल तर त्याचेवर विषमता व क्रूरता हे दोष येतील. ज्या ईश्वराच्या कृपेने जीव उद्धरून जातो तो ईश्वर जीवास पाप करावयास कसे लावील ? तसेच अदृष्टही पापास प्रेरक नाही. अदृष्ट हे भोगाला नियामक आहे. सुखदु.खादि भोग अदृष्टजन्य असतात. कर्म करण्यात जीव स्वतंत्र आहे. 'स्वतत्र: कर्ता' असे पाणिनीचे सूत्र आहे शुभसंस्काराने सद्बुद्धीचा जीव अंगीकार करतो तेव्हा त्याच्याकडून पुण्यकर्म होते व अशुभ संस्कार, दुर्बुद्धी व विकाराच्या स्वाधीन झालेला मानव पापकर्मात प्रवृत्त होतो म्हणून श्रीकृष्ण अर्जुनास सागतात,

**काम एष क्रोध एष रजोगुण समुद्भव. ।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ।। गीता ३–३७**

'श्रीकृष्ण म्हणतात, हा काम हा क्रोध आहे, रजोगुणापासून उत्पन्न झालेला हा आधाशी व महापापी आहे, या लोकी हा आपला वैरी आहे असे जाण.' या श्लोकावरील श्री ज्ञानेश्वर महाराजाची विस्तृत टीका फार मननीय आहे, त्या ओव्याचा भावार्थ खाली देत आहो

हे अर्जुना! जीवाला पाप करावयास लावून दु:खात ढकलणारे हे कामक्रोध आहेत असे समज. याचेजवळ दयेचा साठा मुळीच नाही. हे प्रत्यक्ष यमधर्म (काळ) आहेत. हे ज्ञानरूपी ठेव्यावर असलेले भुजंग आहेत. हे विषयदरीतील व्याघ्र आहेत हे भजनरूपी मार्गावर वाटमारेपणा करणारे आहेत. यांची मृत्यूच्या नगरात चांगली पत आहे कारण हे जीविताचे शत्रू आहेत याना भूक लागली असता खाण्यास हे जग एका घासासही पुरत नाही. सहज मुठीत धरण्यास जिला चौदा भुवनेही थोडी आहेत अशी भ्राती ती याची नव्या नवसाची बहीण आहे जी खेळत असता त्रैलोक्यरूप खाऊ सहज खाऊन टाकते, त्या भ्रातीच्या दासीपणाचे जोरावर ही तृष्णा जगली आहे या कामक्रोधाना मोहाचे घरी मान आहे आपल्या कौशल्याने जो सर्व जगास नाचवितो तो अहंकार या कामक्रोधापाशी देवघेव करतो. ज्याने सत्याच्या पोटी असलेला मालमसाला काढून त्याऐवजी असत्याचा पेंढा भरला असा जो दंभ तो या कामक्रोधानी जगात प्रसिद्धीस आणला. यानी पतिव्रता शाती तिला वस्त्रहीन केले, मग त्या वस्त्रानी मायारूपी मांगीण सजविली अशा या सजविलेल्या मायेकडून साधूचे समुदाय या कामक्रोधानी भ्रष्ट करविले. यांनी विवेकाचा आधारच नष्ट केला वैराग्याची तर कातडीच सोलून काढली व निग्रहाची जीवत-पणीच मान मुरगळून टाकली. या कामक्रोधानी संतोषरूप अरण्यच तोडून टाकले व धैर्यरूप किल्ले पाडले आणि आनंदरूपी रोपटे उपटून फेकून दिले. यानी बोधाची रोपेही उपटली, सुखाची तर भाषाही पुसून टाकली व हृदयात सर्वत्र त्रिविध तापाचे निखारे पसरले. हे पाण्यावाचून बुडविणारे, अग्निवाचून जाळणारे व न बोलता अकस्मात प्राणिमात्राना घेरणारे आहेत. अर्जुना! हे शस्त्राविना मारतात, दोरावाचून बाधतात आणि ज्ञान्याचाही प्रतिज्ञापूर्वक वध करतात.

(ज्ञानेश्वरी अ. ३ ओवी २४० ते ५८ भावार्थ.)

तसेच गीतेच्या सोळाव्या अध्यायाच्या शेवटी तर या कामक्रोधादिकाना नरकाचे द्वार म्हटले आहे

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मन:।**
**काम:क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत ।। गीता १६–२१**

'काम-क्रोध-लोभरूपी तीन प्रकारचे हे नरकाचे द्वार आहे व आत्म्याचा नाश करणारे आहे, म्हणून या तिघांचा त्याग करावा'

यावरील श्री ज्ञानेश्वर महाराजाच्या टीकेचा अभिप्राय पाहा. 'अर्जुना!

काम-क्रोध-लोभ या तिघांचे बंड जेथे माजले आहे तेथे पाप उत्पन्न झाले आहे असे समज. वाटेल त्यास आपली भेट होण्यास सुलभ जावे म्हणून सर्व दु:खांनी आपला मार्ग अचूक दाखविण्याकरता त्या कामक्रोधादिकांस वाटाडे म्हणून नेमून दिले आहे; अथवा पाप्याला नरकभोगात घालण्याकरता ही काम-क्रोध-लोभांची पातकांची पराक्रमी सभाच आहे. जोपर्यंत हे तीन विकार अंत:करणात उठले नाहीत तोपर्यंतच रौरवादिभयंकर नरक आहेत असे पुराणादिकातून ऐकले जाते. याच्या योगाने अपाय सोपे आहेत. यातना स्वस्त आहेत. हे तिघे म्हणजे मूर्तिमत हानीच आहे. या काम-क्रोध-लोभामध्ये जो उभा असतो तो नरकरूपी नगराच्या सभेमध्ये सन्मान पावतो.

(ज्ञानेश्वरी अ. १६ ओवी ४२५ ते ३१ भावार्थ)

श्री एकनाथ महाराजांनी स्वत: कामाच्याच मुखाने आपला पराक्रम वदविला आहे. नरनारायणापुढे काम बोलत आहे. ' मज कामाचे निघाये। ब्रह्मा कन्येसी धरू जाये। पराशरा केले काये। भोगिली पाहे दिवा दुर्गंधा ॥११७॥ ज्याते योगी वंदिती मुगुटी। तो तापसामाजी धूर्जटी। तो शिवू लागे मोहिनी पाठी। फिटोनी लंगोटी वीर्य द्रवले ॥११८॥ विष्णू वृंदेच्या स्मशानी। धरणे बैसे विषय ग्लानी। अहल्येची काहाणी। वेदी-पुराणी वर्णिजे ॥११९॥ नारदु नायके माझी गोठी। त्यासी जन्मले पुत्र साठी। माझी साहो शके काठी। ऐसा बळिया सृष्टी असेना ॥१२०॥ जो ब्रह्मचाऱ्यामाजी राजा। हनुमंत मिरवी पैजा। तयास्तव मकरध्वजा। संगेवीण वोजा जन्मविला म्या ॥१२१॥ कलंकिया केला चद्र। भगांकित केला इद्र। कपाटी घातला षण्मुख वीर। जो लाडका कुमर महेशाचा ॥१२२॥ मज मन्मथाचा यावा। न साहवे देवा दानवा। मा तेथ इतरा मानवा। कोण केवा सहावयासी॥' ए. भा. अ. ४– हा काम जसा घातक आहे तसाच क्रोधही आहे. काम अपूर्ण राहिला की त्याचे पर्यवसान क्रोध, द्वेष यात होते.' पसरिला अभिलाष। अपूर्ण होय तोचि द्वेष॥' ज्ञा.

श्री एकनाथ महाराज सागतात– ' तया अलब्ध कामासाठी। सर्वांगी क्रोधू उठी। जेवी परिपाकापाठी। धरी कडुवटी अंबिलकांजी ॥२८॥ क्रोध काळिया नाग खरा। देतु द्वेषाचा फुंकारा। घाली पूज्यतेच्या आकारा। धुधु:कारा साधु-निंदेचा ॥९९॥ (एकनाथी भा. अ. ५)

कित्येक ऋषी, मुनी, तपस्वी कामाच्या तावडीतून सुटले पण क्रोधात अडकले,

क्षुत्तृट् त्रिकाल गुण मारुत जैव्ह्य शैश्न्यानस्मानपारजालधीनतितीर्यु केचित्।
क्रोधस्य यान्ति विफलस्य वशं पदे गोर्मज्जन्ति दुश्चर तपश्च वृथोत्सृजन्ति ॥

भा. स्क. ११ अ. ४–११

' कित्येक तपस्वी भूक, तहान, ऊन, पाऊस थंडी, वारा इत्यादि सहन करून जिव्हा व विषयवासनांचा (कामाचा) प्रचंड सागर तरून जातात; परंतु क्रोधरूपी गायीच्या पावलाच्या ठशात साचलेल्या अल्प पाण्यात बुडून जातात व एवढी मोठी केलेली तपश्चर्या फुकट घालवितात. याकरिता कपिलऋषी, नारद, दुर्वास इत्यादिकांची उदाहरणे पुराणात प्रसिद्ध आहेत. ( ए. भा. अ. ४ ओवी १२८ ते १३४ पाहणे) सर्वच पारमार्थिक वाङ्मयातून कामक्रोधांची बाधकता अनेक प्रकारे प्रतिपादिली आहे. श्रीशंकराचार्य तर यम व काम यांची तुलना करून सांगतात की, कामापेक्षा यम बरा.

**यमस्य कामस्यच तारतम्यं विचार्यमाणे महदस्ति लोके ।**

**हितं करोत्यस्य यमोऽप्रियःसन् कामस्त्वनर्थं कुरुते प्रियःसन् ।**

यम व काम याचा विचार केला तर यम बरा म्हणावा लागतो. यम अप्रिय वाटतो पण तो मानवाचे हित करतो व काम हा प्रिय वाटतो पण फार अनार्थास कारण आहे. यम हा पापी माणसासच शिक्षा देतो पण काम हा सज्जनाच्याही गतीचा निरोध करणारा आहे. '

असे हे काम-क्रोध भक्तिमार्गातही प्रतिबध करणारे आहेत म्हणून त्यांचा संगही दुःसगच आहे. काम-क्रोधानंतर मोह म्हणजे अविवेक हा निर्माण होतो. योग्य-अयोग्य, ज्ञान-अज्ञान, पाप-पुण्य, सुख-दुःख, स्वपर, इहपर, आत्मा-अनात्मा, बंध-मोक्ष इत्यादिकातील भेद न कळणे हे मोहाचे लक्षण खाली दिले आहे. ' कर्माकर्म हिताहित । इष्टानिष्ट नाठवी चित्त । विवेकशून्यं स्तब्धता प्राप्त । मोह निश्चित या नाव ॥' ए. भा. २८–१८४

या अवस्थेत हिताहित काही कळत नाही. केवळ पिशाच्याप्रमाणे भ्रात होतो, व याच्या पुढची पायरी स्मृतिभ्रंश ही आहे. मनुष्याच्याजवळ असणारी स्मृतिशक्ती ही त्याला दु.ख, दैन्य, दोष, अपघात यांपासून वाचवीत असते. मागे एखादे वेळी एखादे अनिष्ट कृत्य आपल्या हातून झाले असेल व त्यापासून काही अनिष्ट भोगावे लागले असेल त्याची स्मृती अंत.करणात जागृत असेल तर ती स्मृती त्याला पुन्हा त्या अनिष्ट कृत्याकडे प्रवृत्त होऊ देणार नाही. किंवा ' स्मृती 'चा अर्थ भाष्यकार श्री जगद्गुरू शंकराचार्य यांनी असा केला आहे–

**शास्त्रचार्योपदेशाहित संस्कार जनितायाः स्मृतेः ।**

' शास्त्रगुरू याच्या उपदेशाने प्राप्त झालेले जे ज्ञानाचे सस्कार त्यांपासून झालेली त्या ज्ञानसाधनाची ' स्मृती ' मोहामुळे ती स्मृती भ्रष्ट होते. काम-क्रोधाच्या आधीन झालेल्या माणसास जरी काही पूर्वसंस्कार परमार्थाचे असले तरी

मोहाने ते झाकले जातात हा मोहाचा प्रभाव आहे. या स्मृतिभ्रंशाच्या पुढची पायरी ' बुद्धिनाश ' ही आहे. बुद्धिनाश म्हणजे दुसऱ्या अध्यायात गीतेमध्ये जी सद्बुद्धी म्हणून सागितली आहे किंवा गीतेच्या अठराव्या अध्यायात तीन प्रकारची सात्त्विक, राजस, तामस, अशी बुद्धी सागितली आहे त्यात ' प्रवृत्ती-निवृत्ती, कार्य-अकार्य, भय-अभय, बंध-मोक्ष यांना यथार्थ रूपाने जी जाणते ती सात्त्विक बुद्धी होय. ' असे श्रीकृष्णानी अर्जुनास सागितले आहे. अशी आपल्या हिताला जी बुद्धी जाणत नाही तोच तिचा नाश होय. कारण वर सागितलेली बुद्धी हीच मानवाना उद्धारास अनुकूल आहे, हिलाच सद्बुद्धी असे म्हणतात. अशा या बुद्धीचा नाश झाला म्हणजे पुढची पायरी सर्वनाशाचीच आहे असे नारद म्हणतात.

मनुष्याचे मनुष्यत्व तोपावेतोच समजले जाते की तो जोपावेतो कार्याकार्य, ज्ञानाज्ञान, बंधमोक्ष, संसारपरमार्थ याचा विचार करणाऱ्या बुद्धीने युक्त असतो. जर ती बुद्धी नष्ट झाली तर तो मानवाचा सर्वनाश होय. स्थूल देह मृत होणे हा नाश शास्त्रकार मानत नाहीत कारण प्रारब्धाने पुन्हा जन्म प्राप्त होतो. ' नात्मा-नमवसादयेत् ' या गीतेच्या सहाव्या अध्यायातील वचनाप्रमाणे आत्म्यास पुरुषार्थ अयोग्य बनविणे हाच आत्मनाश व हाच सर्वनाश मानला जातो कारण मानवदेह हा केवळ भगवत्प्राप्ती हे मुख्य ध्येय ठेवूनच निर्माण झाला आहे, हे सर्व पुराणांनी व संतानी स्पष्ट सागितले आहे; पण कामादी विकाराच्या दुस्संगामुळे तो वर सागितल्याप्रमाणे सर्वनाश ओढवून घेतो. नित्य, शुद्धबुद्धमुक्त अशा जीवात्म्याला या देहाच्या खोड्यात अडकून गर्भवास, जन्ममरण, त्रिविधताप, अनंत दुःखे भोगावी लागणे हाच महान नाश होय व या नाशास मुळ कारण दुस्संग होय. भगवान श्रीकृष्ण अर्जुनास जीवाच्या नाशाची हीच परंपरा सागत आहेत.

ध्यायतो विषयांपुन्सः संगस्तेषूपजायते ।
संगात्संजायते काम. कामात्क्रोधोऽभिजायते ॥६२॥
क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृति विभ्रम. ।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥६३॥ गी. २

' श्रीकृष्ण सागतात, अर्जुना, शब्दादी विषयविशेषाचे चितन केले असता त्याच्यापासून विषयाचा संग म्हणजे आसक्ती, प्रीती उत्पन्न होते व त्या संगापासून काम व कामापासून क्रोध निर्माण होतो, क्रोधापासून संमोह (मोह–अविवेक) व त्यापासून स्मृतिभ्रंश व त्यापासून बुद्धिनाश. आणि बुद्धनाशाने सर्वनाश होतो. ' यावरील श्री ज्ञानेश्वर महाराजांचे व्याख्यान पाहा. (ज्ञा. अ. २–३२१ ते २८)

' अंतःकरणात विषयांची नुसती आठवण असेल तरीही संग टाकलेल्यासही पुन्हा विषयासक्ती येऊन चिकटते व त्यामुळे विषयेच्छा प्रगट होते. जेथे काम उत्पन्न होतो तेथे क्रोधाने आपले बिऱ्हाड आधीच ठेवलेले असते, व जेथे क्रोध

आला तेथे कार्याकार्याविषयी अविचार ठेवलेला आहेच. ज्याप्रमाणे सोसाट्याच्या वाऱ्याने दिवा नाहीसा होतो त्याप्रमाणे संमोह प्रगट झाल्यावर स्मृती नाश पावते. किंवा सूर्य मावळायच्या वेळेला रात्र सूर्यतेजाला ज्याप्रमाणे गिळून टाकते त्याप्रमाणे स्मृतिभ्रंश झाला असता प्राण्याची दशा होते. मग सर्वत्र केवळ अज्ञानाचा अंधार होतो व त्याचेच आवरण सर्वांवर पडते, अशा वेळी हृदयात बुद्धी व्याकुळ होते. त्यामुळे जेवढे म्हणून ज्ञान आहे तेवढे समूळ नष्ट होते. प्राण निघून गेले असता शरीराची जशी दशा होते त्याप्रमाणे बुद्धीचा नाश झाला असता पुरुषाची स्थिती होते.' (ज्ञा. अ. २ श्लो. ६१–६२ वरील भावार्थ)

श्रीकृष्ण भगवान उद्धवास उपदेश करतेसमयी या विषयाचा विस्तृत विचार करून गेले आहेत.

विषयेषु गुणाध्यानात्पुंसः संगस्ततो भवेत् ।
संगात्संजायते कामः कामादेव कलिर्नृणाम् ॥१९॥
कलेर्दुर्विषहः क्रोधस्तमस्तमनुवर्तते ।
तमसा जायते पुंसश्चेतना व्यापिनी द्रुतम ॥२०॥
तया विरहितः माधो जन्तुः शून्याय कल्पते ।
ततोऽस्य स्वार्थ विभ्रंशो मूर्च्छितस्य मृतस्य च ॥२१॥ भागवत ११-२१

विषयाच्या ठिकाणी गुणबुद्धी ठेवून सतत त्याचेच चिंतन करीत राहिल्याने विषयाचे ठिकाणी आसक्ती उत्पन्न होते. त्यामुळे अभिलाष (काम) विषयानुराग होतो व त्या विषयभिलाषामुळे पुरुषामध्ये कली म्हणजे कलह उत्पन्न होतो. त्या कलहाचे पर्यवसान क्रोधात होते. त्यापासून मोह (सारासार विचार नष्ट होणे) होतो, त्यामुळे मनुष्याची सर्वव्यापिनी बुद्धी नष्ट होऊन जाते. अशी बुद्धी नष्ट झालेला जीव शून्यवत (असून नसल्यासारखा) होतो म्हणजे तो मूढ होऊन इहपर पुरुषार्थाला मुकतो, मृतवत होतो. त्यावरील श्री एकनाथ महाराजांचे व्याख्यान मननीय आहे.

विषयाचे गोडपण । सदाध्याय ज्याचे मन । त्यासी विषयासक्ती जाण। अतिगहन उल्हासे ॥२१३॥ विषयासक्तीचा संभ्रम । तेणे निर्लज्ज खवळे काम । कामास्तव अतिविषम । सोशी दुर्गम उपाय ॥२१४॥ विषयकामार्थ जे उपाय । त्यासी प्रतिपदी अपाय । जेव्हा विषयकाम सिद्धी न होय । तेव्हा महाकलह विवादु ॥२१५॥ जेथ अति जल्पाचा विवाद । तेथ खटाटोपेसी सन्नद्ध । खवळला उठी क्रोध । अतिविरुद्ध दुर्धर ॥२१६॥ क्रोध खवळल्या दारुण । बुद्धीचे तत्काळ नासे ज्ञान । तेव्हा विवेकाचे प्राशन । करी जाण महामोह ॥२१७॥ विवेकाचे लोपल्या भान । स्तब्ध चेतना होय जाण । तेव्हा कार्याकार्य आठवण । हेही स्मरण बुडाले ॥२१८॥ विवेक शून्यस्तब्धवत । तेथ विषयी ना परमार्थ । न कळे सन्मार्ग पंथ ।

आत्मघात पदोपदी ॥२१९॥ ए. भा. अ. २१

वास्तविक या विषयाचा एवढा विस्ताराने विचार करण्याचे कारण काय असे कोणास वाटेल पण हे विकार न कळत मनात शिरतात, वाढतात व परिणामी घातक होतात. म्हणून 'त्याज्य ते त्यागावया लागी। सागावे जरी अनुपयोगी ॥' असे श्री ज्ञानेश्वर महाराजानी म्हटले आहे. त्याचे जेवढे दोष विचाराने पटतील तसे त्याचा त्याग होणे सुलभ होईल. कारण श्री नारदांनी मागील सूत्रात 'दुःसंगः सर्वथैव त्याज्यः' असे म्हटले आहे. वैद्य औषध देण्यापूर्वी त्या व्याधीस प्रतिकूल जे पदार्थ आहारात असतील त्यांचा त्याग करण्याचे पथ्य स्पष्ट सागत असतो. तसेच प्रथमतः मनुष्य या भक्तिमार्गात प्रवेश करणे कठीण, केला तर त्यास त्या मार्गापासून परावृत करण्याकरिता हे विकार टपूनच असतात. अनेक साधकांचे आध्यात्मिक जीवन यानी उद्ध्वस्त केले आहे. म्हणून श्रीकृष्ण भगवान अर्जुनास या विषयात स्पष्टच सांगतात.

**एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नर.।**
**आचारत्यात्मनश्रेयस्ततो याति परां गतिम्** ॥ अ १६–२२

अर्जुना ! नरकाची द्वारे असलेल्या या (काम, क्रोध, लोभ) तिन्हीपासून जो मुक्त होतो तो आपल्या आत्म्याचे कल्याण करतो, नंतर तो श्रेष्ठ गती पावतो.' यावरील श्री ज्ञानेश्वर महाराजांचे व्याख्यान स्पष्ट आहे. 'म्हणौनि पुढत पुढती। हे कामादि दोष त्रिपुटी। त्यजावीच्चि गा वोखटी। आघवा विषी ॥४३२॥ धर्मादिका चौही आतु। पुरुषार्थाची तैंचि मातु। करावी जै सघातु। साडील हा ॥४३३॥ हे तीन्ही जीवि जागती। तववरी निकियाची प्राप्ती। हे माझे कान नाइकती। देवोही म्हणे ॥४३४॥ जया आपणपे पढिये। आत्मनाशा जो बिहे। तेणे धरावी सोये। सावध होईजे ॥४३५॥' आणखीही अनेक दृष्टान्ताच्या द्वारे या विषयाचा विचार केला आहे. ग्रंथविस्तार होईल म्हणून लिहिला नाही. वाचकांनी मुळात पाहणे योग्य आहे.

म्हणून श्री नारद या दोन सूत्रातून त्याचा त्याग व बाधकता सांगून गेले. पुढील पंचेचाळीसाव्या सूत्रात आणखी एका दृष्टीने या कामक्रोधादिकांची बाधकता दृष्टान्त द्वारा पटवून देतात.

## सूत्र ४५

# तरङ्गायिता अपीमे सङ्गात्समुद्रायन्ती ॥ ४५ ॥

**अर्थ :**

हे (कामक्रोधादि) आरंभी लहान तरंगाप्रमाणे भासत असले तरी (दुःसंगाने) समुद्राचा विशाल आकार धारण करतात.

**विवरण :**

प्रथम प्रथम मनुष्याला या विकारांची बाधा कळून येत नाही. कारण ते अगदी सूक्ष्म प्रमाणात असतात. पण जसा त्यांना विषयांचा संबंध होत जाईल तसे तसे ते समुद्राप्रमाणे वाढत जातात. अग्नीची ठिणगी लहान असली तरी ती अनुकूल पेटवण मिळाल्याबरोबर तो वाढायला वेळ लागत नाही. ज्ञानेश्वर महाराज सांगतात. 'देखे खेळता अग्नि लागला । मग तो न सावरे जैसा उधवला । तैसा इंद्रिया लळा दिधला । भला नोहे ॥'३–२०४ ॥

दुसरे उदाहरण त्यांनी विषाचे दिले आहे. विष अल्प प्रमाणात जरी पोटात गेले तरी ते प्राणाचा नाश करते. त्याप्रमाणे विषयाची शंका हीदेखील मनुष्याचा संपूर्ण विवेक नष्ट करते. ' जैसा का विषाचा लेशु । घेतलिया बहुवसु । मग निभ्रांत करी नाशु । जीवितासि ॥ ३१९ ॥ तैसी या विषयांची शंका । मनी वसती देखा । घात करी अशेखा । विवेक जाता ॥३२०॥' अ. ३

हे प्रथम तरंगासारखे लहान असतात हे सांगण्यात विकार हे आरंभी बाधक वाटत नाहीत, म्हणजे त्याचे दोष कळत नाहीत. हे सांगण्याचा हेतू आहे. तसेच त्याच्या आकर्षक गुणामुळे मनुष्य ओढला जातो. ' बापा विषाची मधुरता । झणे आवडी उपजे चित्ता । परि तो परिणाम विचारिता । प्राणु हरी ॥' ज्ञा. ३–॥२१२॥ असा प्रकार असतो. पारध्यांनी पसरलेले जाळे हरिणास प्रथम बाधक वाटत नाही पण परिणामी त्यातच त्याचा सर्वनाश असतो. जोपावेतो हे विकार तरंगासारखे अल्प परिमाणात असतात तोपावेतो त्यांतील दोषदर्शन न झाल्यामुळे त्यांचा त्याग शक्य असूनही केला जात नाही. मग एकदा का ते समुद्रासारखे विशाल व्यापक झाले की आवरले जाणे शक्य नाही. सागराचा दृष्टांत देण्यात त्याची भयानकता, विशालता दाखविणे हा उद्देश असावा. सागर तरून जाणे जसे कठीण तसेच हे कामक्रोधादि विकार तरून जाणेही कठीण आहे.

## सूत्र ४६

## कस्तरति कस्तरति मायाम् ? यः सङ्गान्स्त्यजति यो महानुभावं सेवते, निर्ममो भवति ।।४६।।

**अर्थ :**

(प्रश्न) मायेतून कोण तरून जातो ? कोण तरून जातो ?

(उत्तर) जो सर्व संगांचा त्याग करतो, जो महान (श्रेष्ठ) आहे अनुभव ज्यांचा अशा महात्म्या पुरुषांची सेवा करतो व जो निर्मम म्हणजे कोठेही माझे-पणाचा अभिमान ठेवीत नाही. (तो मायेतून तरून जातो.)

**विवरण :**

आतापावेतो मागील सूत्रातून दुःसग हा कसा बाधक आहे व कामादिकांच्या द्वारे सर्वनाशास कारण आहे हे सांगितले. पण या सर्व विकारांचा समूल नाश झाला पाहिजे. केवळ कामक्रोधादिकांचा नाश झाला पण त्यांचे मूळ जी माया ती राहिली तर तिच्यापासून पुन्हा सर्व संसार निर्माण होण्यास वेळ लागणार नाही. म्हणून माया-तरण झाले पाहिजे. ते कोण करू शकतो याचा विचार या सूत्रात केला आहे. प्रथम माया म्हणजे काय पाहिले पाहिजे. उपनिषदे, पुराणे, स्मृती, गीता व संत-वाङ्मयातून, तसेच शास्त्रकारांच्या दर्शन-ग्रंथातून मायेचा फार विचार केला आहे. माया शब्दाचे अनेक अर्थ कोशातून सापडतात.

**मायाविक्षिपदज्ञानमीशेच्छा वशवर्ति वा ।।**

विक्षेप, अज्ञान, ईशेच्छा इत्यादी रूपाने माया शब्द वापरला जातो. तसेच ऐंद्रजालाप्रमाणे अघटित घडवून आणणाऱ्या शक्तीसही माया म्हटले जाते. या मायेचीच अविद्या, प्रकृती, प्रधान, कल्पना, संसार, भ्रम इत्यादी नावे कार्याच्या सापेक्ष दिली आहेत. शुद्ध चैतन्याला जीवदशेत आणून संसारात अडकवणारी ती माया असे श्री ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितले आहे. 'तैसे भूतजात सर्व । हे माझेचि कीर अवयव । परि मायायोगे जीव । दशे आले ।।'७-६६।। मायेच्या दोन महत्त्वाच्या शक्ती आहेत. आवरण आणि विक्षेप. आवरणशक्तीने चैतन्याच्या विशेष स्वरूपास झाकून ती त्याला आपल्या स्वरूपाचा विसर पाडते हेच अज्ञान. 'आपुला आपण-पया । विसरू जो धनंजया । तेचि रूप यया । अज्ञानासी ।।' ज्ञा. १४-७१. तसेच ही माया आपल्या विक्षेपशक्तीने ब्रह्मांडस्वरूप सर्व सृष्टी उत्पन्न करते. तसेच जीवाला देहद्वयाचा अहंकार घ्यावयास लावून त्याच्या ठिकाणी कर्तृत्व भोक्तृत्वादी धर्मांचा तादात्म्य अध्यास निर्माण करते; असे वेदांतग्रंथांतून म्हटले आहे माया

ही भगवंताची सदसद्विलक्षण अशी अनिर्वचनीय शक्ती आहे. ' सत् म्हणो तरी तत्काळ नासे । असत् म्हणो तरी आभासे । जिणे नामरूपांचे पिसे । लाविले असे जगासी ।।१०३।। नातुडे संतासंत बोली । माया अनिर्वचनीय झाली । तिणे विद्या अविद्या इये पिली । पाढविली निजपक्षी ।।१०४।। ' एकनाथी भागवत अ. ११

जीवाला दु:ख शोकात्मक संसार भोगण्याचे कारण केवळ मायाच आहे असे श्री ज्ञानेश्वर महाराज सांगतात. ' दु:ख शोकाचिया घाई । मारिलिया सेचि नाही । हे सांगावया कारण काई । जे ग्रासिले माया ।।' ज्ञा. ७–१०७ भागवत एकादश स्कंधाच्या तिसऱ्या अध्यायात राजा विदेहाने नव योगेश्वरांस मायेबद्दल प्रश्न केला आहे. त्याच्या उत्तरात मायेचे फार विस्तृत वर्णन अनेक श्लोकातून केले आहे.

माया म्हणवी येणे भावे । जे मी कदा विद्यमान नव्हे । यालागी अविद्या येणे नावे । वेदानुभवे गर्जती शास्त्रे ।।४१।। भ्रम तो मायेचे निजमूळ । भ्रांति हेचि फूल सोज्वळ । गुली ते इचे साजुक फळ । विषय रसाळ सदाफळित ।।४२।। हे नसतेचि रूपे रूपा आली। सत्यासत्ये गरोदर झाली । तेथे असत्याची पिली । स्वये व्याली असंख्य ।।४३।। वासना विषयगुणी । गुंफिली मिरवे लेणी । मीपणाच्या तरुणपणी । मदन मोहिनी चमके ।।४४।। अहं मोह ममता योगे । जग विस्तारले अंगे । स्थूळ सबळ प्रयोगे । ममता निज अंगे वाढवी ।।४५।। संकल्प विकल्पाची काकणे । बाणोनि मन दिधले आंदणे । घालोनि त्रिगुणाचे ठाणे । माया पूर्णपणे थोरावे ।।४६।। एकनाथी भागवत अ. ३

आणखीही पुष्कळ वर्णन विस्तारपूर्वक केले आहे दुसऱ्या अध्यायात मायेचे स्वरूप नवयोगेश्वर सागतात, ' अज्ञानाचे मूळ माया । जे ब्रह्मादिकांनये आया । गुणमयी लागली प्राणिया । जाण ते राया अतिदुस्तर ।।४५९।। त्या मायेचे मुख्य लक्षण । स्वस्वरूपाचे आवरण । द्वैताचे जे स्फुरे स्फुरण । मूळ माया जाण तिचे नाव ।।४६०।। ते मायेच्या निजपोटी । भयशोक दु:खांचिया कोटी । ब्रह्माशिवादीचे लागे पाठी । इतराची गोठी ते कोण ।।४६१।।' एकनाथी भागवत २.

सूत्रात ' तरति ' हे क्रियापद घेतले आहे ते महत्त्वाचे आहे. तरणे ही क्रिया एखाद्या मोठ्या नदीतून पोहून पलीकडे जाणे, तिचे अतिक्रमण करणे या अर्थी होत असते. गीतेमध्येही सातव्या अध्यायात ' मायामेतां तरन्ति ते ' असे म्हटले आहे. पोहणे ही क्रिया एखाद्या नदीतून, सामान्य जलाशय, तळे, विहीर, इत्यादिकांतून होत असते. ती अल्पकाळ श्रमपरिहाराकरिता होते. पण पोहणे व तरणे यांत अंतर मानावे लागते. जलाशय, तळे, विहीर इत्यादिकांत पोहणारा जेथे पोहण्यास प्रारंभ करतो तेथेच परत येतो. पण तरून जाणे म्हणजे एका तीराहून निघून मधला पाण्याचा भाग ओलांडून परतीराला जाणे. याकरिता महानदी किंवा समुद्रच घ्यावा लागतो. म्हणून अनेक ग्रंथांतून या मायेलाच मायानदी भवसागर असे म्हटले

आहे. श्रीकृष्ण भगवंतांनी अर्जुनाला या मायेचे स्वरूप स्पष्ट सांगितले आहे.

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरन्ति ते ।। गीता ७–१४**

श्रीकृष्ण म्हणतात, 'ही माझी त्रिगुणात्मिका दैवी माया तरून जाण्यास दुस्तर आहे. जे मलाच शरण येतात ते ही माया तरून जातात.'

या श्लोकातील 'तरन्ति' या पदाचे महत्त्व पटवून देण्याकरिता श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी या मायेवर नदीचे सांग असे रूपक विस्तारपूर्वक सांगितले आहे. त्या सर्व ओव्या महत्त्वाच्या आहेत. त्याचा भावार्थ खाली दिला आहे.

'जी मायानदी ब्रह्मरूपी पर्वताच्या तुटलेल्या कड्यातून मूळ संकल्परूपी उसळीने निघाल्याबरोबर तिच्यात पंचमहाभुताचा लहान बुडबुडा उत्पन्न झाला, जी सृष्टीच्या विस्ताररूपी ओघाने काळाच्या ग्रास करण्याच्या शक्तिरूप वेगाने वाढून प्रवृत्ती व निवृत्ती या दोन्ही उच काठाबाहेर वाहते, जी गुणरूपी मेघाचा जोरदार वर्षाव झाल्याने मोहरूपी महापुराने भरून यमनियमरूपी गावे वाहून नेते, जी द्वेषरूपी भोवऱ्याने दाट भरली आहे व मत्सररूपी वळणे जिला पडली आहेत व जिच्यामध्ये प्रमदादी मोठे मासे चमकत आहेत, ज्या मायानदीत प्रपंचरूपी वळण आहेत व जिला कर्माकर्मरूपी पूर येत आहे आणि सुख-दुःखरूपी पुराड जिच्यावर तरत आहे, रतीच्या बेटावर जिच्या कामरूपी लाटा आदळतात, व जेथे जीवरूपी फेसाचा समुदाय एकसारखा दिसतो, जिच्यात अहंकाराच्या मोठ्या धारा आहेत, त्यावर विद्या, धन व कुल या तीन मदाच्या उकळ्या येतात व ज्या नदीमध्ये विषयरूपी लाटांवर लाटा उसळतात, जिच्यात उदयअस्तांचे लोंढे जन्म-मृत्युरूप खळगे पाडतात व तेथे पंचमहाभूतांपासून झालेले शरीररूपी बुडबुडे होतात व जातात. अविवेक व गोंधळ हेच कोणी मासे ते सात्विक धैर्यरूपी आमिष गिळतात व ज्या नदीत अज्ञानाचे भोवरे वक्रगतीने फिरतात, जिच्यात भ्रांतीच्या गढूळपणाने आशारूपी गाळात प्राणी फसले व रजोगुणाच्या खळबळीने स्वर्ग गाजू लागला, अशा या मायानदीत तमोगुणाची एक मोठी धार असते. सत्त्वगुणाचा स्थिरपणा गंभीर असतो. फार काय सांगावे, ही महानदी तरून जाण्यास फार कठीण आहे. जिच्या पुनर्जन्मरूपी लाटांची उसळी सत्यलोकाच्या बुरुजावर जाऊन आदळते व पुनरा-वृत्तीच्या आघाताने ब्रह्मांडाचे धोंडे कोसळून पडतात त्या पाण्याच्या वेगाने वाहत असलेला जोराचा पूर अद्याप थांबत नाही असा हा मायानदीचा पूर कोण तरून जाईल ?' एवढे वर्णन केल्यावर श्रीकृष्ण सांगतात, अर्जुना या मायानदीसंधाने एक आश्चर्य आहे. 'येथ एक नवलावो। जो जो कीजे तरणोपावो। तो तो अपावो। होय ते ऐक ।।'

ज्ञा. ७–६९–८२

असेच या मायेवर भवसागराचे विस्तृत रूपक एकनाथ महाराजांनी केले आहे ते अवश्य विचार करण्यासारखे आहे. वसुदेव नारदाला म्हणतात, 'मायाजळे भवसागरू। भरला असे अति दुस्तरू। त्याचा उतरावया पैलपारू। होय तू तारू मुनिराया ।। ९२ ।। याचे सकळ जळ क्षार। माजी सावजे अनिवार। एकेएके चराचर। गिळिले साचार निजशक्ती ।। ९३ ।। लाटांवरी अचाट लाटा। मोहाचिया अतिदुर्घटा। आदळती अविवेक तटा। धैर्याचिया काठा पाडित ।। ९४ ।। अहंकुवावो वाजता थोरू। अवघाचि खवळे सागरू। मी माझेनि गजरे घोरू। अतिदुर्धरू गर्जत ।। ९५ ।। नाना वासनांचा वळसा ।। पाहेपा भवताहे कैसा। येथ तरावया धिवसा। नव्हे सहसा सुरवरा ।। ९६ ।। क्रोधाचे प्रबळ भरते। भरी द्वेषाचिया तरियाते। असूया तिरस्कारांची तेथे। चिडाणी उते अनिवार ।। ९७ ।। काम पर्वताची शिखरे। विषमे भासती अपारे। आशे इच्छेची वरी थोरे। झाडे विषांकुरे वाढली ।। ९८ ।। संकल्प विकल्पांचे मीन। निंदेच्या सुसरी दारुण। ब्रह्मद्वेषाचे नक्रपूर्ण। सागरी जाण तळपती ।। ९९।। एकनाथी भागवत २.

वरील ओव्यांवरून मायेची विशालता, भयानकता कळून येईल. अशा या मायेतून तरून जाणे सोपे नाही. यालाच संसारसिंधू म्हटले आहे. तुकाराम महाराज म्हणतात, 'संसारसिंधु हा दुस्तर। नुल्लंघवे उल्लंघिता पार। बहुत वाहाविले दूर। नलगेचि तीर पैलथडी ।। १ ।।' 'करिता विचार। तव हा दृढ संसार। ब्रह्मादिका पार नुल्लंघवे सामर्थ्ये ।'तुकाराम ।। अशी पुष्कळ प्रमाणे आहेत. मायेतून तरणे म्हणजेच मोक्ष, कैवल्य, निर्वाण, ब्रह्मप्राप्ती, बंधनाश, शोकतरण, मृत्यूल्लंघन, हृदय ग्रंथिभेद, संशयछेद, कर्मक्षय इत्यादी होय. सूत्राच्या आरंभी प्रश्नाच्या भाषेत श्रीनारद विचारतात, मायेतून कोण तरून जातो. याचे उत्तरही पुढील पन्नासाव्या सूत्रापावेतो दिले आहे.

एकूणपन्नासाव्या सूत्राच्या शेवटी 'केवलं अविच्छिन्नानुरागं लभते' असे वाक्य आहे ते महत्त्वाचे आहे. मायेतून तरून जाण्याचे मुख्य साधन भक्तिप्रेम हेच आहे, याच भक्तीने भगवान प्रसन्न होऊन आपल्या भक्ताला आपण स्वतः तारून नेतो अशी त्याची, 'मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरन्ति ते ।।' गी. ७. 'तेषामहं समृद्धर्ता मृत्युसंसार सागरात् ।' अनेक प्रतिज्ञा वाक्ये आहेत. त्या भक्तियोगाची पार्श्वभूमी तयार होण्याकरिता आणखीही काही साधने चार सूत्रांतून सांगितली आहेत. त्यात पहिले साधन, 'यः सङ्गान्स्त्यजति ।' जो सर्व संगाचा त्याग करतो हे आहे. संग, संबंध, उपाधी हे एकच. आपल्याहून स्वरूपाने भिन्न असून, प्रतिकूल असून, भिन्न व प्रतिकूल न वाटणारा असा जो विषय त्यालाच संग, संबंध अथवा उपाधी म्हणतात. त्या उपाधितादात्म्यामुळे, आसक्तीमुळे जीव हा तेथे अहंकार व

ममत्व ठेवतो आणि त्यात अडकून पूर्णपणे बांधला जातो. हाच संसार होय.

अंतरंग व बाहिरंग असे संगाचे दोन प्रकार आहेत. बहिरंग स्त्री, पुत्र, वित्त, गृहक्षेत्रादी व अंतरंग काम-क्रोध, लोभ अहंकारादि हे दोन्हीही जीवाला परमात्म्या कडे जाऊ देत नाहीत. वास्तविक वर पुत्र, वित्त, कलत्रादी विषय बहिरंग म्हटले आहेत. जोपावेतो देह आहे तोपावेतो यांचाही संबंध राहील, मग त्याग कसा होणार? येथे सपूर्ण विषयांचा त्याग हा अर्थ अभिप्रेत नाही. कारण स्वरूपाने ते बाधक नाहीत. बाधक अंश संग म्हणजे आसक्ती, अभिनिवेश, अहंत्व, ममत्व, प्रियत्वबुद्धी होय तीच साधकाला घातक असते, त्या आसक्तीचा त्याग म्हणजेच संगत्याग होय पण या विषयांच्या ठिकाणी अनेक जन्माचा सबंध असल्यामुळे नित्यत्व बुद्धी, सुखरूपतेची बुद्धी, अनुकूल बुद्धी असते. केवळ मनच काय पण अंतःकरणचतुष्टय सर्व त्या विषयात रंगून जाते. असा हा संग दृढ झालेला आहे.

असे जरी आहे तरी जेव्हा अंतःकरणात विवेक निर्माण होतो तेव्हा अंतः-करण, बुद्धी, विषय यांचे अनित्यत्व पटते व एक वेळा अनित्यत्व, अनात्मत्व पटले म्हणजे तो साधक पुन्हा त्यात अडकला जात नाही. तो विवेक महात्म्यांच्या कृपे-विना प्राप्त होऊ शकत नाही. ' चंद्र तेथे चंद्रिका । शंभू तेथे अंबिका । संत तेथे विवेका । असणे की जी ॥' ज्ञा. १८ असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. म्हणून याच सूत्रात ' यो महानुभावं सेवते ' असे नारद सांगतात.

येथे ' संगान्स्त्यजति ' असे बहुवचन आहे.

संगाचे अंतरंग व बहिरंग असे दोन प्रकार वर सांगितले आहेत. बाह्यसंग काही अवांतर कारणाने म्हणजे दोषदृष्टीने सुटू शकतील पण फार बाधक असणारे अंतरसंग हे विना विवेक ज्ञानाच्या टाकले जाणार नाहीत. याकरिता ' यो महा-नुभावं सेवते ' हे वाक्य सूत्रात आले आहे. येथे ' महानुभाव ' हा शब्द महत्त्वाचा आहे. मागे अडतीस व एकूणचाळिसाव्या सूत्रात ' महत् ' पद संतांच्याकरिता वापरले आहे. त्यांनाच येथे महानुभाव असे म्हटले आहे. महान म्हणजे मोठा आहे अनुभव ज्यांना, त्यांना महानुभाव म्हणावे. अनुभव हा एक जीवनाचा स्थायीभाव आहे. जीवनातून अनुभव वगळता येणार नाही. जीवन हे अनुभवस्वरूप असते. अनुभव हा एक ज्ञानाचा प्रकार आहे. मुख्य ज्ञानाचे दोन प्रकार वेदान्तशास्त्रात सांगितले आहेत. स्मृती आणि अनुभव. प्रमाणापासून झालेल्या ज्ञानास अनुभव म्हणतात व अनुभवापासून जे संस्कार होतात त्या संस्कारांपासून जे ज्ञान होते ते स्मृतिज्ञान होय.

अनुभवातही यथार्थ-अयथार्थ, प्रमा अप्रमा (भ्रम) असे प्रकार आहेत. योग्य प्रमाणाने योग्य विषयाचे जे यथार्थ ज्ञान होते त्यास प्रमा म्हणजे यथार्थ ज्ञान

म्हटले जाते जेव्हा प्रमाणात दोष शिरतो, विषय अयोग्य असतो म्हणजे बाधित असतो. त्याचे जे ज्ञान ते अप्रमा (भ्रम) म्हटले जाते. दोरीवर जर एखाद्याला सर्पज्ञान झाले तर तो भ्रम होय. कारण तो दोरीच्या अज्ञानाने इंद्रियदोषादिकांमुळे झालेला असतो व कालांतराने राहत नाही म्हणजे सर्पभ्रम बाधित होतो. म्हणून तो अनुभवही बाधित, अप्रमा, भ्रम म्हटला जातो. संसारात काही अनुभव प्रमाणभूत म्हणजे खरे असतात व काही अनुभव अप्रमा म्हणजे भ्रमरूप असतात, निष्फल नव्हे बाधक असतात. अनेक विषयांचा अनुभव मनुष्य घेत असतो पण तो टिकत नाही. सुखप्रद होत नाही. तसेच विषय कार्य असल्यामुळे अल्प आहेत. 'यदल्पंतन्मर्त्यं' जे अल्प ते मर्त्य म्हणजे विनाशी असते असा उपनिषदाचा सिद्धान्त आहे. सामान्यच काय पण इंद्रादिक देवांच्या स्वर्गीय अलौकिक अनुभवालाही तुच्छता आहे. तेही अनुभव घेणारे महान म्हटले जात नाहीत महान अनुभव म्हणजे ज्या अनुभवाचा विषय मोठा, प्रमाण निर्दोष व अनुभव घेणारा अधिकारी योग्य तो महान एक परमात्माच आहे. याचा विचार मागे आला आहे त्याचा प्रत्यक्ष तादात्म्याने अनुभव भक्तांना येत असतो.

श्रीज्ञानेश्वर महाराजानी नवव्या अध्यायावरील टीकेत महानुभाव या पदाचे विस्तृत व्याख्यान केले आहे. ते म्हणतात—

जयांचिये चोखटे मानसी। मी होऊनी असे क्षेत्रसंन्यासी। जयां निजेलियातें उपासी। वैराग्य गा ॥१८८॥ जयाच्या आस्थेचिया सद्‌भावा। आंत धर्म करी राणिवा। जयाचे मन वोलावा। विवेकासी ॥१८९॥ जे ज्ञानगंगे नाहाले। पूर्णता जेऊनि धाले। जे शांतीसी झाले। पल्लव नवे ॥१९०॥ जे परिणामा निघाले कोंभ। जे धैर्य मंडपाचे स्तंभ। जे आनंद समुद्री कुंभ। चुबकळोनि भरिले ॥१९१॥ जया भक्तीची येतुली प्राप्ती। जे कैवल्याते परते सर म्हणती। जयांचिये लीलेमाजी नीती। जियाली दिसे ॥१९२॥ जे आघवाचि करणी। लेइले शांतीची लेणी। जयांचे चित्त गवसणी। व्यापका मज ॥१९३॥ ऐसे जे महानुभाव। जे दैविये प्रकृतीचे दैव। जे जाणोनिया सर्व। स्वरूप माझे ॥१९४॥ ज्ञा. ९

तसेच गीतेच्या सातव्या अध्यायामध्येही श्रीकृष्ण सांगतात—

हे समस्तही श्रीवासुदेवो। ऐसा प्रतीति रसाचा वोतला भावो।
म्हणोनि भक्तामाजी रावो। ज्ञानिया तोचि ॥ ज्ञा. ७–१३६॥

वरील लक्षणाने युक्त पुरुषालाच 'महानुभाव' म्हटले जाते. या श्रेष्ठ लक्षणावरच संत, साधू, महात्मा यांचे महत्त्व अवलंबून आहे. अशा महानुभवी संत सत्पुरुषांची सेवा ही साधक भक्ताला मायानदीतून तारून नेणारी आहे. भगवान श्रीकृष्णांनी उद्धवास उपदेश करते वेळी याच रूपकाने सांगितले आहे—

निमज्ज्योन्मज्जतां घोरे भवाब्धौ परमायनम्।
सन्तो ब्रह्मविदः शन्तानौर्दृढेवाप्सुमज्जताम् ।। भा. ११, २६, ३२.

जलात बुडणाऱ्यांना जशी बळकट नौका तारून नेते त्याप्रमाणे या घोर संसारात गटंगळ्या खाणाऱ्या जीवास शांत चित्त असलेले ब्रह्मवेत्ते संतच या संसारसागरांतून तरून जाण्याला मोठा आधार असतात. या श्लोकावरील श्री एकनाथ महाराजांचे व्याख्यान पाहा.

प्रतिक्षणी अधिक वृद्धी । अमर्याद वाढे भवाब्धी । तेथ उबकल्या चुबकल्या त्रिशुद्धी । अधर्म बुद्धी जनासी ।।४१९।। अधर्मे निमज्जन नरकात । स्वधर्मे उन्मज्जन स्वर्गात । ऐसे भोगिती आवर्त । स्वर्ग नरकात संसारी ।।४२०।। या परी संसारी जन । पावता उन्मज्जन निमज्जन । त्यासी तरावया भवाब्धि जाण । साधु सज्जन दृढ नाव ।।४२१।। पडल्या जळार्णवा माझारी । जेवी अच्छिद्र नाव तारी । तेवी बुडता भवसागरी । सुखरूप तारी सज्जन नाव ।।४१२।। कामक्रोधरहित शांती । हेचि नावेची अच्छिद्र स्थिती । ब्रह्मज्ञाने सपुरती । सुखरूप निश्चिती या हेतू ।।४२३।। नवल ये नावेची स्थिती । जुनी नव्हे कल्पांती । बुडऊ नेणे धारावर्ती। तारक निश्चिती उद्धवा ।।४२४।। परी ये नावेची नवल गती । वरी चढले ते बुडती। तळी राहिले ते तरती । जाण निश्चिती उद्धवा ।।४२५।। ए. भा. २६.

गीतेच्या सातव्या अध्यायात माया-तरणोपाय सांगताना श्री ज्ञानेश्वर महाराज हेच सांगतात. 'जया सद्गुरू तारू पुढे । जे अनुभवाचिये कासे गाढे । आत्मनिवेदन तरांडे । आकळले ।।' ज्ञा. ७–९८

संत, सद्गुरू हे एका अर्थीच शब्द आहेत. संत हे गुरूच असतात. लघु नसतात व गुरू हेही संतच असतात, असंत नसतात. असो. अशा संतांची सेवा करून त्यांच्या कृपेनेच जीव या माया नदीतून तरून जातो. श्रीकृष्ण भगवान हेच सांगतात 'तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया' गीता ४–३४।। 'ते ज्ञान श्रीसद्गुरूंना प्रणिपात करणे, प्रश्न करणे व सेवा करणे या प्रकारानेच प्राप्त होते 'ते ज्ञान पैगा बरवे । जरी मनी आथि आणावे । तरी संता या भजावे । सर्वस्वेशी ।।१६५।। जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारवंठा । तो स्वाधीन करी सुभटा । वोळगोनी ।।१६६।। तरी तनुमनु जीवे । चरणासी लागावे । आणि अगर्वता करावे । दास्य सकळ ।।१६७।।' ज्ञा. ४

संत सद्गुरू सेवेचा पूर्ण प्रकार श्री ज्ञानेश्वर महाराजांनी तेराव्या अध्यायातील 'आचार्योपासनं' या पदावरील टीकेत फार विस्तृत रूपाने सांगितला आहे तो फार महत्त्वाचा आहे. पण विस्तारभयास्तव लिहिला नाही. जिज्ञासूंनी तो मुळात अवश्य पाहावा.

भवतरावया उत्तम हे नाव । भिजो नेदी पाव हात काही ।। असे संतवर्ण-

नात्मक अभंगात तुकाराम महाराज म्हणतात. अशा रीतीने माया नदीतून तरून गेलेला पुरुष श्री नारद म्हणतात. ' निर्मम ' होतो किंवा मागील साधनातच या निर्ममत्वाचाही अंतर्भाव करावा. अनादि अज्ञानजन्य देहतादात्म्यामुळे या देहालाच जीव अहं (मी) म्हणतो, ' तै अज्ञान एक रूढे । तेणे कोहं विकल्पाचे मांडे । मग विवरूनि की जे पुडे । देहो मी ऐसे ।।' ज्ञा. ५–३४२

एकदा देहाला मी म्हटले की, देहसंबंधी जे जे जड, चेतन, स्थूल, सूक्ष्म पदार्थ असतील त्याना माझे म्हणणे अपरिहार्य होते. ' हा जनकु हे माता । हा मी गौर हीन पुरता । पुत्र वित्त कांता । माझे हे ना ।।४९२।।' ज्ञा. अ. १५. अहं (मी) प्रत्ययाचा विषय आत्मा आहे. देह हा त्या प्रत्यगात्म्याहून भिन्न भूतकार्य, संघातरूप असा ' हा ' परोक्ष अनुभवाचा विषय आहे हे शास्त्रातून व अनुभवांनी सहज पटण्यासारखे आहे. तसेच या अह व मम भावनेत व्याभिचारही आहे. बहुतेक लोक माझा देह अशी देहाच्या ठिकाणी ममत्वभावना ठेवतात पण देहधर्म जे स्थूळ, कृश, काळा, गोरा इ. आहेत तेथे मात्र मी स्थूळ, कृश, गौर, शाम असा अहंत्वधर्म ठेवतात. तसेच इंद्रियाच्याही विषयात असते. डोळा, कान, हात, पाय यांना माझे म्हणतो पण त्याचे जे आंधळा, बहिरा इ. धर्म आहेत तेथे मीपणा वागवला जातो. वास्तविक देह धर्मी असून तो अह प्रत्ययाचा मीपणाचा विषय होणे योग्य आहे, पण होत नाही. याचे कारण वेदान्तशास्त्रात अध्यास हा पूर्वसंस्कारानुसार होत असतो असे सांगितले आहे. अनादि कालापासून असेच संस्कार आहेत म्हणून ते भ्रमाने होणारे तादात्म्यही तसेच असते. अशा या देहाला मी म्हणणे हाच भ्रम आहे. निर्मम होण्याकरिता अगोदर ' अहं ' गेला पाहिजे.

जोपावेतो तो ' मी ' देहात आहे तोपावेतो देहसंबंधी जे सचेतन अचेतन विषय आहेत त्याच्या ठिकाणी ममत्व (माझेपणा) राहणारच. ' अहं मम ' या दोन रुळावरूनच संसाराची गाडी जात असते. ' देही धरिता देहाभिमान । ते अहंता वाढवी मीपणा । मीपणे ममता जाण । वाढे संपूर्ण देह संबंधे ।।३२९।। जे वाढली अहं ममता । ते वर्तवी महादुःखवार्ता ।।' एकनाथी भा. अ. २६ सर्व संसारदुःखे केवळ ' अहं ' (मी) मध्ये नसतात तर ममतेमुळेच होतात. ' देह बुद्धीचिया नरा । थोर चिंतेचा अडदरा । संकल्प-विकल्पाचा मारा । ममता द्वारा अनिवार ।।' एकनाथ भा. २–२८८. अनादिकालीन दृढ संस्कारामुळे ही ममता नष्ट होणे फार कठीण आहे.

भागवतामध्ये भरतराजाचे चरित्र प्रसिद्ध आहे. तो सर्वसंगपरित्याग करून अरण्यात तपश्चर्येकरिता राहिला असता एका हरिणबालकावरच स्नेह जडला, ममता जडली, त्याचा परिणाम त्याला तो हरिणजन्म घ्यावा लागला. ममता जडली मृगापाशी। मृग वना गेला. स्वइच्छेसी । त्याचा खेदु करिता भरतासी । काळ

आकर्षी देहाते ॥१५९॥ या लागी साचचि जाण। ममतेपाशी असे मरण। जो निर्मम संपूर्ण ।त्यासी जन्ममरण स्पर्शेना ॥१६०॥' ए. भा. अ. २. वास्तविक जीव ज्याच्या ठिकाणी ममत्व ठेवतो म्हणजे ज्याना ज्याना म्हणून माझे म्हणतो ते खरे याचे नसतातच तेही परतंत्र व आपलाच स्वार्थ पाहणारे असतात, हे सर्वानाच ठाऊक आहे म्हणून विवेकी भक्त ममत्व धर्म व त्याचे आश्रय जे जे काही पदार्थ आहेत हे क्षण विनाशी तुच्छ आहेत असे जाणून देहाहंता व ममत्व याचा त्याग करतो.

तो समजतो हे कोणी माझे नाहीत, हा देह जर मी अथवा माझा होण्यास योग्य नाही तर मग देहसबंधी कोण माझे राहतील ? असा भक्त ममतेचा केवळ त्याग करतो इतकेच नव्हे तर ' निर्मम ' होतो असे नारद म्हणतात स्थूलरूपाने वर वर त्याग केला तरी मनात सूक्ष्मवासना, ममत्व राहतेच. निर्मम म्हणजे कोठेही ममत्वभाव निर्माणच न होणे हे आहे. या वाक्याच्या मागे ' यो महानुभावं सेवते ' असे आहे, ज्या महात्म्याची हा भक्त सेवा करतो ते निर्ममच झालेले असतात. व यालाही निर्मम बनवितात. जेथे जेथे तुझे ममत्व जाईल ते ते पदार्थ ममत्वास कसे अयोग्य आहेत हे पटवून देतात. त्यांनी सागितलेल्या विवेकाने हाही निर्मम होतो श्री एकनाथ महाराज सागतात–

गुरुकृपा झालिया पूर्ण । माझ्या देहीचे जे मीपण । ते उकलोनिया दाविता जाण । जग संपूर्ण मी एक ॥३३१॥ ऐसे माझे मीपण पाहता । समूळ हरपली ममता । हे माझे म्हणावया पुरता । ठाव रिता नुरेचि ॥३३४॥ तेथ मीपणेसी मी माझे । नुरेचि तूपणेसी तुझे । ऐसे परब्रह्माचेनि निजे । झाले सहजे निर्मम ॥३६॥' ए भा २६ श्रीकृष्णानी अर्जुनास बाराव्या अध्यायात जी महत्त्वाची भक्तलक्षणे सागितली आहेत त्यात, 'निर्ममो निरहकार. समदुःखसुख. क्षमी ॥१३॥' असे म्हटले आहे 'निरहंकार आणि निर्मम ' तो भक्त होय ' आणि मी हे भाष नेणे । माझे काहीचि न म्हणे ॥' ज्ञा. १२–१४९.

श्रीज्ञानेश्वर महाराजाचे निर्ममत्वाचे व्याख्यान पाहा. 'हे ना तो भलतेणे व्याजे । तो जयाते म्हणे माझे । ते नोडवेचि का दुजे । अद्वितीय जाला ॥१०७४॥ पै आपुलिया एकी सत्ता । सर्वही कवळुनिया पंडुसुता । कही न लगती ममता । धाडिली जेणे ॥१०७५॥' ज्ञा. १८. ही ' निर्मम ' (माझेपणारहित) होण्याची परिसीमा आहे. असा जो निर्मम होतो तोच मायेतून तरून जाऊ शकतो, यावरून ममत्व असणे हे मायानदीत बुडणेच आहे हे सहज सिद्ध होते. यासच संसार बंधही म्हणतात. ' अहं ममेत्ययं बंधः नाहं ममेति मुक्तता ।' देहादि मी आहे व देहसबंधी जे ते सर्व माझे आहेत असे वाटणे हाच बंध व कोणी माझे नाही व मी देहादिक संघात नाही, अशी यथार्थ समजूत असणे हाच मोक्ष. या अवस्थेलाच मायातरण म्हणतात. जो संगत्याग करतो, संतसेवा करून निर्मम होतो तोच या मायेतून योग्य प्रकारे तरून जातो.

## सूत्र ४७

## यो विविक्तस्थानं सेवते, यो लोकबन्धमुन्मूलयति, निस्त्रैगुण्यो भवति, योगक्षेमं त्यजति ॥ ४७ ॥

**अर्थ .**

जो एकातवासाचे सेवन करतो, लौकिक बन्धन तोडून टाकतो, जो तीन गुणांनी रहित होतो, आणि जो योग व क्षेमाचाही त्याग करतो (तो माया तरून जातो )

**विवरण .**

साधनाचा विचार करीत असता त्याचे अंतरग व बहिरंग असे प्रकार संभवतात हे पूर्वी सांगितलेच आहे. अंतरंगसाधनांना बहिरंग-साधनाची आवश्यकता असते. सगत्याग हे साधन मागील सूत्रात सागितले आहे ते सिद्ध होण्याकरिता या सूत्रात ' विविक्त स्थानं सेवते ' म्हणजे निर्जन एकांतवासाचा आश्रय करतो असे सांगितले आहे. नगर-ग्राम-गृहादिकांत साधक राहून तो जरी आपल्या साधनाचरणात निमग्न राहील तरी इतर बहिर्मुख स्वार्थी, लोभी, दुष्ट माणसे त्याच्या साधनात कोणत्या ना कोणत्या प्रकारे विघ्न आणण्याकरिता टपून बसलेले असतात नाही नाही ते चांगले-वाईट प्रसंग त्याच्यावर आणून त्याच्या साधनाभ्यासात प्रतिबंध निर्माण करतात. त्याच्या त्या उपसर्गापासूनवाचण्याकरिता पूर्वीपासून एकातवास हेच साधन सर्व ऋषिमुनीनी स्वीकारलेले आहे. इतकेच नव्हे तर कित्येक सार्वभौम राजांनीही उतरत्या वयात सत्संगतीने वैराग्य झाले असता पुत्राच्या स्वाधीन राज्य करून आपण तपाचरणाकरिता अरण्याचा एकातवासाचाच आश्रय केला अशी किती तरी राजांची चरित्रे उपलब्ध आहेत या विषयात श्रीएकनाथ महाराजांनी सांगितलेला श्रीगोरक्षनाथ व राजा भर्तृहरी यांचा संवाद प्रसिद्ध आहे राजा भर्तृहरीने श्रीगुरू गोरक्षनाथास एकदा विचारले की, 'महाराज ! माझ्यासारखा सर्व राज्य टाकून परमार्थाला लागलेला कोणी आहे काय ?' यावर गोरक्षनाथ म्हणाले, अरे, तूच काय पण या भारतात नव्याणव कोटी राजानी राज्यत्याग करून पूर्वी वनवासाचा मार्ग पत्करला आहे.' (आनंदलहरी)

साधकाचे मन अद्यापि पूर्ण एकाग्र झालेले नसते, कोणतेही साधन, विचार, ज्ञान, ध्यान, भजन असो, मन एकाग्र पाहिजे. अनादिकालीन संस्कारामुळे ते चंचल असते हे प्रसिद्ध आहे. त्याला निश्चळ बनवण्याकरिता—एकाग्रतेकरिता— काही साधने करावी लागतात. पाणी मूळचे शांत असले तरी आत असणाऱ्या जलचराच्या

हालचालींमुळे तसेच बाहेरील येणाऱ्या-जाणाऱ्याच्या पदाघातामुळे, मुले दगड टाकतात, त्यायोगाने, सोसाट्याच्या वाऱ्यामुळे ते चंचल बनते. त्याकरिता आतल्या कारणांपासून चंचलता निर्माण न व्हावी म्हणून ती दूर केली पाहिजेत.

साधकाच्या चित्तक्षोभाची बाह्य कारणेही दूर होणे आवश्यक आहे. ती विघ्ने म्हणजे स्वजन-परजनांकडून होणारा संसर्ग तो अनेक प्रकारचा असू शकतो. तो गावातल्या त्या गजबजाटात राहून दूर करता येत नाही, सर्वांवर नियंत्रण कसे ठेवता येईल ? याकरिता तो ससर्ग टाळणेच अवश्य आहे. या दृष्टीने विविक्त स्थान म्हणजे एकांतवासाचा आश्रय त्या साधकाला घ्यावा लागतो.

संगे वाढे शीण न घडे भजन । त्रिविध हे जन बहु देवा ।। याचिमुळे आला संगाचा कंटाळा । दिसताती डोळा नाना छंद ।। तुका म्हणे आता एकलेचि भले । बैसोनि उगले रहावे ते ।। ते विविक्त (एकात) स्थान तरी कोणते व कसे असावे हे श्री ज्ञानेश्वर महाराज सांगतात, 'आणि तीर्थे धौते तटे । तपोवने चोखटे । आवडती कपाटे । वसऊ जया ।। ६११ ।। शैलकक्षांची कुहरे । जळाशय परिसरे । अधिष्ठी जो आदरे । नगरा नये ।। ६१२ ।। बहु एकातावरी प्रीति । जया जनपदावरी खंति । जाण मनुष्याकारे मूर्ती । ज्ञानाची तो ।। ६१३ ।।' ज्ञा. १३

लोकांतात साधनाचरणात साधकास फार विघ्ने येतात, तुकाराम महाराज त्यासाठी म्हणतात,

वृक्षवल्ली आम्हा सोयरी वनचरे । पक्षीही सुस्वरे आळविती ।। १ ।।
येणे सुखे रुचे एकाताचा वास । नाही गुण-दोष अगा येत ।। २ ।।
आकाश मंडप पृथ्वी आसन । रमे तेथे मन क्रीडा करू ।। ३ ।।
कथा कमंडलू देहउपचारा । जाणवितो वारा अवसरू ।। ४ ।।
तुका म्हणे होय मनासी संवाद । आपलाचि वाद आपणासी ।। ५ ।।

एकातवासाचे स्वरूप व त्याचे फल यावरून स्पष्ट कळू शकते.

'गोदातटे निर्मळे । देव देवतांची राऊळे । वैष्णवांचे मेळे । दिवस जाय सुखाचा ।।' असेही एका ठिकाणी तुकाराम महाराज म्हणतात. पण मनुष्यास बाल पणापासून लोकबन्धनातच राहण्याची सवय असते. माता-पिता बंधू-बांधव, इष्ट मित्र, परिवार, स्वजन इत्यादिकांशी जन्मतःच संबंध येतो व तेच बरे वाटते, जय जनपदी सुख । गजबजेचे कौतुक । वानू आवडे लौकिक–।' ज्ञा. १३–८२३. असे सामान्यांचे लक्षण ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितले आहे ते यथार्थ आहे. पण भक्तिमार्गी साधकास या लौकिक व्यवहारापासून फार उपसर्ग होतो, अभ्यासात विघ्ने येतात याकरिता वर लिहिल्याप्रमाणे तो एकांताचाच आश्रय करीत असतो

सूत्राच्या पुढील भागात 'या लोक बन्धमुन्मूलयति' असे नारद म्हणतात. भगवद्

गीतेच्या तेराव्या अध्यायात ज्ञानाची जी साधने सांगितली आहेत त्यांतही या दोन साधनांचा अंतर्भाव आहे विविक्त देश सेवित्वमरतिर्जन संसदि । १३-१० एकातात जरी एकादा साधक असला तरी तेथे जाऊनही त्याला उपसर्ग पोहोचविणारे असतात. ते भाविकपणाचे सोंग घेऊन तेथे जातात. त्याचे वर्णन करू लागतात जनस्तुती लागे मधुर । म्हणती हा उद्धारावया हरीचा अवतार । आम्हा लागी जाहला स्थिर । तेणे तो धरी फार शब्द गोडी ।। १५ ।।

असे श्रीएकनाथ महाराज आपल्या चिरजीवपदात सागतात अशा प्रकारे तो हळूहळू लोकेषणेमध्ये अडकत असतो. पुत्रेषणा, दारेषणा, वित्तेषणा यापेक्षाही साधक-भक्ताला लोकेषणा बाधक असते. लोकानी स्तुती करावयास आरभ केला की तीच प्रिय वाटावयास लागते पण स्तुतीबरोबर हळूहळू निंदाही होण्याला सुरुवात होते, ज्याला स्तुतीने सुख वाटते त्याला निदा ऐकून दुःख झाल्याशिवाय राहत नाही. हाच लोकबन्ध होय.

श्रीतुकाराम महाराजाचा एक अभग प्रसिद्ध आहे

ऐसा हा लौकिक कदा राखवेना । पतित पावना देवराया ।। १ ।। ससार करिता म्हणती हा दोषी । टाकिता आळसी पोट पोसा ।।२।। आचार करिता म्हणती हा पसारा । न करिता नरा निदिताती ।। ३ ।। सतसंग करिता म्हणती हा उपदेशी । येरा अभाग्यासी ज्ञान नाही ।। ४ ।। धन नाही त्यासी ठायीचा करंटा । समर्थासी ताठा लाविताती ।। ५ ।। बहु बोलो जाता म्हणती हा वाचाळ । न बोलता सकळ म्हणती गर्वी ।। ६ ।। लग्न करू जाता म्हणती हा मातला । न करिता झाला नपुसक ।। ७ ।। लोक जैसा ओक धरिता धरवेना । अभक्ता जिरेना संतसंग।। ८ ।। तुका म्हणे आता ऐकावे वचन । त्यजुनिया जन भक्ती करा ।। ९ ।।

म्हणून शेवटच्या चरणात ते सर्वांना सागतात की, जनाचा त्याग करून त्यांचा संसर्ग स्वकीय, परकीय, शिष्य, भक्त म्हणविणारे असोत का विरोधी असोत टाळून भक्ती करा. ज्याला परमात्म्याच्या प्रेमबधनाने बाधले जावयाचे आहे त्याने लोकबन्धन तोडून टाकलेच पाहिजे । निंदा आणि स्तुति । मान करूनि एके पक्ति । विचरे प्राणवृत्ति । जनीवनी ।। ज्ञानेश्वरी १२ ।।

असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. गोपिकाची अवस्था कशी झाली होती, याचे वर्णन तुकाराम महाराजानी विरहिणीच्या अभंगातून केले आहे ते या लोक-बन्ध उन्मूलन भूमिकेचेच आहे.

वाळो जन मज म्हणोत शिदळी । परि हा वनमाळी न विसंबे ।।१।। साडोनि लौकिक जालिये उदास । नाही भय आस जीवित्वाची ।।२।। नाइके वचन बोलता या लोका । म्हणे जालो तुका हरीरता ।।३।।

असे सर्वच संतांचेही उद्‌गार पाहावयास सापडतात. खरा भक्त लौकिव व्यवहारात अडकत नाही. त्याने आपले जीवित तृणप्राय केलेले असते. एक गोपिक आपल्या सखीस म्हणते–

**जीवितं सखि पाणीकृतं मया किं गुरोश्च सुहृदश्च मेभयं ।**
**लभ्यते हि यदि कस्य वा भयं लभ्यते न यदि कस्य वा भयं ।।**

'ती गोपिका म्हणते हे सखे ! मी माझे जीवित पणाला लावले आहे. आत मला गुरुजन वा सुहृदांचेही भय नाही, तो श्रीकृष्ण प्राप्त झालाच तर कोणाचे भय व न प्राप्त झाला तरी कोणाचे भय ? पण कोणीही मानव जोपावतो तीन गुणां वावरत असतो तोपावेतो त्याला वरीलप्रमाणे लोकेषणा इत्यादी गोष्टीची बाध होतच राहणार, म्हणून त्याचा आणि या गुणाचा संबंध तुटला पाहिजे नव्हे त तोडला पाहिजे हे सागण्याकरिता 'निस्त्रैगुण्योभवति' असे नारद म्हणतात. जस लोकबंध आहे म्हणून तो नष्ट करावयाचा तसा गुण हाही बंधच आहे हे श्रीकृष्ण भगवान अर्जुनास स्पष्ट सांगून गेले.

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवा. ।**
**निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम्** ।। १४–५

'सत्त्व, रज, तम हे गुण प्रकृतीपासून झालेले आहेत व हे देहातील जो देही अविनाशी आत्मा त्याला बांधून टाकितात.'

सत्त्वगुण सुखसंग व ज्ञानसंगाच्या द्वारा बांधतो, रजोगुण हा आसक्ती काम याच्या द्वारे बांधतो. तमोगुण पूर्ण अज्ञान, मोह, प्रमाद, आलस्य, निद्रा इत्यादिकांच्य द्वारे जीवास बांधतो. हे बंधन वर दिसत नाही. तर आत अंतःकरणतादात्म्याप जो जीव त्याला असते. जीवही आत म्हणून त्याला बाधणारे हे गुणही आत असतात. गुण शब्दाचा दोरी असाही अर्थ होतो. दोरी हे बंधनाचे साधन आहे, प्रसिद्ध आहे. स्वतंत्र अशा जीवास बंधन केव्हाही आवडत नाही. पण पराधीनपण तो अज्ञानामुळे त्यात अडकतो.

जसा मासा हा आमिषाच्या आशेने स्वतःच्या प्राणघातक अशा गळाल अडकतो तसाच क्षेत्रज्ञ जीव या गुणाच्या जाळ्यात अडकतो. या विषयाचा विशे सविस्तर विचार गीतेच्या चौदाव्या अध्यायात केला गेला आहे गुण म्हणजेच स ससार आहे. कारण सचेतन-अचेतन सर्व सृष्टीही गुणात्मकच आहे, असेच श्रीकृष्णांनं अर्जुनास सागितले आहे. भक्ताला गुणातीत बनावयाचे असते. त्याला तीन गुणांहू अतीत अशा निर्गुण भक्तियोगाचा आश्रय करावयाचा असतो. तसेच त्रिगुण आले की ते आपला एक प्रकारचा अहंकारही घेऊन येतात. तोही भक्तिमार्गाला प्रति बंधक आहे म्हणून नारद 'निस्त्रैगुण्यो भवति' असे म्हणतात,

गीतेमध्ये श्रीकृष्ण अर्जुनाला 'निस्त्रैगुण्यो भवार्जुन' हे अर्जुना, तू निस्त्रैगुण

त्रिगुणधर्मरहित हो ' असेच सांगतात. कोणी म्हणेल, गुणबधनात अडकलेला जीव स्वसामर्थ्याने गुणाच्या बंधनातून मुक्त कसा होईल ? इतकेच नव्हे तर मागे जी भक्तिप्राप्तीची श्रवण, कीर्तन, भजन, एकांतवास इत्यादी साधने सागितली आहेत; ती साधने आचरणात आणण्याकरिताही गुणाची आवश्यकता आहे, हे खरे आहे. या प्रश्नाचे उत्तर श्रीकृष्णानी उद्धवास उपदेश करते वेळी दिले आहे.

सत्त्वं रजस्तम इति गुणाबुद्धेर्नचात्मनः।
सत्त्वेनान्यतमौहन्यात्सत्त्वं सत्त्वेन चैव हि ॥१॥ ए. भा. १३

भगवान म्हणाले, सत्त्व, रज, तम हे गुण बुद्धीचे आहेत. केवळ आत्म्याचे नाहीत. सत्वगुणाची वाढ करून रजोगुण व तमोगुण याचा नाश करावा. नंतर सत्त्वगुणाचाही शुद्धसत्त्वाने निरास करावा इतकेच नव्हे साधनात्मिका भक्ती हीदेखील सत्त्वगुणाचा अवलंब करूनच होते.

सत्त्वाद्धर्मो भवेद्वृद्धात्पुंसो मद्‌भक्ति लक्षण ॥
सात्त्विकोपासया सत्त्वं ततो धर्म प्रवर्तते ॥२॥ भाग ११-१३

' सत्त्वगुणाची वाढ झाली असता, श्रीकृष्ण म्हणतात, माझ्या ठिकाणी प्रेम उत्पन्न होते हेच खऱ्या धर्माचे लक्षण आहे, सात्त्विक पदार्थाच्या उपासनेने सत्त्वगुण वाढतो आणि तो वाढल्यानतरच शुद्ध धर्माची प्रवृत्ती होते.'

सत्त्वगुणाची वृद्धी हाच श्रेष्ठ धर्म आहे. ती वृद्धी रज व तम या दोन गुणांचा नाश करते, व त्यामुळे अंत करणातील सर्व विकार दूर होतात आणि भगवद्‌भाव निर्माण होण्यास साहाय्य होते. असा सत्त्वगुण वाढण्यास खालील दहा गोष्टी कारणीभूत होतात आगम, (शास्त्र) वाराणसी इत्यादी तीर्थे, योग्य संतती, प्रवित्र देश, कर्मोचित काल, विहितकर्म, योग्य कुळात जन्म, भगवद्‌ध्यान, मंत्र तसेच उचित संस्कार या गोष्टी कारणीभूत होतात, म्हणूनच वर महानुभावसेवा, एकान्तवास इत्यादी साधने सत्त्वबुद्धीकरिताच सांगितली आहेत.

सात्त्विक द्रव्ये सेविता। सत्त्ववृद्धी होय तत्त्वता। सत्त्ववृद्धी पुरुषी होता। धर्म स्वभावता प्रवर्ते ॥१६१॥ धर्मप्रवृत्ति माझे भजन। माझ्या भक्ति उल्हासे जाण। भक्तासी मी होय प्रसन्न। तैं स्वभावे ज्ञान प्रकाशे ॥१६२॥ ए. भा. १३

आता सत्त्वगुणही सुखसंग व ज्ञानसंग यांच्या द्वारे जीवाला बंधनात अडकवणाराच आहे हे जरी खरे असले तरी ' सत्त्वं सत्त्वेन चैवहि ' असे वर म्हटलेच आहे त्याप्रमाणे त्या सत्त्वाचाही अहंकार साधकाने टाकून दिला की तोही बाधक होत नाही व तो सात्त्विक अहंकार टाकून तो भक्त ' निस्त्रैगुण्य ' होतो. श्रीकृष्णानी गुणातीत म्हणजे गुणांचे अतिक्रमण करण्याचे साधन माझी भक्तीच आहे असे स्पष्ट सांगितले आहे

**मांचयोऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ।। गीता.** १४.२६

'अर्जुना, अव्यभिचारी भक्तियोगाने जो माझी उपासना करतो तो या गुणाच्या पूर्ण पलीकडे जाऊन, त्यास ब्रह्मत्व प्राप्त होण्याची योग्यता प्राप्त होते.' तरी व्यभिचाररहित चित्ते । भक्तियोगे माते । सेवी तो गुणाते । जाकळू शके ।।३७१।। ज्ञा. अशा रीतीने ज्याला मायेतून तरावयाचे त्याने गुणाचे अतिक्रमण केले पाहिजे कारण माया म्हणजेच गुण 'गुणमयी' हे तिचे स्वरूप आहे.

ससारामध्ये बहुतेक जीवाना आपल्या निर्वाहाची चिता लागलेली असते. जीवनावश्यक पदार्थ अनेक असतात, ते मिळतील का व प्राप्त झालेले टिकतील का ही जीवनाची एक महान समस्या आहे. अप्राप्त वस्तूची प्राप्ती व्हावी व प्राप्त आणि अनुकूल वस्तूचा नाश न व्हावा, त्या आपल्या म्हणून आपणाजवळ अखंड राहाव्या या भावनेला योग-क्षेम म्हणतात. अप्राप्ताची प्राप्ती म्हणजे योग व प्राप्ताचे रक्षण हा क्षेम असा योग-क्षेम शब्दाचा सामान्य अर्थ आहे. या योग-क्षेमाच्याच विवचनेत बहुतेक माणसे गढून गेलेली आहेत. तसेच अप्राप्त पदार्थाच्या प्राप्तीला काही मर्यादा घालता येत नाहीत, व ते प्राप्त होण्याकरिता सतत प्रयत्नशील राहावे लागते. नाना प्रकारची शुभाशुभ कर्मे करीत रहावे लागते आणि प्राप्ताच्या सरक्षणाकरिताही थोडे श्रम करावे लागत नाहीत. एखादा साधकदेखील या योग-क्षेमाच्या चिंतेने ग्रस्त होणे शक्य आहे. सर्वसामान्याचा येथे विचार नाही, ते तर 'चिंतामपरिमेया च प्रलयाता मुपाश्रिता. । आशापाशशतैर्बद्धा कामक्रोध परायणा: ।।' मरणानेही न संपणाऱ्या अशा अमर्याद चिंतेने ग्रासलेले असतात शेकडो आशापाशांनी बद्ध झालेले कामक्रोधपरायण– असेच सर्व असतात ' (गीता अ, १६ ११, १२)

पण ज्याला मायेतून तरून जावयाचे आहे त्या साधकाने आपल्या देहभरण-पोषणाची म्हणजेच लौकिक योग-क्षेमाची चिंता ठेवू नये. कारण देहाचे भरण-पोषण झाले तरी तेवढयाने सर्व पुरुषार्थप्राप्ती झाली असे नाही त्या भरण-पोषणातूनही पुन्हा अनेक विकार निर्माण होऊन ते जीवन अशात बनवीत असतातच. गीतेमध्येही 'निर्योग क्षेम आत्मवान्' 'तू योग-क्षेमाची चिंता न वहाणारा व आत्मवान बन ' असे श्रीकृष्णानी अर्जुनाला सागितले आहे. तसेच जो भगवद्भक्त आहे, तो भोजन-आच्छादन याची चिंता करीत नाही, त्याची ही दृढभावना असते की जगाची जो चिंता वहातो तो आमची उपेक्षा करील काय ?

**भोजनाच्छादने चिंतां वृथा कुर्वन्ति वैष्णवा.** ।
**योऽसौ विश्वंभरो देव: सभक्तान्किमुपेक्षते** ।।

अर्थ वर आलाच आहे. जन्म पावणाऱ्या बालकाच्या जन्माच्या अगोदर तो मातेच्या स्तनात दुग्ध निर्माण करतो.

जो सर्व जगाचा गती, भर्ता, प्रभू असा तो आहे, त्याचे तर प्रतिज्ञावाक्य प्रसिद्ध आहे– योगक्षेमं वहाम्यहम् ।। गी. ९–२२

' जे भक्त माझे अनन्य चिंतन करीत माझीच उपासना करीत असतात, असे अखंड माझ्या ठिकाणीच जे दृढ भावना ठेवून राहणारे आहेत, श्रीकृष्ण सांगतात अर्जुना ! त्यांचा योगक्षेम मी वहातो ' हा योगक्षेम आघवा । तयांचा मजचि पडला पांडवा । ज्याचिया सर्व भावा । आश्रय मी ।। ज्ञा. ९–३४३.

अनन्य भक्त देवाने आपला योग-क्षेम चालवावा असे म्हणत नाही. आपल्या अदृष्टानुसार जसा देहाचा व्यवहार होईल तसा होऊ दे, कारण त्याने संगत्याग केलेला असतो.

म्हणजेच तो स्वत. लौकिक व्यवहार चालण्यास कारण अशा योगक्षेमाची अपेक्षा करीत नाही. अन्न आच्छादन । हें तो प्रारब्धा आधीन । तुकाराम । भगवान आपल्या अनन्य भक्ताचा योगक्षेम चालवतो याचा अर्थ लौकिक देहनिर्वाहास लागणाऱ्या वस्तू पुरवतो असा नाही.

**तया माझिया सायुज्याची चाड । तरी तेंचि पुरवी कोड ।।**
**कां सेवा म्हणती तरी आड । प्रेम सुये ।। ज्ञा.** ९–३४१

सायुज्य मोक्ष अथवा भगवत्प्रेम यापैकी जे त्याला अपेक्षित असेल ते देणे व दिलेल्याचे रक्षण करणे या प्रकारचा योगक्षेम देव चालवितो व तो अनन्य प्रकारे चिंतन करणाऱ्यांचा. जर लौकिक योगक्षेमाची भक्त अपेक्षा करील तर तो अनन्य कसा होईल ? म्हणून येथे ' योगक्षेमं त्यजति ' या वाक्याचा अर्थ सर्व संसारी मानवमात्रांना जी देहनिर्वाहार्थ अन्नवस्त्रादिकाची अपेक्षा असते ती त्याला नसते.

निर्वाहापुरते अन्न आच्छादन । आश्रमासी स्थान कोपी गुहा ।।
कोठेही नमावे चित्तासी बंधन । हृदयी नारायण आठवावा ।

।। तुकाराम ।।

## सूत्र ४८

## यः कर्मफलं त्यजति, कर्माणि संन्यस्यति, ततो निर्द्वंद्वो भवति ॥४८॥

**अर्थ :**

(मायेतून कोण तरतो ?) जो कर्मफलाचा त्याग करतो.(इतकेच नव्हे तर) सर्व कर्मांचाही त्याग करतो नंतर (म्हणजे कर्मफल व कर्मत्यागानंतर) जो निर्द्वंद्व सुखदुःखादिद्वंद्वरहित होतो.

**विवरण :**

मागील सूत्रात जो योगक्षेमाचाही त्याग करतो, जो निर्मम होतो, संगांचा त्याग करतो तो मायेतून तरून जातो असे सांगितले, या सूत्रात आणखी तीन साधने सांगतात. प्रथम कर्मफलत्याग सांगितला आहे. या साधनाचा मागील साधनाशी संबंध आहे. मानवप्राणी हा या जगात येतो तो कर्ता म्हणून येतो. कर्तृत्वाबरोबर येणारा दुसरा धर्म म्हणजे कर्मफलाचे भोक्तृत्व हा आहे. कोणीही जे कर्म करत असतो ते निष्फळ जावे म्हणून करीत नाही तर त्याचे फळ भोगावयास मिळावे याच हेतूने करीत असतो. यासच फलासक्ती म्हणतात. अशा आसक्तीने मानव कर्मे करतो जर फल न मिळेल अथवा त्या फलाची आसक्ती नसेल तर कर्मे करण्याकडे प्रवृत्ती होणे कठीण आहे, हे जरी खरे आहे तरी जीव जो कर्मात अडकतो तो या फलासक्तीमुळेच. मी कर्ता हा अभिमान म्हणून मीच या कर्माचे फळ भोगावे ही आसक्ती, यासच कर्माचा बंध म्हणतात, असे श्रीज्ञानेश्वर महाराज सांगतात. तैसा कर्तृत्वाचा मदु । आणि कर्मफलाचा आस्वादु । या दोहीचे नांव बंधु । कर्माचौकी ॥ ज्ञा. १८–२०५. या फलासक्तीतूनच पुढे रागद्वेषादी विकार, अनुकूल-प्रतिकूल भावना, इत्यादी निर्माण होतात. त्यातल्या त्यात संसारी माणसाची सकाम कर्माकडे विशेष प्रवृत्ती होते ती आणखीही बंधनाला कारण होते. मनुष्याला जन्ममरण प्रवाहात वाहत जावे लागते त्याचे कारणही हे कर्मफळच आहे । वृत्ती ऐसे मन धरिती । मना ऐसी क्रिया करिती । केलिया ऐसे बरिती । मरोनि देहे ॥ ज्ञा. १७-५८

मानव कर्मफलासक्तीने भारला गेला की त्याला परमार्थ गोड लागत नाही. तो त्या बंधनात अंतर्बाह्य अडकून पडतो. ऐसे इष्टापूर्त सकळ । जया कामना एक मूळ । जे केले भोगवी फळ । बांधोनिया ॥ ज्ञानेश्वरी १८-१०० असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ज्याला मायेतून तरून जावयाचे आहे त्याला फलासक्ती ठेवता येणार नाही. कारण तोही एक मायापरिणामच आहे. म्हणून विवेकी साधक

हळूहळू मायेच्या जाळ्यातून सुटण्याकरिता एक एक बंध तोडून टाकण्याचा प्रयत्न करीत असतो. त्यातच 'कर्मफलंत्यजति' याचा अंतर्भाव होतो. गीतेमध्ये भगवंतांनी अर्जुनास अनेक अध्यायांतून फलत्याग सांगितला आहे. कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन। २-४७ अशा फलहेतुविवर्जित केलेल्या कर्माचे फल जन्ममरणात्मक बंधनिवृत्ती व निरामय पदप्राप्ती म्हणजेच मायातरण सांगितले आहे.

**कर्मजं बुद्धियुक्ताहि फलं त्यक्त्वा मनीषिणः।**
**जन्मबंधविनिर्मुक्ताः पदंगच्छन्त्यनामयम्** ।। २-५१

'बुद्धियोगाचा अवलंब करणारे पुरुष कर्मजन्य फलाचा त्याग केल्याने ज्ञानी होऊन जन्मरूप बंधनापासून मुक्त होतात व निरामय अशा मोक्षपदाला जातात.' गीतेच्या दुसऱ्या अध्यायात चाळीस ते एक्कावन्न श्लोकापावेतो हा विषय सविस्तर सांगितला आहे तसेच पाचव्या अध्यायात कर्मफलाचा त्याग करणारा योगी पुरुष हा नैष्ठिकी-श्रेष्ठ अशी शांती मिळवितो. युक्तःकर्म फलं त्यत्क्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम्। ५-१२ असे म्हटले आहे. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, तरी आत्मयोगे आथिला। जो कर्मफळाशी विटला। तो घर रिघोनी वरिला। शांती जगी ।।७१।। गीतेच्या बाराव्या अध्यायात या फलत्यागाचे फार श्रेष्ठत्व ज्ञानेश्वर महाराजांनी वर्णिले आहे

आणि जेणे जेणे वेळे। घडती कर्मे सकळे। तयांची तिथे फळे। त्यजितु जाय ।। १२८।। वृक्ष कां वेली। लोटती फळे आली। तैसी सांडी निपजली। दानपुण्ये ।। १२९ ।। अगा आत्मजेच्या विषी। जीव जैसा निरभिलाषी। तैसाकर्मी अशेषी। निष्काम होये ।। १३२।। अर्जुना हा फलत्यागु। आवडे कीर असलगु। परियोगामाजी योगु। धुरेचा हा ।। १३४ ।। ज्ञा. १२

या फलत्यागाचे श्रेष्ठत्व एवढे मोठे आहे की श्रीकृष्ण भगवान त्याला सर्व योगामध्ये हा श्रेष्ठ योग आहे असे म्हणतात. किंबहुना 'त्याग' या शब्दाचा मुख्य अर्थ कर्मफलत्याग हाच आहे. सर्व कर्म फलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः। गीता १८-२ असे श्रीकृष्णच सांगतात. म्हणजे कर्मफलत्याग हे एक भक्तिमार्गात मायातरणाचे महत्त्वाचे साधन आहे. म्हणूनच श्री नारद 'यः कर्म फलं त्यजति' असे म्हणतात.

भक्तिमार्गामध्ये फलत्याग याचा थोडासा वेगळा अर्थ केला जातो, ते फळ ईश्वरार्पपण करणे, कारण सर्व कर्माचा यथार्थ रूपाने कर्ता जर तो आहे तर त्याचा भोक्ताही तोच आहे, समुद्रातूनच मेघांना पाणी मिळते व मेघांनी वर्षाव केल्यावर ते पाणी पुन्हा समुद्र आपल्या पोटात समाविष्ट करून घेतो, तद्वत भक्त सर्व कर्मांचा कर्ता जर भगवानच आहे असे समजतो तर फळभोक्ताही तोच आहे

म्हणून फळेही त्यालाच समर्पण करतो श्रीज्ञानेश्वर महाराज सांगतात– कर्मफळ ईश्वरी अर्पे। तत्प्रसादे बोध उद्दीपे। तेथ रज्जुज्ञाने लोपे। व्याळशंका ।। २२८ ।। तेणे आत्मबोधे तैसे। अविद्येसी कर्मनाशे। पार्था त्यजिजे जै ऐसे। तै त्यजिले होय ।। २२९ ।। म्हणोनि इयापरी जगी। कर्मे त्यजीतो महात्यागी। येर मूर्छने नाव रोगी। विसावा जैसा ।। २३० ।। ज्ञा. १८ कर्मफळ ईश्वरास समर्पण करणे व त्याच्या प्रसादाने ज्ञान प्राप्त झाले असता मूळ अविद्येसह त्या कर्माचा जो त्याग तोच खरा त्याग आहे. वरवर झालेला त्याग म्हणजे रोग्याला मूर्च्छा आली व तो स्वस्थ पडला असता रोग्यास आता बरे वाटते तो विसावा घेतो आहे असे म्हणण्यासारखे आहे असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

इतकेच नव्हे तर पुढे ‘ कर्माणि संन्यसति ’ असे म्हटले आहे. कर्तृत्वमद व फलास्वाद हे दोन कर्मबंध आहेत असे वर सांगितले आहे. फलापेक्षा जर गेली तर कर्तृत्वबुद्धीही हळुहळु मावळते व ती मावळल्यावर कर्मे कशी होतील ? कर्माचे २ प्रकार आहेत. एक देहनिर्वाहा करिता केले जाणारे दृष्टफलक कर्म श्वासोच्छ्वासापासून ते दैहिक, ऐंद्रियिक, आहार-विहारदिक, व देहनिर्वाहापेक्षा अधिक ज्यांचे दृष्ट अदृष्ट फल आहे अशी श्रुति-स्मृतिप्रतिपादित विहित कर्मे साधक अथवा भक्त, ज्ञानी, योगी कोणीही असो, देहनिर्वाहाकरिता आवश्यक असणारी कर्मे तो करीतच असतो, ती तो टाकू शकत नाही व ती टाकावी असे कोणी विचारी पुरुष सांगूही शकणार नाही. कारण सांगणाऱ्यालाही टाकणे शक्य नाही, तसेच मूळ सूत्रात ‘ कस्तरति मायां ’ म्हणजे मायेतून कोण तरून जातो असा प्रश्न आहे. तो साधक विषयकच मानणे योग्य आहे, म्हणूनच. न हि देहभृता शक्यं त्युक्तु कर्माण्यशेषत । गीता. १८-११ ‘ म्हणजे देह धारण करणाऱ्यास संपूर्ण कर्माचा त्याग करणे शक्य नाही असे श्रीकृष्ण सांगतात. इतकेच नव्हे तर ‘ कोणीही क्षणभरही कर्मांविना राहू शकत नाही ’ असे तिसऱ्या अध्यायात श्रीकृष्ण म्हणतात. तसेच कर्मत्यागही दोन प्रकारचा- साध्यप्राप्तीनंतर व साधकदशेत होणारा. येथे साधक दशेतील त्याग घेणे योग्य आहे.

सिद्धदशेत कर्म ब्रह्मरूप होते. तो कर्मे करूनही अकर्ताच असतो. पार्था तयाचे ठायी। हे आघवेचि आथिपाही। परी कर्ता नव्हे काही। प्रतीति बळे ।। ५–१४६।। असे श्रीकृष्ण सांगतात सर्व कर्मे करूनही तो कर्मत्यागीच नव्हे तर अकर्ताच असतो, हे गीतेमध्ये अनेक स्थळी स्पष्ट केले आहे. आता साधकाचा कर्मत्याग पाहू.

नित्य, नैमित्तिक, काम्य व प्रायश्चित्त असे चार प्रकारचे जे कर्म आहे त्यांत साधकाने काम्य कर्मे करावयाची नाहीत. ज्ञात-अज्ञात पातकक्षालनाकरिता प्राय- श्चित्त कर्मे करावीत व नित्यनैमित्तिक कर्मे न केली तर प्रत्यवाय आहे म्हणून ती टाकू नयेत. अशा प्रकारे जर कर्मे करील तर तो कर्मत्यागीच मानला जाईल. मात्र ती कर्मे निरहंकार वृत्तीने कर्तृत्वमद व फलाशा टाकून करावीत. उचित कर्मांचा त्याग

करून नैष्कर्म्य होऊ पाहणाऱ्यांचा गीतेमध्ये निषेध केला आहे. जे उचित कर्म सांडिती। मग नैष्कर्म्य होऊ पाहती । परी कर्मेंद्रिय प्रवृत्ति । निरोधुनि ।।६४।। तया कर्मत्याग न घडे । जे कर्तव्य मनी सापडे । वरी नटती ते पुढे। दरिद्र जाण ।।६५।। ज्ञा. ३

तो कर्मत्याग नसून 'मिथ्याचार' आहे असे गीतेच्या तिसऱ्या अध्यायाच्या सहाव्या श्लोकात श्रीकृष्णानी म्हटले आहे. खरा कर्मत्याग कसा होऊ शकतो याचे श्रीज्ञानेश्वर महाराजानी विवेचन केले आहे.

जो अतरी दृढु । परमात्मरूपी गूढु । बाह्य तरी रूढु । लौकिक जैसा ।।६८।। जो इद्रिया आज्ञा न करी । विषयांचे भय न धरी । प्राप्त कर्म न अव्हेरी । उचित जे जे ।।६९।। तो कर्मेंद्रिये कर्मी । राहटता तरी न नियमी । परी तेथीचेनि ऊर्मी । झाकोळे ना ।।७०।। ज्ञानेश्वरी ३.

विचाराने पाहिल्यास कर्मत्याग तीन प्रकारचा गीतेमध्ये सांगितला आहे वेद, ईश्वर, परलोक यावर विश्वास न ठेवणारा तमोगुणी पुरुष अविवेकाने जो विहित कर्माचा त्याग करतो तो तमोगुणी त्याग होतो, पण असा त्याग विहित कर्माचा कोणी करू नये असे ज्ञानेश्वर महाराज सांगतात. की स्वभावे आले विभागा । ते कर्मचि वोसंडी पै गा । परी झणे आतळा त्यागा । तामसा तया।।१८–१८३।। तसेच ही विहितकर्मे करणे म्हणजे कष्टाचे आहे. शरीराला फार कष्ट होतात, दु:ख होते या भीतीने जो कर्मत्याग केला जातो त्यास राजस म्हणतात. पण अशा भयाने केलेल्या कर्मत्यागाला खऱ्या त्यागाचे फळ प्राप्त होत नाही, तर कर्तव्य म्हणून जे विहित कर्म कर्तृत्वमद व फलास्वादाची अभिलाषा टाकून केले जाते त्यास सात्त्विक त्याग म्हणतात.

कारणासहित कर्म संपले पाहिजे तरच त्या कर्मत्यागास मोक्ष हे फळ प्राप्त होते तैशा सकारण क्रिया । हारपती धनंजया । तो कर्मत्यागु ये जया । मोक्ष फळासी ।।१८–१९० ज्ञा. असे श्रीकृष्ण सांगतात. म्हणून 'कर्माणि संन्यसति' असे जे सूत्रात म्हटले आहे, तो कर्मसंन्यास वाटतो तेवढा सोपा नाही. भक्तिमार्गात कर्मत्यागाचा विचार करताना ती कर्मे भगवंताला समर्पण करणे यालाच महत्त्व दिले आहे. मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा । गी. ३–३० 'चित्तवृत्ती माझ्या ठिकाणी ठेवून माझ्या ठिकाणी सर्व कर्मे समर्पण करून– असे श्रीकृष्ण सागतात गीतेच्या नवव्या अध्यायात स्पष्टच सांगितले आहे–

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासियत् ।**
**यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ।।२७।।**

'हे अर्जुना, तू जे जे करतोस, जे भोगतोस, जे हवन करतोस, जे दान करतोस, जे तप करतोस, ते सर्व मला समर्पण कर' व अशा कर्मसमर्पणाचे फळही पुढील श्लोकात सांगितले आहे–

**शुभाशुभ फलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः ।**
**संन्यास योग युक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ।।२८।।**

'अशा प्रकारे कर्म केले असता कर्माची शुभाशुभ फलरूप बंधने त्यापासून अर्जुना, तू मुक्त होशील. मगच खरा कर्मसंन्यास होईल, आणि कर्मबंधनापासून मुक्त झालास म्हणजे माझ्या समीप येशील.' तसेच अठराव्या अध्यायातही, सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणी मद्व्यपाश्रय. । चेतसा सर्व कर्माणि मयि सन्यस्य मत्परः ।। गी. १८ श्लोक ५६, ५७ इत्यादी श्लोकांतून हीच गोष्ट सांगितली आहे.

या कारणे गा तुवा । सर्वकर्मा आपुलिया । माझ्या स्वरूपी धनंजया । संन्यास कीजे ।। ज्ञा. १८–१२६०

अशा भगवदर्पण बुद्धीने सर्व कर्मे करणे हाच खरा कर्मसंन्यास होय, या कर्मसंन्यासाने कर्मच ब्रह्मरूप होते. कर्मफलत्याग, कर्मसंन्यास सांगितल्यानंतर त्याचे फल सूत्राच्या शेवटच्या वाक्यात नारद सांगतात 'ततो निर्द्वंद्वो भवति' तो साधक भक्त 'निर्द्वंद्व होतो. मानवी जीवनात सुखदुःख, पापपुण्य, धर्माधर्म, शीतोष्ण, शत्रु-मित्र, आपपर, मानापमान, प्रियअप्रिय अशी अनेकविध द्वंद्वे अखड व्यापून आहेत. किंबहुना द्वंद्वबाधा म्हणजेच मानवी जीवन असे समीकरण होऊन बसले आहे. या द्वंद्वात अडकल्यामुळे अनुकूल-प्रतिकूल बुद्धी होते. द्वंद्वे आली की ती सर्वांना सर्वच अनुकूल नसतात अथवा प्रतिकूल नसतात. त्यात अनुकूल जे असेल किंवा वाटेल त्याच्या स्वीकाराची व प्रतिकूल जे असेल त्याच्या त्यागाची प्रवृत्ती होत असते. त्या प्रवृत्तीमुळे जे प्रतिकूल ते सर्व टाकले जातेच असे नाही व अनुकूल सर्व संपादित होतेच असे नाही. त्यातून अनेक संघर्ष निर्माण होतात. तसेच सुखदुःख, लाभ-हानी यांच्या ठिकाणी कधी व्यभिचारही दिसून येतो. एकाला एका वेळी जे सुख ते अन्याला दु.ख होते. किंबहुना ज्याचे त्यालाही स्थल-काल भेदाने विपरीत प्रत्ययाला येते. यातूनच शुभाशुभ कर्मप्रवृत्ती निर्माण होते, म्हणजे जे कर्म एकाला अनुकूल फलाकरिता कारण वाटते तेच अन्याला प्रतिकूल वाटत असते. जे एकाला प्रतिकूल तेच दुसऱ्याला अनुकूलही वाटणे शक्य आहे यासच व्यभिचार दोष म्हणतात.

म्हणजे संसारी मनुष्य अशा द्वंद्वात सापडून कसा दुःखी होतो याचे उत्तम वर्णन ज्ञानेश्वर महाराजांनी तेराव्या अध्यायात केले आहे. आणि मातलिया सागरी । मोकलिलिया तरी । लाटांच्या येरझारी । आंदोळे जेवी ।।८०४।। तेवी प्रिय वस्तु पावे । आणि सुख जो उंचावे । तैसाचि अप्रियासवे । तळवटु घे ।।५।। ऐसेनि जयाचिये चित्ती । वैषम्याची वोखळती । वाहे तो महामती । अज्ञान गा ।।८०६।। ज्ञा. यासच द्वंद्वबाधा म्हणजेच संसारधर्म म्हणतात. यातून अज्ञानी अभक्त जीवाची कधीच सुटका होत नाही. जे भगवद्भक्त असतात तेच या सर्व

द्वंद्वातून बाहेर पडलेले असतात. म्हणून गीतेमध्ये ज्ञानी तसेच भक्ताच्या लक्षण-वर्णनात ' द्वंद्वैर्विमुक्त. सुखदु.खसंज्ञै.।१५–५ समदु:खसुखस्वस्थ: समलोष्टाश्म कांचन: तुल्य प्रिया प्रियोधीरस्तुल्य निदात्म संस्तुति: ॥२४॥ मानापमान योस्तुल्य: । तुल्योमित्रारिपक्षयो: । २५ गीता अ. १४ यावरील ज्ञानराजांची विस्तृत व भावगर्भ टीका मुळातून वाचणे.

भक्तलक्षणात बाराव्या अध्यायातही, सम:शत्रौच मित्रेच तथा मानापमानयो. । शीतोष्ण सुखदु:खेषु समस्संग विवर्जित: ॥१८॥ तुल्य निंदा स्तुतिर्मोनी संतुष्टो येन केनचित ॥१९॥ इ. निद्वंद्व होणे म्हणजे त्याच्या अंगी द्वंद्वे आढळत नाहीत असे नाही, कारण शरीर, इंद्रिये, विषयभोग हे सर्व त्याच्या ठिकाणी असतातच म्हणजे द्वंद्वाची कारणे आहेत पण तो निद्वंद्व होतो. याचे कारण सर्व द्वंद्वे ही कर्मफलस्वरूप असतात, कर्मजन्य असतात. सूत्राच्या आरंभी हा साधक कर्मफलाचा त्याग करतो (य: कर्मफलं त्यजति, कर्माणिसंन्यसति) कर्माचाही संन्यास करतो असे म्हटले आहे. म्हणजे द्वंद्वाचा आधारच नष्ट झाला म्हणून तो निर्द्वंद्व होतो, असे नारद म्हणतात. या निद्वंद्व अवस्थेचे वर्णन श्रीज्ञानेश्वर महाराजानी सदृष्टांत केले आहे ते पाहिल्यास योग्य कल्पना येईल. पै आयुष्य हीना जीवाते । शरीर सांडी जेवी अवचिते । तेवी निदसुरे द्वैते । सांडिले जे ॥२९१॥ लोहाचे साकडे परिसा । न जोडे अंधार रवि जैसा । द्वैतबुद्धीचा तैसा । सदा दुष्काळ जया ॥२९२॥ अगा सुखदु.खाकारे । द्वंद्वे देही जिये गोचरे । तिये जया का सामोरे । होतीचिना ॥२९३॥ स्वप्नीचे राज्य का मरण । नोहे हर्ष-शोकासी कारण । उपवढलिया जाण । जियापरी ॥२९४॥ तैसे सुखदु:खरूपी । द्वंद्वी जे पुण्यपापी । न घेपिजती सर्पी । गरुड जैसे ॥२९५॥ ज्ञा. अ. १५

जो द्वंद्वाच्या बाधकतेत सापडलेला आहे तो मायानदीत बुडत आहे असे समजावे. जो या सर्व द्वंद्वांचे अतिक्रमण करून जातो तो मात्र मायेत बुडू शकत नाही

गीतेच्या दुसऱ्या अध्यायातील पंचेचाळिसाव्या श्लोकात असे ' निस्त्रैगुण्यो-भव ', ' निर्योगक्षेमवान् भव ', ' आत्मवान भव ', तसेच ' निर्द्वंद्वो भव ' असेही श्रीकृष्णांनी सांगितले आहे ते मायेतून तरून जाण्याची अपेक्षा करणाऱ्या सर्वच साधकांकरिता सांगितले आहे. मागील दोन सूत्रांतून संगत्याग, महानुभावसेवा, एकांतसेवन, लोकबंध उन्मूलन, निस्त्रैगुण्यता, योगक्षेमत्याग, कर्मफलत्याग, कर्मत्याग झाल्यानंतर (तत:) निर्द्वंद्व होतो असे नारद म्हणतात. म्हणजे निर्द्वंद्वता ही भूमिका मागील दोन सूत्रांत सांगितलेल्या साधनानंतर सिद्ध होणारी महत्त्वाची भूमिका आहे हे सिद्ध होते.

## सूत्र ४९

## वेदानपि संन्यसति, केवलमविच्छिन्नानुरागं लभते ।।४९।।

**अर्थ**

वेदांचा देखील योग्य प्रकारे त्याग करतो आणि जो केवळ अखंड अशा भगवत्प्रेमाचा लाभ सपादन करतो.

**विवरण** :

मागील सूत्रात कर्मफले व ती प्राप्त होण्याकरिता केली जाणारी विहित कर्मे यांचाही तो भक्त त्याग करतो असे सांगितले आहे कर्म हे एक प्रमेय आहे ते प्रमाणाधीन असते मानाधीना मेयसिद्धि । असे वचन आहे, याचा अर्थ प्रमाणाचे आधीन प्रमेय (विषय) असावे कोणत्याही विषयाचे यथार्थ ज्ञान करून देणाऱ्या साधनास प्रमाण म्हणतात. प्रमाणाचा शास्त्रग्रंथात पुष्कळ ऊहापोह आहे. प्रमाणे मानण्यात शास्त्रकारांत मतभेद आहेत पण वेदान्त शास्त्रात प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ती व अनुपलब्धी अशी सहा प्रमाणे मानली आहेत. बहुतेक प्रमाणे प्रत्यक्षोपजीवी आहेत, केवळ शब्दप्रमाण मात्र स्वतंत्र आहे. शब्दप्रमाणात लौकिक अलौकिक असे भेद मानले जातात. लौकिक शब्दप्रमाण हे मनुष्य बुद्धीत अनेक भ्रमप्रमादादि दोषयुक्त असल्यामुळे अलौकिक वस्तूच्या ज्ञानाकरिता त्याचा उपयोग नाही म्हणून अपौरुषेय व भ्रमप्रमादादि दोष रहित असे जे वेद आहेत ते लौकिक-अलौकिक सर्व विषयात प्रमाण मानले गेले आहेत

**प्रत्यक्षेणानुमित्यावा तस्तूपायो न बुद्धयते ।**
**एनं विदन्ति वेदेन तस्माद्वेदस्यवेदता ।। स्मृतिवाक्य**

'प्रत्यक्ष अनुमानादिकांनी जे उपायाचे ज्ञान होत नाही त्याचे वेदाने ज्ञान होते म्हणून त्यास वेद म्हणावे. भारतीय शास्त्रे सर्व वेदमूलक आहेत. प्रवृत्ती निवृत्ती ही वेदमूलक आहे. कोणतेही साधन जे वेदात सांगितले असेल तसेच करावे. कार्य व अकार्य काय आहे हे ठरविण्याची कसोटी वेदच होत,

'मागील सूत्रात 'कर्माचाही त्याग करतो' असे आहे, पण जोपावेतो वेद-प्रामाण्य मानले जाते तोपावेतो कर्मे टाकली जाणार नाहीत किंवा कर्मे करतो तोपावेतो वेदाचा त्याग होणार नाही. एखाद्या कर्माचा जो अधिकारी असतो त्यास वेद हा प्रेरणा देत असतो ! जो कर्माचा अधिकारीच नाही त्यास त्या कर्माची प्रेरणाच वेद देऊ शकत नाही, श्रीनारद पुढे याच सूत्रात 'केवलं अविच्छिन्नानुरागं लभते' असे सांगत आहेत अशा केवल अविच्छिन्न भगवदनुरागी भक्तांना कर्माचे बंधन नाही.

तसेच जनक-नवयोगेश्वर सवादात या विषयाचा विचार करीत असता म्हटले आहे तेथे शका घेऊन त्याचा विचार केला आहे.

वेदाज्ञा विष्णूचि परम । वेदे विहिले धर्माधर्म । भक्त आचरता विकर्म । केवी वेदाज्ञानेम न बाधी त्यासी ।।४७६।। जेवी रायाचा सेवक आप्त। तो द्वारपाळा नव्हे अकित । तेथ रायाचा पढियता सुत । त्याचा पंगिस्त तो केवी होय ।।७७।। हरिनामाचे ज्यासी स्मरण । वेद त्याचे वदी चरण । मा जो हरीचा पढियंता पूर्ण । त्यासी वेद विधान कदा न बाधी ।।७८।। भक्तापासूनि विकर्म स्थिती । कदा न घडे गा कल्पाती । अवचटे घडल्या दैवगती । त्या कर्मा निर्मुक्ति अच्युत स्मरणे ।।७९।।

ए. भा. ५

तसेच एकादश स्कधाच्या तेराव्या अध्यायात भक्तानी वेदाचा त्याग केला तरी त्याला प्रत्यवाय (दोष) नाही असे श्रीकृष्ण उद्धवास शंकासमाधानपूर्वक सागतात ' वेदवचन ते तात्त्विक । मानावे पै अवश्यक । हे तुझीच शिकवण देख । तो वेदु लटिक म्हणावा कैसा ।।४६१।। ऐशी मानाल आशंका । तेही विषयी मीचि देखा । वेदवादाच्या विवेका । विभाग नेटका सागेन ।।४६४।। अविद्या भेद सबळ ज्यासी । वेदु नियामक म्या केला त्यासी । मद्रूपी अभेदता ज्या भक्तासी । मिणधा त्यापाशी वेदवादु ।।४६५।। सबळ भेदाचे भेदभान । तंव दुर्लंघ्य वेदवचन । अभेद-भक्त माझे जाण । वेद विधान त्या न बाधी ।।४६९।। ' ए भा. १३

एवढा विचार करण्याचे कारण जो केवळ प्रेमानुरागी भक्त आहे तो कर्मफल त्याग, कर्मत्याग व कर्मास प्रेरक अशा वेदाचाही त्याग करतो येथे 'अपि' या अव्ययाचा सहेतुक उपयोग केला आहे, त्रैगुण्य विषयावेदा निस्त्रैगुण्योभवार्जुन । २–४५ असे श्रीकृष्ण अर्जुनास सागून गेले आहेत. भक्त निस्त्रैगुण्य होतो असे मागील सूत्रात सागितले आहे वेदातील कर्ममार्ग हा सामान्य पामर बहिर्मुख जीवापुढे यज्ञयागादि सकाम कर्माची स्वर्गादि फले ठेवून त्यास निषिद्ध कर्मापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करतो, पण ती स्वर्गादि कर्मफले ही अनित्य अतएव दुःखरूपच आहेत श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात. एऱ्हवी तरी नरकीचे दुःख । पावोनि स्वर्गनाम की सुख । वाचुनि नित्यानद गा निर्दोख । ते स्वरूप माझे ।।३१४।। ज्ञा ९–३१४

मागे सूत्र आठ मध्येही ' निरोधस्तु लोक–वेद–व्यापार न्यासः । असे म्हटलेच आहे. तेथेही या विषयाचा विचार केला गेला आहे

श्रीमद्भागवत चतुर्थस्कंधात नारदानी प्राचीन बर्हिराजाला उपदेश केला आहे. त्या प्रसंगात हीच गोष्ट नारदानी सागितली आहे

**यदायमनुगृण्हाति भगवान्पुरुषः पर. ।**
**सत्यजेत मतिं लोके वेदेच परिनिष्ठिताम् ।।** ४–२९–४६

'जेव्हा भक्त भगवद्ध्यान चितन करीत असतो, परपुरुष भगवंताचा अनुग्रह

हृदयात प्रगट होतो तेव्हा तो भक्त लोकाचार आणि वैदिकाचाराचे ठिकाणी अत्यंत निष्ठा ठेवणारी जी बुद्धी तिचा त्याग करतो.

शुद्ध परमात्मस्वरूपापुढे सर्वच कर्मफले तुच्छ असतात म्हणून तो सागणारा प्रेरक जो वेद त्याचाही भक्त त्याग करतो असे नारद या सूत्रात म्हणतात. कर्मे, कर्मफले किंबहुना वेदांचाही त्याग करून त्याला काय फलप्राप्ती होते ? नास्तिक मनुष्य विहित कर्माचा त्याग करील पण अनुकूल कर्मफलाचा त्याग करीत नाही, तसेच तो वेदाचाही त्याग करील म्हणजे वेदानी सांगितलेल्या आवश्यक अशा विहित कर्माचाही त्याग करील तर तो पतित होतो. पण देवर्षि नारद ज्याचे वर्णन करतात तो पतित तर होतच नाही तर 'अविच्छिन्नानुरागं लभते' अविच्छिन्न अखंड भगवदनुरागाचा त्याला लाभ होतो. येथे 'लभते' हे क्रियापद सहेतुक वाटते. जे अनुकूल प्राप्त झाले त्यास लाभ म्हटले जाते. प्रतिकूल प्राप्तीस लाभ म्हटले जात नाही. भगवद्विषयक अविच्छिन्न अनुराग प्राप्त होणे महद्भाग्याचे लक्षण आहे. येथे केवळ भक्ती असा शब्द वापरला नाही तर 'अविच्छिन्न अनुराग' म्हटले आहे. भक्ती हा शब्द व्यापक आहे. सकाम-निष्काम, व्यभिचारी-अव्यभिचारी सात्विक-राजस-तामस, असे प्रकार भक्तीत संभवतात. पण अविच्छिन्न अनुराग हा केवळ एक प्रकारचाच असतो. त्यात व्यभिचार नसतो. मागे 'परमप्रेमरूपा' असे जे भक्तिलक्षण सागितले आहे त्यासच अविच्छिन्न अनुराग म्हटले जाते, या विषयाचा विशेष विचार पुढे चौपन्नाव्या सूत्रात येणारच आहे. प्रेमाचे महत्त्वाचे लक्षण सहा प्रकारची विशेषणे देऊन त्या सूत्रात सांगितले आहे. त्या सूत्राचे व्याख्यानात विशेष विचार होईल. अविच्छिन्न अनुराग ही प्रेमाची पराकाष्ठा आहे. अशी भक्ती फलरूपा असल्याने या अवस्थेत प्राप्त झालेला प्रेमी स्वयतृप्त असतो. त्याला काही प्राप्तव्य अवशिष्ट रहात नाही. येथे 'वेदानपि संन्यसति' म्हटले आहे. याचा अर्थ हा त्याग तिरस्कारमूलक नसून तृप्तीमूलक आहे. तो भक्त जाणून-बुजून वेदत्याग करीत नाही तर वेदच तो भक्त पूर्णकाम आहे असे जाणून त्याचे-वरील आपले आधिपत्य काढून घेतो. 'तत्रवेदा अवेदाभवन्ति' असे उपनिषदात म्हटले आहे, तसाच हा प्रकार आहे.

## सूत्र ५०

# स तरति स तरति स लोकान्स्तारयति ॥ ५० ॥

**अर्थ** .

( मागील सूत्रात ज्याचे वर्णन केले आहे ) तो या ( मायानदीतून तरतो, तो ( च ) तरतो, ( किंबहुना ) तो (शरणागतांना) ( या मायानदीतून ) तारून नेतो.

**विवरण** :

शेहेचाळिसाव्या सूत्रात आरंभी ' कस्तरति माया ' मायेतून कोण तरून जातो असा प्रश्न उपस्थित करून एकोणपन्नासाव्या सूत्रापावेतो माया तरून जाणाऱ्या भक्ताची लक्षणे सागितली आहेत. ' जो सगत्याग करतो, ' महानुभवांची सेवा करतो, निर्मम होतो, एकांतवासाचा आश्रय करतो, लोकबंधाचे उन्मूलन करतो, निस्त्रैगुण्य होतो, योगक्षेमाचाही त्याग करतो, तसेच कर्मफलांचा त्याग करतो, कर्माचाही त्याग करतो, निर्द्वंद्व होतो, जास्त काय वेदांचाही त्याग करतो, तो या दैवी दुरत्यया गुणमयी मायेतून तरून जातो हे निश्चयपूर्वक द्विरुक्तीने या सूत्रात सांगतात. मायातारण म्हणजेच मोक्ष, उद्धार, कैवल्य इत्यादी होय हे मागील सूत्रात सागितलेच आहे.

' स तरति ' तो तरतो म्हणजे इतर लोक तरून जात नाहीत असा अर्थ होतो. सर्व जीवमात्राची प्रवृत्ती या मायानदीतून पलीकडे जाण्याची म्हणजेच दुःख-निवृत्तीची असते व त्याकरिता ते प्रयत्नही करीत असतातच, पण ते प्रयत्न कसे निष्फल होतात व का होतात हे श्रीज्ञानेश्वर महाराजांनी सांगितले आहे. त्या ओव्याचा भावार्थ खाली देत आहो.

श्रीकृष्णभगवान सांगतात, अर्जुना ! कोणी आपल्याच बुद्धिरूपी बाहुने ही नदी तरून जाण्याकरिता या नदीत शिरले. ते कोठे गेले त्याचा पत्ताच नाही; दुसरे कितीएक या मायानदीत ज्ञानाभिमानाच्या डोहात गर्वरूपी जलचराकडून गिळले गेले. कित्येकांनी तीन वेदरूपी सांगडीचा ( मायानदीतून तरण्याकरिता ) आश्रय केला, पण त्याबरोबर अभिमानाचे मोठे धोंडे घेतले ते मदरूपी माशाच्या तोंडात सबंधच गेले. कितीएकांनी तारुण्यरूपी कासपेटा कमरेला बाधला व मग मदनाच्या कासेला लागले ते विषयरूपी मगरानी चघळून टाकले. आता वार्धक्याच्या लाटेमध्ये असणाऱ्या बुद्धिभ्रशरूपी जाळयाने ते चोहोबाजूनी व्यापिले जातात,

आणि शोकरूपी काठावर आपटून, क्रोधरूपी भोवऱ्यात गुरफटून ज्या ठिकाणी वर येतात त्या ठिकाणी अनंत आपत्तिरूपी गिधाडाकडून टोचले जातात, नतर ते दु:खरूपी चिखलाने भरले व मग मरणाच्या गाळात फसले. याप्रमाणे ज्यानी कामाचा आश्रय केला, ते व्यर्थ गेले. कित्येकानी यजनक्रियारूप पेटी या माया-नदीतून तरून जाण्याकरिता आपल्या पोटाशी बाधली ते स्वर्गसुखाच्या कपारीमध्ये अडकून राहिले कित्येकानी मोक्षरूपी मायानदीच्या पलीकडच्या किनाऱ्याला लागावे या आशेने विहितकर्मरूपी बाहूवर विश्वास ठेवला, परतु ते विधिनिषेधाच्या भोवऱ्यात सापडले. ज्या मायानदीत वैराग्याची नाव प्रवेश करू शकत नाही विवेक-रूपी वेळूला ठाव लागत नाही याउपर अष्टाग योगाने काही तरणोपाय होतो पण तोही क्वचित होतो. याप्रमाणे आपल्या अंगच्या सामर्थ्याने ही मायानदी उतरून जाऊ असे म्हणणे कशासारखे आहे, हे विचारल्यास दृष्टाताने सागतात. जर पथ्य न करणाराला रोग घालविता येईल किवा साधूला दुर्जनाची बुद्धी कळेल, अथवा लोभी पुरुषाला ऐश्वर्य प्राप्त झाले असता तो त्याचा त्याग करील, चोराना जर न्यायाधीश (चौकशी करणारे) भितील, अथवा माशाला जर गळ गिळता येईल, अथवा एखाद्या भित्र्या माणसाला पिशाचावर हल्ला करता येईल, हरिणाच्या पाडसाला जर जाळे कुरतडून तोडता आले, मुगीला जर मेरुपर्वत ओलाडता आला तरच मायानदीचा पलीकडचा काठ जीव पाहू शकतील म्हणून हे अर्जुना ! ज्याप्रमाणे विषयासक्त पुरुषाला स्त्री जिंकता येत नाही (म्हणजे तोच तिच्या आधीन होतो) त्याप्रमाणे जीवाना ही मायारूप नदी स्वसामर्थ्याने तरता येणार नाही

या विवेचनावरून माया तरणे किती कठीण आहे, हे लक्षात येईल म्हणून तो तरतो या वाक्याला महत्त्व आहे भगवान श्रीकृष्ण हेच सागतात । **मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतांतरंति ते** ।। १४।। गी. ७

‘ जे मलाच शरण येतात ते माया तरून जातात ’

येथे एकचि लीला तरले । जे सर्व भावे मज भजले ।<br>
तया ऐलीच थडी सरले । माया जळ ।। ज्ञा. ७–९७ ।।

तसेच उद्धवास उपदेश करतेवेळीही श्रीकृष्ण भगवान म्हणतात,

विरळा कोणीएक सभाग्य येथे । हे सकळ उपाय साडूनि परते ।<br>
जो अनन्य प्रीती भजे माते । कर्मनदी त्याते कोरडी ।। १०७७।।<br>
माझे भक्तीचे तारु नातुडे । जव सप्रेमाचे शीड ना चढे ।<br>
तव तरणोपाय बापुडे । वृथा का वेडे शिणताती ।। ७८ ।।<br>
धरूनि अनन्य भक्तीचा मार्गु । करूनि सर्व धर्म कर्मत्यागु ।।<br>
हा तरणोपाय चागू । येरू तो व्यगु अध:पाती ।। ७९ ।।

एकनाथी भागवत अ. ११

श्रीमद्भागवत एकादशस्कंधात जनकाने मायातरणोपाय कोणत्या साधनाने होईल असा प्रश्न (अध्याय ३) केला होता त्याचा उत्तरात नवयोगेश्वरांनी स्पष्ट सांगितले आहे.

इति भागवतान् धर्मान् शिक्षन्भक्त्या तदुत्थया ॥
नारायणपरो माया मञ्जस्तरति दुस्तराम् ॥ २३ ॥

'याप्रमाणे भागवत धर्माचा अभ्यास करून प्राप्त झालेल्या भगवद्भक्तीने नारायणपर झालेला पुरुष दुस्तर मायेतून लीलेने तरून जातो.' या श्लोकावरील प्रसादगर्भ टीकेत श्रीएकनाथ महाराज सागतात, 'ऐशी हे भागवत धर्म स्थिती। शरण जाऊनि सद्गुरु प्रति। अभ्यासावी भगवद्भक्ती। तै मायेची शक्ति बाधू न शके॥ ६१५॥ माया वेदशास्त्रा अनावर। ब्रह्मादिका अतिदुस्तर। ते सुखे तरती भवगत्पर। हरिनाम मात्र स्मरणार्थे ॥६१६॥ हरिनामाच्या गजरापुढे। माया पळे लवडसवडे। यालागी तरणो पावो घडे। सुख सुरवाडे हरिभक्ता ॥ ६१७॥ भक्तीपाशी नित्य तृप्ति। भक्तीपाशी नित्य मुक्ति। भक्तीपाशी भगवत्प्राप्ति। मायानिवृत्ती हरिभजने ॥ ६१८॥ हरिनाम भजन कल्लोळे। माया जीव घेऊनी पळे। भक्त तरती भाळे भोळे। हरिभजन बळे महामाया ६२१॥ ए. भा. ३

प्राप्त कालात भगवद्भक्ती हाच महत्त्वाचा मायेतून तरून जाण्याचा मार्ग आहे असे सर्वच संतांनी स्वानुभवाने सिद्ध केले आहे. श्री भागवत बाराव्या स्कंधात स्पष्ट म्हटले आहे.

संसारसिंधुमतिदुस्तरमुत्तितीर्षोर्नान्यः प्लवो भगवतः पुरुषोत्तमस्य ॥
लीलाकथारसनिषेवणमंतरेण पुंसो भवेद्विविधदुःखदवार्दितस्य ॥४०॥
(स्कं. १२ अ. ४)

'अनेक दुःखांनी पीडिलेल्या पुरुषास अतिदुस्तर अशा संसारसागरातून तरून जाण्याची इच्छा करणाऱ्यास भगवंताच्या लीलाकथारससेवन या नौकेविना अन्य तरणोपाय नाही.' मूळ सूत्रात 'तो तरतो' असे विधान आहे. तो तरतो म्हणजे कोठे जातो याचे व्याख्यान ज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे.

जयां सद्गुरु तारु पुढे। जे अनुभवाचिये कासे गाढे। जया आत्मनिवेदन तराडे। आकळले ॥९८॥ जे अहंभावाचे वोझे साडूनि। विकल्पाचिया झुळका चुकाउनि। अनुरागाचा निरु ताउनि। पाणिढाळु ॥९९॥ जया ऐक्याचिया उतारा। बोधाचा जोडला तारा। मग निवृत्तीचिया पैल तीरा। झेपावले जे ॥ १०० ॥ ते उपरतीच्या वावी सेलत। सोऽहं भावाचे नि थावे पेलत। मग निघाले अनकळित। निवृत्तितटी ॥ १०१ ॥ येणे उपाये मज भजले। ते हे माझी माया तरले। परि ऐसे भक्त विपाइले। बहुवस नाही ॥ १०२ ॥ ज्ञानेश्वरी— ७

श्रीतुकाराममहाराजही सांगतात 'तरले तरती हा भरवसा। नामधारकाचा

ठसा ।। 'प्रेमी भक्त म्हणजे केवळ अविच्छिन्न अनुरागाचा लाभ ज्याला झाला आहे असा. मागील चार सूत्रातून जी अनेक साधने सागितली आहेत ती या भगवद्-भक्तीचे अंगभूत म्हणून गौण आहेत. भगवद्भक्तीत कोणता प्रतिबध येऊ नये म्हणून संगत्याग, निर्ममता, महानुभावसेवा, एकांतसेवन, लोकबन्धउन्मूलन, निस्त्रैगुण्यता, योगक्षेमत्याग, कर्मफलत्याग, कर्मत्याग, वेदत्याग, निर्द्वंद्वता ही साधने सांगितली आहेत. मायेच्या वर्धिष्णू, क्षयिष्णू व समपरिमाणी अशा तीन स्थिती सांगितल्या आहेत. माया व तिचे विकार यांची अज्ञानी बद्ध जीवांच्या ठिकाणी अनादी संस्काराने वाढच होत असलेली दिसून येते. संसार वृद्धिगत व्हावा, मान, कीर्ती, भोग वरचेवर मिळतच राहावेत याकरिता विहित निषिद्ध कर्मे करणाऱ्यांच्या ठिकाणी माया ही वरचेवर वर्धिष्णू म्हणजे वृद्धी पावणारी अशी असते. ते माया वाढविण्याचा प्रयत्न करणारे असतात, मायेतून तरून जाण्याची कल्पनाही त्यांना नसते. ती वर्धिष्णू अवस्था होय. कित्येक काही दु.खाचे आघात आले, मान, कीर्तीत उणेपणा आला, देहादिकांचे अनित्यत्व जाणले म्हणजे काही काळ माया निवर्तक काही साधनाचा अवलंब करीत असलेले दिसतात. पण अनादि विषयवासनाजन्य सस्कारामुळे पुन्हा पुन्हा संसारात पडत असतात. ही समपरिमाणी स्थिती असते. म्हणजे कधी मायाकार्याचे अनित्यत्वही पटते व अनुकूल भोग प्राप्त झाले तर त्या भोगात रुचीही निर्माण होते. तिसरी क्षयिष्णू अवस्था ही आहे की, सत्संगतीने विवेकाने मायाकार्य सर्व संसार अनित्य दुःखरूप आहे, पारत्रिक भोगही विषयजन्य, कार्य असल्याने क्षयातिशयादी सर्व दोषांनी युक्त आहेत, असा दृढ निश्चय झाल्याने या सर्वांचे कारण ही माया आहे. तिची निवृत्ती म्हणजेच त्या मायानदीतून तरून गेलेच पाहिजे असे त्या भक्तास जे वाटते ती ही क्षयिष्णू स्थिती आहे. या मायेची अशी क्षयिष्णू स्थिती निर्माण होण्याकरिता वरील चार सूत्रात जी अनेक साधने सागितली आहेत, त्याचा उपयोग होतो, अशा रीतीने माया व मायाकार्य सर्व संसाराविषयी अनास्था निर्माण झाली घ केवळ परमात्मा हाच सुखरूप आहे, त्याच्या प्रेमाच्या आड ही माया आहे, ती त्याचीच शक्ती आहे, त्याच्या कृपेनेच तिच्यातून तरून जाणे शक्य आहे म्हणून त्याची भक्ती, त्याची अनन्य प्रीती संपादन करणे यापेक्षा अन्य मार्ग नाही, असे जाणून जो केवळ भगवत्प्रीतीचाच अखंड अनुभव घेत असतो तोच मायेतून पूर्ण तरून जातो.

केवळ तोच तरून जातो असे नसून ' स लोकान्स्तारयति ।' तो आपल्याला शरण आलेल्या अन्य लोकानाही तारून नेतो असे नारद म्हणतात. भगवान श्रीकृष्ण उद्धवास उपदेश करतेसमयीही हीच भाषा वापरत आहेत.

यापरी भक्तियुक्त । होऊनिया माझे भक्त । निजानंदेगात नाचत । तेणे केले

पुनीत लोकत्रय ।। ३३२ ।। कीर्तनाचेनि महाधोके। नाशिली जगाची सर्व दु:खे। अवघे विश्वचि हरिखे। भरिले महासुखे।। उचंबळत ।। ३३४ ।। दर्शने स्पर्शने वचने। एक तारिले कीर्तने। एक तारिले नामस्मरणे। या परी जग उद्धरणे उद्धवा ।। ३३५ ।। ए. भा. १४

भक्त स्वत: भक्ती करतात व लोकाना भगवद्भक्तीचे, भगवन्नामाचे महात्म्य अट्टाहासाने पटवून अनेकांना या भक्तिमार्गाकडे प्रवृत्त करतात. श्री देवर्षी नारदाचे सर्व जीवन अनंत जीवांना मायानदीतून तारून नेण्यातच गेले नाही काय ? 'यारे यारे लहान थोर। याती भलते नारी नर। करावा विचार। न लगे चिंता कवणाची ।।' हे तुकाराममहाराजांचे उद्गारही लोकतरणच दर्शवितात. ते लोकांना का तारून नेतात ? याचे उत्तर भक्ताच्या अंत:करणातील करुणावृत्ती त्यांना स्वस्थ बसू देत नाही. 'बुडता हे जन न देखवे डोळा। येतो कळवळा म्हणोनिया ।।' हे उदगार याचीच साक्ष देतात. त्याच्या अवतारकार्याचे प्रयोजनच हे सांगितले जाते. 'अवतार तुम्हा धराया कारण। उद्धराया जन जडजीव ।।' चंदन हा जसा समीपवर्ती वृक्षांना आपला सुगंध प्रदान करतो त्यामुळे त्या सर्व वृक्षांचेही महत्त्व वाढते, त्याचा उद्धार होतो त्याप्रमाणेच भक्तिमान पुरुष हा अनेक लोकांचा उद्धार करतो. गंगा आपल्या सामर्थ्याने ओहोळास पावन करते, परिस आपल्या सामर्थ्याने लोहास सुवर्ण बनवितो, कस्तुरी आपल्या गुणाने मातीस मुल्यवान बनविते त्याप्रमाणे हा भक्तिमान पुरुष आपल्या सामर्थ्याने अनेकाना या माया-नदीतून तारून नेतो.

## सूत्र ५१-५२

## अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम् ।।५१।।

## मूकास्वादनवत् ।।५२।।

**अर्थ :**

प्रेमाचे स्वरूप शब्दाने सांगण्यासारखे नाही ।।५१।।

मुका मनुष्य एखाद्या रसाचा स्वाद घेतो पण तो वाणीने त्याचे वर्णन करू शकत नाही, तद्वत्

**विवरण** :

प्रेमाच्या स्वरूपाचा नारद विचार करणार आहेत. पण खऱ्या प्रेमाचे स्वरूप वर्णन करणे कठीण आहे, ते अनिर्वचनीय आहे. वेदान्त शास्त्रात अनिर्वचनीय शब्द सत्‌हून विलक्षण, असत्‌हून विलक्षण ते अनिर्वचनीय म्हणजे मिथ्या या अर्थाने वापरला जातो. येथे अनिर्वचनीय शब्द त्या अर्थाने घ्यावयाचा नाही, तर शब्दाने ते प्रेम व्यक्त होईल असा शब्द सापडत नाही. प्रेम सुखरूप का दुःखरूप ? प्रेमात पारतंत्र्य का स्वातंत्र्य असते ? प्रेमात ज्ञान असते का नसते ? प्रेमात भोग का त्याग ? प्रेमात आठव का विसर ? प्रेमात भेद का अभेद ? इत्यादी प्रश्नांची उत्तरे शब्दानी देणे कठीण असते. दृष्टान्तावरून आशय लक्षात येईल. मुका माणूस साखर खाईल तर ती त्यास गोडच लागेल, पण गोड आहे असे तो शब्दाने सांगू शकत नाही. ' प्रेम नये बोलता दाविता सांगता । अनुभव चित्ता चित्त जाणे ।।' असे तुकाराममहाराजही म्हणतात. ज्ञानेश्वरीत जेथे जेथे हा प्रेमाचा विषय आला तेथे तेथे त्याचे अनिर्वचनीयत्व सांगितले आहे.

हा ठायवरी किरीटी । आम्ही प्रेमळु घेवो आपणयासाठी । या बोली बोलिजत गोष्टी । तैसिया नव्हती गा ।। ज्ञा. १०–१४० ।। तरी पढियंताची कहाणी । हे भुलीची भारणी । इये तंव न बोलणी । परि बोलवी श्रद्धा ।।१५८।। म्हणोनि गा आम्हा । वेगा आली उपमा । एऱ्हवी काय प्रेमा । अनुवादु असे ।।१५९।। ज्ञा. १२ मग तया आम्हा प्रीतीचे । स्वरूप बोली निर्वचे । ऐसे नव्हे गा तो साचे । सुभद्रापती ।।६–४८४ ।।

एखाद्या वस्तूला तत्सजातीय वस्तूची उपमा देऊन शब्दाने त्याचे स्वरूप प्रतिपादन करता येते, पण प्रेम हे अद्वितीय आहे. त्याला उपमा देण्याला त्याच्यासारखी दुसरी वस्तूच नाही. शब्दाने त्याचे स्पष्ट स्वरूप व्यक्त करणे कठीण काय अशक्यच आहे. म्हणून त्यास अनिर्वचनीय असे म्हटले आहे. पूर्ण भक्तिप्रेमाचे वर्णन करणे किती अवघड आहे या विषयी एकनाथमहाराज म्हणतात,

'पूर्ण भक्तीचे निरूपण । सांगता वेदा पडले मौन । सहस्रमुखाची जिव्हा पूर्ण । थकोनि जाण थोरावे ।।' ए. भा. २–७९१ ।। आणखी एका ठिकाणी श्रीएकनाथमहाराज सागतात.

जे बोला बुद्धी न ये सहज । ते भक्तिप्रेम निजगुज ।
उद्धवा द्यावया गरुडध्वज । केले व्याज खेंवाचे ।। अ. ११–६८४

स्वतः भगवान श्रीकृष्णच भक्तीबद्दल खालील उद्‌गार काढतात.

प्रेम मजसी मोले अधिक । संवसाटी करिता नव्हे देख ।
या लागी वरीव देता सुख । नये तैं सेवक सेलेचा होय ।। अ. २४-३७७

असे प्रेमाचे महात्म्य आहे.

प्रेम श्रेष्ठ आहे, त्याचा अनुभही प्रेमी पूर्ण रूपाने घेतो, पण तो अनुभव शब्दाने व्यक्त करण्यास शब्द अपुरा पडतो. याकरिता पुढील बावन्नाव्या सूत्रात उदाहरणही दिले आहे. मुक्या व्यक्तीने साखर खाल्ली तर ती त्याला गोडच लागते पण त्या गोडीचा अनुभव ती मुकी व्यक्ती शब्दाने सांगू शकत नाही.

'मुकियाचे परी जीवी। साखर जेवी खादली।' हाच दृष्टान्त तुकाराममहाराजही देतात. जेव्हा एखाद्या वस्तूचा अनुभव घेताना त्रिपुटी मावळते, त्या वेळेस तो अनुभव सांगणारा वेगळा उरत नाही. ब्रह्मानुभवाचा हाच प्रकार आहे.

किंबहुना श्रीनिवृत्ति। ठेविले असे जिये स्थिती।
ते काय देऊ हाती। वाचेचिया ॥ –अनुभवामृत ॥९॥

असे ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. तसेच हे अनुभवस्वरूप आहे, असे पुढे म्हटलेच आहे. त्यात प्रेम, प्रेमी, प्रेमपात्र हे एकस्वरूप होऊन जातात तेव्हा ते सांगणारा वेगळा राहू शकत नाही. म्हणून ते शब्दात येत नाही. अर्थात अनिर्वचनीय आहे.

भक्तीप्रेमाचे लक्षण ठरविणे कठीण आहे. भक्ती ही सत्त्वगुणाची वृत्ती मानली तर सत्त्वगुण हा प्रकृतीचे कार्य आहे. भगवान तर प्राकृत वस्तूच्या द्वारे वश होणे शक्य नाही. भक्ती ही मायावृत्ती मानली तर माया म्हणजे मिथ्या-छल-कपट या वस्तूपासून भगवान सदैव दूर असतो. तो मायेच्या वश कसा होईल. भक्ती ही जीवाचा एक प्रकारचा प्रयत्न आहे असे मानले तर जीवाच्या सामान्य प्रयत्नाने भगवंताला वश करून घेण्याची शक्ती कशी निर्माण होते ? तसेच भक्ती ही एक भगवंताची शक्ती आहे, असे मानले तर शक्ती ही शक्तिमानाचे आधीन असते. शक्तिमान भगवंत आपल्या शक्तीच्या ताब्यात कसा राहील? पण भक्तीच्या आधीन भगवान असतो ! 'अहं भक्तपराधीनः' असे भगवद्वचन स्पष्ट आहे, सारांश भक्तिप्रेमाचे स्वरूप निश्चित करणे, त्याचे लक्षण ठरविणे कठीण आहे. म्हणूनही त्यास अनिर्वचनीय म्हटले आहे.

किंवा प्रेमाचा अनुभव असतो अंतःकरणात, मनात व मन तर सदैव आपल्या प्रेमीशी तन्मय झालेले असते. मग मनाच्या अभावात वाणीला थोडेही वर्णन करण्याची सामग्री कोठे मिळेल ? कित्येक ठिकाणी प्रेमाचे जे यत्किंचित वर्णन केलेले आढळते ते सांकेतिक मात्र असते. पूर्ण नसते. किंवा प्रेमाची प्राप्ती झाल्याशिवाय तर कोणी प्रेम जाणत नाही, व प्राप्ती झाल्यावर त्या प्रेमास वेगळेपणाने जपणारे मनच उरत नाही. मग वाणी त्याचे कथन कसे करू शकेल ? अतएव 'अनिर्वचनीयं प्रेम स्वरूपम्। मुकास्वादनवत।' असे श्रीनारद म्हणतात. प्रेम शब्दात येऊ लागेल तर ते नाटकी होईल. नाटकात प्रेमाची भाषा असते, दाक्षिण्य असते पण प्रेम नसते. पूर्ण प्रेमाच्या अनुभूतीत भाषेला स्थानच राहत नाही. ते अनिर्वचनीय आहे.

# सूत्र ५३

## प्रकाशते क्वापि पात्रे ।।५३।।

**अर्थ** :

( असे अनिर्वचनीय जरी प्रेम आहे, तरी ) एखाद्या अधिकारी व्यक्तीच्या ठिकाणी प्रकाशित होते.

**विवरण** :

सामान्यत्वाने भगवच्छ्रद्धा निर्माण होणे कठीण आहे. भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनोपदेश प्रसंगी म्हटले आहे, 'हजारो मानवांत एखादाच सिद्धीप्राप्तीकरिता यज्ञ करणारा असतो व अशा हजारो यत्नवानांतून एखादाच मला तत्त्वत: जाणतो' (७-३)

हे ज्ञानमार्गाविषयी झाले, यापेक्षाही भक्तिरहस्य गुह्य आहे. 'ज्ञान सांगता अति सुगम। भक्तिरहस्य गुह्य परम ।। अकृत्रिम उपजे प्रेम। ऐसे हे वर्म लाविल्या न लगे ।।' ना. भा. १४।२४२. असे भगवान श्रीकृष्ण उद्धवाजवळ बोलतात. प्रेम शब्दाच्या द्वारे प्रकट होऊ शकत नाही हे सिद्धच आहे, तथापि एखादा प्रेमभराने युक्त असणारा पुरुष प्रमोन्मादात काही अलौकिक व्यवहार करीत असलेला दिसतो. त्यावरून काही काही प्रेमाचा प्रकाश प्रकटपणे दिसणे शक्य असते. त्या वेळी अशा प्रेमी पुरुषाच्या केवळ वाणी व नेत्रातूनच नाही तर त्याच्या रोमरोमातून प्रेमाचे किरण बाहेर पडत असलेले दिसून येतात. असा प्रेमाचा प्रकाश एखाद्याच प्रेमी पुरुषाच्या ठिकाणी 'प्रेमे छंदे नाचे डोले। हारपले देहभाव ।।' अशा रूपाने दिसत असतो. सूर्यकिरणे एखाद्या स्वच्छ पारदर्शक काच आदि पदार्थातूनच पलीकडे जाऊ शकतात. अस्वच्छ, मलिन पदार्थांतून जाऊ शकत नाहीत. तसेच अनेक वैषयिक वासनेने युक्त अंत.करणात प्रेमकिरणे प्रवेश करू शकत नाहीत. सूत्रात प्रेमाकरिता 'प्रकाशते' हा शब्द वापरला आहे, तो महत्त्वाचा आहे. भक्ती ही प्रकाशस्वरूप आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजही सांगतात.

तैसा सहज माझा। प्रकाश जो कपिध्वजा।
ती भक्ती या वोजा ।। बोलीजेगा ज्ञा. १८

एखाद्याच्याच हृदयात हा प्रकाश पडणे शक्य आहे म्हणून 'प्रकाशते क्वापि पात्रे' असे श्री नारद म्हणतात. श्रीमद्भागवत ग्रंथामध्ये वृत्रासुर आख्यानात श्रीशुकाचार्यांनी भक्तीची दुर्लभता सांगितली आहे, ते म्हणतात.

देवांना शुद्ध सत्त्वानां ऋषीणां चामलात्मनाम्।
भक्तिर्मुकुन्दचरणे न प्रायेणोपजायते ।।४।।

मुक्तानामपि सिद्धानां नारायणपरायणः ।
सुदुर्लभः प्रशांतात्मा कोटिष्वपि महामुने ।।५।। भागवत ६-१४

'शुकाचार्य सांगतात हे परीक्षिते, श्रीमुकुन्दचरणाच्या ठिकाणी भक्ती शुद्ध-सात्त्विक देव, पवित्र आत्मे ऋषी यांच्या ठिकाणी प्रायः उत्पन्न होणे कठिण आहे अधिक काय सागावे, सिद्ध अशा मुक्त माणसामध्येही कोठीतून एखादा शांतिसंपन्न नारायण परायण प्रेमी भक्त अतिदुर्लभ आहे.'

भगवद्गीतेच्या सातव्या अध्यायामध्ये चतुर्विध भक्ताचे प्रकार सांगितले आहेत. त्यात ज्ञानी भक्त हाच श्रेष्ठ आहे व मला प्रिय आहे. असे श्रीकृष्णांनी स्पष्ट म्हटले आहे.

तेषा ज्ञानी नित्युक्त एक भक्तिर्विशिष्यते ।
प्रियो हि ज्ञानिनोत्यर्थमहं स च ममप्रियः ।। गी. ७–१७

व असा ज्ञानी भक्त अतिशय दुर्लभ आहे असेही स्पष्ट म्हटले आहे.

वासुदेवः सर्वमिति समहात्मा सदुर्लभः ।७–१९

'तो महात्मा धनुर्धरा । दुर्लभु आथि ।। असे श्रीज्ञानेश्वरमहाराजही सांगतात. येथे 'प्रकाशते' असे क्रियापद सहेतुक वापरले आहे असे वाटते. यावरून प्रेम हा विकार नाही. विकार परप्रकाश्य असतात, जड असतात. व कार्य असतात. प्रेम हे चैतन्यस्वरूप अतएव स्वयंप्रकाश असे आहे. म्हणूनच प्रेमसूर्य, प्रेमज्योती असे प्रेमाचे वर्णन आढळते. प्रकाश हा अंधाराचा निवर्तक असतो. तसेच प्रेम हे सर्व विकारांचे नाशक आहे. मात्र ते दुर्मिळ प्रेम कोणा एखाद्या अधिकारी पुरुषाच्या ठिकाणीच प्रकाशित होते. सूत्रात 'पात्रे' असाही शब्द आहे. 'पात्र' हा शब्द योग्य या अर्थी घेतला जातो. प्रेमास योग्य कोण आहे ? ऐहिक पारत्रिक भोगच काय पण सलोकतादी मोक्षचतुष्टयासही तुच्छ समजणारा तोच योग्य आहे. श्रीज्ञानेश्वर-महाराज स्पष्ट म्हणतात, 'जया भक्तीची येतुली प्राप्ति । जे कैवल्याते परते सर म्हणती ।।' ज्ञा. ९–१९२.

असा प्रेमळ दुर्मिळ आहे. 'पै प्रेमळाचे सांकडे । आमुचे घरी ।।' असे भगवान श्रीकृष्ण म्हणतात. 'क्वापिपात्रे' येथे त्या पात्राचा नामनिर्देश किंवा लक्षण सांगितले नाही. यावरून ते पात्रही अनिर्वचनीयच आहे असे मानावे लागते. मात्र ते प्रेमाला योग्य पाहिजे. सिंहिणीचे दूध सोन्याच्या पात्रातच टिकते. इतर धातूंच्या पात्रात ठेवले तर ते भांडे फुटून जाईल. याप्रकारे हे रसस्वरूप प्रेमही कोण्या एखाद्या अधिकारी पुरुषाच्या हृदयात प्रकाशित होते. म्हणूनच श्रीज्ञानेश्वरमहाराज आपल्या हरिपाठात 'नित्यनेम नामी ते प्राणी दुर्लभ ।' 'ज्ञानदेव म्हणे नाम हे सुलभ । सर्वत्र दुर्लभ विरळा जाणे ।' असे म्हणतात. मात्र कोठे ना कोठे अधिकारी व्यक्तीत प्रेमाचा प्रकाश पडलेला दिसून येतो. ज्या हृदयात त्या भगवद्विस्मरणाने परम-

व्याकुलता आलेली आहे, अनन्यतापूर्ण जे हृदय तेच प्रेम प्रकाशित होण्याला योग्य असे पात्र आहे असे समजावे.

## सूत्र ५४

## गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षण वर्धमानम्विमच्छिन्नं सूक्ष्मतरमनुभवरूपम् ।।५४।।

**अर्थ :**

ते प्रेम गुणरहित, कामनारहित, प्रतिक्षणी वृद्धिगत होणारे, विच्छेदरहित सूक्ष्माहूनही सूक्ष्मतर व केवळ अनुभवस्वरूप आहे.

**विवरण :**

मागील एकावन्नाव्या सूत्रात प्रेम हे अनिर्वचनीय आहे. ते शब्दाने प्रगट होत नाही असे सांगितले. पण वेदांतशास्त्रात परब्रह्मही वाणी, मन यांना गोचर नाही म्हणून अनिर्वचनीय जरी म्हटले जाते तरी त्याचेही काही लक्षण— स्वरूपलक्षण, तटस्थलक्षण— या स्वरूपाने सांगितलेच आहे, विधिमुखाने, निषेधरूपाने त्याचा विचार अध्यात्मशास्त्रात केलाच आहे, सामान्यांना ज्ञान करून देण्यास ती वस्तू शब्दात आणून कोणत्यातरी शक्तिवृत्ति, गौणीवृत्ती वा लक्षणा वृत्तीने तिचा बोध करून द्यावा लागतो. नसता त्या प्रयोजनयुक्त वस्तूचा बोधही न झाल्याने तिचे प्रयोजनही सिद्ध होणार नाही. म्हणूनच शास्त्रांत 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' असा त्या परब्रह्माचा विचार केला आहे. तसेच प्रेम जरी अनिर्वचनीय व अनुभवैकगम्य असले तरी त्याचे काहीच लक्षण न सांगितले तर सामान्यांना कळणार कसे? म्हणून या सूत्रात सहा विशेषणे देऊन प्रेमाचे लक्षण स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. प्रेमाकरिता सहा विशेषणे दिली आहेत. जसे भगवंतास षड्गुणैश्वर्यसंपन्न म्हणजे यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य यांनी युक्त मानले जाते तसे प्रेम ही भगवंताचे स्वरूपच आहे. त्याची सहा लक्षणे या सूत्रात सांगितली आहेत. त्यात प्रथम 'गुणरहित' हे लक्षण आहे. प्रत्येक जीव हा कोणत्या ना कोणत्या गुणाने बांधला गेलेलाच आहे. भगवान श्रीकृष्ण म्हणतात,

त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।
मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम ।। ' गीता, ७–१३

: सत्त्वरजतम या तीन गुणमय भावांनी मोह पावलेले हे सर्व जग या

गुणाहून वेगळ्या व विकाररहित अशा मला (परमात्म्याला ) जाणत नाही.'

मनुष्याचे प्रत्येक व्यवहार हे कोणत्या ना कोणत्या गुणाला धरूनच होत असतात. किंबहुना भक्तीचे व भक्ताचेही तीन गुणांनी पडणारे ती प्रकार भागवतात सांगितले आहेत. तो विचार पुढे सूत्र छप्पनच्या विवरणात विस्तृतरूपाने येईल. मागे दुसऱ्या सूत्राच्या विवरणात प्रेमाचेही श्रीएकनाथमहाराजांनी सांगितलेले तीन गुणांनी सिद्ध होणारे तीन प्रकार सांगितले होते. पण ते गौणच मानले आहेत.

याप्रमाणे भक्ती ही जर तीन प्रकारांची सिद्ध होते तर प्रेम हे गुणरहित कसे राहील ? अशी शंका येहेल. हे त्रिविध भक्तीचे प्रकार भागवतामध्ये तृतीय स्कंधात कपिलमहर्षींनी आपल्या मातेस देवहूतीस सांगितले आहेत. पण याच्याच पुढे त्यांनी निर्गुण भक्तियोगही सांगितला आहे, व तो श्रेष्ठ असून त्याचे फलही दाखविले आहे.

**मद्‌गुणश्रुतिमात्रेण मयि सर्वगुहाशये ।**
**मनोगतिरविच्छिन्ना यथा गंगाम्भसोऽम्बुधौ ॥ ११ ॥**
**लक्षणं भक्तियोगस्य निर्गुणस्यह्युदाहृतं ।**
**अहैतुक्यव्यवहिता या भक्तिः पुरुषोत्तमे ॥ १२ ॥**
**सएंषभक्तियोगाख्य आत्यंतिक उदाहृतः ।**
**येनातिव्रज्य त्रिगुणं मद्भावायोपपद्यते ॥ १३ भागवत ३–२९**

'ज्याप्रकारे गंगेचा प्रवाह सतत समुद्राकडे प्रवाहित होत असतो त्याचप्रकारे भगवान म्हणतात, माझ्या गुणांच्या श्रवणमात्राने तैलधारावत् अविच्छिन्न रूपाने सर्वांतर्यामी अशा माझ्याच रूपाकडे वृत्ती प्रवाहित असणे हे निर्गुण भक्तियोगाचे लक्षण आहे. हाच आत्यंतिक श्रेष्ठ भक्तियोग होय. याच्याद्वारा तो प्रेमीभक्त त्रिगुणांचे अतिक्रमण करून माझ्या प्रेमरूप अप्राकृत स्वरूपास प्राप्त होतो.' हेच ते गुणरहित प्रेम होय. रजोगुण व तमोगुणापेक्षा सत्त्वगुण हा परमार्थ मार्गाला पोषक आहे व तो हृदयात वाढला पाहिजे असे कोठे कोठे सांगितले जाते हे खरे पण त्या सत्वाचाही एक अहंकार वा बंध निर्माण होतो. तो अहंकारही शुद्ध निर्विकार प्रेमात खपत नाही म्हणून त्या प्रेमास असे म्हटले आहे.

विषयप्रेम कधीच गुणरहित नसते. कारण ते विषयच तमोगुणापासून झालेले आहेत. तसेच विषयावर प्रेम करणारा जीव रजोगुणतमोगुणाने बांधलेला असतो. भगवत्प्रेम मात्र गुणरहित पाहिजे. मागे सूत्र सत्तेचाळीसमध्ये भक्त निस्त्रैगुण्य होतो असे सांगितलेच आहे. गुणात्मक प्रेम हे कामस्वरूप असते व काम हा रजोगुण-समुद्भव असतो. अज्ञ लोक या कामालाच प्रेम असे समजत असतात. पण काम आणि प्रेमात महदन्तर आहे. याचा विचार मागे झालाच आहे. तसेच सांसारिक प्रेम हे गुण पाहूनच होत असते. कोठे रूपावर, कोठे कलादि गुणावर, कोठे धन पाहून

प्रेम केले जाते. पण ते रुप जर बदलले वा गुण बाधित झाले, धन नष्ट झाले, विद्या विस्मृत झाली तर हे गुणप्रेम नष्ट होते. म्हणून यास प्रेम संज्ञाही देणे उचित नाही. तसेच गुण वा धन, रूप, इत्यादि पाहून जे प्रेम केले जाते ते करणाऱ्याच्या मनात काही कामना असतातच. ते प्रेम निष्कामकधीच नसते. जग सर्व कामनेने बद्ध आहे. भगवत्प्रेम हे कामनाशून्य पाहिजे. ते निरपेक्ष असणे अवश्य आहे.

भक्त श्रेष्ठ प्रल्हाद भक्तियोगात काम किती बाधक व घातक आहे हे सांगत आहे.

**इंद्रियाणि मनः प्राण आत्मा धर्मो धृतिर्मति :।**
**ऱ्हः श्रीस्तेजः स्मृतिः सत्यं यस्य नश्यन्ति जन्मना ।। ८**
**विमुञ्चति यदा कामान्मानवो मनसि स्थितान्।**
**तर्ह्येव पुंडरीकाक्ष भगवत्त्वाय कल्पते ।। ९ ।। भाग. ७ । १८**

भक्त प्रल्हाद म्हणतो, ' हृदयात कोणत्याही कामनेचा उदय होताच इंद्रिय, मन, प्राण, देह, धर्म, धैर्य, बुद्धी, लज्जा, श्री, तेज, स्मृती आणि सत्य हे सर्व नष्ट होऊन जातात. हे देव, जेव्हा मनुष्य हृदयातील सर्व कामनांचा त्याग करतो त्याच वेळी तो भगत्स्वरूपाची प्राप्ती करून घेऊ शकतो. '

भक्तीत कामना असेल तर त्या कामनेचा विषय हा साध्य ठरेल व ज्याची भक्ती करावयाची तो साधन म्हणजे गौण ठरेल. प्रेमात प्रेमाचा जो विषय तो कधीच गौण नसतो तो मुख्यच असावयास पाहिजे. प्रेम आणि काम दोन्ही बरोबर राहत नाहीत. आपल्या प्रियतमास सुख देण्याचा प्रयत्न प्रेमात असतो व त्याच्यापासून आपल्याला सुख भोगण्यास मिळावे हा भाव कामात असतो. वैषयिक प्रेमात स्वसुखसुखित्व असते, प्रियतमाच्या सुखाने सुखी होणे– ' तत्सुखसुखित्व ' नसते, हे मागे सूत्र चोवीसच्या विचारात सांगितलेच आहे. भक्तीप्रेमात कामना शिरली की ती त्या भक्तीचा नाश करते. कामक्रोधादिक हे ' भजनमार्गीचे मांग । मारक हे ।।'(ज्ञा३) असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे. कामयुक्त भक्ती ही व्यभिचारी असते. भगवान श्रीकृष्ण सांगतात,

गोडी आवडी ते परपुरुषी । मिथ्या लुडबुडी निज पतीपाशी ।
ते पतिव्रता नव्हे जैसी । जाण भक्ती तैसी व्यभिचारी ।।
नाना विषयी ठेऊनि मन । जो करी ध्यान अनुष्ठान ।
ते जार स्त्रियेच्या ऐसे जाण । नव्हे पावन ते भक्ती ।।
ए. भा. ११. ११०८-९

वृत्रासुर हा एक मोठा भगवद्भक्त होऊन गेला. त्यानेही वरील प्रमाणेच उद्गार काढले आहेत. तेथे शुकाचार्यांनी म्हटले आहे,

**यस्य भक्तिर्भगवति हरौ निःश्रेयसेश्वरे ।**
विक्रीडितोऽमृताम्भोधौ किं क्षुद्रैः खातकोदकैः ।। **भाग. ६-१२-२२**

' निःश्रेयसस्वरूप श्रीहरीचे ठिकाणी ज्याची दृढ भक्ती आहे त्याला क्षुद्र विषयाशी काय प्रयोजन आहे ? अमृताच्या सागरात यथेष्ट निमज्जन करणाऱ्या पुरुषाची एखाद्या घाण डबक्यातील पाण्याकडे प्रवृत्ती होईल काय ? '

' सा न कामयमाना नियोधरूपत्वात ।' असे आरंभी सातव्या सूत्रात स्पष्ट नारद सांगून गेलेच आहेत. काम व राम एक अधिकरणात नांदू शकत नाहीत. कामनेचा विषय परोक्ष असतो. व प्रेमाचा अपरोक्ष असतो, अपरोक्षात कामना नसते म्हणून खरे प्रेम कामनारहित असते.

परमप्रेम अमृतरूप आहे व ते प्राप्त झालेला पुरुष सिद्ध, अमृत व तृप्त होतो असे सूत्र चारमध्ये सांगितले आहे. ते प्राप्त झालेला पुरुष कशाचीही वांच्छा करीत नाही इ. पाचव्या सूत्रात मागे सागितले आहे. तसेच ते प्रेम प्राप्त झालेला पुरुष आत्माराम होतो असे सहाव्या सूत्रात म्हटले आहे. असे प्रेमाचे जर माहात्म्य आहे तर त्या प्रेमात कामना होणार कशी ? कामनेचा विषय तोच असतो की जो अनुकूल वाटत असतो प्रेमी पुरुषाला त्याच्या प्रेमाच्या विषयाविना अन्य विषय अनुकूल व प्रिय वाटेलच कसा ? प्रेम अनन्य असते असेही दहाव्या सूत्रात सांगितले आहे. कामना व अनन्यता एका ठिकाणी कशी राहू शकेल ? म्हणून ' कामनारहिते ' असे प्रेमाचे स्वरूप नारद सांगतात.

आता प्रेमाचे तिसरे लक्षण ' प्रतिक्षणवर्धमानं ' कोणतेही साधन साध्य प्राप्ती नंतर क्षीण होत जाते. विवेक वैराग्यादि साधने मोक्षापावेतो असतात. मोक्ष प्राप्त झाल्यावर,

**तेथ वैराग्य विवेकेसी । आटे बंध मोक्षेसी । वृत्ती तिये आवृत्तीसी । बुडोनि जाय ।। ज्ञा. १८-११३५. ते वैराग्यादिक तैसें । पिकलिया आत्मप्रकाशें । मग वैराग्यें-सीही नाशे । अविद्याजात ।। ज्ञा. १८-७९१**

किंबहुना आत्मस्वरूपाची प्राप्ती करून देणाऱ्या वृत्तिज्ञानाचीदेखिल अशीच स्थिती आहे, तेही ज्ञानप्राप्तीनंतर मावळते. म्हणून प्रेमाचे महत्त्व अधिक आहे. ते कधी न्यून होतच नाही तर वृद्धिगत होत राहते. ' पढियंते सदातेचि परी भोगी नवी नवी रुचि ।। ' (अनुभवामृत १०-१३) असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. प्रेम अमृतरूप असल्यामुळे त्याचा वीट येणे शक्य नाही.

वीट नाही पांडुरंगी । वाढे आर्त अंगी तें ।। तु० ।।

प्रेम प्रतिक्षणी वृद्धिगत होणारे असते हे अनेक दृष्टान्तानें ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

वर्षाकाळीं सरिता । जैसी चढो लागे पांडुसुता ।
तैसी नीच नवी भजतां । श्रद्धा दिसे ।।

परि ठाकिलियाही सागरू । जैसा मागीलही यावा अनिवारू ।
तिथे गंगेचि ऐसा पडिभरू । प्रेमभावा ।।
तैंसे सर्वेंद्रियासहित । मजमाजी सूनि चित्त ।
जे राति दिवो न म्हणत । उपासिती ।। ज्ञा. १२–३६–३८

याच विषयाचा विशेष विचार श्रीकृष्णानी उद्धवास उपदेश प्रसंगी केला आहे. तो अनेक दृष्टान्ताच्या द्वारे श्रीएकनाथ महाराजानी विस्तारपूर्वक अनुवादला आहे. 'कृपण जरी दूरी जाये । तो घरीचे ठेवणे जीवी वाहे । तैसे माझे प्रेम पाहे । जो हृदयी वाहे सर्वदा ।। २४३ ।। का वंध्या गर्भ संभवल्यापाठी । उल्हासे वाढवी गोरटी । तैसी माझ्या प्रेमाची पोटी । आवडी मोठी जै होय ।। २४४ ।। जैसे वंध्या गर्भाचे डोहळे । तैसे माझ्या प्रेमाचे सोहळे । पोटातलेनि कळवळे । उल्हास बळे चढोवढी ।।२४५।। सदैव जावई आलिया घरा । जेवी सर्वस्व वेची सुदरा । तेवी माझा कळवळा पुरा । ज्याच्या जिव्हारा वोसंडे ।। २४६ ।। बीज अधिकाधिक पेरिता । उल्हास कृषीवळाचे चित्ता । तेवी सर्वस्व मज अर्पिता । तैशी उल्हासता जै होय ।। २४७ ।। या नाव गा माझी भक्ती । उद्धवा जाण निश्चिती । जे भक्तीसी भुलोनि श्रीपती । भक्ता हाती आतुडलो ।। २४८ ।।' ए. भा. १४

प्रेमाची गोडी नित्यनूतन म्हणून ते प्रतिक्षणी वृद्धिगत होते असे भगवान सांगतात.

नवल भजनाची परवडी । आवडीतें प्रसवे आवडी ।
क्षणोक्षणी चढोवढी । नित्य नूतन गोडी प्रेमाची ।। ए. भा. २४–३३६

श्रीज्ञानेश्वरमहाराज दृष्टान्ताने सांगतात,

वत्स धालया हीवरी । धनु न वचावी दुरी ।
अनन्यप्रीतीची परी । ऐसीच आहे ।।
तेणे काजेवीणही बोलावे । ते देखिले तरी पहावे ।
भोगिता चाड दुणावे । पढियंतया ठायी ।।
ऐसी प्रेमाची हे जाती... ज्ञा. १८. ७८–९
अंगी प्रेमाचे भरते । नेघे उतार चढते ।। तु.

भक्त श्रेष्ठ कबीरांनी म्हटले आहे.

छिनहि चढे छिनहि उतरे वो तो प्रेम न होय ।
अघट प्रेम पिंजर बसे प्रेम कहावे सोय ।। १ ।।

प्रेमात आश्रयालंबन (प्रेम करणारा) व विषयालंबन (ज्याच्यावर प्रेम केले जाते तो) दोघांनाही उत्कट आनंद प्रतीत होतो, या कारणामुळेही प्रेम प्रतिक्षण वर्धमान असते. म्हणूनच 'अविच्छिन्न' हे त्याचे लक्षण सांगितले आहे. अविच्छिन्न आहे म्हणूनच प्रेम प्रतिक्षण वर्धमान असते अथवा प्रतिक्षण वर्धमान

आहे म्हणून अविच्छिन्न म्हणजे विच्छेदरहित आहे.

मानवी जीवनात अनेक वृत्तींचा विच्छेद देश, काळ, कर्म, वियोग, प्रतिबंध, दु.ख इत्यादि अनेक कारणानी झालेला दिसूत येतो. पण ज्यांच्या हृदयांत पूर्ण प्रेमाचे खऱ्या रीतीने एकदा प्रागटच झाले असता कोणत्याही कारणाने विच्छेद होत नाही. 'उज्ज्वलनीलमणि' नामक भक्तिशास्त्रावरील ग्रंथात प्रेमाची ऱ्हीच व्याख्या केली आहे.

**सर्वथा ध्वंसरहितं सत्यपि ध्वंस कारणे ।**
**यद्भावबंधनं यूनोः तत्प्रेमा परिकीर्तितः ।।**

'प्रेमात बाधा येण्याची कारणे निर्माण झाली असताही जे सर्वथा अबाधितच असते असे जे प्रेमीजनांचे अव्यभिचारी भावबंधन त्यास प्रेम असे म्हणतात.'

प्रेमाचा विच्छेद होईल असे कोणते कारणच नाही. जेव्हा एखादी कामना असते तेव्हां ती पूर्ण न झाली तर, निराशा झाली तर, मागणी पूर्ण होऊन स्वार्थ साधला न गेला तर, प्रेम विच्छिन्न व्हावे. पण प्रेमात कामनाच नसते हे प्रथमच 'कामनारहितं' या पदाने सागितले आहे. ज्याच्यावर प्रेम करावयाचे त्याचे दोष दिसले तर प्रेम कमी व्हावे, पण जर गुण पाहून प्रेम होईल तरच दोषामुळे ते घटेल. प्रेम हे गुण पाहून होत नाही व प्रेमाच्या नेत्रानी दोष दिसतच नाहीत ! आपले आंधळे, पांगळे, काळे असे मूल असले तरी आई त्याच्यावर प्रेम करीत असते

आधळे पांगळे मुके अनर्गळ । जैसे तैसे बाळ पढिये माते ।। तु०।।

प्रेमात विच्छेद निर्माण करण्याचे सामर्थ्य कोणातच नाही. जी गोष्ट दुर्बळ असते म्हणजे तिच्यात स्वतःचे सामर्थ्य कमी असते ती विच्छिन्न होणे सभवनीय असते, किंवा तिच्यापेक्षा बलवान वस्तू पुढे आली तरी ती आपल्या सामर्थ्याने अन्य वस्तूचा विच्छेद करू शकते. प्रेम हे आपल्या बळाने पूर्ण असते. तसेच त्याच्यापुढे अन्य कोणाचेही बळ अपुरेच पडते. प्रत्यक्ष देवाचेही बळ अपुरे पडते ! 'हृदय बंदीखाना केला । आत विठ्ठल कोडिला ।।' असे प्रेमभक्तिमती जनाबाई म्हणते. 'भावापुढे बळ । नाही. कोणाचे सबळ ।।

असे तुकोबाराय म्हणतात. प्रेमापुढे भोग व मोक्ष याचेही काही चालत नाही.

जयाचिय आवडी । केली मजसी कुळवाडी
भोग मोक्ष बापुडी । त्यजिली कुळें ।। ज्ञा. १२– ८१

असे भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला सागतात.

सती जाणाऱ्या स्त्रीच्यापुढे प्रत्यक्ष अग्नी प्रज्वलित झालेला दिसतो, म्हणजे मरणच पुढे दिसते पण तिला त्याचे काही वाटत नाही. 'अग्न देखोनिया सती । अंगी रोमांच उठती ।।' (तु.) तिला आनंदाच्या उकळ्या फुटतात.

वोखटे मरणा ऐसे । ते ही आलिया अग्निप्रवेशे ।
परी प्राणेश्वरोद्देशे । नगणीचि सती ।। ज्ञा. १६–१८६ असे ज्ञानेश्वर महाराज तिचे वर्णन करतात. म्हणजे प्रेमात प्रत्यक्ष काळही प्रतिबंध आणू शकत नाही, रावणाने सीतेचे प्रेम प्रभूरामचंद्रावरून कमी व्हावे व आपल्यावर जडावे म्हणून तिचा किती तरी छळ केला. अनेक प्रलोभने दाखविली. मृत्यू पुढे आणून उभा केला पण या सर्व खटाटोपाचा काहीच परिणाम झाला नाही. भक्तश्रेष्ठ भानुदास महाराजांना अनागोंदीच्या राज्यात सुळावर जाण्याचा प्रसंग आला. पण त्यावेळचे त्याचे उद्गार पाहा–

जै हे आकाश वरपडो पाहे । ब्रह्मगोळ भंगा जाये ।
वडवानळ त्रिभुवन खाये । तरी मी तुझीच वास पाहेगा विठोबा ।।
सप्तसागर एकवट होती । जै हे विरोनि जाय क्षिती ।
पंच महाभूते प्रलय पावती । तरी मी तुझाचि सांगाती गा विठोबा ।।

या पेक्षा प्रेमाच्या अविच्छिन्नतेचे अधिक वर्णन काय करावे ?

विदग्ध माधव या भक्तिप्रधान काव्यग्रंथात एक प्रसंग वर्णिला आहे. भक्तिमती राधेला श्रीकृष्णाचा विरह असह्य झाला ती फार दुःखविलाप करते हे पाहून आपल्या सखीचे दुःख दूर करावे या हेतूने ललिता नामक गोपी श्रीकृष्णाकडे गेली व राधेचे दुःख तिने सांगितले पण श्रीकृष्णाने तिकडे दुर्लक्ष केले. ललितेचा अपमान केला. तेव्हा दुर्मुखलेली ती परत आली. तिचे ते उदासमुख पाहून राधेने ओळखले की शामसुदराने माझी प्रार्थना ऐकली नाही ललिता रडत असलेली पाहून राधा तिला म्हणते,

**न चायातः कृष्णो यदि सखि तवागः कथमिदं ।**
**मुधा मा रोदीमैं कुरु परमिमामुत्तर कृतिम् ।**
**तमालस्य स्कंधे विनिहित भुजा वल्लरिरियं ।**
**यथा वृंदारण्ये चिरमविचला तिष्ठति तनुः ।।**

राधा म्हणते, ‘सखे ! श्रीकृष्णाने येथे येण्याचे मान्य केले नाही यात तुझा काय अपराध आहे ? व्यर्थ रडू नकोस. पण आता त्याच्या वियोगात हे शरीर राहाणे शक्य नाही, याकरिता माझ्या मृत्यूनंतर माझ्या भुजा या तमालवृक्षाला अशा आवळून बाधा की बरेच दिवस माझे शरीर या वृंदावनात असेच राहील. म्हणजे श्रीकृष्ण नाही भेटला तरी त्याच्या वर्णाच्या या तमालवृक्षाशी शरीर लपेटून राहील !’ यावरून प्रेमाची जात कशी असते हे कळून येईल.

प्रेमाची तंव जाती ऐसी । आठवूं नेदी आठवणेसी ।
हा भावो जाणवें सज्जनासी । ते भक्तिप्रेमासी जाणते ।। ए. भा. ११–६८७ असे श्रीकृष्ण भगवान उद्धवास सांगतात. अशा प्रेमाचा विच्छेद होणे कसे शक्य आहे ? गंगेचा व समुद्राचा कोणी विच्छेद करू शकेल काय ? म्हणून प्रेम हे

अविच्छिन्न आहे असे नारद म्हणतात

संसारात मृत्यू सर्वांचा विच्छेद करीत असतो. स्त्री, पुरुष माता, पिता, बन्धू, गृहधन, लोक या सर्वांचा विच्छेद मृत्युमुळे होतो पण खरे प्रेम हे मृत्यूमुळे ही विच्छिन्न होत नाहीं. भक्तिरसामृतसिंधूत म्हटले आहे.

**पञ्चत्वं तनुरेतु भूतनिवहाः स्वांशे विशंतु स्फुटं ।**
**धातारं प्रणिपत्य हन्त शिरसा तत्रापि याचे वरम् ।**
**तद्वापीषु पयस्तदीय मुकुरे ज्योतिस्तदीयाङ्गण– ।**
**व्योम्नि व्योम तदीय वर्त्मनि धरा तत्तालवृन्तेऽनील: ।।**

' मृत्यूनंतर शरीरातील पंचतत्त्वे आपल्या आपल्या मूल महातत्त्वात मिसळून जातील ती जावोत. पण ब्रह्मदेवाला मस्तक नम्र करून, अभिवादन करून आम्ही हे वरदान मागतो की, आमचे शरीरातील जलाश आमच्या प्रेमास्पदाच्या त्या विहरीतील जलामध्ये मिसळून जावो की जिच्या पाण्याचा त्यांच्या स्नानादिका-करिता उपयोग होत असतो. आमच्या शरीरातील तेज त्या दर्पणात सामावले जाऊ दे ज्यात प्रेमी आपले रूप पाहतो. आमच्या देहातील आकाश ज्या अंगणात ते वावरतात त्यात मिसळो. आमच्या शरीरातील माती ज्या मार्गावरून ते चालतील त्या पृथ्वीत मिळो. आमचा प्राणवायु ज्या पंख्यानी त्यांना वारा घातला जातो त्या वायूत एकरूप होवो ' असाच श्री ज्ञानेश्वर महाराजाचा एक प्रसिद्ध अभंग आहे.

**आकार स्थूळ नाशिवंत । हे तरी जाईल भूमि आंत ।**
**तयावरी हरि चालत । तेणे होईल कृतकृत्य ।।१।।**
**देहे जावो अथवा राहो । पांडुरंगी दृढ भावो ।।धृ।।**
**दुजा गुण आपी मिळे । तरि मी होईन गंगाजळ ।**
**हरि अभिषेक अनुदिनी । सुखें सर्वांगावरी खेळे ।।२।।**
**तिजा गुण तेजरूप । तरि मी होईन महादीप ।**
**हरिरंगणी दीपमाळा । दीप उजळीन समीप ।।३।।**
**वायु व्यापक चौथा गुण । तरि विंजणा होईन ।**
**हरि अष्टांगे निववीन । ऐशा दृढ धरिन खुणा ।।४।।**
**आकाश पाचाव गुण । तरि मी प्रासादी राहीन**
**बापरखुमादेवीवरा । अखंड तुझे अनुसंधान ।।५।।**

ही स्थिती म्हणजेच अविच्छिन्न प्रेमाचे मूर्तिमंत लक्षण होय.

या नंतर पांचवे लक्षण ' सूक्ष्मतरं ' हे आहे. काही शारीरिक व्यापार स्थूल दृष्टीस गोचर होत असतात, काही अनुमानाने ओळखले जातात, तर काही शब्दा-वरून जाणले जातात. प्रेम हे शब्दाने कळण्यासारखे नाही. ते अनिर्वचनीय आहे. एखाद्याच्या भजनपूजनादि बाह्यक्रियावरून त्याच्या प्रेमाचे अनुमान कोणी कोणी

करतात. पण ते खरे असतेच असे नाही.

सासूसाठी रडे सून । भाव अंतरीचा भिन्न ।।
जळो प्रेमा तैसा रंग । जाय भुलोनि पतंग ।।

असे तुकाराम महाराज म्हणतात. 'कीर्तनाचे वेळे रडे फुंदे लोळे। प्रेमेवीण डोळे गळताती ।।' असे ही तुकाराममहाराजांनीच म्हटले आहे. एखादा आर्तभक्त, अर्थार्थी भक्तही असू शकतो. तो पुष्कळ भक्ती करीत आहे असे दिसते. पुष्कळ उपचारही गोळा करतो, टाहो फोडतो– पण तेथे प्रेम नसते, तर एखादा गोकुळवासी गोपिकांप्रमाणे आपला सर्व संसार करीत असलेला दिसतो. लोक त्याला संसारीच समजत असतात. पण तो खरा प्रेमी असतो, त्याचे अंतरंग प्रेमरसाने व्याप्त असते.

एक कथा प्रसिद्ध आहे. श्री नारदमहर्षी गोकुळाहून परत येत असता सहज मार्गात श्री दुर्वासऋषीची भेट झाली दुर्वासांनी विचारले, 'नारदा, कुठून आला ?' नारद म्हणाले. 'गोकुळात राधेच्या दर्शनाला गेलो होतो.' दुर्वास म्हणाले, 'अहो, ती तर व्यभिचारिणी म्हणून प्रसिद्ध आहे. तिचे दर्शन कसे घेता ?' नारद म्हणाले, 'तुम्ही तिला कधी भेटला नाही. तुम्हाला तिची योग्यता कळणार नाही.' दुर्वासानी मनात म्हटले, नारदा सारखे वर्णन करतात तर एकदा जाऊन बघून तरी येऊ. म्हणून ते गोकुळात राधेच्या घरी गेले, कोणी महापुरुष आले आहेत हे पाहून तिने अत्यंत भक्तीने त्यांचे आदरातिथ्य केले. पूजा केली. हात जोडून प्रार्थना केली व म्हणाली, 'महाराज ! आज माझे घर पुनीत झाले. आपले दर्शन झाले. या दासीला काय आज्ञा आहे ?' दुर्वास म्हणाले, 'राधे ! आताच मला नारदऋषी भेटले व ते म्हणाले गोकुळात राधेकडे गेलो होतो.' राधा म्हणाली, 'होय महाराज आज भाग्याचा दिवस आहे. आजच महानश्रेष्ठ महाभागवत नारद येऊन गेले व आता आपण दर्शन देऊन कृतार्थ केले.' राधेचा हा सद्भाव व तिच्या मुखावरील ते दिव्य तेज पाहूनच दुर्वासाना बरेच समाधान वाटले पण मनातील संशय विचारावा म्हणून ते म्हणाले, 'राधे ! जग तर तुला दोषी, व्यभिचारी म्हणते व नारदासारखे महावैष्णव तर तुझ्याविषयी फार आदराची भावना ठेवतात, तेव्हा खरे काय आहे ? जगाप्रमाणे दोषी मानावे का भक्त म्हणावे ?' राधा म्हणाली, 'महाराज ! मी हे काही जाणत नाही. मला कोण काय म्हणते याचा विचार मी कधी केला नाही व करण्याचे कारण नाही. मी एकच भावना उराशी बाळगून आहे की मी त्या श्रीहरीची आहे. त्याने माझा अंगीकार केला. भली असले तरी त्याची व वाईट असले तरी त्याची आहे. हे माझ्या जीवनाचे सार आहे. इतर गोष्टीचा विचार करावयाला मला 'अवकाश नाही.' हे तिचे उद्‌गार ऐकून दुर्वास ऋषीचे सर्व संशय दूर झाले व राधेविषयी त्यांच्या

अंत:करणात अत्यंत आदराची भावना निर्माण झाली. म्हणजे दुर्वासासारख्याना-देखील या राधादेवीच्या प्रेमाची कल्पना आली नाही. मग सामान्याना कशी येणार ? म्हणून सूक्ष्मतर म्हटले आहे.

कित्येक पुरुष संसारबधनातून आत्मज्ञानाने मुक्त झालेले असतात. ब्रह्मरूप बनतात. पण त्यांनाही हे प्रेम प्राप्त होते असे नाही

भक्तिप्रेम सुख नेणवे आणिका । पंडित वाचका ज्ञानियासी ।।१।।
आत्मनिष्ठ जरी झाले जीवन्मुक्त । तरी भक्तिसुख दुर्लभ त्या ।।२।।

भगवान श्रीकृष्ण व अर्जुन यांचा संवाद ज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितला आहे.

जया सोहंभाव हा अटकु । मोक्षसुखालागोनि रंकू ।
तयाचिये दिठिचा झणे कलंकु । लागेल तुझिया प्रेमा ।। ज्ञा. ६–११५.

भक्तिशास्त्रामध्ये म्हटले आहे

**ज्ञानत सुलभा मुक्तिर्भुक्तिर्यज्ञादि कर्मत ।**
**सेयं साधनसाहस्त्रैर्हरिभक्तिस्सुदुर्लभा ।। भ. र. सिं.**

'ज्ञानाने मुक्ति सुलभ आहे, यज्ञादिकाने भुक्ति (भोग) सुलभ आहेत, पण हजारो साधने केली तरी हरिभक्ति (प्रेम) हे अत्यंत दुर्लभ आहे' म्हणून ते सूक्ष्मतर म्हटले आहे.

देहात काही विशिष्ट उत्तम चिन्हे प्रगट झाली तर त्यावरून तो पुरुष ज्ञानी आहे असे म्हटले जाते. अशी अमानित्वादि लक्षणे गीतेत तेराव्या अध्यायात सागितली आहेत. त्यावरून ज्ञानाचे अनुमान होते पण प्रेमात अमानित्वही असते तसा मानही असतो; प्रेमळ आपल्या प्रेमीकडून कित्येक वेळी मानाचीही अपेक्षा करतो. स्तुतीत प्रेम मानावे तर कित्येक भक्ताच्या मुखातून निंदेचेही शब्द बाहेर पडलेले आढळतात अनेक संतांचे भाडणाचे अभंग प्रसिद्ध आहेत. आदराच्या क्रियेतून काही सद्भावना कळत असतात. पण प्रेम कोणत्या क्रियेने अभिव्यक्त होते ? यशोदेने काठीने मारले, उखळीस बांधले, तरी ते प्रेमच व वात्सल्याने दुग्धपान करविले तरी ते प्रेमच. एखादा भक्त श्रद्धेने सर्व सामग्रीसह पूजा करील तेही प्रेम होईल कारण नवविधा भक्तीत अर्चन भक्ती सागितलीच आहे पण भृगुऋषी येऊन वक्षस्थळावर लत्ता प्रहार करतो तोदेखील प्रियोपचारच मानला गेला असे ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.

जी भृगूचा कैसा अपकारु । की तो मानूनि प्रियोपचारू ।
तोषेचि ना शारङ्धरु । गुरुत्वासी ।। ज्ञा. १६–२६ ।।

म्हणजे प्रेमाचा निश्चितकाळ, निश्चित अवस्था, निश्चित व्यवहार ठरविणे

कठिण आहे. कधी ज्ञानात तर कधी अज्ञानातही प्रेम दृग्गोचर होते. दारिद्र्यात व श्रीमंतीतही प्रेमाचा व्यभिचार नाही. प्रमाणजन्य ज्ञान अज्ञान्याला शहाणे करते तर प्रेम हे सर्वज्ञालाही वेड लावते

आपुले ते थोर पण। नारायण विसरला॥
वेडा झाला वेडा झाला। लाचावला भक्तीसी॥

असे देवालाही वेड लावणारे प्रेम आहे. मोठे मोठे ज्ञानी सर्वज्ञ मुक्त पदवीला प्राप्त झालेले पुरुष या प्रेमाने मोहित होऊन श्रीकृष्णाच्या कीर्तनरंगात रगून देह-भाव विसरून अष्ट सात्त्विक भावाने युक्त होऊन नाचत असलेले दिसतात. याचे कारण काही कळत नाही, म्हणून त्यास सूक्ष्म असे म्हटले जाते.

जी वस्तू सूक्ष्म असते ती अतीद्रिय असते. परमात्मा सुक्ष्मात्सूक्ष्मतर— अणो-रणीयान्— असा आहे म्हणून तत्स्वरूप असणारे प्रेमही सूक्ष्मतर असते असे म्हटले तर वावगे होणार नाही.

स्मृतीत जसे प्रेम तसे विस्मृतीतही प्रेम असते, भक्तिशास्त्रीय ग्रथात एक प्रसग वर्णिला आहे. एकदा राधेला भगवद्विरह झाला, सतत त्याचे स्मरण होत आहे, पण तो भेटत नाही. तिला सुख लागेल म्हणून तिच्या सख्या तेथे श्रीकृष्णाचे गुणगान करून त्याचे स्मरण देऊ लागल्या. तेव्हा ती त्याना म्हणाली,

**सन्त्यज सखितवुदन्तं यदिसुखलवमपि समीहसे सख्याः।**
**स्मारय किमपि तदिरत् विस्मारय हन्त मोहनं मनस॰॥**

'हे सखे! तुझ्या सखीला जर क्षणभर सुख व्हावे असे वाटत असेल तर त्या श्रीकृष्णाची चर्चा न करिता दुसरे कशाचे तरी स्मरण करून दे, मला त्याचे विस्मरण होईल असे काही तरी कर.' हे पाहून तेथे एक ध्यानधारणा करणारा मुनी होता, त्याला आश्चर्य वाटले व तो मनात म्हणतो—

प्रत्याहृत्य मुनि॰ क्षणं विषयतो यस्मिन्मनो धित्सति।
बाला सौ विषयेषु धित्सति ततः प्रत्याहरन्ती मन॰॥
यस्य स्फूर्तिलवाय हन्त हृदये योगी समुत्कण्ठते।
मुग्धेयं बत पश्य तस्य हृदयान्निष्क्रान्तिमाकांक्षति॥

'काय आश्चर्य आहे! मोठे मोठे योगी मुनी हे आपल्या मनास धारणा ध्यान-द्वारा ते मन विषयापासून परावृत्त करून भगवंताकडे लावण्याचा अहर्निश प्रयत्न करतात, तरी त्यांचे मन पुन्हा विषयाकडे जाते. पण ही मुग्धा त्या मनाला भगवता-पासून परावृत्त करून विषयाकडे लावण्याचा प्रयत्न करीत आहे. ज्याच्या क्षणिक स्फूर्तीकरिता योगी पुरुष सदैव उत्कंठि असतात त्याला ही स्त्री आपल्या हृदया-प,सून दूर करण्याचा प्रयत्न करीत आहे!' म्हणजे राधेची अशी ही भाषा ही प्रेमातच गणली जाते. विधीत प्रेम तसे निषेधातही प्रेम दृग्गोचार होते म्हणून

सूक्ष्मतर म्हटले जाते. भगवान श्रीकृष्ण भक्तीची सूक्ष्मता उद्धवास स्पष्ट सागत आहेत.

अलक्ष्य लक्षेना माझी भक्ती। अतर्क्य तर्केना शास्त्रयुक्ती।
अगाध नातळे निश्चिती। साधन व्युत्पत्ती शिणताही ॥२३८॥
पूर्ण माझे भक्तीचा पार। मजही नकळे साचार।
यालागी मी भक्ताचा आज्ञाधार। नुल्लघी उत्तर सर्वथा ॥
अगाध भक्ताची थोरी। या लागी मीही सेवा करी।
भक्तपद धरिले उरी। वदी शिरी अंघ्रिरेणू ॥
भक्त म्हणविता वाटे गोड। भजनमुद्रा अति अवघड।
भक्तीचें अंतर अति गूढ। न कळे उघड श्रुतिशास्त्रा ॥

ए. भा. १४. २३९-४१

यापेक्षा सूक्ष्मतेचे अधिक वर्णन काय करावे ?

यानंतर भक्तीचे शेवटचे सहावे लक्षण 'अनुभवरूपम्' असे नारद सागतात. काही गोष्टी शारीरिक क्रियेवरून कळणे शक्य असते, काही क्रिया किवा भावना ज्याच्या त्याच्या भाषणावरूनही कळत असतात. तसे प्रेम व्यक्त होणारी एखादी निश्चित अशी शब्द योजना किवा क्रिया नाही. प्रेमाचे शब्द साहित्यातून सापडतात, प्रेम व प्रेमीक याच्यामधील प्रेमाचे संवादही वाचावयास मिळतात, नाटकादिकातून प्रेमाची दृश्ये पाहावयास व भाषा ऐकावयास मिळते, पण तेथे प्रेम असते असे नाही. म्हणूनच 'अनुभव चित्ता चित्त जाणे' असे सत म्हणतात.

अनुभवातही व्यवहारात त्रिपुटी प्रतीत होत असते– अनुभविता. अनुभाव्य व अनुभव पण खऱ्या प्रेमाच्या पूर्णतेत ही त्रिपुटीही प्रतीत होत नाही भक्तिग्रथात राधा व ललितेचा संवाद वर्णिला आहे ललिता गोपीने एकदा राधेला विचारले, 'राधे ! श्रीकृष्णाशी तुझा काय सबध आहे ?' राधा म्हणाली, 'तुला जो वाटेल तो सबध तू मानू शकतेस. खऱ्या प्रेमात संबंधाची महती नाही, संबध हा कदाचित प्रेमाचे साधन होईल, साध्य नाही.' यावर ललिता म्हणाली, 'आम्हास असे वाटते की तू प्रियतमा आहेस व तो प्रियतम आहे.' यावर राधा म्हणाली, 'सखे, तू काही जाणत नाहीस.'

**सखि न स रमणो नाहं रमणीति भिदावयोरास्ते ॥**
**प्रेमरसेनोभयमन इहमदनो निष्पिपेष बलात् ॥**

राधा म्हणते, 'हे सखी ! खरे सांगावयाचे तर आता अशी अवस्था आहे की तो प्रियतम नाही व मी प्रियतमा नाही. आता आमच्या दोघात तो भेद राहिला नाही. प्रेमरसाने मीलनाची तीव्र आकाक्षा जागृत झाली तिने बलपूर्वक दोघाना एकरूप करून टाकले. आता मनेच दोन राहिली नाहीत. भेद तर मनामुळेच

होतो ?'

एका ठिकाणी या प्रेमाचे खालीलप्रमाणे वर्णन आढळते.

**अद्वैतं सुखदुःखयोरनुगुणं सर्वास्ववस्थासु यत् ।**
**विश्रामो हृदयस्य यत्र जरसा तस्मिनहार्यो रसः ।।**

' हे प्रेम सुखात वाढत नाही व दुःखात घटत नाही, दोन्हीही प्रियतमच देतो अशी प्रतीती असते. म्हणून दरिद्रता, ऐश्वर्य, रोग, स्वास्थ, स्वप्न, जागृत् अशा सर्वच अवस्थामध्ये हे प्रेम समानच राहात असते. हृदयाला त्यानेच विश्राती प्राप्त होते. वार्धक्यानेही त्या रसाला शिळेपणा येत नाही ' हाच प्रेमाचा विचित्र अनुभव आहे प्रेमात त्रिपुटी नष्ट होऊन शुद्ध अनुभवरूपातच कसे राहते ही गोष्ट उद्धव–श्रीकृष्ण संवाद प्रसगी एकनाथ महाराज सागत आहेत.

हृदयी हृदय झाले संलग्न । देही देहा पडले अलिगन । मनेंसी एक झालें मन । स्वानंद पूर्ण वोसडे ।।३९।। देवो विसरला देवपण । भक्ता नाठवे भक्तपण । दोघाचे उडाले दोनीपण । स्वानदी पूर्ण बुडाले ।।३९२।। सेव्य सेवकता ठेली गोठी । द्वैत भावाची खुटली दृष्टी । भक्ति साम्राज्याच्या पाटी । दोघाची झाली भेटी निजात्मता ।।३९३।। स्थूळ लिंग आणि कारण । इहीं उपलक्षिजे महाकारण । ते देह चतुष्टयाची आठवण । आठविते कोण ते ठायी ।।३९४।। तेथ निबिड आणि निघोट । सुखस्वरूप घनदाट । नाही आदि मध्य शेवट । ते झाले प्रकट स्वयभ ।।३९५।।

श्री ज्ञानेवर महाराजही स्पष्टच सांगत आहेत.

तरी क्रिया कीर न साहे । अद्वैती भक्ती आहे ।
हें अनुभावचिजोगे, नोहे । बोला ऐसे ।। ज्ञा. १८

## सूत्र ५५

## तत्प्राप्य तदेवावलोकयति, तदेव श्रृणोति, तदेव भाषयति, तदेव चिंतयति ।।५५।।

**अर्थ :**

(मागील सूत्रात सागितलेल्या) त्या प्रेमाला प्राप्त झालेला प्रेमी (सर्वत्र) या प्रेमासच पाहतो; त्या प्रेमाचेच सदैव श्रवण करतो, प्रेमाचेच अखंड वर्णन करीत असतो, व हृदयात प्रेमाचेच चिंतन करीत असतो.

**विवरण** :

मागील सूत्रात गुणरहित, कामनारहित, प्रतिक्षण वृद्धिंगत होणारे, सूक्ष्म, अविच्छिन्न व अनुभवस्वरूप असे प्रेमाचे सहा प्रकारच्या महत्त्वपूर्ण विशेषणानी वर्णन केल्यानंतर त्या दिव्य प्रेमरसात निमज्जन करणारा प्रेमी पुरुष कसा असतो, म्हणजे त्याचा दर्शन श्रवण भाषण चिंतनादि व्यापार प्रेममय कसा होतो, ते नारद-महर्षि या सूत्रात सांगतात. मनुष्याचा अंतरातील दृढ अनुभवच त्याच्या सर्व इंद्रियव्यापारातून प्रगट होत असतो असा नियम आहे. ' **अंतरीचे धावे स्वभावें बाहेरी । धरिता ही परी आवरेना ।** ' असे तुकाराम महाराजही म्हणतात. याच आशयाने या सूत्रात प्रेमप्राप्त झालेल्या पुरुषाचा सर्व दैहिक व्यवहार प्रेममय कसा बनत असतो ते सांगितले आहे.

येथे सूत्रात ' तत्प्राप्य ' म्हणजे ' ते प्रेम प्राप्त झाले असता ' असा शब्दार्थ होतो. पण ते प्रेमाश्रय, प्रेमाधार जो असेल त्याहून वेगळे राहू शकत नाही. हीच अवस्था गीतेमध्यें दहाव्या अध्यातात सांगितली आहे. भगवान म्हणतात—

**मच्चित्ताः मद्‌गतप्राणा बोधयन्तः परस्परम्**
**कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्तिच ।।१०–९.**

' माझ्या ठिकाणी ज्यांचे चित्त आहे म्हणून जे मद्रूप झाले व माझ्या ठिकाणी ज्याचे प्राण आहेत म्हणून माझ्याच योगाने जे तृप्त झाले आहेत असे माझे भक्त परस्पराना हा प्रेमाचा बोध देत आणि नित्य माझ्या गुणांचे वर्णन करीत समाधान पावतात व आनंदात मग्न होतात. ' या श्लोकावरील टीकेत श्रीज्ञानेश्वर महाराज सांगतात.

चित्तें मीचि झाले । मियाचि प्राणे धाले । जीवो मरो विसरले । बोधाचिया भुली ।।११९।। मग तया बोधाचे नि माजें । नाचती संवादसुखाची भोजें । आतां एकमेकां घेपे दीजें । बोधचिवरी ।।१२०।। जैसी जवळिकेंची सरोवरें । उचंबळलेया कालवती परस्परें ।। मग तरंगासी धवळारे। तरंगचि होती ।।१२१।। तैसी येरयेरांची मिळणी । पडत आनंद कल्लोळांची वेणी । तेथ बोधाची लेणी । बोधेंचि मिरवी ।।१२२।। तेव्हा तया महासुखाचे नि भरे । धांवोनि देहाचिये गांवां बाहिरें । मिया धाले तेणें उद्‌गारें । लागती गाजों ।।१२३।। जैसी कमळकळिका जालेपणें । हृदयी-चियां मकरंदातें राखों नेणें । दे रायारंकां पारणें । आमोदाचें ।।१२७।। तैसेनि मातें विश्वीं कथित । कथितेनि तोषें कथू विसरत । तयां विसरा माजी विरत । आंगें जीवें ।।१२८।। ऐसें प्रेमाचेनि बहुवसपणे । नाही राती दिवो जाणणें । केलें माझे सुख अव्यंगवाणे । आपणपेयां जिही ।।१२९।। ज्ञानेश्वरी अ. १०.

भगवत्प्रेम प्राप्त पुरुषाचे सर्व व्यवहार प्रेममय कसे होतात हे वरील ओव्यां-तून स्पष्ट होते. याच स्थितीचे ज्ञानेश्वरी अध्याय नवव्यांत सुंदर वर्णन आढळतें

श्रीकृष्ण सांगतात,

जयांचिये वाचे माझे आलाप। दृष्टी भोगी माझेंचि रूप। जयाचें मन संकल्प। माझाचि वाहे ॥४४५॥ माझिया कीर्तीविण। जयाचें रितें नाही श्रवण। जया सर्वांगी भूषण। माझी सेवा ॥४४६॥ जयांचें ज्ञान विषो नेणें। जाणीव मजचि एकातें जाणें। जया ऐसें लाभे तरी जिणे। एऱ्हवी मरण ॥४४७॥ ऐसा आघवांचि परी पाडवा। जिही आपुल्यिा सर्व भावा। जियावयालागी वोलावा। मीचि केला ॥४४८॥ ज्ञा ९. खऱ्या प्रेमाची प्राप्ती झाल्याशिवाय ही अवस्था प्राप्त होणे शक्य नाही. खालील श्री तुकाराम महाराजांच्या अभंगातून त्यांचा हा प्रेममय अनुभव स्पष्ट होत आहे

जेथे देखे तेथे तुझीच पाऊलें। विश्व अवघें कोंदाटले। रूप गुण नाम अवघा मेघश्याम। वेगळे ते काय उरले॥ जाता लोटांगणी अवघीच मेदिनी। सकळ देव-पाट झाले। सदा सर्वकाळ सुदिन सुवेळ। चित्त प्रेमे असे धाले॥ अवघा आम्हा तूचि झालासि देवा। संसार हेवा कामधंदा। न लगे जाणे कोठे काहीच करणे। मुखी नाम ध्यान सदा॥ वाचा बोले ते तुझेचि गुणवाद। मंत्र जप कथा स्तुति। भोजन सारूं ठायी फल ताबूल काई। पूजा नैवेद्य तुज होती॥ चालता प्रदक्षिणा निद्रा लोटांगण। दंडवत तुजप्रती। देखोनि दृष्टी परस्परे गोष्टी। अवघ्या तुझ्या मूर्ति॥

वरील अभंगातून या सूत्राचा अर्थच विशद होत नाही काय ? श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या ' अनंत रूपे अनंतवेषे देखिले तयासी। बाप रखुमादेवीवरू खूण बाणली कैसी॥ ' या अभंगातून हा प्रेमप्राप्तीचा अनुभवच प्रगट होत आहे. श्री एकनाथ महाराज एका लौकिक दृष्टान्ताने हाच अनुभव प्रगट करीत आहेत.

दीपु लाविजे गृहाभीतरी। तोचि प्रकाशे गवाक्षद्वारी। तेवी मनी प्रगटला श्रीहरी। तोचि इंद्रियातरी भजनानंदु॥३६२॥ तेचि इद्रिय व्यापार। सागिजती सविस्तर। स्वाभाविक इंद्रिय व्यवहार। भजन तत्पर परब्रह्मीं॥३६३॥ जंव दृष्टी देखें दृश्याते। देवोचि दिसे तेथे। यापरी दृश्य दर्शनाते। अर्पी भजन सत्ते दृष्टीचा विषयो॥३६४॥ एकनाथी भागवत– जनक नवयोगेश्वर संवाद अ. २

जो विकार अंतरात पूर्णत्वाने बाणला असेल तोच बाहेरही दृश्य रूपाने दृष्टिगोचर होतो असा एक निसर्ग सिद्ध नियम आहे.

**तैसें मन हें पांडवा। मूळ इंद्रियभावा। हेंचि राहटे आघयां। द्वारीं इहीं॥३०२॥ परि जियेवेळी जैसें। जें होऊनि आंत असे। बाहेरि ये तैसें। व्यापाररूपें॥३०३॥**

ज्ञानेश्वरी अ. १३

श्री एकनाथ महाराजांच्या चरित्रात एक कथा प्रसिद्ध आहे. एकनाथ महाराजांनी रामायणावर मराठी भाषेत भावार्थ रामायण नामक अलंकार चढविला

आहे हे प्रसिद्ध आहे. तो ग्रंथ लिहित असता त्यावर ते पुराणही सांगत असत. ओघानें सीता शुद्धीचा प्रसंग सुदरकांडात आला. श्रीमारुतिराय हे सीताशोधाकरिता लंकेत प्रविष्ट झाले. सीतादेवीला रावणाने ज्या अशोकवनात ठेविले होते त्या वनाचे वर्णन चालू होते. त्या वनात अनेक वृक्षाना पाढरी फुले लागली होती असे नाथ महाराज सागून गेले. जेथे श्रीरामकथा चालू असते तेथे श्रीमारुतिरायांची उपस्थिती असते, त्याचा एक पाट माडलेला असतो. त्यांत नाथ महाराजासारखा भक्त, प्रेमळवक्ता असल्यानतर तेथे त्याची उपस्थिती असणे स्वाभाविक आहे. त्यांचे गुप्त रूपाने तेथे वास्तव्य होतेच. त्यानी पांढरी पुष्पे लागली होती हे ऐकले पण त्याना ते पटलें नाही. कारण ते जेव्हा लंकेत अशोकवनात गेले तेव्हा त्याना त्या फुलाचा रंग तांबडा दिसला होता. कार्यक्रम आटोपून सर्व लोक निघून गेल्यानंतर श्रीमारुतिराय नाथापुढे प्रगट झाले, नाथाना फारच फार आनंद झाला, त्यांनी साष्टांग दंडवत घातले नाथ म्हणाले, ‘ हे भक्तराया, धन्य भाग्य माझे की आज आपले अकस्मात दर्शन झाले. ’ मारुतिराय म्हणाले, ‘ अहो एकनाथ ! मी कां आलो माहित आहे का ? तुमच्यासारखे भक्त, रसिक, कवी रामकथा सांगत असता आम्ही तेथे असणारच. पण आतापावेतो तुम्ही जे रामचरित्र वर्णन केले त्यात काही चूक नव्हती. पण आजच्या वर्णनात एक चूक आढळून आली. ’ नाथ म्हणाले, ‘ हे महारुद्रा ! मला प्रभूरामराय जशी प्रेरणा देतात तसे मी लिहितो व तेच सांगतो. आतापावेतो त्यानीच सर्व लिहवून घेतले व आजही तेच समर्थ प्रेरणा देणारे आहेत. बरे चूक तरी कोणती ?’ मारुतिराय म्हणाले, ‘ अशोक वनातील वृक्षांना पाढरी फुले लागली होती असे तुम्ही म्हणाला, पण मी स्वतः तेथे गेलो होतो. या डोळयानी मी पाहिले ती फुले तांबडया रंगाची होती. नाथांनी विचार केला की मारुतिराय काही खोटे बोलणार नाहीत, पण मला जी प्रभू प्रेरणा देतो ती तरी खोटी कशी म्हणावी ? आतापावेतो जर कोठे चुकलें नाही तर आताच कसे चुकेल ? नाथानी थोडा विचार केला. त्याना या घोटाळयाच्या कारणाची कल्पना आली. ते म्हणाले, ‘ आपण म्हणता तेही खरेच व मी सांगतो तेही खरेच आहे. अहो ! मुळात ती फुले पांढरीच होती. पण तुम्ही लंकेत प्रवेश केल्यानंतर श्रीसीतामातेची दीन, असाहाय अशी परिस्थिती पाहून तुम्हाला अत्यंत क्रोध आला होता. त्या क्रोधामुळे तुमचे नेत्र अतिशय आरक्त झाले होते. त्याचा परिणाम म्हणून तुम्हास जे जे पांढरे ते ते सर्व तांबडे लाल दिसावयास लागले. मुळात ती फुल श्वेतवर्णाचीच होती.’ हे ऐकून मारुतिरायांचे ही समाधान झाले. ‘ तत्प्राप्य तदेव अवलोकयति ’ या सूत्राचा आशय ही असाच आहे प्रेमाने हृदय भरले, मन-प्रेममय बनले, अंतःकरणात दुसरा भावच उरला नाही अशा वेळी नेत्रही जे जे पाह्यतील ते सर्व प्रेमस्वरूपच दिसणार.

तसेच या प्रेमी पुरुषाच्या कानांत जो ध्वनी येतो तो कसाही आला तरी त्यास त्या प्रेममय परमात्म्याच्या प्रेमसंगीताचाच स्वर आहे असे वाटू लागते. श्री ज्ञानेश्वर महाराजानी वृक्षावर बसलेल्या एका कावळयाचा शब्द ऐकला. त्याना वाटले हा परमात्मा पाडुरगाबद्दल मला शकुनच सागत आहे. ते म्हणतात,

**पैल तो गे काऊ कोकताहे । शकुन गे माये सांगताहे ।।**
**उडरे उडरे काऊ तुझें सोन्याने मढवीन पाऊ ।**
**पाहुणे पंढरिराऊ घरा कैं येती ।।**

कानात तेच शब्द ऐकू आले तर मुखातून अन्य भाषा कशी बाहेर पडेल ? जिव्हा अविच्छिन्न रूपाने त्याच प्रेमसुधेचे पान करीत राहणार

माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ।।,
बोलणेचि नाही । आतां देवावीण काई ।। तु

हे उद्‌गार याच भूमिकेचे आहेत. एक सामान्य गृहस्थ तुकोबाराया जवळ येऊन प्रपंचाच्या गोष्टी करू लागला. ते त्याला स्पष्ट म्हणाले.

नका मज पाशी । वदो प्रपंचाचे विशी ।।
नाइकवे कानी । मज देवावीण वाणी ।।

याच आशयाने ' तदेव श्रृणोति तदेव भाषयति ' असे सूत्रात म्हटले आहे.

सूत्रात ' तदेव चिन्तयति ' असे वाक्य आहे प्रेमाने हृदय भरले असता अन्य वस्तूचे चिंतन होईल कसे ? संकल्प विकल्प हा मनाचा स्वभाव आहे. पण प्रेमी पुरुषाचा संकल्प विकल्प भगवद्रूपच होतो. नवयोगेश्वर जनकराजास सांगतात.

म्हणोनि संकल्प विकल्प । अवघे झाले भगवद्रूप । या लागी भक्त नित्य निष्पाप । सत्य संकल्प हरिदास ।। ३५२ ।। जो जो सकल्पकामी कामु । तो तो होय आत्मारामु । तेथ भजनाचा संभ्रमु । अति निःसीमु स्वये वाढे ।। ३५३ ।। मना होता समाधान । समाधाने अधिक भजन । पूर्ण बाणलें अनुसंधान । ध्येय ध्याता ध्यान । समरसें भजे ।। ३५५ ।। तुर्या साक्षी उन्मनी । याही लाविल्या भगवद्भजनी । जंववरी अवस्थापणी । आप आपणी मुकल्या नाही ।।३५६ ।। ए. भा. २. याच आशयाने ' तदेवचिन्तयति ' असे म्हटले आहे.

भगवत्प्रेम प्राप्त झाल्यावर त्याचेच सदैव चिन्तन होते. चिंतनाचे चार भाग संभवतात. संकल्प, विकल्प, विचार व अहंकार. प्रेमप्राप्त पुरुष प्रियतमविषयकच संकल्प करीत असतो. ' संकल्पासी अधिष्ठान । नारायण गोमटें ।।' प्रेमी पुरुषाचे हृदय अखंड प्रियतमाचेच संकल्प करीत असते. गोपिकांची अवस्था कशी होती त्याचे वर्णत तुकाराममहाराज करीत आहेत.

त्यांचे ध्यानीं मनी सर्व भावें हरी । देह काम करी चित्त त्यापें ।।
त्याचेचि चिंतन कृष्ण कोठें गेला । कृष्ण हा जेविला नाहीं कृष्ण ।।

कृष्ण तयाध्यानी आसनीं शयनी । कृष्ण देखें स्वप्नी कृष्णरूप ।।
गोविंदाचे ध्यान निजालिया जाग्या । आणिक वाऊग्या न बोलती ।।
न बोलती निजलिया हरीवीण । जागृती स्वप्न एक झाले ।। तु०

या प्रमाणे विकल्पही प्रेमविषयकच होतात. भगवान जर भेटला नाही तर तो का आला नाही; काय कारण असावे ? आपल्या कडून कळत नकळत काही चूक तर झाली नाही ना ? काही पाप तर आडवे आले नाही ना ? त्याला कोणी अन्य प्रेमासक्त भक्ताने अडविले तर नाही ना ? असे नाना संशय विकल्प निर्माण होतात. ते त्या प्रेमामुळेच होतात. तसेच मनच काय पण बुद्धीही त्या प्रेमास्पदालाच विषय करते. म्हणजे त्याच्या मीलनाचे उपाय तसेच त्याच्या स्वरूप स्वभावादिकांचाच विचार करणारी होते निश्चय हा बुद्धीचा धर्म आहे. ती एक-विधतेने याच्याच ठिकाणी दृढ राहते. आपली दृढता ढळू देत नाही. यासच अनन्यता म्हणतात. तसेच त्या प्रेमी पुरुषाचा अंहकार ही त्या प्रेमास्पदालाच विषय करतो. मी त्याचा आहे तो माझा आहे 'मी त्याचा आहे' ही 'तदीयता-वृत्ति' व तो माझा आहे यास 'मदीयता' म्हटले जाते.

सूत्रांत प्रत्येक वाक्यांत 'एव' शब्द घातला आहे. तो अन्य क्रियांची व्यावृत्ती करणारा आहे. म्हणजे प्रेमी पुरुषाच्या व्यवहाराचा विषय एकमेव भगवानच असतो असे त्याने सुचविले आहे.

एक विषय तो सकळांचा हरी । त्याच्या आवडीने आवडी इतरी । अंध बधिर हे प्रेत लोकाचारी । त्यांची कीर्ति गाइली पुराणांतरी वो ।।

बोलावा विठ्ठल पहावा विठ्ठल करावा विठ्ठल जीवे भावे ।। तु
येणे सोसे मन झाले हावभरी । परत माघारी येत नाही ।।

हीच या सूत्रात दर्शविलेली श्रेष्ठ अवस्था होय.

## सूत्र ५६

## गौणी त्रिधा गुणभेदादार्तादिभेदाद्वा ।।५६।।

**अर्थ** :

गौणी भक्ती गुणभेंदाने अथवा आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू या भेदाने तीन प्रकारची होते.

**विवरण** :

सूत्र एकावन्न पासून पंचावन्नाव्या सूत्रापावेतो प्रेमस्वरुपाचा उत्कृष्ट विचार

केला आहे प्रेमाचे स्वरूप व प्रयोजन स्पष्ट सांगितले. या प्रेमभक्तीलाच भक्तिशास्त्रात पराभक्ती, श्रेष्ठ भक्ती म्हटले जाते. अशी ही भक्ती एखाद्याच्याच ठिकाणी प्रगट होते असे मागे त्रेपन्नाव्या सूत्रात म्हटले आहे. पण या विश्वात अनेक मानव भक्ती करीत असलेले दिसून येतात. किंबहुना भक्ती करणे हा एक मानवी जीवनाचा स्थायीभावच आहे पण मानव प्राणी अनादि मायेने त्रिगुणात्मक आहेत. त्या गुणाप्रमाणे त्याचे सर्व व्यवहार होतात. म्हणून गीतेमध्ये कर्म, कर्ता, ज्ञान, बुद्धी, धृती, सुख यासर्वांचे तीन प्रकार सांगितले आहेत. सतराव्या अध्यायांत मानवाच्या अंत.करणांत वास्तव्य करून असलेल्या श्रद्धेचेदेखील तीन प्रकार विस्ताराने सांगितले आहेत. त्यामुळे तप, दान, यज्ञ, इत्यादि साधनाचे तीन प्रकार संभवतात, ते ही सांगितले आहेत. यावरून मानवाच्या अंत:करणात जी भक्ती आहे तीही तीन प्रकारची होऊ शकते. ज्या ज्या गुणाचे अत करणांत आधिक्य असेल तशीच कोणतीही क्रिया होत असते

तैं प्राणियें तंव स्वभावे। अनादिमाया प्रभावे। त्रिगुणाचेचि आघवें। वळिले आहाती ॥ ५६ ॥ तेथही दोन गुण खांचती। मग एक धरी उन्नती। तैं तैसियाचि होती वृत्ती। जीवांचिया ॥ ५७ ॥ वृत्ति ऐसे मन धरिती। मना ऐसी क्रिया करिती। केलिया ऐसी वरिती। मरोनि देहे ॥ ५८ ॥ ज्ञा० १७ ॥

मनुष्याची वृत्ती पूर्वसंस्कारानुसार ज्या ज्या गुणाने युक्त म्हणजे व्याप्त असते त्या त्या गुणाप्रमाणेच कोणतेही व्यवहार होतात हे उघड आहे. म्हणून भक्तीत ही त्रिगुणाची व्याप्ती आहे. श्रीमद्‌भागवतातील तृतीय स्कंधातर्गत कपिलदेवहूती सवादात भगवद्‌वतारस्वरूप कपिलानी माता देवहूतीस गुणभदाने होणाऱ्या भक्तीचे तीन प्रकार व त्याचे स्वरूप सांगितले आहे.

भक्तियोगो बहुविधो मार्गैर्भामिनि भाष्यते ।
स्वभावगुणमार्गेण पुसां भावो विभिद्यते ॥७॥
अभिसंधाय यो हिंसां दम्भं मात्सर्यमेव वा ।
संरम्भी भिन्नदृग्भावं मयि कुर्यात्स तामस ॥८॥
विषयानभिसंधाय यश ऐश्वर्यमेव वा ।
अर्चादावर्चयेद्यो मां पृथग्भावः स राजसः ॥९॥
कर्मनिर्हारमुद्दिश्य परस्मिन्वा तदर्पणम् ।
यजेद्यष्टव्यमितिवा पृथग्भाव. स सात्त्विकः ॥१०॥

कपिल म्हणतात, ' हे माते ! साधकांच्या भावनेप्रमाणे भक्तियोगाचा अनेक प्रकारे विचार केला जातो. कारण स्वभाव व गुणांच्या भेदाने मनुष्याच्या भावनेतही विभिन्नता येत असते. जो भेददर्शी पुरुष हृदयात हिंसा, दम्भ, क्रोध, मात्सर्यादि भाव बाळगून माझी भक्ती करतो तो तामस भक्त होय. जो विषयांच्या कामनेने

अथवा यशऐश्वर्यप्राप्तीकरिता माझ्या प्रतिमादिकांच्या ठिकाणी भेद भावनेने पूजन करतो तो राजस भक्त होय. तसेच जो पापाचा क्षय करण्याकरिता, परमात्म्यास अर्पण करण्याकरिता अर्थात भगवत्प्राप्तीकरिता किंवा पूजा करणे आपले कर्तव्य आहे या बुद्धीने, भेदभावाने, माझी भक्ती करतो तो सात्त्विक भक्त आहे'

वरील त्या त्या गुणानी युक्त पुरुषांची भक्तीही त्या त्या गुणाची म्हटली जाते. या प्रत्येक भक्तीचे अधम, मध्यम, उत्तम असे तीन प्रकार पुन्हा नारद-पुराणात सागितले आहेत. असे एकूण नऊ प्रकार होतात

यच्चान्यस्य विनाशार्थं भजनं श्रीपतेर्नृप ।
सा तामस्यधमा भक्तिः खलभावधरायतः ॥
योऽर्चयेत्कैतवधिया स्वैरिणी स्वपति यथा ।
नारायण जगन्नाथं तामसी मध्यमा तु सा ॥
देवपूजापरान्दृष्ट्वा मात्सर्यात् योऽर्चयेद्धरिम् ।
सा भक्ति. पृथ्वीपाल तामसी चोत्तमा स्मृता ॥

'दुसऱ्याचा विनाश करण्याच्या हेतूने लक्ष्मीपतीचे भजन केले जाते ती अधमा तामसी भक्ती आहे. कारण ती दुष्टभाव धारण करणारी आहे. जो मनात कपटबुद्धी ठेवून, जशी व्यभिचारिणी स्त्री स्वपतीची सेवा करते त्या प्रमाणे भगवंताचे पूजन करतो ती मध्यमातामसभक्ती आहे. जो दुसऱ्याना भगवदाराधनेत तत्पर पाहून ईर्ष्यावश स्वतःही श्रीहरिची पूजा करतो त्याची ती क्रिया उत्तमा तामसीभक्ति मानली जाते. तसेच राजसी भक्तीत ही तीन प्रकार सागितले आहेत.

धनधान्यादिक वस्तु प्रार्थयन्नर्चयेद्धरिम् ।
श्रद्धया परया युक्तः सा राजस्यधमा स्मृता ॥
य. सर्वलोकविख्यात कीर्तिमुद्दिश्य माधवम् ।
अर्चयेत्परया भक्त्या सा मध्या राजसी मतो ॥
सालोक्यादि पदं यस्तु समुद्दिश्यार्चयेद्धरिम् ।
सा राजस्युत्तमा भक्ति. कीर्तिता पृथिवीपते ॥

जो धनधान्यादिकाची याचना करतो व परम श्रद्धेने श्रीहरीची प्रार्थना करतो त्याची भक्ती अधम राजसी भक्ति म्हटली जाते. जो सर्व लोकांत प्रसिद्धी प्राप्त व्हावी, कीर्ती मिळावी, या उद्देशाने माधवाची अर्चा परमभक्तीने करतो ती मध्यम राजसी भक्ति होय. जो सालोक्य सारूप्यादि पदांची प्राप्ती व्हावी या इच्छेने भगवताची अर्चा करतो त्याची ती उत्तमा राजसी भक्ति म्हणावी.' तसेच सात्त्विक म्हणजे सत्त्वगुण प्राधान्याने होणाऱ्या भक्तीचेही तीन प्रकार सांगितले आहेत.

**यस्तु स्वकृतपापानां क्षयार्थं प्रार्चयेद्धरिम् ।**
**श्रद्धया परयोपेतः सा सात्त्विक्यधमा स्मृता ।।**
**हरेरिदं प्रियमिति शुश्रूषां कुरुते तु यः ।**
**श्रद्धया संयुतो भूयः सात्त्विकी मध्यमा तु सा ।**
**विधिबुद्धयार्चयेद्यस्तु दासवच्छ्रीपतिं नृप ।**
**भक्तीनां प्रवरा सा तु उत्तमा सात्त्विकी स्मृता ।।**

'जो आपण केलेल्या पापाचा नाश करण्याच्या हेतूने पूर्ण श्रद्धेने श्रीहरीची पूजा करतो त्याची ती पूजा अधमासात्त्विकीभक्ति म्हटली जाते. हे भगवान विष्णूस प्रिय आहे असे मानून जो श्रद्धापूर्वक सेवा शुश्रूषा करतो त्याची ती सेवा मध्यमा सात्विकी भक्ति आहे शास्त्राची ही आज्ञा आहे असे मानून जो सेवकाप्रमाणे भगवान विष्णूची पूजाअर्चा करत असतो त्याची ती भक्ती सर्वप्रकारच्या भक्तीमध्ये श्रेष्ठ उत्तमासात्त्विकीभक्ती मानली गेली आहे.' भागवत स्कध सातव्यात प्रल्हादमुखाने ज्या श्रवण कीर्तनादि नवविध भक्तीचे वर्णन केले आहे त्या प्रत्येकीत सात्त्विक राजस तामस असे भेद पडतात व त्यातही पुन्हा उत्तम, मध्यम, अधम असे पुन्हा तीन प्रकार होतात म्हणजे एक एक भक्ती नऊ प्रकारानी होते व असे नऊ प्रकारच्या भक्तीचे प्रत्येकी नऊ असे एक्याऐंशी प्रकार संभवतात असे श्रीमद्भागवतावर संपूर्ण टीका लिहिणारे व परमभागवत श्री श्रीधरस्वामी यानी तृतीय स्कंध अध्याय एकोणतीस श्लोक दहा वरील व्याख्यानात म्हटले आहे. तसेच भागवत अकरावा स्कंध अध्याय दोन मध्ये उत्तम, मध्यम व प्राकृत असे तीन भेद सांगितले आहेत. उत्तम भक्तांचे लक्षण पाहा.

**सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद् भावमात्मन. ।**
**भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः ।।अ.२-४५**

नवयोगेश्वर जनकसंवादात हरी म्हणाले, 'आपला आत्मा तोच परमात्मा असे ईशस्वरूप प्राणिमात्रामध्ये जो पाहतो, त्याचप्रमाणे सर्व भूताचा समावेश अभेद रूपाने असणाऱ्या भगवद्रूपामध्ये जो पहातो तो उत्तमभागवत (भगवद्भक्त) होय.'

**ईश्वरे तदधीनेषु बालिशेषु द्विषत्सु च ।**
**प्रेम मैत्री कृपोपेक्षा यः करोति स मध्यमः ।।४६।।**

'परमेश्वरावर प्रेम, भगवद्भक्तांशी मैत्री, बालिशां (मूर्खा) वर कृपा व शत्रूची उपेक्षा करणारा जो भक्त तो मध्यम कोटीचा होय.'

**अर्चायामेव हरये पूजां यः श्रद्धयेहते ।**
**न तद्भक्तेषु चान्येषु सभक्तः प्राकृतः स्मृतः ।।४७।।**

'ज्या मूर्तीची तो पूजा करतो त्यांतच हरी आहे असे मानून फक्त तिची

जो पूजा करतो, पण हरिभक्तात व इतर लोकात हरीचे वास्तव्य नाही असे समजून जो त्याच्यावर प्रेम करीत नाही तो प्राकृत (निकृष्ट) भक्त समजावा.'

या तीनही श्लोकावरील श्री एकनाथ महाराजाची विस्तृत भावगर्भ टीका मुळात पाहावी.

कोणास वाटेल की रजोगुण तमोगुण हे परमात्मभक्तीला विरोधी असतात मग तामस किवा राजस भक्ती होईल कशी ? याचे उत्तर वर एका दृष्टीने आले आहे मानवाच्या ठिकाणी श्रद्धा जी असते ती त्रिविध असते, सात्त्विक, राजस, तामस. ती गुणानी युक्त असणारी श्रद्धा तीच त्याला भक्ती करावयास प्रेरित करते. त्याच्याकडून अनन्य अव्यभिचारिणी निष्काम भक्ती होणार नाही पण सकाम, अथवा अन्य विकारासह भक्ती होऊ शकते. समाजात असे पुष्कळ पुरुष आपणास दिसतात. तसेच कित्येक तमोगुणी लोक केवळ तुच्छ व निंद्य विषयात आसक्त होऊन राहतात, देवधर्म उपासना इत्यादि काही न मानता अनीती, पाप, हिंसाचार, कपट, मत्सर, द्वेष, इत्यादि तामस विकारानी भारलेले असतात. त्यांचे वर्णन भगवद्गीतेच्या अठराव्या अध्यायात तामसज्ञान, तामसकर्म, तामसकर्ता इत्यादि-रूपाने विस्ताराने केले आहे. त्याना मृत्यूनंतर नरक व नरकभोगानंतर निद्य पश्वादि कृमिकीटकादि योनीचीच प्राप्ती होते अशा स्थितीत एखादा तमोगुणी श्रद्धेने युक्त पुरुष हिसा, दंभ, क्रोध, मात्सर्यादिभाव बाळगून जरी परमात्म्याची भक्ती करू लागला तरी त्याचा तमोगुण हळूहळू कमी होऊन खऱ्या भक्तीचा अंत:करणात उदय होऊ लागेल.

तसेच रजोगुणाचेही आहे. रजोगुणी पुरुष कर्मजड व भोगासक्त असतो व तो भोगाकरिता भक्ती करतो. बहुतेक असेच भक्त अधिक असतात पण अशा विषयभोगाकरिता जरी भगवद्भक्ती करील तरी त्याची चित्तशुद्धी होऊन हळूहळू विषयासक्ती कमी होऊ लागेल व हृदयात भगवत्प्रेमाचा अंकुर निर्माण होऊ लागेल म्हणूनच त्याना तामस राजस भक्त अशी संज्ञा दिली आहे. मात्र ही परा (श्रेष्ठ) भक्ती म्हटली जाणार नाही. यात रजो तमोगुणाचा संबंध असल्याने भेद-भाव, व्यभिचार, सकामता, इत्यादी अनेक दोष निर्माण होतात. असेही भक्ती करणारे बहुजन समाजात अनेक लोक दिसतात. म्हणून गौणी भक्तीत त्यांचा अंतर्भाव केला आहे. तसेच श्रीमद्भगवद्गीतेच्या सातव्या अध्यायात श्रीकृष्णानी,

न मा दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः ।
माययापहृतज्ञाना. आसुरं भावमाश्रिताः ॥१५॥

'दुष्कर्मी, मूर्ख, अधम असे लोक मायेने त्यांचे ज्ञान नष्ट झाल्यामुळे आसुरी मार्गाचा अवलब करतात, आणि मला (भगवंताला) शरण येत नाहीत.' असे म्हटले आहे.

असे दुष्कृती नराधम जरी अधिक असले तरी पूर्वसुकृत चागले आहे त्यास सुकृतवशात अल्पाशाने का होईना सद्बुद्धिचा लाभ होतो व भगवद्भाव निर्माण होतो. त्यात आपल्या जीवनात जे प्रतिकूल असते ज्याचा प्रतिकार आपल्या सामर्थ्याने होत नाही त्याची निवृत्ती व जे अनुकूल वाटेल त्याच्या प्राप्तीकरिता भगवान श्रीहरीची भक्ती करण्याकडे त्याची प्रवृत्ती होते. असे जे भक्त त्याचे तीन प्रकार श्रीकृष्णानी गीतेमध्ये सागितले आहेत, ते आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी हे होत. याच्या भक्तीचाही अंतर्भाव गौणीभक्तीतच केला आहे.

तो पहिला आर्तु म्हणिजे । दुसरा जिज्ञासु बोलिजे ।
तिजा अर्थार्थी जाणीजे । ज्ञानिया चौथा ।।
तेथ आत तो आर्तीचेनि व्याजे। जिज्ञासु तो जाणावयालागी भजे ।
तिजेनि तेणे इच्छिजे । अर्थसिद्धि ।। ज्ञा. ७.१०९–१०

याना गौण भक्त म्हणण्याचे कारण याच्या भक्तीत भगवान हा याच्या इच्छेचा विषय प्राप्त करून देणारा साधन ममजला जातो. साधनाची गरज साध्य प्राप्ती पावेतो असते, साध्य प्राप्तीनतर साधनाला महत्त्व राहात नाही. मुख्य भक्तीत भगवान हाच व त्याची अनन्य भक्ती हीच साध्य असते तसेच वरील गौण भक्तीमध्ये अनन्यता नसते माध्याचा व्यभिचार असतो. खरा भक्त 'निस्त्रैगुण्य' होतो असे मागे सूत्र सत्तेचाळिसाव्यात नारदमहर्षींनीच सागितले आहे भागवतात सत्त्व, रज, तम, गुणांनी होणाऱ्या भक्तीचा विचार केल्यानतर पुढे निर्गुण भक्तीयोगही सागितला आहे

गीतेतील सानव्या अध्यायातील आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू या तीन प्रकारच्या भक्तीमध्ये गुणसंबंध असतोच म्हणून तिला गौणी असे म्हटले आहे आर्त म्हणजे रोग, चोर, दुर्जन, व्याघ्रादिकाच्या संसर्गामुळे ज्याचे जीवित रक्षण होणे अशक्य झाले आहे, स्वत.चे सर्व उपाय निष्फल झाले आहेत अशा वेळी ते दुःख नष्ट करणारी शक्ती एकमेव परमात्माच आहे अशा दृढभावनेने सर्व शक्ती एकवटून भगवान श्रीहरीचाच धावा करणारा. पुराणातून गजेंद्र, द्रौपदी इत्यादिकांची उदाहरणे दिली आहेत. अशा अवस्थेत जो देवाचा धावा करतो त्याच्याकरिता तो धावून येतो व त्या दुःखातून त्या आर्तभक्ताची सुटका करतो. भगवान श्रीकृष्ण अर्जुनास सागतात

रंक का अडलेपणे । काकुळती धावगा धाव म्हणे ।
तयाचिये ग्लानी धावणे । काय न घडे मज ।। ज्ञा. ८–१२८

तसेच कित्येक दारिद्र्याने अतिशय गाजलेले, त्यामुळे ज्याना ससारात आपले व कुटुबीयाचे जीवन चालविणे अशक्य झाले आहे असे, अन्याय्यचौर्यहिसादि मार्गाने द्रव्य संपादन करण्याचा प्रयत्न करतात आणि नरकाचे अधिकारी

बनतात. पण ज्याच्या अंतःकरणात पूर्वसंस्काराने काही सद्भावना जागृत आहेत असे पुरुष केवळ परमात्मा श्रीहरीच आपणास या दारिद्र्याच्या आपत्तीतून सोडविणारा समर्थ आहे, या भावनेने त्याची भक्ती करतात; तेव्हा भगवान त्याना दारिद्र्याच्या संकटातून मुक्त करतो भक्तश्रेष्ठ सुदाम, ध्रुव यांची उदाहरणे पुराणादिकातून आढळतात सुग्रीव बिभीषणादिकाचाही अर्थार्थी भक्तांमध्ये अतर्भाव केला जातो अशा भक्तास अर्थ जरी प्राप्त झाला तरी त्यास अहंकार, दभ, गर्व, मद तसेच अर्थापासून होणाऱ्या अन्य दोषाची बाधा होत नाही. कारण केवल भगवत्कृपेनेच हा लाभ झाला अशी त्याची दृढ भावना असते व त्या अर्थाचा विनियोग तो भगवत्सेवेतच व्हावा अशी अपेक्षा ठेवून असतो.

तिसरा जिज्ञासू भक्त त्याला केवल परमात्म्याच्या अपरोक्ष ज्ञानाची इच्छा असते. कारण त्या ज्ञानाविना जीवाची संसारातून, म्हणजे गर्भवासादि दु.खे, त्रिविध ताप, जन्ममरण इत्यादिकातून, सुटका होऊन त्यास मोक्ष प्राप्त होत नाही अशी त्याची दृढ श्रद्धा असते. अतएव ते ज्ञान प्राप्त होण्याकरिता योग्य श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ, शब्दपरनिष्णात सद्गुरूंस शरण गले पाहिजे हे खरे. पण असे श्रीगुरू भेटणे हे फार कठिण आहे तसेच त्याची भगवंतावर दृढश्रद्धा असते म्हणून तोच श्रीगुरू आहे या भावनेने तो जिज्ञासुभक्त भगवतालाच ‘ मुमुक्षुर्वैशरणमह प्रपद्ये ’ म्हणून शरण जातो.

जिज्ञासू, मुमुक्षु, साधक इत्यादि एका अर्थाचेच शब्द आहेत. जिज्ञासेमध्ये लौकिक व अलौकिक जिज्ञासा असे दोन प्रकार श्री एकनाथ महाराजानी सागितले आहेत

ब्रह्मप्रापक युक्तीचा ठसा । या नाव शुद्ध जिज्ञासा ।
वेदशास्त्र जाणीव वळसा । लौकिक जिज्ञासा त्या नाव ।।

‘ ज्ञातु इच्छा जिज्ञासा ’ म्हणजे परमात्म्याच्या अपरोक्ष ज्ञानाची जी इच्छा ती जिज्ञासा ! ही भाग्यवशात ज्याला प्राप्त आहे तो जिज्ञासू होय. तो साधनचतुष्टयसंपन्न असावा लागतो विवेक, वैराग्य, शमदमउपरतितितिक्षाश्रद्धासमाधान आणि मुमुक्षुत्व या चार साधनास साधनचतुष्टय म्हणतात जिज्ञासूभक्ताचे ठिकाणी ही साधने बाणलेली असावी लागतात. या साधनांनी युक्त अशा, पुरुषाच्या ठिकाणीच तीव्र जिज्ञासा प्रगट होत असते व ती पूर्ण होण्याकरिता तो श्रीहरीची सतत करुणा भाकित असतो. त्याच्या तीव्र जिज्ञासेचे वर्णन श्री एकनाथ महाराजानी केले आहे.

कै कृपा करील गोविद । कै तुटेल भावबध । कै देखेन तो निजबोध । परमानद जेणे होय ।। २२९ ।। धाव पाव गा श्रीहरी । कृपाकरी दीनावरी । मज उद्धरी भवसागरी । भक्तकैवारी श्रीकृष्ण ।। २३० ।। जैसी जीवना वेगळी मासोळी । तैसा

बोधालागी तळमळी । प्रेम पडिभराच्या मेळी । देह न सांभाळी सर्वथा ।। २३१ ।। जरी विवेक कळला मना । तरी न तुटती विषयवासना । तेणे सतप्त होऊनि जाणा । नारायणा चिंतितु ।। २३४ ।। कृष्ण म्हणे उद्धवासी । सविवेक वैराग्य असे ज्यासी । तोचि आपला गुरू आपणासी । विशेषेंसी जाणावा ।। २३५ ।। त्याचिये निज-बुद्धीसी । मीचि विवेकु प्रकाशी । तो स्वये जाणे निजबोधासी । निजमानी विवेके ।। २३६ ।। ए भा. अ. ७

अशा जिज्ञासुभक्तामध्ये भक्तश्रेष्ठ अर्जुन, भक्तप्रवर उद्धव, श्रुतदेव, बहुलाश्व इत्यादि भक्तांची गणना होते अर्जुनाची जिज्ञासा श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या दुसऱ्या अध्यायात स्पष्टरूपाने प्रगट झाली आहे.

कार्पण्यदोषोपहत. स्वभाव· पृच्छामि त्वा धर्मसंमूढचेता. ।
यच्छ्रेयस्स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधिमा त्वां प्रपन्नम् ।।

'अर्जुन म्हणतो, 'हे श्रीकृष्णा ! मोहरूपी दोषाने स्वभाव नष्ट झालेला व धर्मासबधाने चित्त मोहित झालेला मी तुला विचारीत आहे जे खरोखरीच श्रेयस्कर असेल ते मला साग. मी तुझा शिष्य आहे. तुला शरण आलेल्या मला उपदेश कर'

भक्तश्रेष्ठ उद्धवाची जिज्ञासू अवस्था किती श्रेष्ठ होती ती पाहा उद्धव श्रीकृष्णास म्हणतो

**ज्ञानं विशुद्धं विपुलं यथैतद्वैराग्यविज्ञानयुतं पुराणम् ।**
**आख्याहि विश्वेश्वर विश्वमूर्ते त्वद्‌भक्तियोगं च**
**महद्विमृग्यम् । ।। ८ ।।**
**तापत्रयेणाभिहतस्य घोरे संतप्यमानस्य भवाध्वनीश ।**
**पश्यामि नान्यच्छरणं तवाङ्घ्रिद्वंद्वातपत्रावमृताभिवर्षात ।। ९ ।।**
**दष्टं जनं संपतितं बिलेऽस्मिन् कालाहिना क्षुद्रसुखोरुतर्षम ।**
**समुद्धरैनं कृपयाऽऽपवर्ग्यैर्वचोभिरासिंच महानुभाव ।। १० ।।**

**भागवत ११–१९**

'हे देवा, तुझ्याच रूपाने हे विश्व नटले असून तू विश्वाचा स्वामीही आहेस, तरी अत्यंत निर्मळ वैराग्य व विज्ञानाने शोभिवंत झालेले, पुरातन, कधी न सपणारे असे ज्ञान मला साग. त्या प्रमाणे जो प्राप्त होण्यासाठी देवादिकही प्रयत्न करतात असा तुझा भक्तियोगही मला कथन कर.

'हे परमात्मन्, त्रिविधतापांनी मी पीडिलेला असून अत्यंत भयंकर असा ससारमार्ग आक्रमित असता होरपळून गेलो आहे. ज्ञानरूपी अमृताचा वर्षाव करणारे तुझे चरण कमल हेच मला निववणारे छत्र असून त्या तुझ्या चरणा-शिवाय शरण जाण्यास योग्य असे दुसरे कोणतेही स्थान मला दिसत नाही.

'हे महानुभावा, मी या ससाराच्या कूपामध्ये पडलेला असून काळरूपी सर्प सारखा दंश करीत आहे, त्यातून क्षुद्र विषयसुखाची आसक्ती मला अणुमात्र सोडीत नाही, तरी हे देवा, कृपा करून मला यातून सोडव आणि मोक्षप्रद अशा अमृतवचनाचा माझ्यावर वर्षाव कर.'

श्री तुकाराम महाराज, श्री नामदेवमहाराज, श्री एकनाथ महाराज इत्यादि सर्व संताच्या गाथ्यातून त्यांची स्वोद्धाराची तीव्र जिज्ञासा प्रगट करणारे अनेक अभंग आढळतात.

काय मी उद्धार पावेन । काय कृपा करील नारायण ।।
ऐसे तुम्ही सागा सत जन । करा समाधान चित्त माझे ।।१।।

माझे चित्त तुझे पायी । राहे ऐसे करी काई ।
धरोनिया नाही । भव हा तारी दातारा ।।१।।
चतुरा तू शिरोमणी । गुण लावण्याची खाणी ।
मुकुट सकाळा मणि । धन्य तूचि विठोबा ।।२।।
करी या तिमिराचा नाश । उदय होऊनि प्रकाश ।
तोडी आशापाश करी वास हृदयी ।।३।।
पाहे गुतलो नेणता । माझी असो तुम्हा चिता ।
तुका ठेवी माथा । पायी आता राखावे ।।४।।

आता मज दृष्टि देई पाडुरंगा मायबापा ।
शरण आलो आता निवारूनिया पापा ।
अजन लेववूनी करी मारग सोपा ।
जाईन सिद्ध पंथे अवघ्या चुकतील खेपा ।।

जिज्ञासेमध्ये प्रामुख्याने ऐहिक पारत्रिक भोगाविषयी पूर्ण अनासक्ती, ससारातून मुक्त होण्याविषयी अधीरता, अज्ञाननिवृत्तीविषयी पूर्ण तळमळ, परमात्म्याच्या यथार्थज्ञानाविषयी तीव्र इच्छा, या गोष्टी असाव्या लागतात. त्या ज्याच्याजवळ पूर्णत्वाने असतात व या सर्व गोष्टी केवळ श्रीहरिकृपेनेच सिद्ध होतात अशी ज्याची दृढ निष्ठा असते त्यास जिज्ञासूभक्त असे म्हटले आहे.

श्रीएकनाथमहाराजानी भागवत एकादशस्कंधातील एकोणिसाव्या अध्यायात चोवीसाव्या श्लोकावरील टीकेत या विषयाचा काहीशा वेगळ्या दृष्टिकोनातून विचार केला आहे. त्यांनी आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी याचे लौकिक व पारमार्थिक असे प्रकार कल्पिले आहेत व पारमार्थिक व्याख्यांना महत्त्व दिले आहे. त्या ओव्यां अशा

रोगिया नाव आर्तता । हें व्याख्यान नव्हें परमार्थी ।
भगवत्प्राप्तीची तीव्र व्यथा । ते आर्तता परमार्थी ।।२७२।।
जो भगवंताच्या प्राप्तीलागी । कडा घालू धावे वेगी ।
का रिघों पाहे जळते आगी । तो आर्त सवेगी बोलिजे ।।२७३।।
आर्ताची स्थिती ऐसी । जिज्ञासु निवारी त्यासी ।
मनुष्यदेह ब्रह्मप्राप्तीसी । तो आत्महत्त्येशी नको योजू ।।२७४।।
मागील भक्त कोणे रीती । जाणोनि पावले भगवद्भक्ती ।
जीवें भावें त्या विवरी युक्ती । जिज्ञासु निश्चिती या नाव ।।२७५।।
सर्वा अर्थीं मीचि अर्थना । शुद्ध अर्थार्थी या नाव जाणा ।
म्हणती अर्थार्थी द्रव्य कामना । ते मंद व्याख्याना प्रवर्तती ।।२७८।।
दृष्टी पडे नाना अर्थी । जो विवंचोनि लावी परमार्थी ।
त्या नाव बोलिजे अर्थार्थी । त्यातेंही निज भक्ति प्रकाशे माझी

ए. भा. १९

पारमार्थिक दृष्टया श्रीएकनाथमहाराजानी म्हटल्याप्रमाणे आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी याचे वरील ओव्यात सागितलेले शब्दार्थ होऊ शकतील पण यातून प्रत्येक पदाचे भिन्न तात्पर्य सिद्ध न होता एकाच अर्थी ते होईल. म्हणजे आर्तही भगवत्प्राप्तीचीच आर्ति बाळगणारा, अर्थार्थी ही भगवत्प्राप्तीचीच जिज्ञासा ठेवणारा अशा रीतीने शब्द वेगळे पण अर्थ किंवा भाव एकच होईल. पण गीतेमध्ये ज्ञानीभक्तासह ' चतुर्विधा भजन्ते मां ' असे श्रीकृष्ण सागतात त्यातील चतुर्विधा म्हणजे चार प्रकारचे असा संख्यावाचक निर्देश आहे त्याचे तात्पर्य सिद्ध होणार नाही. जगात जे भक्त म्हणविणारे दिसून येतात ते रोगादि दु ख नाशार्थ, धनादि ऐश्वर्य प्राप्त्यर्थ, सलोकतादि तसेच सायुज्य मोक्षार्थ भक्ती करणारे असेच बरेच भक्त दिसून येतात. तसेच ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायातील अज्ञान लक्षणात व्यभिचारी भक्ताची लक्षणे सांगितली आहेत ती अशा सकामभक्तांचीच आहेत. असे ही भक्त जगात असतात. वास्तविक त्या भक्तांच्या त्या क्रियेला भक्ती म्हणणे योग्य नव्हे. पण स्वतःचे दुःख निवारण करण्याकरिता अन्य जीवांचे बळी घेतो, किवा अन्य भूतमात्रांना दुःख देतो त्यापेक्षा देवाची उपासना करतो त्याला गौण भक्तात समाविष्ट करून घेतले आहे. तसेच अर्थप्राप्तीकरिता अनेक चौर्यहिसादि घातक कर्मे करणारेही जगात पुष्कळ आहेत ते पापफलभागी होऊन त्याना शेवटी नरकाला जावे लागेल, त्यांच्यापेक्षा देवाच्या कृपेने द्रव्य ऐश्वर्य मिळविण्याची अपेक्षा करणारा श्रेष्ठ आहे त्या दृष्टीने त्यास भक्तकोटीत समाविष्ट करून घेतले आहे. पण ती गौणीभक्ती होय. अशा या गौणी भक्तीने भगवत्प्राप्ति न झाली तरी भगवन्महात्म्य पटते. त्यामुळे अंतःकरणात भगवत्प्रेम हळूहळू निर्माण होणे सभवनीय असते

म्हणूनच नारदानी सूत्रातून या गौणीभक्तीचा उल्लेख केला आहे.

## सूत्र ५७

## उत्तरस्मादुत्तरस्मात्पूर्वपूर्वा श्रेयाय भवति ।।५७।।

**अर्थ** :

(मागील सूत्रात सागितलेल्या गुणभेद तसेच आर्तादिभेदाने युक्त भक्तीमध्ये) पुढच्या पुढच्या भक्तीहून तत्तत्पूर्व असलेली भक्ती कल्याणास कारण होते.

**विवरण** ·

मागील सूत्रात सात्त्विक, राजस, तामस या गुणभेदाने होणाऱ्या भक्तीचे वर्णन केले अनेकत्व आले की त्यात तारतम्य निर्माण होणे व त्याच्या श्रेष्ठ कनिष्ठतेची जिज्ञासा होणे स्वाभाविक असते. सर्वानाच समानता प्राप्त होऊ शकत नाही. याकरिता या सूत्रात नारदमहर्षि सागतात, उत्तर उत्तर भक्तीच्या अपेक्षेने तत्पूर्व भक्ती श्रेष्ठ आहे. गुणभेदाने होणाऱ्या भक्तीत तमोगुणी भक्तीपेक्षा रजोगुणी भक्ती बरी कारण तमोगुणात हिसा, द्वेष, मत्सर, क्रोध, ईर्ष्यादि विकाराचा भर असतो. तो रजोगुणात कमी असतो त्यात विषयलालसा, यश, ऐश्वर्यादिकाची वासना असते. तो अन्याचा द्वेष मत्सर करण्याची अपेक्षा ठेवीत नाही. पण त्या रजोगुणी पुरुषाच्या भक्तीपेक्षा सत्त्वगुणी पुरुषाची भक्ती श्रेष्ठ आहे, कारण त्याचे ठिकाणी विषयलालसा नसते पूर्वसचित पापातून मुक्त व्हावे, आपली कर्मे भगवदर्पण व्हावीत, भक्ती करणे आपले कर्तव्य आहे या बुद्धीने त्याची भक्ती होते म्हणून ती अधिक श्रेयास, कल्याणास कारण आहे. यातून ज्याला श्रेयस्कर भक्ती करावयाची त्याने सत्त्वगुणाचा अगीकार करून भक्ती करावी असेही सूचित केले जाते. कोणास वाटेल सत्त्वगुण कोठून सपादन करावा, याचे उत्तर हे की प्रत्येक मानवाचे ठिकाणी न्यून अधिक प्रमाणात त्रिगुण असतातच. कितीही तमोगुणी असला तरी अशरूपाने त्याचे ठिकाणी सत्त्वगुण असतोच, तोच सत्संगतीने सच्छास्त्र श्रवणाने, मननाने, वाढतो सत्त्वगुणाची वृद्धी झाली म्हणजे खालील महत्त्वाच्या भूमिका सहज प्राप्त होतात असे एकनाथ महाराज सागतात.

सत्त्व उत्कर्षाचें लक्षण । धर्मनिष्ठा स्वधर्माचरण । तैसें तेथील वासना बंधन। इहामुत्र जाण वांछीना ।।५२।। झालिया शुद्ध अंतःकरण। तेव्हा निःसीम वाढे सत्त्वगुण । पुरुषा मद्भक्तिलक्षण । धर्म जाण उपतिष्ठे ।।५३।। सत्त्वें वाढल्या धर्म-

प्रवृत्ति। तै गुरुभजनी अतिप्रीती का सत्त्वविग्रही माझी मूर्ती। तें ठायीं भक्ती उल्लासे ॥५४॥ कायिक वाचिक मानसिक। मदर्पण करी स्वाभाविक। मज वेगळा आणिक। भावार्थ देख स्फुरेना ॥५५॥ एवं सत्त्ववृत्ती वाढला धर्म। तो तत्काळ नाशी अधर्म। अधर्माचे मूळ रजतम। त्याचे रूप नाम उरो नेदी ॥५८॥ ना. भा. १३

जरी रजोगुण व तमोगुणयुक्त पुरुष भक्ती करीत असलेला दिसतो तरी ती सदोष असते. खऱ्या भक्तीचे फल ती देऊ शकत नाही, सत्त्व गुणी पुरुषाची भक्ती श्रेष्ठ आहे म्हणून पुढच्या पुढच्या भक्तीपेक्षा पूर्वीची श्रेष्ठ आहे असे या सूत्रात म्हटले आहे. तसेच आर्त जिज्ञासू अर्थार्थी असे भेद सांगितले आहेत. त्याचा विचार मागील विवेचनात आलाच आहे. त्यातही अर्थार्थी भक्तापेक्षा जिज्ञासू श्रेष्ठ व त्या पेक्षा हरिप्राप्तीची कोणत्या का हेतूने असेना तीव्र आर्त ज्याला झालेली आहे तो श्रेष्ठ. कारण अर्थार्थी हा अर्थ म्हणजे विषयकामी असतो, जिज्ञासू हा भक्त असतो पण तो विचारप्रवण असतो. तो सारासार विचार करीत बसतो. पण आर्त-भक्ताच्या भक्तीची तीव्रता फार असते. गजेंद्र अथवा द्रौपदीने धावा करताच श्रीहरीला धावून यावे लागले, तेथे अवकाश खपत नाही. या दृष्टीने तारतम्याने उत्तरोत्तर भक्तीला श्रेष्ठत्व प्रतिपादिले आहे. या सर्वच भक्तिक्रियाना गौणत्व आहे तरी त्यांच्यात तारतम्य असणे स्वाभाविक आहे श्रीकृष्णानी गीतेच्या सातव्या अध्यायात (चतुर्विधा भजन्ते मा जनाः सुकृतिनोऽर्जुन,।) 'चार प्रकारे माझी भक्ती करणारे लोक सुकृति म्हणजे पुण्यवान आहेत,' असे सर्वांना चागलेच म्हटले आहे. काही तरी सुकृताचा साठा असल्याविना कोणत्याही भावनेने अंत करणात भक्ती उत्पन्न होऊ शकत नाही. व अंतःकरणात भक्ती निर्माण झाली की ती श्रेय म्हणजे कल्याणास कारण होते.

## सूत्र ५८

## अन्यस्मात्सौलभ्यं भक्तौ ॥५८॥

**अर्थ :**

अन्य सर्व साधनांपेक्षा भक्तीत सुलभता आहे.

**विवरण :**

आता पावेतो अनेक अंगानी प्रेम भक्तीचा विचार केला. तिचे सर्वांपेक्षा श्रेष्ठत्व पटवून दिले. ती कर्म, ज्ञान, योगादि साधनांपेक्षा श्रेष्ठ आहे असे मागे सूत्र पंचवीस

मध्ये स्पष्ट केले. त्याचप्रमाणे साधनभक्ती गौणीभक्तीचाही विचार केला. भक्तीचे फलरूपत्वही सांगितले. अशी ही सर्व साधनाहून श्रेष्ठ असणारी भक्ती कठीण असेल, आचरण करण्यास क्लेश होतील किंवा त्या मार्गात अनेक विघ्ने निर्माण होणेही शक्य असेल असे कोणास वाटेल. भक्तीही दुर्लभ आहे, कठिण आहे, अशी कोठे कोठे प्रमाणेही आढळतात. पण श्रीनारद महर्षि या सूत्रात तिची सुलभता स्पष्ट सांगतात.

मनुष्यमात्राचा असा स्वभाव आहे की संसारात अथवा परमार्थात कोणत्याही साधनात सुलभता तो पाहत असतो. 'अवघड कोणी न करी सांगता । सुलभ बहुता गोड वाटे ॥' असे तुकाराम महाराज म्हणतात. तसेच कलियुगामध्ये लोकात कठिण साधने करण्यासारखी शारीरिक, मानसिक शक्ती राहिली नाही, असे पुराणातूनही वर्णन आढळते. अशा स्थितीत त्याला सोपे साधन सागणे अवश्य असते. त्या दृष्टीने नारदानी भक्तीची सुलभता सांगितली आहे. नुसते भक्ती हे सुलभ साधन आहे असे न म्हणता 'अन्यस्मात्सौलभ्यं भक्तौ' अन्य साधनापेक्षा भक्तीमध्ये सौलभ्य आहे असे तुलनात्मक दृष्टीने म्हटले आहे. भगवत्प्राप्तीची शास्त्रामध्ये ज्ञान, कर्म, योग, त्याग, संन्यास इत्यादि अनेक साधने सांगितली आहेत, तसेच त्याचा सर्वांगीण विचारही केलेला आढळून येतो. त्यांत अंतरंग व बहिरंग असाही प्रकार सापेक्षतेने मानला आहे. जी जी मोक्षप्राप्तीला जवळची अशी महावाक्यश्रवण, मननादि साधने अंतरंग होत व तत्पूर्वी होणारी विवेक–वैराग्यादि साधने श्रवणादिकांच्या सापेक्ष बहिरंग म्हटली जातात. पण ही सर्व साधने साधकास कठिणच आहेत.

प्रथम कर्म मार्गाचा विचार केला तर अधिकाराचा प्रश्न आरंभी पुढे येतो. वेदोक्त कर्माचा केवळ त्रैवर्णिकांनाच अधिकार आहे. त्यातही संस्कार योग्य प्रकारे झाले पाहिजेत. वेदाध्ययन केले पाहिजे ते स्वरपूर्वक पाहिजे. एखादा स्वर चुकला तर अनर्थ निर्माण होतो.

संस्कारपूर्वक गुरुगृही वेदाध्ययन सांग झाले पाहिजे. नंतर आश्रमोचित कर्माचा अधिकार प्राप्त होतो. त्या कर्माचा विचारही फार सूक्ष्म आहे. कर्म हे विधिप्रयुक्त असते, विधीत किंचितही न्यूनता किंवा चूक घडेल तर महादोष निर्माण होतात. असे या साधनात काठिण्य आहे. त्याकरिता आपल्या ठिकाणी शरीरबळ, द्रव्यबळ, मंत्रबळ, यज्ञयागादिकांकरिता कुटुंबाची अनुकूलता, विधीचे पूर्ण ज्ञान, यथायोग्य सामग्री, योग्य देश, काल, स्थलादिकांची अपेक्षा असते. या सामग्रीत, मंत्रात, विनियोगात अल्पही त्रुटी निर्माण झाल्यास ते कर्म निष्फळच नव्हे तर हानीलाच कारण होते.

प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्णच भक्तवर्य उद्धवास या कर्ममार्गातील विघ्ने व

त्याचे काठिण्य पटवून देत आहेत–

स्वर्ग प्राप्तीचिये विधी । कर्मे करिता विघ्न बाधी । तेणें नव्हें स्वर्गसिद्धी । जाण त्रिशुद्धी उद्धवा ।।५०३।। जें गर्भींच सटवलें । त्याचें बारसें न वचें केलें । तेवी कर्मींचि विघ्न उद्‌भवले । पावणे ठेलें स्वर्गाचे ।।५०४।। म्हणसी विघ्न करी कोण । कर्म करितां होय विगुण । तें कर्मचि कर्मासी जाण । विघ्न दारुण उपजवी ।।५०५।। कर्मचि कर्मासी साधक । कर्मचि कर्मासी बाधक । कर्मची कर्मासी मोचक । हे नेणोनि लोक गुंतले ।।५०६।। काम्यकर्मी विघ्न विचित्र । देशकाळ मंत्र तंत्र । द्रव्य दक्षिणा विधिपात्र । शुद्धि सर्वत्र पाहिजे ।।५०७।। जैसे क्षयरोगाचे रोगियासी । अल्प कुपथ्य बाधी त्यासी । तैसे जाण काम्य कर्मासी । अल्पदोषी सविघ्न ।।५०८।। प्रचंड दुधाचे भांडें । माजी थेंबू एक काजि पडे । तेणे दही दूध ना तूप जोडे । करी खवडे दुधाचे ।।५०९।। तैसे काम्य कर्म जाण । अल्पही होता विगुण । फळ नव्हे परी दारुण । ते कर्मचि विघ्न उपजवी ।।५१०।। ए. भा. १०

इतके कष्ट करून या साधनाने भगवत्प्राप्ती होणे शक्य आहे म्हणावे तर ती होत नाही.

करिता श्रौतस्मर्त कर्मासी । कर्मठें झाली पानपिसी । तरी मी नाकळें त्यांसी । क्लेश होमेसी कष्टता ।।२९।। अश्वमेध राजसूययाग । सर्वस्व वेंचूनि करितां सांग । माझे प्राप्तीसी नव्हतीचि चाग । तेणें मी श्रीरंग नाटोपे ।।३०।। ए. भा. ।।१२।।

अष्टांग योग हे एक महत्त्वाचे साधन शास्त्रांत सागितले आहे व त्याचे श्रेष्ठत्व योगशास्त्रावरील ग्रंथात योग्य प्रकारे पटवून देण्याचा प्रयत्न केलेला आहे. भगवद्‌गीतेतील सहाव्या अध्यायावरील टीकेत श्रीज्ञानेश्वर महाराजानी या योग-मार्गाचे पुष्कळ वर्णन केलें आहे. यास ‘पंथराज’ म्हटले आहे. पण गीतेच्या बाराव्या अध्यायांतच त्या मार्गाचे अतिशय काठिण्य व क्लेशकारकत्व स्पष्टपणे प्रतिपादिले आहे. योगेश्वर श्रीकृष्ण भगवान सागतात–

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्ता सक्त चेतसाम् ।**
**अव्यक्ताहि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ।।५।। अ १२**

‘अर्जुना, अव्यक्त ब्रह्माचे ठिकाणी ज्याचे चित्त आसक्त आहे त्यांना अधिक क्लेश असतो, कारण देह धारण करणाऱ्याना अव्यक्त ब्रह्मप्राप्तीचा मार्ग कष्टाने साध्य होतो’ या श्लोकावरील श्री ज्ञानेश्वर महाराजांची टीका पाहा.

जिही सकळ भूतांच्या हीती । निरालंबी अव्यक्ती । पसरलिया आसक्ती । भक्तीवीण ।।६०।। तया महेंद्रादि पदें । करितातिं वाटवधें । ऋद्धिसिद्धीची द्वंद्वें । पडोनि ठाती ।।६१।। कामक्रोधाचे विलग । उठावती अनेग आणि शून्येसी अंग । झुंझवावें की ।।६२।।

या योगमार्गातील विघ्ने सांगून पुढे त्याचे काठिण्य सांगतात. ताहानें ताहानचि पियावी। भुकेलियां भूकचि खावी। अहोरात्र वावी। मवावा वारा ॥६३॥ उन्निद्रेयाचें पहुडणें। निरोधांचे वेल्हावणें। झाडासी साजणे। चावळावे गा ॥६४॥ शीत वेढावें। ऊष्ण पांघुरावें। वृष्टीचिया असावें। घरांआंत ॥६५॥ किंबहुना पांडवा। हा अग्निप्रवेशु नीच नवा। भ्रतारेंवीण करावा। तो हा योगु ॥६६॥ एथ स्वांमीचें काज। ना बापिकें व्याज। परी मरणेसी झुंज। नित्य नवे ॥६७॥ ऐसें मृत्यूहूनि तिख। का घोंटें कढत विख। डोंगर गिळितां मुख। न फाटे काई॥६८॥ म्हणोनि योगाचिया वाटां। जे निगाले गा सुभटा। तयां दुःखाचाचि वाटा। भागा आला ॥६९॥ हेच भागवतातही श्रीकृष्ण भगवान सांगतात,

हे योग मार्गीची वाट। अति अवघड परमकष्ट।
थोर विघ्नाचा कडकडाट। प्राप्ती अवचट एखाद्या ॥४५६॥

ए. भा. १४

तसाच ज्ञानमार्गही फार कठीण आहे, उपनिषदांतच 'क्षुरस्यधारा निशिता दुरत्यया दुर्गं पथस्तत्कवयो वदन्ति।' म्हणजे 'तीक्ष्ण शस्त्राची धार जशी असते तसा हा ज्ञानमार्ग कठिण आहे असे विद्वान म्हणतात.' असे त्याचे काठिण्य दृष्टान्तपूर्वक सांगितलें आहे. श्रीकृष्ण उद्धवास सांगतात,

निर्गुणाचा बोध कठिण। मनबुद्धिवाचें अगम्य जाण।
शास्त्रासी न कळे उण खूण। वेदीं मौन धरियेलें ॥१४६०॥
वारा उमाणावा वावे। आकाश आकळावें खेंवे।
भावना भांबावली धावे। काय करावे स्फुरेना ॥१४६१॥ ए. भा.११

या ज्ञानाकरिता आरंभी साधन चतुष्ट याची आवश्यकता असते. त्या विवेक, वैराग्यादिक साधनाच्या काठिण्याबद्दल श्रीकृष्ण भगवान अर्जुनास सांगतात,

विवेकश्रवणें अतित्रासे। जेथे व्रताचरणें कर्कशे। करितां जाती भोकसें। बुद्ध्यादिकांचे ॥७८३॥ सुषुम्नेचेनि तोंडें। गिळिजे प्राणापानाचे लोंढे। बोहणिये-सीचि येवढे। भारी जेथ ॥७८४॥

वैराग्य तर फार कठिणच आहे. अनादि कालापासून ज्या विषयाची आसक्ति आहे, किंबहुना विषय सेवन हाच पुरुषार्थ वाटतो त्या ऐहिक, पारत्रिक सर्व विषयांचा त्याग होणे सोपे नाही. तुकाराम महाराज स्पष्ट भाषेत सांगतात.

बोल बोलतां वाटें सोपें। करणी करिता टीर कापें ॥१॥
नव्हे वैराग्य सोपारे। मज बोलतां न वाटे खरे ॥२॥
विष खावे ग्रासोग्रासी। धन्य तोचि एक पची ॥३॥

त्याचप्रमाणे मनोविग्रह म्हणजे शम, इंद्रियनिरोध म्हणजे दम, ही साधने किती कठिण आहेत याबद्दल श्रीज्ञानेश्वर महाराज अनेक दृष्टांतपूर्वक सांगतात,

पै सारसांही विघडता । होय वोहाळूनि वत्स काढितां ।
नव्हें भणंग दवडिता । भाणयावरुनि ।।७८५।।
पै मायेपुढौनि बाळक । काळें नेता जे एक ।
होय कां उदक । तुटता मीना ।।७८६।।
तैसें विषयाचे घर । इंद्रिया सांडिता थोर ।
युगांत होय ते वीर । विराग साहाती ।।७८७ ज्ञानेश्वरी १८

तात्पर्य ज्ञानमार्गात प्रवेश करण्यास एवढा अट्टाहास व एवढे क्लेश आहेत. तसेच श्रोत्रियब्रह्मनिष्ठ अशा शब्दपरनिष्णात गुरूंची गाठ पडणेही फार कठीण, त्यानंतर ' तरी तनुमनुजीवे । चरणासी लागावे । आणि अगर्वतां करावें । दास्य सकळ ।। ( ज्ञा ४-१६७) या श्रीज्ञानेशोक्तीप्रमाणे श्रीगुरूंची सेवा व्हावी, त्यानी कृपा करावी, महावाक्योपदेश करावा, तो विचार अंतःकरणात पूर्ण ठसावा हे सोपे नाही. जन्मजन्मांतरीच्या असंभावना, विपरीतभावना दूर होणे दुर्घट आहे. अनेक विघ्ने उपस्थित होतात.यामुळे सतत अभ्यासरत साधकासदेखील एका जन्मात मोक्ष प्राप्त होईलच असे म्हणता येत नाही. '**अनेक जन्म संसिद्धस्ततो याति परांगतिम् ।**' अनेक जन्मानी योग सिद्ध झाल्यानंतर तो साधक श्रेष्ठ अशा गतीला म्हणजे मोक्षास प्राप्त होतो '(गीता ६-४५).तसेच, '**बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।**' अनेक जन्म झाल्यानंतर तो ज्ञानी मला प्राप्त होतो ' (गीता. ७ ) असे प्रत्यक्ष श्रीकृष्णानी अर्जुनास सागितले आहे. उद्धवोपदेश प्रसंगी हीच गोष्ट एका दृष्टान्ताने पटवून दिली आहे. श्रीकृष्ण भगवान म्हणतात,

**भाझिये प्राप्ती लागुनी । भक्ती-ज्ञानमार्ग दोन्ही । ज्ञान अत्यंत कठिण-पणीं । भक्ति निर्विघ्नी पाववी मज ।। १५२८ ।। मळा शिंपावया लागुनी । मोट पाट उपाय दोन्ही । मोटा काढिजे विहीरवणी । बहुत कष्टोनि अतिअल्प ।। ३१ ।। मोट नाडा बैल जोडी । अखंड झोडितां आसुडीं । येंतां जातां वोढावोढी । भोय भिजें थोडी भाग एक ।। ३२ ।। तेथ ही मोट फुटे कां नाडा तुटें । वोडव पडे बैल अवचटें । तरी हातां येतां पीक आटे । वोल तुटे तत्काळ ।। ३३ ।। तैसा नव्हें सरितेचा पाट । एकवेळ केल्या वाट । अर्हानिशी घडघडाट । चालती लोट जीवनाचे ।। ३४ ।। मोटेचें पाणी तैसें ज्ञान । करूनि वेदशास्त्र पठण । नित्यानित्यविवेकासी जाण । पंडित विचक्षण बैसतीं ।। ३५ ।। एक कर्माकडे वोढी । एक संन्यासाकडे बोडी । एक म्हणती हे गोष्टी कुडी । देहो वोढावोढी न घालावा ।। ३६ ।। एक म्हणती प्रारब्ध प्रमाण । एक म्हणती सत्य शब्द ज्ञान । एक म्हणती धरावें मौन । अतिजल्पन न करावें ।। ३७ ।। एक म्हणती सांडावी व्युत्पत्ति । ज्याची चढे अधिक युक्ति । तोचि ज्ञाता निश्चितीं । सांगों किती मूर्खासी ।। ३८ ।। एक म्हणती तप प्रमाण । एक म्हणती पुरश्चरण । एक म्हणती वेदाध्ययन । द्यावें दान एक म्हणती**

**॥ ३९ ॥ एक तो हें अवघेंचि मोडी । घाली योगाग्नियें कडाडी । लावी आसन मुद्रेची वोढी । बैसवी रोकडी वारयावरी ॥ ४० ॥ ऐसे नाना वाद करितां । एक निश्चयो नव्हे सर्वथा । ज्ञानाभिमान अतिपंडिता ॥ ज्ञान तत्त्वतां कळेना ॥ ४१ ॥ ऐसी ज्ञान मार्गाची गती । नाना परीची विघ्नें येतीं । विकल्पें नासल्या व्युत्पत्ती । माझी निजप्राप्ती तेथें नाहीं ॥ ४२ ॥**

एवढा ज्ञानमार्गाच्या काठिण्याचा विचार केल्यावर भक्तिमार्गाच्या सुलभते-बद्दल सांगतात,

तैसी नव्हे माझी भक्ती । नाम मात्रें मज पावती । नामें उद्धरिले नेणों किती । हेंचि भागवती बोलिलें ॥ ४३ ॥ माझें करितां गुणवर्णन । कां हरिकथा नामसंकी-र्तन । तेथे रिगों न शके विघ्न । गडगर्जन हरिनामे ॥ ४४ ॥ ऐसी निजभक्ती सुलभ फुडी । देवो सांगे अति आवडी । उद्धवासी हरिभक्तीची गोडी । हर्षाची गुढी उभारली तेणें ॥ ४८ ॥ ए. भा. ११

मूळ सूत्रात ' अन्यस्मात् ' असे पद आहे. त्याचा अर्थ अन्य साधनापेक्षा असा होतो. त्याकरिता अन्य साधने व त्यांतील दोष, विघ्ने अथवा कठिणतेचा विचार करणे उचित आहे. या दृष्टीने वरील ओव्या महत्त्वाच्या आहेत.

' सौलभ्य ' म्हणजे ते साधन करीत असतां कष्ट न वाटणे, त्यासाधनाचरणात विघ्ने न येणे, साधनाचरणात प्रमाद निर्माण न होणे इंद्रियमनबुद्धीवर सक्ती करून, दडपण आणून, साधन करण्याचे कारण न पडणे, साधन करता करता साधनापासून स्खलन च्युती न होणे, पतन न होणे, त्या साधनाच साध्याशी संबंध असणे. म्हणजे ते साध्यापावेतो सहज नेणारे असणे, साधनाचरण करीत असता साधकाला संतोष होत राहणे, साधकाची त्या साधनात तन्मयता होणे, तसेच ज्याच्या प्राप्ती करता साधकभक्त हे साधन करतो त्यालाही हे साधन आवडणे, इत्यादि सुलभतेचे प्रकार म्हणविले जातील. हे सर्व गुण भक्ती या साधनात आहेत भागवत अकराव्या स्कंधात दुसऱ्या अध्यायात नवयोगेश्वर विदेहाला या भक्ती मार्गाच्या श्रेष्ठत्वा-बद्दल सागतात.

**यानास्थाय नरो राजन्न प्रमाद्येत कर्हिचित ।**
**धावन्निमील्य वा नेत्रे न स्खलेन्न पतेदिह ॥ ३५ ॥**

' या भागवतधर्माचा (भक्तीचा) आश्रय केला असतां मनुष्य भ्रष्ट होत नाही. नेत्र मिटून चालत असला तरी अडखळत नाही, किंवा पडत नाही. '

भक्ती हे साधन अन्य योगादि साधनापेक्षा सुलभ असूनही योग ज्ञानादिकांनी प्राप्त होणाऱ्या सर्व आध्यात्मिक भूमिकांचा लाभ या एका साधनाने होतो असे श्रीकृष्ण उद्धवास सागतात.

नकरितां योग साधन । नलगे त्वंपदाचे शोधन । याहोनि सुलभ साधन ।

तुज मी आन सांगेन ।। २८६ ।। जेथ कष्ट करिता तरी थोडे । परी योगाचे सकळ फळ जोडे । त्वंपदशोधन त्यापुढे । होय बापुडे लाजोनि ।। ८७ ।। ते माझी गा निजभक्ती । माझ्या रामकृष्णादि ज्या मूर्ती । पूजितां त्या अतिप्रीती । मी श्रीपती संतोषे ।। ८८ ।। ए. भा. २०

भक्ती साधनाचे सौलभ्य म्हणजे ज्याच्या प्राप्तीकरिता हे साधन करावयाचे तोच या साधनातील विघ्ने निवारण करतो. भगवान श्रीकृष्ण स्वमुखाने भक्तांची विघ्ने मी कशी दूर करतो हे सागतात,

असो न ठके माझें ध्यान । तैं सोपा उपाय आहे आन ।
माझे करितां नामकीर्तन । विघ्न निर्दळण हरिनामें ।। ६१७ ।।
जेथ नामाचा घडघडाट । तेथ उपसगी न चले वाट ।
महाविघ्नाचा कडकडाट । करी सपाट हरिनामे ।। ६१८ ।। ए. भा. २८

मोक्षप्राप्तीची जी अन्यसाधने योग, तप, ज्ञान, इत्यादि सागितली आहेत त्यांत आतून बाहेरून अनेक उपसर्ग सदोष प्राक्तन, संस्कार, सगती, योग्य सामग्रीची अननुकूलता, इत्यादि कारणाने निर्माण होतात. त्यामुळे त्या उपसर्गाना, संकटाना साधकानेच धैर्याने तोंड द्यावे लागते. कित्येक वेळा ते धैर्य अपुरे पडते. त्यामुळे त्या साधनात प्रगती न होण्याने साध्य दूर राहते. पण भक्तिमार्गात प्रत्यक्ष भगवान श्रीहरीच ‘ मागे पुढे उभा राहे साभाळित । आलिया आघात निवाराय ।। ’ (तु.) या प्रमाणे साहाय्यक होतो. म्हणूनच नवयोगेश्वर जनक संवादात म्हटले आहे,

यापरी हरिकीर्तन । देत परम समाधान ।
हा भक्ति राजमार्ग पूर्ण । ये मार्गी स्वये रक्षण चक्रपाणीकर्ता ।। ५४३ ।।
ए भा. २

श्री तुकाराम महाराज कलियुगाचा हवाला देऊन स्पष्ट सांगत आहेत की,

अवघ्या वाटा झाल्या क्षीण । कली न घडें साधन ।
उचित विधिविधान । नकळे न घडे सर्वथा ।। १ ।।
भक्तिपंथ बहु सोपा । पुण्य नागवे या पापा ।
येणे जाणे खेपा । येणेचि एके खंडती ।। २ ।।

आणखीही या साधनाचे सौलभ्य ते सांगतात,

नलगे सांडावा आश्रम । उपजले कुळीचे धर्म ।
आणीक न करावे श्रम । एक पुरे नाम विठोबाचे ।। १ ।।
बीज आणि फळ हरिचे नाम । सकळ पुण्य सकळ धर्म ।
सकळ कळांचें हें वर्म । निवारी श्रम सकळही ।। २ ।।

विचार केला असता ‘ भक्ति ’ या साधनाची सुलभता अनेक प्रकारे सिद्ध होऊ शकते. कर्माचा अधिकार केवल त्रैवर्णिकानाचे आहे. बृहस्पतिसव याग फक्त

ब्राह्मणच करू शकतो. राजसूययज्ञ केवळ क्षत्रियासच करता येतो. त्यातही देश, काल, संस्कार, विधिज्ञान, इत्यादि अनेक प्रतिबंध आहेत. याचा विचार आरंभी केलाच आहे. पण भक्ती ही सर्वांना करता येते.

ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र । चांडाळाही अधिकार ।
बाळें नारीनर । आदि करूनि वेश्याही ॥१॥ तु० ॥

भक्तीत व्याध, शबरी, पिंगला किंबहुना चांडाळासही अधिकार आहे. जास्त काय सांगावे, श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

परी भक्ताचेनि नावे । चतुष्पदादि आघवे ।
वैकुंठीचिये राणिवें । योग्य केले ॥ ज्ञा० १२. ९३

दुसरी सुलभता ही आहे की योग, कर्म, इत्यादि साधनांना योग्य देशकाल अपेक्षित असतो. तसा न प्राप्त होईल तर ते कर्म वा योग सांग होणार नाही. पण भक्ती कोठेही व केव्हाही करता येते. तिसरी सुलभता अशी की ज्याची भक्ती करावयाची तो तुमचेपासून कशाचीही अपेक्षा करीत नाही. तो कोणाचे धन घेणार नाही अथवा धर्म बिघडविणार नाही किंवा स्वजन संबंधीयाचा त्याग करावयास सांगणार नाही.

**नलगतीं सायास जावे वनांतरा । सुखे येतो घरां नारायण ॥** तु०

आणखी ही भक्तिसौलभ्य असे आहे की, काही साधने मनाने अथवा वाणीने करून भागत नाही तर कायेने (शरीराने) ती यथा प्रकार झाली पाहिजेत तरच त्या कर्मधर्मादि साधनांचे फळ मिळते पण भक्ती शरीराने, वाचेने किंबहुना केवळ मनानेही करता येते. देवपूजेत बाह्य सर्व उपचाराची अनुकूलता असेल तर उत्तमच, नसता केवल नामस्मरणाने सर्वांची उणीव भरून निघू शकते.

**तुका म्हणे देवा अवघे तुझे नाम । धूप दीप राम कृष्ण हरी ॥**

तसेच भक्तीची सुलभता अशी आहे की अन्य साधनाच्या क्रिया शास्त्र-मर्यादानुसार ठरलेल्या आहेत. त्या योग्य क्रमाने, योग्य प्रकारे, नियमानुसार झाल्या तरच त्या साधनाचे योग्य आचरण होऊन फल मिळेल. पण भक्तीमध्ये असा क्रम विवक्षित नाही. ध्यान, जप, श्रवण, कीर्तन, भजन, पूजा, नमन कोणत्याही क्रमाने केले तरी ते भक्तीत समाविष्ट होते. किंवा भावना प्राबल्य असेल तर शरीराने होणारे स्वाभाविक कर्मदेखील भक्तीमध्ये समाविष्ट होते.

जें जें काही करितो देवा । तें तें सेवा समर्पे ॥ तु०

'यद्यत्कर्म करोमितत्तदखिलं शम्भो तवाराधनं ॥' ही शंकराचार्यांची उक्ती प्रसिद्ध आहे. भक्तीमध्ये कोणत्याही पदार्थाविना अडत नाही. द्रव्य कमी पडले तर यज्ञ होणार नाही. दान पुण्य मिळवता येणार नाही. पण भक्तीत त्या वस्तूविना अडणार नाही पत्र, पुष्प फल, तोय, जे मिळेल ते प्रेमाने श्रीहरीस समर्पण केले की

भक्ती होते. गजेंद्राचे एक पुष्प, शबरीची उष्टी बोरे, सुदामाचे मुष्टिभर पोहे पण भक्तीत समाविष्ट झाले. तेही न मिळाल्यास रंतिदेवाप्रमाणे केवळ जलदेखील समर्पण केले तरी ते भगवान प्रेमाने स्वीकारतो.

**तुलसीदल मात्रेण जलस्य चुलुकेनच ।**
**विक्रीणीते स्वमात्मानं भक्तेभ्यो भक्तवत्सलः ।।** पुराणवाक्य.

'केवल एका तुलसीदलाने अथवा चुळकाभर जलाने भक्तवत्सल भगवान भक्तांना विकला जातो,' 'भावे तुलसीदल पाणी जोडा हात । म्हणावे पतित वेळोवेळा ।।' तु० भक्तवर्य प्रल्हाद असुरबालकाना उपदेश करीत असता म्हणतो,

**कोऽति प्रयासोऽसुरबालका हरेरुपासने स्वे हृदि तिष्ठत सतः ।**
**स्वस्यात्मनः सख्युरशेष देहिनां सामान्यतः किं विषयोपपादनैः ।।**

श्रीमद्भागवत ७।७।३८

'दैत्यपुत्रांनो, श्रीहरीच्या उपासनेत कोणते असे मोठे श्रम आहेत? तो तर आपल्या हृदयातच वास्तव्य करून आहे, आपला आत्माच आहे व समस्त देहधारी जीवाचा सामान्यत. मित्र आहे. त्याचे भजन करा, विषय संपादनाचे मागे लागून काय सुख प्राप्त होणारे आहे ? पुन्हा प्रल्हाद सांगतो,

**नालं द्विजत्वं देवत्वमृषित्वं वा सुरात्मजाः ।**
**प्रीणनाय मुकुन्दस्य न वृत्तं न बहुज्ञता ।। ५१ ।।**
**न दानं न तपो नेज्या न शौचं न व्रतानि च ।**
**प्रीयतेऽमलया भक्त्या हरिरन्यद्विडम्बनम् ।।** भागवत ७।७।५२

'हे असुरबालक हो, भगवान मुकुंदाला प्रसन्न करण्याकरिता ब्राह्मणत्व, देवत्व, ऋषित्वाची आवश्यकता नाही.तसेच केवळ आचार वा विद्वत्ता प्रसन्न करू शकत नाही. दान, तप, यज्ञ, पावित्र्य, व्रते इत्यादिकांची अपेक्षा नाही. केवल निर्मल भक्तीनेच तो प्रसन्न होतो. अन्य सर्व विडम्बन आहे.' म्हणून अन्यसाधनापेक्षा भक्तिची सुलभता सांगितली आहे. भागवत एकादश स्कंधाच्या शेवटी उद्धवाने श्रीकृष्णास हाच प्रश्न केला आहे.' सुगमोपायें स्वरूप प्राप्ती । भाळे भोळे जन पावती । तैसा उपाय श्रीपती । कृपामूर्ती सांगावा ।। १८५ ।।' यावर श्रीकृष्ण उत्तर देतात 'भाळयाभोळया ब्रह्मप्राप्ती । पावावया सुगम स्थिती । ये अर्थी दाटुगी माझी भक्ती । तिसी मी श्रीपती सदा वश्य ।।२१४।। माझें करितां अनन्य भजन । मी सदा भक्तां आधीन । तेथ जाती गोत ज्ञातेपण । उंच नीच वर्ण मी न म्हणे ।।२१५।। ए. भा. २९

अशा सुलभ भक्तीचा विशेष असा की तिच्या योगे योगयागतपादिकांनी वश न होणारा दुर्लभ असा भगवानही सुलभ होतो. श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात.

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः** ।। गीता ८. १४

अर्जुना, जो सतत अनन्यचित्त होऊन नित्य माझे स्मरण करतो, त्या माझ्याशी निरंतर एकवटलेल्या योग्याला मी सुलभच आहे.'

**ऐसें जे नित्ययुक्त । तयांसीं सुलभ मी सतत ।**
**म्हणऊनि देहांती निश्चित । मीचि होती** ।। ज्ञा० ८–१३९

वरील अनेक कारणांचा विचार केला असता भक्तिमार्गाची अन्य साधना-पेक्षा सुलभता सहज कळेल.

## सूत्र ५९

## प्रमाणांतरस्य अनपेक्षत्वात् स्वयंप्रमाणत्वात् ।।५९।।

**अर्थ :**

अन्य प्रमाणाची अपेक्षा नसल्यामुळे व ती स्वतःच प्रमाण असल्यामुळे (भक्ती इतरापेक्षा सुलभ आहे).

**विवरण :**

मागच्या सूत्रामध्ये भक्ती ही परमार्थाच्या इतर साधनांपेक्षा सुलभ आहे असे म्हटले आहे ती कशी सुलभ आहे हे आपण विवरणात विस्ताराने पाहिले. त्यासाठी गीताभागवतादि ग्रंथातील प्रमाणेही दिली. पण नारदमहर्षींच्या मताने 'भक्ती ही सुलभ का ?' या गेल्या सूत्राबरोबर निर्माण होणाऱ्या प्रश्नाचे उत्तर वेगळेच आहे आणि त्यानी ते या आणि यांच्या पुढच्या साठाव्या सूत्राच्याद्वारे दिले आहे. त्याच्या मताने इतर मार्ग हे आपल्या स्वरूपनिश्चयाकरिता, त्यांच्या साधननिश्चयाकरिता व त्याच्या फलनिश्चयाकरिता इतर प्रमाणांवर अवलंबून असतात कर्म, योग, ज्ञान याचे स्वरूप, प्राप्तीचा उपाय इत्यादी मनुष्य स्वतःच्या मनाने ठरवू शकत नाही. त्यासाठी त्याला वेदशास्त्रे किंवा योग्य गुरू याच्यावर अवलंबून राहावे लागते. पण वेद किंवा शास्त्रग्रंथ प्रमाण मानावेत तर त्याचे अर्थ अनेकांनी अनेक प्रकारे केलेले असल्यामुळे 'नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम्' अशी परिस्थिती निर्माण होते. गुरूंना प्रमाण मानावे तर ते योग्य भेटणे हे सहज शक्य नाही. त्याला भाग्यच लागते. म्हणजे इतर मार्गात मनुष्य पराधीन आहे. आपण योग्य मार्गावरून चाललो आहोत किंवा नाही हे समजण्यासाठी त्याला सतत

दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहावे लागते. पण भक्तीमार्गात तसे नाही. भक्तीच्या सबधात मनुष्य स्वाधीन, स्वतंत्र आहे. म्हणून ती अधिक सुलभ आहे.

यावर शंका अशी की, भक्ती ही वेदपुराणादिकात प्रतिपादिली आहे. म्हणून ती प्रमेय आहे. ज्ञानेश्वर महाराज हरिपाठात म्हणतात, ' वेदशास्त्र प्रमाण श्रुतीचे वचन। एक नारायण सार जपा ।।'. शाडिल्यभक्तिसूत्रामध्ये ' भक्ति. प्रमेया श्रुतिभ्य ।' आणि ' पुराणेतिहासाभ्या चेति ।' अशी दोन सूत्रे आहेत. स्वत. नारदच पुढे ' भक्तिशास्त्राणि मननीयानि ' (सूत्र ७६) असे सागणार आहेत. श्रीमत्भगवत्-गीता भक्तीचे प्रतिपादन करते, श्रीमत्भागवत तर भक्तिशास्त्रच म्हणविले जाते आणि सर्व प्रमाणशिरोभूत वेदही भक्ती सागतो.

यस्य देवे पराभक्ति. यथा देवे तथा गुरौ ।
तस्यैते कथिता ह्यर्था. प्रकाशन्ते महात्मन. ।।

' ज्याची देवावर परमभक्ती आहे व जशी देवावर तशीच गुरूवर आहे. त्यालाच महात्म्यानी सागितलेल्या अर्थाचा बोध होतो '

अशा अनेक श्रुतिवचनातून भगवद्भक्तीचे श्रेष्ठत्व सागितले आहे तात्पर्य, अनेक ग्रथातून भक्ती ही प्रमेय म्हणून माडली गेली आहे व कोणत्याही प्रमेयाची सिद्धी ही प्रमाणाने होते भक्तीला प्रमाणभूत होणारे वरीलप्रमाणे अनेक ग्रथ आहेत अधिक काय, स्वत: नारदाची भक्तिसूत्रे ही भक्तीचे स्वरूप, साधन वगैरे सागणारा प्रमाणग्रथच आहे. असे असता नारदमहर्षी भक्तीच्या सिद्धीसाठी प्रमाणाची आवश्यकता नाही असे कसे म्हणतात ?

या शंकेचे उत्तर हे की, भक्ती या साधनाकरिता तिचे स्वरूप, साधन, फल सागणारी व मान्य होणारी प्रमाणे आहेत हे खरे; पण प्रमाणे आहेत म्हणूनच ती भक्ती होते व ज्याना त्या प्रमाणाचे ज्ञान नाही त्याच्याकडून ती होत नाही असे मात्र नाही. शुकाचार्यानी भागवतामध्ये भक्तवर्य प्रल्हादाचे चरित्र सागताना ' वासुदेवे भगवति यस्य नैसर्गिकी रति: ।' असे म्हटले आहे पाचव्या वर्षी ध्रुवाच्या अंत:करणा भगवद्भक्तीचा उदय झाला बाल वयातच नामदेवानी आपल्या भक्ति-बळाने नैवेद्य खावयास देवाला भाग पाडले रामावतरात हनुमान, सुग्रीव, अंगद, जाबुवन्त व शबरी इत्यादिकानी कोणते प्रमाण पाहून भक्ती केली ? कृष्णावतारात गोकुळातील गोपबालक, यज्ञपत्न्या, गोपिका यानी कोणत्या प्रमाणाच्या आधारे भक्ती केली ? श्रीकृष्ण भगवानच नाथभागवतात म्हणतात,

कोण भक्ती केली गोपाळी । काय ती सोवळी की ओवाळी ।
त्याचे उच्छिष्ट कवळ मी गिळी । प्रेमसमेळी डुल्लत ।।

ए. भा. २४–३८१

तुकाराममहाराजही गोपाळाचे वर्णन करताना म्हणतात,

गौळियाची ताकपिरे । कोण पोरे चागली ।।१।।
केवढा त्यांचा छद देवा । काय हेवा भक्तीची ।।२।।

भक्तीला प्रमाणातराची आवश्यकता का नाही तर ती प्रमाणाचा विषयच होऊ शकत नाही म्हणून, असे श्रीनारदांचे त्यावर उत्तर आहे. कारण 'अनिर्वच-नीयं प्रेमस्वरूपम् ।' अशी तिची व्याख्याच ते करतात. ती जर प्रमाणाला विषय झाली तर तिचे अनिर्वचनीयत्व कसे मानले जाईल ?

तसेच प्रेम हे प्रकाशस्वरूप आहे. ते जड, अज्ञात असे नाही. अज्ञात, जड पदार्थाच्या ज्ञानाकरिता प्रमाणाची आवश्यकता असते निरूपचार प्रेमाचा विषय आत्मा हा जर स्वसंवेद्य आहे तर त्याचे स्वरूपभूत प्रेमही स्वसंवेद्य असेच मानले पाहिजे. माता–बालक, पति–पत्नि, हे परस्परावरील प्रेमाकरिता इतर कोणत्याही बाह्य प्रमाणावर अवलबून नसतात. त्याच्या अत.करणातील आपल्या प्रिय व्यक्ती-विषयी वाटणारी ओढ म्हणजे प्रेमच तेथे प्रमाण असते.

सर्व प्रमाणे शेवटी अनुभवपर्यवसायी असतात म्हणजे प्रमाणानी दिलेले ज्ञान अनुभवाला आले तर खरे, नसता त्याना काही महत्त्व नाही. मग प्रेम किंवा भक्ती ही तर अनुभवस्वरूपच आहे 'अनुभवरूपम्' असे प्रेमाचे लक्षण चौपन्नाव्या सूत्रात केले आहे. म्हणून ते स्वयप्रमाण आहे.

प्रमाणांनी प्रेम शोधावयाचे झाल्यास ते शोधणाऱ्याहून वेगळे ठरेल. पण ते आत्म्याहून वेगळे राहू शकत नाही. पुन्हा ज्याच्यावर प्रेम केले जाते तो आत्माच वाटत असतो. म्हणूनच गोपिकानी भगवन्ताला 'अखिलदेहिना अतरात्मदृक् ।' असे म्हटले आहे

प्रमाण म्हटले की त्यात प्रमेय, प्रमाता, प्रमाण ही त्रिपुटी आली. पण प्रेमात अनन्यता, तन्मयता असते. तसेच प्रमाणानी एखादी गोष्ट ठरली की त्यात काही नियम, मर्यादा, विशिष्ट आचार इत्यादी येतात. पण प्रेमात हे बंधन नसते

प्रमाण प्रमेय विचारात प्रमाता हा त्या प्रमेयाच्या प्राप्तीत काही फलाची अपेक्षा करतो. पण भक्त हा भक्ती हेच फल समजतो. 'फलरूपत्वात्' असे सूत्रच आहे म्हणून भक्तीच्या संबधात वेगळ्या प्रमाणाची आवश्यकताच राहात नाही.

किंवा शांडिल्याच्या भक्तिसूत्राप्रमाणे भक्ती प्रमेय आहे असे मानले तर तेथे वेगळ्या दृष्टीने विचार करावा लागेल. त्यासाठी काही ठिकाणी भक्तीचे दोन प्रकार मानले आहेत, वैधी भक्ती व रागात्मिका भक्ती. वैधी भक्ती म्हणजे शास्त्रात मानवांना भक्तिसाधनाचा विधी सागितला आहे, म्हणजे भगवंताची भक्ती करावी असे सागितले आहे. मग विधींचे पालन न करणे हे प्रत्यवाय दोषास

कारण आहे. भगवतानी भगवद्गीतेमध्ये ' मन्मना भव, ' ' मद्भक्तो भव, ' मद्याजी भव, ' ' मा नमस्कुरू ' असा विधीरूप उपदेश केला आहे. त्यामुळे भक्ती करणे आपले कर्तव्य आहे असे वाटून किवा त्यामुळे काही विशिष्ट पुण्यात्मक फल प्राप्त होईल असे वाटून किंवा दुर्गतीच्या भीतीने जी भक्ती केली जाते ती वैधी भक्ती होय विधीकरिता शब्दप्रमाण अपेक्षित आहे म्हणून वैधी भक्ती प्रमाणातराची अपेक्षा ठेवणारी आहे. पण सा तु अस्मिन् परमप्रेमरूपा । अमृतस्वरूपाच ।' म्हणून ज्या ' रागानुगा ' किंवा ' रागात्मिका ' भक्तीचा श्रीनारदानी प्रारभीच निर्देश केला आहे ती मात्र प्रमाणातरनिरपेक्ष, स्वयप्रमाणस्वरूप अशी आहे.

तिच्या प्राप्तीसाठी बाह्य कोणत्याही प्रमाणाची आवश्यकता नाही, तिचे कोणतेही शास्त्र नाही, तिचा कोणताही विधी नाही. त्यामुळे तिच्यासाठी वेगळी खटपट नाही, ती सहजच अंत:करणात नित्य असते, आणि ती आहे किवा नाही हे आपले आपल्यालाच केवळ समजू शकते.

अशा रीतीने ती बाह्य कोणत्याही प्रमाणावर अवलंबून नसल्यामुळे अत्यत सुलभ आहे

## सूत्र ६०

## शांतिरूपात्परमानंदरूपाच्च ।।६०।।

**अर्थ :**

( स्वयंप्रमाणरूप असलेली भक्ती ) शातिस्वरूपा व परमानंदस्वरूपा अशी असल्याने (सुलभ आहे)

**विवरण :**

जीवनात शाती, परमानंद, अखंड असावा असे सर्वांनाच वाटते. ससार सर्व अशातीने भरलेला आहे, परमानंद तर नाही पण अल्पही आनद मिळत नाही. जो मिळाल्यासारखा वाटतो तो केवळ भास आहे. आनंदाची इच्छा पूर्ण करण्याची शक्ती ससारात नाही. अस्थिरता, असारता, चंचलता म्हणजेच संसार. शाती ही जीवनाच्या स्थैर्यात आहे. परमानंद ही जीवनाची पूर्णता आहे व परमात्मा श्रीहरी हा आनंदरूप आहे आनंदस्वरूप परमात्म्याच्या अनुभूतीतच जीव आनदरूप बनतो. भगवद्भक्ती ही परमप्रेमरूपा अमृतरूपा आहे असे आरंभी सूत्रातच सागितले आहे. त्यामुळे तीही शांतिरूप व परमानंदरूप आहे. मोक्षमार्गाकडे प्रवृत्त झालेला साधक

या शातीप्राप्तीकरिताच अनेक साधनाचा अवलंब करीत असतो. श्रीभगवद्गीतेमध्ये कर्मफलत्याग, कामत्याग, योग, आत्मज्ञान यांच्या द्वारे शांती प्राप्त होते असे म्हटले आहे.[१] म्हणजे योगज्ञानादिक शांती व आनंदाची साधने मानली गेली आहेत. तसे भक्ती हेही या शांति व परमानंदाचे साधन आहे असे कोणास वाटेल म्हणून नारद सांगतात, ती परमप्रेमरूपा भक्ती ही शातिरूप, परमानंदस्वरूप आहे.

काही काळ मन निश्चळ राहाणे अथवा ठेवणे यास शांती म्हटले जाते. पण ती खरी शांती नव्हे. भगवान श्रीकृष्ण उद्धवास शांतीचे खरे स्वरूप सांगतात.

काम क्रोध सलोभता । समूळ मूळेसीं न वचतां । देही आली जे निश्चळता । ते नसरे सर्वथा येथ शाती ।।१७०।। मत्स्य धरोनिया मनी । बक निश्चळ बैसला ध्यानी । ते शांति कोण मानी । अंतःकरणी सकाम ।।१७१।। देही स्फुरे ना देह अहंता । विराली कामक्रोध सलोभता । हे शाती बाणे भाग्यवंता । मुख्यशातता या नाव ।।१७२।। ए. भा. १४. काही काळ निश्चळता आली तरी ती सर्व काळ राहतेच असे नाही. समाधी अवस्थेतूनही व्युत्थानदशेत योगी येतो, म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शांतीचे लक्षण फार महत्त्वाचे सागितले आहे.

आता शातीचे लिग । ते व्यक्त मज सांग । देवो म्हणती चाग । अवधान देई ।।१३६।। तरि गिळोनि ज्ञेयातें । ज्ञाता ज्ञानही मागौते । हारपे निरुते । ते शाति पैं गा ।।१३७।। जैसा प्रळयाबूचा उभडू । बुडऊनि विश्वाचा पवाडु । होय आपणपे निबिडु । आपणचि ।।१३८।। मग उगम ओघ सिधु । हा नुरेचि व्यवहार भेदु । परी जलैक्याचा बोधू । तो ही कवणा ।।१३९।। तैसी ज्ञेया देतां मिठी । ज्ञातृत्व ही पडे पोटी । मग उरे तेचि किरीटी । शातीचे रूप ।।१४०।। ज्ञा. १६.

परमप्रेमरूपिणी भक्तीमध्येच अशी स्वरूप शाती प्राप्त होते. भगवान श्रीकृष्ण उद्धवास सागतात, 'याहीवरी प्रेमयुक्त । माझ्या स्वरूपी रगलें चित्त । अतएव निजशाति तेथ । असे नादत निजरूपे ।।११४।।' ए० भा० १४. हिलाच स्वरूपशाती असे म्हणतात. 'करिता ऐक्य भावे निजभक्ती । उत्कृष्ट उपजे पूर्ण शाती । तेणे होय असताची निवृत्ति । भक्ता पूर्ण प्राप्ती । परमानंदे ।।६२१।।' ए० भा० २.

भक्तीचे ते वर्म जयाचिये हाती । तया घरी शातिक्षमादया ।।१।। तु०

गीतेच्या नवव्या अध्यायात भक्तीचे महत्त्व प्रतिपादन करीत असता श्रीकृष्ण सागतात, 'क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ।।' गी० ९ 'अर्जुना, माझा

---

१ गीता अ० २ श्लो. ७१, अ० ४ श्लो. ३९, अ० ५ श्लो. १२, अ० ६ श्लो १५, अ० ५ श्लो. २९, अ० ९ श्लो ३१, अ० १२ श्लो. १२, अ० १८ श्लो. ५३ व ६२, शातिप्राप्तीच्या विषयात हे श्लोक मुळात पाहणे.

भक्त हा तत्काल धर्मात्मा होतो, त्याला शाश्वत अशी शाति प्राप्त होते.' या श्लोकावरील टीकेत श्रीज्ञानेश्वर महाराज सागतात

मग माझी नित्य शाती । तया दशा तेचि काती ।
किबहुना जिती माझेनि जीवे ।। ९–४२९।।

या सर्व प्रमाणावरून शाति व भक्ती या दोघाचा अभेद कसा आहे हे सहज लक्षात येईल

तसेच भक्ती ही परमानदरूप आहे असे नारद महर्षि सागतात आनद-संतोष, सुख इत्यादि शब्द एकमेकाचे पर्याय आहेत. सूत्रात केवळ आनंद शब्द न वापरता विशेष महत्त्वाचा परमानंद शब्द वापरला आहे. आनद हे जीवनाचे साध्य आहे ससारातही जीव आनद शोधीत असतो आत्मा हा आनदरूपच आहे, कारण तो परमप्रेमास्पद, 'प्रियाची परमसीमा' असा आहे. पण अनादि अज्ञानामुळे जीवास परमानंद परमात्मस्वरूपाचे आवरण आहे. अनावृत आनंद मिळत नाही. पण आनद हा जीवनाचा स्थायिभाव असल्यामुळे त्याची ओढ नष्ट होत नाही. परमानद आवृत झाल्याने, तसेच प्रेमाधार आत्मा असला तरी अज्ञानाने सत्-चित्-आनदरूप आत्म्याला विसरून जीव देहादि अनात्मतत्त्वालाच आत्मा म्हणून सर्व व्यवहार करतो. देहइद्रियाशी अध्यासामुळे तादात्म्यसबध आला की पचविषय हेच सुख– आनंद– स्वरूप वाटावयास लागतात.

भ्रमाने विषयात सुखबुद्धी झाली तरी विषयात क्षय व अतिशय हे दोष आहेत. क्षय म्हणजे विषय मृगजळवत् मिथ्या नाशवान आहेत. अतिशय म्हणजे प्राप्त विषयापेक्षा श्रेष्ठ अन्य विषय दिसला की प्राप्त विषय सुखरूप वाटत नाही. तसेच योगशास्त्रात सागितलेले परिणामदु.ख तापदु.ख, सस्कारदु.ख, गुणवृत्ति विरोधादि दु.खेही त्यात आहेत. विषय सुखरूप जरी वाटले तरी त्यापासून पुढे परिणाम दु.खरूपच होतो एखादे विष प्रथम मधुर वाटले तरी परिणाम घातकच असतो. विषय सेवन करीत असता ते विषय संपादन करण्याकरिता जे क्लेश होतात ते, किंवा सुखकारक पदार्थाचा उपभोग घेतानाही त्या पदार्थाच्या विरुद्ध जे पदार्थ आहेत त्याविषयी मनात द्वेष असल्यामुळे सुखोपभोगकालीही ती द्वेष-बुद्धी टाळता येत नाही. त्यासच तापदु.ख म्हटले जाते. तसेच त्या विषयाचे सेवन करीत असता तो भोग अनुकूल विषयाचे संस्कार निर्माण करीत असतो. असे अनंत सस्कार निर्माण होऊन अशातता उत्पन्न होते, हे संस्कारदु.ख सत्त्वरजतम या तीन गुणाच्या वृत्ती सुख, दुःख, मोह या रूपांनी दृष्टोत्पत्तीस येतात त्या परस्पर विरोधी असल्यामुळे त्याच्यापासून दु.ख होते गुणाविना विषयभोगाचा व्यवहार होत नाही. हा गुणवृत्ति-विरोध होय. कदाचित् अनुकूल विषय प्राप्तीमुळे अथवा विषयाच्या ठिकाणी झालेल्या अनुकूल बुद्धीमुळे क्षणिक सुख वा आनंदाचे भान झाले तरी ते टिकत नाही. त्याच्या मागे पुढे सर्व दु:खच असते कारण सुख हा विषयधर्मच नाही. विषय तमोगुणाचे कार्य आहेत व जड आहेत सुख अथवा आनंद

जडाचा धर्म आहे असे कोठेही सागितले नाही. जड हे असत् व दु:खस्वरूप असते असा वेदात सिद्धान्त आहे. म्हणूनच विवेकी साधक खऱ्या सुखाच्या प्राप्तीचाच यत्न करीत असतो.

त्यांतही काही भेद आहेत. कोणत्याही साधनात आनंद नसतो. साधनात क्लेश असतात हे मागील सूत्रातून सांगितले आहे. योगामध्ये वृत्तीचा निरोध असल्याने आनंदाचा भोग नाही वृत्तिनिरोध होण्याने दृष्टयाचे आपल्या स्वरूपात अवस्थान होते. पण योगात दृष्टयाचेच स्वरूप आनद नाही. आनंदाकार वृत्ती पण योगात इष्ट नाही असंप्रज्ञात समाधीत आनंद मानला जात नाही. तेथे आनंद भोगला जाईल तर आनंदाचा भोक्ता जीव होईल. तो दृष्टा राहणार नाही. तर भक्तीमध्ये आनंदाकार वृत्तीचा निरोध इष्ट नाही! साख्य व योगमतामध्ये सत्त्वगुणाची परिणामरूप वृत्ती आनद आहे. ती प्राकृत अतएव त्याज्य आहे. वेदान्त शास्त्रात मोक्ष हा आनंदरूप मानला आहे, पण तेथे आनंदाचा भोग नाही. भक्तीत आनंदाचा भोग आहे.

**' द्रवीभावपूर्विकाहि मनसो भगवदाकारता सविकल्पकवृत्तिरुपा भक्तिः ।'**

' अंत:करणास द्रवीभाव प्राप्त होऊन जी भगवदाकारतारूप सविकल्पकवृत्ती ती भक्ती. ' असे भक्तीचे लक्षण श्रीमधुसूदन सरस्वती यानी आपल्या भक्ति रसायनात सागितले आहे आणखीही ते सागतात

**' व्यक्ती भवद्भगवदाकारतारूपरसाख्य. स्थायीभाव परमानंद साक्षात्कारात्मक: प्रादुर्भवति स एव भक्तियोग इति तं परमं निरतिशयं पुरुषार्थं वदन्ति रसज्ञा। तस्मात् अयं भक्तियोग पुरुषार्थ. परमानंदरूपत्वात् इति निर्विवादम् ।।**

' अत:करणात अभिव्यक्त झालेला भगवदाकारतारूप रतिस्वरूप स्थायीभाव परमानदाचा साक्षात्कार रूपाने प्रगट होतो तोच भक्तियोग आहे. त्यासच रसज्ञ लोक परम अर्थात निरतिशय पुरुषार्थ म्हणतात अतएव हा भक्तियोग परमानंदरूप असल्याने स्वतत्र पुरुषार्थरूप आहे हे निर्विवाद सिद्ध होते. '

श्री मधुसूदन सरस्वती भक्ति शब्दाची व्याख्या स्पष्ट करतात.

**' भजनं अंत:करणस्य भगवादाकारतारूपं भक्तिरिति भावव्यूत्पत्त्या भक्तिशब्देन फलमभिधीयते ।।**

' भजन म्हणजे अत:करणाची भगवदाकारतारूपता तीच भक्ती ' या (व्याकरणातील) भावव्युत्पत्तीने ' भक्ती ' पदाचा अर्थ केला तर तिचा फल असा अर्थ होतो, ' म्हणजे ती साधन भक्ती न होता साध्य होते.

याच भक्तीच्या परमानंदरूपतेचे वर्णन श्री एकनाथ महाराजानी भगवन्मुखाने केले आहे. भगवान श्रीकृष्ण उद्धवास सांगतात,

**देशेकाळें वेदानुवादा । ज्या सुखाची न करवे मर्यादा । त्या सुखाची सुखसंपदा ।**

**मद्भक्त सदा भोगिती ।।२०१।। ज्या सुखाचे सुख प्राप्ती । विरोनि जाय चित्तवृत्ति । सुखें सुखरूप सर्वांगें होतीं । एवढी सुखप्राप्ती मद्भक्ता ।। २०२ ।। इतर मी सांगों कायी । मोक्ष सुखाच्याही ठायीं । या सुखाची गोडी नाही । धन्य पाही हरिभक्त ।२०३।।**

वास्तविक अशा श्रेष्ठ सुखाकरिताच अनेक साधक नाना प्रकारची साधने करतात. पण त्या साधनाने ही शाती व परमानदप्राप्ती त्याना होत नाही

**ऐशिया सुखाकारणे । साधक शिणतीं जीवें प्राणे । तपादि शरीर शोषणे । व्रत धरणे विषयांचे ।।२०४।। एक करिती योगयाग । एक करिती शास्त्रसंग । एक करिती सर्वस्व त्याग । एकीं सांडिला संग गृहदारा ।।२०५।। एक फळाहारी निराहारी । एक ते नग्न ब्रह्मचारी । एक कडे कपाटी शिखरी । गिरिकंदरी रिगाले ।२०६।। एक ते जटाळ गांढथाळ । एक नखधारी ढिसाळ । एक महाहटी विशाळ । एक पिसाळ मत्तमुद्रा ।।२०७।। एक तांबडे बोडके । एक ते केवळ सुडके । एक तीर्थाटणे रोडके । एक ते मुके मौननिष्ठ ।।२०८।। एक राख्ये एक शंख्ये । एक ते अत्यंत बोलके । एक पाणिपिशी झालीं उदकें । कुशमृत्तिकें विगुंतलीं ।।२०९।। ऐशा नाना परीच्या व्युत्पत्ती । साधक शिणती नेणों किती । माझ्या भजनसुखाची प्राप्ती । नव्हे निश्चिती कोणासी ।।२१०।। जिहीं माझ्या भजन परवडी । केली भक्तीची कुळवाडी । ते माझ्या निजसुखाची गोडी । पावले रोकडी आत्यंतिक ।।२१५।। ज्या निजसुखाच्या ठायीं । शिळेपणाची भाषा नाहीं । विटो नेणें कल्पांतीही । इंद्रियांचा कांही न पडे पांगू ।।२१६**

एवढा विचार व विस्तार करण्याचे कारण अन्य साधने जशी क्लेश प्रद आहेत तशी भक्ती नाही.

आता भक्ती हे साधन स्वत आनंदरूप असल्यामुळे इतर साधनाप्रमाणे तिच्यामध्ये कष्टाचा अनुभव नाही. म्हणूनही ती सुलभ आहे. तैत्तिरीय उपनिषदामध्ये जी आनदाची विस्तृत मीमासा केली आहे. त्यात सर्व आनदाची प्राप्ती श्रोत्रिय अकामहत अशा ब्रह्मज्ञानी पुरुषास होते असे म्हटले आहे. पण प्रेमभक्तीचा आनंद त्या मोक्षावस्थाप्राप्त आनंदापेक्षाही मोठा आहे. म्हणून तर ' घोटविन लाळ ब्रह्मज्ञान्या हाती । मुक्ता आत्मस्थिती साडवीन ।। ' अशी प्रतिज्ञा तुकाराममहाराज करतात

श्रीभागवत ग्रथात अनेक भक्त श्रेष्ठांनी आपली हीच भावना स्पष्टतया प्रगट केली आहे भक्त श्रेष्ठ प्रल्हाद, ध्रुव, पृथु, वृत्र, किबहुना वेदस्तुतीमध्ये प्रत्यक्ष वेदानीही हीच भावना स्पष्ट रूपाने प्रगट केली आहे. वेद म्हणतात,

**दुखगमात्मतत्त्व निगमाय तवात्ततनोश्चरित महामृताब्धि परिवर्तपरिश्रमणा. । न परिलषन्ति केचिदपवर्गमपीश्वरते चरणसरोजहंसकुलसंग विसृष्टगृहाः ।।२१।।**

' श्रुती म्हणते हे ईश्वरा ! दुर्बोध आत्मतत्त्व दाखविण्याकरिता अवतार धारण करणाऱ्या तुमच्या चरित्ररूप समुद्रामध्ये स्नान करून श्रमरहित झालेले

तसेच आपल्या चरणारविंदाचे ठिकाणी हंसाप्रमाणे रममाण होणाऱ्या भक्तजनांच्या संगाने ज्यांनी गृहादिकावरील आसक्तीचा त्याग केला आहे असे भक्त जन अपवर्ग[1] म्हणजे मोक्षाचीही इच्छा करीत नाहीत.'

श्री ज्ञानेश्वर महाराजही, 'जया भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्यातें परते सर म्हणती ।।' (९–१९२.) 'चहूं पुरुषार्थाशिरी । भक्ती जैसी ।।' (१८–८६७.) असे भक्तीचे आनंदरूपत्व सागतात तुकाराममहाराजही स्वानुभवाने भक्तीची परमानंदरूपता सागतात, 'सर्व सुख त्यालों सर्व अलंकार । आनंदे निर्भर डुल्लतसो ।।,' 'आनदे निर्भर असो भलते ठायी । सुखदुःखा नाही चाड आम्हा ।।' निळोबा राय म्हणतात, ' आजि आनंदासी आनद माझ्या झाला । आजि सुखासी सुखलाभ केला । आजि हर्षासी हर्ष भेटो आला । तेणे श्रीरंग निजदृष्टी स्थिरावला वो ।।'

तात्पर्य भक्ती ही स्वरूपाने शांतिरूप व परमानंदरूप आहे हा नारदाचा सिद्धान्त सर्व संताच्या स्वानुभवानेही सिद्ध होतो. भगवान तर परमानंदस्वरूप आहेच पण भक्तही त्याच्या अनन्य प्रेमाने परमानदरूप होतात. म्हणून या दोघात आनंद व्यापून टाकणारी भक्तीही परमानंदस्वरूपच आहे.

येथे शांती व आनंद दोन शब्द वापरले आहेत. गीता अध्याय चार मध्ये शांती हे सुखाचे साधन सागितले आहे 'अशातस्य कुतः सुखम् ।'. कोणास वाटेल भक्ती ही शातिरूप आहे म्हणजे आनदाचे साधन आहे की काय ? तर ती आनंदाचे साधन नसून परमानदरूपच आहे. सूत्रात ' च ' अव्यय आहे ते निश्चय-वाचक आहे.

## सूत्र ६१

## लोकहानौ चिंता न कार्या निवेदितात्मलोकवेदत्वात् ।। ६१ ।।

**अर्थ :**

( भक्ताने ) लोकहानीची चिंता करू नये, कारण ( भक्ताने ) आपल्या स्वत स व लौकिक वैदिक (सर्व प्रकारच्या) कर्मांना भगवत्समर्पण केलेले असते.

१. प, फ, ब, भ, म, या व्यंजनांना प वर्ग म्हणतात. यांचे प्रतीक प– पाप पुण्य, फ– फल (कर्मफल), ब– बन्धन, भ– भेद, म– मोह, हे प वर्ग ज्यांत नसतात असा मोक्ष आहे, म्हणून त्यास अपवर्ग म्हणतात.

**विवरण** ·

अशा शांतिरूप परमानंदस्वरूप भक्तीचा अनुभव घेत असता त्या आनंदात सतत निमग्न असल्याने त्या भक्ताचे व्यवहार सुरळीत, व्यवस्थित होत नाहीत. व्यवहार व्यवस्थित होण्यास देहतादात्म्य, ममत्व, लोकलज्जा, लोकांनी आपल्याला चांगले म्हणावे ही इच्छा लागते लोकेषणेची अपेक्षा असते. याकरिता सामान्य मनुष्य लोकव्यवहार दक्षतेने सांभाळीत असतो. सोयरेधायरे, इष्टमित्र यांचा आदर, त्यांचा योग्य पाहुणचार करीत असतो. शेजाऱ्यापाजाऱ्याशी योग्य अगत्य-पूर्वक वागणूक ठेवीत असतो आर्थिक हानी सोसूनही लौकिक सांभाळीत असतो संसाराचे हेही एक महत्त्वाचे अंग आहे. लोकहानी होणार नाही याची त्या सामान्य माणसास सतत चिंता असते पण भगवत्प्रेमी भक्ताकरिता नारदमर्हषि सांगतात भक्ताचे व्यवहार असे सुरळीत होणे कठिण आहे. तुकाराम महाराज म्हणतात, 'माझिया देहाची मज नाही चाड। कोठे करूं कोड आणिकाचे ।।' त्याच्या देहाची त्यालाच स्मृती नसते. 'काय खातो आम्ही कासया सांगती। कैसे हे लागती नेणो मुखी ।।' अशी त्याची अवस्था होते. 'विषय तो त्याचा झाला नारायण। नावडे जनधन मातापिता ।।' या स्थितीत तो गेलेला असतो. अशा वेळी लौकिक जरी नीट सांभाळला गेला नाही, लोकव्यवहार व्यवस्थित झाले नाहीत, आप्तस्वकीय संबंधात बाधा निर्माण झाली, लोक निंदा करू लागले, इष्टमित्र दुरावले तरी भक्ताने या लोकहानीची चिंता करू नये. कारण भगवद्भक्ताकरिता लोकहानी ठेवलेलीच आहे. भक्त प्रल्हादाचा जन्मदात्या पित्याकडून छळ झाला. बिभीषणाचा ज्येष्ठ बंधूकडून छळ झाला. अंबऋषीला दुर्वासासारख्या ऋषीकडून छळ सोसावा लागला. चालू युगातील संतांचे अनुभव याहून वेगळे नाहीत. श्रीज्ञानेश्वर महा-राजांना समाजाने बहिष्कृत केले होते. नामदेवराय म्हणतात,

गण आणि गोत्रज अवघे हासतात मज ।
गेले याचे माणुसपण येणें सांडियली लाज ।
विनवितो शिंपी नामा संतचरणीचे रज ।।

तुकाराम महाराजांचे तर दिवाळे निघाले होते. दुष्काळाने द्रव्य गेले, लोकांनी देणे बुडवले, मान गेला, एक बायको अन्न अन्न करून मेली, असे त्यानीच म्हटले आहे. एकदा तर लोकानी त्यांना गावाबाहेर घालवण्याचा प्रयत्न केला होता. मंबाजीने काट्यांनी मारले. त्याच्या अभंगाच्या वह्या इंद्रायणीत बुडविल्या गेल्या. किती तरी लोकहानीचे प्रकार सोसावे लागले. नामदेवचरित्रात असा प्रसंग आहे की त्यांच्या कीर्तनात काही दुष्टानी एक गायच मारून आणून टाकली होती. एकनाथमहा-राजांचाही लोकानी कमी छळ केला नाही, त्यांच्या चरित्रात त्याविषयी अनेक कथा आहेत. भक्त हा लोकविरोधी सहसा वागत नाही, सर्वांतर्यामी श्रीहरी आहे म्हणून तो 'अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एवच' असाच वागत असतो. पण जग

त्याची निंदा, छळ, उपहास करीतच असते हा एक लौकिक जगाचा सहज स्वभावच आहे तो नाहीसा करण्याचा प्रयत्न केला तरी त्याचा उपयोग होत नाही. म्हणून खऱ्या प्रेमी भक्ताने त्याची चिंताच करू नये असे नारद सांगतात; व खरा भक्त करीतही नाही. कारण भक्ताने आपणास स्वत व आपल्या लौकिक व वैदिक सर्व व्यवहारास भगवंतास अर्पण केलेले असते श्री ज्ञानेश्वर महाराज गौळणीच्या रूपकाने सांगतात,

**किती शिकवाल मज वेळोवेळा । मी तया गोवळा रातलिये ।।**
**नगमेहा संसारू म्हणुनि केला भ्रतारू । लोक अनाचारुषु म्हणती मज ।।**
**चंचळ झालिये म्हणती मज । कवणा सांगू जिवीचे गुज ।।**

श्री तुकाराम महाराजाचे विरहिणीचे अभग प्रसिद्ध आहेत. ते म्हणतात,

**विसरलें कुळ आपुला आचार । पती भावे दीर घर सोय ।। १ ।। सांडिला लौकिक लाज भय चिंता । रातले अनंता चित्त माझे ।। २ ।। मज आता कोणी आळवाल झणीं । तुका म्हणे कानीं बहिरी झाले ।। ३ ।।**

सर्व संताचे असे उद्‌गार आहेत.

आरंभी आठव्या सूत्रामध्ये लोकवेद व्यापाराचा न्यासरूपी निरोध हे भक्तीचे स्वरूप आहे असे म्हटलेच आहे. सामान्य अध्यात्ममार्गप्रविष्ट साधकाची अशी भावना असते की लोकाना आपले वर्तन प्रतिकूल वाटू नये याकरता तो लोक व्यवहार साभाळून वागण्याचा प्रयत्न करीत असतो. पण भिन्न भिन्न स्वभावाचे लोक असल्याने ते याच्याशी अनुकूल वर्तन करतीलच असे नाही. विशेषत. प्रतिकूलतेनेच वागतात पण भक्ताने त्याच्याकडे लक्ष देऊ नये.

भक्तिशास्त्रावरील एका ग्रंथात एका श्रीकृष्णप्रेमी गोपीचे उद्‌गार आहेत.

**माधवो यदि विहन्तु हन्यताम् । बान्धवो यदि जहातु हीयताम् ।**
**साधवो यदि हसन्ति हस्यताम् । माधव. स्वयमुरीकृतो मया ।।**

'सखे ! तो माधव मला मारील तर खुशाल मारू दे. जर बन्धुबान्धव माझा त्याग करतील तर करू देत. साधूजन मला हसतील तर हसू देत. मी केवळ त्या शामसुंदराचाच स्वीकार केला आहे.'

ज्याने आत्मनिवेदन केले नाही, आत्मसमर्पण झाले नाही असा सामान्य देहाभिमानी पुरुष लोकेषणा, वित्तेषणादिकानी व्यापलेला असतो म्हणून त्या ईषणा (इच्छा) पूर्ण न झाल्यास किंवा त्यांच्या पूर्णतेमध्ये काही प्रतिबंध आल्यास तो सतत चिंता करीत असतो. तसेच ससारामध्ये चिंता कधीच संपत नाही. इष्ट विषय प्राप्त नाही झाला तरी चिंता, प्राप्त झाला तर रक्षणाची, वृद्धीची चिंता. तो नष्ट झाला तरी चिंता प्राप्त झालेल्या विषयापेक्षा अप्राप्त अशा अधिकाची चिंता,

भोगाची चिंता, भोगशक्ती कमी झाली तरी चिंता, भोक्ता राहील का याची चिंता, काही प्रतिबंधक निर्माण झाले तर ते दूर करण्याची चिंता, असे चितेचे विविध भेद आहेत. 'तैसी चिंता अपार । वाढविती निरंतर । जीवी सूनि असार । विषयादिक ॥ ज्ञा. १६–३३३॥' अशीही चिंता जीवास सुख भोगू देत नाही. एका सुभाषितकाराने म्हटले आहे, चिता व चिंता यात तारतम्य पाहिले तर चितेपेक्षा चिंता वाईट आहे, कारण चिताही केवळ निर्जिव देहास जाळते पण चिंता सजीवास जाळीत असते !

या चिंता निर्मूलनाचे साधन या सूत्रात नारदानी सागितले आहे 'निवेदितात्म-लोक-वेदत्वात्.' भक्ताने आपले स्वत.चे तसेच सर्व लौकिक कर्माचे, वैदिक कर्माचे भगवत्स्वरूपी समर्पण केलेले असते. त्यामुळे त्यास लोकहानीची चिंता करण्याचे कारण नाही. स्वतःच्या ठिकाणी कोणतीही क्रिया किवा वृत्ती आरोपित केली की तिच्या सिद्धीअसिद्धीविषयी चिंता वाटणे स्वाभाविक आहे पण मीदेखील त्याचाच आहे, माझा सर्व लौकिक व्यवहारही त्याचाच आहे, तोच प्रेरक, नियामक, कर्ता आहे, तोच सर्व आहे, असे मानल्यावर चिंता करण्याचे ओझे आपल्या डोक्यावर घेण्याचे कारण उरत नाही.

'लोकहानी' या सूत्रातील पदाचा दुसराही एक अर्थ संभवतो. भक्ताच्या देहा-कडून लौकिक कर्मे यथाप्रकार न होणे. लौकिक देहनिर्वाहास कारण कर्मे व्यवस्थित न झाली तर वैदिक कर्मे, जी वर्ण, आश्रम, इत्यादिकाना अनुलक्षून होणे अवश्य असते, ती ही यथाविधी होणार नाहीत. पण भक्ताने त्याची ही चिंता करू नये. कारण त्याने आपल्या आत्म्याचे, लौकिक वैदिक कर्माचे, सर्वप्रकारे भगवंतास समर्पण केलेले असते. मागे सूत्र एकोणिसाव्यात 'तदर्पिताखिलाचारता' हे भक्तीचे लक्षण नारदानी स्वत.चे म्हणून सांगितलेच आहे. अशा प्रकारे भक्ताने आत्म-समर्पण केलेले असल्यामुळे त्याच्याकडून वैदिक कर्मे न झाली तरी त्याचा प्रत्यवाय दोष त्यास लागत नाही भगवान श्रीकृष्ण उद्धवास सांगतात,

**करितां माझी कथा श्रवण । प्रेमें वोसंडे अंतःकरण । विसरे देह गेहाचीं आठवण । तेथे प्रत्यवाय जाण बाधीना ॥१०२॥ हो का पूर्ण विरक्त नर । कां माझे सेवेसीं जो तत्पर । तेथ कर्म बापुडे किंकर । हे स्वये श्रीधर बोलिला ॥१०८॥**

ए. भा. २०

शिवाय भगवंताच्या अखंड चिंतनात असलेला जो भक्त त्याला चिंता करण्यास अवकाश तरी कोठे असतो ! 'शोक मोह चिंता । यांची नेणती ते वार्ता ॥' तु.॥ 'हरी तैसे हरिचे दास । नाही तया भय मोह चिंता आस । होऊ-न रहाती उदास । बळकट कास भक्तीची ॥तु.॥' येथे चिंता हे अनेक विकारांचे उपलक्षण मानावे. चिंता, भय, मान, मोह, लोभादिक कोणत्याही विकारांचे आहारी

भक्ताने जाऊ नये व तो जात नाही. कारण चिंता करणारे मन हे भगवंतास समर्पण केले गेलेले असते

## सूत्र ६२

## न तदसिद्धौ लोकव्यवहारो हेयः किन्तु फलत्यागस्तत्साधनं च कार्यमेव ॥६२॥

**अर्थ** :

(परंतु) जोपावतो भक्ती सिद्ध झाली नाही तोपावेतो लोकव्यवहाराचा त्याग न केला पाहिजे, पण कर्मफलत्यागपूर्वक त्या भक्तीचे साधन करीत राहिले पाहिजे.

**विवरण** :

भक्तिसाधना करणाऱ्या साधकाच्या ठिकाणी ती प्रेमलक्षणा भक्ती सिद्ध झाल्यानंतर त्या भक्ताच्या ठिकाणी देहतादात्म्य, कर्तृत्वबुद्धी न राहिल्यामुळे, त्याने सर्वस्व भगवंताला समर्पण केले असल्यामुळे, त्याची लौकिक, वैदिक, कर्मे आपली आपण सुटतात, जाणूनबुजून त्या कर्मांचा त्यास त्याग करावा लागत नाही. प्रेमाच्या उच्च अवस्थेत तो प्रेमी भक्त विधिनिषेधाच्या पलीकडे सहज गेलेला असतो. मागे अठ्ठेचाळिसाव्या व एकोणपन्नासाव्या सूत्रात ' तो भक्त कर्मफलाचाच काय पण सर्व कर्मांचा त्याग करतो, निर्द्वंद्व होतो, वेदाचाही त्याग करतो कारण केवळ अविच्छिन्न अशा भगवदनुरागाचा लाभ त्याला झालेला असतो;' असे नारदानी म्हटलेच आहे. तसेच सातव्या आठव्या सूत्रांत भक्ती ही कामनात्मक नाही, ती निरोधरूपा आहे व निरोध म्हणजे लौकिक वैदिक समस्त कर्मांचा त्याग होय असे स्पष्ट म्हटले आहे. अतएव विशेष अवस्था प्राप्त होईपावेतो लोकव्यवहार होतच राहणार, मात्र अनासक्त बुद्धीने तो करीत राहावा. हाच श्रीमद्भगवत्गीतेचा उपदेश आहे. गीतेमध्ये अध्यायाअध्यायातून ही गोष्ट श्रीकृष्णांनी सागितली आहे. विशेष अवस्था प्राप्त न झाली तर स्वभाव विहित नियतकर्म टाकता येणार नाही. कोणास वाटेल असे जर कर्म करीत राहिलो तर त्या कर्मबंधनात अडकावे लागेल. याचे उत्तर नारद या सूत्रात देतात.

ते म्हणतात, त्यासाठी भक्ताने कर्मफल त्याग करावा. कारण कर्म हे फलासक्तीनेच बंधनास कारण होते. म्हणून फलत्याग करून त्या भक्तीचे साधन करीत

राहिले पाहिजे. भक्तीसाधनाचा विचार मागे सूत्र चौतीस ते बेचाळिसाव्या पावेतो विस्तृत केला आहे 'तस्या: साधनानि गायन्त्याचार्या:' म्हणून विषय त्याग, संगत्याग, अव्यावृत भजन, भगवद्गुण श्रवण कीर्तन, सत्पुरुषांची कृपा वा भगवत्कृपा संपादनाचा प्रयत्न करणे इत्यादि साधने सांगितली आहेत. ही साधने साधकाने सतत करीत राहिले पाहिजे. साधनात अश्रद्धा, आळस इत्यादि करणे योग्य नाही

**आणिक काही नेणेधंदा । नित्यध्यातसे गोविंदा ।।**
**आम्हा नामाचे चिंतन । रामकृष्ण नारायण ।**
**तुका म्हणे क्षण । खाता जेविता न विसंबो ।। तु० ।।**

सर्वच भक्ताची अशी अवस्था असते

सूत्रातील 'एव' हे पद साधनाचरणाची आवश्यकता प्रतिपादन करणारे आहे भक्तिमार्गात साधनाचा विशेषक्रम नाही. ध्यान, भजन, कीर्तन, स्मरण, दास्य, यापैकी, कोणतेही साधन पूर्णत्वाला प्राप्त झाले की अन्य सर्वच साधने सहजगत्या सिद्ध होतात.

**अवघ्या दशा येणे साधतीं । मुख्य उपासना सगुणभक्ती । प्रगट हृदयीची मूर्ती । भावशुद्धी जाणोनिया ।। तु० ।।**

पुढे सत्त्याहत्तरव्या सूत्रांत 'क्षणार्धमपि व्यर्थन नेयं' असे श्रीनारदऋषीच सांगणार आहेत.

## सूत्र ६३

## स्त्रीधननास्तिकचरित्रं न श्रवणीयम् ।।६३।।

**अर्थ :**

(साधक भक्ताने) स्त्री, धन, तसेच नास्तिक (पाषंडी) व्यक्तीचे चरित्र श्रवण करू नये.

**विवरण :**

साधक भक्ताकरिता काही विधायक सूचना देणे श्रीनारदमुनीना आवश्यक वाटले. सर्व आध्यात्मिक, भागवतादि पुराणातून, संतग्रंथातून अशा सूचना दिल्या गेल्या आहेत. भक्ति मार्गात प्रवेश होणे कठिण, प्रवेश झाल्यावरही काही प्रतिकूल अशा विषयाकडे पूर्व संस्कारामुळे लक्ष वेधले जाणे अशक्य नाही. तसेच त्या विषयात एक प्रकारची आकर्षकता, मोह निर्माण करण्याचे सामर्थ्य असते. अनेक

साधकभक्ताची यामुळे फसवणूक झाल्याचे पुराणेतिहासावरून कळते. म्हणून नारद या सूत्रात तीन गोष्टीशी संबध ठेवू नये असेच म्हणत नाहीत तर त्यांचे श्रवणही बाधक होते म्हणून त्याचे श्रवणही करू नये असे सागत आहेत. मागील सूत्रात साधक भक्ताने लोक व्यवहार— भक्तीसिद्ध होईपावेतो— टाकू नये असे सांगितले. या दृष्टीने लोकव्यवहारात राहिला तरी त्यातही वरील सूत्रातील तीन गोष्टीबद्दल साधकाने फार जपले पाहिजे असे ते सागतात.

स्त्री, धन व नास्तिक चरित्र श्रवण करू नये असे ते म्हणतात याचे कारण त्या त्या विषयाचे श्रवण केले की तो विषय श्रोत्रेंद्रियाच्या द्वारे आत अंत.करणात प्रवेश करतो व मग अंत करणात त्या विषयभोगाचे पूर्व संस्कार सुप्त असलेले या श्रवणाने उद्‌बुद्ध होतात म्हणजे जागृत होतात. येथे सूत्रात 'चरित्र' शब्द आला आहे. स्त्री चरित्र म्हणजे रूप, लावण्य, तारुण्य, काती, सौदर्य इत्यादिकाचे श्रवण. तसेच धन-चरित्र म्हणजे धनापासून सर्व विषय प्राप्त होतात, सर्व भोग सपादन केले जातात, सत्ता प्राप्त होते, मान, यश, कीर्तीचा लाभ होतो, अशा प्रकारे धनाचे गुणगान हेच त्याचे चरित्र. तसेच नास्तिक चरित्र म्हणजे नास्तिक माणूस वेद, धर्म, ईश्वर, ज्ञान, भक्ती, मोक्ष इत्यादिका विषयी त्याचे विरुद्ध मत मोठ्या युक्तीने दृष्टान्ताने करतो त्यामुळे श्रद्धावानाचादेखिल बुद्धिभेद होणे शक्य असते. त्याचे हे जे कौशल्य हेच त्याचे चरित्र. याच्या चरित्र श्रवणाने त्याचे विषयी अनुकूल बुद्धी निर्माण होते, त्याचा परिणाम त्यांची संगती निर्माण होते व ती सर्व अनर्थास कारण होते. म्हणजे हे श्रवण भक्ती मार्गापासून माणसाला दूर नेते

भागवत एकादश स्कधामध्ये यदु अवधूत संवादात अवधूत सदृष्टात सागतात,

**योषिद्धिरण्याभरणाम्बरादिषु द्रव्येषु मायारचितेषु मूढ ।**
**प्रलोभितात्माह्युपभोगबुद्धया पतङ्‌वन्नश्यति नष्टदृष्टि: ।। अ० ८-८**

'मायेने निर्माण केलेल्या स्त्री, सुवर्णालंकार, सुदर वस्त्रे इत्यादि पदार्थाचे ठिकाणी उपभोग लालसा वाढल्यामुळे लोभाने जो वेडा झाला आहे तो विवेक शून्य होऊन पतंगा प्रमाणे नाश पावतो.' म्हणून साधकानें यांना भुलू नये. या श्लोका-वरील टीकेत एकनाथ महाराज सांगतात.

पाहे पा काता आणि सोने । वस्त्रे आभरणें रत्ने । मायेनें रचिली पडणें। पतनाकारणे जनाच्या ।। ७८ ।। वनिता देखोनि गोमटी । विवेकाची होय नष्टदृष्टी। प्रलोभें उपभोगा देती मिठी । ते दु.ख कोटी भोगिती ।। ८८ ।। देखोनि दीपरूपी झगमगी। उपभोगबुद्धि पतंगी। उडी घालिता वेगी । जळोनि आगी नासती ।। ८९ ।। एवं योषितारूपे माया । उपभोगबुद्धी भुलवी प्राणिया। जे विमुख हरीच्या पाया। त्यासीच माया भुलवितु ।। ९० ।। ए० भा० अ० ८

तसेच अवधूतांनी जे चोवीस गुरु केले त्यात 'मदगज' एक गुरु केला आहे,

त्याचे कारण सांगताना अवधूत सांगतात.

**पदापि युवतीं भिक्षुर्न स्पृशेद्दारवीमपि ।**
**स्पृशन्करीव बद्ध्येत करिण्या अंगसंगतः ॥ १३ ॥ ए० भा० ८**

'भिक्षू (साधका) ने स्त्रीला मग ती लाकडाची कोरलेली बाहुली असली तरी पायानेसुद्धा स्पर्श करू नये. स्पर्श केला असता ज्याप्रमाणे कृत्रिम हत्तिणीशी सग करून हत्ती वेडा होतो आणि खड्ड्यात पडतो, त्या प्रमाणे साधकाची स्थिती होण्याचा संभव असतो '

वास्तविक पुरुष व स्त्रीदेहात विशेष अतर नाही दोन्ही पाचभौतिकच आहेत. केवल स्त्रीदेहाचा निषेध करण्याचे तत्त्वतः कारण नाही स्त्रियांतही पतिव्रता साध्वी पुष्कळ होऊन गेल्या आहेत व वर्तमानकालातही असतील. अनेक ब्रह्मवादिनी स्त्रिया होऊन गेल्या. उपनिषदातून त्यांचे वर्णन आढळते. मिराबाई, मुक्ताबाई, जनाबाई, बहिणाबाई, इत्यादि संत कोटीतील, भक्त कोटीतील, स्त्रिया झाल्या आहेत. गृहस्थाश्रम स्त्री विरहित होऊ शकत नाही. तरी स्त्री ही केवळ भोग्य आहे व त्या भोगातच सुख आहे अशी भावना सामान्य कामासक्त पुरुषाची असते. त्यात ती सौदर्यवती असेल तर सहजच पुरुष तिजकडे आकृष्ट होतो. अशा पुरुषाचे लक्षण ज्ञानदेवानी सोळाव्या अध्यायात सांगितले आहे ' स्त्रिया गाइले आईकावें। स्त्रीरूप डोळा देखावे । सर्वेंद्रिये आलिगावें । स्त्रियेतेंचि ॥ ३३४ ॥ कुरवंडी कीजे अमृतें । ऐसें सुख स्त्रियेपरौतें । नाहीचि म्हणौनि चित्तें । निश्चयो केला ॥ ३३५ ॥' ज्ञा० १६.

सूत्रात स्त्री, धन, नास्तिक यांचे चरित्र श्रवण करू नये असे आहे. येथे श्रवण हे केवल श्रवणापुरतेच सांगितले नसून ते स्पर्श, भाषण, कीर्तन, संबंध या सर्वांचेच उपलक्षण मानले पाहिजे. वरील सर्वच गोष्टी साधकाच्या चित्तक्षोभाला व ध्येयापासून विचलित करण्यास कारणीभूत होतात. भगवानश्रीकृष्ण सांगतात,

याल्रागी साधकी आपण । स्त्री निरीक्षण संभाषण । सर्वथा न करावें जाण । एकांतशील न केव्हाही व्हावें ॥२५३॥ म्हणशी विवेकी जो आहे । त्यासी स्त्री संग करील काये । स्त्री संगास्तव पाहे । सोशिले अपाये सूज्ञानी ॥२५४॥ पराशरासी अर्धघडी । नावेसी मिनली नावाडी । ते अर्धघटिकेसाठी रोकडी । अंगी परवडी वाजली ॥२५५॥ विषय इंद्रियांचे संगती । अवश्य क्षोभे चित्तवृत्ती । तेथ सज्ञानही बाधिजती । मा कोण गती अज्ञाना ॥२५७॥' ए. भा. २६

या विषयात श्री एकनाथ महाराजांच्या चिरंजीवपद या प्रकरणातील उपदेश साधकभक्ताने मनन करण्यासारखा आहे.

नावडे स्त्रियात बैसणे । नावडे स्त्रियाते पाहणे । नावडे स्त्रियांचे रगडणे । त्यांचे बोलणे नावडे ॥ ३० ॥ नको नको स्त्रियांचा सांगात । नको नको स्त्रियांचा एकात । नको नको स्त्रियाचा परमार्थ । करिती आघात पुरुषासी ॥३१॥ म्हणाल

गृहस्थ साधकें । स्त्री साडोन जावे कें । येच अर्थी उत्तर निकें । ऐक आता सागेन ॥३२॥ तरी स्वस्त्रिये वाचोनी । नातळावी अन्य कामिनी । कोणे स्त्रियेसी संनिध-वाणी । आश्रयो झणी न द्यावा ॥३३॥ स्वस्त्रीसही कार्यापुरते । बोलावे स्पर्शावे निरुते । परी आसक्त होऊनिया तेथे । सर्वथा चित्ते नसावे ॥३४॥ नरनारी शुश्रूषा करिती । भक्तीममता उपजविती । परी शुद्ध जो परमार्थी । तो स्त्रियाचे सगती न बैसे ॥३५॥ ऐसी स्थिती नाही ज्यासी । तंव कृष्णप्राप्ती कैंची त्यासी । या–लागी कृष्ण भक्तासी । ऐसी स्थिती असावी ॥३६॥ या स्थिती वेगळा जाण । कृष्णी मिळू पाहे तो अज्ञान । तो सकळ मूर्खांचे अधिष्ठान । लटिके तरी आण देवाची ॥ ३७ ॥ चिरंजीवपद, ए. म.

एवढा विस्तारपूर्वक विचार करण्याचे कारण साधक भक्ताकरिता हे फार धोक्याचे स्थान आहे, असे सर्वच सतानी व पुराणातून ऋषिमुनीनी सागितले आहे. स्वतः नारदानाही या विषयाचा थोडा धक्का जाणवला होता असे कोठे कोठे पुराणादि कथातून आढळते साधक भक्ताने या विषयात फार जपून रहावे असेच या विधानातून सूचित केले आहे. तसेच एखादी साधक स्त्री असेल तर तिनेही पर-पुरुषापासून सावध असावे हेही यातून सूचित होते.

तसेच धनाबद्दल नारद निषेध व्यक्त करतात. ईषणात्रयामध्ये दारेषणा जशी तशीच वित्तेषणाही सांगितली आहे. ससारात मनुष्यास जीवन निर्वाहा-करिता तसेच सुखोपभोगाकरिता जे जे भोग्य पदार्थ अवश्यक असतात त्याची बहुतेकाची उपलब्धि द्रव्याच्याद्वारे होते म्हणून द्रव्याची अवश्यकता होते. पण यातूनच पुढे सचयबुद्धी, लोभ निर्माण होतो, व तसा लोभ निर्माण झाल्याने लोभ-मूलानि पापानि ' या वचनाप्रमाणे ते धन मिळविण्याकरिता कोणतेही निषिद्ध, अनैतिक, अयोग्य कृत्य करण्यास मनुष्य तयार होतो अर्थ म्हणजे धन कसे अनर्थाला कारण आहे याचा विस्तृत विचार श्रीकृष्णानी उद्धवास उपदेश प्रसगी सागितला आहे

**अर्थस्य साधने सिद्धे उत्कर्षे रक्षणे व्यये ।**
**नाशोपभोग आयासस्त्रासश्चिंता भ्रमो नृणाम् ॥१७॥**
**स्तेयं हिंसानृतं दम्भः काम. क्रोध. स्मयो मदः ।**
**भेदो वैरमविश्वासः संस्पर्धा व्यसनानि च ॥१८॥** ए भा अ २३

' धन सपादनाचे साधन जरी हाताशी असले तरी ते सपादन करून त्याची वाढ करताना, रक्षण करताना, खर्च करताना, तसेच त्याचा नाश झाला असताना व उपभोग घेतानाही मानवास क्लेश त्रास चिंता व भ्रम होतो. तसेच या धनाच्या मागे पंधरा अनर्थ प्राप्त होतात ते येणे प्रमाणे आहेत. चौर्य, हिसा, अनृत, दंभ, काम, क्रोध; हे द्रव्य प्राप्ती करिता होतात नंतर गर्व, मद, भेदवृत्ती, वैर,

अविश्वास, मत्सर आणि मद्यद्यूतइत्यादि व्यसने प्राप्त होतात ' या श्लोकावरील श्री एकनाथ महाराज याची विस्तृत व भावगर्भ टीका मुळात अवश्य वाचवी.

वास्तविक धनाची निर्मिती धर्माकरिता व धर्म ज्ञानविज्ञानप्राप्तीकरिता आणि ज्ञानविज्ञान हे स्वरूपशातिप्राप्ती करिता आहे असे भागवतामध्ये यदु अवधूत सवादात सागितले आहे

ज्या धनाचेनि पांगे । हा धर्मचि आलासे निजागे । जेवी पायाळाचेनि योगे । महानिधी वेगे आतुडे हाती ॥२४४॥ चंद्रास्तव वाढती कळा । जीवनास्तव जिव्हाळा । तेवी धनास्तव सोज्ज्वळा । धर्माचा सोहळा धार्मिका घरी ॥ २४५॥ धर्म तेथ शुद्ध ज्ञान । ज्ञान तेथ विज्ञान । विज्ञान तेथ समाधान । शाति संपूर्ण नादे तेथ ॥२४७॥ एवढे फळ ज्या धनापासी । ते मूर्ख वचिती विषयाशी । देह लोभे भुलली पिसी । अगीच्या मृत्यूसी विसरले ॥ २४७ ॥ ए. भा. अ. ५

साधन भक्ताची विषयाचे ठिकाणी दोष दृष्टी असावी लागते, अदृष्ट वशात काही विषय अनायासे प्राप्त झाले तरी त्याच्या भोग साधनमार्गापासून च्युति होण्याचा सभव असतो. त्यात विशेषत हे दोन विषय महत्त्वाचे आहेत असे श्रीकृष्ण उद्धवास सागतात. ' विषयाचे दोष दर्शन । मुख्यत्वे बाधक स्त्री आणि धन । आवरावी रसना सिस्न । हे आठवण अहर्निशी ॥८१॥' ए. भा. २० सामान्य ससारी माणसाना अर्थ काम हे दोनच पुरुषार्थ भासतात व या दोन पुरुपार्थाचे धन व स्त्री हे साधन वाटतात म्हणून हे लोक अखड त्याचीच चर्चा करीत असतात ती सतत कानावर पडल्याने किवा त्या विपयाच्या दर्शनाने, स्पर्शाने त्याची आसक्ती निर्माण होते म्हणून साधक भक्ताने त्याचे चरित्र म्हणजे त्याच्या विषयीची अनुकूल चर्चा श्रवणही करू नये असे नारद म्हणतात.

आता या सूत्रात शेवटी आणखी एका घातक गोष्टीचा उल्लेख आला आहे त्याचा विचार करू नारद म्हणतात नास्तिक चरित्रही श्रवण करू नये. समाजामध्ये देवधर्माविषयी श्रद्धा असणारे बरेच लोक असतात व आपल्या श्रद्धेला अनुसरून आपला उपासना मार्ग आक्रमित असतात पण काही अश्रद्धावान ही असतात. भगवद्गीतेमध्ये ' अज्ञश्चाश्रद्धानश्च सशयात्मा विनश्यति ॥' गीता ४ असा त्या पुरुपाचा उल्लेख श्रीकृष्णानी केला आहे अनादिकाला पासून हा वर्ग समाजामध्ये नादत आला आहे असे अश्रद्धावान लोक हे केवळ स्वत:पुरतीच भावनाशून्यता बाळगून स्वस्थ बसत नाहीत, तर अनेक सश्रद्ध भाविकाचा बुद्धिभेद करण्याचे त्याचे कार्य चालू असते. यात दर्शनकाराचाही समावेश आहे. चार्वाकदर्शन हे प्रमुख नास्तिकदर्शन आहे अशा नास्तिकाचे लक्षण श्रीकृष्णानी उद्धवास सागितले आहे

मोहममतेचे आधिक्य । तेणे निर्दळिले निज आस्तिक्य । वेदी शास्त्री दृढ

नास्तिक्य । देवचि मुख्य नाही म्हणती ।। ५०४ ।। नास्तिक्य वादाचिया वंडा । या ज्ञानाचा ढोरकोंडा । लागोनेदी त्याचिया तोंडा । ज्याचा भावा कोरडा नास्तिक्ये केला ।। ५०५ नास्तिक्यवादापुढे । ज्ञान कायसे बापुडे । अनीश्वरवादाचे बंड गाढे । ते त्यागावे रोकडे नास्तिक्यवादी ।। ५०६ ए भा. २९

यासच 'पाषंड' असे म्हणतात 'वेद बाह्य लंड बोले तो पाषाड । त्याचे काळे तोंड संतामध्ये ।।' असे तुकाराममहाराज सांगतात.

पाषंड शब्दाचे दोन तीन अर्थ होतात

**पालनाश्चैव सर्वेषां पाशब्देन त्रयीमता ।**

**तां खण्डयतिमोहाद्य. स पाखण्डः प्रकीर्तितः ।।**

सर्वांचे धर्मज्ञान देऊन पालन करणारे म्हणून 'पा' शब्दाचा वेदत्रयी असा अर्थ आहे, त्या वेदाचे जो अविवेकाने खंडण करतो त्यास पाखंड म्हणतात

**पा शब्द· पापनिकरे खंडं चिन्ह मिहोच्यते ।**

**पापस्य चिन्ह पाखंडस्तत्सेवी नारकी ध्रुवं ।।**

'पा' म्हणजे पापसमूह, खड म्हणजे चिन्ह. पापाचे चिन्ह–लक्षण– म्हणजे पाखड. 'पा' पापनिकर सनोति ददाति स्वसेविभ्य ' इति पाषंडः ? –स्वसंबधीयाना पाप समूहात प्रविष्ट करणारा म्हणून पाषड म्हटले जाते या पाषंडासच नास्तिकता म्हणतात. वेद, ईश्वर, धर्म, त्याग, सेवा, श्रद्धा, ज्ञान, भक्तिही मानवी जीवनाच्या अत्यतिक कल्याणाची मूलभूत अगे आहेत, त्याचा हे नास्तिक लोक पूर्ण अनादर करतात, धर्म अधर्म पापपुण्य, नीति अनीतीचा विचार न करता भोगैश्चर्य प्रसक्त म्हणजे भोगवादी बनून स्वैर विषय मेवन करीत रहाणे हाच पुरुषार्थ मानतात याच्या मताचा अनुवाद श्रीज्ञानेश्वर महाराजानी सोळाव्या अध्यायातील आसुरी प्रकृतीच्या विवेचन प्रसगी केला आहे त्या ओव्याचा भावार्थ खाली देत आहो

'विश्व हे अनादि ठिकाण आहे याचे नियमन करणारा राजा ईश्वर आहे व न्याय अन्याय याचा निवाडा वेद, चावडीवर करतात वेदाच्या दृष्टीने जो अन्यायी ठरतो त्यास नरक भोगाची शिक्षा होते व जो न्यायी ठरतो तो सुखाने स्वर्गात रहातो. अर्जुना, अशी ही जी जगाची व्यवस्था पुरातन कालापासून चालत आलेली आहे तिला ते आसुर (नास्तिक) सर्वच थोताड आहे म्हणतात. त्याचे मत म्हणजे यज्ञाचे ज्याना वेड आहे ते यज्ञानी फसले, देवांचे ज्याना वेड आहे ते प्रतिमा (मूर्ति)नी फसले भगवे वस्त्र धारण करणारे सन्यासी व योगी, हे समाधि भ्रमाने फसले. या जगात आपल्या सामर्थ्याने जे जे प्राप्त करून घेता येईल ते ते भोगावे, याशिवाय निराळे पुण्य कोठें आहे ? अथवा शरीराच्या अशक्तपणामुळे मिळविता येत नाहीत यामुळे जे विषयसुखावाचून पिडले जाणे तेच पाप होय श्रीमंताचे प्राण घेणे हे जर खरोखर पाप आहे तर त्याचे सर्वस्व हाती येते हे

ग्वाश्रीने पुण्याचे फळ नाही काय ? बलवान् हा अशक्तला खातो हे जर बाधक असेल तर माशाचे निःसंतान का होत नाही ? आणि दोन्ही कुळाचा शोध करून, मुलगा व मुलगी याचे शुभ ग्रहानी युक्त अशा वेळी लग्न केले जावे हाच जर प्रजेच्या उत्पत्ती विषयी हेतु असेल, तर पशु पक्ष्यादि ज्या जाति आहेत, ज्याच्या संनतीची गणती नाही, त्याचे कोणत्या विधिविधानानी लग्न केले ? चोरीचे द्रव्य कोणाजवळ आले तर ते कोणास विष झाले आहे काय ? विषयावरील प्रेमाने जर कोणी व्यभिचार केला तर त्यास कोड होते की काय ? म्हणून देव मालक आहे, तो धर्माधर्म भोगावयास लावतो, जो जे येथे करतो ते परलोकाच्या गावी भोगतो असे म्हणावे तर तो परलोक अथवा भोगविणारा देव हे दोन्ही प्रत्यक्ष दिसत नाहीत म्हणून ते व्यर्थ आहेत आणि धर्माधर्म करणारा देह तर येथे मरून जातो, मग भोगावयाला ठिकाण कोण ? या भोगाच्या कामी इद्र जितका ऊर्वशीच्या योगाने स्वर्गात सुखी आहे तितकाच नरकात लोळत असणारा किडा देखील स्वत ला सुखी समजतो. म्हणून नरकस्वर्ग ही पापपुण्याने मिळणारी ठिकाणे नाहीत कारण की, दोन्ही ठिकाणी कामाचा सुखभोग सारखाच आहे काम हाच सर्वांचे मूळ आहे असे हे असुर बोलतात आणि ईश्वराच्या तिरस्काराने हे नुसतीच बडबड करतात इतकेच नव्हे, त्या संबंधीचा त्याचे मनात (ईश्वर नाही हा) एक दृढ निश्चय झालेला असतो फार काय सागावे ! अंगामध्ये उघडपणे धर्मलडपणा भरून, या नास्तिकाच्या अत.करणाचे वेशीत नास्तिकपणाचे हाड रोविलेले असते.' (ज्ञानेश्वरी अ १६–८, ९.) वरील अनुवादा वरून नास्तिकाच्या मताचे स्वरूप लक्षात येईल.

अध्यात्म विषयाचा विचार करणारी जी नानामते म्हणजे दर्शने आहेत त्यात चार्वाकदर्शन प्रथम सागितले आहे. त्याचेही विचार असेच आहेत तो स्वभाववाद मानतो. म्हणजे अग्नि उष्ण, जल शीत, सम स्पर्श असा वायु, हे कोणी निर्माण केले आहेत ? तर अनादि कालापासून स्वभावताच त्याची स्थिती आहे. स्वर्ग नाही, मोक्ष नाही, पारलौकिक आत्मा नाही, म्हणून वर्णाश्रमादिकाच्या क्रिया फलदायक मानता येत नाहीत. यज्ञादिकामध्ये मारलेला पशु जर स्वर्गात जातो तर यजमानाने आपल्या पित्याचा यज्ञात बळी द्यावा म्हणजे तो सहजच स्वर्गात जाईल. मृत माणसाना येथे दिलेले श्रद्धान्न जर ते जेथे असतील तेथे पोहोचते तर प्रवासास जाणाऱ्या माणसाबरोबर मार्गात उपयोगी पडावे म्हणून पाथेय (फराळाचे) देण्याचे काय कारण ? येथे घरी त्याचे श्राद्ध करावे म्हणजे प्रवासात त्याला मिळेल हे जसे हास्यास्पद होईल तसेच यज्ञयाग श्राद्धादि कर्मे करणे हास्यास्पद अतएव व्यर्थ आहेत जीव असे पावेतो यथाशक्य सुखाने जगावे, ऋण करून घृतादि स्निग्ध पदार्थांचे सेवन करावे देह गेला त्याचे भस्म झाले म्हणजे पुन्हा कोण येतो ? इत्यादी चार्वाकदर्शनातील नास्तिकता प्रगट करणारे विचार आहेत. ते परम पुरुषार्थाची हानी करणारे आहेत. चार्वाक् शब्दाचा अर्थ 'चारु म्हणजे सुदर

आहे वाक् वाणी भाषा ज्याची ' म्हणजे त्याचे अति उथळ व विषयांच्या सेवनाकड प्रवृत्त करणारे विचार बहिर्मुख पामराना पटतात पण ते परिणामी घातक आहेत श्रुतियुक्ती व विवेकी पुरुषाच्या अनुभवापुढे ते टिकणारे नाहीत. त्यांच्या आचरणाने जीवन सर्व पुरुषार्थहीन होते. ' हरीवीण जन्म नर्कचि पै जाणा । यमाचा पाहुणा प्राणी होय ॥ ' असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. मानवी जीवनात श्रद्धा, भावना, भक्ति याना फार श्रेष्ठ असे स्थान आहे. याच्याद्वारा मानव हा पुरुषार्थ संपादन करू शकतो. केवळ स्वैर विषयसेवनातच जर जीवनाची कृतार्थता असती तर ऋषिमुनीना, संत साधूना ते करणे अशक्य नव्हते. पूर्वीच्या राजे महारांजानीही आपल्या सार्वभौम राज्याचा त्याग करून आत्मचिंतनाकरता, भगवद्भक्तीकरीता अरण्यवासाचा मार्ग पत्करला नसता. भगवत्प्राप्तीतच मानवी जीवनाची सार्थकता आहे हा श्रुतिस्मृति, ऋषिमुनी, साधुसताच्या स्वानुभवावरून निश्चित असा सिद्धात आहे. मानवी जीवनाचा धर्म, नीती, भावभक्ती, सर्वात्मबोध, मुक्ती हा स्थायीभाव आहे व तदर्थ प्रयत्न करीत रहाणे हेच मानवाचे खरे कर्तव्य आहे. अशा पुरुषार्थोपयोगी जीवनापासून च्युत करणारे, ते जीवन दु.खमय, अंधकारमय करणारे असे नास्तिकाचे विचार असतात त्या विचारामुळे बुद्धिभेद होण्याचाही सभव असतो म्हणून साधक भक्ताने ते ऐकू नयेत असे नारदमहर्षि म्हणतात, भगवान श्रीकृष्ण अर्जुनास हेच सागतात

**येत्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मेमतम् ।**
**सर्वज्ञानविमूढान्स्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥** गीता ३–३२

' विहिताचरणपूर्वक सर्व कर्मे मला समर्पण करावीत असे केले असता तो कर्मबधातून मुक्त होतो हे यापूर्वी सागितलेल्या श्लोकातील माझे मत जे मत्सरी लोक अनुसरत नाहीत ते सर्व प्रकारच्या ज्ञानाविषयी मूढ, अविवेकी व नष्ट आहेत असे समज. ' या श्लोकावरील श्री. ज्ञा. म. चे व्याख्यान पाहा.

ना तरी प्रकृतिमंतु होऊनि । इद्रिया लळा देऊनि । जे हे माझे मत अव्हेरुनी । ओसंडिती ॥१९४॥ जे सामान्यत्वे लेखती । अवज्ञा करूनि देखती । काही अर्थवादु म्हणती वाचाळपणे ॥ ९५ ॥ ते मोह मदिरा भ्रमले । विषयविखे घारले । अज्ञान-पंकी बुडाले । निभ्रांत मानी ॥ ९६ ॥ देखे शवाच्या हाती दिधले । जैसे का रत्न वाया गेले । ना तरी जात्यंधा पाहले । प्रमाण नोहे ॥९७॥ का चंद्राचा उदयो जैसा। उपयोगा न वचे वायसा । मूर्खा विवेक तैसा । रुचेल ना ॥९८॥ तैसे ते पार्था । जे विमुख या परमार्था । तयासी सभाषण सर्वथा । करावे ना ॥१९९॥ ज्ञा. ३.

वास्तविक नास्तिक मत सर्वथा त्याज्य असल्यामुळे त्याचा एवढा विस्तृत विचार करण्याचे कारण नाही पण ते विचार मोहक असल्यामुळे सामान्य

भाविकाना त्यातील दोष दिसणे व पटणे आवश्य आहे, याकरिता एवढे विवेचन करावे लागले.

नारदभक्तिसूत्राच्या काही प्रतीमध्ये या सूत्राचा ' स्त्रीधननास्तिकवैरिचरित्रं न श्रवणीयम् ' असा पाठ आहे. त्या दृष्टीने पाहिल्यास वैरिचरित्रश्रवणही भक्ताला बाधक आहे, कारण ते चित्तक्षोभाला कारण आहे. मागे सूत्र त्रेचाळिसाव्यांत दुःसंगत्याग सागून काम, क्रोध, मोह, स्मृतिभ्रंश, बुद्धिनाश या द्वारा तो सर्व नाशास कारण आहे असे चव्वेचाळिसाव्यात म्हटले आहे. या सूत्रात स्त्री, धन, नास्तिक, वैरी यांचे चरित्र श्रवण करू नये असे म्हटले आहे, त्याचे कारण स्त्री चरित्र हे कामवृद्धीस कारण होते, धनचरित्र लोभ वृद्धीस व नास्तिक तसेच वैरी चरित्र द्वेषमत्सरादिक निर्माण करण्यास कारण आहे व हे तीनही दोष नरकाचे द्वारभूत आहेत. म्हणून त्या तिघांचा त्याग करावा असे श्रीकृष्णानी गीतेच्या सोळाव्या अध्यायातील एकविसाव्या श्लोकात सागितले आहे. याही दृष्टीने याचे श्रवण घातक असल्याने ते करू नये असे नारदांचे सांगण असावे

नास्तिकतेविषयी वर बराच विचार केला गेला आहे. ' न अस्ति '– ईश्वर नाही म्हणणारा तो नास्तिक असे लक्षण केले जाते. पण पूर्णपणे नास्तिक होणे कठिण आहे. जो संपूर्ण सृष्टी आणि त्याच्या अधिष्ठानाला जाणून मी सर्वच पाहिले आहे, पण ईश्वर नाही असे म्हणेल तर त्याची भाषा खरी म्हणता आली असती. पण अशी सर्वज्ञता त्याला प्राप्त होणे शक्य नाही. कारण अधिष्ठान नाही तर अध्यस्त नाही. कारण नाही तर कार्य नाही. शास्त्र व सताच्या अनुभवदृष्टीने पाहिल्यास ईश्वर नाही तर जग नाही समुद्र नाही तर तरंग कोठून येतील ? पूर्ण शोध केल्याखेरिज नाही म्हणण्याचा कोणास अधिकार नाही. म्हणून नास्तिकता म्हणजे सशयग्रस्तता, भ्रातता, संपूर्ण ज्ञानाचा अभाव. कारण मनुष्याची बुद्धी पूर्ण व निर्दोष असते असे नाही. बुद्धीकौशल्याने युक्तिवादाने ते विचार जरी मांडले गेले तरी प्रमाणाने विचार केल्यास ते टिकत नाहीत. बुद्धी विकल्पग्रस्त झाली की ती अशांत असते. अशा विकल्पी संशय, ग्रस्तव्यक्तीचे चरित्र श्रवण केले तर आपलीही बुद्धी विकल्प व संशयादिकाने भारली जाते. विवेकी मनुष्य आपल्या प्रत्येक व्यवहारात विवेक करीत असतो म्हणजे योग्य अयोग्य ठरवित असतो, ग्राह्याग्राह्य पाहतो. तसेच श्रवणाच्या बाबतीतही योग्यायोग्य काय हे पाहून श्रवण करावे. ईश्वर, गुरू, संत याची निंदा ऐकू नये असे पुराणात स्पष्ट म्हटले आहे. नास्तिकाच्या चरित्रात आवर्जून या गोष्टी असतात.

तुकाराम महाराज या विषयात आपले गाऱ्हाणे देवापुढे सागत आहेत.

**पाखंड्यानी पाठी पुरविला बुमाला । तेथे मी विठ्ठला काय बोलो ॥१॥**

**कांद्याचा खाणार चोजवी कस्तुरी । आपण भिकारी अर्थ नेणो ॥२॥**

**न कळे ते मला पुसती छळोनि । लागता चरणी न सोडिती ।। ३ ।।**
**तुका म्हणे खीळ पडो त्यांच्या तोंडा । किती बोलों भांडा वादकासी ।। ४ ।।**

असा बुद्धिभेद करण्याचा प्रयत्न त्या नास्तिकाकडून होत असतो. म्हणूनच त्यांचे चरित्र श्रवण करू नये असे श्रीनारदमहर्षि सागत आहेत.

## सूत्र ६४

## अभिमानदम्भादिकं त्याज्यं ।।६४।।

**अर्थ** .

(साधकभक्ताने) अभिमान, दभ, आदि (दोषाचा) त्याग केला पाहिजे.

**विवरण :**

मागील सूत्रात साधक भक्तास विघातक अशा बाह्य स्त्री, धन, नास्तिक, वैरी याच्या चरित्राच्या श्रवणाचा निषेध सागितला. पण काही भक्तिमार्गास विघातक अशा गोष्टी आपल्या आ तही असतात त्याही बऱ्याच आहेत तसेच त्या अतिनिकट, स्वरूपातर्गत असल्यामुळे त्याची प्रथम कल्पनाही येणे अशक्य असते. पण त्या बाहेरच्या प्रतिकूल गोष्टीपेक्षाही भक्तिमार्गास अधिक बाधक असतात. त्याचा थोडा निर्देश या सूत्रात नारदमहर्षि करतात. त्या अभिमान दंभ आदि होत. जीव ज्या देहाचा स्वीकार करून या पृथ्वीवर जन्म घेतो त्या देहाचा तर अभिमान स्वभावतःच असतो.

तैसी पांचाही गाठी पडे । जैं देहाकारू उघडे । तैं नाचवी चहूंकडे । तो अहंकारुगा ।।८१।। नवल अहंकाराची गोठी । विशेषे नलगे अज्ञानापाठी । सज्ञानाचे झोंबें कठी । नाना संकटी नाचवी ।।८२।। ज्ञा. १३

श्री ज्ञानेश्वरमहाराजानी अहंकाराचा उगम कसा होतो हे वरील ओव्यातून सागितले आहे. अहंकार अभिमान हे एकाच अर्थाचे शब्द आहेत. या अभिमानाचे साधारण व असाधारण असे भेद पडतात देहाभिमान, क्रियाभिमान हा साधारण म्हटला जातो, कारण तो यावज्जीवमात्राचे ठिकाणी असतो. तो तितका बाधक होत नाही असाधारण अभिमान म्हणजे वर्णाभिमान, आश्रमाभिमान, गुणाभिमान, विद्या, तप, श्रुत, तसेच धन, सत्ता, बल इत्यादिकाचा अभिमान बाधक असतो. तोच राजसी, तामसी प्रकृतीचा अंगीकार करू लागला की त्याजबरोबर दंभ, दर्प, क्रोध, पारुष्य, अज्ञान इत्यादि आसुरी प्रकृती निर्माण करतो व ती सर्व अनर्थास कशी कारण आहे

याचा विचार गीतेच्या सोळाव्या अध्यायात विस्तृत रीतीने केला आहे. भक्तिमार्गामध्ये देहेंद्रिय, मनबुद्धी, प्राणेंद्रियादिकाचा प्रेरक प्रवर्तक केवळ श्रीहरी आहे ही भावना असणे आवश्यक आहे, कारण ती वास्तव स्थिती आहे. उपनिषदातूनही ' श्रोत्रस्य श्रोत्रं मनसो मनो यद्वाचोह वाच तदु प्राणस्य प्राण: ।। ' असे म्हटले आहे. ' भ्रामयन्सर्व भूतानि यन्त्रारूढानि मायया । ' गीता. १८. आपल्या मायाशक्तीच्याद्वारे देहादिकाशी तादात्म्य ठेवलेल्या जीवाना विहित प्रतिषिद्ध क्रियांमध्ये भ्रमण तो ईश्वर करवितो असे गीतावचन आहे असे असताही अभिमान हा विकार हे कर्तृत्व आपल्यावर घेतो. गती, भर्ता, प्रभू, साक्षी, निवास, शरण्य, सुहृत् केवळ श्रीहरीच आहे असे गीतेच्या नवव्या अध्यायात भगवान श्रीकृष्णानी स्पष्ट म्हटले आहे. पण अभिमान हे तत्त्व मानावयास तयार नसतो. तो सर्व मीच आहे असे म्हणत असतो. श्री ज्ञानेश्वर महाराजानी त्या पुरुषाचे लक्षण सागितले आहे.

तरी देह हेचि आत्मा । ऐसेया जो मनोधर्मा । वळघोनिया कर्मा । आरंभ करी ।।७१३।। आणि उणे कां पुरे । जे जे काही आचरे । तयाचेनि आविष्कारे । कुथो लागे ।।७१४।। डोईये ठेविलेनि भोजे । देवलविसे जेवी फुंजे । तैसा विद्या वयसा माजे । उताणा चाले ।।७१५'। म्हणे मीचि एकु आथी । माझाचि घरी संपत्ती । माझी आचरती रीति । कोणा आहे ।।७१६।।' ज्ञा. १३. याप्रमाणे अभिमानाचे स्वरूप असते तो अभिमानी पुरुष आत्मकेंद्रित असतो स्वत· व्यतिरिक्त इतर कोणासही तो मानीत नाही आसुरी प्रकृतीची जी सहा लक्षणे गीतेच्या सोळाव्या अध्यायात सागितली आहेत. त्यात ' अभिमान ' हे तिसरे लक्षण आहे. या लक्षणावरील श्रीज्ञानदेवाचे विस्तृत व्याख्यान मननीय आहे अभिमानी पुरुष वेद, ईश्वर इत्यादिकाविषयी कसा द्वेषी असतो या विषयी ते म्हणतात.

आणि जगा वेदी विश्वासु । विश्वासी पूज्य ईशु । जगी एक तेजसु । सूर्यचि हा ।।२३०।। म्हणौनि जरी उत्साहे । याते वानू जाये । की ते आईकोनि मत्सरु वाहे । फुगो लागे ।।२३१।। म्हणे ईश्वराते खाये । तया वेदा विषु सुये । गौरवामाजी त्राये । भगीत असे ।।२३२।। पतंगा नावडे ज्योती । खद्योता भानूची खंती । का टिटिभीने अपांपती । वैरी केला ।।२३३।। तैसा अभिमानाचेनि मोहे । ईश्वराचे नामही न साहे । वेदाते म्हणे मजहे । सवती झाली ।।२३४।। ज्ञा १६.

अहकार आला की बल, दर्प, काम, क्रोध, परिग्रहादि त्याची प्रभावळ तेथे गोळा होतेच. या सर्वांचा आश्रय करणारे मत्सरी, द्वेषी आपल्या व इतराच्या देहामध्ये असणाऱ्या माझा (श्रीहरीचा) द्वेष करतात असे गीतेच्या सोळाव्या अध्यायातील अठराव्या श्लोकात श्रीकृष्णांनी सागितले आहे. अहंकारापासूनच मनबुद्धिचित्तादिकांची निर्मिती होते, व अभिमानाबरोबरच त्यांचाही व्यवहार होतो. म्हणजे अभिमान ज्याला विषय करील त्यालाच मन, बुद्धी, चित्त हे विषय

करतात. हा अभिमान भगवद्विमुख असतो. याच अभिमानाला जर विद्वत्तेची जोड मिळाली तर तो अभिमान वृद्धिगत होऊन अतिशय बाधक होतो. तो भगवद्भक्तीचा अत्यंत विरोधक असतो. श्रीकृष्ण उद्धवास सांगतात,

**आम्ही ज्ञातें हें मानूनि दृढ । ज्ञानाभिमानें केले मूढ ।**
**पांडित्यें होऊनि गर्वारूढ । दुःखदुर्वाड भोगिती ।।९१।।**
**अभिमाना ऐसा वैरी । आन नाही संसारी ।**
**तोहा ज्ञानाभिमाने करी । घाली दुस्तरी सज्ञाना ।।९२।।**

**ए. भा. २९**

**तुका म्हणे नरकी घालीं अभिमान । जरी होय ज्ञानगर्व ताठा ।।१।।**

अभिमानाने श्रीपरमात्मा कसा दूर राहातो या विषयाचे विस्तृत व्याख्यान ज्ञानदेवांनी नवव्या अध्यायातील पंचविसाव्या श्लोकावर केले आहे. ते महत्त्वाचे आहे. त्या ओव्याचा भावार्थ खाली देत आहो. श्रीकृष्ण म्हणतात,

'अर्जुना, जो जाणिवेचा अहंकार बाळगतो त्यास काही कळत नाही. माझ्यापुढे जो आपला संपन्नपणा मिरवतो तोच त्याचा कमीपणा आहे. मी कृतार्थ झालो असे जो समजतो तो काहीच झाला नाही. अथवा अर्जुना, यज्ञदान किंवा तप याच्या योगाने मी सहज भगवत्प्राप्ती करून घेईन असा जर कोणाचा गर्व असेल तर त्या साधनाना माझ्याजवळ गवताच्या काडीइतकीदेखील किंमत नाही. अर्जुना, विचार कर, ज्ञानसंपन्नतेच्या बाबतीत वेदापेक्षा कोणी श्रेष्ठ आहे काय ? किंवा शेषापेक्षा अधिक तोंडानी बोलणारा कोणी आहे काय ? तो शेषदेखील माझ्या अंथरुणाखाली लपून बसतो. दुसरा जो वेद तो परमात्मा ' असा नाही ' म्हणत परत फिरतो. सनकादिकासारखेदेखील माझ्याकरिता वेडेपिसे झाले. तपस्व्यांची निवड करू गेले तर असा कोण तपस्वी आहे की जो महादेवाच्या पंक्तीला बसविता येईल ? तो शिव देखील अभिमान टाकून माझे चरणोदक मस्तकावर धारण करीत आहे. अथवा ऐश्वर्याने लक्ष्मीच्या बरोबरीचे जगात कोण आहे ? पण त्या लक्ष्मीचीही माझ्या येथे किंमत नाही. ती लक्ष्मी जेव्हा आपल्या ठिकाणी असलेल्या ऐश्वर्य अभिमानाचा त्यागकरून सर्वस्वी माझी सेवा करू लागली त्या वेळी ती माझे पाय धुवावयाच्या भाग्याला पात्र झाली. एवढ्याकरिता आपल्या ठिकाणचा मोठेपणा दूर टाकून द्यावा. शास्त्राध्ययन केल्याचा (विद्वत्तेचा) फुंज असेल तर तो टाकून, जसे काही आपण काही शिकलोच नाही अशी नम्रतेची वृत्ति ठेवावी. अशा प्रकारचा लहानपणा घेऊन जगात राहावे म्हणजे माझे सान्निध्य प्राप्त होते. अरे अर्जुना, हजारो किरण असलेल्या सूर्याच्या प्रकाशात चंद्रसुद्धा लोप पावतो त्या सूर्यापुढे काजव्यांनी आपल्या अल्पप्रकाशाचा डौल कशाला मिरवावा ? लक्ष्मीचा मोठेपणा जेथे चालत नाही, शंभूचे तपही जेथे पुरे पडत नाही त्या माझ्या ठिकाणी

या सामान्य अजागळांचा प्रवेश कसा होईल ? म्हणून परमात्मस्वरूपावरून आपल्या शरीराची कुरवंडी करावी, आपल्या अगी असलेल्या सर्व गुणांचे निबलोण करावे, तसेच संपत्तीचा मद टाकून द्यावा.'

आता या अभिमानाचा त्याग कसा होऊ शकेल ? याच्या त्यागा करिता जे जे साधन करावे त्या त्या साधनाचा एक अभिमान वाढतो ! 'तप करोनि तीर्थाटण वाढविला अभिमान ।। वाटिले जे धन केली अहंता जतन ।।तु.।। भगवान श्रीकृष्ण उद्धवास सांगतात,

अभिमान साडिता न सडे । हेचि दुर्घट थोर माडे ।
या लागी साधनाचे साकडे । सोसणे पडे साधका ।। ४३९ ।।
जे जे करावे साधन । साधनी रिघे साधन भिमान ।
धावणे नागवी सपूर्ण । साधनी विघ्न होय तैसे ।।४४०।।

मग तो जाण्यासाठी काय करावे ते पुढे सांगतात,

तत्काळ जावया देहाभिमान । अखंड माझे नामस्मरण ।
गीत नृत्य हरिकीर्तन । सर्वभूती समान मद्भावो ।। ४४१ ।। ए.भा१३

किंवा

देहाचे माथा । ठेविली होती अहंता ।
ते देह मिथ्यात्व पावता । समूळ अहंता पळाली ।।२६५।। अ. ७

जरी अहंकार हा भक्तीला प्रतिबंध करतो असे आरंभी म्हटले आहे, तरी विवेकाने तो हळूहळू दूर होतो व भक्तिभाव वृद्धिगत होतो.

अभिमानाप्रमाणे दंभाचाही त्याग करावा असे या सूत्रात नारद सागतात दंभ हे आसुरी प्रकृतीचे प्रथम लक्षण गीतेच्या सोळाव्या अध्यायात (श्लो. ४), सांगितले आहे. त्या दंभ या पदावर ज्ञानेश्वर महाराजानी अनेक दृष्टान्त देऊन व्याख्यान केले आहे. आपण केलेले जे धर्माचरण आहे त्याचा फार गाजावाजा, प्रसिद्धी करणे यास दंभ म्हणतात ते कसे बाधक आहे याविषयी ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. 'आपली माता ही तीर्थाप्रमाणे पावन करणारी आहे. परंतु लोकात ती उघडी केली असता ती अधोगतीला नेण्याला कारण होते अथवा गुरूने उपदेशिलेली ब्रह्मविद्या ही इष्ट फल देणारी खरी परंतु ती चव्हाटचावर प्रसिद्ध केली असता अकल्याणास कारणीभूत होते. आपण स्वतः महापुरात बुडत असताना जी नाव आपल्याला त्वरीत काढून पलीकडच्या काठाला पोहोचविते, ती नावच आपण डोक्यावरून बांधली असता आपणाला बुडविते. अर्जुना, जगण्याला कारण जे अन्न, ते खात असताना वर्णन करून पचनशक्तीपेक्षा अधिक खाल्ले असता अजीर्णामुळे ते अन्नच विषासारखे मारक होते. त्या प्रमाणे इहपरलोकी साह्य करणारा यथा-कथंचित आचरिला गेलेला जो धर्म तो प्रसिद्ध केला असता पातकाला कारण होतो.

म्हणजे तो धर्मच अधर्म होतो. तोच ‘ दंभ ’ होय. ’ ज्ञा. १६ ओ. २१६–२२३.

गीतेच्या तेराव्या अध्यायात ज्ञानचिन्हे सांगितली आहेत त्यात ‘ अदम्भित्व ’ हे दुसरेच लक्षण आहे. तेथेच पुढे अज्ञान लक्षणात दंभित्व सांगत असता ज्ञानदेव म्हणतात, घाली विद्येचा पसारा । सुये सुकृताचा डागोरा । करी तेतुले मोहरा । स्फीतीचिया ।। ६५९ ।। अग वरिवरी चर्ची । जनातें अभ्यर्चिता वंची । तो जाण पा अज्ञानाची । खाणी येथ ।। ६६० ।।’ ज्ञानेश्वरीच्या तिसऱ्या अध्यायात कामक्रोधादिकांचे विस्तृत व्याख्यान आहे. या कामक्रोधानीच हा दंभ या जगात रूढ केला असे ते म्हणतात व त्याचे स्वरूपही सागतात. ‘ जेणें सत्याचा भोंकसा काढिला । मग असत्य तृणकुटा भरिला । तो दभ रूढविला । जगीं इहीं ।।२५।।’ ‘ एखाद्या मृतपशूच्या शरीरातील मांस काढून त्यात पेंढा भरून तो खरा जिवंत पशू आहे असे दाखविण्याचा प्रयत्न करावा त्या प्रमाणे स्वतःच्या आचरणातील सत्य काढून त्यात असत्याचे तृण भरून पूर्ण सत्याचरणाचा आभास निर्माण करण्याचा प्रयत्न करणे यासच दंभ म्हणतात. ’ श्रीकृष्ण भगवंतानी भागवत एकादश स्कंधात जो बोध केला त्यांतील तेविसाव्या अध्यायात दंभाचा विस्तृत विचार आला आहे. त्यात दंभाचे काही प्रकारही सांगितले आहे. त्यांत भजन दंभ हा एक प्रकार आहे.

पोटीं नाही परमार्थ । धरोनि अर्थस्वार्थ ।
स्वयें म्हणवितीं हरिभक्त । या नांव निश्चित भजनदंभू ।।२३०।।

असाच प्रकार नारदानी वसुदेवाला जो नवयोगेश्वर व जनकसंवाद सांगितला त्यातही आला आहे.

सद्भावो नाही अभ्यतरी । बाह्य भक्ति भावेंचि करी । ते भावानुसारें संसारी । नानापरी स्वयें ठकती ।। ४९७ ।। ठकले ते मनुष्यगती । ठकले ते निजस्वार्थी । ठकले ते ब्रह्मप्राप्ती । दंभे हरिभक्ती कदानुपजे ।।४९८।। अ. २

आणखी काही दंभ प्रकाराचे वर्णन एकनाथ महाराज करतात,

धन जोडावया कारणे । टिळे माळा मुद्राधारणे । धनेच्छा उपदेश देणे । या नांव जाणणे दीक्षादंभू ।। २३१ ।। जया पासोनि होय अर्थ प्राप्ती । ते समर्थ शिष्य आवडती । दीन शिष्याते उपेक्षिती । हे दांभिक स्थिती गुरुत्वा ।। २३२ ।। गुरूपदेशे शिकोनियुक्ती । स्वये ज्ञानाभिमाना येती । गुरुते मानी प्राकृत स्थिती । तोही निश्चिती दाभिकू ।। २३७ ।। अहब्रह्म हेही स्फूर्ती । न साहे जेथ स्वरूपस्थिती । तेथ मी ज्ञाता हे धोंगडी युक्ती । स्फुरे निश्चिती सूक्ष्म दंभें ।।२३९।। नवल दंभाचे कवतिक आम्ही अग्निहोत्री याज्ञिक । तेचि जीविका करोनि देख । नाडले वेद पाठक धनलोभें ।।२४१।। सोडोनि परमार्थाची पोथी । ब्रह्मज्ञान सांगे नानायुक्ती । ते ही ज्ञाते दंभे नाडिजेती । द्रव्यसक्ती धनलोभें ।। २४२ ।। दंभे नाडिले संन्यासी । लौकिक राखणे पडे त्यांसी ।ज्या लागी मुंडिले शिसी । त्याअर्थासी विसरले ।। २४३।। ए. भा. २३

असे दंभप्रकार अनेक आहेत. एका ठिकाणी ' निस्पृह दंभ ' नावाचा आणखी एक प्रकार सागितला आहे व तो सर्व दभा पेक्षा श्रेष्ठ म्हटला आहे.

**जपदम्भाः तपोदम्भाः ध्यानदंभास्तथैवच ।**
**सर्वे निस्पृहदंभस्य कलां नार्हन्ति षोडशीम् ।।**

: जपदंभ; तपोदंभ, ध्यानदंभादि अनेक दंभाचे प्रकार आहेत पण ते सर्व निस्पृहदंभाच्या सोळाव्या अशाचीही बरोबरी करू शकत नाहीत. ' अत करणात धन विषय इत्यादि स्पृहा असूनही त्या मुळीच नाहीत असे विरक्तीचे सोंग दाखविणे हे निस्पृह दंभाचे स्वरूप आहे. या दंभाने अनेक लोक भोळचा जनतेला भुलवीत असतात. असा हा दभ भगवद्भक्तीस अत्यंत विरोधी आहे. तो चित्त मलिन करणारा आहे 'हित व्हावे तरी दंभ दूरी ठेवा। चित्त शुद्धि सेवा देवाची हे ।।' असे तुकाराम-महाराज सांगतात,

सूत्रामध्ये ' अभिमानदम्भादिकं ' असे ' आदि ' पद आहे. हे सर्व भगवद्भक्तीस प्रतिकूल अशा विकाराचे द्योतकपद आहे. ' आदि 'पदाने काम,क्रोध,मद, मत्सर, द्वेष, लोभ, दर्प,बल, परिग्रह इत्यादि अनेक विकार निर्देशिले आहेत व ते सर्व भगवद्भक्तीस प्रतिकूल आहेत. भक्तश्रेष्ठ प्रल्हाद या विकारापासून साधक भक्ताची किती किती हानी होते हे सागतो.

**इंद्रियाणि मन. प्राण । आत्माधर्मो धृतिर्मति ।**
**न्ही. श्रीस्तेजः स्मृतिः सत्यं यस्य नश्यन्ति जन्मना ।। ८।। भा**. ७. १०

' कामाच्या उत्पत्तीमुळे इंद्रिये, मन, प्राण, देह, धर्म, धैर्य, सारासार विवेक, लज्जा, ऐश्वर्य, प्रताप, स्मृती आणि सत्य ही सर्व नाहीशी होतात. ' किंबहुना भगवान केवल भक्तीनेच संतुष्ट होतो. अन्य सासारिक महत्त्वाच्या गोष्टी त्याच्या प्राप्तीत अकिंचित्कर आहेत असे भक्त प्रल्हाद म्हणतो. ' मन्येधनाभिजन रूपतप श्रुतौजस्तेजः प्रभाव बल पौरुष बुद्धियोगाः ।। नाराधनायहि भवन्ति परस्य पुंसो भक्त्या तुतोष भगवान्गजयूथपाय ।।' ९.९ 'प्रल्हाद म्हणतो, मला वाटते अभिमानाची स्थाने जी धन, कुलीनता, रूप, तप, विद्या, ओज, तेज, प्रभाव, बल, पौरुष, बुद्धि व योग हे सर्व गुण परम पुरुष भगवंताला संतुष्ट करण्यास समर्थ नाहीत. पण केवल भक्तीने तो गजेंद्रावरही संतुष्ट झाला होता. '

सर्वस्वाचा त्याग केला पण अभिमान जर टाकला गेला नाही तर तो त्याग व्यर्थ आहे, किंबहुना त्यागाचाही अभिमान धारण करू नये. भगवच्छरणागति हे श्रेष्ठ व अंतिम साधन आहे. खरी शरणागती अभिमान त्यागाविना होऊच शकत नाही. अभिमान हृदयात बाळगून शरणागत होणे किती बाधक आहे हे श्रीकृष्णानीच भक्तवर्य उद्धवास पटवून सांगितले साहे,

सांडूनि कुळाचे उंचपण । सांडूनि जातीचा अभिमान । सांडूनि आश्रमाचे

श्रेष्ठपण । मजलागी शरण रिगावे ।। २३७ ।। सर्व त्यागाचे त्यागिलेपण । उद्धवा तुज मी सांगेन खूण । सर्व सांडावा अभिमान । हे मुख्य लक्षण त्यागाचे ।।२४०।। तिळभरी राखोनि अभिमान । जरी मज रिगसी शरण । तरी माझी प्राप्ती नव्हे जाण । अभिमान विघ्न प्राप्तीसी ।।२४६।। ए. भा. १२,

परमार्थात अभिमानत्यागाला किती महत्त्व आहे हे भगवान स्वत.च इतक्या अट्टाहासाने अभिमानत्यागाचे महत्त्व पटऊन देत आहेत त्यावरून पटण्यासारखे आहे. श्रीहरीस प्रिय असणाऱ्या भक्तांची जी लक्षणे सांगितली जातात त्यांत निरभिमानता हे एक श्रेष्ठ लक्षण सागितले आहे. नवयोगेश्वर जनक संवादात म्हटले आहे

**न यस्य जन्मकर्मभ्यां न वर्णाश्रमजातिभि. ।**
**सज्जतेऽस्मिन्नहंभावो देहे वै स हरेः प्रिय. ।।५१।। ए. भा. २**

' आपला जन्म, कर्म, वर्ण, आश्रम किंवा जाती यामुळे ज्याची देहाचे ठिकाणी अहंबुद्धी उत्पन्न होत नाही तोच भक्त हरीला प्रिय होतो. ' एकनाथ महाराज त्यावर म्हणतात, ' समूळ देहाभिमान झडे । तो देहीचि देवासी आवडे । ते भक्त जाण वाडेकोडे । लळेवाडे हरीचे ।।' २–७२२. या संदर्भात एका भक्ताचे उद्गार मननीय आहेत. तो म्हणतो,

**नाहं विप्रो न च नरपतिर्नापि वैश्यो न शूद्रो । नाहं वर्णी न च गृहपति र्नोवनस्थो यतिर्वा**
**किंतु प्रोद्यन्निखिल परमानंदपूर्णामृताब्धे र्गोपीभर्तुः पदकमलयो र्दासदासानुदास ।।**

पद्यावली

भक्त म्हणतो, ' मी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यापैकी कोणी नाही. तसेच ब्रह्मचारी गृहस्थ वानप्रस्थ संन्यासी या आश्रमाचा माझा संबंध नाही. तर निखिल परमानंदसागरस्वरूप गोपाल कृष्णाच्या चरणाच्या दासांच्या दासाचा दास आहे.' केवढी निरभिमानता ही आहे ? या अवस्थेत अभिमान दंभादिकाचा लेश तरी राहील काय ?

## सूत्र ६५

## तदर्पिताखिलाचारः सन् कामक्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम ॥६५॥

अर्थ

सर्व आचार (क्रिया) भगवंताला अर्पण केल्यानंतरदेखील जर कामक्रोध अभिमानादिक (कदाचित) अवशिष्ट राहतील तर त्यांचासुद्धा भगवत्स्वरूपीच विनियोग (साधकभक्ताने) करावा

**विवरण** :

मागील सूत्रात अभिमान दंभादिकांचा त्याग सांगितला. पण अनादिकालापासून अनत जन्मे झाली असूनही जे या शरीरात वास्तव्य करीत आहेत ते वरवर टाकले तरी सूक्ष्म रूपाने राहतात व अनुकूल वातावरण निर्माण झाले की पुन्हा प्रगट होतात असा अनुभव आहे. म्हणून अनेक जपी, तपी, ऋषी मुनीच्या अंत:करणामध्ये अकस्मात् कामक्रोधादिकाचा उद्रेक झालेला दिसून येतो. पुराणातून त्यांची पुष्कळ उदाहरणे आहेत. या आपत्तीवर या सूत्रात श्रीनारद उपाय सुचवीत आहेत. कामादिकांना विषय हवे असतात. ते विषयानुसारी आहेत. स्त्री,धन, इत्यादि कामादिकांचे विषय, शत्रू अथवा अन्य काही प्रतिकूल पुढे येणे हे क्रोधाचे विषय, देह, इंद्रिये, विद्वत्ता शौर्य, कौशल इत्यादि अभिमानाचे विषय आहेत. नारद म्हणतात, जर यांचा भक्ताच्या अंत.करणातून पूर्ण त्याग न झाला तर भक्ताने विषय बदलावेत तसेच कोणत्याही विकाराचे उत्थान अंत:करणात झाले तरी पुढे त्याचे क्रियेत, आचारात म्हणजे इंद्रियव्यापारात पर्यवसान होते. म्हणून प्रथम भक्ताने आपला अखिल आचार म्हणज ज्ञानेंद्रिये व कर्मेद्रिये यांच्या क्रिया त्या भगवंतालाच अर्पण कराव्यात. मागे एकोणिसाव्या सूत्रात श्रीनारदानी गर्ग, व्यास, इत्यादिकांची भक्तिलक्षणे सागितल्यानंतर आपले स्वत चेही भक्तिलक्षण सांगितले आहे. त्यात ‘ तदर्पिताखिलाचारता ’ सर्व क्रिया भगवदर्पण करणे ही नारदप्रोक्त भक्ती आहे त्या सूत्रावरील विवरणात त्याचा सविस्तर विचार केलाच आहे. येथेही नारदानी. प्रथम ‘ तदर्पिता खिलाचार ’ हे साधन सांगितले आहे. भगवद्भक्तीचे हे प्रधान अंग आहे. भागवत धर्माचे हे स्वरूपच आहे. या विषयात खालील महत्त्वाचा श्लोक प्रसिद्ध आहे.

> कायेन वाचामनसेन्द्रियैर्वा बुद्ध्यात्मनावाऽनुसृतः स्वभावात् ।
> करोति यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥
>
> भागवत ११-२-३६

' शरीराने, वाणीने, मनाने, इंद्रियानी, बुद्धीने, अंतःकरणाने किंवा आपल्या प्रारब्धानुसार जी जी कर्मे प्राणी करतो ती ती सर्व कर्मे नारायणालाच समर्पण करावीत. ' हाच तो भागवत धर्म होय.

याप्रमाणे इंद्रिये, मन, बुद्ध्यादिकाच्या धर्मांचे जर भगवदर्पण झाले तर कामक्रोधाभिमानादिक राहतील कोठे ? ' काया वाचा मने झाला विष्णुदास । कामक्रोध त्यास बाधती ना ॥' असे तुकाराम महाराज सांगतात. अशाही अवस्थेत कदाचित अनादि संस्कार वासनांमुळे जर कामक्रोधादिकांनी डोके वर काढले तर त्याकरिता या सूत्रात उपाय सुचविला आहे. तो हा की काम क्रोध व अभिमानादिक त्या भगवंताचे ठिकाणीच करावेत.

कोणी म्हणेल हे कसे शक्य आहे व योग्य आहे ? कारण कामादिक दुष्ट विकाराचा विषय परमात्मा कसा करावा ? व तो होईल कसा ?

कोणत्याही विकाराचे अधिष्ठान भगवानच आहे. त्याचेकडे ते गेले की ते विकार राहत नाहीत.

**न मय्यावेशितधियां कामः कामाय कल्पते ।**
**भर्जिताः क्वथिता धानाः प्रायो बिजाय नेष्यते ॥ भाग.**

भगवान् म्हणतात, माझ्या ठिकाणी ज्यांनी आपले मन बुद्धी समर्पण केली आहे व ज्यांनी कामही माझे ठिकाणीच ठेविला आहे त्याचा काम त्याना बाधक होत नाही भाजलेले धान्य जरी जमिनीत पेरले तरी ते उगवत नाही.' (भागवत–१०-२२-२६.) कामादिक विकार दुःखजनक आहेत, पापोत्पत्तीस कारण आहेत, इत्यादि मागे सांगितलेच आहे. पण ज्याप्रमाणे एकाद्या विषाचीही योग्य प्रमाणात, योग्य अनुपानाच्या द्वारे उपयोग केला तर ते औषध बनते व आरोग्यास कारण होते त्याप्रमाणे कामादिक विकारांनाही भगवंताकडेच लावले म्हणजे ते बाधक होण्याऐवजी साधकच होतात अशी उदाहरणे आहेत. ' भक्तिरसामृतसिंधु ' या ग्रंथात भक्तीचे वैधी व रागानुगा असे दोन प्रकार सांगितले आहेत. भक्ती करण्याचा शास्त्र वा पुराणातून विधी सांगितला आहे म्हणून शास्त्राज्ञा पालन करण्याकरिता जी भक्ती केली जाते तिला' वैधी ' (विधीने प्राप्त झालेली) म्हटले जाते.त्या वैधी भक्तीलाच मर्यादामार्ग असेही म्हणतात.

**शास्त्रोक्तया प्रबलया तत्तन्मर्यादयाऽन्विता ।**
**वैधी भक्तिरियं कैश्चिन्मर्यादामार्ग उच्यते ॥ २-५९**

रागानुगा भक्तीचे स्वरूप असे आहे,

**इष्टे स्वारसिकी रागः परमाविष्टता भवेत् ।**
**तन्मयी या भवेद्भक्तिः सात्र रागात्मिकोदिता ॥ २-६२॥**

' आपल्या इष्ट प्रिय व्यक्तीविषयी अंतःकरणात सहज जे परमप्रेम निर्माण

होते, तन्मयता प्राप्त होते त्या अवस्थेस रागात्मिका भक्ती म्हणतात.' त्या रागात्मिका भक्तीचे कामरूपा आणि संबंधरूपा असे दोन प्रकार कल्पिले आहेत. कामरूपा भक्तीच्या विषयात गोपिकाचे उदाहरण प्रथम घेतले जाते. ‘ गोप्यः कामात् ’ असे शुकाचार्यांनी म्हटले आहे, (मागे सूत्र २१ च्या विवरणात या विषयाचा विशेष विचार आला आहे.)

जे माझेनि कामें सकाम । माझेनि प्रेमे सप्रेम ।
जे माझिया भुली संभ्रम । नेणती लोक ।। ज्ञा ९-३६३

संसारात काम असला की त्याच्या पोटात अनेक विषय येतात पण भक्ति-प्रेमात तो आला की केवळ भगवद्विषयकच असतो. तो कामही प्रेममय बनून जातो व शेवटी भक्त निष्काम बनतो !

तसाच क्रोध ती एक अत्यंत घातक वृत्ती आहे. चव्वेचाळिसाव्या सूत्रामध्ये त्या क्रोधाचा विचार आला आहे. तो क्रोध टाकणे योग्य आहे, पण कठिणही आहे ! ससारात क्रोधाची कारणे अनेक असतात व विषयही अनेक असतात. नारद म्हणतात तोही देवावरच करावा. श्रीज्ञानेश्वरमहाराज, नामदेवराय, एकनाथमहाराज, तुकाराममहाराज, तुकयाबधु, जनाबाई इत्यादिक संत हे अटी-तटीने देवाबरोबर भाडले ! ज्ञानेश्वर महाराजांचा, ‘यम नियम पाप पुण्य आम्हासी । आपण भलतेचि करिसी । तुझिया थोरपणा बिहुनि असावे कवणे शंकावे रायासी । प्रत्यक्ष जगी बाटली नारी तिचे स्मरण लोकासी । पुराणें जगी डांगोरा पिटिताती हे पतिव्रतापण तियेसी ।।१।। आवडे ते करिसी देवा । कोण करी तुझा हेवा रे रे ।। ’ हा सर्व मोठा अभंग पाहावा. नामदेव महाराज ‘पतितपावन नाम ऐकुनि आलो मी द्वारा । पतितपावन नाहीस म्हणुनि जातो माघारा ।। ’ म्हणून देवावर रागावतात. एकनाथ महाराजही ‘ जय गोविदा परमानदा ऐक माझे बोल । निर्गुणरूपे असता तुझे कांहीच नव्हे मोल ।। ’ असे देवाला बजावतात. तुकाराम महाराज चिडून म्हणतात, ‘ काय तुझें वेंचें मज भेट देता । वचन बोलता एक दोन ।। काय तुझे रूप घेतो मी चोरोनि । त्या भेणे लपोनि राहिलासी ।। ’ तुकया बंधू कान्होबा याना श्रीतुकोबारायांचा वियोग असह्य झाला त्यावेळी ते देवाबरोबर इतके भांडले की प्रत्यक्ष शिव्याच मोजल्या. जनाबाईबद्दल बोलण्यासच नको ! ‘ अरे विठ्या अरे विठ्या । मूळ मायेच्या कारट्या ।। तुझी रांड रंडकी झाली । जन्म सावित्री चुडा ल्याली ।। तुझ गेलें मढें । तुला पाहुनि काळ रडे ।। उभी राहुनी अंगणीं । शिव्या देत दासी जनी ।। ’ असे किती तरी परखड उद्गार त्यांच्या अभंगातून आहेत. गौळणीही देवाला शिव्या देत असत पण देव त्या ऐकून हसत असे ! ‘ हासतसे शिव्या देता त्या गौळणी ।। ’ असे तुकोबांनी म्हटले आहे. याचा अर्थ क्रोधाचा विषयही देवच असावा व भक्त क्रोध ही देवावरच करतात हाच

आहे.

तसाच अभिमान ही देवविषयक असावा असे नारद सागतात. वास्तविक ईश्वर हा अभिमानाचा द्वेषी आहे, असे सूत्र सत्तावीसमध्ये सागितले आहे. तसेच याच्या मागील सूत्रात अभिमानाचा त्याग करावयास सागितला आहे हे खरे ईश्वर-सेवेव्यतिरिक्त धन, विद्या, कुल, शील, बल, इत्यादिकाच्या अभिमानाविषयी ते सागितले आहे, भगवद्विषयक अहंकार बाधक नाही. ' जे अहंकार वाहत अगी । आम्ही हरीचे भूषावयालागी । जे लोभिये एकुचि जगी । माझेनि लोभे ।।' ज्ञा. ९३२. असे श्रीकृष्ण अर्जुनास सागतात. श्रीतुकाराममहाराजांचा एक अभग पाहा,

**घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्याहातीं । मुक्ता आत्मस्थिती सांडवीन ।। १ ।। ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनी । भाग्य तरी ऋणी देव ऐसा ।।२।। तीर्थ भ्रामकासी आणीन आळस । कडू स्वर्गवास करिन भोग ।।३।। सांडविन तपोनिधा अभिमान । यज्ञ आणि दान लाजविन ।।४।। भक्तिभाग्यसीमा साधिन पुरुषार्थ । ब्रह्मीचा जो अर्थ निज ठेवा ।।५।। धन्य म्हणविन इहलोकी लोकां । भाग्ये आम्हीं तुका देखियेला ।।६।।**

तात्पर्य कामक्रोधअभिमानादि विकार मनात न येतील तर उत्तमच, आल्या-नंतर त्याचा त्याग करता आला तर फारच उत्तम, पण तोही न होऊ शकला तर तिसरा महत्त्वाचा उपाय या सूत्रात सागितला आहे की विकाराचा विषय केवल श्रीहरीच व्हावा. म्हणजे ते नष्ट होतात, किवा राहिले तरी बाधक न होता साधकच होतात ! सूत्रामध्ये ' आदि ' शब्द आहे. आदि शब्दाने द्वेष, वैर, भय सबंध, इत्यादि गोष्टी येतात. पुराणातून शिशुपालादिकानी वैर केले, कंस हा भयाने मुक्त झाला, इत्यादि वर्णने आढळतात. स्वत देवर्षि नारदच वासुदेवास सागत आहेत,

वैरेण यनृपतय शिशुपालपौण्ड्शाल्वादयो गतिविलासविलोकनाद्यै : । ध्यायन्त आकृतधिय शयनासनादौ तत्साम्यमापुरनुरक्तधिया पुनः किम् ।।४८।। ' शिशुपाल, पौण्ड्र, शाल्व, इत्यादि राजे आत्यंतिक वैरभावाने भगवंताच्या सर्व क्रियाशी (लीलाशी) तन्मय झाले. विरोधी भक्तीने भगवताच्या ठिकाणी अत:करण आकृष्ट झाल्यामुळे त्याना भगवत्सारूप्य प्राप्त झाले मग ज्याचे अत:करण प्रेमाने त्या भगवंताचे ठिकाणी जडले आहे ते भगवन्मय होतील यात काय संशय आहे ?'

' शिशुपाल दंतवक्र । पौड्रकशाल्वादि महावीर । कृष्णासी चालविती वैर । द्वेषें मत्सरें ध्यान करिती ।।५२४।। घनश्याम पीताबर कटे । विचित्रालकारी कृष्णु नटे । गदादि आयुधी ऐसा वेठे । अतिबळें तगटे रणभूमीसी ।। ५२५ ।। ऐसे वैर-वशे उद्भट । क्रोधें कृष्णध्यान उत्कट । ते वैरभावें वरिष्ठ । तद्रूपता स्पष्ट

पावले द्वेषे ।। ५२६ ।। कंसासी परमभयें जाण । अखंड लागले श्रीकृष्णध्यान । अन्नपान शयनासन । धाके सपूर्ण श्रीकृष्ण देखे ।।५२७।। कंसासुर भयावेशे । शिशुपाळादिक महाद्वेषें । सायुज्य पावले अनायासे । मा श्रद्धाळू कैसे न पावती मोक्ष ।।५२८।। ए. भा ५

भागवतामध्ये असे म्हटले आहे की कोणताही विकार भगवताशी जोडला गेला की तो माणसाला भगवंताशी एकरूप करण्याला कारणीभूत होतो. शुकदेव सागतात,

कामं क्रोधं भयं स्नेहं ऐक्य सौहृदमेव च ।
नित्य हरौ विदधतो यान्ति तन्मयता हि ते ।। भागवत, १० २९.१५

थोडक्यात भगवत्प्राप्ती करिता साधनांची उणीव नाही कोणत्याही वृत्तीचा आश्रय श्रीहरी बनविता येतो संसारात हे शक्य नाही ज्याचा ज्याचा जसा लौकिक सबध असेल तसेच त्याच्याशी वागावे लागते. कोणाशी बधूप्रमाणे, कोणाशी मित्राप्रमाणे, कोणाबरोबर उदासीनतेने, तर कोणाबरोबर विरोधाने वागणे अपरिहार्य होने. सर्ववृत्ती एका केद्रात आणता येत नाहीत व आणल्या तर त्या बाधक झाल्याविना राहणार नाहीत पण भगवंताच्या ठिकाणी सर्व वृत्ती ठेवता येतात

मात्र त्यात एक महत्त्वाचा भाग असा आहे की त्या वृत्तीचे विकेद्रीकरण होता उपयोगी नाही, त्या त्या वृत्तीचा एक श्रीहरीच आलंबन झाला पाहिजे सूत्रामध्ये ‘ एव ’ हे अव्यय घातले आहे त्याचे हे तात्पर्य आहे. हे जरी खरे आहे तरी सामान्याना वैर, भय, द्वेष याचा त्याग होणे अशक्य आहे, त्यानी श्रद्धापूर्वक सर्व कर्मसमर्पणाचा अभ्यास व नवविधा भक्ती, नामचितन, ध्यानादिकाचा मार्ग अवलंबणेच श्रेयस्कर होय.

## सूत्र ६६

## त्रिरूपभङ्गपूर्वकं नित्यदासनित्यकान्ताभजनात्मकं वा प्रेमैव कार्यं प्रेमैव कार्यम् ।।६६।।

**अर्थ**

त्रिरूपभङ्गपूर्वक (मागे गौणीभक्तीचे जे तीन प्रकार सागितले त्याचा भङ्ग म्हणजे त्याग करून) भक्ताने आपला दास्यभाव अथवा कान्तभाव अखंड राहील असे (श्रीभगवत्स्वरूपावर) प्रेम करावे, प्रेमच करावे.

**विवरण** :

या सूत्राचे मुख्य उद्देश्य भक्ताने देवावर प्रेम करावे, नव्हे केवल प्रेमच करावे, दुसरा भाव निर्माण होऊ देऊ नये, हे आहे मागील सूत्रातून सर्व कर्मे श्रीहरीला अर्पण करून कदाचित कामादिक विकार असतील तर तेही देवावर ठेवावेत इत्यादि सांगितले, पण या सूत्रातून स्पष्ट निर्देश करीत आहेत की त्या विकारानाही विसरून केवल प्रेममयजीवन निर्माण करावे. कारण भक्ती म्हणजे केवल 'परमप्रेम' हे आरंभी सागितलेच आहे. पण भक्ती करीत असता अथवा भक्तीला आरभ करीत असता सत्त्वरजतमादि गुण किवा आर्त अर्थार्थी जिज्ञासू हे भाव कोणत्या ना कोणत्या रूपाने (अथवा पूर्वसस्काराने) भक्ताच्या हृदयात प्रवेश करीत असतात हे तीन भाव वा गुण म्हणजेच 'त्रिरूप' होय पण शुद्ध प्रेमाची जी सहालक्षणे चौपन्नाव्या सूत्रात सागितली आहेत त्यात या गुणाचा प्रवेश नाही या गुणातून अथवा आर्त आदिभावातून भक्ती होईल पण पण ती 'गौणी भक्ति' समजली जाते. परा–श्रेष्ठ–भक्तीत याचा समावेश होणार नाही भक्ती करीत असता हे गुण आत शिरण्याचा प्रयत्न करतात. पण भक्ताने आवर्जून त्याना दूर केले पाहिजे. सूत्रात तर 'भङ्ग,' म्हणजे नाश असा शब्द वापरला आहे

मात्र भक्ती ही कोणत्या तरी योग्य भावातून व्हावी ते दोन प्रकारचे भाव या सूत्रात सागितले आहेत, 'नित्यदास्यभाव' 'नित्यकाताभाव' या भावाने भजन म्हणजे सेवा करावी. 'भज' या धातूचा सेवा हा अर्थ व्याकरणात सांगितला आहे. कारणपरत्वे देवाचे दास्य सेवा करणारे अनेक असतात पण ती भक्तीमध्ये समाविष्ट होत नाही. सूत्रात 'नित्य' विशेषण आहे. मागील चौपन्नाव्या सूत्रात 'अविच्छिन्न' असे विशेषण दिले आहे. नित्य म्हणजे अखंड दास्यभाव ठेवून प्रेम करावे. किवा प्रेम अबाधित राहाण्यास अखंड दास्यभाव असणे उचितच काय आवश्यक आहे.

दास्यभक्तीचा नित्य आनद प्राप्त व्हावा म्हणून प्रत्यक्ष शंकरानी हनुमंत या रूपाने अवतार घेतला ते कसे करावे हे त्याच्याजवळून शिकावे. शरण शरण हनुमंता। तुम्हा आलो रामदूता ॥१॥ काय भक्तीच्या त्या वाटा। मज दावाव्या सुभटा ॥' अशी प्रार्थना तुकाराम महाराजांनी केली आहे. श्रीमारुतिरायाचे दास्य हे अद्भुत, अलौकिक, अतिश्रेष्ठ स्वरूपाचे होते. रामायण ग्रंथातून ह्याचा सर्व प्रकार अनेकविधरूपाने वर्णिला आहे. शेवटी श्री मारुतिरायानी अखड दास्याचीच याचना केली आहे. मारुतिरायाच्या दास्याबद्दल प्रभु श्रीरामचद्र म्हणतात,

एकैकस्योपकाराय प्राणान्दास्यामि ते कपे ।
शेपस्येहोपकाराय भवाम ऋणिनो वयम् ।।

'हे मारुते, तुझे अनंत उपकार माझ्यावर झाले आहेत, एकएका उपकाराच्या मोबदल्यात माझे प्राण अर्पण करीन तर ते पाचच आहेत. राहिलेल्या उपकारा करिता मी तुझा कायमचा ऋणी राहीन !'

दास्यभक्तीत श्रीलक्ष्मणाची योग्यताही कमी नाही आपली साध्वी स्त्री, तसेच सर्व राजवैभव सोडून तो श्रीरामचंद्रासह वनवासात आले. त्याचप्रमाणे लक्ष्मीही अखंड श्रीमहाविष्णूचे दास्य करीत असते. श्रीसीतादेवी ही सेवाभक्तीचा आदर्श आहे असे एकनाथमहाराजानी म्हटले आहे. 'तरी केवळ स्त्री' नव्हे सीता । ते निजभक्त जाण तत्त्वता । खांडोनि राजभोगा समस्ता । सेवेच्या निजस्वार्था वना आली ।। ३८६ ।। राज्यी असतां रघुवीरे दास्यदासां वाटले अधिकारे । ते मी एकली एकसरे । सेवा वनातरी अवधीचि करीन ।। ३०७ ।। ते सेवा यावया हाता । सकळ सेवेच्या निजस्वार्था । चरण चाली चालोनि सीता । आली तत्त्वता वनवासासी ।। ३८८ ।।' ए. भा. ५. भक्तश्रेष्ठ भरत हाही एक सेवा भावी पुरुष होता. त्याची अतरगसेवा रामायणात वर्णिली आहेच. सुग्रीव, अंगद, बिभीषणादिकानीही दास्य भक्ती केली आहे

खरा भक्त दास्यापुढे, सेवेपुढे मोक्षही तुच्छ समजतो असे भागवतामध्ये कपिल-देवहूति सवादात म्हटले आहे.

सालोक्यसार्ष्टिसामीप्यसारूप्यैकत्वमप्युत ।
दीयमानं न गृण्हन्ति विना मत्सेवनं जना. ।। ३–२९–१३

'माझे भक्त सालोक्य, सार्ष्टि (ऐश्वर्य), समीपता, सरूपता व सायुज्य मोक्ष दिला तरी माझ्या सेवेविना ते काही घेत नाहीत.' अनेक भक्ताचे असे उद्गार आहेत. श्रीज्ञानेश्वरमहाराज प्रभृति सर्व सतानी दास्य, सेवा याना फार महत्त्व दिले आहे.तुकाराम महाराजाची सेवेची पराकोटीची आवड त्याच्या अभंगातून दिसून येते. 'भय नाहीं जन्म घेतां । मोक्ष सुखा हाणू लाता । तुका म्हणे सत्ता । निकट करूं सेवेची ।। १ ।।' अशी अनेक प्रमाणे आहेत. सर्वच संताची ही दास्य-भावाची इच्छा अत्यंतिक स्वरूपाची आढळते.

सूत्रात नित्य दास्यरूपाने भजनात्मक प्रेम करावे असे म्हटले आहे. म्हणजे ही सेवा अखड करीत राहिले पाहिजे. दास्यात सेवेचे अनेक प्रकार संभवतात त्यात अमुक एका प्रकार अधिक, अमुक एक न्यून, असा भेद नाही. कोणतीही सेवा काया वाचा व मनाने अखंड चालली पाहिजे. भगवान श्रीकृष्ण सांगतात, 'आणीकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानसिक भाव । तया मीवांचूनि धाव । आनौती नाही ।। ७९ ।। ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर । ध्यान मिषे घर । माझे झाले

॥ ८० ॥ जयांचिये आवडी । केली मजसी कुळवाडी । भोग मोक्ष बापुडी । त्यजिली कुळे ॥ ८१ ॥ ज्ञा. १२ 'प्रेम कार्यं' असे जे सूत्रात सांगितले आहे ते प्रेम, अखंड सेवेने वृद्धिगत होत असते.

त्याचप्रमाणे नित्यकांताभावाने प्रेम करावे असे सूत्रात म्हटले आहे. यासच मधुरभाव अथवा मधुरारति म्हटले आहे. भगवान आपला कान्त आहे व आपण त्याची प्रियतमा, प्रेयसी, स्त्री, आहोत हा भाव ठेवणे म्हणजे कान्ताभाव. स्थूल शरीरात व त्याच्या व्यवहारात काही बदल न होता पण त्या देहावर उदासीन राहून हा भाव निर्माण व्हावा लागतो. भक्तिशास्त्रामध्ये केवळ भगवान हाच एक पुरुष आहे, जीव ही प्रकृती आहे व प्रकृति ही पुरुषाधीन असते व असणे अवश्य आहे. पुरुषसेवा करून त्याच्याशी तादात्म्याला पावणे त्याच्या आनंदाचा भोग घेणे यातच जीवाची सार्थकता आहे हा भाव स्वीकारला जातो. या भावनेला पोषक असा हा 'कांताभाव' आहे. देवभक्तांच्या संबंधात तादात्म्याकरिता हाच दृष्टान्त अनेक स्थली दिला जातो. 'तो वल्लभा मी कांत । ऐसा पढिये ॥' (ज्ञा. १२–१५६) तसेच, 'तैसे ते माझे । कलत्र हे जाणिजे । कायिसेनिही न लाजे । तयांचेनि मी ॥' (ज्ञा. १२–८६) संतांचे अभंग जर आपण पाहिले तर सर्व संतांनी आपल्या ठिकाणी कमीअधिक प्रमाणात या भावाचा अंगीकार केला आहे. गौळणी, विरहिणी, सौरी (स्वैरि), अंबुला इत्यादि रूपकांचे अभंग या कांताभावाचेच आहेत. हा भाव स्वतःच्या ठिकाणी अनन्यतेने मानून या भावात तन्मय बनूनच त्याचे अनेक उद्गार प्रगटतात. श्रीज्ञानेश्वर महाराजाचे उद्गार पाहा

दुरलु अंबुला केला गे बाई । ब्रह्मादिका जो न पडे ठायी ॥
मायाविवर्जित झालिये वो । माझे गोत पंढरिये राहिले वो ॥
पतिव्रता मी परद्वारिणी । परपुरुषेसी व्यभिचारिणी ॥
बापरखुमादेवीवरु जन्मा वेगळें केलें । म्हणोनि भाज झाले बाई येवो ॥

येथे 'अंबुला' म्हणजे पती व 'भाज' म्हणजे पत्नी. तुकाराम महाराजाचेही उद्गार पहा,

हाचि नेम आतां न फिरे माघारी । बैसले शेजारी गोविंदाचे ॥
घररिघी झाले पट्टराणी बळें । वरिलें सावळें परब्रह्म ॥
विसरले कुळ आपुला आचार । पति भावे दीर घर सोय ॥
सांडिला लौकिक लाज भय चिंता । रातले अनंता चित्त माझें ॥

सर्वच संतांचे असे स्वानुभवपूर्ण अनेक उद्गार आहेत. म्हणजे हा कांताभाव सामान्य नसून फार श्रेष्ठ आहे हे यावरून सिद्ध होते.

प्रेमाकरितां नारदांनी पूर्वी सूत्र एकवीसमध्ये व्रजवासी गोपिकांचेच उदा-

हृरण दिले आहे. त्यांचे प्रेम फार पराकोटीचे होते. तोच प्रेमभाव आपल्या हृदयात उत्कटतेने यावा म्हणून भक्तजन त्या गोपीभावाचा, कांताभावाचा स्वीकार करतात. कान्त शब्दाचा अर्थ, 'कं सुख तस्य अंतः कान्त.' पराकाष्ठा 'क' म्हणजे सुख त्याचा अंत म्हणजे पराकाष्ठा ज्याच्यामुळे सुखाची पराकाष्ठा परमानंद प्राप्त होतो, तो कान्त व त्याची अनन्यसेवा करणारी ती 'कान्ता' होय. किंवा 'कान्तिः अस्यास्ति इतिकान्तः ।' जीवनामध्ये ज्याच्याद्वारे कान्ति म्हणजे प्रकाश, ज्याच्याद्वारे आमच्या जीवनातील सपूर्ण अंधकार दूर होऊन प्रेमाचा प्रकाश सर्वत्र पडतो तो कान्त. असा हा केवल श्रीहरीच कान्त होऊं शकतो व तोच सेव्य उपास्य म्हणून योग्य आहे. या विषयात भक्तिमती श्रीरुक्मिणीदेवीचे उद्गार महत्त्वाचे आहेत. आपल्या पत्रिकेत ती म्हणते–

**श्रुत्वा गुणान्भुवनसुंदर श्रृण्वतां ते निर्विश्य कर्ण विवरैर्हरतोङ्गतापम ।।**
**रूपं दृशां दृशिमतामखिलार्थलाभं त्वय्यच्युताविशति चित्तमपत्र पं मे ।। ३७ ।।**
**का त्वा मुकुन्दपदवी कुलशीलरूपविद्यावयोद्रविणधामरात्मतुल्यम् ।**
**धीरा पतिं कुलवती न वृणीत कन्या काले नृसिंह नरलोकमनोभिरामे ।। ३८ ।।**
**यस्याङ्घ्रि पङ्करजः स्नपनं महान्तो वाञ्छन्त्युमापतिरिवात्मतमो- पहत्यै ।**
**यर्ह्यम्नुजाक्ष न लभेय भवद्यत्प्रसादं जह्यामसून्व्रत कृशाञ्छत जन्मभिः स्यात् ।।**

भागवत, स्कं. १०.५२.४३

रुक्मिणीदेवी म्हणते, 'हे अच्युता ! त्रैलोक्यसुंदरा ! श्रोत्रेंद्रियद्वारा हृदयात प्रवेश करून श्रवण करणाऱ्याचा अंगताप सर्व नाहीसा करून टाकतात असे तुझे दिव्य गुण, तसेच नेत्रधारण करणाऱ्यांच्या दृष्टीचा परमलाभ असणारे तुझे दिव्यरूप, यांची प्रशंसा ऐकून माझे चित्त सर्व लोकलज्जा सोडून तुझ्यावर अत्यंत आसक्त झाले आहे.

'हे मुकुन्दा ! कुलशील, रूप, विद्या, वय, द्रव्य व प्रभावाने तुझ्या समान केवळ तूच एक आहेस. हे पुरुषसिंहा ! तू सर्व नरलोकांच्या मनास मोहित करणारा आहेस. विवाहकाल प्राप्त झाला असता कोण तुझ्यावर प्रेम करणारी कुलवती, गुणवती, बुद्धिवती कन्या तुला पतिरूपाने वरण्याची इच्छा करणार नाही ?

'हे कमललोचना ! प्रत्यक्ष उमापति शंकरासारखे महान् देव आपल्या हृदयातील तम दूर होण्याकरिता तुझ्या चरणधूलीत स्नान करण्याची इच्छा करतात. ती चरणधूळ मला प्राप्त न होईल तर असे निश्चयाने समज की मी व्रतादिकांचेद्वारा शरीर कृश करून या व्याकुल प्राणांचा त्याग करीन.'

भागवतामध्ये द्रौपदी व श्रीकृष्ण भगवंताच्या ज्या प्रमुख पट्टराण्या अष्ट-

नायिका यांचा संवाद आहे. त्या प्रसंगी त्या श्रीकृष्णपत्न्याचा कांताभाव कसा होता हे त्या पट्टराण्याच सांगतात.

**न वयं साध्वि साम्राज्यं स्वाराज्यं भोज्यमप्युत ।**
**वैराज्यं पारमेष्ठ्यंच आनन्त्यं वा हरेः पदम्** ।। ४१ ।।

**कामयामह एतस्य श्रीमत्पादरजः श्रियः ।**
**कुचकुङ्कुमगन्धाढ्यं मूर्ध्नावोढुं गदाभृत** ।। ४२ ।। भागवत १०-८३

'हे द्रौपदी ! आम्हास पृथ्वीचे साम्राज्य, इंद्राचे राज्य अन्यभोग, आणिमादि ऐश्वर्य ब्रह्मलोक, मोक्ष अथवा वैकुंठाचीही अपेक्षा नाही. आम्ही केवल भगवान श्रीकृष्णाची कमलाकुचकुंकुमसुगंधयुक्त चरणधूली आमच्या मस्तकावर अखंड पडत राहावी हीच कामना करीत आहो.'

भगवंतावर 'कान्तभाव' ठेवताना मात्र एक महत्त्वाची जाणीव राखणे अवश्य आहे. ती म्हणजे तो सामान्य मनुष्य वा पुरुष नाही. त्याचा देह, त्याचे रूप, गुण सर्व अलौकिक आहेत, परमात्मा परब्रह्मच ही लीलातनु घेऊन आला आहे अशी भावना त्यात पाहिजे. गोपिकाना विषयसुख देण्यास त्याचे पती समर्थ होते, पण श्रीकृष्णाविषयी त्याची अलौकिक दिव्य भावना होती. त्यांना त्याचे माहात्म्यज्ञान पूर्ण होते याचा विचार बाविसाव्या सूत्रावरील विवरणात विस्ताराने केला गेला आहे.

श्रीमत्भागवतामध्ये रुक्मिणीविनोद नामक एक प्रकरण आहे. त्यात एके दिवशी श्रीकृष्ण रुक्मिणीदेवीस सहज विनोदाने म्हणाले, 'तुम्ही राजपुत्री आहा! अनेक सामर्थ्यवान राजे तुम्हास वरण्यास सिद्ध असता आम्हाला काय म्हणून वरले ? आम्हाला राहाण्यास स्थान नाही, समुद्रात राहावे लागले, राज्य नाही, वैभव नाही' असे बरेच भाषण श्रीकृष्णांनी केले. त्यावर श्रीरुक्मिणीदेवीने दिलेले उत्तर या विषयात महत्त्वाचे आहे.

त्वक्श्मश्रुरोमनखकेशपिनद्धमन्तर्मांसास्थिरक्तकृमिविट्कफपित्तवातम् ।
जीवच्छवंभजति कान्तमतिर्विमूढा याते पदाब्जमकरंदमजिघ्रती स्त्री ।। ४५ ।।
—भागवत १०. ६०

'रुक्मिणी म्हणाली प्रभो ! जी स्त्री आपल्या चरणकमलाच्या मकरंदाचे सेवन करू शकत नाही, त्याचा रस घेऊ शकत नाही ती अत्यंत मूर्ख दाढी मिशा-केश, रोम, नखाने युक्त, कातडयाने मढवलेले, मांस हाडे रक्त विष्ठा मूत्र वात, कफपित्तादिकानी भरलेल्या जिवंत प्रेतावर अनुरक्त होऊन त्याला प्रियतम मानते.'

या कांताभावात अव्यभिचारी निष्ठा लागते, अनन्यता लागते. भगवान श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात,

किंबहुना निकट निज । जयाचें जाहलें मज ।
तेणे आपणपयां आम्हा सेंज । एकी केली ।। ६०५ ।।
रिगता वल्लभापुढे । नाही अंगी जीवी साकडे ।
तियें कांतेचिनि पाडे । एकसरला जो ।। ६०६ ।। ज्ञा. १३

अशा प्रकारचे प्रेम करावे. प्रेमभाव जसा वाढवित गेला तसा तो वाढतच जातो. तो 'प्रतिक्षण वर्धमान' असतो असे मागें सांगितलेच आहे, दास्यभाव अथवा कांताभाव वाढविला व त्या भावातून अखंड भजन (सेवा) होऊ लागले म्हणजे प्रेम केले असे समजले जाईल. 'प्रेमैव कार्य' प्रेमाविना अन्यभाव तेथे नच आला पाहिजे.

## सूत्र ६७

## भक्ता एकान्तिनो मुख्याः ।।६७।।

**अर्थ :**

(भक्तांचे अनेक प्रकार असले तरी त्यात) अनन्यभक्त श्रेष्ठ आहेत.

**विवरण :**

आतापावेतो मागील सूत्रातून भक्ती व भक्तीच्या प्रकाराचा विचार केला. पण भक्ती ही कोणातरी व्यक्तीचा आश्रय करूनच राहते, स्वतंत्र राहू शकत नाही. ज्या पुरुषाच्या आश्रयावर भक्ती नांदते त्यास भक्त असे म्हटले जाते. भक्तीमध्ये जर गौणी, मुख्या असे भेद पडतात तर भक्तामध्येही हे भेद होणारच. भक्तामध्ये सात्त्विक, राजस, तामस, उत्तम, मध्यम, निकृष्ट; असे भेद मानले गेले आहेत. तसेच आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू हेही भेद गीतेच्या सातव्या अध्यायात श्रीकृष्णानी सागितले आहेत. त्यांचा विचार छप्पनाव्या सूत्राच्या विवरणात विस्तृत झाला आहे. नारदानी ते गौणी भक्तीमध्ये समाविष्ट केले आहेत. श्रीकृष्णानी जरी त्या सर्वांना 'उदाराः सर्व एवै ते' (गी. ७) म्हणून उदार (योग्य) असे म्हटले आहे तरी त्यांना मुख्यत्व नाही. कारण श्रीकृष्णनीच पुढे

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियोहि ज्ञानिनोत्यर्थं महं स च मम प्रियः ।।** गीता, ७–१७

'अर्जुना ! या आर्त, अर्थार्थी व जिज्ञासू अशा भक्तांमध्ये नित्य व माझ्याशी अनन्य होऊन भक्ती करणारा ज्ञानीच श्रेष्ठ होय. कारण त्या ज्ञानी भक्ताला

अत्यंत प्रिय मी आहे तसेच मलाही तोच एकमेव अत्यंत प्रिय आहे'. भक्तवर्य प्रल्हादाने एकान्तभक्तीचे लक्षण सांगितले आहे ते पहा.

एतावानेव लोकेऽस्मिन्पुंस. स्वार्थः परः स्मृतः ।
एकान्तभक्तिर्गोविन्दे यत्सर्वत्र तदीक्षणम् ।। भागवत ७–५५

प्रल्हाद म्हणतो, 'जीवाचा परमस्वार्थ हाच सागितला आहे, भगवंताची अनन्यभक्ती म्हणजेच 'एकान्तभक्ति', व तिचे स्वरूप भक्ताने सर्वत्र श्रीहरीसच पाहणे.'

भगवान श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात,

मग चौथियाच्या ठायीं । काहींच करणें नाहीं ।
म्हणोनि भक्त एकु पाही । ज्ञानिया तो ।। ज्ञा. ७–१११.

'एकान्तिनः' हे भक्ताचे विशेषण आहे. एकत्वाचा अन्त म्हणजे निश्चय, हा एकांत या पदाचा अर्थ आहे. ती एकत्वभावना ज्यांना अनन्यतेने प्राप्त झाली त्यांना 'एकान्तिन' असे म्हटले जाते. भक्ताच्या हृदयात श्रीहरीविना अन्य भावनेला थाराच नसतो. 'जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत । हा भक्तियोग निश्चित । जाण माझा ।।' (ज्ञा १०–११८) हीच एकान्तभक्ती. ज्ञानेश्वरीत अकराव्या अध्यायाचे शेवटी दृष्टान्तपूर्वक या भक्तीचे स्वरूप सांगितले आहे.

परि तेचि भक्ति ऐसी । पर्जन्याची सुटिका जैसी । धरावांचूनि अनारिसी । गतीचि नेणें ।। ६८६।। कां सकळ जळसंपत्ती । घेऊनि समुद्रातें गिवसिती । गंगा जैसी अनन्यगती । मिनलीचि मिळे ।। ८७।। तैसे सर्वसंभारे । न धरत प्रेम एकसरें । मजमाजी संचरे । मीचि होऊनि ।।६८८।। ज्ञा. ११.

भगवान श्रीकृष्ण भक्तश्रेष्ठ उद्धवास एकान्तभक्तीचे स्वरूप स्पष्ट करून सांगत आहेत,

ऐक एकान्त भक्तीची मातु । देव भक्तासी होय एकान्तु । भक्त रिघ देवा आंतु । देवभक्तांतु सबाह्य ।।४०६।। ऐसें अभेद माझें भजन । या नांव एकान्त भक्ति जाण । भज वेगळें कांही भिन्न । न देखे आन जगामाजीं ।।४०७।। ज्यासी चहूं पुरुषार्थेसी मुक्ती । मी स्वयें देताहे श्रीपती । ते दुरोनि दृष्टी न पाहती । मा धरिती हातीं हें कदा न घडे ।।४०८।। ते स्वमुखें कांहीं मागती । हें न घडे कदा कल्पांतीं । सांडूनि माझी एकान्तभक्ती । कैवल्य न घेतीं ते निजभक्त ।।४०९।।
ए. भा. २०.

मागे 'परमप्रेम' 'अनन्यता' इत्यादि विशेषणांनी जिचे वर्णन केले आहे तीच ही एकान्तभक्ति होय. हिलाच अद्वैतभक्तीही म्हटले जाते. श्रीज्ञानेश्वर-महाराज याच भक्तीचे सदृष्टान्त स्वरूप सांगतात,

तरंग सर्वांगीं तोय चुंबी । प्रभा सर्वत्र विलसे बिंबीं । नाना अवकाश नभीं । लुंठतु जैसा ।।११४८।। तैसा रूप होऊनि माझें । मातें क्रियावीण तो भजे । अलंकार

कां सहजें। सोनयातें जेवीं ॥११४९॥ कां चंदनाची द्रुती जैसी। चंदनी भजे आपैसी। कां अकृत्रिम शशी। चंद्रिका ते ॥११५०॥ ज्ञा. १८

हीच खरी 'एकान्तभक्ति' होय. या भक्तीने युक्त भक्त श्रेष्ठ, मुख्य, होत. यांच्या प्रमुखत्वाचे कारण म्हणजे ते पूर्णरूपाने भगवत्प्रेमाला पात्र होतात. भगवान अशाच भक्तांच्या हृदयात अखंड वास्तव्य करतो.

## सूत्र ६८

## कंठावरोधरोमाञ्चाश्रुभिः परस्परं लपमानाः पावयन्ति कुलानि पृथिवीं च ॥६८॥

**अर्थ :**

(आत्यंतिक भक्तिप्रेमामुळे) कण्ठावरोध, रोमांच आणि अश्रू यांनी (युक्त झालेले ते) परस्पराशी संवाद करणारे (श्रेष्ठ भक्त) कुलांना आणि पृथ्वीलाही पावन करतात.

**विवरण :**

मागील सूत्रात ज्या 'एकान्तभक्तांचे' श्रेष्ठत्व सांगितले ते भक्त एकत्र आले असता त्यांच्या परस्पर भेटीत भक्तिरसाचा महापूर वाहतो. त्यांत निर्माण होणाऱ्या अष्टसात्विकभावात ते रंगून जातात. असे भक्त आपली सर्व कुले पावन करतात, म्हणजे कुलांचा उद्धार होतो, किंबहुना सर्व पृथ्वीचा (जगाचा) उद्धार करण्याचे सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी प्राप्त होते. भागवत एकादशस्कंधाच्या आरंभी नव-योगेश्वर व राजा विदेह यांच्या संवादात प्रबुद्ध सांगतात,

**परस्परानुकथनं पावनं भगवद्यशः ।**
**मिथोरतिर्मिथस्तुष्टिर्निवृत्तिर्मिथ आत्मनः॥३०॥**
**स्मरन्तः स्मारयन्तश्च मिथोऽघौघहरं हरिम् ।**
**भक्त्यासञ्जातया भक्त्या बिभ्रत्युत्पुलकांतनुम् ॥३१॥** ए. भा. ३

'अनन्यभक्तांची भेट झाली असता ते परस्पर अघनाशन करणाऱ्या श्रीहरीच्या पवित्र यशाचे गायन करतात. अन्योन्य प्रेम, परस्परांचे समाधान, परस्परदुःख निवृत्ति संपादन करतात. पातकांचा नाश करणाऱ्या श्रीहरीचे आपण स्मरण करून इतरांनाही स्मरण करावयास लावतात आणि अखंड साधन भक्तीचे आचणा करून ज्यांचे ठिकाणी 'पराभक्ति' उत्पन्न झाली आहे, तिच्या योगाने त्यांच्यर ठिकाणी अष्टसात्त्विक भाव निर्माण होतात.'

सूत्रात 'परस्परं लपमानाः' असे वाक्य आहे. त्याचे हेच तात्पर्य आहे. भक्तांची परस्पर भेट झाल्यानंतर अन्य भाषा थोडीच बाहेर पडेल ? या श्लोकावरील आपल्या ओवीबद्ध अनुवादात एकनाथमहाराज म्हणतात,

तेथ करितां कथानुवादु । परस्परें निजात्मबोधु । करितां गुह्यज्ञान संवादु । परमानंदु वोसंडे ॥५८३॥ तंव हरिकथेच्या आवडी । परस्परें श्रद्धा गाढी । सुखसंवाद परवडी । निजसुख गोडी चाखिती ॥५८४॥ चाखतां निजसुखगोडी । हारपतीं दुःखकोडी । उभऊनि भक्ति साम्राज्य गुढी । स्वानंदजोडी जोडावी ॥ ५८५ ॥ साधनरूप भक्तीच्या युक्ती । पूर्ण सप्रेम उपजे भक्ती । ते भक्तीची निजस्थिती । ऐक चक्रवर्ती सज्ञाना ॥५८९॥ सद्भावें निजभजन करी । हृदयीं प्रगटतां श्रीहरी । तंव देहीची चिन्हें बाहेरी । क्षणामाझारीं पालटती ॥५९०॥ चित्त चैतन्या होता भेटी । हर्षे बाष्प दाटे कंठी । पुलकांकित रोमाञ्च उठी । उन्मीलित दृष्टी पुंजाळे ॥५९१॥ ए भा. ३.

मूळ सूत्रामध्ये कंठावरोध, रोमाञ्च व अश्रू असे तीनच भाव सांगितले असले तरी ते अष्टसात्त्विक भावांचे उपलक्षण मानले पाहिजे. वर जे तीन सांगितले त्यांचेबरोबर बाकीचे पाच सहज येतात. त्यांची नावे खाली दिली आहेत.

**स्तम्भः स्वेदोऽथ रोमाञ्चः स्वरभंगोऽथ वेपथुः ।**
**वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्त्विका मताः ॥**

स्तंभ (शरीर स्तब्ध) होणे, स्वेद (घाम), रोमाञ्च, स्वरभंग (वाणी गद्गद होणे), कंप, वर्ण बदलणे, अश्रू व प्रलय(शरीर, मन अविचल होणे), हे ते आठ सात्त्विकभाव साहित्यशास्त्रातही सांगितले आहेत. हे भक्तिप्रेमानी भरलेल्या शरीरात निर्माण होतातच. 'कंठी प्रेमदाटे नयनी नीर लोटे। हृदयी प्रगटें रामरूप ॥' तुकाराम महाराज असे त्या स्थितीचे वर्णन करतात. श्रीभागवत एकादशस्कंधाच्या चौदाव्या अध्यायात श्रीकृष्ण उद्धवउपदेशप्रसंगी म्हणतात,

**कथं विना रोमहर्षं द्रवता चेतसा विना ।**
**विनाऽऽनंदाश्रुकलया शुद्ध्येद्भक्त्या विनाऽऽशयः ॥२३॥** अ. १४

'अंगावर रोमांच उभे राहून हृदय सद्गदित झाल्याशिवाय, तसेच नेत्रातून आनंदाश्रू गळल्याविना अंतःकरण शुद्ध कसे होणार ?' म्हणजे अष्टसात्त्विक भावांची उत्पत्ति ही भक्तिप्रेमाच्या पूर्णतेची खूण आहे. श्रीभक्तश्रेष्ठ नामदेव म्हणतात,

पुलक घर्म रोमांच नाहीं जंव उठिले । सजळ नाहीं झाले नयन जंव ॥१॥
हरिभक्तीचें सुख कळलें जे म्हणतीं । लटिकें बोलिजेति उभयलोकीं ॥२॥

ही अवस्था प्राप्त होण्याकरिता तुकाराम महाराज देवाची प्रार्थना करीत आहेत.

नाम आठवितां सद्‌गदित कंठीं । प्रेम वाढे पोटीं ऐसें करी ।।
रोमांच जीवन आनंदाश्रू नेत्रीं । अष्टागही गात्री प्रेम तुझें ।।

देव-भक्त अथवा भक्त-भक्तांच्या परस्पर प्रेमसंवादात हे अष्टसात्त्विकभाव निर्माण होणे अपरिहार्य होते. गीताश्रवणप्रसंगी अर्जुनाची व संजयाची या अष्ट-सात्विक भावांनी कशी स्थिती झाली होती याचे वर्णन श्रीज्ञानेश्वर महाराजांनी अनेक ठिकाणी केले आहे. अकराव्या अध्यायातील अर्जुनाच्या या स्थितीचे वर्णन पहा.

आंतुला महानंदाचेईरे जाहले । बाहेरी गात्रांचें बळ हारपोनि गेलें । आपाद पां गुतलें । पुलकांचलें ।। २४६ ।। वार्षियें प्रथमदशें । वोहळल्या शैलांचें सर्वांग जैसें । विरूढे कोमलांकुरी तैसें । रोमांच आले ।। ४७ ।। शिवतला चंद्रकरी । सोमकांतु द्रावो धरी । तैसिया स्वेदकणिका शरीरीं । दाटलियां ।। ४८ ।। माजि सांपडलेनि अलिकुळे । जळावरी कमळकळिका जेवी आंदोळे । तेवी आंतुलिया सुखोर्मिचेनि बळे । बाहेरि कांपे ।। ४९ ।। कर्पूरकेळीची गर्भपुटे । उकलता कापुराचेनि कोंदाटे । पुलिका गळती तेवी थेंबुटें । नेत्रोनि पडती ।। ५० ।। ऐसा सात्त्विकाही आठा भावा । परस्परें वर्ततसे हेवा । तेथ ब्रह्मानंदाची जीवा । राणीव फांवली ।। २५१ ।। ज्ञा. ११

अशीच वर्णने ज्ञानेश्वरीच्या नवव्या व अठराव्या अध्यायाच्या शेवटी आढळतात.

भक्तिशास्त्रामध्यें या सात्त्विकभावांचे फार श्रेष्ठत्व प्रतिपादिले आहे. अंतरात जर निःसीम प्रेमाचा उद्‌भव झाला असेल तरच हे भाव निर्माण होतात व ज्याचे ठिकाणी हे भाव उत्पन्न होतात त्या पुरुषाचे ठिकाणी असे काही अलौकिक सामर्थ्य निर्माण होते की त्याच्या योगाने त्याचे सर्व कुळच काय पण पृथ्वीही पुनीत होते. भगवान नृसिंह भक्तश्रेष्ठ प्रल्हादास स्पष्ट म्हणतात,

**त्रिःसप्तभिः पितापूतः पितृभिः सह तेऽनघ ।**
**यत्साधोऽस्य गृहे जातो भवान्वै कुलपावनः ।। १८ ।।**
**यत्र यत्र च मद्‌भक्ताः प्रशान्ताः समदर्शिनः ।**
**साधवः समुदाचारास्ते पूयन्त्यपि च कीकटाः ।। १९ ।।**

भागवत, ७-१०

‘हे निष्पाप प्रल्हादा ! तुझा पिता आपल्या एकवीस पिढ्या पूर्वजासह पवित्र झाला आहे. कारण त्याच्या घरात कुलपावन करणारा तू जन्म घेतला आहेस. जेथे शांत, समदर्शी, परोपकारी, सदाचारसंपन्न असे माझे भक्त असतात ते कीकट देशासारखे अत्यंत अपवित्र असलेले देशही पवित्र करतात.’

ज्ञानदेवा सांग झाला हरिपाठ । पूर्वजा वैकुंठ मार्ग सोपा ।।
मातृपितृभ्राता सगोच अपार । चतुर्भूज नर होऊनि ठेले ।।

ज्ञा. हरिपाठ.

भगवान श्रीकृष्ण भक्तवर्य उद्धवास स्पष्टच सांगत आहेत—

**वाग्गद्गदा द्रवते यस्य चित्तं रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च ।।**
**विलज्ज उद्गयति नृत्यते च मद्भक्ति युक्तो भुवनं पुनाति ।।**

ए. भा. १४-२४

' ज्याची वाणी प्रेमातिशयाने सद्गदित होते, ज्याच्या चित्ताला द्रव येतो, जो वारंवार प्रेमाने रुदन करतो, क्वचित हसतोही, प्रेमाने निर्लज्ज होऊन मोठ्याने गातो आणि नाचतो, याप्रमाणे ज्याची माझ्या ठिकाणी अष्टसात्त्विक भावाने युक्त भक्ती असते असा भक्त त्रिभुवनाला पुनीत करतो. '

श्रीएकनाथमहाराज अनुवाद करतात ' यापरी भक्तियुक्त । होऊनिया माझे भक्त । निजानंदे गात नाचत । तेणे केले पुनीत लोकत्रय ।। ३३२ ।। कीर्तनाचेनि महाघोकें । नाशिली सर्व दुःखें । अवघें विश्वचि हरिखे । भरिले महासुखें उचंबळत । ३३४ ।। दर्शनें स्पर्शनें वचनें । एक तारिलें कीर्तनें । एक तारिलें नामस्मरणें । यापरि जग उद्धरणें उद्धवा ।। ३३५ ।। ए. भा. १४.

कोणास अतिशयोक्ति वाटण्याचा संभव आहे पण भगवान श्रीकृष्णच स्पष्ट सांगतात कीं माझ्यापेक्षाही भक्तांचा पवित्रपणा श्रेष्ठ आहे.

**निरपेक्षं मुनिशान्तं निर्वैरं समदर्शिनम् ।**
**अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यंघ्रिरेणुभिः** ।। १६ ।। ए. भा. १४

' निरपेक्ष, अंतर्निष्ठ, शात, निर्वैर व सर्वत्र समदर्शी अशा भक्तांच्या मागे मागे सर्वकाळ मी असतो. त्यात माझा हेतू हा की भक्तांच्या चरणधूलीने आपण पवित्र व्हावें. '

हे पंच लक्षण आल्या हातां । मजहूनि अधिक पवित्रता । जोडली माझ्या निजभक्ता । मीही वंदी माथा चरणरेणु ।। १८५ ।। समुद्रोदक मेघी चढे । त्यासी मधुरता अधिक वाढे । जग निववी वाडेकोडें । फेडी सांकडें दुकाळाचें ।। ८६ ।। तेंचि उदक समुद्रीं पडतां । उपयोगा नये गा सर्वथा । तेवी माझेनि भजनें मद्भक्ता । झाली पवित्रता मजहुनी ।। ८७ ।। केळी चाखितां चवी नातुडे । तिच्चिच केळें अति गोडे । तेवीं मजहुनि माझ्या भक्ताकडे । पवित्रता वाढे अनिवार ।। ८८ ।। भक्त चरणरेणु वंदिता । मज केवढी आली पवित्रता । माझे पायवणी वाहे माथा । जाण तत्त्वतां सदाशिवू ।। १९० ।। ए. भा. १४

तात्पर्य अष्टसात्त्विक भावयुक्त भक्तीचा प्रभाव एवढा मोठा आहे की पूर्वजांचा तसेच सर्वजगाचा उद्धार करण्याइतके पावनत्व त्या भक्तीने प्राप्त होते. म्हणून भक्त जीवनाला जगात महत्त्वाचे स्थान आहे.

## सूत्र ६९

## तीर्थी कुर्वन्ति तीर्थानि सुकर्मी कुर्वन्ति कर्माणि सच्छास्त्री कुर्वन्ति शास्त्राणि ।। ६९ ।।

अर्थ :

असे (अष्टसात्त्विक भावाने युक्त असणारे भक्त) तीर्थांना सुतीर्थ बनवितात (विहित) कर्मांनाही सुकर्म दशेला आणतात आणि शास्त्राना सच्छास्त्र स्वरूप प्राप्त करून देतात.

**विवरण :**

मागील सूत्रात प्रेमीभक्त कुलास तसेच पृथ्वीस पावन करीत असतात असे सांगितले. आता यासूत्रात आणखीही त्यांचा पावन करण्याचा विशेष अधिकार किती श्रेष्ठ आहे ते नारदमहर्षि सांगत आहेत. मानवांना संचित पापापासून मुक्त करून त्यांना पावन करण्याचे सामर्थ्य तीर्थामध्ये आहे असे पुराण व स्मृतिग्रंथातून स्पष्ट सांगितले आहे. आपल्या या भारतवर्षात सर्वत्र अनंत तीर्थे पसरलेली आहेत. पद्म-पुराण खंड सहा एकशेतिसाव्या अध्यायामध्ये अनेक तीर्थांचा इतिहास लिहिला आहे. साभ्रमतीतीर्थ, नंदीतीर्थ, विकीर्णतीर्थ, श्वेततीर्थ, गणतीर्थ, कंबुतीर्थ, कपितीर्थ, मंकितीर्थ, ब्रह्मतीर्थ इ. इ. शेकडो तीर्थांचे वर्णन आहे. महाभारत वन-पर्वात अनेक तीर्थांचा विचार आला आहे, कोणी कोणी त्या तीर्थात स्नान केले व त्यांचा कसा उद्धार झाला याचा इतिहासही सांगितला आहे. प्रत्येक पुराणातून अनेक तीर्थांचे माहात्म्य विशद केले आहे. श्रीभागवत एकादश स्कंधाच्या एकोणतीसाव्या अध्यायातील दहाव्या श्लोकावरील आपल्या व्याख्यानातून एकनाथ महाराजांनी कुरुक्षेत्र, अयोध्या, गंगायमुना, अर्बुदाचले, कलापग्राम, नंदिग्राम, बदरिकाश्रम, पंचवटी, मथुरा गोकुळ, वृंदावन, ब्रह्मगिरी, द्वारावती, पंढरपूर, वाराणसी, गया, त्रिवेणीसंगम, गंडकी, नर्मदा, तापी, चिदंबर, कृष्णा, वेण्या, तुंगभद्रा, गोमती, श्रीशैल्य, कावेरी, कृतमाला, पयस्विनी, ताम्रपर्णी, नैमिषारण्यादि अनेक तीर्थांची नामावळी सांगितली आहे.

मनुष्यजन्मात आल्यानंतर जी अनेक धार्मिक कृत्ये केली पाहिजेत असा धर्मशास्त्राचा आदेश आहे त्यात तीर्थयात्रांचा समावेश आहे. तुकाराम महाराज सांगतात, ' जंव हें सकळ सिद्ध आहे । हात चालावया पाय । तंव तू आपलें स्वहित पाहे । तीर्थयात्रे जाय चुको नको ।।' या तीर्थांचे ठिकाणी पापनाशक सामर्थ्य कसे

व का आले याचे वर्णन पुराणातून आढळते. शास्त्रामध्ये पापनाशाकरिता जे साधन सांगितले जाते त्यांना प्रायश्चित्त असे म्हणतात. त्यांचे दोन प्रकार आहेत, साधारण व असाधारण. सर्व ज्ञात अज्ञात पातकांच्या निवृत्तीकरिता जे आचरले जाते त्यास साधारण ( सामान्य ) प्रायश्चित्त म्हणतात. तीर्थांना साधारण प्रायश्चित्त म्हटले जाते. कारण इह वा पूर्व जन्मातील कळत असलेली व नसलेली कायिक, वाचिक, मानसिक, सांसर्गिकादि सर्व पापे तीर्थस्नानाने धुऊन जातात. पण या प्रायश्चित्ताने पापांचा नाश होतो असे मानले तरी ज्या कारणामुळे पापप्रवृत्ति होते ती कारणे म्हणजे पापवासना, कामक्रोधादि विकार, नष्ट करण्याचे सामर्थ्य या प्रायश्चित्त कर्मात नाही. भागवतामध्येच स्पष्ट म्हटले आहे,

**क्वचिन्निवर्ततेऽभद्रात्क्वचिच्चरति तत्पुनः ।**
**प्रायश्चित्तमतोऽपार्थं मन्ये कुञ्जर शौचवत् ॥ भा. ६-१-१०**

'प्रायश्चित्त करीत असता अभद्र म्हणजे पापापासून निवृत्त होतो व पुन्हा त्याच पापाचे आचरण करतो, हत्तीला चांगले धुतले तरी तो पुन्हा आपले अंगावर धूळ उधळून घेतो तद्वत.'

ही तीर्थातील न्यूनता नष्ट करण्याचे सामर्थ्य हरिभक्तांमध्ये आहे. तीर्थांना खरे पावनत्व यांच्या संगतीने प्राप्त होते. स्वतः धर्मराज विदुरांना म्हणतात,

**भवद्विधा भागवतास्तीर्थीभूताः स्वयं विभो ॥**
**तीर्थीकुर्वन्ति तीर्थानी स्वान्तस्थेन गदाभृता ॥ भागवत १-१३-१०**

'हे प्रभो ! तुमच्यासारखे भक्तभागवत स्वतः तीर्थ-स्वरूप आहेत. पापी-पुरुषांच्या द्वारा कलुषित झालेल्या तीर्थांना आपल्यासारखे आपल्या हृदयामध्ये विराजित श्रीगदाधर भगवंताच्या प्रभावाने पुन्हा तीर्थत्व प्रदान करितात.'

तीर्थे पापी पुरुषांना निष्पाप पवित्र बनवितात, परंतु पापात्म्यांच्या सतत संबंधामुळे त्याच्यात मलिनता येते. तीर्थांचीही मलिनता अशा भक्तांच्या समागमामुळे नष्ट होते. सूर्यवंशी राजा भगीरथाच्या तपाने प्रसन्न झालेली भागीरथी त्यास म्हणाली की तुझ्या पूर्वजांचा उद्धार करण्याकरिता मी जर मृत्युलोकावर आले तर तेथील पापीजन माझ्यात स्नाने करतील व त्यांची पापे मला लागतील ? यावर भगीरथाने तिला हेच उत्तर दिले आहे. भगीरथ तिला म्हणतो,

**साधवो न्यासिनः शान्ता ब्रह्मिष्ठा लोकपावनाः ।**
**हरन्त्यघं तेऽङ्गसङ्गात्तेष्वास्ते ह्यघभिद्धरिः ॥ भागवत ९-९-६**

'हे माते ! समस्त लोकांना पावन करणारे, विषयत्यागी, शांतस्वरूप ब्रह्म-निष्ठ साधुसंत हेही त्या मृत्युलोकात आहेत. ते येऊन तुझ्या प्रवाहामध्ये स्नान करतील, त्यांच्या शरीराच्या संगतीने तुमची पापे सर्व धुऊन जातील कारण त्यांच्या हृदयामध्ये समस्त पातकांचा विनाश करणाऱ्या श्रीहरीचे वास्तव्य असते.'

भागवतामध्ये जनक नवयोगेश्वर संवादात राजा जनक त्या नवयोगेश्वरांना म्हणतो,

स्नान केलिया गंगा । पवित्र करी सकळ जगा । ते गंगाही निजपापभंगा । तुमचे चरणसंगा वांछित ।।२५१।। तुमची दर्शनसंग चिद्गंगा । अत्यंत दाटुगी माजी जगा । दर्शनमात्रे ने भवभंगा । जन्ममरण पैगा मग कैचे ।।२५२।। तेथें कायसा गंगेचा पडिपाडू । नाहीं तीर्थ महिमेसी पवाडू । तीर्थां भवदोष अवघडू । त्यांचा करी निवाडु दृष्टिसंगे ।।२५३।। ए. भा. २.

एकादशस्कंधाच्या सव्विसाव्या अध्यायात तर प्रत्यक्ष भागीरथीचीच साक्ष काढली आहे.

स्वयें आपण भागीरथी । सर्वदा ऐसें जीवी चिंती । कोणी साधु ये जै मज-प्रती । तै माझी पापें जाती निःशेष ।।३५८।। पार्वतीचा द्वेष मनी । ते बद्ध पाप मजलागुनी । तेही झडे संतचरणी । सकळ पापाधुणी सत्संगे ।।३५९।। कां ज्याचें मुखीं हरिनामकीर्ती । त्याचे पाय जै मजमाजी येती । तै सकळ पापे माझी जाती । ऐसें भागीरथी स्वयें बोले ।।३६०।। ए. भा. २६.

'तीर्थे पावन धर्म जिही केला धडौता । कैवल्यकलपद्रुम ते त्रिजगती ।।१।।' असे ज्ञानेश्वर महाराजही एका अभंगात सांगतात– भगवान श्रीकृष्ण सांगतात, 'संतांचेनि अंगलगे । पापातें जिणणें गंगें । तेणें संतसंगे । शुचित्व कैसें ।।' (ज्ञा. १२–१७७) म्हणून तीर्थयात्रेला जाणाऱ्यांनी केवल त्या तीर्थात स्नान अथवा पितरांच्या प्रीत्यर्थ श्राद्धविधी इत्यादिक करून न राहाता त्या त्या तीर्थाचे ठिकाणी जे साधु-संत वास्तव्य करून रहातात त्यांचेही दर्शन घ्यावे असा संप्रदाय आहे. काही तीर्थे कालाच्या ओघात लुप्त झाली होती. त्यांचा पुनरुद्धार महात्म्यांनी केला अशा आख्यायिका आहेत. श्री जगद्गुरू शंकराचार्यांनी नारदकुंडातून श्रीबद्रीनारायणाची मूर्ती काढून त्याची पुन्हा प्रतिष्ठा करून त्या क्षेत्राचा महिमा वाढविला. श्रीचैतन्य महाप्रभूच्या पूर्वी वृंदावनात श्रीकृष्णलीला कोठे कोठे झाल्या याचा पत्ता नव्हता. महाप्रभूनी श्रीरूप व सनातन गोस्वामींना आशीर्वाद देऊन वृंदावनात पाठविले व सांगितले की तुम्हाला तेथे कोणती लीला कोठे झाली याचे स्फुरण होईल. वर्तमान वृंदावनातील लीला स्थानाचा निश्चय रूपगोस्वामी यांनी केला अशी आख्यायिका आहे. पंढरपुरात श्रीपांडुरंग भक्त पुंडलिकाकरता आला ही कथा प्रसिद्धच आहे आळंदी देहू इत्यादि तीर्थक्षेत्रे तर संतांच्यामुळेच निर्माण झाली आहेत. किंबहुना संत ज्या नदीत स्नान करतात ती नदी व ज्या भूमीत वास्तव्य करतात त्या भूमीला तीर्थपणा प्राप्त होतो.

तसेच सूत्रात पुढे 'सुकर्मी कुर्वन्ति कर्माणि सच्छास्त्री कुर्वन्ति शास्त्राणि असे म्हटले आहे. म्हणजें शास्त्रात अनेक सत्कर्मे पुण्यकर्मे, सांगितली आहेत.

पण जी कर्मे संत-भक्त करतात त्यांनाच सत्कर्मे असे म्हटले जाते. भक्ताच्या दृष्टीने नवविधाभक्ती, एकादश्यादि उपवास, सर्वात्मभावाने दीनदु:खी जीवांची सेवा, ध्यान, इत्यादि हीच भगवत्प्राप्तीस कारणीभूत असणारी अशी सत्कर्मे होत. भक्तगण यांनाच सत्कर्मे म्हणतात. एतद्व्यतिरिक्त हिसाप्रधान यज्ञयागादिकांना जे स्वर्गप्राप्तीस कारण आहेत त्याना ते सत्कर्म वा पुण्यकर्म म्हणत नाहीत. ज्ञानेश्वर महाराज सागतात, 'जैसे कल्पतरू तळवटी। बैसोनि झोळिये पाडी गाठी। मग निदैव निघे किरीटी। दैन्यचि करू ॥११॥ तैसे शतक्रतू योजिले माते। की ईप्सिा ताति स्वर्ग सुखाते। आता पुण्य की हे निरुते। पाप नोहे ॥१२॥ म्हणोनि मजवीण-पाविजे स्वर्ग। तो अज्ञानाचा पुण्यमार्ग। ज्ञानिये तयाते उपसर्ग। हानि म्हणती ॥१३॥ एऱ्हवी तरी नरकीचे दुःख। पावोनि स्वर्गा नाम की सुख। वाचूनि नित्यानंद गा निर्दोख। ते स्वरूप माझे ॥१४॥ मज येता पैं सुभटा। या द्विविधा गअव्हाटा। स्वर्गनरक या वाटा। चोरांचिया ॥१५॥ स्वर्गा पुण्यात्मके येईजे। पापा त्मके पापे नरका जाईजे। मग माते जेणे पाविजे। ते शुद्ध पुण्य ॥३१६॥' ज्ञा० ९

तसेच फलाशा धरून कर्म करू नये, ते काम्यकर्मही सत्कर्म या संज्ञेस प्राप्त होत नाही. सामान्य श्रद्धावानाना सत्कर्म का असत् कर्म यातील भेद कळत नाही. एखादे सामान्य कर्मही जर भगवत्प्रीत्यर्थ केले गेले तर ते सत्कर्म होते. उदाहरणार्थ रंतिदेव राजाने केवल जल भगवंताला समर्पण केले, पण तेवढ्यानेच भगवान प्रसन्न झाला. ते कर्म केवढ्या श्रेष्ठ पदवीला प्राप्त झाले त्याचे वर्णन श्रीकृष्ण भगवानच करीत आहेत, 'अथवा ऐसेंही एक घडे। जे पालाही परी न जोडे। तरि उदकाचे तत्र साकडे। नव्हेल की ॥३८७॥ ते भलतेथ निमोले। न जोडिता आहे जोडलें। तेंचि सर्वस्व करूनि अर्पिले। जेणें मज ॥८८॥ तेणे वैकुंठा पासोनि विशाळे। मजलागी केली राऊळें। कौस्तुभाहोनि निर्मळें। लेंणी दिधली ॥८९॥ दुधाची शेजारे। क्षीराब्धी ऐसी मनोहरे। मजलागी अपारें। सृजिली तेणें ॥९०॥ कर्पूरचंदन आगरु। ऐसेया सुगंधाचा महामेरू। मज हातीं लाविला दिनकरु। दीपमाळे ॥९१॥ गरुडासारखी वाहने। मज सुरतरूंची उद्याने। कामधेनूची गोधने। अर्पिली तेणें ॥९२॥ मज अमृताहूनि सुरसें। बोनी वोगरिली बहुवसे। ऐसा भक्तांचे नि उदकलेशें। परितोषे गा ॥३९३॥' ज्ञा० ९

म्हणजे केवळ जलसमर्पणरूप सामान्यकर्म ही केवढ्या सत्कर्म पदवीस प्राप्त होते! गजेंद्राचे पुष्प समर्पण, सुदामदेवाचे पोहे समर्पण, शबरीची बोरे अर्पण करणे इत्यादी सामान्य कर्माला एवढे सत्कर्माचे महत्त्वाचे स्वरूप प्राप्त झाले आहे की त्यांच्यापुढे मोठमोठ्या अश्वमेधादि यज्ञाचे, कृच्छ चांद्रायणादि कर्माचे मूल्य काहीच नाही. याचे कारण एकच की प्रेमिभक्ताच्यामुळे त्या सामान्य कर्माला 'सत्कर्म' पणा प्राप्त होतो. किंबहुना भक्तांचे कायिक वाचिक मानसिक कोणतेही

कर्म सत्कर्मच होते.

तसेच पुढे सूत्रात ' सच्छास्त्री कुर्वन्ति शास्त्राणि ' असे वाक्य आहे म्हणजे. भगवद्भक्त शास्त्रांना सच्छास्त्रपणा आणतात. शास्त्रशब्दाचा अर्थ ' हित शासनाच्छास्त्रं, ' मानवास हिताचे ज्ञान करून देणाऱ्या वचनास वा ग्रंथास शास्त्र म्हणतात

तशी प्रमुख सहा शास्त्रे मानली आहेत न्याय, वैशेषिक, योग, साख्य पूर्व मीमासा, उत्तरमीमांसा (वेदांत) ही ती सहा शास्त्रे होत. प्रत्येक शास्त्राची स्वतंत्र विचार प्रणाली आहे. प्रत्येकाचा साध्य साधन विचार भिन्न आहे. पुढच्या पुढच्या शास्त्रज्ञांनी मागील शास्त्रज्ञाच्या मताचे खंडण केले आहे. त्यांच्यात एकवाक्यता होणे कठिण आहे. त्यानी जीव जगत् व ईश्वर याचा सूक्ष्म विचार केला आहे. पण यातील कित्येक ईश्वर हे तत्त्वच मानीत नाहीत. सांख्य व मीमांसक मत ईश्वर न मानणारे आहे. नैय्यायिक ईश्वर मानतात पण तो सगुण निराकार व द्रव्य स्वरूप मानतात तसेच तो परिछिन्न मानतात. ज्ञान आनंद हे त्याचे स्वरूप न मानता ते गुण मानतात. योगदर्शनात क्लेश, कर्मविपाक, आशय इत्यादीकानी रहित अशा एका जीवाहून भिन्न पुरुषास ईश्वर मानले आहे. रामकृष्णादि अवताराना ते ईश्वर मानीत नाहीत. सर्वच शास्त्रज्ञ सर्वज्ञ व श्रेष्ठ म्हणविले जातात म्हणून एखाद्या साधक भक्तास ईश्वरविषयक संशय उत्पन्न होणे अशक्य नाही; कारण त्याची एकवाक्यता करणे, समन्वय साधणे सोपे नाही. एका अभंगात ज्ञानेश्वर महाराज सांगतात, 'वेद शास्त्र जाणितलें । आगमी पूर्णज्ञान झाले । पुराण मात्र धाडोळिलें । आहे तें राहिलें वेगळेंचि ॥१॥' अशा शास्त्राना सच्छास्त्र म्हणता येण"र नाही. भक्तमहात्मे ज्या शास्त्राचा आदर करतात तेच सच्छास्त्र म्हटले जाते. त्याचा विचार पुढे शहात्तराव्या सूत्रात सविस्तर केला जाणार आहे. भगवद्भक्तीच्या दृष्टीने ज्या शास्त्रात भगवत्स्वरूप विचार नाही, भगवद्गुणानुवाद नाहीत, नाममाहात्म्य नाही ते शास्त्र नव्हे.

असेही म्हटले तर वावगे होणार नाही की, भक्त महात्मे जेथे वास्तव्य करून असतात, ज्या जलाशयाचा उपयोग ते स्नानाकरिता करतात तेच तीर्थ बनत असते. त्यांच्या संसर्गाने ' अतीर्थ ' असलेलेही जल अथवा स्थान तीर्थ पदवीला प्राप्त होते. म्हणजे अतीर्थीलाही तीर्थ बनविण्याचे सामर्थ्य त्यांना प्राप्त झालेले असते. तसेच भक्त जे जे कर्म करतात ते ते सामान्य असेल तरी ते सत्कर्म संज्ञा धारण करते. तसेच त्यांच्या मुखातून जे शब्द जी वाक्ये सहजपणे बाहेर पडतात ती शास्त्रे होतात. ' येषां स्वैर कथालापा उपदेशा भवन्ति हि ॥ ' (भागवत) किंवा 'सहज बोलणे हित उपदेश ' (तु.) या वचनाप्रमाणे त्यांच्या शब्दांचे महत्त्व आहे. ज्यांना खऱ्या रीतीने तीर्थांचे, सत्कर्माचे वा सच्छास्त्राचे वर्म ज्ञात होईल त्यांची हीच भावना राहील.

## सूत्र ७०

## तन्मयाः ॥७०॥

**अर्थ :**

(कारण ते भक्त) तन्मय असतात.

**विवरण :**

मागील सूत्रात भक्तांचे असे सामर्थ्य कथन केले की त्यांच्यामुळे तीर्थांनाही पावनत्व प्राप्त होते, कर्म सत्कर्म बनते, शास्त्रांना सच्छास्त्रपणा प्राप्त होतो. त्याचे कारण या सूत्रात सागितले आहे की ते भक्त ' तन्मय ' म्हणजे भगवन्मय झालेले असतात. त्याच्यामध्ये व भगवंतामध्ये स्वरूपाने अंतर राहिलेले नसते. भगवान श्रीकृष्ण सांगतात.

**वीतराग भयक्रोधाः मन्मया मामुपाश्रिता ।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भाव मागता ॥** गीता, ४.१०

' अर्जुना, आसक्ती, भय, क्रोध ही ज्याच्यापासून निघून गेली आहेत, जे मन्मय, मत्स्वरूप झाले आहेत, माझा आश्रय करून राहिले आहेत, असे ज्ञानतपाने, भक्तीने शुद्ध झालेले माझ्या स्वरूपाला प्राप्त झाले आहेत.' श्री ज्ञानेश्वर महाराजांचे या श्लोकावरील व्याख्यान पहा–

जे सदा मियांचि अथिले । माझिया सेवा जियाले । कां आत्मबोधें तोषले । वीतराग जे ॥६१॥ जे तपोतेजाचिया राशी । एकायतन ज्ञानासी । जे पवित्रता तीर्थासी । तीर्थरूप ॥६२॥ जे मद्भावा सहजे आले । मी तेचि ते होऊनि ठेले । जे मज तया उरले । पदर नाही ॥६३॥ ज्ञा. ४

' ज्ञानीत्वात्मैव मे मतं ' हे गीतावचन प्रसिद्ध आहे. पुढे नवव्या अध्यायात श्रीकृष्ण म्हणतात, ' ते वर्तत दिसती देही । परि ते देहीना माझां ठायी । आणि मी तयांचा हृदयी । समग्र असे ॥४०९॥ सविस्तर वटत्व जैसें । बीज कणिकेंमाजि असे । आणि बीजकण वसें । वटीं जेवी ॥४१०॥ तेवी आम्हां तयां परस्परें । बाहेरी नामाचींचि अंतरें । वांचुनि आंतुवट वस्तु विचारें । मी तेचि ते ॥४११॥' भक्त हा भगवद्ध्यान करीत असतो, त्या ध्यानाचे सामर्थ्य ध्येयाकरता प्राप्त होणे हे आहे. ' गोविंदगोविंद । मना लागलिया छंद ॥ मग गोविंद ते काया । भेद नाही देवातया ॥ ' असे तुकाराम महाराज सांगतात. याकरिता भागवतामध्ये भिंगुरटी कीटकाचे उदाहरण दिले आहे. भिंगुरटी एक आळी धरून आणते आणि आपल्या घरट्यात ठेवते व तिला येता जाता टोचते. त्या भयाने ती आळी सतत त्या

भिंगुरटीचे ध्यान करते. त्या ध्यानाने ती पुढे भिंगुरटी होऊन जाते. तद्वत् भगवद्ध्यानाने भक्त तन्मय होतो. श्री एकनाथ महाराज सांगतात, ' भिंगुरटी कीटकीतें धरी । कोंडी भिंती माजिलेघरी । ते मरणभयें ध्यान करी । निरंतरी भ्रमरीचे ॥२३९॥ तेणें तीव्र ध्यानें ती किटी । होऊनि ठाके भिंगुरटी । गगनी चढे उठाउठी । प्रत्यक्ष देखिजे ॥२४०॥ भिंगुरटी जड असंत । मूढ किटी तिचे ध्यान करीत । तेणे तद्रूपता प्राप्त । तैसा भगवंत तंव नव्हे ॥२४१॥ तो अजड चिद्रूप सुखदाता । ज्ञाता अधिकारी ध्यान करितां । तेथ तद्रूपता पावता । विलंबू सर्वथा पैं नाही ॥२४२॥' ए. भा. अ. ९

स्वत: श्रीकृष्ण भगवान हीच गोष्ट उद्धवास सागतात.

**विषयान्ध्यायतश्चित्तं विषयेषु विषज्जतें ।**
**मामनुस्मरतश्चित्तं मय्येव प्रविलीयतें** ॥भागवत ११–१४

जो करी विषयांचे ध्यान । तो होय विषयी निमग्न । जो करी सदा माझें चिंतन । तो चैतन्यघन मीचि होय ॥३४९॥ स्त्री गेली असता माहेरी । ध्याताचि प्रगटे जिव्हारी । हाव भाव कटाक्षेवरी । सकाम करी पुरुषाते ॥३५०॥ नसते स्त्रियेचे ध्यान करिता । प्रगट दिसे यथार्थता । मी स्वत: सिद्ध हृदयी असता । सहजे मद्रूपता चिंतिता मज ॥३५१॥ आवडी माझें जे चिंतन । चित्त चिंता चिंतितेपण । विरोनि होय चैतन्यघन । मद्रूपपण तेणें होय ॥३५२॥ ए. भा. १४.

कित्येक भक्त ध्यान भक्तीने तन्मय होतात तर कित्येक भक्तांना भगवत् कृपेने जे अपरोक्ष ज्ञान प्राप्त झालेले असते ते त्या ज्ञानाने तन्मयतेला प्राप्त होतात. त्याचा विचार वर आलाच आहे. भगवान श्रीकृष्ण गीतेच्या चौदाव्या अध्यायाच्या आरंभी त्या भक्ताची तन्मयता म्हणजे भगवदेकरूपता किती श्रेष्ठ आहे ती सांगतात,

जे माझिया नित्यता । तेणें नित्य ते पंडुसुता । परिपूर्णता । माझियाचि ॥५२॥ मी जैसा अनंतानंदु । जैसाचि सत्यसिधु । तैसेचि ते भेदु । उरेचिना ॥५३॥ जे मी जेवढें जैसें । तेचि ते जाले तैसे । घटभंगी घटाकाशें । आकाश जेवी ॥५४॥ ज्ञा१४

ही खरी तन्मयता आहे. ' तन्मय ' शब्दातील ' मयट् ' प्रत्ययाच्या अर्थाचा विचार केला असतां ' मयट् ' प्रत्ययाचे ' प्राचुर्य ' ' विकार ' व ' तादात्म्य ' असे तीन अर्थ होतात. प्राचुर्य म्हणजे आधिक्य. एखाद्या ठिकाणी एखादा पदार्थ अधिक प्रतीत झाला म्हणजे तेथे ' मयट् ' चा उपयोग केला जातो. ' जलमय सृष्टि ' ' दु:खमय संसार ' येथे प्रचुर म्हणजे अधिक असा अर्थ आहे. तसेच ' मृण्मय ' घट या वाक्यांत विकार असा ' मय ' चा अर्थ आहे, म्हणजे मातीचे कार्य, मातीचा विकार, असा अर्थ आहे. तिसरा ' मयट् ' शब्दाचा ' तादात्म्य ', ऐक्य हा अर्थ आहे, जसे परमात्मविशेषणात ' चिन्मय ' ' ज्ञानमय ' ' आनंदमय ' ही पदे

येतात. तेथे प्राचुर्य म्हणजे आधिक्य किंवा विकार हा अर्थ अभिप्रेत नसून तादात्म्य म्हणजे ऐक्य तद्रूपता हा अर्थ घ्यावयाचा असतो. तसे या सूत्रात जो ' मयट् ' प्रत्यय ' तन्मया· ' म्हणून सांगितला आहे तोही देव व भक्त यांच्यातील तादात्म्याचाच वाचक आहे. प्राचुर्य म्हणजे आधिक्य किंवा विकार या अर्थाचा नाही. बाराव्या अध्यायांत जी भक्तलक्षणे श्लोक तेरा पासून एकोणीस पावेतो सांगितली आहेत. ती अशा तन्मय अवस्थेला प्राप्त झालेल्या भक्त श्रेष्ठाचीच आहेत.

## सूत्र ७१

## मोदन्ते पितरो नृत्यन्ति देवताः सनाथा चेयं भूर्भवति ॥ ७१ ॥

**अर्थ** :

(अशा भक्तामुळे) मातापितर प्रमुदित होतात, स्वर्गीय देवतादेखील आनंदाने नृत्य करू लागतात ही पृथ्वी सनाथ होते.

**विवरण** ·

मागील सूत्रात भक्तीचे स्वरूप किंवा प्रयोजन ' तन्मयता ' हे सांगितले ते मुख्य फल आहे. मुख्य फलाबरोबर त्या त्या कार्याची अवातर फलेही सिद्ध होत असतात. ती या सूत्रात सांगितली आहेत. ज्या कुळात भक्त अवतार घेतात त्या कुळातील पूर्वज ज्या ज्या लोकात असतील तेथे तेथे त्याना आनंद होतो. पुराणादिकामध्ये तसेच गीतेतही पितृलोकाची कल्पना आहे. जेथे ते पितर वास्तव्य करून असतात, त्या पितृलोकात कर्मफले भोगण्याकरिताच ते पितर गेलेले असतात. पण तेही एक प्रकारचे बधनच आहे. त्या बधनातूनही मुक्त व्हावे असे त्यांना वाटते. पण ते पितृलोकात राहून बधमुक्त होऊ शकत नाहीत. ब्राह्मणक्षत्रियवैश्यादि त्रैवर्णिकाना वेदाधिकार असल्याने ते पितराच्या उद्देशाने वार्षिक श्राद्धे, महालयादि व पार्वणादि श्राद्धे करू शकतात. ते अन्न पितराना ते असतील तेथे मिळते. त्याची उपपत्तीही शास्त्रात सागितली आहे पण तेवढ्याने पितरांचा उद्धार होत नाही. भगवद्भक्तीनेच त्याचा उद्धार होतो. ' पुरे एकचि पुत्रमाय पोटी । नामस्मरणें उद्धरी कुळे कोटी ॥१॥' किंवा ' तरतील कुळे दोनी उभयतां । गाता आईकता सुखरूप ॥१॥ 'तुकाम्हणे कोटी कुळें ती पुनीत । भावें गाता गीत विठोबाचे ॥१॥' असे तुकाराम महाराज म्हणतात.

**यत्र यत्र कुले चैव एको भवति वैष्णवः ।**
**कुलं तस्य तदा पापैर्युक्तं तन्मोक्षगामि वै ॥३।१।२० पद्मपुराण**

'ज्या कुळात एकही वैष्णव जन्म घेईल त्याचे कुल सर्व पातकापासून मुक्त होते.' भागवत एकादशस्कंधाच्या पांचव्या अध्यायात नवयोगेश्वर विदेह राजास सांगतात,

भावें करिता भगवद्भक्ती । सकळ पितर उद्धरती । ऋषीश्वरा नित्य तृप्ती । भगवद्भक्ति स्वनंदें ॥४६४॥ स्वानंदें भगवद्भक्ती । तेणें सर्व भूते सुखी होती । पुत्रें केल्या भगवद्भक्ती । आप्त उद्धरती मातापितरें ॥४६५॥ ए भा. ५

आपल्या पापकर्मामुळे नरकाला गेलेले जरी पितर असले तरी त्या नरकापासूनही त्या पितरांचा उद्धार हरिभक्तीने होतो असे पद्मपुराणात म्हटले आहे.

**नरकेऽपि चिरं मग्नाः पूर्वजा ये कुलद्वयें ।**
**तदैव यान्ति ते स्वर्गं यस्यार्चति सुतो हरिम् ॥**

भावार्थ रामायणात एकनाथ महाराज म्हणतात,

शरण रिगालिया श्रीरघुनाथा । कृतार्थ होय त्याची माता ।
त्याचेनि पूर्वजा होय सुखरूपता । उद्धरी समस्ता समागमें ॥ २६ ॥
भा० रा० सुं० ३५

सर्वच पुराणातून या विषयात अनेक कथा प्रसिद्ध आहेत. एखाद्या वंशात कोणी हरिभक्त जन्मला तर पितरांना किती आनंद होतो ते पद्मपुराणात सांगितले आहे.

**आस्फोटयन्ति पितरो नृत्यन्ति च पितामहा. ।**
**मद्वंशे वैष्णवो जातः सनस्त्राता भविष्यति ॥**

'पितृपितामहगण आपल्या वंशात भगवद्भक्ताचा जन्म झाला आहे हे जाणून हा आमचा आता उद्धार करील या आशेने प्रसन्न होऊन आनंदाने टाळ्या वाजवितात व नृत्य करू लागतात.'

तसेच सूत्रात 'नृत्यन्ति देवताः' असे एक वाक्य आहे. भक्ताचा अवतार झाला की स्वर्गीय देवता आनंदाने नृत्य करू लागतात. वास्तविक स्वर्गात वास्तव्य करून दिव्य सुखाचा अखंड आस्वाद घेणाऱ्या, अमृताचे प्राशन करणाऱ्या त्या देवता आहेत त्याना मृत्युलोकावर जन्म घेणाऱ्या एखाद्या भगवद्भक्ताच्या जन्माने आनंद व्हावा व त्या आनंदात त्यानी नृत्य करावे हे आश्चर्य नव्हे काय ? भागवतामध्ये श्रीकृष्ण भगवंताच्या अवतारकालाचे जे वर्णन शुकाचार्यांनी केले आहे त्यात त्या वेळी स्वर्गात दुदुभि वाजावयास लागल्या, गंधर्वसिद्धचारणविद्याधर हे अप्सरागणासह नाचू लागले, देव पुष्पवृष्टी करू लागले असे पुष्कळ वर्णन आढळते. पण भगवंताच्या अवताराप्रमाणे भक्ताच्या अवतारानेही स्वर्गीय देवांस आनंद

होतो असे नारद म्हणतात. त्याचे कारण असे असावे की भक्त जन्म घेऊन जे कर्म करतात ते सर्व लोककल्याणकारीच असते. देवाप्रमाणेच धर्मरक्षण हेच भक्ताच्या अवताराचेही प्रयोजन असते. समाजात कालाच्या ओघामुळे धर्मकर्माविषयी अज्ञान, अश्रद्धा निर्माण होते त्यामुळे देवपितृकार्ये नीट होत नाहीत, देवांना योग्य हविर्भाग मिळत नाही, कोणी यज्ञयागादि करीत नाहीत. कदाचित कोठे कोठे काही यज्ञादिक होत असलेले दिसले तरी त्यात दंभ दाक्षिण्याचा भागच अधिक असतो, त्यामुळे देवाचा भाग त्याना मिळत नाही, पितरांचा वाटाही त्यांना प्राप्त होत नाही, यामुळे ते खिन्न असतात. एखादा हरिभक्त जन्मला तो लोकात धर्मभावना जागृत करतो, त्याच्या तेजस्वितेमुळे लोक त्याच्याकडे सहज आकृष्ट होतात. त्याची धर्माचरणात श्रद्धा, रुची निर्माण होते. त्यांच्याकडून देवपितराच्या उद्देशाने यज्ञयाग– हव्यकव्यादि– कर्मे व्हावयास लागतात. त्यामुळे देवतांचा भाग त्याना यथासमय प्राप्त होतो, त्याना आनद होऊन त्या आनंदात ते नृत्य करू लागतात असे म्हटले तर वावगे होणार नाही.

किवा आणखीही एका उपपत्तीने पाहिले तर असे वाटते की जेव्हा भक्त या पृथ्वीतलावर अवतार घेतात तेव्हा त्याच्याकरिता देवालाही अवतार घ्यावा लागतो. भगवान श्रीकृष्ण अर्जुनास म्हणतात,

ते वेळी आपुल्याचेनि कैवारे । मी साकार होऊनि अवतरे । मग अज्ञानाचे आधारे । गिळूनि घाली ।। ५१ ।। अधर्माची अवधी तोडी । दोषाची लिहिली फाडी । सज्जना करवी गुढी । सुखाची उभवी ।। ५२ ।। ज्ञा० ४-५२

तसेच भक्ताच्याकरिता भगवान अवतरला म्हणजे स्वर्गीय देवाना पीडा देणाऱ्या असुराचा नाश होतो याही कारणाने देवताना आनंद होऊन त्या नृत्य करू लागतात. मृत्युलोकात धर्म नांदू लागला की स्वर्गस्थ देवतांना फार आनद होतो कारण त्याचा त्यांचा हविर्भाग त्याना योग्य रीतीने प्राप्त होतो. म्हणून त्या देवता नृत्य करू लागतात. किंवा मनुष्याच्या देहातील प्रत्येक इंद्रियांत त्या त्या इंद्रियांच्या अधिष्ठात्री देवता आहेत असे उपनिषदातून वर्णन आढळते. पंचज्ञानेंद्रियांच्या देवता दिशा, वायु, सूर्य, प्रचेते, अश्विनीकुमार, कर्मेंद्रियाच्यादेवता अग्नि, इंद्र, उपेंद्र, मित्र, प्रजापति इ०, मनबुद्धीच्या चंद्र व बृहस्पति; अहंकाराची देवता रुद्र अशा प्रसिद्ध आहेत. या देवता त्या त्या इंद्रियाच्याकडून ती ती नियत कर्मे करवितात. सर्व जीव आपल्या इंद्रियांच्याद्वारे केवल प्राकृत विषयभोगच घेतात, किंबहुना निषिद्ध विषयांचेही सेवन करतात व नरकाचे दु:ख भोगण्याचे अधिकारी बनतात. त्यामुळे त्या त्या इंद्रियाधिष्ठात्री देवतांनाही दु:ख होणे स्वाभाविक आहे. पण एखादा भगवद्भक्त निर्माण झाला व तो अंतर्बाह्य इंद्रियाद्वारे भगवत्सेवा करू लागला म्हणजे त्या भक्तीचा दिव्य व अलौकिक आनंद त्या इंद्रियाधिष्ठात्री

देवतांनाही मिळतो. प्रत्यक्ष ब्रह्मदेव श्रीकृष्णस्तुति प्रसंगी म्हणतो,

**एषां तु भाग्य महिमाच्युत तावदास्तामेकादशैव हि वयं बत भूरिभागा : ।**
**एतद् धृषीक चषकैरसकृत् पिबामः शर्वादयोऽङ्घ्र्युदजमध्वमृतासवं ते ।। ३३ ।।**

'हे अच्युता ! या व्रजवासियांच्या भाग्याचे माहात्म्य तर श्रेष्ठच आहे, ते राहू दे, पण मन आदि अकरा इंद्रियाच्या अधिष्ठात्री देवताच्या रूपाने राहणारे महादेव आदि आम्ही देवतालोकही फार भाग्यवान आहो कारण या व्रजवासी जनाचे मन आदि इंद्रियाची पात्रे बनवून त्याच्याद्वारे आम्ही अमृताहून गोड, मदिरेहूनही मादक अशा आपल्या चरणकमलाच्या मधुर मकरंदरसाचे पान करीत आहो.'

भाग० १०–१४

वास्तविक देवादिकानाही भगवद्दर्शन दुर्लभ आहे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

'जो जन्मसहस्राचियासाठी । इंद्रादिकाही महाग भेटी ।।' (ज्ञा० ६–१४६ )

किवा, 'नमे विदुः सुरगणा : प्रभवं न महर्षयः ।।' (गीता १०–२) 'माझा प्रभाव देवही जाणत नाहीत व ऋषीही जाणत नाहीत' असे श्रीकृष्णच अर्जुनास सागत आहेत. अशा स्थितीत भक्ताच्या माध्यमातूनच त्या देवताना भगवत्स्पर्शाचा यत्किंचितही का होईना आनंद भोगावयास मिळतो. कोणालाही आनद तेव्हाच होतो की जेव्हा एखादी अद्भुत वस्तु प्राप्त होते नेत्रेंद्रियानी नेहमी जड व तुच्छ वस्तूचेच दर्शन होत असते व त्या वस्तू अलौकिक रूपाने देवाना प्राप्तही असतात. पण एखादा भक्त 'आता दृष्टीपुढे ऐसाचि तू राहे । जो मी तुज पाहें वेळोवेळा।।' किवा 'रूप पहाता लोचनी । सुख झालें हो साजणी ।।' असे म्हणतो त्यावेळी त्या नेत्रेंद्रियाधिष्ठित देवालाही त्या अलौकिक दिव्य दर्शनाचा आनंद होतो. कारण 'ज्योतिषामपि तज्ज्योतिः ।' असा तो आहे. सूर्यदेवतेला वाटते की याच्या नेत्रामध्ये वास करून अनंत जन्मे याला साहाय्य केले, त्याचे फळ मला मिळाले. मलाही याच्यामुळे अपूर्व असे भगवद्दर्शन झाले. तसेच वायुदेवतेस भक्ताच्या त्वगिंद्रियद्वारे भगवत्पूजेचे सुख– स्पर्शसुख– अनुभवावयास मिळते. अग्निदेवता भक्ताच्या वाणीतून भगवन्नामोच्चरणाचा आनंद भोगतो. अशाच रीतीने या भक्ताच्या माध्यमातून आम्हाला हा भगवत्स्वरूपाचा आनंद मिळतो. म्हणुन या आनंदाने देवता नृत्य करू लागतात.

या भक्ताच्या भक्तीचे आणखीही एक महत्त्वाचे फल नारदमहर्षि सागतात– 'सनाथा चेयं भूर्भवति'– त्यांच्यामुळे ही पृथ्वी सनाथ होते. व्यवहारात एखाद्या पृथ्वीपालक राजास पृथ्वीपती म्हणण्याची प्रथा आहे. पण ती अन्वर्थक आहे असे म्हणता येणार नाही. कारण तो राजाही स्वतः जीवदशेत राहणारा, प्रारब्ध–कर्मात अडकलेला, जन्ममरणादिधर्मवान् असाच असतो. किबहुना दुसरा एखादा बलवान पुरुष निर्माण झाला तर तो त्याचे राज्य आपल्या बलाने हरण करतो व

त्यास दुर्बल बनवितो. नव्हे त्याचा नाशही करतो. पुराणातून इतिहासातून अशी शेकडो उदाहरणे सापडतात. म्हणून कोणा राजास पृथ्वीपती म्हणणे हे गौण आहे. तो स्वत:च अनाथ असतो तर पृथ्वीला काय सनाथ करील ? तसेच या पृथ्वीवर जेव्हा तमोगुण प्रधान असणारे पापी, असुर, नास्तिक असे लोक निर्माण होऊन सज्जनाना अत्यंत पीडा देतात, त्यांचे सर्वस्व हरण करतात, पृथ्वीतून निर्माण होणाऱ्या धनधान्याचा दीन जनाकरिता उपयोग न करता केवल स्वत:च्या व्यक्तिगत सुखोपभोगातच त्याचा विनियोग करतात, त्यावेळी या भूमीला त्यांचे ओझे होते. हीच गोष्ट भागवत दशम स्कधाच्या आरंभी शुकाचार्यांनी सांगितली आहे.

**भूमिर्दृप्तनृपव्याजदैत्यानीकशतायुतैः ।**
**आक्रांता भूरिभारेण ब्रह्माणं शरणं ययौ ।।** भाग. १०-१-१७

'श्रीकृष्णावतारापूर्वी, लक्षावधि दैत्यदलानी गर्वोद्धत राजांची रूपे धारण करून आपल्या भाराने पृथ्वीला आक्रांत केले होते, त्या भारापासून सुटका व्हावी म्हणून ती ब्रह्मदेवास शरण गेली.'

श्रीनामदेव महाराज याचा अनुवाद करतात, 'पापी जे अभक्त दैत्य जे मातले । धरणीसी झाले ओझे त्यांचे ।। राहियले यज्ञ मोडिले कीर्तन। पळाले ब्राह्मण दैत्याभेण ।। दिधलासे त्रास ऋषि मुनी सर्वा। न पूजिती देवा कोणी एक ।।' या भूमीवर अखंड यज्ञयाग, धर्माचरण, नीतियुक्त वर्तन, भगवद्भक्ती व ज्ञानाचा प्रचार होऊन सर्वभूतामध्ये पूर्ण समतोल असेल, तरच ती व तिच्यावर नांदणारे प्राणी सुखी समाधानी असतात, पण वरीलप्रमाणे दुष्टदुर्जन हा समतोल राहू देत नाहीत तेव्हा तिला त्याचे ओझे होते व ती दुःखी अतएव स्वत:स अनाथ समजू लागते.

भूमिही एक देवता विशेषच आहे. किंबहुना 'भूदेवी' ही भगवंताची पत्नी आहे. तो 'विश्वश्रियेचा भर्ता' आहे. ती अनाथ कशी राहील ? भूमी ही कधी स्वामिहीन राहिली आहे काय ? एक पौराणिक आख्यायिका अशी आहे, की भगवंताच्या अनेक स्त्रिया आहेत. भगवान जेव्हा वैकुंठात असतात तेव्हा तेथे श्रीदेवी लक्ष्मीचे प्राधान्य असते. तेथे भूदेवी गौण होऊन राहते. भगवान तेथे रमादेवीच्या आधीन होऊन असतात. ती रमादेवी भगवच्चरणदेखील आपल्या अंकावर घेऊन बसलेली आहे. म्हणून भूदेवी वियोगाकुल असते. जेव्हा अनन्यभक्त या पृथ्वीवर अवतार धारण करतात तेव्हा भगवानही त्यांच्या हृदयात व्यक्तरूपाने राहतो. इतकेच नव्हे तर त्यांच्या रक्षणाकरिता सगुणसाकार रूपधारण करून अवताराला येतो व दुष्टांचा नाश करून त्यांचा झालेला धराभार उतरवतो. तसेच याच भूमीवर भक्तांसह अनेक लीला करतो. त्या वेळी या भूदेवीला धन्यता वाटते, आपण आता पूर्ण सनाथ झालो आह्मो असे वाटते.

तात्पर्य, भक्तांसाठी अवतरलेल्या भगवंतामुळे असो किंवा स्वतः भक्त आपल्या मनातील शुद्ध भक्तिप्रभावाने असो निराधार झालेल्या या जगाला मोठा आधार होतात. ते जगाचे पाप आणि दुःख दूर करून सर्वत्र आनंदाचे साम्राज्य निर्माण करतात. ज्ञानदेवांनी त्यांच्या कार्याचे वर्णन केले आहे,

ऐसे माझेनि नामघोषें। नाहीचि करिती विश्वाची दुःखें।
अवघे जगचि महासुखें। दुमदुमित भरले ।। ज्ञा. ९.२००

म्हणून पितर, देवता आणि पृथ्वी या सर्वांनाच अत्यंत आनंद व कृतकृत्यता वाटते !

## सूत्र ७२

## नास्ति तेषु जातिविद्यारूपकुलधनक्रियादिभेदः ।।७२।।

**अर्थ** :

त्यांचे (भक्तांचे) ठिकाणी जाती; विद्या, रूप, कुल, धन आणि क्रियादिकांचा भेद नाही.

**विवरण** :

मागील सूत्रात ज्या भक्तांचे उत्कृष्ट प्रकारे वर्णन केले व त्यांचे सामर्थ्य किती श्रेष्ठ आहे हे सांगितले त्यांच्या श्रेष्ठत्वाचे आणखी एका महत्त्वाच्या लक्षणाने या सूत्रात वर्णन श्रीनारदमहर्षि करतात. व्यवहारात जाति. विद्या, रूप, कुल, धन, क्रिया इत्यादि कारणाने मानवा मानवामध्ये भेद निर्माण होतो म्हणजे उच्चनीच भाव ठरविला जातो. त्याची काही कारणेही असू शकतात. काही अधिकार विशिष्ट जातीनाच शास्त्रानी दिले आहेत. काही कर्मे विद्यावानच करू शकतो. काही व्यवहारात कुल पाहिले जाते. उदाहरणार्थ, आपली कन्या दुसऱ्यास देताना त्याचे कुळ प्रथम पाहण्याची जुनी पद्धती होती. तर कोठे धनाचा विचार केला जातो. हा श्रीमंत हा दरिद्री असा भेद पाहिला जातो. कोठे व्यक्तीची क्रिया पाहून भेद केला जातो. तेथे त्या क्रियेत कुशल-अकुशल, समर्थ-असमर्थ, सशक्त-अशक्त, असा भेद केला जातो. व्यवहारात भेद निर्माण करणारी आणखीही अनेक कारणे आहेत, त्यांचा समावेश ‘आदि’ शब्दाने केला आहे. व्यवहारात हे भेद सर्वत्र दिसून येतात, एवढेच नव्हे तर या प्रकारच्या भेदासच व्यवहार असे म्हटले जाते. या भेदव्यवहारामुळेच मानवामध्ये परस्पर उच्चनीचभाव, अहंकार, श्रेष्ठ-कनिष्ठभाव, द्वेष, मत्सर, भय इ. विकार निर्माण

होत असतात व जीवनात अशाती निर्माण होते. अतएव भक्ताच्या ठिकाणी हे भेद नसतात. सूत्रकार नारदांचा हा आशय आहे की भक्तीमध्ये जाती, कुल, रूप, धन, क्रिया, हा भेद नाही, म्हणजे भक्त कोणत्याही जातीत जन्मला तरी तो भक्ती करू शकतो. यज्ञयागादिकाना जसा विशिष्ट जाती, वर्ण, आश्रम, असा अधिकार लागतो तसा येथे लागत नाही. भगवान श्रीकृष्ण सागतात,

**मांहि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु॰ पापयोनयः ।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राः तेऽपि यांति परां गतिम् ॥** गीता ९–३२

'हे पार्था ! माझा आश्रय केल्यावर स्त्रिया, वैश्य, शूद्र, त्याचप्रमाणे ज्यांचा जन्म पापयोनीत झाला असे हे सर्व उत्कृष्ट गतीला पावतात.'

या श्लोकावरील आपल्या विस्तृत टीकेमध्ये श्री ज्ञानेश्वर महाराज सागतात. म्हणोनि कुळ उत्तम नोहावें । जाती अंत्यजही व्हावें । वरि देहाचेनि नांवें ।' पशूचेही लाभो ॥ ४३७ ॥ पाहे पा सावजें हातिरू धरिलें । तेणें तियां काकुळती मातें स्मरिलें । तयाचें पशुत्व वावो झालें । पावलिया मातें ॥ ४३८ ॥ अगा नांवें घेतां वोखटी । जे आघवियां अधमांचे शेवटी । तियें पापयोनीही किरीटी । जन्मले जे ॥ ४३९ ॥ ते पापयोनी मूढ । मूर्ख जैसे दगड । परि माझाठायी दृढ । सर्वभावे ॥ ४४० ॥ ते पापयोनीही होतु कां । श्रुताधीतही न होतु का । परि मजसी तुकितां तुका । तुटी नाही ॥ ४४५ ॥ पाहे पा भक्तीचेनि आथिलेपणें । दैत्यी देवां आणिलें उणे । माझें नृसिहत्व लेणें । जयाचिये महिमे ॥ ४४६ ॥ येऱ्हवी दैत्यकुळ साचो-कारें । परि इंद्रही सरी न लाहे उपरें । म्हणौनि भक्ति गा एथ सरे । जाति अप्रमाण ॥ ४४७ ॥

यापुढे दृष्टांताने ते सांगतात, की राजाज्ञेची अक्षरे एखाद्या चामड्यावर जरी उमटविलेली असली तरी त्या चामड्याचे मोबदल्यात बाजारातील सर्व वस्तू प्राप्त होतात. त्याच्यापुढे सोन्या-रुप्याला ही प्रामाण्य नाही. कारण राजाज्ञा ही समर्थ, श्रेष्ठ आहे. ते चामडे जर प्राप्त झाले तर सर्व प्राप्त होते. त्याप्रमाणे जाति-वर्णादिकांचे उत्तमत्व तेव्हांच सरते होते, विद्येने प्राप्त होणारी सर्वज्ञताही मान्यतेला येते; की जेव्हा मन बुद्धी भगवत्प्रेमाने भारली जाते. 'म्हणोनि कुळ, जाती वर्ण । हे आघवेचि गा अकारण । एथ अर्जुना माझेंपण । सार्थक एक ॥ ४५२ ॥' ज्ञा. ९. जो पावेतों गंगेत मिसळले नाहीत तो पावेतो लहानमोठे वहाळवोहोळ ही भाषा असते. गंगेत मिसळल्यानंतर ते सर्व गंगारूप होऊन जातात. तसेच खैर, चंदन, बोरी, बाभूळ इ. काष्ठे भिन्न भिन्न आहेत, त्यांचे मूल्य ही न्यून अधिक असते, पण जोपावेतो ती सर्व अग्नीने भस्मसात केली नाहीत तोपावेतोच. त्याप्रमाणे भगवान श्रीकृष्ण म्हणतात 'तैसे क्षत्रियवैश्यस्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इयां । जाती तंवचि वेगळाल्या । जंव न पवती मातें ॥ ४५६ ॥ मग जाती व्यक्ती पडे बिंदुलें । जेव्हां

भावें होती मज मीनले । जैसें लवणकण घातले । सागरामाजीं ।। ४५७ ।।' ज्ञा. ९

श्रीमद्भागवत एकादश स्कंधाच्या चौदाव्या अध्यायात भगवान् श्रीकृष्ण भक्तीचे महात्म्य उद्धवास सागताना म्हणतात

**भक्त्याहमेकया ग्राह्यः श्रद्धयाऽऽत्मा प्रियः सताम् ।**
**भक्तिः पुनाति मन्निष्ठा श्वपाकानपि सम्भवात् ।।** भागवत, ११।१४।२१

'संताना अत्यंत प्रिय असा त्यांचा आत्माच मी आहे. श्रद्धेने केलेल्या केवळ भक्तीनेच मी वश होतो. माझ्या ठिकाणी केली गेलेली ऐकान्तिक भक्ती एखादा चांडाळ जरी असला (श्वपाक म्हणजे मृत कुत्र्याचे मांस शिजऊन खाणाऱ्यास म्हणतात,) तरी त्यालाही ती पुनीत करते. याचाच अर्थ भक्ती ही जाती पाहत नाही. भक्ताग्रणी प्रल्हादाने तर या विषयात स्पष्ट उद्गार काढले आहेत

**विप्राद्विषड्गुणयुतादरविंदनाभपादारविंदरविमुखात् श्वपचं वरिष्ठम् ।।**
**मन्ये तदर्पित मनोवचने हितार्थ प्राणं पुनाति सकुलं न तु भूरिमानः ।।१०।।**
भागवत, ७-९

प्रल्हाद म्हणतो, 'ज्या ब्राह्मणाचे ठिकाणी दान, तप, वेदाध्ययन, जप, शम, मौन, एकान्तवास, शौच, सत्य, अहिंसा आणि नियम पालन इत्यादी बारा गुण तर आहेत पण तो जर भगवच्चरणारविंद भक्तीपासून विमुख असेल तर त्या ब्राह्मणापेक्षा भगवद्भक्ती करणारा चांडाळ श्रेष्ठ आहे असे मी मानतो. कारण ज्याने आपली वाणी, मन, प्राण भगवंताला समर्पण केले आहेत तो आपल्या कुलालाही पवित्र करतो, पण स्वतःला फार विद्वान तपस्वी, दानी समजणारा अहंकारी ब्राह्मण स्वतःसही पवित्र करू शकत नाही.'

याच श्लोकाचा अनुवाद श्री एकनाथ महाराज भागवत एकादशस्कंधावरील टीकेच्या चौदाव्या अध्यायात भक्तीमाहात्म्य सांगताना करीत आहेत.

**विप्रात् द्विषड्गुणयुता । ये श्लोकींची हेचि कथा ।**
**जळो त्या द्विजाची पवित्रता । जो माझ्या भजनपथा विमुख ।।२९२।।**
**त्याहूनि श्वपच गा वरिष्ठ । जो माझ्या भजनी भजननिष्ठ ।**
**त्यातें वंदितीं पुराणश्रेष्ठ । कविवरिष्ठ महाकवी ।।२९३।।**
ए. भा. १४

तसेच भागवत तृतीय स्कंधात श्रीशुकाचार्यही देवहूतीच्या मुखाने हीच गोष्ट स्पष्टपणे सांगत आहेत.

**अहो बत श्वपचोऽतो गरियान् यज्जिव्हाग्रेंवर्तते नाम तुभ्यम्**
**तेपुस्तपस्ते जुहवु : सस्नुरार्या ब्रह्मानूचुर्नाम गृणन्तियेंतें ।।** ३।३३।७

'हे भगवन्, तो चांडालही श्रेष्ठ आहे की ज्याच्या जिव्हेवर अखंड तुमचे

नाम राहते. कारण जे तुमच्या नामाचे उच्चारण करतात त्यांनी तप, हवन, तीर्थ-स्नान, सदाचारपालन, वेदाध्ययन सर्वच केले असा अधिकार त्यांना प्राप्त होतो.'

भगवान श्रीकृष्ण भक्तवर्य उद्धवास विस्तारपूर्वक ही गोष्ट सांगत आहेत,

सांडोनि दांभिक लौकिक । माझ्या भजनी भावार्थे चोख । तो ज्ञाती जरी झाला श्वपाक । तरी अवश्यक मज पूज्य ॥ २८९ ॥ केवळ जी अपवित्रे । रिसें आणि वानरें । म्या पूजिली गौळयांची पोरें । ताकपिरे रानटें ॥२९०॥ जो जातीने नीचत्वा गेला । परि भक्तीभावे उंचावला । तो मद्रूपता पावला । पूज्य झाला तिही लोकी ॥ २९१ ॥ विदुर दासीपुत्र तत्त्वतां । भावें पढिया भगवंता । भावो प्रमाण भगवंता । जात्यभिमानता सरेना ॥ २९४ ॥ मज पावावया साचोकारें । भावो सरे जाती न सरे । यालागी अवघ्याचे धुरे । म्यां वनचरें उद्धरिला ॥२९५॥ पक्ष्यामाजी केवळ निंद्य । जटायु उद्धरिला म्या गीधू । अंत्यज उद्धरिला धर्मव्याधू । भावशुद्ध मदर्थी ॥२९६॥ भलता हो भलते जाती । ज्यासी माझी भावार्थे भक्ती । तोचि जाण पां पवित्र मूर्ती । माझी प्राप्ती मद्भजने ॥ २९७ ॥ ए. भा. १४

या विषयात तुकाराम महाराजांचा एक अभंग फार महत्त्वाचा आहे तो खाली देत आहो.

पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथे हरिचे दास जन्म घेती ॥१॥
कर्मधर्म त्याचा झाला नारायण । त्यांचेनी पावन तीन्ही लोक ॥२॥
वर्णअभिमाने कोण झाले पावन । ऐसे द्या सांगून मजपाशी ॥३॥
अंत्यजादि योनी तरल्या हरिभजने । तयाची पुराणे भाट झाली ॥४॥
वैश्य तुलाधार गोरा तो कुंभार । धागा हा चांभार रोहिदास ॥५॥
कबीर मोमीन लतीफ मुसलमान । सेना न्हावी जाण विष्णुदास ॥६॥
कान्होपात्रा खोदु पिंजारी तो दादु । भजनी अभेदु हरीचे पायी ॥७॥
चोखा मेळा बंका जातीचे महार । त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी ॥८॥
नामयाची जनी कोण तिचा भाव । जेवी पंढरिराव तिजसवे ॥९॥
मैराळ जनक कोण कुळ त्याचे । महिमान तयाचे काय सांगो ॥१०॥
यातायातीधम नाही विष्णुदासा । निर्णय तो ऐसा वेदशास्त्री ॥११॥
तुका म्हणे तुम्ही विचारावे ग्रंथ । तारिले पतित नेणो किती ॥१२॥

स्वतः नारदऋषीही पूर्व अवतारात दासीपुत्रच होते ना ?

भक्तीमध्ये जातिभेद न मानण्याचे कारण भागवत एकादशस्कंधात नवयोगेश्वर जनक संवाद प्रसंगी सांगितले आहे.

जरी जाहला उत्तमवर्ण । परी तो न म्हणे मी 'ब्राह्मण'। स्फटिक कुंकुमे दिसे रक्तवर्ण । मी लोहिवा पूर्ण स्फटिक न म्हणे ॥७११॥ ज्यासी नाही देहाभिमान । तो हाती न धरी देहाचा वर्ण । तैसाचि आश्रमाभिमान । भक्त सज्ञान न धरी कदा ॥७१२॥ जाति उंच नीच असंख्य । परी तो न म्हणे माझीचि एक ।

जेवीं गंगातीरी गांव अनेक । परी गंगा माझा एक गांव न म्हणे ।।७१५।। तेवीं जन्मकर्मवर्णाश्रमजाती । पूर्ण भक्त हाती न धरिती । चहूं देहाची अहंकृती । स्वप्नीही न धरिती हरिभक्त ।।७१६।। तरी काय वर्णाश्रम जाती । भक्त निःशेष सांडिती । त्यात असोनि अहंकृती । ते हे उपपत्ति बोलिलो राया ।।७१७।। ए. भा. २

जसा जातिधर्मामुळे भक्तामध्ये भेद निर्माण होत नाही तसाच विद्येमुळेही पडत नाही व्यवहारात विद्वत्तेमुळे मानवामानवात भेद निर्माण झालेला दिसून येतो, म्हणजे विद्यावानाचा आदर सन्मान केला जातो, त्याचा राजेमहाराजेही आदर करतात त्यामुळे बहुजनसमाजापासून तो श्रेष्ठ म्हणून वेगळा पडतो. त्यालाही आपल्या विद्वत्तेचा एकप्रकारचा गर्व, मद, दर्प निर्माण होतो. श्री ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, 'आणि येणेंही न सरे । लांकण लागे दुसरें । जें विद्वत्तेचें संचरें । भूत अगी ।।' (ज्ञा. १४–१५१) ही विद्या, हे पांडित्य भक्तामध्ये भेद निर्माण करू शकत नाही. किंबहुना ही विद्या अभिमानद्वारा भक्तिमार्गास विरोधक होते. ही विद्या त्या विद्वानाच्या अंतःकरणात भक्तिप्रेमाचा जिव्हाळा निर्माण करू शकत नाही. किंबहुना जी विद्या जीवास देवापासून दूर करणारी आहे तिला विद्याही म्हणता येत नाही. अनेक विद्वान भक्तही होऊन गेले पण त्याना विद्येचा गर्व नव्हता त्यानी आपल्या विद्वत्तेचा अभिमान टाकला होता. श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात, 'म्हणौनि थोरपण पऱ्हा सांडिजे । एथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे । जैं जगा धाकुटे होईजे । तैं जवळीक माझी ।।' (ज्ञा ९–३७४). गजेंद्र, शबरी, गोकुळातील गोपाळ इ. अनेक भक्तांचे ठिकाणी कोणती विद्या होती ? साराश भक्तामध्ये विद्वान व अविद्वान असा भेद पडत नाही.

तसेच रूपानेही भक्तिमध्ये भेद पडत नाही, रूपवान भक्त श्रेष्ठ, कुरूप कनिष्ठ असे मानले जात नाही. रूप, जाती, विद्या, इत्यादिक ही जीवनाची बाह्यांगे आहेत. बाह्यागावर लुब्ध होणारा बहिर्मुख जीवच रूप, विद्या, जाती इत्यादिकांचा विचार करीत असतो. पण परमात्मा असा बहिरंगावर भुलणारा नाही. 'अंतरीची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ।।' तु,

आपल्यापुढे जे रूप आहे तो एक भौतिक विषयाचा गुण आहे. तो जड सामान्य आहे भक्त ही त्या रूपाला महत्त्व देत नाही. शुकाचार्यापुढे स्वर्गातील अप्सरा रभा आली होती पण त्यांनी तिच्याकडे बघितले नाही. (नाना रंभेचेनिरूपे । शुकी नुठिजेचि कंदर्पे ।।ज्ञा. १६।।) ज्या नेत्रानी अलौकिक दिव्य मनोहर देवदुर्लभ असे रूप पाहिले व डोळ्यात साठविले ते डोळे अन्य रूपावर कसे भाळतील ? भगवंताचे रूप कोटिकंदर्पदर्पहर असे आहे. तें अलौकिक आहे. एवढी क्षीरसागरातून निघालेली परमसुंदरी महालक्ष्मीही त्याच्या स्वरूपावर भाळली. मग भक्ताच्या अतःकरणात अन्य रूपाला प्रवेश होईलच कसा ? तात्पर्य भक्तही रूपाला महत्त्व

देत नाही व भगवानही अशा जड अनित्य रूपाला भुलणे शक्य नाही. शबरी एक भिल्लिणी होती. मथुरेतील कुब्जा काय रूपवान होती ? श्रीकृष्ण उद्धवास सागतात, ' कुब्जा ती ठायी वाकुडी । नीट निजभावे चोखडी । तिच्या चदनाची शुद्ध गोडी । अति आवडी मज लागी ।।९३।। ' (ए. भा १२) आणखी एका ठिकाणी श्रीकृष्ण म्हणतात, ' कुब्जा काय सुदर होती । तिच्या प्रेमाची मज प्रीती । राधा प्रार्थी मी वनाप्रती । काय विषयासक्ती लागूनी ।।' (ए. भा. २४–३८०) म्हणून भक्तामध्ये रूपादिकामुळेही भेद पडत नाही.

तसेच कुलाच्या श्रेष्ठत्वामुळेही भक्तामध्ये भेद पडत नाही. व्यवहारामध्ये कुळाला महत्त्व दिले जाते. सकुलीन अकुलीन असे भेद पाडले जातात. कुलाची काही विशिष्ट सदाचार परंपरा असते. काही आचार विशेष अंगी बाणलेले असतात. एखाद्या कुळात शौर्य, एखाद्यात दातृत्व, एखाद्या कुळात विद्वत्ता, सदाचार असे कुलविशेष मानले जातात. या कुलविशेषामुळे लौकिक व्यवहारात भेद पाडले जातात. पण भक्तामध्ये कुलविशेषाने भेद पडत नाही. कुलाचा संबंध जन्माशी व जन्माचा संबंध या स्थूल देहाशी असतो. भक्त या देहाशीच तादात्म्य ठेवीत नाही तर जातिकुलाशी त्याचे तादात्म्य कसे राहील ? तसेच परमात्माही भक्ताच्या जातिकुळाकडे पाहून त्यावर कृपा करीत नाही. तो केवळ भक्तिप्रेम पाहणारा आहे. या विषयात श्रीकृष्णानी अर्जुनाजवळ काढलेले उद्गार स्पष्ट आहेत.

**अगा कुळाचिया चोखटपणा न लगा । अभिजात्य झणी श्लाघा । व्युत्पत्तीचा वाउगा । सोस का वहावा ।।४२७।। कां रूप वयसा माजा । आथिलेपणें कां गाजा एक भाव नाहीं माझा । तरी पाल्हाळ ते ।।४२८।। कणेंवीण सोपटे । कणसे लागलीं घनदाटे । काय कराल गोमटे । वोस नगर ।।४२९।। ना तरी सरोवर आटले। रानीं दुखिया दु:खी भेटले । कां वांझ फुली फुलले । झाड जैसे ।।४३०।। तैसे सकळ तें वैभव । कुळ जाति गौरव । जैसे शरीर आहे सावेव । परी जीवचि नाहीं ।।४३१।। तैसें माझिये भक्तिविण । जळो ते जियालेंपण । अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ।।४४२।।** ज्ञा ९

कुल शब्दाचा अर्थ पाहिल्यास ' कौ लीयते इति कुलम् '– ' कु ' म्हणजे पृथ्वी, तिच्यात शेवटी जे लीन होऊन जाते ते कुल, असा होतो. आजपावेतो कोणते कुळ लीन झाल्याविना राहिले आहे काय ? ज्याच्यापासून सर्व कुलांचा उगम झाला व ज्याच्या ठिकाणी कुले लीन होतात, त्या परमात्म्याच्या ठिकाणी भक्त प्रेम ठेवतो. म्हणून त्याची दृष्टी कुलावर जात नाही. तो कुलाचा विचारही करीत नाही. तसेच कुलाभिमान घेतला की कुलधर्म, कुलदेवता, कुलाचार सांभाळणे इत्यादि उपाधि मागे लागतात. त्याचा अभिमान निर्माण होतो तो भगद्भक्तीत प्रतिबंधक होतो. खरा भक्त आपली कुलदेवता कुलधर्म कुलाचार सर्व एकमेव

भगवानच आहे असे समजतो. म्हणून त्याच्या भक्तीमध्ये कुलाने कुलधर्माने वा कुलदेवतेने भेद पडत नाही.

तसेच धन ही व्यवहारात भेद उत्पन्न करणारे आहे. संसारात तर धनवंतालाच मान मिळत असतो. 'धनवंता लागी । सर्व मान्यता हे जगी ॥' हा तुकाराम महाराजांचा सर्व अभंग प्रसिद्ध आहे. बहुतेक मानव अर्थकामपरायणच असलेले दिसून यतात. परंतु ते धन सर्वांनाच प्राप्त होते असे नाही. कारण ते अदृष्टाधीन आहे. 'प्रारब्धेचि जोडे धन ।' (तु.) धन प्राप्तीचे अदृष्ट सर्वांना अनुकूल असतेच असे नाही. यदाकदाचित अदृष्ट व शांत धन प्राप्त झाले तरी ते अत्यंत अनर्थावह आहे. धन शब्दाचा 'ध धैर्य नाशयति इति धनं' असा अर्थ होतो. म्हणजे पारमार्थिक धैर्याचा नाश करणारे म्हणून धन असे म्हणतात. श्री एकनाथमहाराज म्हणतात, 'जो धनमाजी आणि स्त्रीजितू। त्यासी विमुख होय हृदयस्थू॥ त्याते सद्गुरुही उपेक्षितू । परम अनर्थू अविश्वासे ॥ '(ए.भा. २३–३०७).

लौकिक व्यवहारात धनाला महत्त्व आहे धार्मिक व्यवहारातही धनाला महत्त्व आहे कारण धनानेच यज्ञ, याग, दान इत्यादी घडतात. सामान्याच्या दृष्टीने त्यामुळे धनवान आणि धनहीन यांच्यामध्ये भेद पडतो. पण भक्तांच्या दृष्टीने धनालाच महत्त्व नसल्यामुळे धन असले काय किवा नसले काय त्यांच्या दृष्टीने ते सारखेच आहे. भगवद्भक्तीच्या आनंदापुढे क्षुद्र तुच्छ व विकारी अनर्थमूल धनाचे काय मूल्य आहे ? 'द्रव्य जीवाहूनी आवडे या जना । आम्हासी वमनाहूनि नीच ॥ तु० ॥' धन हे साधन आहे व भोग हे त्या धनाचे साध्य आहे. पण भक्तांची ऐहिक, पारत्रिक भोगाविषयी पूर्ण अनित्य व दुःख बुद्धी असल्याने त्याच्या जीवनात धनाला स्थान नसते. भक्त श्रेष्ठ तुलसीदासानी म्हटले आहे,

तीन टूक कौपीन मे अरु भाजी बिन लोन ।
तुलसी रघुवर उर बसे इंद्र बापुरो कोन ? ॥

'शरीराची लाज राखण्याकरिता तीन तुकडे जोडून केलेली लंगोटी व खाण्यास मीठही नाही अशी कोणत्या तरी झाडपाल्याची भाजी अशी आमची सांसारिक स्थिती असताही जर आमचे हृदयात रघुवर प्रभुरामचंद्र नांदत आहे तर आमच्यापुढे इंद्र बापडा कोण ? 'सुंभाचा कडदोरा रकट्याची लंगोटी' ही नामदेवरायाची अथवा 'झाडे वोरपोनी खाऊनिया पाला' ही तुकाराममहाराजांची उक्ती हेच पटवून देत नाही काय ?

या नंतर सूत्रात 'क्रियादि' हे पद आले आहे त्याचा विचार करू. मनुष्याच्या जीवनात क्रियेला महत्त्वाचे स्थान आहे. जो पावेतो देह आहे तो पावेतो क्रिया असणार. शरीरधारी पुरुषाकडून सर्व कर्माचा त्याग होणे शक्य नाही असे गीतेमध्य

स्पष्ट म्हटले आहे. क्रियेमध्ये दोन भेद : साधारण व असाधारण. देहेंद्रिय निर्वाहाकरिता सर्वाकडून होणाऱ्या क्रिया या साधारण म्हटल्या जातात. त्या विशेष भेद पाडणाऱ्या नसतात. त्या भक्तअभक्ताच्या समानच असतात. असाधारण क्रिया, ज्यांना देह निर्वाहापेक्षा ऐहिक अथवा पारत्रिक असे अधिक फल प्राप्त होणे शक्य असते, त्या भेद निर्माण करणाऱ्या असतात. उदाहरणार्थ, ब्राह्मण यज्ञयागादि, तपअनुष्ठानादि करीत असेल तर त्याला विशेष महत्त्व प्राप्त होते. क्षत्रिय युद्धात निष्णात असेल, दातृत्वधर्मनियुक्त असेल, राजा असून राजधर्माचे योग्य पालन करीत असेल तर तो श्रेष्ठ समजला जातो. वैश्य कृषिगोरक्षवाणिज्यादि विशेष कर्मात निष्णात असेल तर त्याला महत्त्व आहे, किंवा एखादा एखाद्या कलेत म्हणजे चित्रकला, गायनकला, वादनकला, नृत्यकला, वास्तुनिर्माणकला इत्यादिकात निष्णात असेल तर त्याला विशेष क्रियावान समजले जाते. तात्पर्य, ती क्रिया मानवामानवात भेद निर्माण करते म्हणजे श्रेष्ठ कनिष्ठ भाव उत्पन्न करीत असते. आपल्या या विशेषक्रियाच्याद्वारा एखादा स्वर्ग मिळवू शकेल, तर एखादा राज्य मिळवील, तसेच काही क्रिया ऐहिक धन, मान, ऐश्वर्य, कीर्ती, मिळवून देऊ शकतील. असा पुरुष आपणास इतरापेक्षा श्रेष्ठही समजत असतो यातूनच अहंकार दर्प दंभ कामक्रोध लोभादि अनेक विकाराचा उद्भव होतो असा विशेष क्रियावान पुरुष इतराना आपल्यापुढे तुच्छ समजत असतो. पुराणातून अशाच लोकानी ऋषिमुनीचा साधुसंताचा अपमान केलेली अनेक उदाहरणे आढळतात. कुबेरपुत्रांनी नारदऋषीचा, इंद्राने दुर्वासऋषीचा अपमान केला अशा कथा भागवतात आहेत म्हणजे क्रियेत भेद पडल्याने माणसात भेद पडतो. ससारात तर व्यक्तिव्यक्तिगत क्रियेत भेद पडत असलेला दिसतो. त्याची कारणेही अनेक आहेत गुण, संस्कार, पूर्वकर्म, संगती, इत्यादि इत्यादि पण सूत्रकार नारद म्हणतात भक्तामध्ये क्रियादिकांमुळे भेद पडत नाही म्हणजे त्याने अमुक कर्म केले तरच तो श्रेष्ठ भक्त नसता कनिष्ठ असा भेद मानला जात नाही. केवळ त्याच्या ठिकाणी अनन्यभक्ती असली म्हणजे त्यात सर्व धर्मकर्माचा अंतर्भाव होतो. श्रीकृष्ण भगवान म्हणतात,

**अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितोहि सः ।।** गीता ९. ३०

'पूर्वी तो अत्यंत दुराचरणी असला तरी तो जर अनन्य होऊन माझी भक्ती करील तर तो साधूच ( योग्यच ) मानला पाहिजे, कारण, त्याचा योग्य निश्चय झाला आहे.'

या श्लोकावरील टीकेत श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, 'आणि आचरण पहाता सुभटा । तो दुष्कृताचा कीर सेलवाटा । परी जीवित वेचिले चोहटा । भक्ती-

चिया की ।। ४१२ ।। तो आधी जरी दुराचारी । तरी सर्वोत्तमचि अवधारी । जैसा वुडाला महापुरी । न मरत निघाला ।। ४१३ ।।' ज्ञा० ९. इतकेच नव्हे तर भक्तिहीन पुरुष कितीही पुण्यकर्मे करील तरी ती व्यर्थ होतात. भगवान श्रीकृष्ण सागतात, 'पै हिवराची दाट साऊली । सज्जनी जैसी वाळिली । तेसी पुण्ये डावलोनि गेली । अभक्ताते ।। ४३३ ।। निब निबोळिया मोडोनि आला । तरी तो काऊळियासीचि सुकाळ झाला । तैसा भक्तिहीन वाढिन्नला । दोषाचि लागी ।। ४३४ ।।' ज्ञा० ९ इतकेच नव्हे ज्याना शास्त्रोक्त कर्मात अधिकारही नाही असे किती तरी जीव अनन्यभक्तीने भगवद्भावाला प्राप्त झाले स्वत श्रीकृष्ण त्याची नावे सागतात,

**सुग्रीवो हनुमान् ऋक्षो गजो गृध्रो वणिक्पथ ।।**
**व्याध· कुब्जा व्रजे गोप्यो यज्ञपत्न्यस्तथाऽपरे ।। ६ ।।**
**ते नाधीत श्रुतिगणा नोपासीत महत्तमा: ।**
**अव्रतातप्त तपस: सत्संगान्मामुपागता: ।। ७ ।।**
**केवलेनहि भावेन गोप्यो गावो नगा मृगा ।**
**येऽन्ये मूढधियो नागा: सिद्धामामीयुरञ्जसा ।। ८ ।।**

श्रीकृष्ण सागतात, 'उद्धवा ! सुग्रीव, हनुमान, जाबवंत, गजेद्र, जटायु, तुलाधार वैश्य, व्याध, कुब्जा, गोपी, यज्ञपत्न्या तसेच इतर अनेक उद्धरून गेले. वर सागितलेल्यानी वेदाचे अध्ययन केले नव्हते, श्रेष्ठाची सेवाही केली नव्हती, कोणते व्रत, तपश्चर्याही केली नव्हती, केवळ प्रेमभावनेने गोपी, गाई, वृक्ष, पक्षी दुसरे मूढबुद्धि नागादि सहजरीतीने माझ्या स्वरूपाला प्राप्त झाले '

या श्लोकावरील श्रीएकनाथमहाराजाची विस्तृत टीका मुळात पाहणे योग्य आहे भागवत एकादशस्कध अध्याय दोन मध्ये नवयोगेश्वर भक्तिमाहात्म्य सागताना स्पष्ट म्हणतात, 'जो श्रुतिस्मृति नेणता । भावे भजे भगवत्पथा । त्यासी विधिनिषेधबाधकता । स्वप्नीही सर्वथा प्रमादु न घडे ।। ३३० ।। सद्भावेसी सप्रेम । आचारिता भागवत धर्म । बाधू न शके कर्माकर्म । भावे पुरुषोत्तम सतुष्ट सदा ।। ३३१ ।।' ए० भा० २

एवढा विस्तार करण्याचे कारण कोणत्याही कर्माने भक्ताच्या भक्तीत भेद पडत नाही. किबहुना भक्ती नसेल तर कोणताही कर्मधर्म अधर्म होतो भगवान श्रीकृष्णच सागतात, 'माझे भक्तीवीण कर्मधर्म ।। जाण पा तो केवळ भ्रम । चुकले मत्प्राप्तीचे वर्म । तो धर्म अधर्म परिणामे ।। २९९ ।।' ए. भा. १४ भक्तीच्या आचरणातही काही क्रिया श्रवण, कीर्तन, पूजा, सेवा या रूपाने घडत असतात. पण त्याचा समावेश क्रियेत न होता भक्तीत होतो. भक्तीविना होणाऱ्या कोणत्याही कितीही मोठ्या क्रिया झाल्या तरी त्या क्रियेमुळे भक्ताच्या भक्तीत भेद पडत नाही. भेद पडणे म्हणजे काही विशेष गुण वा महत्त्व निर्माण होणे.

भक्ती ही सर्वकर्मफलस्वरूपा आहे असे मागे सांगितले आहे. तसेच भक्तीही सर्व श्रेष्ठ गुणाची खाण आहे. भक्तीचे महत्त्व भगवंताजवळ सर्वांपेक्षा अधिक आहे. अतएव भक्तीपेक्षा अधिक कोणतीही क्रिया नसल्यामुळे अन्य कोणत्याही क्रियेमुळे भक्तामध्ये भेद पडत नाही.

या सूत्राचा आणखी एका दृष्टीने विचार करता येईल. सूत्रात 'नास्ति तेषु' म्हणून भक्ताचा निर्देश करून जातिकुलरूपधनक्रियादि भेदाचा निषेध केला आहे म्हणजे भक्ताची दृष्टी जगाकडे पहाताना वरील विशेष पहात नाही. सामान्य माणसाची दृष्टी जाती, कुल, रूप, धन क्रिया हे पाहून व्यक्तीव्यक्तीत भेद पाहत असते तसे भक्त पाहत नाही. तो सर्वांत केवळ भगवतच व्यापून आहे अशी भावना ठेवतो. भगवान श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात, 'तऱ्ही दोन्ही पालववेरी। जैसा एक ततू अंबरी। तैसा मी वाचूनि चराचरी। जाणतीना ॥ २१९ ॥ आदि ब्रह्मा करुनी। शेवटी मशक धरुनी। माजी समस्त हे जाणूनि। स्वरूप माझे ॥ २२० ॥ मग वाड धाकुटे न म्हणती। सजीव निर्जीव नेणती। देखिलिये वस्तूते उजूलुठिती। मीचि म्हणोनि ॥ २२१ ॥ आपुले उत्तमत्व नाठवे। पुढील योग्यायोग्य नेणवे। एकसरे व्यक्तिमात्राचेनि नावे। नमूचि आवडे ॥ २२२ ॥' ज्ञा. ९. या सर्व ओव्यातून भक्ताची दृष्टी व्यभिचारी अशा जातिकुलरूपक्रियादि गुणावर जाऊन कोणात ही भेद करीत नाही तर सर्वांत अनुस्यूत अद्वैतरूप भगवत्स्वरूपातच स्थिर असते.

सूत्रामध्ये शेवटी 'आदि' असा शब्द आहे. जाती, कुल, रूप, धन, क्रिया इत्यादि भेद करणाऱ्या विशिष्ट वस्तूचा निर्देश करून केवळ एवढ्याच वस्तूनी भेद केला जातो असे नसून गुण, आकार, परिमाण, देश, काल, वस्तु इत्यादि भेद निर्माण करणारी अनेक कारणे आहेत पण भक्ताच्या दृष्टीने ती कारणे ही कल्पित व व्यभिचारीच आहेत.

महर्षि शांडिल्यानी आपल्या भक्तिसूत्रातूनही हेच सांगितले आहे.

**आनिंद्ययोन्यधिक्रियते पारम्पर्यात्सामान्यवत्** ॥ ७८ ॥

शांडिल्य भक्तिसूत्रे

'भगवद्क्तीमध्ये निंद्य चांडालादिकांचाही अधिकार आहे, कारण भगवद्भक्तगण भगवद्भक्तीच्या मर्यादेच्या स्वरूपाच्या दृष्टीने सर्व समान आहेत.' इतर साधनांचे दृष्टीने भक्ती या साधनाचे श्रेष्ठत्व प्रदर्शित करणे हे या सूत्राचे तात्पर्य आहे. मागेही 'सा कर्मज्ञानयोगेभ्यो प्यधिकतरा' असे श्रेष्ठत्व दाखविलेच आहे पण या सूत्रात वेगळ्या दृष्टीने भक्तीचे महत्त्व सांगितले आहे.

## सूत्र ७३

## यतस्तदीया: ॥ ७३ ॥

**अर्थ** :

कारण भक्त त्याचे (भगवंताचेच) असतात.

**विवरण** :

मागील सूत्रात भक्तांचे ठिकाणी जातीकुलरूपक्रियादि भेद नसतात असे सांगितले. त्याचे कारण या सूत्रात स्पष्ट करीत आहेत. मनुष्य देहात आलेला जीव अज्ञानामुळे स्वत:स देहाचा किंवा देहसंबंधीयांचा समजत असतो. 'जे देहचि आपणपें मानिती । विषयातें भोग्यम्हणती । ययापरतें न स्मरती । आणीक काही ॥' (ज्ञा. ३–१२७) आपला केवळ देह आहे अथवा देहच केवळ आपण आहोत असा अज्ञानमूलक दृढ निश्चय त्याचा अथवा बहुतेकाचा असतो. पण हे देहतादात्म्य व तन्मूलक ममत्व हेच सर्व अनर्थाचे मूल आहे याची त्यांना कल्पना नसते 'जया देहसंबंधाआंतू । प्रतिपदी आत्मघातू । भुजता उसंतू । कहीच नाही ॥ (ज्ञा. १८–१२७६)

देहाचे बनणे म्हणजे देह बुद्धि ठेवणे कसे घातक आहे हे नवयोगेश्वर राजा जनकाला सांगतात.

ऐक राया नवलपरी । आपुला संकल्प आपणा वैरी । देहवुद्धी वाढऊनि शरीरी । अतिदृढ करी भवभया ॥ २८५ ॥ जयापाशी देहबुद्धी । तयासी सुख नाही त्रिशुद्धी । ते बुडाले द्वंद्वसंधी । आधिव्याधि महार्णवी ॥ २८६ ॥ जे देहबुद्धीपाशी । सकळ दु:खाचिया रासी । महाभयाची भूतें चौपाशी । अहर्निशी झोंबती ॥ २८७ ॥ ऐसी असत देहबुद्धी कुडी । वाढवी विषयाची गोडी । तेथे महाभयाची जोडी । जन्ममरण कोडी अनिवार ॥ २८८ ॥ ए. भा. २

आध्यात्मिक दृष्टीने जीव देहाचा बनूही शकत नाही. देहाचे होणे म्हणजे देहाशी सबंध ठेवणे होय. पण जीव चेतन व देह जड, जडचेतनाचा कोणताही संबंध होऊ शकत नाही. जीव निरवयव, देह सावयव; दोघाचा संबंध कसा होणार ? जीव नित्य, देह अनित्य; असा दोघात अनेक प्रकारचा परस्पर विरोधी प्रकार असताना याचा संबंध कसा होतो ? ज्या दोघात संबंध तात्त्विक दृष्टचा होऊ शकत नाही तेथे संबंध मानणे यासच भ्रम असे म्हणतात. जीव केवळ भ्रमाने म्हणजे अज्ञानास वश झाल्याने 'तदीय' म्हणजे देवाचा न होता या देहाचा होतो व संसार दु:ख

भोगतो. पण भक्त हा देह व आत्मा याच्या स्वरूपाला जाणणारा असल्याने तो कधीच देहाचा म्हणजे देहावर तादात्म्य ठेवणारा होत नाही. तुकाराम महाराज म्हणतात,

पंचभूतांचा गोंधळ । केला एके ठायी मेळ ।
लाविला सबळ । अहंकार त्या पाठी ।। १ ।।
तेथे काय मी ते माझें । कोण वागवी हे ओझें ।
देहां केवी रिझे । हें काळाचे भातुकें ।। २ ।।

सर्व जग स्वत:ला 'तदीय' म्हणजे आपण देवाचे असे समजत नाही, 'तदीय' म्हणजे त्या देवाचा होणे. 'देवाचा' ही षष्ठी विभक्ती आहे. षष्ठी विभक्ती संबंध दाखविणारी असते संबंधाचे सामान्य व विशेष असे दोन भेद होतात. सामान्यसंबंधास विशेषाची अपेक्षा असते. माझा असे केवळ म्हणणे म्हणजे सामान्य संबंध. पण यावर शका येते की तुझा हा कोण ? याच्या उत्तरात पुत्र, पिता, बंधु, इष्ट मित्र, शत्रू, इ जे संबध दाखविले जातात त्यास विशेष असे म्हणतात जीवाचा परमात्म्याशी अंशअंशीभावसंबंध जरी आहे तरी त्याला विशेषसंबंधाचे ज्ञान नसते म्हणून तो 'तदीय' म्हणजे देवाचेच आहोत असे समजत नाही. पण भक्ती हा आपला विशेषसंबंध देवाशीच मानीत असतो.

**त्वमेव माता च पिता त्वमेव त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव ।**
**त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव त्वमेव सर्वं मम देवदेव ।।**

हा श्लोक प्रसिद्ध आहे. तुकाराम महाराजांचे उद्‌गार पाहा,

विठ्ठल बाप माय चुलता । विठ्ठल भगिनी आणि भ्राता ।
विठ्ठलेवीण चाड नाही गोता । तुका म्हणे आतां नाही दुसरे ।।१।। तु.

सकळही गोत माझे पंढरीसी जाण ।
बापरखुमा देवीवरू विठ्ठलाचीआण ।।१।। ज्ञा.

श्रीशंकराचार्यही देवाजवळ तदीयतेची भावना व्यक्त करीत आहेत.

**सत्यपिभेदापगमे नाथ तवाह न मामकीन स्त्व ।**
**समुद्रोहि तरग: क्वचन समुद्रो न तारंग: ।।१।।**

'हे नाथ ! जरी तुझ्या माझ्यात भेद नाही तरी मी तुझा आहे, तू माझा नाहीस. तरंग हा समुद्राचा आहे पण समुद्र तरंगाचा नाही. म्हणजे तरंगाच्या अस्तित्वास समुद्राची आवश्यकता आहे पण समुद्राकरिता तरंगाची अपेक्षा नाही.' केवढे 'तदीयत्व' आहे ? तदीयतेचे विस्तृत व्याख्यान ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायात उत्तम रीतीने केले आहे. भगवान श्रीकृष्ण सांगतात,

मग मीचि डोळा देखिला । जिही कानी मीचि ऐकला । मनी मी भाविला ।

वानिला वाचा ।।३५९।। सर्वांगी सर्वाठायीं। मीचि नमस्कारिला जिही। दान पुण्यादिकें जे काही। ते माझियाचि मोहरा ।।३६०।। जिही मातेंचि अध्ययन केलें। जे आत बाहेरी मियाचि धाले। जयांचे जीवित्व जोडले। मजचिलागी ।।३६१।। जे माझेनि कामे सकाम। जे माझेनि प्रेमें सप्रेम। माझिया भुली संभ्रम। नेणती लोक ।।३६२।। जयांची जाणती मजचि शास्त्रें। मी जोडे जयाचेनि मंत्रे। ऐसें जे चेष्टामात्रें। भजले मज ।।३६३।। ज्ञा.

भक्ति ग्रथातून काही ठिकाणी तदीयता, त्वदीयता व मदीयता असे प्रकार कल्पिले आहेत. म्हणजे प्रथम भक्ताच्या अंतःकरणात मी त्या भगवंताचा आहे, अन्य कोणाचा नाही– म्हणजे संसाराचा अथवा दुसऱ्या कोणा जीवाचा नाही, हा भाव निर्माण होतो. पण तदीय भावनेत परोक्षता असते. तत् शब्द परोक्षताबोधक असतो. तदीयतेचा परिपाक योग्य प्रकारे झाला की याच्या पुढची पायरी 'त्वदीयता' म्हणजे, ' देवा ! मी तुझा आहे. ' देवाच्या प्रत्यक्षात, सामीप्यात ही भाषा असते. श्रीज्ञानेश्वर महाराजही देवाला म्हणतात, ' तुझी आण वाहीन गा देवराया। बहु आवडसी जीवा पासूनिया ।।१।। ' सर्वच संतांची ही भावना असलेली दिसून येते. भक्तवर्य अर्जुन श्रीकृष्णास म्हणतो, ' तू गुरू बंधुपिता। तू आमची इष्ट देवता। तूचि सदा रक्षिता। आपदी आमुतें ।।५९।। (ज्ञा. २). अशी भावना असणे हीच ' त्वदीयता '. याच्या पुढची पायरी ' मदीयता, ' म्हणजे देव माझा आहे ही भावना निर्माण होणे, ही आहे.

कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता। बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा ।।१।।
कृष्ण माझें मन कृष्ण माझे जन। सोईरा सज्जन कृष्ण माझा ।।२।। तु.

' मदीयता ' मध्ये ' ममैव असौ '– हा माझाच आहे, या भावनेची दृढता असते. ही भावना पूर्णत्वाला पावली म्हणजे देवालाही भक्त हा माझाच आहे अशी भावना निर्माण होते. गीतेच्या बाराव्या अध्यायांत ' भक्तिमान् य· स मे प्रिय. ' ' भक्तिमान्मे प्रियो नर.', 'यो मद्भक्तः स मे प्रियः', 'भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ', अशी भगवन्मुखातील किती तरी वचने आहेत.

' यतस्तदीयाः ' एवढेच वाक्य सूत्रात आहे, पण त्यातून वरील सर्व भाव प्रगट होऊ शकतात.

## सूत्र ७४

## वादो नावलम्ब्यः ।।७४।।

**अर्थ** :

(भक्ताने) वादाचा अवलंब करू नये.

**विवरण** :

प्रत्येक साधनात काही विरोधी– प्रतिकूल-अतएव बाधक गोष्टीचा त्याग करावयास सांगितलेला असतोच. भक्तिमार्गात मागे अनेक सूत्रातून 'विषयत्याग, संगत्याग' (सू २५) 'दुःसंगाचा सर्वथा त्याग' (सू. ४३) 'कामक्रोधादिकाचा त्याग' (सू. ४४) 'कर्मफल त्याग– कर्मत्याग' (सू. ४८) 'स्त्रीधननास्तिक वैरिचरित्राचे श्रवण न करणे' (सू. ६३) 'अभिमानदंभादिकाचा त्याग' (सू.६४) सांगितला आहे. वरीलप्रमाणेच या सूत्रात नारदमहर्षि भक्ताच्याकरिता आणखी एका गोष्टीचा निषेध सांगतात. वास्तविक पाहता आपणास प्रामाणिकपणाने पटलेले प्रमेय सिद्ध करणे काही वाईट आहे असे कोणी म्हणणार नाही. सर्व ऋषिमुनींनी ते केले आहे. पण येथे 'वाद' असा शब्द आहे शुकरंभासंवादरूप एक आख्यान संस्कृतभाषेत प्रसिद्ध आहे. त्यात श्री शुकाचार्यांच्या मुखातून एक श्लोक कवीने वदविला आहे.

**तीर्थे तीर्थे निर्मलं साधुवृंदं वृंदे वृंदे तत्त्वचिंतानुवाद ।**
**वादे वादे जायते तत्त्व बोध. बोधे बोधे सच्चिदानंदरूपम् ।।**

'साधकाने तीर्थयात्रा कराव्यात त्या तीर्थात पवित्र असे साधूंचे समुदाय असतात व त्या साधुसमुदायात तत्त्वचिंतनपूर्वक अनेक प्रमेयावर वादविवाद होत असतात. त्या त्या वादातून साधकास, तत्त्वबोध होतो व त्या बोधातच सच्चिदानंदरूप साठवलेले असते.' या श्लोकावरून जरी वादाचे उपयोगित्व पटत असले तरी 'वादे वादे जायते तत्त्वभेदः' अथवा 'वादे वादे वर्धते वैरन्हिः ।' असेच अनुभवास येते. 'वाद. प्रवदतामहम्' म्हणून श्रीकृष्णांनी गीतेच्या दहाव्या अध्यायात वाद ही आपली विभूती जरी सांगितली आहे तरी तेवढ्याने तो वाद श्रेष्ठ ठरत नाही. तसे तर 'द्यूत छलयतामस्मि' म्हणून द्यूत (जुगार) ही विभूतीच आहे, पण ती आदरणीय, अनुकरणीय आहे असे होत नाही. सूत्रामध्ये 'वाद' एवढाच शब्द जरी आहे तरी त्याच्या पोटात वितंडा, जल्प, तर्क, हेत्त्वाभास याही गोष्टींचा अंतर्भाव होतो. दोन व्यक्ती अथवा दोन पक्षांमध्ये लौकिक व्यवहाराबद्दल जे भांडण होते त्यासही वाद म्हटले जाते. पण तो अर्थ येथे अभिप्रेत नाही. शास्त्रामध्ये 'तत्त्वबुभुत्सो

कथावादः ' 'तत्वज्ञानाच्या इच्छेने दोन पुरुषामध्ये परस्पर जी चर्चा होते तिला वाद म्हणतात; ' अशी वाद शब्दाची व्याख्या आहे अशी चर्चा गुरुशिष्य यांमध्ये झालेली भक्तिशास्त्रावरील ग्रंथातूनही दिसून येते. महाभारतात भीष्म-युधिष्ठिर, श्रीकृष्ण-अर्जुन, भागवतामध्ये शुक-परीक्षिती, विदुर-मैत्रेय, प्रल्हाद-दैत्यपुत्र, कपिल-देवहूति, नारद-वसुदेव, जनक-नवयोगेश्वर, श्रीकृष्ण-उद्धव अशा अनेक गुरु-शिष्यांमध्ये चर्चा झालेली आहे. पण अशा चर्चेचा अवलंब करू नये असे म्हणता येणार नाही. कारण नारदाबरोबरही अनेकांनी अशी चर्चा केली आहे. पद्मपुराणात नारद व भक्ती याच्यामध्ये झालेली चर्चा आली आहे, पण ती भक्तीला बाधक नाही; व अशा चर्चेला वाद न म्हणता 'संवाद' म्हणण्याची पद्धत आहे. भगवद्गीतेच्या अध्यायाचे शेवटी 'श्रीकृष्णार्जुन संवादे' असे म्हटले आहे. संजयही 'राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम्।' (गीता. १८–७७) म्हणून संवाद असेच म्हणतो. श्रीकृष्णानीही अठराव्या अध्यायाचे शेवटी 'अध्येष्यतेच य इमं धर्म्यं संवाद मावयोः।' (गीता १८–७०) असा संवाद शब्दच वापरला आहे. ज्ञानेश्वर महाराजानी त्या संवादाचे महत्त्व व त्यापासून होणाऱ्या आनंदाचे पुष्कळ वर्णनही केले आहे.

आणि संवादाचे निमिषें। जे अव्यवहारी वस्तु असे।
तेचि भोगिजे की जैसें। आरिसा रूप॥ ८१ ॥ ज्ञा. १८.

असा संवाद न होईल तर कोणालाही ज्ञान होणार नाही, व अशा सवादाचा अवलंब करू नये असे नारद केव्हाही म्हणणार नाहीत कारण अशा संवादाविना साधकाची अनेक प्रकारच्या सशयाची निवृत्ती होणार नाही. म्हणून 'वादो नावलम्ब्यः' या सूत्रात वादविवाद, वितंडवाद, जल्प इत्यादी अर्थ घेणे योग्य आहे.

न्यायशास्त्रात तर्क, वाद, जल्प, वितण्डा, हेत्त्वाभास असे या विषयात अनेक भेद कल्पिले आहेत. वादात दोन पक्ष असतात, एकास वादी व दुसऱ्यास प्रतिवादी म्हणतात. आपलाच पक्ष योग्य हे सिद्ध करताना परस्पर जिकण्याच्या हेतूने वाक्याभास, युक्त्याभास, हेत्त्वाभासादिकाचा अवलब करून आपलाच पक्ष खरा आहे हे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला जातो त्याला 'वादविवाद' म्हणतात यात सद्भावनेपेक्षा स्पर्धा, मत्सर, द्वेष यांनाच प्राधान्य असते. स्वमताचे मंडण व परमताचे खंडण करण्याचा दुराग्रह असतो. कित्येक वेळा तर वितंडवादात त्याची परिणती होते. आपला पक्ष स्थापन नाही झाला तरी दुसऱ्याच्या पक्षाचे खंडण करण्याकरिता जी चर्चा होते तिला शास्त्रात वितंडा म्हटले जाते. स्वतःस विद्वान् म्हणविणारे अत्यंत अभिमानी लौकिकात मोठेपणा सिद्ध करण्याकरता अशा वादविवादाचा अवलंब करतात. अनेक शास्त्रज्ञ, पंडित, दर्शनकारही स्वमतप्रस्थापनार्थ या वादविवादाचा अवलंब करीत असलेले दिसतात. शास्त्रकारांत वादविवाद कसे चालतात त्याचा प्रकार ज्ञानेश्वरमहाराजानी गीतेच्या तेराव्या अध्यायातील पाचव्या श्लोकावरील

आपल्या टीकेत दाखविला आहे, तो मुळातून पाहावा. लौकिक व्यवहारात तर भाडणे, वादविवाद हे स्वार्थमूलक होतच असतात, पण धार्मिक, आध्यात्मिक क्षेत्रातही असे वादविवाद व्हावेत व त्यातून द्वेष, मत्सर निर्माण व्हावेत हे आश्चर्य आहे. पंडितांचे वाद होतातच, एकाने व्याकरणावर 'मनोरमा' नावाचा ग्रंथ केला की दुसरा त्याच्या खंडणात्मक 'मनोरमाकुचमर्दन' नामक ग्रंथ करतो! वेदान्त मतातही द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैत मतातून पूर्वीपासून हे वाद वाढलेले व परस्पर विरोधी सिद्धात स्थापन करण्याकरिता परस्पर विरुद्ध अनेक तर्क, हेत्वाभासाचा अवलंब केलेला दिसतो व याकरिता शेकडो ग्रंथाची निर्मिती झालेली दिसून येते. ते ग्रंथ वादविवादात्मक, खंडणमंडणरूपच असतात. शास्त्रकारांना असा वादविवाद करणे कित्येक वेळा अपरिहार्य होते. कुमारिलभट्टांना सुधन्वा राजाच्या सभेत वेद-प्रमाण न मानणाऱ्या जैन पंडिताबरोबर दिव्य करून प्रतिज्ञापूर्वक वाद करावा लागला. श्री जगद्गुरुशंकराचार्यांनीही माहिष्मती नगरीत मंडनमिश्र नामक मीमांसक पडिताबरोबर वाद करून त्याला जिंकून संन्यासदीक्षा दिली ही कथा प्रसिद्ध आहे. पण केवळ अशा वादाने मोक्ष प्राप्त होतो असे त्यानी म्हटले नाही. श्रीशंकराचार्य म्हणतात,

**वाग्वैखरी शब्दझरी शास्त्रव्याख्यान कौशलम् ।**
**वैदुष्यं विदुषां तद्वत् भुक्तये न तु मुक्तये ।।**

'वैखरीतून शब्दाचे झरे वाहतात, त्यात शास्त्रव्याख्यान कौशल्य दिसून येते. ते विद्वानांचे पाडित्य पोट भरण्यास उपयोगी पडते. पण मोक्षात त्याचा किंचितही उपयोग नाही.'

भागवत एकादश स्कंधातील दहाव्या अध्यायात साधकाची लक्षणे सांगत असता एकनाथ महाराज म्हणतात,

वादविवाद अतिवाद । नावडे कोणाचा संवाद ।
न करी बोलाचा विनोद । लौकिक शब्द न बोले ।। २२८ ।।
वक्रोक्ति नाही जाण । बोली न बोलें विंदाण ।
करूं नेणें प्रतारण । मिथ्या वचन न बोले ।। २२९ ।। ए. भा. १०

तत्त्वनिश्चयाकरिता प्रथम वाद जरी निर्माण झाला तरी त्याचे पर्यवसान नंतर एकमेकांनी एकमेकाच्या उखाळयापाखाळ्या काढणे, मर्मभेद करणे, दोष दाखविणे यात होऊन अंत करणे दुखविली जातात. भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायात अव्यवसायी बुद्धीच्या कर्मठांचे लक्षण सांगत असताना श्रीकृष्ण भगवंतानी त्या 'वेदवादरत' पुरुषांना 'अविपश्चित्' अविवेकी म्हटले आहे. (गीता. ४२, ४३) या श्लोकांवरील टीकेत ज्ञानेश्वरमहाराजांनी अशा 'वादरत' पुरुषांना दुर्मति दुर्बुद्धि असे स्पष्ट म्हटले आहे.

तसेच श्रीमद्भागवत एकादश स्कंधात आश्रमविचार सांगतांना श्रीकृष्ण भगवंतानी संन्यासाश्रमी पुरुषाची जी व्रते, नियम सांगितले आहेत त्यात संन्यासाने 'वेदवादरत' होऊ नये असे स्पष्ट म्हटले आहे.

**वेदवादरतो नस्यान्न पाषण्डी न हैतुकः ।**

**शुष्कवादविवादें न कञ्चित्पक्षं समाश्रयेत्** ।। ३० ।। ए. भा. १८.

'संन्यासी साधकाने वेदवादरत होऊं नये, त्यातून पाषंडीपणा निर्माण होतो, तो होऊ देऊ नये. तार्किक होऊ नये म्हणजे मिथ्या तर्कवितर्कांचा अवलंब करू नये, कोरड्या वादविवादाचा आश्रय करून कोणत्याही एका पक्षाचा अभिनिवेश धरू नये.'

श्रीएकनाथ महाराजांची या श्लोकावरील टीका साधकाकरता मननीय आहे.

धरोनिया मीमांसकमत । कर्मकांडीचे शास्त्रार्थ । नानावाद कर्मार्थे । न करी निश्चित निजबोधें ।। २०४ ।। तार्किकाचे अतितर्क । तर्कवितर्क कुतर्क । हेही वाद करीना देख । निजात्मसुख जो जाणें ।। २०५ ।। बाहेरी ब्रह्मज्ञानाचें गर्जे तोंड । भीतरी विषयवासना उदंड । ऐसे महावादी प्रचंड । अतर्क्य पाखंड त्या नांव ।। २०६ ।। शुष्कवाद ज्या ज्या गोष्टी । त्यांतही वाग्वाद उठी । होय नव्हें कपाळ पिटी मिथ्या चावटी करीना ।। २०९ ।। श्रुतिस्मृतीसी विरुद्ध । होता देखे अतिवाद । स्वयें जाणे शास्त्रार्थशुद्ध । परी पक्षपात करीना ।। २१० ।। ए. भा. १८.

वादविवादामुळे चित्तात विक्षेप निर्माण होतात. तसेच वाणीमध्ये मग नाना प्रकारचे दोष शिरतात, एखादा वादात हरला तर त्याला दुःख होते. वादात तर्काला, युक्तीला प्राधान्य असते विश्वास अथवा श्रद्धेला नसते. ज्याची बुद्धी जितकी अधिक तर्ककुशल तितका तो दुसऱ्याला लौकर पराजित करीत असतो. भक्ताच्या जीवनात तर्काला प्राधान्य नाही, तर्क शब्द 'कृति छेदने' धातूपासून बनला आहे, त्याचा छेदन करणे, तुकडे करणे असा अर्थ होतो. 'कर्त'चे उलट स्वरूप तर्क हे आहे. प्रमाणजन्य ज्ञान, यथार्थ अनुभव, कोणत्या तर्काने छेदला जाईल ? तसेच जेथे पूर्ण विश्वास आहे, अढळ श्रद्धा आहे, तेथे अविश्वासच नाही. मग वाद कशाचा करणार ?

कुशल चतुर येथे न पवती । करतील रिते तर्क मते ।। तु० ।।

तार्किकाचा टाका संग । पांडुरंग स्मराहो ।। तु० ।।

असे तुकाराम महाराज म्हणतात. एखादा विश्वासाने देवाचे भजन पूजन करू लागला म्हणजे काही वादकुशल लोक त्याला उद्देशून नाही नाही ते प्रश्न करतात. त्याची उपासना करणे कसे अयोग्य आहे हे पटविण्याचा प्रयत्न करतात. वादविवाद करण्यास प्रवृत्त होतात. वादविवादाने मन ढवळले जाते. तो क्षीण होतो. तुकाराम

महाराजच शेवटी म्हणाले,

कोणाचिया न पडो छंदा । गोविंदासी आळऊ ॥
बहुतांचीं बहुत मतें । अवघी रिते पोकळीं ॥
घटापटा ढवळी मन । होय शीण न करू तो ॥
तुका म्हणे पांडुरंग । भरूं भाग आला तो ॥

एका अभंगात ते वादविवाद करणाऱ्यांना म्हणतात,

तुका म्हणे तुम्ही करा घटापटा । नका जाऊं वाटां आमुचिया ॥

वादविवादात जी भाषा वापरली जाते, तिच्यात किती दोष असतात ते ज्ञानेश्वरमहाराजानी सांगितले आहेत. 'विरोध, वादबळ, प्राणितापढाळ (इतरास-दुःख देणे), उपहास, छळ, वर्मस्पर्श, आटूवेग (आवेशाचे बोलणे), विंदाण (कपट), आशा, शंका, प्रतारणा (वंचना)' (ज्ञानेश्वरी १३-२७०-७१) हे दहा दोष वादात निर्माण होतात म्हणून सज्जन वादविवादात पडत नाही. भक्ताची भाषा कशी असावी याविषयी ते सांगतात, 'तैसे साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ । शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥' (ज्ञा. १३-२६९). एखादा जिज्ञासु-बुद्धीने एखादी शंका विचारील तर यथाशक्य त्याचे वरील ओवीत सांगिलेल्या भाषेतून समाधान करावे, पण जर कोणी श्रद्धाहीन तर्कटी वादास प्रवृत्त झाला तर त्याच्या बरोबर भाषणही करू नये असे त्यांनी सांगितले आहे.

तैसे जे पार्थी । विमुख या परमार्थी ।
तयासी भाषण सर्वथा । करावें ना ॥ ज्ञा. ३-९७

या अनेक कारणास्तव भक्त होऊ इच्छिणाऱ्याने वादविवादात पडू नये. कित्येकदा, वादात खरे बोलले व त्यातून दुसऱ्या पक्षाचे खंडण झाले, त्याचा अपमान झाला, त्याला दुःख झाले, तर भक्तांकरिता तेही योग्य नाही. म्हणून तर कित्येक भक्त मौनाचाच आश्रय करतात या दृष्टीने, 'जो साचलटिकें दोन्ही । न बोलोनि जाला मौनी ॥' (ज्ञा. १२-२०९) असे ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. वादविवाद तो करतो की दुसऱ्यास पराजित केले असता ज्यास आनंद होतो. भक्ताची ही वृत्ती कधीच नसते.

एकदा एक दिग्विजयी पंडित वृंदावनात गेले व येथे कोणी विद्वान पंडित आहेत काय, मला त्यांच्याशी वादविवाद करावयाचा आहे असे विचारू लागले. तेव्हा तेथे चैतन्यसंप्रदायी सनातन गोस्वामी राहत असत. ते मोठे पंडित आहेत असे लोकांनी त्या दिग्विजयी पंडितास सांगितले. तेव्हा तो पंडित सनातन गोस्वामी-कडे जाऊन त्यांना म्हणाला, 'माझ्या बरोबर शास्त्रार्थ करा. नसता मला विजय-पत्र लिहून द्या.' सनातन गोस्वामी पंडित होते तरी भगवान श्रीकृष्णाच्या ध्यानात निमग्न असून त्या आनंदाचा अनुभव घेणारे होते. ते आग्रही वृत्तीचे नव्हते. त्यांनी

त्या पंडिताला जयपत्र लिहून दिले ! तेव्हा तो पंडित बऱ्याच लोकांसहित आपल्या विजयपत्राची घोषणा करीत निघाला. तो रस्त्यात सनातन गोस्वामीजीचे पुतणे श्रीजीव गोस्वामी भेटले व त्यांनी त्या पंडितास म्हटले की अगोदर माझ्याबरोबर वाद करून मला पराजित करा, मग विजयघोषणा करा. त्या दोघांचा शास्त्रार्थ झाला त्यामध्ये त्या दिग्विजयी पंडिताचा पराभव झाला. जीवगोस्वामींनी त्याच्या जवळची सर्व जयपत्रे हिसकावून घेऊन त्याचेकडूनच परत विजयपत्र लिहून घेतले. परंतु हा समाचार जेव्हा सनातन गोस्वामीच्या कानावर गेला तेव्हा त्याना वाईट वाटले व म्हणाले आता जीवाकरिता (जीवगोस्वामी) माझे दार बंद आहे. त्याने येथे येऊ नये. त्याने एका व्यक्तीचा उत्साहभंग केला, अपमान केला. जीवगोस्वामीना हे ऐकून फार खेद झाला. त्यांनी पश्चात्तापपूर्वक क्षमा मागितली. नंतर त्यांना भेटण्याची परवानगी दिली.

तात्पर्य भक्ताने वादाचा अवलंब करू नये. ज्याने भगवद्भक्तीच्या द्वारे भगवंताचा अवलंब केला आहे त्याला भगवत्स्वरूपात सर्व वाद अतर्भूत आहेत. वादाला आधारभूत सर्व शास्त्रे त्याचेपासूनच निर्माण झालेली आहेत. तो तर वाद-अवादातीत, वादसाक्षी, तसेच सर्व वादांचे अधिष्ठान आहे. भक्त श्रेष्ठ तुकाराम महाराजही सांगतात की देवाला वादविवाद आवडत नाही,

जाणतिया सवें येऊं नेदी हरी । तर्कवादी दुरी दुराविले ।।
वादियासी भेद निंदा अहंकार । देऊनिया दूर दुराविले ।। तु० ।।

श्रीमद्भागवतामध्ये दक्ष प्रजापति भगवद्वर्णन करताना म्हणतो,

यच्छक्तयो वदतां वादिनां वै विवाद संवादभुवो भवन्ति ।
कुर्वन्ति चैषां मुहुरात्ममोहं तस्मै नमोऽनन्तगुणाय भूम्ने ।। ६-४-३१

'हे प्रभो ! तुमच्याच शक्ती वादी प्रतिवाद्यांच्या विवाद आणि संवादा–(ऐकमत्या)चा विषय, आधार होतात. तसेच त्यांना पुनःपुन्हा मोहात घालीत असतात, तुम्ही अनन्त अप्राकृत कल्याण गुणांनी युक्त तसेच स्वत. अनंत आहा. अशा तुम्हाला मी नमस्कार करतो.'

खरा भक्त भगवद्व्यतिरिक्त भाषा कोणी बोलू लागला तर ऐकतही नाही. तसेच भगवद्गुण व भगवन्नामाव्यतिरिक्त त्याची वाणी अन्य भाषा बोलण्यासही तयार नसते. अशा स्थितीत वादविवादाला अवसरच कोठे असतो ? कदाचित् साधक भक्त चुकून एखाद्या वेळी कोणाबरोबर वादविवाद करील तर त्याला उद्देशून नारदमहर्षींची ही आज्ञा असावी की 'भक्ताने वादाच अवलंब करू नये.'

'बहुग्रंथकलाभ्यासव्याख्यावादविवर्जनम् ।।' भ. र. सि. २-२९ भक्तिरसांमृतसिधू या भक्तिशास्त्रावरील ग्रंथातही भक्ताने अनेक ग्रंथ व कला यांचा अभ्यास, व्याख्यान व वादविवाद वर्ज्य केले पाहिजेत असे सांगितले आहे.

## सूत्र ७५

## बाहुल्यावकाशादनियतत्वाच्च ।।७५।।

**अर्थ** :

(वादाचा अवलम्ब करू नये, कारण ) यांत बाहुल्याला म्हणजे विस्ताराला अवकाश असतो, म्हणजे तो वाद वाढतच जातो तसेच तो अनियत आहे म्हणजे वादात निश्चितता नसते.

**विवरण :**

मागील सूत्रात भक्ताने वाद-विवादात पडू नये असे सामान्यपणे सांगून या सूत्रात वादविवादात दोष कोणते असतात, ते सूत्रकार सांगतात. वादात बाहुल्यावकाश असतो. म्हणजे उत्तर-प्रत्युत्तर, आक्षेप-प्रत्याक्षेप इत्यादिकामुळे तो वाढतच जातो. तसेच त्यांत निष्कारण वेळ अधिक जातो. लाभ काहीच होत नाही. दोन्ही बाजूने आपल्या मताचे समर्थन करण्याच्या प्रयत्नात शब्दाची कचकच वाढत जाते. उदाहरणार्थ, ईश्वर आहे की नाही ? असेल तर सगुण का निर्गुण ? साकार का निराकार ? एक का अनेक ? जगत्कर्ता का अकर्ता ? मायोपाधिक का निरुपाधिक ? उपादानकारण का निमित्तकारण ? जगताहून भिन्न का अभिन्न ? प्राणिकर्मसापेक्ष कर्ता का निरपेक्ष कर्ता ? भक्तीसाध्य का ज्ञानसाध्य ? जीवाचा त्याचा संबंध कोणता ? इ. अनेक प्रश्न वादात उपस्थित होऊन वाद वाढत असतो. हे वाद कसे वाढतात याबद्दल एकनाथ महाराज सांगतात,

येऱ्हवी ब्रह्म अद्वितीय नित्य। हें सकळ ऋषींचे संमत। त्यासीही पुसोजातां बहुत। विक्षेप तेथ उठती ।।४०६।। एक म्हणती ब्रह्म सगुण । एक म्हणती ते निर्गुण । ऐसे वाद करिती दारुण। युक्तिखंडण अभिमाने ।।४०७।। एक म्हणती ब्रह्म सप्रपंच। एक म्हणती निष्प्रपंच । मिळोनिया पांचपांच । शब्द कचकच वाढविती ।।४०८।।

ए. भा. ९

तसेच बावीसाव्या अध्यायात भगवान श्रीकृष्ण उद्धवास आत्म्याचे स्वरूपात कसे वाद होत असतात ते सांगतात.

एक म्हणती आत्मा देही । एक म्हणती तो विदेही । एक म्हणती आत्म्याच्या ठायी । हे दोन्ही नाही सर्वथा ।।३८९।। एक म्हणती आत्मा सगुण । एक म्हणती तो गुणविहीन । एक म्हणती ते वेगळी खूण । सगुण निर्गुण परमात्मा ।।३९०।। एक प्रतिपादिती भेद । एक पतिपादिती अभेद । एक म्हणती दोन्ही अबद्ध । आमुचे मत शुद्ध देहात्मवादु ।।३९१।। एक म्हणती हे मिथ्याभूत ।प्रत्यक्ष दिसताहे जो

येथ । तो प्रपंच मानिती सत्य । हेंचि मत एकाचें ।।३९२।। ऐसे भेदवाद सकळ । विचारितां अज्ञान मूळ । आत्मा चिन्मात्र केवळ । भेदातें समूळ छेदक ।।३९३।। ए. भा. २२.

जसा साध्याबद्दल वाद तसाच साधनाच्या स्वरूपाविषयी अनेक मते, वाद-विवाद कसे चालतात याचा विस्तृत विचार श्रीकृष्णानी उद्धवास एकादशस्कंधाच्या चौदाव्या अध्यायांत सांगितला आहे. जिज्ञासूनी तो मुळात पहावा. एका क्षेत्र (शरीर) विषयात वादविवाद कसे चालतात, हे श्रीकृष्ण भगवतानी अर्जुनास सांगितले आहे.

पैं याचि स्थळांकारणें । श्रुति सदा बोबाणे । तर्क येणेंचि ठिकाणें । तोंडाळ केला ।।१४।। चाळितां हेचि बोली । दर्शनें शेवटा आलीं । तेवींचि नाही बुझाविली । अझूनि द्वंद्वें ।।१५।। शास्त्राचिये सोयरिके । विचळिजे येणेंचि एके । याचेनि एकवकें जगा वाद ।।१६।। तोडेसी तोडा न पडे । बोला बोलेसी न घडे । इया युक्ति बडबडे । त्राय जाहाली ।।१७।। ज्ञा. १३.

अध्यात्मातील सर्वच विषयांच्या बाबतीत अशी भिन्नमते व वाद आहेत यामुळे कोणत्याही सिद्धान्ताचा निश्चय होणे कठिण जाने. साधक भक्ताचा बुद्धिभेद होण्याचा संभव असतो. काही गोष्टी वादविवादाने ठरवावयाच्या नसतात. ज्या भगवंताची भक्ति करावयाची तो वादविविदाने सिद्ध करून मग भक्ति करावयाची का ? कोण भक्त असा वादविवाद करीत बसला आहे ? ' निष्ठावंत भाव भक्ताचा स्वधर्म । निर्धार हे वर्म चुको नये ।। ' असे तु. म. सांगतात. वादविवादात श्रद्धा, विश्वास असतोच असे नाही. म्हणून दुसरे कारण सूत्रकार सांगतात, ' अनियतत्वात् ' वादविवादाने कोणत्याही गोष्टीचा निश्चय होईल, निर्णय लागेल असे नाही. वादविवादात प्रथम प्रमाणविचार असतो कोणती प्रमाणे स्वीकारून वाद करावयाचा, त्या प्रमाणाच्या प्रामाण्याबद्दल पुन्हा वाद निर्माण होतात. ' शास्त्राची मोकळी । यां कैं कोण वेटाळी । एकवाक्यतेच्या फळी । पैसिजे कैं । ' (ज्ञा. १७-२६) असाच प्रकार होतो. ज्या गोष्टी स्वयंप्रमाणरूप आहेत त्यांच्या-करिता अन्य प्रमाण शोधीत बसावे काय ? भक्ति ही प्रमाणांतरनिरपेक्ष आहे, ती स्वयंप्रमाणरूपा आहे असे मागे एकूणसाठाव्या सूत्रात सागितले आहे, तिच्या-करिता वाद कसा करता येईल ? पतिव्रतेच्या प्रेमाचा विचार वादविवादाने होईल काय ? तेथे वाद कोणता निर्णय देऊ शकेल ? माता व बालकातील प्रेम वादातीत असते. वादविवादाने चित्त रुक्ष कठोर बनते. भक्ती ही मृदु हृदयाचा आश्रय करते, तिचे साध्य साधन निश्चित असते.

एकविध आम्ही न धरू पालट । न संडू हे वाट सापडली ।।१।।

आम्ही नामाचे धारका । नेणों प्रकार आणिक ।
सर्व भावे एक । विठ्ठलचि प्रमाण ।। तु० ।।

भक्तलक्षणांत ' दृढ निश्चय: असे ' एक लक्षण गीतेच्या बाराव्या अध्यायांत सांगितले आहे असा भक्त ' अनियत ' अशा स्वरूपाच्या वादाचा आश्रय कसा करील ?

## सूत्र ७६

## भक्तिशास्त्राणि मननीयानि तदुब्दोधक कर्माण्यपि करणीयानि ।।७६।।

**अर्थ** :

(त्या प्रेमभक्तीच्या प्राप्तीकरिता) भक्तिशास्त्राचे मनन केले पाहिजे आणि त्या भक्तीची वृद्धि होईल अशी कर्मे केली पाहिजेत.

**विवरण** ·

मागील मूत्रात भक्ती ही स्वयंप्रमाणरूपा आहे असे म्हटले आहे. भक्ताने वादाचा अवलंब करू नये, शास्त्राच्या जाळचात अडकू नये असे सागितले आहे हे खरे आहे. तथापि अनेकजन्मार्जित शुभाशुभ सस्काराने काही संशयी-विकल्प निर्माण होणे शक्य असते. अर्जुनासारख्या भक्तालाही भगवदतारविषयी निर्माण झाला होता असे गीतेच्या चौथ्या अध्यायातील त्याच्या प्रश्नावरून दिसून येते तसेच अव्यक्तोपासक व व्यक्तरूपाची उपासना करणारे या दोघामध्ये योगवित्तम कोण असा संशय बाराव्या अध्यायाचे आरंभी त्याने प्रगट केला होता. तसेच श्रीकृष्णानी त्याला साख्य व योग विचार स्पष्ट सागितला असताही तिसऱ्या अध्यायाच्या आरंभी त्याने ' तू या मिश्रित वाक्याने माझ्या बुद्धीला मोह पाडीत आहेस. ' असा आक्षेप श्रीकृष्णावर घेतला होता. परीक्षितीनेही श्रीकृष्णलीलावर आक्षेप घेतले होते. असा प्रकार होत असतो. तसेच ध्यान, जप, पूजा, अशी, भक्ति करताना काही विघ्ने, प्रतिबंध निर्माण होतात. ते दूर कसे करावेत अशी अडचण साधक भक्ताला पडते आणखी कित्येक भाविकांना भक्तीची साधारण भावन असते. पण ती विशेष रूपात परिणत व्हावी असे वाटले तरी त्या त्या विशेषाचे ज्ञान होण्याचे साधन त्यास उपलब्ध नसते. अशा वेळी एखादा अधिकारी महात्मा जो सर्व संशय, विकल्प, अज्ञान दूर करील असा भेटणेही कठिण असते. अश स्थितीत त्या भक्ताकरिता त्याच्या भक्तिमार्गात सहाय्यभूत असणारे साधन य सूत्रात नारदमहर्षि सांगतात की भक्तिशास्त्रांचे मनन करावे.

येथे नुसता शास्त्र असा शब्द वापरला नाही, केवळ शास्त्र शब्दच वापरला असता तर शास्त्रे पुष्कळ आहेत. सर्वच शास्त्रे भक्ति मार्गाचा विचार करणारी, प्रेमभक्तीस पोषक आहेत असे नाही. भक्तिरसामृतसिंधुनामक भक्तिशास्त्रावरील ग्रंथात म्हटले आहे,

**फल्गु वैराग्य निर्दग्धाः शुष्कज्ञानाश्च हैतुकाः ।**
**मीमांसका विशेषेण भक्त्यास्वादबहिर्मुखाः** ॥५–१११

निष्फल वैराग्याने ज्यांचे हृदय होरपळलेले आहे. कोरड्या ज्ञानाच्या गोष्टी करणारे तसेच हेतुवादी तार्किक त्यांतही विशेष रूपाने कर्ममीमांसक हे भक्तिचा आस्वाद घेऊ शकत नहीत.' याही पुढे ते सांगतात,

**इत्येष भक्तिरसिकैश्चोरादिव महानिधिः ।**
**जरन्मीमांसकाद्रक्ष्यः कृष्णभक्तिरसः सदा** ॥ ५–११२

'चोरापासून जसे आपल्या धनाचे रक्षण करावे तसे या मीमांसकादिकांपासून आपल्या हृदयात असलेल्या कृष्णभक्तिरसाचे रक्षण करावे.'

कर्मठ मीमांसकांचा निषेध गीतेच्या दुसऱ्या व नवव्या अध्यायात श्रीकृष्ण भगवंतांनी केला आहे विशेषतः यज्ञयागादिकाना प्रमाणभूत मानणारे हे कर्मठ सर्वयज्ञस्वरूप, सर्वयज्ञाचा भोक्ता, सर्व यज्ञादिकर्माचे फल देणारा जो भगवान् त्यालाच मानीत नाहीत. श्रीकृष्ण भगवान सांगतात,

अखंड सकळ हें सकळां मुखी । सहज अर्पत असे मज एकी ।
की नेणणेयासाठी मूर्खी । नपविजेचि मातें ॥ ज्ञा. ९–२६३ ॥

शास्त्र शब्दाचा अर्थ, त्याचे स्वरूप, इत्यादि विचार सूत्र एकूणसत्तराव्याच्या विवरणात आला आहे शास्त्रे अनेक आहेत. मोठमोठ्या ऋषिमुनीनी ती निर्माण केली आहेत. त्यांत अनेक प्रमेयांचा, प्रमाणांचा सूक्ष्मातिसूक्ष्म, गूढ विचार केला आहे. प्रत्येक शास्त्राचे विशेष प्रयोजनही सांगितले आहे. विचारी पुरुषाच्या अंतःकरणात शास्त्राविषयी आदर असतो, जिज्ञासाही असते, पण आपणास कोणते शास्त्र उपयोगी आहे हे त्याला कळत नाही. जो भगवद्भक्ती करीत असतो त्याला अभ्यास व चिंतनशील बुद्धी लाभली असेल तर त्याच्याकरिता सूत्रकार त्याने भक्तिशास्त्राचे मनन करावे' असे सांगतात.

येथे 'शास्त्राणि' असे बहुवचन आहे. भक्तिशास्त्रेही अनेक आहेत काय ? सर्वच शास्त्रावर जसे अनेक ग्रंथ अनेक अधिकारी पुरुषांनी रचले आहेत तसे भक्तिशास्त्रावरही अनेक ग्रंथाची रचना झाली आहे. श्रीनारदमहर्षिप्रणित नारद पाञ्चरात्रागम हा फार मोठा भक्तिशास्त्रावरील ग्रंथ आहे. हा आगम ग्रंथ मानला जातो. यात भक्तीच्या अनेक अंगांचा अनेक प्रकारे विचार केला आहे. भक्तिरसामृतसिंधूमध्ये शास्त्राचे लक्षण सांगितले आहे,

**शास्त्रमत्र समाख्यातं यद् भक्तिप्रतिपादकम्** । २–४०॥

जे भक्ती प्रतिपादन करणारे असेल त्यालाच येथे शास्त्र म्हटले जाते. स्कंद पुराणात म्हटले आहे,

**वैष्णवाणि तु शास्त्राणि ये शृण्वन्ति पठन्ति च ।**
**धन्यास्ते मानवा लोके तेषां कृष्णः प्रसीदति ।।**

'विष्णु भक्ती प्रतिपादक शास्त्राचे जे पठण श्रवण करतात ते मानव य लोकात धन्य आहेत. त्यांच्यावर श्रीकृष्ण प्रसन्न होतो'

पुराणात असे वर्णन आढळते की ज्या शास्त्रपुराणामध्ये हरिभक्ती सांगितल नाही ते शास्त्र वा पुराण ब्रह्मदेवाने सांगितले असले तरी श्रवण करू नये.

**यस्मिन्शास्त्रे पुराणे वा हरिभक्तिर्न दृश्यते ।**
**श्रोतव्यं नैव तच्छास्त्र यदि ब्रह्मा स्वयं वदेत् ।।**

श्री भागवत एकादश स्कधाच्या तिसऱ्या अध्यायात नवयोगेश्वर व जन सवादात साधकाने इतर शास्त्राची निदा करू नये पण श्रद्धा मात्र भागवत शास्त्र वरच ठेविली पाहिजे असे म्हटले आहे.

**श्रद्धां भागवते शास्त्रेऽनिंदामन्यत्र चापि हि ।। भा.** ११–३–२६

या श्लोकावरील व्याख्यानात श्री एकनाथमहाराज सागतात,

त्याच्या दृढ विश्वासासी । भागवतशास्त्र गुरुपाशी । अभ्यासावें आदरेसी दृढ निश्चयेसी प्रबोधक ।।५०३।। सगुण अथवा निर्गुण । जेथ भगवत्स्वरूप वर्णन का भगवंत बोलिला आपण । अथवा भगवद्गुण कीर्ति जेथे ।।५०४।। तें तें राय शास्त्र जाण । आवडे जैसें जीवु प्राण । विशेषेसी ज्ञान कथन । सप्रेम पूर्ण पढिय ।।५०५।। ए. भा. अ ३

भक्तिशास्त्र म्हणजे श्रीभागवत पुराण आहे हे सर्वसमत आहे. भगवा श्रीकृष्ण अर्जुनास सागतात, 'ते हे कल्पादि भक्ती मिया । भागवत मिषे ब्रह्मया उत्तम म्हणोनि धनंजया । उपदेशिली ।।' ज्ञा. १८–११३२).

पद्मपुराणात म्हटले आहे की, 'ज्यात सर्व शास्त्रसिद्धान्त भरलेले आहेत, संसारभयनाशक, भक्तिप्रवर्तक व श्रीकृष्ण परमात्म्यास प्रसन्न करणारे आहे अ हे भागवतशास्त्र कलियुगात शुकाचार्यांनी कथन केलेले आहे.

सर्वसिद्धान्तसारं हि ससारभयनाशनम् ।
भक्तिप्रवर्धनं यच्च कृष्ण– सतोष हेतुकम् ।
श्रीमद्भागवतं शास्त्रं कलौ कीरेण भाषितम् ।।१८९–११।।

याप्रमाणे भक्तिशास्त्र म्हणून भागवताचे सर्वांनी वर्णन केले आहे. अठर पुराणे, इतिहास-स्मृति, सूत्रे, निर्माण करूनही व्यासमहर्षींच्या चित्ताचे समाधा झाले नाही ते या भगवद्गुणवर्णनप्रधान अशा भागवताने झाले असे भागवताच्य आरंभीच सांगितले आहे.

तसेच श्रीमद्भगवद्गीता हेही भक्तिशास्त्रच आहे. 'गेयं गीता– नामसहस्र

असे श्रीशकराचार्य ही म्हणतात. संतानीही गीतेचे फार माहात्म्य गाइले आहे.

भक्तिशास्त्रे म्हणजे वर सांगितल्याप्रमाणे पाञ्चरात्रागम, गीता, भागवत, पद्मपुराण इ. तर आहेतच पण नारदभक्तिसूत्रे, शाडिल्यभक्तिसूत्रे, श्रीशंकराचार्यांचे विष्णुसहस्रनामभाष्य, स्तोत्रग्रथ, अन्य आचार्यांचे आपआपल्या उपास्याचे वर्णनात्मक करुणापर स्तोत्रग्रंथ, त्याचप्रमाणे सतवाङमय, श्री ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, भावार्थ रामायण, दासबोध, तुलसी रामायण, सूरसागर तसेच सर्व संताच्या अभंगाच्या ज्या गाथा आहेत त्या भक्तिशास्त्रामध्ये समाविष्ट होऊ शकतील. कारण या सर्व ग्रथातून भगवद्भक्तीच्या सर्वांगाचा अनेक प्रकारे विचार केला आहे. भक्तिशास्त्र हे स्वानुभवाचे शास्त्र आहे व हे ग्रंथकार सर्व भक्तिप्रेमाचा पूर्ण अनुभव घेणारे, त्या प्रेमभक्तीत तल्लीन झालेले होते. किबहुना यांच्यामुळेच या भारतात भक्तीचा महिमा विस्ताराला पावला. तसेच बगालमध्ये श्रीचैतन्यमहाप्रभू व त्याच्या रूपगोस्वामी, जीवगोस्वामी इत्यादि शिष्यानी संस्कृत भाषेमध्ये भक्तिशास्त्रावर साहित्य व नवरस प्रधान असे उत्कृष्ट वाङ्मय निर्माण केले आहे भारतातील बहुतेक सर्व प्रचलित भाषातून भक्तिप्रधान वाङ्मय भक्तानी निर्माण केले आहे, त्यामुळेच त्या त्या प्रातात भक्तिमार्ग यथाशक्य नादतो आहे असो.

भक्तिशास्त्रांचे मनन करावे असे नारद महर्षी सागतात त्याचा हेतू भक्तिमार्गाच्या आचरणाकरिता ज्या ज्या गोष्टीची अवश्यकता असते त्यांचे त्याचे यथार्थज्ञान त्यातून होते. भक्ताला आपण ज्याची भक्ती करतो त्याच्या स्वरूपाचे ज्ञान असणे अवश्य असते. तो परमात्मा श्रीहरी सगुण आहे का निर्गुण ? साकार का निराकार ? केवल सगुण व साकार असेल तर जगही सगुण व साकार आहे. मग दोघांत अंतर ते काय ? याचे उत्तर तो निर्गुण निराकार असून आवृत्त न होता भक्तरक्षणाकरिता व भक्ताचे मनोरथ पूर्ण करण्याकरता सगुण साकार बनतो. भागवत, ज्ञानेश्वरी या ग्रथातून या विषयाचा विचार बराच आला आहे. तसेच त्या सगुण साकार मूर्तीच्या ध्यानाचा प्रकारही सागितला जातो. भागवत एकादश स्कंध व त्यावरील श्रीएकनाथ महाराजांची टीका यातून विस्ताराने तो विचार आला आहे. त्याचप्रमाणे भक्तीचे अनेक प्रकार व त्याचे आचरण कोणी कोणी कसे कसे केले, त्याना भगवान कसा प्रसन्न झाला, इत्यादि विचार अनेक भक्तचरित्राद्वारे सांगितला गेला आहे. भक्तीत अंतरातून विघ्ने कोणती येतात, त्याचा परिहार कसा करावा बाहेरून भक्तांना संकटे कशी येतात व भक्तिबळावर ती कशी दूर होतात, अथवा, भगवान प्रगट, अप्रगट रूपाने ती कशी दूर करतो हाही प्रकार अनेक दृष्टान्ताच्याद्वारे कळून यतो. तसेच भगवंताच्या अनेक श्रेष्ठ गुणांचे, लीलांचे ज्ञान होऊन चित्त त्या भगवस्वरूपाकडे आकृष्ट होते. प्रेम निर्माण होण्याचे ते एक महत्त्वाचे साधन आहे.

त्याचप्रमाणे भगवत्प्रिय भक्ताच्या प्रेमपूर्ण कथा ऐकावयास मिळतात त्यातून त्याच्या प्रेमभक्तीचे स्वरूप कळते व आपल्याही अंत:करणात प्रेमभक्तीचा उदय होऊ लागतो. तसेच भगवन्नामाचीअगाध शक्ती, नाममहिमा, नामनामीचा अभेद, केवल नामानेच कोणाकोणाचा कसा उद्धार झाला इत्यादि गोष्टीचे ज्ञान होऊन नामप्रेम उत्पन्न होते भक्तीचे स्वरूप, भक्तीचे अधिकारी, भक्तीचे अनेक भेद व भक्तीचे यथार्थ फल, भक्तीही केवळ साधनच आहे का साध्यही आहे, साध्य असेल तर तिला पचमपुरुषार्थ रूपता कशी व ती स्वरूपाने सुखरूप कशी आहे, मुक्ती व भक्तीत काय अतर आहे इत्यादि अनेक विषयाचे ज्ञान होऊन भक्तीकडे चित्त आकृष्ट होते अशा अनेकानेक गोष्टीचा लाभ होतो व जीवनात भगवत्प्रेम निर्माण होण्यात त्याचा उपयोग होतो म्हणून भक्तिशास्त्राचे मनन करावे असे म्हटले आहे.

या वाक्यातून आणखीही एक भाव प्रगट होऊ शकतो की काही ग्रथ शब्दालकार, अर्थालकार श्रृगारवीरहास्य इत्यादि रसानी युक्त असे दिसून येतात, त्यात भगवान श्रीहरी व त्याच्या भक्तीचा विचार नसतो. केवळ ग्राम्यकथा, ग्राम्य विषयाचीच महती गायिली असते. त्या योगे अंत.करणात विकाराना प्रवेश मिळतो, असे ग्रथ साधकाने हातातही घेऊ नयेत भक्तवर्य श्रीनारद महर्षीनीच व्यास मुनीना उपदेश करताना भागवताच्या आरंभी स्पष्ट म्हटले आहे,

**न यद्वचश्चित्रपदं हरेर्यशो जगत्पवित्रं प्रगृणीत कर्हिचित् ।**
**तद्वायसतीर्थं मुशन्ति मानसा न यत्र हसा निरमन्त्यु शिक्षयाः ॥१०॥**
**तद्वाग्विसर्गो जनताघविप्लवो यस्मिन्प्रतिश्लोकमबद्ध व त्यपि ।**
**नामान्यनन्तस्य यशोऽङ्कितानि यत् श्रृण्वन्ति गायन्ति गृणन्ति साधव.** ॥११॥ भागवत १–५

नारदऋषी म्हणतात, 'हे व्यासमुने! वाणी कितीही रसअलंकारादियुक्त असली, तरी पण त्या वाणीकडून जगताला पवित्र करणाऱ्या श्रीकृष्णाच्या यशाचे गायन कधी झाले नाही तर ती कावळ्याकरिता उष्टे जेथे फेकले जाते त्या जागेसारखी (उकिरड्या सारखी) मानली जाते. मानससरोवरासारख्या सरोवरातील शोभिवंत कमलवनात विहार करणारे हंस त्या स्थानाकडे ढुकूनही पाहणार नाहीत. तद्वत् भगवच्चरण कमलाचा आश्रय करणारे परमहंसभक्त कधीही त्या वाणीत रममाण होणार नाहीत. याच्या उलट ज्या वाक्यात सुदर शब्दरचना नाही, अलंकार नाहीत, अशुद्ध (व्याकरणदृष्टचा) रचना आहे, पण ज्यातील प्रत्येक शब्द भगवंताच्या सुयशसूचक नामांनी युक्त आहे ती वाणी लोकांच्या सर्व पापांचा नाश करून टाकते, कारण संत सत्पुरुष अशाच वाणीने श्रवण-गायन-कीर्तन करीत असतात.'

साराश, भगवन्मुखातून निघालेली अथवा साक्षात्कारी संतांच्या मुखातून

निघालेली जी भाषा असते तीच पवित्र भाषा जगदुद्धार करणारी, भगवत्प्रेमाने भरलेली असते, म्हणून तिला भक्तिशास्त्र म्हणणे वावगे नाही. साक्षात्कारी पुरुषांच्या मुखातून निघालेल्या कोणत्याही शब्दाला वेदाची योग्यता प्राप्त होते असे ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.

तयाचे बिसाट शब्द । सुखे म्हणो येती वेद ।
सदेह सच्चिदानंद । का नोहवा तो ।। ज्ञा. १८–१६४५

तुकाराम महाराज सांगतात,

तुका तरी सहज बोले वाणी । त्याचे घरी वेदात वाहे पाणी ।।१।।

'हितशासनाच्छास्त्रं' : प्राणिमात्राच्या हिताचे शिक्षण देणारे ते शास्त्र म्हणविले जाते. संताचे बोल तसे असतात म्हणून ते बोल भक्तिशास्त्र म्हणविले जातात. अशा भक्तिशास्त्राचे साधकभक्ताने सतत मनन करावे असे सूत्रकार म्हणतात. म्हणजे हृदयात भक्तिभाव दृढ होत जातो. असंभावना, विपरीतभावना राहत नाहीत, विकल्प येत नाही. हृदयात वरचेवर भक्तिप्रेमाचा पूर येऊ लागतो.

सूत्रात 'मननीयानि' म्हटले आहे. श्रवणानंतर मनन होत असते, म्हणून प्रथम श्रद्धेने श्रवण करावे लागते. श्रवण ही पहिली भक्ती आहे श्रवण कसे करावे त्याचाही पुष्कळ विचार संत ग्रंथातून केला आहे भगवद्‌गुण, महात्म्य, लीला याचे प्रेमाने, एकाग्रतेने भक्तमुखातून श्रवण केले पाहिजे. त्यास श्रद्धाश्रवण म्हणतात. ते कसे असावे याबद्दल एकनाथमहाराज म्हणतात,

ऐक श्रद्धेचे लक्षण । करिता हरिकथा श्रवण ।
ज्याचे अर्थारूढ मन । श्रद्धाश्रवण या नाव ।। ७०३ ।। ए०भा० ११

याच अध्यायात पुढे शुद्ध श्रद्धेचे व श्रवणाचे स्वरूप श्रीकृष्ण सागतात,

दृढ आस्तिक्यें समाधान । शुद्ध श्रद्धा त्या नाव जाण । भावार्थे न डंडळी मन । कथाश्रवण सादरें ।। १२३६ ।। वक्त्याच्या वचनापाशी । जडुनि घाली कानामनासी। श्रवणार्थ वाढवी बुद्धीसी । विकिला कथेसी भावार्थे ।। १२३७ ।। जेवी दुधालागी मांजर । सधी पाहावया सादर । तेवी सेवावया कथासार । निरंतर उल्हासु ।।१२३८।।
ए० भा० ११

अशा प्रकारे भक्तिशास्त्रातून भगवद्‌गुण, रूप, प्रभाव इत्यादिकाचे श्रवण केले तरी पुन्हा त्याचे मनन करावेच लागते. उपनिषदातूनही 'आत्मा वा रे श्रोतव्यः मन्तव्यः निदिध्यासितव्यः।' असे सागितले आहे. या विषयात पद्मपुराणातील भागवतमहात्म्यात शंकापूर्वक उत्तर दिले आहे.

**श्रवणं समभागेन सर्वेषामिह विद्यते ।**
**फलभेदः कुतो जात : प्रब्रुवन्तु हरिप्रियाः** ।। ५–७०

'सर्व श्रोते श्रवण सारखेच करतात मग सर्वांना सारखे फल का मिळत

नाही ? फलभेद का होतो हे सागा.' यावर उत्तर दिले आहे.

**श्रवणस्य विभेदेन फलभेदोऽत्र संस्थितः ।**
**श्रवणं तु कृतं सर्वैर्न तथा मननं कृतम् ।। ५-७१ ।।**

'या फलभेदाचे कारण श्रोत्यांच्या श्रवणात भेद होतो म्हणजे श्रवण सर्वांनी समानरूपाने केले असले तरी मनन सर्वांकडून केले जात नाही.' मननाविना श्रवण कसे व्यर्थ होते हे एकनाथ महाराज दृष्टांतपूर्वक सांगतात.

जें जें केलें पुराण श्रवण । तें तें व्यर्थ होय मननेविण । यालागी श्रवण मनन । सावधान करावें ।। ५३० ।। मोलें घेतली जे गाये । दुभते खाता विष होये । तेचि दान देता लवलाहे । दुभती होये परमामृते ।। ५३१ ।। तेवी केलें जें श्रवण । तें मननें परमपावन । तेंचि उपेक्षिता जाण । परिपाकी पूर्ण वांझ होय ।। ५३२ ।। हरिनाम पडता श्रवणी । एका गळोनि जाय वदनी । एका ये कानीचे कानी। जाय निघोनि हरिनाम ।। ५३३ ।। हरिनाम पडता श्रवणी । ज्याचे रिघे अंतःकरणी । सकळ पापा होऊनि धुणी । हरिचरणी तो विनटे ।। ५३४ ।। ऐसें मननयुक्त श्रवण । करितां वोसंडे हर्षपूर्ण । तेणें हर्षे हरिकीर्तन । करी आपण स्वानदें ।। ५३५ ।।
ए० भा० २

अन्न खाल्ले तरी ते पूर्ण पचले तरच शरीराचे रक्षण होते. तसे श्रवणाचे मनन झाले तर ते श्रवण पचले व फलदायी झाले असे म्हटले जाते मनन, चिन्तन, ध्यान असा सहजच क्रम निर्माण होतो. भक्तिशास्त्राचे मनन म्हणजे भक्तिशास्त्राचा विषय एकमेव भगवान आहे, त्याचेच अखंड मनन करावे असा अर्थ आहे. मनाच्या अनादिकालीन चंचलतेच्या संस्काराने एकदम मनन साधणे जरी कठिण असले तरी सततच्या अभ्यासाने ते साधू शकते. ' अभ्यासासी काही । सर्वथा दुष्कर नाही । यालागी माझ्या ठायी । अभ्यासें मिळे ।।' (ज्ञा. १२. ११३) असे श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात.

जरी भक्तिशास्त्राचे श्रवण, मनन झाले तरी तेवढ्याने भागत नाही तर सूत्रकार पुढे ' तदुद्बोधककर्माणि करणीयानि ' असे सागतात. पराप्रेमलक्षणाभक्तीमध्ये ज्या क्रिया घडतात त्या सर्व त्या प्रेमाने भारलेल्याच असतात. तेथे 'पडले वळण इंद्रियां सकळां । भाव तो निराळा नाही दुजा ।। तु० ।।' अशी अवस्था सहजच झालेली असते. पण साधकभक्ताकरिता अत करणात भक्तीचा अधिकाधिक उद्रेक व्हावा एतदर्थ काही कर्मे अवश्यक आहेत. मनुष्यशरीर कर्मप्रधान आहे. निषिद्ध, काम्य इ०कर्मे भक्ताला वर्ज्यच आहेत, नित्यनैमित्तिक कर्मे जी वर्णाश्रमाला उचित ती भगवदर्पण बुद्धीने कर्तृत्वमद व फलास्वाद टाकून करावीत असे भगवंतानीच गीतेमध्ये सांगितले आहे. किंबहुना सर्व कर्मे भगवंतालाच अर्पण करावीत. असेही सांगितले आहे.

भक्तीस उद्‌बोधक कर्मे कोणती आहेत याचा विचार भक्तिशास्त्रावरील ग्रथातून अनेक प्रकारे सांगितला आहे. 'हरिभक्तिविलास' या ग्रंथात साधन भक्तीची चौसष्ट अंगे सांगितली आहेत. ती सर्व भक्तिरसामृतसिंधू या ग्रथातही आलेली आहेत. तसेच भक्तीला प्रतिकूल कर्मे कोणती आहेत तीही सेवापराध या नावाने सांगितली आहेत. त्याचेही चौसष्ट प्रकार वैष्णवग्रंथातून सागितले आहेत. श्रीभागवत एकादश स्कंधातील अकराव्या अध्यायात श्रीकृष्णानी उद्धवास भक्ति-पोषक कर्माचा सविस्तर विचार सांगितला आहे. त्याचा केवळ भावार्थच खाली देत आहो. 'श्रीकृष्ण म्हणतात उद्धवा! माझ्या रामकृष्णादि प्रतिमा यांचे दर्शन घेणे, त्यास स्पर्श करणे, आलिंगन देणे, आदराने त्याची पूजा करणे, सेवा करणे, स्तोत्रे म्हणून आळविणे, नम्रतेने माझ्या गुणकर्माचे सकीर्तन करणे माझ्या कथा, लीला श्रद्धेने ऐकणे, माझे ध्यान करणे, जे काही प्राप्त होईल ते मलाच अर्पण करणे, माझे अनन्यदास्यत्व स्वीकारून मनबुद्धिआत्म्यासह मला अर्पण करणे, आत्म-निवेदन करणे, माझ्या जन्माच्या तसेच लीलाच्या कथा प्रेमाने सागणे, माझ्या जयन्त्यादि उत्सवात सहभागी होणे, गायन, नर्तन, वादन व कथा यांच्याद्वारे माझ्या-मंदिरात उत्सव करणे, माझ्या श्रेष्ठ स्थानाच्या यात्रा वार्षिक पर्वकाळात करणे, तुलसी फुले, नैवेद्य अर्पण करणे, वेद विहित अथवा तत्रोक्त दीक्षा घेऊन मत्प्रीत्यर्थ नाना व्रताचे अनुष्ठान करणे, माझ्या मूर्तिस्थापनेविषयी श्रद्धा ठेवणे, मंदिरात उद्यानउपवनादि निर्माण करणे, मंदिरात झाडणे, सारवणे, रागोळ्या काढणे इत्यादि एखाद्या सामान्य दासाप्रमाणे मंदिरातील सेवा करणे, जे जे व्यवहारात उत्तम समजले जाते व जे स्वतःस अत्यत प्रिय वाटते ते सर्व मला अर्पण करणे, निरभिमानतेने दंभरहित होऊन आपण केलेल्या कर्माची वाच्यता न करणे, मला अर्पिलेल्या कोणत्याही पदार्थाचा स्वार्थाकरिता उपयोग न करणे इत्यादि इत्यादि अनेक कर्मे सागितली आहेत. (ए० भा० अ० ११ श्लोक चौतीस ते सत्तेचाळीस पाहा) एवढा विचार करून शेवटी श्रीकृष्ण सागतात,

**इष्टापूर्तेन मामेवं यो यजेत समाहितः ।**
**लभते मयि सद्भक्तिं मत्स्मृतिः साधुसेवया ।। ए० भा० ११-४७**

जो शात पुरुष इष्टपूर्तकर्मांनी माझे आराधन करतो तो माझ्या उत्तम भक्तीच्या लाभाचा अधिकारी होतो, तसेच साधूच्या सेवेने त्याला माझी स्मृति प्राप्त होते.

मागे अकराव्या सूत्रात भगवद्‌भक्ताने लौकिकवैदिक कर्मात भक्तीस अनुकूल कर्मे करावीत व विरोधी कर्मांत उदासीन राहावे असे म्हटले आहे तर अठ्ठेचाळी-साव्या सूत्रात अनन्यभक्त कर्मफल व कर्मांचाही तसेच वेदाचाही त्याग करतो असे सागितले आहे, ते भक्तिभावास विरोधी अशी जी कर्मे असतील त्याचेविषयी आहे

असे समजावे. जी कर्मे भगवद्भक्तीस पोषक, उद्बोधक, आहेत ती कर्मे केली पाहिजेत असे या सूत्रात सागतात. वास्तविक भक्ताचे प्रत्येक कर्म भगवद्विषयकच असते. श्रीकृष्णभगवान सागतात, 'जो मजचि एकालागी । कर्मे वाहातसे अंगी । जया मी वाचूनि जगी । गोमटे नाही ॥ ६८६ ॥' ज्ञा० ११. तरीही साधक भक्ताने ध्यान, जप, पूजा, नाममत्रजप, तीर्थयात्रा, सत्संग, इत्यादि कर्मे अखंड करीत राहिले पाहिजे, भगवत्कथा, भगवल्लीलाश्रवण, संतचरित्राचेही श्रवण करीत राहिले तरच अंत:करणात भगवद्भाव स्थिर राहू शकतो. साधकभक्ताने ही कर्मे अवश्यमेव आचरिली पाहिजेत.

## सूत्र ७७

## सुखदु:खेच्छालाभादि त्यक्ते काले प्रतीक्ष्यमाणे क्षणार्धमपि व्यर्थं न नेयम् ॥७७॥

**अर्थ :**

सुख, दु ख, इच्छा, लाभ इत्यादिकाचा त्याग होईल अशा कालाची वाट पहात अर्धा क्षणही (भजनाविना) व्यर्थ जाऊ देऊ नये.

**विवरण :**

मागील सूत्रात भक्तिशास्त्राचे मनन व भक्तिवर्धक कर्मांचे आचरण सागितले, पण हे करीत असता भक्तापुढे काही प्रतिबंधक अशा गोष्टी येत असतात. अनादिकालीन शुभाशुभ सस्कारामुळे सुख, दु.ख, इच्छा; लाभ, इत्यादी पुढे येऊन उभे राहतात. त्याचे संस्कार एवढे प्रबल असतात की जीव त्यांच्याशी तत्काल समरस होतो. पूर्वजन्मातील शुभकर्माने अनुकूल अदृष्ट निर्माण होते व त्याचे फल अनुकूल विषयप्राप्ती व त्या विषयापासून सुखाकार वृत्ती निर्माण होत असते. ती वृत्ती जीवाला आपल्याकडे आकृष्ट करीत असते कारण जीवाची नैसर्गिक प्रवृत्ती सुखाकडे असते. सुखाविना जीव जगू शकत नाही. वास्तविक सुख हे जीवाच्या हृदयात आहे, तरी वृत्ती बहिर्मुख असल्यामुळे त्या अतरातील सुखाचा अनुभव तिला घेता येत नाही, ती बाहेर सुख शोधीत असते. पूर्व संस्कारामुळे विषयाच्या ठिकाणी नित्यत्वबुद्धी व सुखबुद्धी असल्याने अनुकूल विषय प्राप्त झाला असता ती इच्छावृत्ती क्षणभर अंतर्मुख होते व त्या अंतर्मुख मनोवृत्तीत अंतरात असलेल्या आनंदरूप आत्म्याचे प्रतिबिंब पडते तेव्हा तिला सुखाचा भोग होतो. वास्तविक

ते सुख परमात्म्याचेच, पण वृत्तिअंतर्मुखतेस बाहेरचे विषय कारण झाल्यामुळ तिला ते विषयजन्य वाटते व क्षणैक समाधान होते, पण विषय हे क्षयातिशयदोषाने युक्त असतात अथवा अनुकूलबुद्धी चंचल असल्याने प्राप्त विषयाचा नाश झाला अथवा त्याचे ठिकाणी जे दोष असतात त्यांच्यामुळे तो विषय जाऊन अन्य विषयाकडे ती सुखबुद्धी जात असते, असा जन्मभर व्यवहार होतो. म्हणजे त्या विषयसुखापासून परिणामी कितीही दुःख झाले तरी त्या सुखाचा त्याग होत नाही. कारण विषय सत्यत्वबुद्धी, सुखत्वबुद्धी व वृत्तीची बहिर्मुखता नष्ट होत नाही.

विषयसेवनात परिणामी दुःख आहे इतकेच नव्हे तर विषयाची आसक्ति ही मनुष्यास पापपुण्याचा विचार करू देत नाही. त्या विषयाकरिता निषिद्ध कर्मे करून पापही केले जाते व त्याचे फलस्वरूप अंती नरक प्राप्ती अनिवार्य होते. ज्ञानेश्वर महाराज सांगतात, ' आणि वाढे जंव जंव मोहो। तव तंव विषयी रोहो। विषय तेथ ठावो। पातकासी ।। ३७० ।। पापें आपले नि थावें। जंव जंव करितीं मेळावें। तंव जिताचि आघवे। येती नरका ।।३७१।। ज्ञा. १६

संतवाङ्मयातून या विषयाचा अनेक प्रकारे विचार केलेला आहे. विचारी पुरुषास या सुखाचा खोटेपणा, परिणामी दुःखरूपता, बाधकता ही सत्सगतीने सच्छास्त्र श्रवणाने, विचाराने पटते व तो त्याचा त्याग करावा अथवा व्हावा अशी भावना ठेवीत असतो. पण केवल भावना ठेवण्यानेच भागत नाही.

तसेच जीवनात सुखाबरोबर दुःखही येतच असते, त्याची कारणे पुष्कळच आहेत. पण पूर्वजन्मार्जित पापकर्माचा संचय अदृष्टरूपाने दुःख देत असतो. दुःखाचे अध्यात्मिक, अधिदैविक, अधिभौतिक असे मुख्य तीन प्रकार मानले आहेत. यांसच त्रिविध ताप म्हणतात. या तीन प्रकारातून पोटभेदाने अनेक प्रकार निर्माण होतात, ते दुःख कोणीही अनुकूल मानीत नाहीं, कोणी अपेक्षाही करीत नाही, पण प्रारब्ध बलेकरून भोगण्याविना गत्यंतर नाही. श्रीकृष्ण उद्धवास सांगतात, ' मजलागी दुःख होआवे। ऐसे कोणी भावीना जीवे। न वाछिता दु.ख पावे। येणे न संभवे स्वतंत्रता ।। ४४६ ।।' (ए. भा. १०) असा प्रकार असल्याने या सर्व दुःखाचा त्याग व्हावा असे वाटणे स्वाभाविक आहे कारण दुःख हे जीवाचे स्वरूप नाही. म्हणून ते प्रतिकूल वाटते. तरी ते टळणे संसारात अशक्य आहे. विचारी साधक अनेक प्रयत्न करीत असतो. भक्त तर देवावर भार घालून बसतो.

ऐसे दुःख कोण हरील माझें। कोणा भार घालू ओझे।
भवसिधुतारक नाम तुझें। धावसी काजें आडलिया ।। तु. ।।

अशा या दुःखाचा त्याग व्हावा, म्हणजे संबंध सुटावा असे त्याला वाटते व ते केव्हां सुटेल याची वाट पाहत तो बसत असतो.

तशीच मनुष्याची अमर्याद अशी इच्छावृत्तीही आहे. किंबहुना आत्मा जीवदशेत आला की पहिली जी वृत्ती तिला इच्छा म्हणतात. ज्ञानेश्वर महाराजांनी इच्छेचे स्वरूप-लक्षण चांगल्याप्रकारे सांगितले आहे.

तरि भूतलें आठवे । कां बोलें कानू झांकवे । ऐसियांवरि चेतवे । जे वृत्ति गा इंद्रियाविषयांचियें भेटी । सरिसीचि जे उठी । कामाची बाहुटी । धरोनिया जियेचेनि उठिलेपणें । मनासँघ धावणें । न रिगावे तेथ करणें । सूति तोंडें । जिये वृत्तिचिया वाढी । बुद्धि होय वेडी । विषयी जिया गोडी । ते हे इच्छा ज्ञा. १३. १२२—२५

या इच्छेसच अभिलाषा, आशा, तृष्णा, स्पृहा, कामना इत्यादी नावे आहेत. ही इच्छा जीवनाच्या अपूर्णतेत असते. तसेच कितीही विषय मिळाले तरी ती पूर्ण होतेच असे नाही, नव्या नव्या विषयांकडे धावत असते. मागे चव्वेचाळिसाव्या सूत्रामध्ये दुःसंग वर्णनात कामादिकांचा विचार आलाच आहे. सर्व इच्छांची पूर्ती होणे हे अशक्यच आहे. ज्ञानेश्वरमहाराज सांगतात, 'तैसी खवळे चाड । होय दुःखासकट गोड । इंद्रश्रीही सांकड । गमोचि लागे ॥ (१४–१६३)' असा प्रकार आहे, इच्छेची पूर्णता करीत बसण्याच्या प्रयत्नापेक्षा इच्छेच्या विषयाचे अनित्यत्व जाणून सर्व इच्छांचा त्याग करणे उचित आहे असे विवेकी पुरुषास वाटते. तसेच इच्छेचा संभवतात. विषय प्राप्त झाला की त्यास लाभ म्हणतात. त्याचे अनेक प्रकारही गुणपरत्वें, संस्कारपरत्वे, अधिकारानुसार लाभात भेद पडतात. ऐहिक, पारत्रिक, असेही प्रकार असतात. त्याकरिता मानव जीवापेक्षा अधिक प्रयत्नही करीत असतो. कित्येक वेळा ते प्रयत्न निष्फळ होतात तर कित्येक वेळा प्रयत्नाप्रमाणे लाभ प्राप्त होतो पण तो पर्याप्त वाटत नाही. त्या लाभापासूनच पुन्हा लोभ वाढत जातो. 'लोभमूलानि पापानि,' याप्रमाणे त्या लोभाला बळी पडून मनुष्याकडून अनेक पापे घडू लागतात. म्हणून विचारी पुरुष त्या परिणामी घातक अशा लाभाचाही त्याग व्हावा अशी अपेक्षा ठेवीत असतो. आता पावेतो सांगितलेल्या सुख, दुःख, इच्छा, लाभ यांचा त्याग व्हावा असे वाटले व प्रयत्नही केले तरी तत्काल त्यांचा त्याग होतोच असे नाही. साधकास त्या कालाची वाट पाहत बसावे लागते. कित्येक मंदप्रज्ञ साधक केवळ या कालाची वाट पाहत बसतात. पण त्या कालात काही साधना करीत नाहीत. साधनाविना जो काल जातो तो आळसात जातो. साधकाने त्या आलस्यालाही थारा देऊ नये. किंबहुना सूत्रकार सांगतात 'क्षणार्धमपि व्यर्थं न नेयम्'. संसारात अहर्निश सायास केले जातात 'सायास करिसी प्रपंची दिननिशी हरीसी न भजसी कवण्या गुणे ॥' असे ज्ञानेश्वर महाराज हरिपाठात विचारतात. परमार्थात अज्ञान, अश्रद्धा व आळस हे तीन 'अकार' फार बाधक आहेत. उपेक्षेने व आळसाने आपला बराच काळ व्यर्थ जातो. पण तेवढ्यामुळे फार हानी

होते. भागवत एकादश स्कंध, यदु अवधूत संवादात स्पष्ट म्हटले आहे, 'येथे आळसू जेणें केला । तो सर्वस्वें नागवला । थिता परमार्थ हातीचा गेला । आवर्ती पडला भवचक्रीं ।' (ए. भा. ७९–३३८.) प्रपंचभोग प्रारब्धाधीन असतात. ते कदाचित् प्रयत्नाविना प्राप्त होऊ शकतात. पण भगवद्भक्ती ही प्रयत्नपूर्वक करावी लागते गीतेमध्ये 'यतन्ति' 'यततां' 'प्रयत्नाद्यतमानस्तु' अशी पदे वापरली आहेत. परमार्थ दृष्टीने आयुष्यातील एकएका क्षणालाही फार मूल्य आहे.

**आयुषः क्षण एकोऽपि न लभ्यो हेमकोटिभी**
**सचेद्विफलतां याति का हानिस्तु ततोऽधिका ।**

**भावार्थरामायण युद्धकांड**. ५८–४४

कोटिकोटि वेंचिता सुवर्ण । नरदेहींचे आयुष्य जाण ।
न मिळे अर्धक्षण । नाना साधने करितांही ।। भा रा. यु. ५८.४४

सूत्रकार क्षणार्धही वाया घालवू नये असे सांगतात. तो वाया का घालविला जातो याची कारणे वर सांगितलीच आहेत ती दूर करण्याचा सतत प्रयत्न साधक-भक्ताने केला पाहिजे. लोहाराच्या भट्टीतील अग्नि प्रज्वलित रहाण्याकरितां तो सतत भाता चालू ठेवीत असतो. भात्यातून जोरात निघालेला वारा त्या निखाऱ्यावर राख साचू देत नाही, साचली तर दूर करतो. तद्वत् साधनाविना काळ वाया चालला तर जीवनावर विकाराची राख साचली जाते. साधनरूप अग्नि मद होतो. या करिता सतत दक्षतेने अभ्यास करीत चालले पाहिजे, म्हणूनच श्रुती देखिल 'उत्तिष्ठत, जाग्रत, प्राप्यवरान्निबोधत' । 'उठा (कार्यतत्पर व्हा)' जागे व्हा (आळस टाका), श्रेष्ठ पुरुषाच्याकडून ज्ञान मिळवा.' असे उद्घोषाने सांगत आहे. एकनाथ महाराज दृष्टांतपूर्वक सांगतात,

छेदोनिया आळसासी । दवडूनिया निद्रेसीं । आत्मचिंतन अहर्निशी । अवि-श्रमेसी साधावें ।।३४०।। रणीं निघालिया शूरासी । न जिणता परचक्रासी । विसावा नाही क्षत्रियासी । तेणें वेगेसी साधावे ।।३४१।। साधावया आत्मलग्न । सावधान बिजवराचें मन । तेणें साक्षेपें आपण । सायुज्य लग्न साधावें ।।३४२।। रायाचे एकुलते एक । चुकल्या अवचटे बाळक । तो जेवी शोधी सकळ लोक । तेवीं निजसुख साधावें ।।३४३।। काळाचा चपेट घात । जंव वाजला नाही येथ । तंव साधावया परमार्थ । आयुष्य व्यर्थ न करावें ।।३४४।। ए. भा. ९.

भगवान श्रीकृष्ण हेच सांगतात;

आवडी करितां माझें भजन । विसरे भोगाची आठवण । माझे प्राप्ती लागीं-जाण । रिता क्षण जावों नेदी ।।२५०।। ए. भा. १९.

निमिषार्ध त्रुटी लवक्षण । जे न सोडिती हरिचरण । ते वैष्णवामाजी अग्रगण्य । राया ते जाण उत्तम भक्त ।। ए. भा. २–७६१

असे नवयोगेश्वर जनक संवादात म्हटले आहे 'रिकामा अर्धघडी राहो नको' असे ज्ञानेश्वर महाराज हरिपाठात सागतात त्याचे मर्म हेच आहे. यासच सदभ्यास असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. या अभ्यासाने काय सिद्ध होणार नाही? 'असाध्य ते साध्य करिता सायास। कारण अभ्यास तुका म्हणे' हे वचन प्रसिद्ध आहे.

सदा सावधान बुद्धी। लवनिमिष वांया जावो नेदी।
अनुसंधान त्रिशुद्धी। तुटोनेदी सर्वथा ॥ ए. भा. ९-१६३

श्रीकृष्ण उद्धवास हेच सागतात.

माझेनि भजनें कृतकृत्यता। दृढ विश्वास धरूनियां चित्तां।
भजनी प्रवर्तावें सर्वथा। अविश्रमता अहर्निशीं ॥६५२॥
माझ्या भजनाच्या आवडी। नुरेचि अराणुकेची वाडी।
वाया जावो नेदी अर्धघडी। भजन परवडी या नांव ॥६५३॥

ए. भा. ११.

खऱ्या भक्ताची ही स्थिती सहज असते हे मागे सूत्र एकोणिसाव्यात 'तद्विस्मरणे परमव्याकुलता' या शब्दात सांगितली आहे. पण साधक भक्ताला ही स्थिती अनायासे प्राप्त होत नाही. त्याने अभ्यासाने प्रयत्नपूर्वक, संपादन केली पाहिजे. कोणास वाटेल गीतेमध्ये सांगितल्याप्रमाणे अंतकाली भगवत्स्मरण केले म्हणजे उद्धार होईल. पण हे शक्य नाही. जन्मभर जे केले असेल, जी भावना सतत अंतःकरणात बाळगिली असेल तीच मृत्यूचे वेळी पुढे येत असते. जन्मभर संसाराचे, विषयाचेच चितन केले असेल तर परमात्मा मृत्यूचे वेळी पुढे कसा येईल? शिवाय मृत्यूचे समयी कफवातपित्तादि त्रिदोषामुळे मूर्च्छा प्राप्त झाली असता भगवत्स्मरण कसे होईल? म्हणून ज्या वेळी आपली मन, बुद्धी, इंद्रिये, कार्यक्षम आहेत त्याच वेळी चित्ताला भगवत्स्मरणचिंतनाकडे प्रवृत्त करावे. एक भक्त देवास प्रार्थना करतो,

**कृष्ण त्वदीय पदपङ्कज पञ्जरान्ते अद्यैव मे विशतु मानस राजहंसः।**
**प्राणप्रयाणसमये कफवातपित्तैः कण्ठावरोधनविधौ स्मरणं कुतस्ते ॥ १ ॥**

'हे श्रीकृष्णा तुझ्या चरण कमलरूपी पिंजऱ्यात माझा हा मनरूपी राजहंस आजच प्रवेश करो. कारण प्राण जाण्याचे वेळी जेव्हा कफवातपित्तवृद्धि होऊन कंठ अवरुद्ध होईल त्यावेळी तुझे स्मरण कसे होऊ शकेल?'

म्हणून सूत्रकार स्पष्ट शब्दात सुचवीत आहेत की क्षणभरही भगवद्भजना। विना काळ वाया घालवू नये. वाया गेलेला क्षण काळ मोजीत असतो. भगद्भजनातील क्षणावर कालसत्ता चालत नाही. श्रीकृष्ण सांगतात,

करितां माझी कथाश्रवण। काळासीं रिगमू नाहीं जाण। इतरांचा पाडु कोण ॥

कर्मबंधन तेथे कैचे ।।७००।। जो हरि कथेनें गेला क्षण । तो काळासी नव्हें प्राशन । काळ सार्थकता त्या नांव जाण । जै श्रद्धा श्रवण हरिकथा ।।७०१।। ए. भा. ११

आरंभी सूत्रात सुखदुःख इच्छा लाभादिकांच्या त्यागाची साधक प्रतीक्षा करीत असतो असे म्हटले होते, जर सर्व काळ भगवच्चिंतनात जाऊं लागला तर त्याच्या सामर्थ्याने लौकिक सुख, दुःख, इच्छा, आदिकांचा सहजच त्याग होऊ शकेल.

आनंदे निर्भर असो भलते ठायीं । सुखदु.खा नाही चाड आम्हा ।।
आम्हां भयचिंता नाही धाक । जन्ममरण कांही एक ।
झाला इहलोकीं परलोक । आले सकलिक वैकुंठ ।।
न कळें दिवस कीं राती । अखंड लागलीसें ज्योती ।
आनंद लहरीची गती । वर्णूं मी किती तया सुखा ।।

हे तुकाराम महाराजांचे उद्गार हेच सांगतात. अखंड भगवद्भजनाने गोकुलवासी गोपिकांची कशी निर्द्वंद्व स्थिती झाली होती याचे वर्णन तुकाराम महाराजांनी केले आहे ते फार उद्बोधक आहे.

कृष्णाचिया ओव्या गाणें गीती गीत । कृष्णमय चित्त झाले त्यांचें ।।
त्यासी ठावा नाही बाहेरील भाव । अंतरीच वाव सुख झालें ।।
सुखें तया दिस न कळे हे राती । अखंड या ज्योती गोविंदाची ।।
चितनेंचि धाले न लगे अन्नपाणी । तुका म्हणे मनी समाधान ।।

कृष्णाचिया सुखें भूक नाही तहान । सदा समाधान सकळांचें ।।
विसरू कामाचा तुका म्हणे झाला । उद्वेग राहिला जावें यावें ।।

ही अवस्था अखंड भगवत्स्मरण करणाऱ्या भक्तास क्रमाने प्राप्त होते, असा अनेक भक्त भगवतांचा स्वानुभव आहे

सूत्रात ‘व्यर्थं’ असे पद आहे तेही महत्त्वाचे आहे. मनुष्याचा काल संसारात द्रव्य, मान, कीर्ती, भोग, लौकिक, आरोग्य इत्यादि संपादन करण्यात जातो, तेव्हा त्याला तो काळ आपला योग्य कामात गेला असे वाटत असते. त्यात त्याला समाधानही वाटते, पण संतमहात्मे त्याला व्यर्थ म्हणतात. ‘वाया येरझार हरीविण ।’ असे ज्ञानेश्वर महाराजही म्हणतात. याचे कारण नरदेह हा केवळ भगवत्प्राप्ती करताच निर्माण झाला आहे. त्यातच त्याची सार्थकता आहे· श्रीभागवताच्या द्वितीय स्कंधाच्या तिसऱ्या अध्यायात श्रीशुकाचार्यांनी या विषयाचा स्पष्ट व विस्तृत विचार सांगितला आहे.

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षिते ! ज्या पुरुषाचा काल भगवद्गुणश्रवण अथवा गायनात जातो त्याच्यावाचून सर्व मानवांचे आयुष्य व्यर्थ जात आहे असे समजावे. कारण वृक्षही जिवंत राहत नाहीत काय ? लोहाराचा भाताही श्वास

घेत नाही काय ? ग्रामपशूही खातपीत मैथुनादि करीत नाहीत काय ? ज्याच्या कानात श्रीकृष्णलीलाकथा कधी पडत नाही तो नरपशु कुत्री, ग्रामशूकर, उंट, गर्दभ याच्यापेक्षाही नीच म्हणावा लागेल. जो मनुष्य श्रीकृष्णकथेचे कानाने कधी श्रवण करीत नाही त्याचे कान म्हणजे मूषकाच्या बिळासारखे आहेत. जी जिव्हा भगवल्लीलांचे गायन करीत नाही ती बेंडकुळीच्या जिव्हेप्रमाणे निरर्थक ओरडणारी आहे. जे मस्तक कधी भगवच्चरणापुढे नम्र होत नाही ते किरीटादिकानी विभूषित असले तरी शरीराला भारभूत आहे. जे हात भगवत्पूजासेवा करीत नाहीत ते कंकणादिकानी शोभित असले तरी प्रेताच्या हातासारखे निरर्थक आहेत. जे नेत्र भगवद्दर्शन करीत नाहीत ते मोराच्या पंखाच्या डोळ्यासारखे निरर्थक समजावेत. जे पाय भगवत्यात्रा करीत नाहीत ते चालत असले तरी उभ्या वृक्षासारखेच होत. ज्या पुरुषाने भगवत्प्रेमी संताच्या चरणाची धूळ कधी मस्तकावर धारण केली नाही तो जिवंत असूनही प्रेतरूपच आहे. जे भगवंताच्या मंगलमय नामाचे श्रवण झाल्यावरही श्रद्धाहीनतेमुळे द्रवावस्थेस प्राप्त नाही. ते हृदय नाही तर लोखंड आहे.

येथे स्पष्ट आणि थोडचा कठोर भाषेत ही व्यर्थता पटवून दिली आहे. जर काळ भगवच्चिंतनाविना घालविला जाईल तर सर्व जीवनच व्यर्थ होईल म्हणून ‘ क्षणार्धमपि व्यर्थ न नेयम् ’ असे आवर्जून सांगितले आहे.

## सूत्र ७८

### अहिंसासत्यशौचदयास्तिक्यादिचारित्र्याणि परिपालनीयानि ॥७८॥

**अर्थ :**

(साधक भक्ताने) अहिंसा, सत्य, पावित्र्य, दया, आस्तिकता आदि सद्गुणांचे सर्वप्रकारे पालन करावे.

**विवरण :**

मागील सूत्रात भक्ती वाढविणारी कर्मे करावीत असे सूत्रकारांनी सांगितले, त्या कर्मांचा विचार केला. नियम असा आहे की गुणाप्रमाणे मनुष्याची वृत्ती बनते व वृत्तिप्रमाणे कर्मे घडतात. ती ती योग्य कर्मे घडावीत असे वाटत असेल तर त्या त्या कर्मांना पोषक असे चांगले गुण वाढले पाहिजेत. त्या गुणाचे पालन साधकभक्ताकडून योग्य प्रकारे झाले पाहिजे. तर त्या गुणाप्रमाणे चांगल्या कर्मांचेही आचरण

होईल. ' आवडे ते वृत्ति किरीटी । आधि मनौनीचि उठी । मग ते वाचा दिठी करासी ये ।।' (ज्ञा० १३–२९८) असा प्रकार आहे. असे अनेक गुण आहेत पण त्यातील प्रमुख पाच गुणांचा सूत्रात निर्देश केला आहे. ही पाच संख्या यावत् दैवी गुणांचे उपलक्षणस्वरूप आहे. हे सांगण्याचे कारण असे असावे की कित्येक देव-देवतांची भक्ती करणारे दिसतात पण ते त्या देवतांना संतुष्ट करण्याकरिता हिंसेचा अवलंब करीत असलेले दिसतात. गीतेमध्ये तमोगुणी भक्तांचे असे प्रकार सांगितले आहेत. (गीता अ० १७ श्लोक ५–६)

तसेच कित्येक सकाम भक्ती करणारे असत्याचा अवलंब करूनही भक्ती करीत असलेले दिसतात तसेच अनेक प्रकारची कायिक, वाचिक, मानसिक पातके करून, अतर्बाह्य पावित्र्य नसताही, किबहुना त्या पातकाबद्दल त्यांना पश्चात्तापही झालेला नाही असेही काही देवदेवतांची भक्ती करणारे आढळतात. त्याचप्रमाणे ज्यांचे अत.करणात यथार्थ आस्तिक्यबुद्धि नाही, गीतेमध्ये राजस, तामस श्रद्धा जिला म्हटले आहे त्या श्रद्धेचा स्वीकार करून, भक्ति करतात. त्यांची ती क्रिया खऱ्या भक्तीमध्ये समाविष्ट होत नाही अशा भक्त म्हणविणाऱ्यांना खऱ्या भक्तीचे फळही प्राप्त होत नाही. जसे जमिनीत बी पेरण्याचे अगोदर ती नांगरली पाहिजे. सपाट केली पाहिजे. तिच्यातील गवत इत्यादी पूर्ण काढून टाकले पाहिजे, तिच्यात ओल आली पाहिजे. मगच पेरणी करणे योग्य आहे. तसे भक्तिबीजाची पेरणी ज्या अंत.करणात करावयाची असते त्याची खरी तयारी सूत्रात सांगितलेल्या साधनांनी होत असते.

दैवी प्रकृतीचा विचार गीतेच्या सोळाव्या अध्यायांत विस्ताराने सांगितला आहे. दैवी प्रकृतीची सव्वीस लक्षणे आहेत. अभय, सत्त्वसंशुद्धी, ज्ञानयोग व्यवस्थिती दान, दम, यज्ञ, तप, आर्जव, अहिंसा, सत्य, अक्रोध, त्याग, शांती, अपैशून्य, दया, अलोलुप्त, मृदुता, लज्जा, अचापल्य, तेज, क्षमा, धैर्य, शौच, अद्रोह, मानाची अपेक्षा नसणे, अशी ही सव्वीस लक्षणे आहेत. सूत्रातील पांच लक्षणाच्याद्वारे संक्षेपाने या सर्वांचाच स्वीकार होतो. या लक्षणांचा मुद्दाम निर्देश करण्याचे कारण अनादिकालीन अशुभ संस्काराने मानवाच्या अंतःकरणात नैसर्गिक हिंसा, असत्य, मालिन्य, पापप्रवृत्ती, अश्रद्धा, सूक्ष्मरूपाने का असेना चौर्यप्रवृत्ती इ० दुर्गुण असतात. ' वेदे न करिता प्रेरणा । अनिवार विषयवासना ।।' असे एकनाथमहाराजांनी म्हटले आहे. पण या वृत्ती तितक्याच घातकही आहेत. लहान मुलांना निषिद्ध पदार्थ, मृत्तिका आदि, भक्षणाची सहजप्रवृत्ती असते पण ती आरोग्याची नाशक असते. ती प्रयत्नांनी दूर करणे हितावह असते. त्याप्रमाणे हिंसा, असत्य, मालिन्य इत्यादि अन्याय्य प्रवृत्ति संसारातही बाधक आहेत. त्यांचा त्याग उचित आहे. कदाचित अपवादभूतरूपाने यज्ञ, युद्ध, इत्यादिकात हिंसा, तसेच कोठे असत्य

इत्यादी थोडे खपत असले तरी भक्तिमार्गात हे दोष मुळीच खपत नाहीत. ज्याला भक्त व्हावयाचे त्याला भगवद्व्यतिरक्त अन्य कोणताही स्वार्थ, लोभ, काम, नसतो. मागे अनन्यतेचा विचार आलेला आहे. तसेच दुःसंगत्याग, कामक्रोधादिकांचा त्याग सांगितला आहे हिंसा होण्याची स्वार्थ, लोभ, काम, क्रोध, द्वेष इत्यादी कारणे आहेत, भक्त लक्षणांत गीतेमध्ये,

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ।। अ० १२–१३**

अशी विशेषणे दिली आहेत. त्यात 'अद्वेष्टा' प्रथम लक्षण आहे. जो अद्वेष्टा आहे तो हिंसा कशी करील ? 'कोण्याही भूताचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचे ।।' असे सर्वेश्वर पूजनाचे वर्म तुकाराममहाराज निर्मत्सर राहणे हे सांगतात सर्वच मार्गात अहिंसा हे साधन मानले जाते पण भक्तिमार्गात अहिंसेला फार श्रेष्ठ स्थान आहे, ते भगवत्प्रसाद संपादन करण्याचे साधन मानले आहे. भागवतामध्ये म्हटले आहे.

**तितिक्षया करुणया मैत्र्या चाखिल जन्तुषु ।**
**समत्वेन च सर्वात्मा भगवान्संप्रसीदति ।। भा० ४–११–१३**

'सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणी तितिक्षा (दु.ख झाले तरी सहन करणे), करुणा, मैत्री आणि समत्व ठेवल्याने भगवान् सतुष्ट होतो'

भगवान सर्वांतर्यामी असता कोणाचाही द्वेष हिंसा केली तरी पर्यायाने ती त्याचीच हिंसा होते. 'परमात्मा जो श्रीहरी । तो अंतर्यामी सर्व शरीरी । तेथ पराचा जो द्वेष करी । तेणें द्वेषिला हरि निजात्मा ।। (ए० भा० ५–२८१) म्हणून भक्तिमार्गातच नव्हे तर ज्ञानमार्ग, योगमार्गातही अहिंसा या साधनाचे श्रेष्ठत्व प्रतिपादिले आहे. गीतेच्या तेराव्या अध्यायांत जी अमानित्वादि ज्ञानलक्षणे सांगितली आहेत त्यांत 'अहिंसा' हे तिसरे लक्षण आहे. या लक्षणावर श्रीज्ञानेश्वर महाराजानी फार विस्तृत व्याख्यान केले आहे. प्रथमतः काही मतवादी अहिंसेच्या नावाखाली हिंसा कशी करतात या विषयाचा परामर्श घेतला आहे. आरंभी कर्ममीमांसकांचा निर्देश करून ते म्हणतात, वृष्टि (पाऊस) न झाल्याने पीडा पावलेल्या जगास वाचविण्याकरिता हे कर्मठ पर्जन्येष्टि इत्यादि नाना याग करतात व त्यांत पशुहिंसा केली जाते. नुसती हिंसा पेरली असता अहिंसा कशी पिकेल ? तसेच रोगाने पीडित माणसाच्या आरोग्याकरिता आयुर्वेद नाना उपाय सांगतो त्यात एखाद्या वनस्पतीचे कांदे उपटून काढतो, एखादे झाड उपटून त्याचे मूळ काढतो. अजातशत्रू अशा वृक्षांना सुरीने चिरा पाडून त्यातील रस नष्ट करतात, एखाद्या झाडाची साल काढतात, एखाद्याचा फुले उकडून काढतात, कित्येक जंगम प्राण्याच्या देहामध्ये हात घालून त्यांचे पित्त बाहेर काढतात, असे करत असता त्याना किती

दु:ख होते तिकडे दुर्लक्ष करून इतर रोग्यांना वाचविण्याचा प्रयत्न करतात, ही अहिंसेच्या नावाखाली हिंसाच नव्हे काय ? त्याच प्रमाणे कित्येक धर्मात पाणी गाळून घेण्याची प्रथा आहे. पण गाळण्याच्या धक्क्यानेच किती जीव मरतात. तात्पर्य अहिंसा व हिंसा यांचा विचार फार सूक्ष्म आहे. केवळ शस्त्रादिकांनी एखाद्या प्राण्याचा वध अथवा त्यास पीडा देणे यास हिंसा म्हणू नये, तर प्रत्येक इंद्रिय व्यापारातून म्हणजे वाणी, नेत्र, हस्त, पाद इत्यादिकांचे द्वारे हिंसा होत असते त्याचा विचार अनेक दृष्टान्ताच्या द्वारा विस्तारपूर्वक ज्ञानेश्वर महाराजानी तेराव्या अध्यायात ओवी २१७ ते ३१७ अशा शंभर ओव्यातून केला आहे तो फार महत्त्वाचा आहे. या व्याख्यानाच्या निमित्ताने पूर्ण अहिंसक अशा साधूचे हृदयच प्रगट झालेले आहे. त्याच्या मताप्रमाणे, 'ज्ञानामनाचिये भेटी। सरिसेचि अहिंसेचें बिंब उठी।' (१३–२४४)– सर्वांतर्यामी परमात्म्याचे ज्ञान अंत:करणात झाल्याखेरीज खऱ्या अहिंसेचे लक्षण सिद्ध होत नाही. एकदा ते ज्ञान पटले म्हणजे सहजच सर्व जीवनच अहिंसामय होऊन जाते.

आणि जगाचिया सुखोद्देशें। शरीर वाचा मानसे।
रहाटणें तें अहिंसें। रूप जाण॥ १६-११३॥

असे एका ओवीत खऱ्या अहिंसेचे उत्कृष्ट लक्षण केले आहे. भक्ताचे प्रत्येक कृत्य जगाच्या सुखाकरिताच होत असते.

योगशास्त्रातही अहिंसेला फार महत्त्वाचे स्थान आहे. योगाची जी अष्टांगे आहेत त्यात यम, नियम ही आरंभी आहेत व त्या 'यम' या अंगाचे जे पाच प्रकार सांगितले आहेत त्यात अहिंसा हे साधन प्रथम आहे. म्हणजे योग साधनाचा आरंभच अहिंसा या लक्षणापासून होतो व या अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य अपरिग्रह यांना योगसूत्रकार पतञ्जलीनी महाव्रते असे म्हटले आहे. खरी अहिंसा साधकाच्या अंगी बाणली तर ती त्या साधकाच्या अंगीं एवढी शक्ती निर्माण करते की त्या योग्याच्या सान्निध्यात जे येतील त्यांच्या चित्तातील वैराचा त्याग घडून येतो. 'चित्तशुद्ध तरी शत्रु मित्र होती। व्याघ्रही नखाती सर्प तया॥' हा तुकाराम महाराजांचा अनुभव हेच सांगतो. पातञ्जल योगदर्शनाच्या साधन पादातील तिसाव्या सूत्रात, '**अहिंसाप्रतिष्ठायां तत्संनिधौ वैरत्याग**:।' म्हणजे 'अहिंसेची प्रतिष्ठा ज्या योग्याच्या चित्तांत उत्पन्न झाली असेल त्यायोग्याच्या सान्निध्यात जे येतील त्यांच्या चित्तातील वैराचा त्याग घडून येतो' असे अहिंसेचे अलौकिक महात्म्य सांगितले आहे अशा या अहिंसेचा फार सूक्ष्म विचार योग शास्त्रात केला आहे

यमनियम म्हणून जे अहिंसादि प्रकार सांगितले आहेत त्याच्या विरोधी हिंसा, असत्य इ० विकार चित्तात वास्तव्य करून असतात त्या जितक्या प्रमाणात

आहेत तेवढया प्रमाणांत त्यांचा प्रतिकार होणे अवश्य आहे. याकरिता हिंसेचा विचार विस्तारपूर्वक केला आहे व जितक्या प्रकारे हिंसा होते तिला विरोधी अहिंसावृत्तीही तेवढया प्रकारची बाणली गेली पाहिजे. हिंसादि कर्माच्या ज्या वासना चित्तात स्फुरतात आणि तदनुसार जे हिसात्मक आचरण हातून घडते त्याला योगशास्त्रात ' वितर्क ' म्हटले आहे या वितर्कात कृत, कारित व अनुमोदित असे तीन मुख्य भेद असतात कृत म्हणजे आपण स्वत: केलेली, कारित म्हणजे इतराना प्रेरणा देऊन केलेली हिसा व अनुमोदित म्हणजे इतरांनी केलेल्या हिसेस प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संमति दिली तर ती अनुमोदित हिसा होते. या वितर्कांना लोभ, क्रोध आणि मोह ही आधी उत्पन्न होणारी कारणे असतात म्हणून हे वितर्क लोभक्रोधमोहपूर्वक होत यापैकी एक तरी असल्याविना कोणत्याही प्रकारची हिंसा होत नाही या कारणरूप मनोविकाराचा किंवा कार्यरूप वितर्कांचा संवेग म्हणजे प्राबल्य असेल तदनुसार त्याचे मृदू, मध्य, अधिमात्र (तीव्र) असे आणखी तीन भेद आहेत कोणतीही चागली वाईट गोष्ट सर्व वेळेस एकाकडून किवा सर्वांकडून सारख्या प्रमाणात होते असे नाही तर वर सागितल्या प्रमाणे तिचे तीन भेद पडतात म्हणजे एका हिंसेचे वर सागितल्याप्रमाणे सत्तावीस प्रकार होतात त्यांत मृदू, मध्य, अधिमात्र याचे पुन्हा तीन तीन प्रकार सागितले आहेत, म्हणजे मृदुमृदु, मृदुमध्य मृदुतीव्र, मध्यमध्य, मध्यमृदु, मध्यतीव्र, तीव्रतीव्र, तीव्रमध्य, तीव्रमृदु, असे सत्तावीसाचे प्रत्येकाचे वरील तीन तीन प्रकार केले तर एकूण एक्यांशी प्रकार हिसेचे होतात. या हिसेच्या विरोधी असणाऱ्या अहिंसेचेही इतके प्रकार संभवतात पण श्रीज्ञानेश्वर महाराजानी ज्ञानामनाची भेट झाल्यानंतर खरी अहिंसा प्रगट होते असे सांगितले आहे व जगाच्या सुखाकरिता काया– वाचा– मनाने जे वागणे ती अहिसा जर अंगी बाणली तर वरील सर्व प्रकारची हिंसा अथवा हिसेची कारण दूर होतात. प्रथमत साधक भक्ताने या हिंसावृत्तीतील दोष जाणले पाहिजेत. योगशास्त्रात या हिसा, असत्य आदि वितर्काना ' दुःखाज्ञाना अनंतफलाः ' म्हणजे अनेक प्रकारची दुःखे देणारे अज्ञान वाढविणारे आणि जन्ममरणरूप संसारातील अनतफले भोगावयास लावणारे आहेत असे म्हटले आहे म्हणून या वितर्कांच्या विरोधी अहिसा, सत्य, इत्यादिकांचे आचरण करीत राहिले पाहिजे

योगसूत्रे साधनपाद सूत्र चौतीस व त्यावरील टीकेत हा विचार केला आहे

ही अहिसा कोठे राहते याचा विचार एकनाथमहाराजांनी भागवत धर्माच्या लक्षणांचा विचार करताना विस्ताराने सांगितला आहे. कायिक, वाचिक, सर्वेंद्रियानी होणारी अहिंसा सांगितल्यानतर ते म्हणतात,

भूतां देतां दु.खलेशु । भूती दुखवेल भूतेशु । ऐसा ज्याचा दृढविश्वासु । तेथ रहिवासु अहिंसेचा ॥ ४६० ॥ कायिक, वाचिक, मानसिक । भूता उपजे त्रिविध

दु ख । ते जेथे निमाले निःशेख । अहिंसा देख ते ठायी ।। ८६१ ।। ए. भा. ३.

तात्पर्य हिंसा हा एक प्रकारे भगवद्वेष आहे, कारण, ' जें जें भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।', हा जर भक्तियोगाचा निकष आहे तर भगवद्रूप मानल्या गेलेल्या भूतमात्राची हिंसा होईल कशी ? केवळ कोणाला दु.ख न देणे एवढीच अहिंसेची व्याप्ति मानता येत नाही तर कोणी दुःखी असेल व त्याचे दुःख दूर करून त्याला सुख देण्याचा प्रयत्न न केला जाईल तर तीही एक प्रकारे हिंसाच होईल. म्हणून भक्त अशा दुःखिताला दु.खी राहू देणार नाही.

तुका म्हणे सुख पराविया सुखे । अमृत हे मुखें स्रवतसे ।। तु० ।।

राजा रंतिदेवाचे उदाहरण या विषयात फार महत्त्वाचे आहे. त्याने आपले सर्व राज्यही दीन, दुःखी जीवांकरिता खर्ची घातले. स्वतः अरण्यात राहण्याची पाळी त्याच्यावर आली. महिनेच्यामहिने त्याला अन्नाविना काढावे लागले. कदाचित एखादे वेळी काही अन्न मिळाले तर कोणी तरी याचकाने यावे व ते मागावे. यानी ते देऊन टाकावे केवळ पाण्यावर कितीतरी दिवस काढावे. एकदा तर कितीतरी दिवस त्यास पाणीही मिळाले नाही. अन्न-पाण्याविना प्राण शरीरातून जाण्याची वेळ आली, अशा स्थितीत कोठून तरी थोडे पाणी मिळाले. ते घेणार तो एक अति तृषार्त याचक समोर येऊन ' पाणी ' म्हणून त्याच्यापुढे पडला. रंतिदेवाचे प्राणही व्याकुळ झाले होते पण अशाही स्थितीत ते पाणी स्वतःच्या प्राणाची पर्वा न करिता त्या याचकाला भगवानच या रूपाने आला आहे या भावनेने दिले. तत्काल भगवान तेथे प्रगट झाले व प्रसन्न होऊन म्हणाले तुझ्या या प्रेमाने मी संतुष्ट झालो. तुला काय मागायचे आहे ते माग. मी तुझ्या सर्व इच्छा पूर्ण करीन. तेव्हा रंतिदेवाने काय मागितले ? तो म्हणाला,

**न कामयेऽहं गतिमीश्वरात्परामष्टर्धियुक्तामपुनर्भवं वा ।**
**आर्ति प्रपद्येऽखिललोकभाजामन्तःस्थितो येन भवन्त्यदुःखाः ।।**

भा. ९-२१-१२

' मी भगवंतापासून अष्टसिद्धीनी युक्त परमगतीची अपेक्षा करीत नाही, जास्त काय ? मी मोक्षाचीही कामना करीत नाही, मी तीच इच्छा करतो की सर्व प्राण्यांच्या हृदयात स्थित होऊन जावे व त्यांचे सर्व दुःख मी सहन करावे, ज्यामुळे कोणत्याही प्राण्याला दुःख होणार नाही.'

हेच ते सूत्रात सांगितलेले चारित्र्य होय. या साधनाचे आचरण करता करता तो स्वभाव बनून जातो

चारित्र्यात दुसरे स्थान सत्य हे आहे सत्य या गुणाचा संबध वाणीशी आहे. सत्य म्हणजे जसे पाहिले, ऐकले वा अनुभविले असेल तसेच कोणी विचारले असता त्यास सांगणे, ते लेखनपूर्वक असो अथवा सकेताने असो मात्र ते बोलत असता

ऐकणाऱ्याला जर दु:ख होण्याचा संभव असेल तर आपल्या हातून वाचिक हिंसा घडून वरील अहिंसा व्रताला बाध येईल कित्येक वेळा आपले सत्यभाषण दुसऱ्याला हिंसा करण्यास प्रेरक होण्याचाही संभव आहे अशा अनेक प्रसंगी सत्यव्रताचे आचरण करणे फार कठीण असते अशा सर्व प्रसंगी महाभारतामध्ये वा स्मृती ग्रंथामध्ये भाषणाविषयी जी मर्यादा सांगितली तिला अनुसरून न बोलावे हे योग्य आहे, महाभारतामध्ये म्हटले आहे

**सत्य ब्रूयात्प्रियं ब्रूयात् न ब्रूयात्सत्यमप्रियम् ।।**
**प्रियं च नानृतं ब्रूयात् एष धर्म : सनातनः ।।**

'सत्य आणि प्रिय असेल ते बोलावे, सत्य पण अप्रिय असेल ते बोलू नये, प्रिय पण खोटे असेल ते बोलू नये, हा सनातन धर्म आहे' 'सत्य 'या सोळाव्या अध्यायातील दैवीप्रकृतीच्या लक्षणावर व्याख्यान करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजानी दृष्टातपूर्वक बरीच चर्चा केली आहे ती उद्‌बोधक आहे. ते म्हणतात,

'आता कमळकलिका जशी स्वभावतः तीक्ष्ण असून मऊ असते (कारण ती पाण्याचे भेदन करते म्हणून तिला तीक्ष्ण म्हणावयाचे व स्पर्शाला मृदू असते म्हणून मऊ म्हणावयाचे) अथवा चंद्राचे तेजच खरे पण तो ताप देत नाही, शीतल असते. दाखविल्याबरोबर रोग नाहीसा करू शकेल आणि जिव्हेला जे कडू लागणार नाही असे औषधच नाही मग त्याची उपमा तरी कशी देता येणार ? तरी जसे पाणी बुबुळाला घासले तरी ते मऊपणामुळे डोळ्यास खुपत नाही पण त्याच पाण्याचा विचार केला तर डोंगराचा कडा फोडण्याचे सामर्थ्य त्यात असते, त्याप्रमाणे, अर्जुना ! जे सत्य भाषण सशय नाहीसा करण्याच्या कामी तरवारीसारखे तीक्ष्ण असते आणि ऐकण्याच्या बाबतीत गोडपणाला पायाखाली तुडविते, जे सत्यभाषण सहज ऐकत असता कानालाच मुखे उत्पन्न होतात, आणि जे सत्यभाषण आपल्या खरेपणाच्या जोरावर ब्रह्मालाही भेदून जाते, फार काय सांगावे, जे भाषण प्रिय-पणाने कोणालाही फसवू जाणत नाही व जरी ते खरे असले तरी ते कोणाला खुपत नाही. बाह्यदृष्टीने पाहिले तर पारध्याचे गायन कानाला खरोखर गोड लागते पण ते अतिघातकर असल्याचे दिसून येते, किंवा अग्नी आपले जाळण्याचे काम उघडपणाने करतो, पण असल्या प्रकारच्या गोड आणि उघड सत्यास आग लागो. जे भाषण कानाने ऐकले असता गोड लागते पण अर्थाने काळजाला झोंबते असे भाषण ते भाषणच नाही. तर ते भाषण सुदररूप धारण करणारी हडळच आहे परंतु मुलाचे अकल्याण होऊ नये म्हणून मुलावर लटिके रागावणारी व लाड करण्यात फुलासारखी मऊ अशा त्या आईचे स्वरूप जसे असते, त्या प्रमाणे जे ऐकल्याने सुख देण्यात कुशल व जे परिणामी सत्य असते व ज्या बोलण्याने ऐकणाऱ्याच्या अंतःकरणात क्रोध द्वेषादि विकार येत नाहीत त्या बोलण्यास येथे

'सत्य' असे म्हटले आहे.'( ज्ञा० १६-११५ ते २४ )

याच सत्याला 'ऋत' अशी संज्ञा आहे श्रीकृष्ण उद्धवास सागतात,

ऋत म्हणिजे ते ऐसें येथ । सत्यवाचा जे श्रोत्यांचे हित ।
तेही दुःखसंबंधरहित । 'ऋत' निश्चित या नांव ।। ४६४ ।।

ए० भा० १९

साधकाने कसे बोलावे याबद्दल श्रीकृष्ण उद्धवास सागतात,

सत्य आणि अतिमधुर । आइकता आल्हादकर ।
सर्वांशी हितत्वें साचार । बोले सनागर हरिकथा ।। २३५ ।।

ए० भा० १०

असत्य हे इहपरलोकाकरिता किती घातक आहे व सत्याचे मूल्य किती श्रेष्ठ आहे हे स्वतः श्रीकृष्ण सागतात,

असत्य पापी सकळ सृष्टी । असत्यामाजी पापकोटी । असत्याची खोटी गोठी । जो तो पोटी साडीना ।। २१४ ।। उभय लौकिकी खोटेपणे । असत्य बहिर्मुख नाणे । तें मनीहूनि जेणे साडणें । तो म्या श्रीकृष्णे वंदिजे ।। २१५ ।। ते गुह्यामाजी अतिगुह्य जाण । सत्यवाचा का मनीहूनि मौन । ते मी म्हणे मधुसूदन । सत्यं प्रिय जाण निजगुह्य ।। २१६ ।। ए० भा० १६

राजा जनकाने नवयोगेश्वराना भागवत धर्म विचारले असता त्या भागवत धर्मात ज्या ज्या साधनांचा अतर्भाव होतो त्यात सत्याचे माहात्म्य फार श्रेष्ठ आहे

सत्यापरतें नाही तप । सत्यापरता नाही जप
सत्ये पाविजे सद्रूप । सत्यें निष्पाप साधक होती ।। ५३६ ।।

ए० भा० ३

सत्य हे सहज आहे पण असत्याला मात्र काही निमित्त लागते. स्वार्थ, लोभ, द्वेष, मत्सराविना कोणी निष्कारण असत्याचा अवलब करीत नाही अनादिकालीन संस्कारामुळे विकार तादात्म्य निर्माण होते व असत्य भाषा बाहेर पडते वाचेचा हा असत्यमळ धुतला जाऊन वाचा पूर्ण सत्याचा अंगीकार करील याकरिता साधक भक्ताने काय उपाय करावा याविषयी नवयोगेश्वरापैकी 'प्रबुद्ध' सागतो,

कां रामनामाच्या आवृत्ती । वाचा धुतली स्मरणोक्ति । ते असत्यामाजी पुढती । कदा कल्पाती बुडेना ।। ५२९ ।। मंथूनि काढिलें नवनीत । ते पुढती न बुडे ताकात । तेवी नामे वाचा निर्धूत । असत्य तेथ स्पर्शेना ।। ५३० ।। चंदनाचिया चौफेरी । काष्ठत्वा मुकती खैर बोरी । तेवीं नामाच्या निजगजरीं । वाचे माझारी निजसत्य प्रगटे ।। ५३२ ।। झालेनि अर्क प्रकाशे । खद्योत हारपती जैसे । तेवी रामनामसौरसें । लोपे अनायासें असत्य ।। ५३३ ।। ए० भा० ३

तात्पर्य साधक भक्ताने रामनामाच्या बळाने असत्याला दूर सारून सत्याचा आश्रय करावा.

यानंतर साधकाने ज्या चारित्र्यांचे पालन करावे असे सूत्रात सांगितले आहे त्यात 'शौच' म्हणजे अंतर्बाह्य पावित्र्य हे महत्त्वाचे साधन आहे. भगवद्गीतेतील तेराव्या अध्यायातील ज्ञानलक्षणात व सोळाव्या अध्यायात दैवीप्रकृतीच्या लक्षणात 'शौच' या साधनाचा समावेश आहे श्री एकनाथमहाराज तर शुचित्वाला फार महत्त्व देतात. ते म्हणतात, 'मुख्य साधावया परमार्था। अवश्य पाहिजे गा शुचिता। शुचित्वावाचोनि तत्त्वतां। न लभे हातां निजस्वार्थ ॥३८०॥ (ए. भा. ३). शुचितेचे बाह्य आणि आतर असे दोन भेद आहेत. बाह्य शुचितेचे अनेक प्रकार आहेत. शरीरशुद्धी, व्यवहारशुद्धी, अन्नशुद्धी, अर्थशुद्धी, गृहशुद्धी इत्यादि बाह्यशुद्धी-कडेही साधकाने लक्ष दिले पाहिजे. येथे हे लक्षात ठेवावे की स्वच्छता आणि शुद्धता यात अंतर आहे स्वच्छता प्रत्यक्ष दिसते पण शुचिता ही धर्म्य अशी असते व ती शास्त्रावरून अथवा संतवचनावरून कळते ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, 'स्वच्छें शीतळें सुगंधें। जळें होती सुखप्रदें। परी पवित्रत्व संबंधें। तीर्थाचेनि ॥३२३॥' (ज्ञा १७,) पाणी या दृष्टीने सर्व सारखेच असते पण पवित्रता गंगेच्या व तीर्थाच्या पाण्यासच मानली जाते स्वच्छता ही दृष्टफलक असते व पवित्रता दृष्टअदृष्ट उभयफलक असते परमार्थात पावित्र्याला फार महत्त्व आहे, बाह्यशुद्धी म्हणजे शरीरशुद्धी मृत्तिका, जल याच्याद्वारे होते. 'मृत्तिका आणि जळें। बाह्य येणें मैळें। निर्मळु होय बोले। वेदाचेनि ॥४६४॥' ज्ञा. १३ ती बाह्यशुद्धीही धर्मशास्त्रांनी सांगितलेल्या मार्गानेच केली पाहिजे.

तसेच दुसऱ्याचे स्वत्व न हरण करता सत्यतापूर्वक निर्दोषरूपाने व्यवहार करून 'जोडोनिया धन उत्तम व्यवहारे' या संतोक्तिप्रमाणे धन संपादन करणे ही धनशुद्धी.

शुद्ध स्थानात, शुचिर्भूत व्यक्तीकडून, शुद्ध निरामिष अन्नापासून बनविलेले व भगवंताला समर्पण केलेले भोजन, ही आहारशुद्धी होय.

शुद्ध निष्कपट प्रेमपूर्ण व्यवहार करणे ही व्यवहारशुद्धी.

अतिथीसत्कार, पाहुण्यांचा आदर, देवदेवतांची व साधुसंताची पूजा व भगवन्नामध्वनीने गृहाची शुद्धी होते.

शास्त्रविहित धर्मपालन व सर्व बाह्य क्रियांना शुद्ध ठेवणे ही आचारशुद्धी होय. अशाप्रकारे सर्व रीतीने बाह्यशुद्धी करण्याचा प्रयत्न केला व अंतरशुद्धी नसेल तर या बाह्यशुद्धीला काही महत्त्व नाही. या विषयात श्रीज्ञानेश्वर महाराजानी विस्तारपूर्वक अनेक दृष्टांत देऊन शुद्धीचे स्वरूप सांगितले आहे.

ते म्हणतात, 'सहज विचार करून पाहिले तर आत मन शुद्ध नसताना बाहेरच्या कर्माने केवळ शरीरशुद्ध करणे ही विटंबना होय. प्रेतास जसे अलंकाराने सजविले, गाढवाला तीर्थात स्नान घातले, अथवा कडू असलेला दुध्या भोपळा जसा गुळाने चोपडला, ओसाड घराला जसे तोरण बांधले, किंवा उपाशी माणसाच्या अंगास जसे बाहेरून अन्न लिपले, अथवा विधवा स्त्रीने कुंकुमसेंदूर इ. धारण केले तर ते जसे व्यर्थ तसे केवळ बाह्यशुचित्व व्यर्थ होय. आतून पोकळ व बाहेर केवळ सोन्याचा मुलामा देऊन केलेले कळस जे असतात त्यांच्यावरच्या चकाकीला आग लागो! शेणाची फळांची चित्रे करून त्यांना बाहेरून रंग देऊन जरी ती हुबेहूब फळासारखी दिसणारी केली तरी त्यांना घेऊन काय करावे? त्यांच्या आत शेणच आहे. आत शुद्ध नसून केवळ बाह्यात्कारी कर्म करणे हे वरील सर्व दृष्टांताप्रमाणे आहे. दारूने भरलेली घागर गंगोदकात बुचकळली तरी त्या योगाने ती घागर पवित्र होत नाही. म्हणून मनामध्ये पवित्र अशा भगवत्ज्ञानाचा उदय व्हावा मग बाह्यशुद्धी सहजच प्राप्त होईल. याकरिता अर्जुना, बाहेरील भाग कर्माने चांगला शुद्ध केलेला आहे आणि ज्ञानाने आतून मळ काढून टाकला आहे त्या स्थितीत आतील व बाहेरील शुचित्व हा भेद गेला व दोन्ही शुचित्वे एक झाली. स्फटिकाच्या तावदानात ठेवलेले दिवे मंदमंद हालताना जसे बाहेरून दिसतात तशा अंतःकरणातील सद्भावना बाहेर इंद्रियद्वारा प्रगट झालेल्या दिसतात. कोणत्याही विकल्पाने वृत्तिलिप्त न होणे हेच खरे शौच होय'. (ज्ञानेश्वरी अ. १३ ओवी ४६४ ते ८२.)

ज्ञानेश्वरीच्या सोळाव्या अध्यायातही असेच व्याख्यान 'शौच' या पदाचे केले आहे. 'सोने शुद्ध करून त्याची घागर तयार केली व त्यांत गंगेचे अमृततुल्य पाणी भरून ठेविले तर त्या आत बाहेर स्वच्छ असलेल्या घागरीप्रमाणे 'शौच' म्हणजे शुद्धपणा असतो. तसे ज्याच्या शरीराचे ठिकाणी निष्काम कर्माचरण आहे व अंतःकरणात खरा विवेक आहे तो आत बाहेर शुचित्वाची मूर्तीच आहे.' (ज्ञा. १६–१९७–९८.)

याच अनुरोधाने भागवत एकादशस्कंधाच्या तिसऱ्या अध्यायावरील टीकेत एकनाथमहाराजांनी सदृष्टान्त विस्तृत व्याख्यान केले आहे, (ए. भा. अ. ३, श्लोक २४, ओवी ३८० ते ३९९) जिज्ञासूनी ते मुळात पाहावे. सर्व विवेचन केल्यानंतर शुचित्वाचे वर्म सांगितले आहे ते असे, 'ईश्वर भावाचें निजवर्म। ज्याचें पोटी रिगालें सप्रेम। त्याचें कर्मचि होय ब्रह्म। त्या देहभ्रम बाधीना॥ या नांव शुचिष्मता। सत्य जाण नृपनाथा॥' ए. भा. ३–३९८.

मुख्यतः चित्तशुद्धी ही प्रेमयुक्त भगवद्भक्तीनेच होते. तो भगवद्भाव वृद्धिगत करण्याचा प्रयत्न करणे साधक भक्ताचे कर्तव्य आहे असे नवयोगेश्वर सांगतात.

रजतमादि कर्मज मळ। चित्तीं बैसले जे सबळ। ते प्रक्षाळिती सकळ। भक्तिप्रेम-

जळ क्षाळणे ॥७४१॥ जंव जंव थोरावें सप्रेम भक्ती। तंव तंव पागा लागे विरक्ति। स्वयें विरमे विषयासक्ती। होय चित्तवृत्ती निर्मळ ॥७४२॥ ए. भा. ३. बाह्यअंतर शौचाकरिता धर्माचरण, ज्ञान इत्यादी साधने कठिण वाटली तर हरिनामकीर्तनानेही अंतर्शुद्धी होते असे एकनाथमहाराज सांगतात,

अंतर्शुद्धीचें कारण। मुख्यत्वे हरिकीर्तन।
नामापरतें साधन। सर्वथा आन असेना ॥३५३॥ ए. भा. ५

शौच या साधनाचा विचार केल्यानंतर सूत्रकार 'दया' हे साधन सांगतात. दया ही एक परमार्थातील फार श्रेष्ठ अशी वृत्ती आहे

**परे वा बंधुवर्गे वा मित्रे द्वेष्टरि वा सदा।**
**आपन्ने रक्षितव्यंतु दयैषा परिकीर्तिता ॥**

'परका असो अथवा आपला संबंधी असो. मित्र असो किंवा द्वेश करणारा असो कोणीही संकटात पडला असता त्याचे रक्षण करावे असे वाटणे यासच दया म्हटले जाते,' अशी स्मृतीत दयेची व्याख्या आहे. श्री ज्ञानेश्वरमहाराजांनी सोळाव्या अध्यायात दैवी प्रकृतीच्या लक्षणात दयेचे विस्तृत व्याख्यान केले आहे, दयेचे स्वरूप व महात्म्य कळण्यास ते महत्त्वाचे आहे. त्याचा भावार्थ खाली दिला आहे. 'आता दया अशी असते की ज्याप्रमाणे पौर्णिमेच्या चंद्राचे चांदणे शीतलता देताना लहान थोर अशी निवड करीत नाही, त्याप्रमाणे दुःखिताचे क्लेश कृपाळू-पणाने हरण करीत असता श्रेष्ठ अथवा कनिष्ठ असा भेद करणे ती जाणत नाही. जगामध्ये पाण्यासारखी वस्तु स्वतः अंगाने नाश पावते परंतु गवताच्यादेखील जीविताचे रक्षण करते. त्याप्रमाणे दुसऱ्याच्या दुःखाने कळवळला असता त्याच्या दुःखनिवारणार्थ सर्वस्वासह आपल्याला अर्पण केले तरीदेखिल त्या दयाळू माणसाला ते थोडेच वाटते वाहत असलेले पाणी खड्डा अपुरा भरला तर पुढे सरकावयाचे जाणतच नाही, त्याप्रमाणे पुढे आलेल्या दुःखिताला संतुष्ट करून मग त्याचे पुढे जाणे होते. पायात काटा शिरतो व त्याच क्षणी ते दुःख अंतःकरणात प्रगट होते, त्याप्रमाणे दुसऱ्याच्या दुःखाने तो पोळला जातो. अथवा पायाला थंडावा मिळतो तो डोळ्याच्या उपयोगास येतो त्याप्रमाणे तो दुसऱ्याच्या सुखाने सुखी होत असतो. फार काय सांगावे, तहानेलेल्या करताच जसे जगात पाणी राहिले आहे त्याप्रमाणे दुःखितांच्या दुःखनिवारणार्थ त्याचे आयुष्य खर्च होते. असा पुरुष दयेची प्रत्यक्ष मूर्ती आहे असे समज, ती दया त्याच्या ठिकाणी उत्पन्न होताच, श्रीकृष्ण म्हणतात, मी त्याचा ऋणी होतो.' (ज्ञानेश्वरी अ. १६ ओ. १५४ ते ६२)

पद्मपुराणात महीधर नामक एका हरिभक्त राजाचे चरित्र आहे. त्यास विष्णुदूत वैकुंठास नेत असता मार्गात नरकलोक लागला. तेथील जीवांची ती दुःखप्रद हीन स्थिती पाहून त्याची करुणावृत्ती जागृत झाली. जेव्हा हा चालला तेव्हा

याच्या अंगाच्या वाऱ्याचा स्पर्श त्या नरकातील लोकांना होऊन त्या दुःखातही त्यांना सुख वाटू लागले. हे पाहून तो त्या विष्णुदूतांना म्हणाला–

**नार्तजन्तूनहं हित्वा पीडितो गन्तुमुत्सहे ।**
**स पापिष्टोहि आर्तानां शोकं नापहरेत्क्षमः ।।**
**मदंगसंगमोत्सृष्टवायुस्पर्शेन ते यदि ।**
**जन्तवः सुखिनो जाताः तस्मात्तत्र नयन्तु मां ।।**

'या दु.खी जीवांना मी येथे सोडून वर वैकुठास जाऊ इच्छित नाही. जो समर्थ असूनही दुःखितांचे दुःख हरण करीत नाही तो पापिष्ठ होय. माझ्या अंगाच्या वायुस्पर्शाने ते लोक सुखी होत आहेत तर मला तेथेच न्या

**सन्तस्त एव ये लोके परदुःखविदारणाः ।**
**आर्तानां आर्तिनाशार्थं प्राणा येषां तृणोपमाः ।। पद्मपुराण.**

'जे दुसऱ्याचे दुःख निवारण करतात व आर्तांच्या दुःखाचा नाश करण्यासाठी आपले प्राणही जे तृणवत् मानतात तेच संत होत.' भक्त श्रेष्ठ प्रल्हादही दैत्यबालकांना उपदेश करताना हेच सांगत आहे

तस्मात्सर्वेषु भूतेषू दयां कुरुत सौहृदम् ।
आसुरं भावमुन्मुच्य यया तुष्यत्यधोक्षजः ।।२४।। भागवत ७-६

'हे दैत्यबालकानो ! आसुरभावाचा त्याग करून सर्वभूतमात्रावर दया करा. त्या दयेने अधोक्षज भगवान संतुष्ट होतो.' या दयागुणाचा प्रत्यक्ष परमात्मा श्रीहरीवर किती प्रभाव पडतो हे स्वतः श्रीकृष्णच उद्धवाला सागत आहेत, ते व्याख्यान पाहा.

बाळक देखोनि संकटी । जेवी न सावरत माय उठी । तेवी दीन देखोनि दृष्टी । ज्याचें पोटीं दया द्रवे ।।१२४।। दीनाचिये दयेलागी । जो रिगे जळत्या आगी । त्याचे चरण मी वंदी वेगी । धन्य जगी दयाळू ।।१२७।। ऐसिये दयेचेनि गुणें । मज अनंतालागी तेणें । विकत घेतले जीवें प्राणें । की जाह्लो पोसणे मी त्याचे ।।१२८।। यालागीं दयाळूवाचे घरी । मी सदा नाटिका काम करी । जे दयावंताचे अवसरी । ते माझे शिरी सर्वदा ।।१२९।। जो जाणे दीनांचा विचार । दीनदयाळू जो साचार । उद्धवा तो माझे निजभांडार । सुखाचे सुखसार तो माझे ।।१३०।। ए. भा. १७

यापेक्षा दयेचे अधिक व्याख्यान कोण करू शकेल ?

यानंतर 'आस्तिक्य' हे साधन सांगितले आहे. वास्तविक वर जी अहिंसा, सत्य, दया इत्यादी साधने सांगितली याचे मूळ आस्तिक्यात आहे. आस्तिक्य असेल तरच ही वरील साधने पूर्ण रूपाने आचरिली जातील. आस्तिक्य म्हणजे ईश्वरभाव. समाजात आस्तिक व नास्तिक असे द्विविध जन असतात. वेदशास्त्र व वेदशास्त्रांचे

प्रमेय असा ईश्वर मानणाऱ्यांना आस्तिक म्हटले जाते. व वेदशास्त्रे व ईश्वर न मानणाऱ्यांना नास्तिक म्हणण्याची प्रथा आहे. कोणतेही प्रमेय प्रमाणाविना मानले जात नाही, तसेच ते प्रमाणही बलवान पाहिजे. असे बलवान प्रमाण अपौरुषेय वेद हेच आहे. 'तस्मांच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्य व्यवस्थितौ ॥' (गीता १६-२४) असे श्रीकृष्णानी अर्जुनास स्पष्ट सांगितले आहे. या श्लोकावरील टीकेत ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, 'बाबा अर्जुना ! ज्याला आपल्या उद्धाराची काळजी वाटते त्या साधकाने वेदांच्या निरोपाप्रमाणेच वागावे जसे पतीच्या मताप्रमाणे वागून पतिव्रता अनायासे आत्महित साधते अथवा आपला ठेवा आपल्या हाताला यावा असे वाटत असल्यास दिवा पुढे करावा त्याप्रमाणे सर्व पुरुषार्थावर स्वामित्व संपादन करावे असे वाटत असेल त्याने श्रुतिस्मृतींना आपल्या मस्तकावर धारण करावे म्हणजे त्यांच्या आज्ञा पाळाव्यात शास्त्र जे त्याज्य म्हणून सांगत असेल ते कितीही महत्त्वाचे म्हणजे पृथ्वीचे राज्य जरी असेल तरी ते टाकावे व शास्त्र जे घे म्हणेल ते कितीही प्रतिकूल किंबहुना विष जरी असेल तरी घ्यावे. अशा प्रकारे जो शास्त्रनिष्ठ असेल तर त्याला केव्हाही अनिष्टाची प्राप्ती होणार नाही. कारण अहितापासून काढून हित देऊन वाढविणारी श्रुतीविना दुसरी माऊली कोणी या जगात आहे काय ? ही जीवाचा ब्रह्माशी योग घडवून आणते म्हणून कोणी हिचा त्याग करू नये.' (ज्ञानेश्वरी अ १६ ओ. ४५५ ते ६३).

कित्येक वेद मानतात म्हणून त्यांना आस्तिक दर्शनकार म्हटले जाते. पण ते ईश्वर मानीत नाहीत. असे मीमांसक, सांख्य इ शास्त्रज्ञ आहेत. एका दृष्टीने हे शास्त्रकारही नास्तिकच म्हणविले जातील. 'नास्ति ईश्वरः इति वदति स नास्तिकः' अशीही एक नास्तिकाची व्याख्या केली जाते वेद प्रमाण मानून ईश्वर प्रमाण न मानणे म्हणजे एक प्रकारची नास्तिकताच होय. भक्तिमार्गामध्ये वेदाबरोबर पुराणांना प्रमाण मानले जाते. भागवतादि पुराणातून भगवदवतार लीलांचेसविस्तर वर्णन आढळते त्यावरही श्रद्धा ठेवणारा, तसेच संत वाङमयावर श्रद्धा ठेवणारा तोच येथे आस्तिक म्हटला जातो (याचा विचार मागे सूत्र त्रेसष्टवर झालाच आहे). ईश्वरावर श्रद्धा असणे हे आस्तिकाचे लक्षण आहे. तसे पाहिले असता बहुतेक लोक सामान्यत्वाने ईश्वर मानणारेच आहेत. ते ईश्वराचे सामान्यज्ञान एखाद्या लहान बालकालाही असते, पण सामान्यज्ञानात अनेक दोष राहू शकतात. ईश्वराच्या त्यात यथार्थस्वरूपाचे अज्ञान, सकामता, भेदबुद्धी, अवज्ञा इत्यादि दोष निर्माण होतात. त्यामुळे पूर्ण विश्वास राहणे शक्य नसते. भगवान् परमात्मा आहे व तो सर्वव्यापी असून सर्वेश्वर आहे, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, परमदयाळू, परमसुहृद्, भक्तवत्सल, दीनानाथ असून माझ्या अंतर्यामी सर्व साक्षीरूपाने आहे, असा निश्चय पाहिजे. भगवद्गीतेच्या भाषेत सांगावयाचे

तर गती, भर्ता, प्रभू, साक्षी, निवास, शरण्य, सुहृद, प्रभव, प्रलय, स्थान, निधान बीज, अव्यय (गीता ९-१८) अशा रूपाने तो कळला पाहिजे. तसेच तो निर्गुण निराकार असून त्यास सगुणसाकार रूपही धारण करता येते व तसा तो झाला तरी त्याच्या मूळ निर्गुणनिराकार स्वरूपात बाधा येत नाही अशी जी ज्ञानी भक्ताची दृढ भावना असते तशी असणे हीच खरी आस्तिक्य बुद्धी होय. जीवनात भगवंतावर विश्वास असणे ही गोष्ट सर्वांपेक्षा प्रथम व सर्वांपेक्षा अधिक महत्त्वाची आहे. त्याच्या अस्तित्व व गुण-प्रभाव इत्यादिकावर विश्वास राहील तर मन स्वत त्याच्याकडे ओढ घेऊ लागेल. मनाला जे जे पाहिजे, परमात्मा त्याचा खजिन आहे. ज्ञान पाहिजे तो ज्ञानघन आहे. प्रेम हवे असेल तर तो निरतिशय प्रेमास्पद आहे. आनंद पाहिजे तर तो आनंदाचा गाभा आहे. यश, श्री, वैराग्य, ऐश्वर्य, धर्म यांपैकी काही पाहिजे असल्यास त्याच्या विशेष षड्गुणांतच यश, श्री, औदार्य ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य यांचा अंतर्भाव आहे. सारांश, जीव संसारामध्ये सौंदर्य माधुर्य, प्रेम, स्नेह, धन, भोग, सुख, ऐश्वर्य हे शोधत असतो व या सर्व वस्तूविषयी आपली जी उंचीतील उंचीची कल्पना असेल त्या सर्व वस्तू या भगवत्स्वरूपाचा एक अंशही व्यापू शकणार नाहीत. या जगातील ते पदार्थ व त्याविषयी आपली जी अनुकूल बुद्धी, ज्या ज्या सौदर्य, माधुर्य, ऐश्वर्यादिकांची कल्पना करील ते ते सर्व या भगवंताच्या स्वरूपात पूर्णत्वाने समाविष्ट आहेत. अशा दृढ भावनेने जो भगवंतास जाणतो व त्यावर विश्वास ठेवतो तो अशा भगवंताला सोडून अर्ध्या क्षणाकरिताही दुसरीकडे आपले मन जाऊ देणार नाही व या जगातील क्षणिक भोगाच्या प्राप्तीने व नाशाने त्याच्या मनात हर्ष विषाद उत्पन्न होणार नाहीत.

भगवत्सत्तेच्या विश्वासाचे बाबतीत भक्तश्रेष्ठ प्रल्हादाचे उदाहरण फार श्रेष्ट आहे. प्रल्हादाची भक्ती त्याच्या जगज्जेत्या पित्यास, हिरण्यकशिपूस, पटत नव्हती त्याने पुष्कळ सांगून पाहिले पण प्रल्हादाने ऐकले नाही. तेव्हा, 'दैतेय चंदनवने जातोऽयं कंटकद्रुमः ।।' (भा. ७) 'दैत्यांच्या चंदनवनासारख्या कुलात हा एक काट्याचा वृक्ष निर्माण झाला आहे.' असे म्हणून याचा नाशच करणे योग्य आहे असे ठरवून हिरण्यकशिपूने त्या प्रल्हादाचा नाश करण्याकरता त्याच्या अंगावर अनेक शस्त्रास्त्रे धारण करणारे दैत्य सोडले. ते जेव्हा मोठमोठी शस्त्रे घेऊन प्रल्हादाच्या अंगावर धावून आले तेव्हा तो भक्तवर्य त्या दैत्यांना म्हणतो,

**विष्णुः शस्त्रेषु युष्मासु मयि चासौ व्यवस्थितः ।**
**दैतेयास्तेन सत्येन माक्रमन्त्वायुधानि च ।। विष्णु पु० १।१७।३३**

'हे दैत्यहो ! माझा भगवान विष्णु या शस्त्रातही आहे. तुमच्यातही आहे व तोच माझ्यातही आहे, सर्वत्र आहे. या परमसत्याच्या प्रभावाने तुमच्या या शस्त्रास्त्रांचा माझ्यावर काही परिणाम न होवो.' प्रल्हादास मारण्यास मोठेमोठे

विषधर सर्प सोडले, मदोन्मक्त हत्तीही सोडले पण त्या सर्पात तसेच त्या मदोन्मत्त विशालकाय हत्तीत व त्यांच्या वज्राप्रमाणे असलेल्या दांतातही प्रल्हादाने आपल्या भगवंतालाच पाहिले त्यांच्यामुळे प्रल्हादावर काहीही प्रतिकूल परिणाम झाला नाही. प्रखर अग्निकुंडामध्ये त्याला टाकले पण त्यात त्याला नवमेघवर्णाप्रमाणे श्यामसुंदर विष्णुमूर्तीच दिसली. तो पित्यास म्हणतो,

**तातैष वन्हिः पवनेरितो ऽ पि । न मां दहत्यत्र समन्ततोऽहम् ।**
**पश्यामि पद्मास्तरणास्तृणानि । शीतानि सर्वाणि दिशाम्मुखानि ।।**

विष्णु पु० १–१७–४७

'हे तात ! वायुने प्रेरित हा अग्नीही मला जाळू शकत नाही. मला तर सर्व दिशा अशा भासू लागल्या आहेत की जणू काही, माझ्या चारी बाजूस कमलपत्रांचे पडदेच टांगले आहेत' एके दिवशी अत्यंत क्रोधयुक्त होऊन प्रल्हादास पित्याने विचारले की अरे ज्या मला तीन लोकातील अधिपतीही भितात, त्या माझे शासन न भीता तू कोणाच्या बलावर मानीत नाहीस ? यावर प्रल्हादाने उत्तर दिले,

न केवलं मे भवतश्च राजन् स वै बलं बलिनां चापरेषां ।
परेऽवरेऽमी स्थिरजङमा ये ब्रह्मादयो येन वशं प्रणीताः ।। ८ ।।
स ईश्वरः काल ऊरुक्रमोऽ सावोजसहः सत्त्वबलेंद्रियात्मा ।
स एव विश्वं परमः स्वशक्तिभि : सृजत्यवत्यत्ति गुणत्रयेशः ।। ९ ।।

भागवत ७. ८

'दैत्यराज ! ब्रह्मदेवापासून मुंगीपावेतो सर्व चराचर जीवांना भगवंताने आपल्या स्वाधीन करून ठेविले आहे केवळ माझ्या किंवा आपल्या बळासच तो कारण आहे असे नसून जगातील समस्त वलवानांचे बलही केवळ तोच आहे. तोच महापराक्रमी सर्व शक्तीमान प्रभु काल आहे. तसेच सर्व प्राणिमात्रांचे इंद्रियबल, मनोबल, देहबल, धैर्य एवं इंद्रियेही तोच आहे. तोच परमात्मा आपल्या शक्तीच्याद्वारा या सृष्टीची उत्पत्ती, स्थिती, संहार करतो. तोच त्रिगुणांचा स्वामी आहे.'

हे ऐकून हिरण्यकशिपु म्हणाला, 'हे मन्दभाग्या ! माझ्याहून वेगळा एक जगदीश्वर आहे असे तू म्हणतोस तो कोठे आहे ? जर, तो सर्वत्र आहे तर या खांबात का दिसत नाही ? मला विरुद्ध बोलणाऱ्या तुझे मस्तक आता धडापासून वेगळे करीन व तू ज्याला शरण गेलास तो हरी तुझे कसे रक्षण करतो ते पाहीन. असे अभद्र भाषण करून अत्यंत क्रोधाने तप्त झालेल्या हिरण्यकशिपूने हातात खड्ग घेऊन सिंहासनाहून खाली उडी घातली आणि मोठ्या आवेशाने समोरच्या खांबावर मुष्टिप्रहार केला, त्यावेळी

**सत्यं विधातुं निजभृत्य भाषितं व्याप्तिंच भूतेष्वखिलेषु चात्मनः ।**
**अदृश्यतायद्भुतरूपमुद्वहन् स्तम्भे सभायां न मृगं न मानुषम् ।।**

भागवत ७–८–१८

' आपल्या भक्त प्रल्हादाची तसेच ब्रह्मदेवाची वाणी सत्य करण्याकरिता व समस्त पदार्थात आपली व्यापकता दाखविण्याकरिता सभेमध्ये त्याच स्तंभात विचित्ररूप धारण करून भगवान प्रगट झाले. ते रूप पूर्ण सिंहाचे नव्हते व पूर्ण मनुष्याचे ही नव्हते. '

केवढा निश्चय व केवढे आस्तिक्य !

कोणत्याही वस्तूचे यथार्थज्ञान वस्तुनिष्ठ स्वरूपाने, म्हणजे वस्तू जशी, जेवढी, ज्या रूपाची असेल तसे, असणे अवश्य आहे; तरच ते यथार्थ म्हटले जाते. त्यांत प्रमाणप्रमेयअसंभावना, विपरीत भावना इत्यादि असू नयेत. यांना दोष म्हणतात. दोषयुक्त ज्ञानच अज्ञान होते. परमात्मा जसा व्यापक सर्वाहून अभिन्न असेल तसेच प्रल्हादाप्रमाणे त्याचे ज्ञानही असणे अवश्य आहे. खरे आस्तिक्य हेच होय.

श्रीज्ञानेश्वर महाराजांनी ' आस्तिका 'ची व्याख्या अशीच केली आहे.

हे त्रैलौक्यचि पुरुषोत्तम । ऐसा साचा जयाचा मनोधर्म ।
तया ' आस्तिका 'चा आश्रम । पांडवा गा ।। ज्ञा० ८–१९३ ।।

श्रुतिस्मृतिपुराणे व संतवचनांचा हाच आशय व संतांचा अनुभवही परमात्मविषयक असा व्यापकच असतो कोणाला असे वाटेल की ही व्यापक आस्तिकता फार दुर्लभ आहे. ' वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ।। ' (गीता ७–१९) ' हे समस्त श्रीवासुदेव स्वरूप आहे असा ज्याचा अनुभव आहे तो महात्मा दुर्लभ आहे' असे श्रीकृष्ण सांगतात. परमात्मविषयक अपरोक्ष असे व्यापक ज्ञान होणे दुर्लभ असेल पण उपनिषदे, गीता, संतवचनावरून त्या व्यापक स्वरूपाचे परोक्षज्ञान होऊ शकते तेदेखिल व्यर्थ जात नाही. ते परोक्षज्ञान तरी अवश्य संपादन करावे. अशी पूर्ण आस्तिकता हेच भक्ताचे खरे चारित्र्य आहे. हिचे पालन करावे असे नारद महर्षी म्हणतात त्याचे कारण असे असावे कीं भेदज्ञानाचे, कामनादिकांचे संस्कार जन्मजन्मांतरीचे असल्याने जरी भगवत्स्वरूपाचे ज्ञान झाले तरी अनेक विकल्प, संशय निर्माण होऊन त्या ज्ञानाला प्रतिबंध करतात. या विचाराची जागृति सतत राहण्याकरिता अभ्यासाची आवश्यकता आहे.

असा सतत अभ्यास जागृत ठेवणे हेच आस्तिक्यादि चारित्र्य परिपालनाचे साधन आहे.

सूत्रात ' आदि ' असा एक शब्द आहे. अहिंसा, सत्य, शौच, दया, आस्तिक्य, या पाच साधनांचा प्रामुख्याने निर्देश केला आहे, पण या साधनांच्या आचरणाकरिता अन्य सहकारी साधनेही अवश्यक असतात. गीतेमध्ये सोळाव्या आध्यायात दैवी प्रकृतीची जी अभय, सत्त्व संशुद्धि, ज्ञानयोगव्यवस्थिति इत्यादि लक्षणे आहेत त्यांचा ' आदि ' या पदात समावेश करावा व ती लक्षणेही संपादन करावीत.

थवा, गीतेच्या बाराव्या अध्यायातील भक्तलक्षणाचाही समावेश करावा.

सूत्रात केवळ 'पालन' असा शब्द न वापरता 'परिपालन' परितः– सर्वकारे– पालन असे म्हटले आहे. ते महत्त्वाचे आहे.

तात्पर्य, भक्ताच्या भक्तीला पोषक अशी जी जी साधने भक्त महात्म्यांनी ांगितली व आचरली असतील त्या साधनांचे पालन करणे हे भक्ताचे कर्तव्य ाहे.

## सूत्र ७९

## सर्वदा सर्वभावेन निश्चिन्तितैर्भगवानेव भजनीयः ॥७९॥

र्थ :

(भक्तांना) सर्वकाली, सर्वभावाने निश्चित होऊन श्रीभगवान हाच केवळ जनीय (सेवा करण्यास योग्य) आहे

**वरण :**

मागील सूत्रात अहिंसा, सत्य, शौच, दया, आस्तिक्य इत्यादिकांचे परिपालन क्ताने करावे असे सांगितले, पण ही साधने भक्तीच्या स्वरूपात प्रविष्ट नसून क्तीची उपांगे होत. या सूत्रात भक्तीचे मुख्य अंग सूत्रकार सांगतात की भक्ताने र्वकाल. सर्वभावाने निश्चित बनून केवळ भगवंताचेच भजन करावे.

येथे 'भज' धातूचा उपयोग केला, आहे. 'भज इत्येष वै धातुः सेवायां परिीर्तितः ॥' भज् धातू सेवा या अर्थाने सांगितला जातो. 'भज सेवायां'. तर ोपालपूर्वतापिन्युपनिषदामध्ये म्हटले आहे, 'किं नाम भजनं ? भजनं नाम रसनं ।' भजन कशाला म्हणतात ? भजन म्हणजे रसास्वादन करणे.' म्हणजे भजन ही वाही आहे व भजन म्हणजे त्याचा आनंद लुटणेही आहे!

'आस्तिक्य परिपालन' असे जे मागील सूत्रात सांगितले त्याचे स्पष्टीकरणच ा सूत्राच्याद्वारा नारदमहर्षी करीत आहेत. शास्त्रात जी कर्मादि साधने ांगितली आहेत त्यांना योग्य देश, काल, निमित्त, इत्यादिकांची अपेक्षा असते. ण भक्ताने भजन अखंड करावे त्याला' विशिष्टकालाचे बंधन नाही.

काळवेळ नाम उच्चारितां नाहीं । दोन्ही पक्ष पाही उद्धरती ॥

असे श्री ज्ञानेश्वर महाराज हरिपाठात म्हणतात. तप, दान, धर्म, यज्ञ, तीर्थ, ते, योग आदि साधनास विशिष्ट कालाची अपेक्षा असते हे स्मृतिग्रंथातून

सांगितलेच आहे. याचे कारण ज्या साधनात स्वतंत्र सामर्थ्य कमी असते अथवा नसते त्यांना अन्य साधनांचे साहाय्य लागते पण भगवद्भजन हे अन्य सहकारी साधनांची अपेक्षा न करता स्वतंत्रतेने फल देण्यास समर्थ आहे असे स्कंदपुराण-वचन आहे.

**न देशकालावस्थात्मशुद्ध्यादिकमपेक्षते ।।**
**किं तु स्वतंत्रमेवैतन्नाम कामितकामदम् ।।**

'देश, काल, अवस्था, देह, मन इत्यादिकाची शुद्धी यांची अपेक्षा न करताच स्वातंत्र्याने भगवन्नाम हे सर्व काम पूर्ण करणारे आहे '

नारदपुराणात श्रीनारदमुनीचेच वचन आहे,

न देशनियमो राजन्न काल नियमस्तथा ।
विद्यते नात्र संदेहो विष्णोर्नामानुकीर्तने ।।

पद्मपुराणात प्रत्यक्ष भगवद्वाक्यच आहे,

**तच्च मे मंगलं नाम जपात्पापात्प्रमुच्यते ।**
**दिवा निशि च संध्यायां सर्व कालेषु संस्मरेत् ।।**

'भगवान सांगतात, ते माझे मंगल नाम दिवसा, रात्री, सायंकाळी मनुष्य जपत राहिला तर तो सर्व पातकापासून मुक्त होईल.'

**अहर्निशं स्मरे न्नाम कृष्णं पश्यति चक्षुष : ।**
**अशुचिर्वा शुचिर्वापि सर्व कालेषु सर्वदा ।।** ४-८-८.

'अहर्निश नामस्मरण केल्याने श्रीकृष्णाचे प्रत्यक्ष दर्शन होते. अशुद्ध स्थितीत असो वा शुद्ध स्थितीत असो सदासर्वदा नामस्मरण करील तर क्षणात तो संसारातून मुक्त होईल.'

सूर्य अंधाराचा नाश करतांना जसा इतरांचे साह्य घेत नाही, किंवा मदोन्मत्त हत्तीच्या गंडस्थलाचा भेद करण्याकरिता निघालेला सिंह अन्य साधनांची अपेक्षा ठेवीत नाही, तद्वत् नामाची स्वतंत्र शक्ती आहे. असे हे भजन सर्वदा करावे असे नारद म्हणतात. मनुष्याकडून एकच गोष्ट सर्वदा होणे कठिण आहे. बहुतेक गोष्टी निमित्त प्राप्त झाले असताच मनुष्य करीत असतो. सर्वदा तीच गोष्ट होते की जिच्यावर खरे प्रेम असते. माता पुत्रावर काल पाहून प्रेम करीत नाही, पतिव्रता पतीच्या सेवेकरिता एखाद्या निमित्ताची वाट पाहत बसत नाही. कारण 'सर्वभावें पति ध्यानी मनीं ।' तु० ।। अशी तिची अवस्था असते. लोभी धनावर सर्वदा प्रेम करतो, तसाच प्रकार येथे आहे.

**माताके चित्त पूत बैठा कामिनी के चित्त काम ।**
**लोभी के चित्त धन बैठा तुका के मन राम ।।**

असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे. मागील सत्याहत्तराव्या सूत्र

विवरणात या विषयाचा विचार झाला आहेच.

तसेच दुसरेही पद सूत्रात महत्त्वाचे आहे. ' सर्व भावेन '. संसारात अनेक गोष्टी केल्या जातात पण त्या सर्वभावानेच होतात अथवा केल्या पाहिजेत असे नाही. काही केवल शरीराने, काही वाणीने, काही मनाने केल्या जातात. भाव शब्दाचे कोशात अनेक अर्थ आहेत.

भावो लीला क्रिया चेष्टा भावः सत्ता भवोऽपि वा ।
भावो भक्तिः समाख्याता पदार्थो भाव उच्यते ॥

लीला, क्रिया, चेष्टा, सत्ता, संसार, भक्ति, पदार्थ असे अनेक अर्थ संभवत असले तरी येथे भाव शब्द एका वेगळ्या अर्थाने स्वीकारावा लागेल.

सर्व भाव शब्दाने ' अहं वाचा चित्त अंग ' यांचेकडून होणारी कर्मे समर्पण करणे असाच अर्थ होतो. तसेच बाराव्या अध्यायावरील व्याख्यानात सर्व भावाचे लक्षण सांगितले आहे. ' आणीकही जें जें सर्व । कायिक वाचिक मानसिक भाव । तया मी वांचूनि धांव । आनौती नाहीं ॥ ७९ ॥ ' या ओवीत सर्वभाव लक्षण स्पष्ट केले आहे. सहासष्टाव्या सूत्राच्या विवरणात या विषयाचा विचार केला गेला आहे. काही गोष्टी सर्वभावानेच केल्या गेल्या तर त्याला फळ येते. पृथ्वीत पेरलेले बीज तुकडे झालेले, सडलेले, मोडलेले चालत नाही. ते अखंड संपूर्ण पाहिजे. गंगेचे जल समुद्राकडे सतत प्रवाहित असते. भगवान श्रीकृष्ण अनन्य व अव्यभिचारिणी भक्तीचे असेच लक्षण सांगत आहेत.

आणि मीवाचोनि काही । आणीक गोमटेंचि नाहीं । ऐसा निश्चयोचि तिहीं । जयाचा केला ॥ ६०३ ॥ शरीर वाचा मानस । पियाली कृतनिश्चयाचा कोश । एक मीवाचोनि वास । न पाहती आन ॥ ६०४ ॥ किंबहुना निकट निज । जयाचे जाहले मज । तेणें आपणया आम्हा सेज । एकी केली ॥ ६०५ ॥ रिगता वल्लभापुढे । नाहीं अंगी जीवी सांकडे । तिये कातेचेनि पाडे । एकसरला जो ॥ ६०६ ॥ ज्ञा. १३

गीतेमध्ये ' सततयुक्त, ' नित्ययुक्त, ' ' अनन्य, ' अशा विशेषणांचा जागजागी उपयोग केला आहे. जर काही भाव भगवत्समर्पण न केले तर ते अन्य विषयाकडे जातील, त्यामुळे भावनेत व्यभिचार निर्माण होईल. ते भजन सर्वदा होणार नाही. भगवान् आपल्या भक्तांना सर्वभावाने सर्व देतो असे पुढील सूत्रात म्हटले आहे. मग भक्ताने सर्व भावानेच भजन केले पाहिजे.

या पुढील पद ' निश्चिन्तितैः ' हे आहे. अनादि कालीन संसारासक्तीमुळे जीवाच्यामागे जे विकार लागले आहेत त्यात चिंता हा एक अत्यंत दुर्धर व क्लेशदायक विकार आहे. श्रीमंत, गरीब, सत्ताधीश, सत्ताशून्य, विद्वान, अविद्वान, कोणालाही चिंतेने सोडले नाहीं. एका सुभाषितकाराने चिता व चिंता यांचे साम्य दाखविले आहे. तो म्हणतो चितेपेक्षाही चिंता अधिक आहे. चिता ही निर्जीव

हाला दग्ध करते तर चिंता ही सजीवाला सतत आतून जाळीत असते. अप्राप्ताच्या ाप्तीची चिंता व प्राप्ताच्या रक्षणाची, वृद्धीची चिंता लागत असते. ती विषय-ातनात्मक असते. ऐहिकभोगाची प्राप्ती झाली तरी पारत्रिक भोगाकरिता चिंता ात असते.

तैसी चिंता अपार । वाढविती निरंतर ।
जीवीसूनि असार । विषयादिका ।। ज्ञा. १६-३३३

पण ज्याची भगवंतावर खरी निष्ठा आहे तो म्हणतो की 'योगक्षेमं हाम्यहम्' अशी जर त्या प्रभूची प्रतिज्ञा आहे तर मी चिंता का करावी ? माता र समर्थ आहे तर बाळकाला चिंता करण्याची काय आवश्यकता ?

तुका म्हणे चिंता कैसी तें मी नेणें । लडिबाळ तान्हें माऊलीचे ।।

भगवान श्रीकृष्ण सांगतात,

ते एकवटूनि जियें क्षणीं । अनुसरले गा माझिये वाहणी । तेव्हां चि तयाची ातवणी । मजचि पडली ।। ३३८ ।। मग तिहीं जें जें करावें । तें मजचि पडिलें ाघवें । जैसी अजातपक्षाचेनि जीवें । पक्षिणी जिये ।। ३९ ।। आपुली तहानभूक णें । तान्हया निकें तें माऊलीसचि करणे । तैसें अनुसरले मज प्राणें । तयांचें वें मी करी ।। ३४० ।। ज्ञा० ९

कित्येकांना सांसारिक चिंतेने ग्रासलेले असते तर कित्येक अध्यात्ममार्गी ाधकांना उद्धाराच्या चिंतेने व्यापलेले असते. तो प्रकार एकनाथ महाराजांनी विस्तर सांगितला आहे.

कैं कृपा करील गोविंद । कैं तुटेल भवबंध । कैं देखेन तो निजबोध । रमानंद जेणें होय ।। २२९ ।। जैसी जीवनावेगळी मासोळी । तैसा बोधालागी ळमळी । प्रेम पडिभराच्या मेळी । देह न सांभाळी सर्वथा ।। २३० ।। एक नेणोनि रदेहा मुकले । एकी नव्हें म्हणोनि उपेक्षिले । एक ज्ञानगर्वें गिळिले । एक भुलले षयार्थी ।। २३१ ।। एक साधनाभिमानें ठकले । एक करूं करूं म्हणतां गेले । क करितां अव्हांटा भरले । करणें ठेलें तैसेचि ।। २३२ ।। जरी विवेक कळला ना । तरी न तुटती विषयवासना । तेणें संतप्त होऊनि जाणा । नारायणा ातितु ।। २३४ ।। ए. भा. ७

या विषयात तुकाराम महाराजांचेही उद्गार प्रसिद्ध आहेत.

काय मी उद्धार पावेन । काय कृपा करील नारायण ।
ऐसें तुम्ही सांगा संतजन । करा समाधान चित्त माझें ।। १ ।।
काय हे खंडईल कर्म । पारुषतील धर्माधर्म ।
कासयानें ते कळेल वर्म । म्हणऊनि श्रम वाटतसे ।। २ ।।

ऐसी चिंता करी सदासर्वकाळ । रात्रंदिवस हेचि तळमळ ।
तुका म्हणे नाही आपुलें बळ । जेणें फळ पावेन निश्चयेसी ।। ३ ।। तु०

अशी ही चिंता एखादा साधक करील पण नारद म्हणतात, ज्याचा सर्वभाव भगवंताचे ठिकाणी आहे त्याला कोणत्याही प्रकारची चिंता करण्याचे कारण नाही. श्रीकृष्ण भगवान प्रतिज्ञापूर्वक सागतात,

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम्** ।। गीता १२-७

' माझ्या स्वरूपाचे ठिकाणी ज्यांनी आपले चित्तसमर्पण केले आहे अशा भक्तांचा मी मृत्युरूप संसारसागरातून तत्काल उद्धार करतो. '

येऱ्हवी तरी माझिया भक्ता । आणि संसाराची चिंता ।
काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ।। ८५ ।।
म्हणोनि गा भक्ता । नाहीं एकही चिंता ।
तयातें समुद्धर्ता । आथि मी सदा ।। ९४ ।। ज्ञा. १२

असा प्रकार असल्यामुळे खरा भक्त कशाचिही चिंता करीत नाही. कारण चिंता करीत बसणे म्हणजे भगवत्कृपेवर, भगवत्सामर्थ्यावर अविश्वास प्रगट करणे होय. ' निर्वाणी गोविंद असे मागे पुढे । काहीच साकडे पडो नेदी ।। तु. ।।' असे जर आहे तर मग चिंता का करावी ? म्हणूनच नारद निश्चित होऊन भगवंताचेच भजन करावे असे सूत्रात सागतात

भजन करणे, सेवा करणे हा एक जीवाचा स्वभाव आहे, तो आपल्यापेक्षा श्रेष्ठाची वा कनिष्ठाचीही सेवा शरीराने वा वाणीने अथवा मनाने करीतच असतो. पण असे दिसून येते, की, एक मनुष्यदेहधारी जीव दुसऱ्या जीवाचीच सेवा करीत असतो. जीवाने जीवाची सेवा करून काय उपयोग ? जीव हा अंश आहे, तो अल्पज्ञ, अल्पशक्तिमान, दुःखी, परतंत्र जन्ममरणादिधर्मवान् असा असतो. तो स्वतः चिंता-भयक्लेशादि विकारांनी युक्त असतो, मग तो कोणी ब्रह्मदेव असो. तुकाराममहाराज म्हणतात. ' ब्रह्मादिकपदे दुःखाची शिराणी ' किंवा ' इंद्रादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ।। ' गीतेच्या नवव्या अध्यायात इंद्रादिकांचे भोग कसे दुःखमिश्रित असतात. व पुण्य संपल्यानंतर त्यांना पुन्हा कसा गर्भवास, जन्ममरण, इत्यादि प्राप्त होते हे स्पष्टच सांगितले आहे. 'आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।।' (गी.८–१६) हा श्लोक प्रसिद्ध आहे. एक जीव दुसऱ्या जीवाचा उद्धार करू शकत नाही. एक बुडणारा दुसऱ्या बुडणाऱ्यास कांठावर आणू शकेल काय ? तसाच प्रकार आहे. श्रीशुकाचार्य परीक्षिति राजास सांगतात,

सांडूनि श्रीकृष्णचरण । इंद्रादि देवांचे करितां भजन ।
ते देव मृत्युग्रस्त पूर्ण । मा भजत्याचें मरण कोण वारी ।।३४।। ए. भा.२

भगवान श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात,

जो मज होय अनन्यशरण । त्याचे निवारी मी जन्म मरण ।
यालागीं शरणागता शरण्य । मीचि एक ।।२८८।। ज्ञा. ९

इतकेच नव्हे तर आपणास सोडून हे अज्ञानी यज्ञयागादि करणारे, अन्य देवास जणाऱ्यांना श्रीकृष्णानी ' दुर्बुद्धि ' असे म्हटले आहे.

मी सकळां यज्ञांची आदि । आणि यजना यया मीचि अवधि ।
कीं मातें चुकोनि दुर्बुद्धि । देवां भजले ।।३५२।। ज्ञा. ९

इतका विस्तार करण्याचे कारण सूत्रात ,' भगवान् एव भजनीयः ।' असे ़ाम सागितले आहे. भगवान शब्दाच्या अर्थाचा सविस्तर व सप्रमाण विचार गे सदतिसाव्या सूत्राच्या विवरणात केला आहे. यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य, ़वर्य या षड्गुणांनी पूर्ण अशा परमात्मस्वरूपालाच भगवान ही संज्ञा प्राप्त होते. ़र देवांचे ' देव ' हे उपनाव आहे ! तत्त्वतः ते कर्माने, कर्मफलाने, बांधलेले ़वच आहेत. त्यामुळे भक्ताच्या भक्तीचा अंगीकार करून त्याला प्रेमदान कर-ाचे सामर्थ्य या अन्य देवदेवतातरांचे ठिकाणी कोठून येणार ? इतकेच नव्हे तर गवत एकादशस्कंधाच्या सहाव्या अध्यायांत असा प्रसंग आहे की, सर्व तेहतीस टि देव श्रीकृष्ण भगवंतांजवळ आले. त्यांनी स्वर्गातील अनेक दिव्य पुष्पांच्या ळांनी भगवंताचे पूजन करून तेरा श्लोकांच्या द्वारे श्रीकृष्ण भगवंताचे अत्यंत वनापूर्ण स्तवन केले. म्हणून सूत्रात ' भगवान् एव ' असा शब्द प्रयोग केला हे. भजन करणाऱ्याच्या सर्व कामना पूर्ण करण्याचे पूर्ण सामर्थ्य त्याचेच ठिकाणी हे म्हणून तो ' भजनीय ' आहे.

तुका म्हणे कृपावत । इच्छिले पुरवी मनोरथ ।
ऋद्धिसिद्धि मोक्ष देत । शेखी संग आपुला ।।तु ।।

अशा भगवंताचे सर्वदा सर्वभावाने भजन करावे.

भज् धातू सेवा या अर्थाचा आहे हे पूर्वी सांगितलेच आहे. ती सेवा हीच ़्त, उपासना, पूजा इत्यादि अनेक स्वरूपाने केली जाते. भक्तीचे अनेक प्रकार ़ो भक्तिशास्त्रावरील ग्रंथात सांगितले आहेत तरी ते सर्व ' सेवा ' या अर्थात ़र्भूत होतात. असे सर्वदा सर्वभावाने भजन कसे करावे, सेवा कशी करावी, ़णागति कशी करावी हे स्वतः श्रीकृष्ण भगवानच भक्तवर्य उद्धवास नाथ-ावतात सांगतात,

सांडूनि धनमान चेष्टा । सांडूनि सज्ञान प्रतिष्ठा । सांडूनिया नाना निष्ठा । ण वरिष्ठा मज यावे ।।२५।। सांडूनि कुळाचे उंचपण । सांडूनि जातीचा ़्रमान । साडूनि आश्रमाचे श्रेष्ठपण । मज लागी शरण रिघावें ।।२६।। सांडूनिया ़ध्यान । सांडूनिया विधिविधान । सांडूनिया देहाभिमान । मजलागीं शरण

रिगावें ॥२२७॥ ए. भा. १२.

या सर्वभावाने निश्चित होऊन केलेल्या भजनाचे फल पुढील सूत्रात सांगितले आहे.

## सूत्र ८०

## स कीर्त्यमानः शीघ्रमेवाविर्भवति अनुभावयतिच भक्तान् ॥८०॥

**अर्थ :**

तो (भगवान) त्याचे कीर्तन केले असता तत्काल अविर्भूत होतो व आपल्या भक्तांना आपला अनुभव देतो.

**विवरण :**

मागील सूत्रात मानवाने सर्वकाळ सर्वभावाने निश्चित मनाने भगवंताचेच भजन करावे असे सांगितले. वास्तविक मानव जन्मात जीव फार भाग्याने येतो. हाच जन्म जीवास या जन्ममरणात्मक संसारातून उद्धरून जाण्याचे एकमेव साधन आहे. जीवनाची सफलता संपादन करण्याचे जीवास भगवतापावेतो जाण्याचे हे साधन आहे.

श्रीमद्भागवताच्या शेवटी शुकाचार्य म्हणतात,

मृषागिरस्ता ह्यसतीरसत्कथा न कथ्यते यद्‌भगवानधोक्षज. ।
तदेव सत्यं तदु हैव मंगलं व देव पुण्यं भगवद्‌गुणोदयम् ॥
तदेव रम्यं रुचिरं नवं नवं तदेव शश्वन्मनसो महोत्सवम् ।
तदेव शोकार्णव शोषणं नृणां यदुत्तमश्लोकयशोऽनुगीयते ॥

' ज्या वाणीने अधोक्षज भगवत्कथांचे गायन होत नाही, विषयाचेच तुच्छ वर्णन केले जाते, ती वाणी असत् आणि व्यर्थ आहे. ज्या वचनांनी भगवद्‌गुणप्रगट केले जातात, पुण्यकीर्ति भगवद्यश वर्णिले जाते तेच वचन सत्य आहे, तेच मंगलरूप आहे, तेच पुण्य आहे, तेच मनोहर व तेच रुचिर आहे. तेच नित्य नवे रसमय आहे. तेच सदा मनाला महान् आनंद देणारे आहे. तेच मानवाच्या शोकरूपी सागरास शोषण करणारे आहे. '

मागील सूत्रात ' भगवान् एव भजनीयः ' असे वाक्य आहे. त्याच्या भजनात, सेवेतच जीवनाचे साफल्य कसे आहे, त्याच्या भजनाचे फल किती श्रेष्ठ आहे हे या ऐशीव्या सूत्रात सांगतात. यज्ञादी कर्मात इंद्रादी अनेक देवदेवतांची उपासना

मंत्राने, अग्निमुखी हवनाने केली जाते. पण त्या योगे त्या यज्ञकाली कोणतीही देवता आविर्भूत होत नाही व त्याकाली त्या याज्ञिकाला आपला अनुभव म्हणजे कृपाप्रसादही देत नाही. त्या यज्ञादिकांचे पुण्य अपूर्वद्वारा कालान्तराने मिळते. पण भगवद्भक्तांना त्या भजनाचे फळ तत्काळ प्राप्त होते असे नारद सांगतात. त्याचे कीर्तन केले असता, तो तत्काळ भक्तापुढे आविर्भूत होतो. इतर योगतपादी साधनांत तत्काल भगवंताला पुढे प्रगट दशेस आणण्याचे सामर्थ्य नाही. स्वतः भगवान श्रीकृष्णच अर्जुनास स्पष्ट सांगत आहेत,

न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।
एवं रूपः शक्य अहं नृलोके दृष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ।। ४८।। गीता ११

'वेदपठण, यज्ञयागादि, शास्त्रपठण, दान, श्रौतस्मार्तादि कर्मे अथवा उग्र तपश्चर्या यांनीदेखील माझे हे रूप मनुष्यलोकामध्ये अन्य कोणालाही दिसणे शक्य नाही.'

अर्जुन हा भगवंताचा प्रियभक्त होता. शुकाचार्यांच्या कीर्तनात अर्जुन प्रमुख रागरागिणीने देवास आळवीत असे. त्यामुळे कीर्तनात रंग चढत होता. कीर्तनात भावप्राधान्य असले तरी सुस्वर गायनाने प्रेमाने प्रभूस आळविण्यालाही तितकेच महत्त्व आहे. सूत्रात 'कीर्त्यमानः' असे पद आहे. कीर्त्यमान म्हणजे प्रेमाने ज्याचे गायन केले जाते तो, असा अर्थ होतो. 'कृतिर्या रमयत्येव भूताना कीर्तिरुच्यते ।' जी कृती, जी कर्मे भूतमात्राना आनंदास कारण होतात त्यांना कीर्ती असे म्हटले जाते. भक्तवर्य अर्जुन भगवत्कीर्तीचे महत्त्व प्रतिपादन करीत आहे,

परि पडिलिया दुःखसागरी । तूं काढिसी कां जयापरी । ते कीर्ति तुझी श्रीहरी आठवित असे ।।५०२।। कीर्ति आठविता वेळोवेळा । भोगीतसे महासुखाचा सोहळा । तेथ हर्षामृत कल्लोळा–। वरि लोळत आहे ।।५०३।। ज्ञा. ११

भगवत्कीर्ती अनेक प्रकारची आहे. संसारात कोणी रूपाने, गुणाने, विद्येने, शौर्याने, कलेने कीर्ती संपादन करणारे असतात. बलीचे व कर्णाचे औदार्य, भीमाचे, बळ, ऋषिमुनींचे ज्ञान, दधीची, शिबी इत्यादिकांची दया, मदनाचे रूप, ऋषभ देवाची शांती इत्यादि स्वतंत्र एक एक गुण एकाएकाच्या कीर्तीस कारण झालेले पुराणातून दिसतात. पण भगवंताच्या ठिकाणी या सर्व गुणांचा समन्वय आहे, नव्हे, जगातील सर्व श्रेष्ठ गुण संपूर्णरूपाने त्याचेच ठिकाणी वास्तव्य करून असतात. तसेच ते इतके अपूर्व आहेत की कोणीही श्रद्धावान पुरुष त्या गुणांकडे आकृष्ट होतो व त्यांचे मोठ्या आवडीने वर्णन करू लागतो. भगवद्विषयक निरतिशय प्रेम निर्माण होण्याचे हे एक महत्त्वाचे साधन आहे. तसेच ज्याच्याविषयी प्रेम असते त्याचे सर्वच मधुर उत्तमोत्तम वाटायास लागते. 'मधुराधिपतेरखिलं मधुरं ।' असे श्रीवल्लभाचार्यांनी स्त्रोत्रात म्हटले आहे. नाम, लीला, गुण, यांचे उच्च-

स्वराने गायन करणे हे कीर्तनाचे लक्षण भक्तिरसामृतसिंधु नामक ग्रंथात (१-२-२९) केले आहे. ' कीर्तनं मुनिभिः प्रोक्तं हरेर्लीला प्रगायनं । ' श्रीहरीच्या लीलांचे गायन करणे म्हणजेच कीर्तन होय अशी ही एक व्याख्या केली आहे. मात्र ते कीर्तन कसे करावे हे श्रीएकनाथमहाराज भागवतस्कंध अकराव्याच्या शेवटच्या अध्यायात सांगतात.

देवाधिदेव सर्वेश्वर । त्याचे मत्स्य कूर्मादि अवतार । जन्मकर्मादि नाना चरित्र । गाती ते पवित्र पुण्यराशी ।।३००।। ते तू श्रद्धा कोण म्हणसी । जेवी धन लोभी धनाशी । गुळी आवडी माकोडचांसी । तैसी कीर्तनासी निज आवडी ।।३०१।। जेवी शिणतां काळें बहुतें । वंध्या प्रसवे एकोलते । ते कळवळी जैसी त्यातें । तेवी कीर्तनाते अति प्रीती ।।३०२।। ऐसिया श्रद्धासंपत्ती । वर्णितां भगद्गुण कीर्ती । श्रद्धाळुवा परम प्रीती । जाण निश्चिती नृपनाथा ।।३०३।। ए. भा. ३१. कीर्तनाचे गुणकीर्तन नामसंकीर्तन इत्यादी प्रकार सांगितले आहेत. भगवंताचे अनंत गुण जरी आहेत तरी षड्गुणाना प्राधान्य दिले जाते हे मागे सांगितले आहे. तसेच भागवत पुराणात सोळा महत्त्वाचे गुण सांगितले आहेत त्यांचा विचार मागे सदतिसाव्या सूत्रावरील विवरणात केला आहे. भक्तिरसामृतसिंधु नामक भक्तिशास्त्रावरील अपूर्व ग्रंथात प्रमुख चौसष्ट गुण सांगितले आहेत. ते खालीलप्रमाणे आहेत,

सुरम्याङ्ग, सर्वसल्लक्षणांनींयुक्त, रुचिर (सौदर्यातिशयाने दृष्टीला आनंद देणारा), तेजस्वी, बलवान, सर्वजयी, वयान्वित (कौमार, पौगण्ड, किशोर वयात असूनही भक्तिरसाला आश्रयभूत असणारा), विविध अद्भुत भाषावित्, सत्यवक्ता, प्रियवादी, वक्तृत्वगुणवान, पाण्डित्ययुक्त, बुद्धिमान, प्रतिभावान, विदग्ध (कलाविलासयुक्त), चतुर, दक्ष, कृतज्ञ, दृढव्रत, देशकालसुपात्रज्ञ, शास्त्रदृष्टिवान्, शुचि, जितेंद्रिय, स्थिर, दान्त (दुःसहक्लेश सहन करणारा), क्षमाशील, गम्भीर, धृतिमान, सम (रागद्वेषविमुक्त), दानवीर, धार्मिक, शूर, करुणावान्, मान्य पुरुषांचा सन्मान करणारा, विनयी, न्हीमान, शरणागत पालक, सुखी, भक्तसुहृत्, प्रेमवश्य, सर्वशुभंकर, प्रतापी, कीर्तिमान, लोकानुरागप्राप्त, साधुसमाश्रय (साधूचा पक्षपाती), सुन्दरीवृन्दमोहन, सर्वाराध्य, सर्वसमृद्धिमान, सर्वश्रेष्ठ, ईश्वर, सदास्वरूपसंप्राप्त (सदैव स्वरूपात स्थित असणारा), सर्वज्ञ, नित्यनूतन, सच्चिदानंदघन, सर्वसिद्धी ज्याची अखंड सेवा करतात असा, अचिंत्यमहाशक्ति, कोटिब्रह्मांडविग्रह, अवतारावली बीज (सर्व अवतारांचे मूल), हतारिगतिदायक (ज्या शत्रूचा नाश केला त्यांना मुक्ती देणारा), आत्माराम अशा ज्ञानी पुरुषांना आकृष्ट करणारा, सर्वाद्भुतचमत्कारलीलाकल्लोळसागर, अतुल्यमधुरप्रेममण्डित, आपल्या अलौकिक वेणुनादाने त्रिभुवनाला आकर्षित करणारा, समस्तकल्याणगुणवारिधी, हे चौसष्ट

गुण भक्तिशास्त्रात प्रमुख म्हणून सांगितले आहेत । कीर्तनातून अशा या गुणाचे विस्तृत वर्णन भगवल्लीलांच्या द्वारा केले जाते. श्रीमद्भागवत पुराणातून शुकाचार्यांनी ज्या भगवल्लीला गायिल्या आहेत, त्यात वरीलपैकी अनेक गुणाचे संकीर्तन केले गेलेले दिसून येते. तसेच श्रीविष्णुसहस्रनामादिकात जी नामे सांगितली आहेत त्यातून कोणत्या ना कोणत्या श्रेष्ठ गुणाचे संकीर्तन केलेले दिसून येते. अशा या कीर्तनाने भगवंताचा तत्काल आविर्भाव होतो असे सूत्रकार सागतात.

श्रुतिशास्त्रसिद्धान्तानुसार प्रत्येकाच्या हृदयात परब्रह्मपरमात्म्याचे अखंड वास्तव्य आहेच. पण अज्ञान, अहंकार, कामादिविकार व तज्जन्य पातकांच्या संस्कारामुळे तो असून नसल्यासारखा होतो. एकनाथमहाराज म्हणतात,

तेवी निजात्मा हृदयी वसे । परी चित्तवृत्ति मळिण असे ।
तंव परब्रह्म न प्रकाशे । चित्त वासनादोषें दूषित ।।७८८।। ए. भा. ३

हृदयातील हे दोष पूर्णपणे नष्ट होण्याचे भगवद्भक्ती हे साधन आहे.

रजतमादि कर्मज मळ । चित्ती बैसले जे सबळ । ते प्रक्षाळिती सकळ । भक्तिप्रेमजळ क्षाळणें ।।७४१।। जंव जंव थोरावे सप्रेम भक्ति । तंव तंव पाया लागे विरक्ति । स्वये विरमे विषयासक्ति । होय चित्तवृति निर्मळ ।।४२।। निर्मळ झालिया चित्तवृत्ति । परमात्मया सर्वभूती । भजो लागे अनन्य प्रीती । हे चौथी भक्ति उदार ।।७४३।। ए. भा. ३

कीर्तनाचा व श्रीभगवत प्रादुर्भावाचा कसा अन्योन्य कार्यकारणभाव संबंध आहे हे नवयोगेश्वर–जनक संवादात सांगितले आहे.

सप्रेम सद्भावें संपूर्ण । नित्य करिता नामस्मरण । वृत्ति पालटती आपण । तेही लक्षण ऐक राया ।। ७७५ ।। नामासरिसाच हरी । रिघे हृदया माझारी । तेणें धाकें अभ्यंतरी । हो लागे पुरी हृदयशुद्धि ।। ७७६ ।। तेव्हां प्रपंच सांडोनि वासना । जडोनि ठाके जनार्दना । अहंकारू साडोनि अहंपणा । सोऽहं सदना माजी रिघे ।। ७७७ ।। चित्त विसरोनि चित्ता । जडोनि ठाके भगवंता । मनाची मोडली मनोगतता । सकल्प विकल्पता करू विसरे ।। ७७८ ।। कृतनिश्चयेंसी बुद्धि । होऊनि ठाके समाधी । ऐशी देखोनि हृदयशुद्धी । तेथोनि त्रिशुद्धी न रिघे हरि ।। ७७९ ।।

कीर्तन भक्ती अशी श्रेष्ठ आहे की ती श्रीहरीच्या संतोषास कारण होते. श्रीतुकाराममहाराज यांचा एक अभंग महत्त्वाचा आहे. ते सांगतात,

कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव । वैकुंठीचा राव सवें असे ।।
त्रैलोक्यभ्रमण करीत नारद । त्यासवें गोविंद फिरतसे ।।
नारदमंजुळ सुस्वरे गीत गाय । मार्गी चालताहे संगे हरी ।।
तुका म्हणे त्याला गोडी किर्तनाची । नाहीं आणिकांची प्रीती ऐसी ।।

भगवंताच्या आविर्भावासच अवतार असे म्हटले जाते. त्याचे अनेक प्रकार व प्रयोजन गीतादि ग्रंथातून सांगितले आहे.

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ गीता ४–८**

'भक्ताचे रक्षण, दुष्टांचा नाश, धर्माची संस्थापना करण्याकरिता मी युगायुगात प्रगट होतो,' असे श्रीकृष्णानी अर्जुनाला सांगितले आहे या प्रयोजनाच्या सिद्धिकरिता अनेक अवतार धारण केलेले पुराणादिकात वर्णिले आहेत. त्यांचेही पुरुषावतार, गुणावतार, लीलावतार, आवेशावतार, अंशावतार, कलावतार इ० प्रकार आहेत. श्रीमद्भागवतामध्ये अशा चोवीस अवतारांचे वर्णन आहे. त्याची चरित्रे व कार्य सविस्तर सांगितले आहे. लघुभागवतामृत या भक्तिशास्त्रावरील ग्रंथात आणखीही काही प्रकार आहेत गर्गसंहिता गोलोक खंडात मुख्य सहा प्रकार सांगितले आहेत–अंशाश, अंश, आवेश, कला, पूर्ण व पूर्णतम इ० मरीच्यादि प्रजापती अंशांश अवतार, ब्रह्मादि अंशावतार, भार्गवादि आवेशावतार, कपिल कूर्मादि कलावतार, नृसिह, राम पूर्णावतार व श्रीकृष्ण पूर्णतमावतार आहेत.

**परिपूर्णतम साक्षाच्छीकृष्णभगवान् स्वयं ॥ गर्ग सं० १**

कित्येक भक्तिग्रंथातून तर कृष्णावतारातही पूर्ण, पूर्णतर व पूर्णतम असे भेद कल्पिले आहेत. द्वारकेतील श्रीकृष्ण पूर्ण, मथूरेतील पूर्णतर व वृंदावनातील बाललीला करणारा रासाधिपती पूर्णतम असे म्हटले आहे. न्यूनाधिक प्रमाणात अवतार कल्पना सर्व पुराणांस व भक्तिशास्त्रास मान्य आहे. ज्या ज्या वेळी भक्तास कोणत्याही अधिभौतिक अध्यात्मिकादि दुःखानी पीडा होते त्या त्या वेळी भगवान श्रीहरी सगुण साकार रूप धारण करून त्याचे ते दु ख दूर करतो. श्रीकृष्ण भगवान अर्जुनास सांगतात,

भवसिंधूचे नि माजें । कवणासि धाक नुपजे ।
तेथ जरी की माझे । बिहिती हन ॥ ८८ ॥
म्हणोनि गा पाडवा । मूर्तीचा मेळावा ।
करूनि त्यांचिया गावा । धावत आलो ॥ ८९ ॥ ज्ञा० १२

सर्व पुराणे या अवतार माहात्म्याने, अवतारांच्या चरित्राने भरली आहेत. कोणत्या युगात कोण कोण राक्षस व दुष्ट जन्मले, त्यानी भक्तास व धर्माचरण करणाऱ्या धार्मिक जनास कशी पीडा दिली, त्यामुळे धर्मग्लानि कशी वाढली, त्या त्यावेळी भगवान कोणकोणत्या रूपाने कोठे कोठे कसे अवतरले, कोणत्या पद्धतीने त्या राक्षसांचा नाश केला, धर्माची कशी स्थापना केली, भक्तांचे कसे रक्षण केले हे त्या त्या पुराणातून अविस्तर सांगितले आहे. भागवत पुराणात तर सर्वच अवतारांची चरित्रे विस्तृत आलेली आहेत. वास्तविक सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् सर्व ब्रह्माण्डाची उत्पत्तीस्थितीलय करणारा, मायोपाधिक ईश्वर आहे तो समर्थ

आहे, त्याला आपल्या स्वरूपस्थितीत राहूनही धर्मरक्षण, दुष्टनाश, इत्यादी गोष्टी करता येणार नाहीत असे नाही. मग सगुण साकार रूपच स्वीकारावयाचे प्रयोजन काय असे कोणास वाटेल. पण जेव्हा जेव्हा भक्तांना पीडा होते व दुष्ट उन्मत्त होतात व भक्त देवाचा धावा करतात त्यावेळी भक्त जेथे असतात तेथे येऊन साकारस्वरूप धारण करून त्यांचे रक्षण केल्यासच दुष्टांनाही आपल्यापेक्षा एक प्रबल शक्ती या विश्वात आहे, तिच्यापुढे आपले सामर्थ्य चालत नाही याची कल्पना येते, त्यांचा गर्वपरिहार होतो व इतरांनाही अधर्माचरणाने काय हानी आहे याची जाणीव होऊन धर्माचरणाकडे बहुजनसमाजाची प्रवृत्ती होते. समाजात सदाचार वाढतो, सामाजिक संतुलन निर्माण होते. तसेच भक्तांनाही भगवान आपल्या भक्तीमुळे प्रसन्न होऊन कशाही आपत्तीत आपल्याकरिता धावत येऊन आपले रक्षण करतो याचा विश्वास निर्माण होऊन भक्ताचे भगवंतविषयक प्रेम 'प्रतिक्षण वर्धमान' होते. तसेच सामान्यांना निराकार स्वरूपाचे ज्ञान व श्रद्धा निर्माण होणे कठीण असते. भगवंतच अवतार घेतो अशी भावना झाल्यावर त्यांची त्यापैकी कोणत्या तरी आवडत्या स्वरूपावर श्रद्धा जडणे सुकर होते. या अनेक कारणामुळे भक्तिमार्गात प्रगट अशा भगवदवतारांना फार श्रेष्ठत्व आहे.

असे भगवत्प्रागट्याचे म्हणजे अवताराचे प्रयोजन असले तरी या सूत्रात नारदमहर्षि सांगतात तो प्रकार वेगळा वाटतो. ते म्हणतात कीर्तनप्रेमी भक्त कीर्तनात रंगला आहे त्या वेळी 'तो प्रेमे छंदे नाचे डोले । हारपले देहभान ।। तु० ।। 'नाठवोनि देह पायाचे चिंतन । अवसान ते क्षण नाही मध्ये ।। तु ।।' अशा अवस्थेत गेला आहे. तन्मय झाला आहे त्याला कोणत्याही दुःखाची स्मृती नाही, कीर्तनाच्या निर्भर आनंदात डुल्लत आहे, त्यावेळी प्रत्यक्ष भगवंतालाच त्याची स्थिती एवढी आवडत की तो भक्त ज्या स्वरूपात देवाला आळवीत असेल त्या स्वरुपाने तेथे न बोलावताच तत्काल प्रगट होतो. याचे कारण देव हा प्रेमपिसा आहे व भक्ताचे प्रेम अष्टसात्विकभावयुक्त कीर्तनात अभिव्यक्त होते. व्रजवासी गोपिकांना श्रीकृष्ण विरह झाला त्या वेळी त्यांनी पुष्कळ शोध केला पण श्रीकृष्ण काही सापडेना. तेव्हा सर्वांनी मिळून गीत गाइले. त्यास 'गोपीगीत' म्हणतात. ते एक श्रीकृष्णकीर्तनच होते, आक्रोशपूर्वक, भगवान श्रीकृष्णाच्या महात्म्यज्ञानपूर्वक अनेक लीला त्यांनी गायिल्या आहेत. श्रीकृष्णाच्या त्रैलोक्यसुदर स्वरूपाचे वर्णन केले आहे, करुणा भाकली आहे, दर्शनाची आर्तता प्रगट केली आहे, दीनतेचे प्रदर्शन केले. या गीताच्या द्वारे श्रीकृष्णप्रेमाचा सागर उचंबळून आला. त्या वेळी ते कीर्तन चालू असतानाच श्रीकृष्ण भगवान एकदम प्रगट झाले असे वर्णन आहे.

तासामाविरभूच्छौरिः स्मयमान मुखाम्बुजः ।
पीताम्बरधरः स्रग्वी साक्षान्मन्मथमन्मथः ।। भागवत १०-३२-२

'त्या गोपीका विरहाने शोकमग्न असता प्रसन्न मुखकमळ असणारा, पीताम्बरधारी, वनमालाविभूषित, मदनालाही लाजविणारा भगवान श्रीकृष्ण तेथे आविर्भूत (प्रगट) झाला.' या प्रगटतेत भगवंताचे कीर्तनप्रेम हाच एकमेव हेतू सिद्ध होतो. म्हणून 'स कीर्त्यमानः शीघ्रमेव आविर्भवति' असे नारद म्हणतात.

**नाहं वसामि वैकुंठे योगिनां हृदये रवौ ।**

**मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद** ।। आदि पु० १९-३५

भगवान स्वतःच भक्तवर्य नारदास सांगतात, 'मी वैकुंठातही राहत नाही, योग्यांच्या हृदयातही नाही, सूर्यमंडलातही नाही, तर जेथे माझे भक्त माझ्या गुणलीलादिकांचे सतत गायन करीत असतात. तेथेच मी अखंड वास्तव्य करून असतो.' श्रीज्ञानेश्वरमहाराजही याच श्लोकाचा अनुवाद श्रीकृष्णमुखाने करतात,

तो मी वैकुंठी नसे । वेळ एक भानुबिंबीही न दिसे । वरी योगियांचीही मानसें । उमरडोनि जाय ।। २०७ ।। परी तयापासी पांडवा । मी हारपला गिंवसावा । जेथ नाम घोष बरवा । करिती माझा ।। २०८ ।।

पुन्हा असे की, जेथे भगवान स्वतः आविर्भूत (प्रगट) होतो, ती भूमिका प्रत्यक्ष वैकुंठस्वरूप बनते. श्रीकृष्ण सांगतात,

कही एकाधेनि वैकुंठा जावें । ते तिहीं वैकुंठचि केलें आघवें ।

ऐसें नामघोष गौरवें । धवळलें विश्व ।। २०३ ।। ज्ञा० ९

जेथे वैकुंठलोक आला तेथे सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्यादि सर्व वैभव प्रगट होते. याचा विचार भागवत एकादश स्कंधातील विदेह-नवयोगेश्वर संवादात एकनाथमहाराजांनी सुंदररीतीने केला आहे.

कीर्तनी हरिनामाचा पाठा । तेणें देवासी संतोष मोठा । वेगीं सांडूनि वैकुंठा । धावें अवचटा कीर्तनामाजी ।। ४२६ ।। हरिकीर्तना लोधला देवो । विसरला वैकुंठा जावो । तोचि आवडला ठावो । भक्तभावो देखोनि ।। २७ ।। जेथ राहिला यदुनायक । तेथेंचि ये वैकुंठलोक । यापरी मुक्ति 'सलोक' । कीर्तनें देख पावती भक्त ।। २८ ।। नामकीर्तन निजगजरीं । भक्तानिकट धांवें श्रीहरी । तेचि 'समीपता' । मुक्ति खरी । भक्तांच्या करी हरिकीर्तनें ।। २९ ।। कीर्तनें तोषला अधोक्षज । भक्ता प्रत्यक्ष गरुडध्वज । श्यामपीतवासा चतुर्भुज । तें ध्यान सहज ठसावें ।। ३० ।। भक्तु कीर्तन करी जेणें ध्यानें । तें ध्यान दृढ ठसावें मनें । तेव्हां देवाची निज चिन्हें । भक्तें पावणे संपूर्ण ।। ३१ ।। श्याम चतुर्भुज पीतांबरधारी । शंखचक्रादि आयुधें करी । हें स्वरूपता भक्तातें वरी । कीर्तन गजरीं भाळोनि ।। ३२ ।। तेव्हां देवभक्त समसमान । समान अवयव समचिन्ह । भावें करितां हरिकीर्तन । एवढें महिमान हरिभक्तां ।। ३३ ।। दोघां एकत्र रमा देखे । देवो कोण तेही नोळखे । ब्रह्मा नमस्कारी चवकें । देवो तात्त्विकें नकळे त्यासी ।। ३४ ।। भावें करितां हरि-

कीर्तन । तेणे संतोषे जनार्दन । उभयता पडे आलिंगन । मिठी परतोन सुटेना ।।३५। वृत्ति स्वानंदी निमग्न । परतोनि कदा नव्हे भिन्न । 'सायुज्य मुक्ति' या नांव पूर्ण। जेणें दुजेपण असेना ।। ३६ ।। ए० भा० ५

अशा प्रकारे कीर्तनात भगवत् आविर्भाव होतो. स्वत: भगवान श्रीकृष्णच उद्धवोपदेश प्रसंगी त्याला कीर्तनमहात्म्य कथन करीत आहेत.

जें सुख क्षीरसागरी नसे । पहाता वैकुंठीही न दिसे । -तें सुख मज कीर्तनी असे । कीर्तन वशें डुल्लतु ।। ७४१ ।। मज सप्रेमाची आवडी भारी । भक्तभावाचिया कुसरी । मीही कीर्तनीं नृत्य करी । छंद तालावरी विनोदें ।। ७४२ ।। ए० भा० ११

'नामदेव कीर्तन करी पुढे नाचतो पांडुरंग ।' हा अभंग प्रसिद्ध आहे. संकीर्तनाने भगवत आविर्भाव होतो तो अनेक भक्तांच्या अनुभवाप्रमाणे भिन्न भिन्नही असू शकतो. कित्येक वेळा केवळ भगवंताचे भक्त ज्या स्वरूपाची अपेक्षा करतील त्या स्वरूपाचे केवळ काही अल्पकाळ दर्शन देतो व पुन्हा अदृश्य होतो. कित्यक वेळी दर्शन देऊन भगवान भक्ताबरोबर भाषण करतात व अपेक्षित वरदानही देतात. कित्येत वेळा आंतही हरी प्रतीत होतो व बाहेरही साकार रूपाने भक्ताच्या आवडीप्रमाणे मूर्तिमंत प्रगट होतो. 'साठविला राहे हृदयसंपुष्टी । बाहेर धाकुटी मूर्ती उभा ।। तु० ।। ' असाही अनुभव येतो. कित्येक भक्तांना भगवद्दर्शनाबरोबर त्यांच्या लीलांचेही दर्शन होते, तसेच त्या भगवंताचे पार्षदगण, भक्तगणही त्याच्याबरोबर लीला करीत असलेले दिसतात. तर कित्येक भाग्यवान भक्तांना भगवल्लीलामध्ये आपणही समाविष्ट आह्मो असेही अनुभवास येते. भक्तभावाप्रमाणे भगवंताचा तसा तसा आविर्भाव होतो. 'जेणें जेणें जैसें ध्यावें। तैसें व्हावे कृपाळें ।। तु० ।।' भक्तइच्छेप्रमाणे किवा कित्येक वेळी आपला ऐश्वर्ययोग दाखविण्याच्या इच्छेनेच भगवदाविर्भाव होतो अर्जुनाच्या इच्छेप्रमाणे त्याचे— पुढे विश्वरूप प्रगट केले, ते आवडले नाही म्हणून पुन्हा कृष्णरूपाने दर्शन दिले. तर यशोदेने मुख उघड म्हटले त्या प्रमाणे मुख उघडले तो तिला त्यांत सर्व ब्रह्माण्डरूपाने दर्शन दिले. 'अनंतरूपें अनंतवेषें देखिले म्यां त्यासी । बाप रखुमादेवीवरू खूण बाणली कैसी ।। १ ।।' असा ज्ञानेश्वरमहाराजही आपला स्वानुभव सांगतात.

कीर्तनात जो भगवत्आविर्भाव होतो तो भगवंताला कीर्तनभक्ती अत्यंत प्रिय असल्यामुळे होतो. भक्ताने कीर्तन केले असता त्या कीर्तनेप्रमाने केवल भगवत्स्वरूपाचा आविर्भावच होतो एवढेच नाही तर 'अनुभावयति भक्तान्' —भक्तांना आपला अनुभव करून देतो, असे सूत्रकार म्हणतात. जरी साकाररूपाने आविर्भाव झाला पण त्याचा सर्वांगाने अनुभव न आला तर काय उपयोग ? सूर्योदय होता क्षणीच जसा जगातील सर्व अंधकार दूर होतो तसा भगवान प्रगट होताक्षणीच अंतर्बाह्य सर्वांगाने त्याचा अनुभव तो आणून देतो. संसारात

अनुभवाचे विषय वेगळ्या वेगळ्या इंद्रियांद्वारे वेगळे वेगळे असतात. ते सर्वच अनुकूल असतात असे नाही. पण जेव्हा भक्तास भगवान आपल्या अनुभवाने व्यापून टाकतो त्या वेळी अंतर्बाह्य तोच प्रतीत होतो. 'पाहे तिकडे बापमाय। विठ्ठल आहे रखुमाई ।। तु० ।।' 'पडलें वळण इंद्रियां सकळां। भाव तो निराळा नाहीं दुजा ।।' असाच प्रकार होतो.

किंवा 'अनुभावयति' म्हणजे भक्ताच्या ज्या ज्या भावना असतील त्या त्या पूर्ण करतो. 'होय भक्ती केला तैसा। पुरवी धरावी ते इच्छा ।। तु० ।।' अथवा ज्या रूपाने कीर्तनात तो प्रगट होतो त्या रूपाचा भक्ताला मोह पडला म्हणजे तो त्याच रूपाने भक्तांच्या 'मागे पुढे उभा राहे सांभाळीत। आलिया आघात निवाराया ।। तु० ।।' या वचनाप्रमाणे अखंड प्रगट असतो.

'अनुभावयति भक्तान्' या वाक्याचे व्याख्यान आपन श्रीकृष्ण भगवंताच्या मुखानेच ऐकू. श्रीकृष्ण भक्तवर्य उद्धवास सांगतात,

गर्जती नामाचे पवाडे। माझी कीर्ति गाती वाडेकोडें ।माझ्या रामनामापुढे। द्वंद्वाचें उडे बाधकत्व ।। ३४६ ।। ऐसी देखोनि निश्चयें भक्ती। मीही करी अनन्य प्रीती। भक्त जेऊती वास पाहती। तेऊता मी श्रीपती स्वयें प्रगटे।। ३५१ ।। भक्त स्वभावें बोलों जाय। त्यांचें बोलणें मीचि होये। त्याचें बोलण्या सबाह्ये। मीचि राहे शब्दाचें ।। ५२ ।। तो कौतुके खेळे खडे। ते खेळचि मज होणें घडे। तो कृपाळु पाहे जयाकडे। त्याचें छेदी मी गाढे भवबंध ।। ५३ ।। तो वास पाहे जेणें मोहरी। तेऊतीं मी सुखाची सृष्टी करी। तो म्हणे जयाते उद्धरी। तो मी स्वपदावरी बैसवी ।। ५४ ।। जेवी तान्हयालागी माता। तेवीं भक्तांची मज चिंता। त्यांची सेवाही करितां। मी सर्वथा लाजेना ।। ५५ ।। माता बाळकाचे पुरवी कोड। तैसे ते माझे लळेवाड। त्यांचें प्रेमचि मज गोड। उपचार चाड मज नाहीं ।।५६।। मी शरीर तो माझा आत्मा। प्रेमळ असे पढिया आम्हा। प्रेमळा वरती सीमा। भक्तीचा महिमा चढेना ।। ३५८ ।। ए० भा० २४.

यापेक्षा भगवदनुभवाचे वर्णन कोण अधिक करू शकेल ? मात्र सूत्रकारांनी शेवटी एक महत्त्वाचा शब्द ठेवला आहे–'भक्तान्' म्हणजे तो अनुभव भक्तांनाच देतो. भगवाम श्रीकृष्णच अर्जुनास सांगतात,

पैं गा भक्तासि माझें कोड। मज तया अनन्यगतीची चाड।
कां जे प्रेमळाचें सांकड। आमुचिया घरी ।।१३७।।
पाहे पां स्वर्ग मोक्ष उपायिले। दोन्ही मार्ग तयांचिये वाहणी केले।
आम्ही अंगही शेखी वेचलें। लक्ष्मियेसी ।।१३८।।
परि आपणपेंवीण जे एक। ते तैसेचि सुख साजूक।
सप्रेमळालागि देख। ठेविलें जतन ।।१३९।।

हा ठायवरी किरीटी । आम्ही प्रेमळ घेवो आपणयासाठी ।
या बोली बोलाविया गोष्टी । तैसिया नव्हती गा ॥१४०॥ ज्ञा. १०

भक्तांना ज्या ज्या प्रकारे भगवंताचा अनुभव यावा असे वाटेल त्या त्या प्रकारे आविर्भूत झालेला भगवान तसा तसा अनुभव आणून देतो. अनेक भक्तांच्या जीवनात असा अनुभव आलेला त्यांच्या चरित्रातून दिसून येतो.

## सूत्र ८१

## त्रिसत्यस्य भक्तिरेव गरीयसी भक्तिरेव गरीयसी ॥८१॥

**अर्थ :**

त्रिवार सत्य असणाऱ्या (भगवंता)ची भक्ती हीच श्रेष्ठ आहे, भक्तीच श्रेष्ठ आहे.

**विवरण :**

सूत्रकार नारद महर्षींनी आतापावेतो ऐंशी सूत्रांतून अनेक प्रकारे भक्तीचा सांगोपांग विचार केला. भक्तीचे स्वरूप, साधन, फल, सर्व सांगून झाल्यावर शेवटी निश्चयपूर्वक द्विवार सांगतात की भक्ती हीच श्रेष्ठ आहे. मागे पंचविसाव्या सूत्रात ती कर्मज्ञानयोगादिकांपेक्षा श्रेष्ठ आहे, ती फलरूप आहे असे सांगितलेच आहे. तसेच एकूणसाठ व साठाव्या सूत्रात ती भक्ती प्रमाणान्तर निरपेक्ष व स्वयं-प्रमाणरूप आहे आणि शांतिरूप व परमानंदस्वरूप आहे हे सांगून तिचे श्रेष्ठत्व पटवून दिलेही आहे. सर्व प्रकारे या भक्तीचे सर्वश्रेष्ठ स्वरूप पटवून दिल्यावर शेवटी नारद म्हणतात, सर्व साधनांत भक्तीच श्रेष्ठ आहे.

'त्रिसत्य' या पदाचे अनेक अर्थ केले जातात. कायिक, वाचिक, मानसिक, सत्य म्हणजे त्रिसत्य या तिन्ही सत्यामध्ये भक्ती श्रेष्ठ आहे, अथवा तिन्ही कालांत वर्तमान, भूत, भविष्य– भगवद्भक्ती श्रेष्ठ आहे; किंवा भगवद्प्राप्तीची कर्मज्ञान-योग ही तीन साधने सत्य म्हणून पुराणादिकातून सांगितलेली आहेत, त्या तीन सत्य साधनांपेक्षाही भक्ती श्रेष्ठ आहे म्हणून 'त्रिसत्य' असे ते भक्तीचे विशेषण काहींनी मानले आहे.

पण षष्ठीचा प्रत्यय असल्यामुळे त्रिवार सत्य असणाऱ्याची भक्ती श्रेष्ठ आहे हा अर्थ सरळ आहे. भागवत दशमस्कंधात भगवान देवकीच्या उदरी आले तेव्हा सर्व देव तेथे स्तुती करण्याकरिता प्राप्त झाले. त्या स्तुतीच्या पहिल्याच श्लोकांत

'सत्यव्रतं सत्यपरं त्रिसत्यं ।' असे सत्य रूपाने वर्णन केले आहे. देव म्हणतात, 'हे भगवन् ! आपण सत्यव्रत आहात. म्हणजे जे व्रत कराल अथवा जे म्हणाल ते सत्य करणे हे आपले व्रत आहे. तसेच सत्यपरं– सत्य हेच आपल्या प्राप्तीचे साधन आहे, आणि आपणच 'त्रिसत्यं' आहात. म्हणजे तिन्ही कालांत आपणच सत्य आहा. तसेच सत्व, रज, तम या तीन गुणांत आपणच गुणाधिष्ठान रूपाने सत्य आहा. जाग्रत, स्वप्न, सुषुप्ती या तिन्ही अवस्थामध्ये साक्षीरूपाने आपण सत्य आहा. ज्ञाता ज्ञान ज्ञेय, ध्याता ध्यान ध्येय यामध्ये जी एक अखंड चिद्वस्तु ती सत्यरूपाने तुम्हीच आहा. ब्रह्मा विष्णू रुद्र रूपाने एकमेव सत्य तुम्हीच आहा. यावरून त्रिसत्य शब्द भगवद्वाचक समजला जातो. अशा त्रिसत्य भगवंताची भक्ती ही श्रेष्ठ आहे. ज्याचे ज्या साधनावर अथवा साध्यावर प्रेम असते तो त्याला श्रेष्ठ समजतो. तसा प्रकार येथे नाही. कारण महर्षि नारद हे स्वतः धर्म, ज्ञान, योग, तपादि संपन्न होते. सर्वच शास्त्रांत व साधनांत नारदाचा अधिकार किती श्रेष्ठ होता याचा विचार ग्रंथाच्या आरंभी केलाच आहे. सर्व शास्त्रांचे आलोकन करून, सर्व साधनांचे आचरण करून जो निष्कर्ष निघाला व जो अनुभव आला त्या यथार्थ अनुभवावरूनच ते सागतात की भक्ती ही श्रेष्ठ आहे. सर्व साधनांत ज्यांचा पूर्ण अधिकार असून त्याचा अनुभव घेतल्यानंतर पूर्ण विचाराने जिचे सर्वांगीण महत्त्व ज्यांना पटले, त्याजबरोबर भक्ति. प्रिय भगवंताशी नित्य ज्यांचा अनन्यप्रेमसंबंध असल्यामुळेही त्याच्या प्राप्तीच्या श्रेष्ठ साधनाचे, त्याच्या आवडीच्या साधनाचे ज्ञान ज्यांना झाले आहे; व्यास, प्रल्हाद, ध्रुव, इत्यादी श्रेष्ठ भक्तांच्या गुरुत्वाचा मान ज्यांना प्राप्त झाला होता, 'देवर्षीणां च नारदः' म्हणून भगवद्विभूतीमध्ये ज्यांचा समावेश आहे, असे नारदमहर्षि सांगतात की 'भक्तिरेव गरीयसी,' भक्ती हीच श्रेष्ठ आहे.

काही गोष्टींचे श्रेष्ठत्व एकेका कारणामुळेच असते. कोणाचे रूपामुळे, कोणाचे सत्तेमुळे, कोणाचे बलामुळे, कोणाचे गुणामुळे इ. इ, पण भक्तीचे श्रेष्ठत्व सर्वच कारणांमुळे आहे. भक्तिरसामृतसिंधू ग्रंथामध्ये भक्तीचे स्वरूप सांगत असता खालील व्याख्या केली आहे.

**क्लेशघ्नी शुभदा मोक्षलघुताकृत्सुदुर्लभा ।**
**सान्द्रानन्द विशेषात्मा श्रीकृष्णाकर्षिणी च सा ॥**

ती सर्व क्लेशांचा नाश करणारी आहे, अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेश या पाचांना शास्त्रामध्ये क्लेश असे म्हटले आहे. तसेच पापाची सर्व रूपे म्हणजे प्रारब्ध, अप्रारब्ध, रूढ आणि बीज हेही क्लेशातच अंतर्भूत होतात. या सर्वांचा भक्ती नाश करते. तसेच दुसरे लक्षण शुभदा हे आहे. भगवद्विषयात रुची, कृपा, क्षमा, सत्य, मार्दव, समता, धैर्य, गाम्भीर्य आदि सर्व सद्‌गुणांना शुभ म्हटले आहे. या सर्व शुभगुणांची प्राप्ती भक्तीच्या द्वारा होत असते, अतएव ही शुभदा

आहे. सर्व सुखांचाही अंतर्भाव 'शुभ' या शब्दात होतो. तसेच सर्वांपेक्षा श्रेष्ठ पुरुषार्थ जो मोक्ष त्यालाही लघुत्व आणण्याचे सामर्थ्य भक्तीत आहे. ही पंचम अरुषार्थरूपा, फलरूपा आहे असे सूत्र सव्वीसमध्ये सांगितले आहे. तसेच ती सुदुर्लभ आहे. त्रेपन्नाव्या सूत्रामध्ये 'प्रकाशते क्वापि पात्रे' म्हणून तिची दुर्लभता स्पष्ट केली आहे. तसेच ती आनंदाचे साधन नसून ती स्वतःच 'सान्द्रानन्द विशेषात्मा' आहे याचा विचार 'शांतिरूपात्परमानंदरूपाच्च।' या साठाव्या सूत्रात केला गेला आहे. ती श्रीकृष्णाकर्षिणी आहे. भगवान् भक्तिवश आहे. 'भक्त्याहमेकया ग्राह्यः' असे भगवानच म्हणतात. या विषयाचा विचार पूर्वी अनेक सूत्रातून झाला आहे. या सर्व कारणांमुळे भक्तीची सर्वश्रेष्ठता सिद्ध होते. ती अमृतरूपा आहे म्हणजे तिच्यात गोडी आहे इतर साधनात ती नाही. म्हणून भक्ती श्रेष्ठ आहे.

तिच्यात अवीट तृप्तीचा आनंद आहे म्हणून ती श्रेष्ठ आहे.

भगवान भक्तांच्या आधीन राहतो. आपले महत्त्व टाकून आपल्या भक्तांची सर्व कामे करितो. इतर योगी, तपी, ज्ञानी यांचेकरिता तो वरील प्रमाणे वागत नाही, म्हणून भक्ती श्रेष्ठ आहे.

भगवान अन्य ऐश्वर्य, तसेच चतुर्विध मोक्ष देण्याच्या बाबतीत उदार आहे. पण भक्ती देत नाही भागवत पचमस्कंधात शुकाचार्यांनी परीक्षितीस सांगितले आहे.

**राजन्पतिर्गुरुरलं भवतां यदूनां दैवं प्रियः कुलपति क्वच किङ्करोवः।**
**अस्त्वेवमंग भगवान् भजतां मुकुन्दो मुक्ति ददाति कर्हिचित्स्म न भक्तियोगं॥**

भागवत ५–६–१८

'हे राजन! भगवान श्रीकृष्ण स्वतः पांडवांचे आणि यादवांचे रक्षक, गुरु, इष्टदेव, सुहृत् व कुलपती होते, इतकेच नाही तर ते कधी कधी आज्ञाधारी सेवकही होत असत. अशी ते अनेक भक्तांची अनेक कार्ये करू शकतात, तसेच अनेकांना मुतीही देतात, पण मोक्षापेक्षा श्रेष्ठ जो भक्तियोग तो सहसा देत नाहीत.' यावरून ही भक्तीची श्रेष्ठता सिद्ध होते.

इतर कर्म, योग, ज्ञान ही साधने आहेत पण पराप्रेमलक्षणाभक्ती ही फलस्वरूप आहे असे नारदांचेच नव्हे तर सर्व भक्तश्रेष्ठांचे मत आहे म्हणून भक्ती श्रेष्ठ होय.

योगज्ञानादिसाधने स्वतःच्या सिद्धीकरिता प्रमाणाची अपेक्षा ठेवतात पण भक्ती ही प्रमाणान्तर निरपेक्ष आहे असे एकूणसाठाव्या सूत्रात नारदांनीच सांगितले आहे, अतएव भक्ती श्रेष्ठ आहे.

कर्मधर्मादिकांच्या आचरणाचे फल कालान्तराने मिळते, भक्तीही तत्काळ फल देणारी आहे म्हणून श्रेष्ठ आहे.

योग व ज्ञान यांचे फल इहलोकात मिळते पण त्यांत अनेक विघ्ने, प्रतिबंध आडवे येतात पण भक्ती हा निर्विघ्न मार्ग आहे व कदाचित विघ्ने आली तरी भगवान ती दूर करतो म्हणून ती श्रेष्ठ आहे. काही साधने देशसापेक्ष, काही कालसापेक्ष, काही वर्णआश्रमसापेक्ष आहेत. पण भक्ती ही या कोणत्याही गोष्टींची अपेक्षा करीत नाही, स्वतंत्र आहे म्हणून श्रेष्ठ आहे

अन्य साधनांनी त्या साधनाचे आचरण करणाराच उद्धरून जातो, पण भक्तिमान् पुरुष कुलालाच काय पृथ्वीसही पावन करतो असे अडुसष्टाव्या सूत्रात म्हटले आहे. या वैशिष्टयामुळे भक्ती श्रेष्ठ आहे.

कोणी कर्माचरणाने, कोणी शास्त्रज्ञानाने, त्या त्या साधनाचे आचरण करून उद्धरून जातात. पण भक्तामुळे कोणत्याही कर्माला सत्कर्मपणा प्राप्त होतो, तसेच यांच्यामुळे शास्त्रांना सच्छास्त्रत्व यते म्हणून भक्ती श्रेष्ठ म्हटली जाते.

कर्म, धर्म, तप, ज्ञान या साधनांना श्रद्धाभक्तीची अपेक्षा आहे, पण भक्ती ही स्वसिद्धीकरिता अन्य कोणत्याही साधनाची अपेक्षा ठेवीत नाही म्हणूनही तिचे श्रेष्ठत्व सिद्ध होते.

त्रिपाद्विभूतिनारायणोपनिषदामध्येही म्हटले आहे,

**सर्वोपायान्परित्यज्य भक्तिमाश्रय । भक्ती निष्ठोभव, भक्तीनिष्ठो भव ।**

**भक्त्या सर्व सिद्धयः सिद्धयन्ति, भक्त्या असाध्य न किञ्चिदस्ति ।**

' सर्व उपायांचा त्याग करून भक्तीचाच आश्रय कर. भक्तीनिष्ठ हो, भक्तीनिष्ठ हो. भक्तीने सर्व सिद्धी सफल होतात. भक्तीने असाध्य असे या संसारात काही नाही. ' उपनिषदेही भक्तीचे श्रेष्ठत्व गातात. गीतेच्या बाराव्या अध्यायाच्या आरंभी अर्जुनाने श्रीकृष्णास प्रश्न केला आहे की ' अव्यक्त अक्षराची योगमार्गाने उपासना करणारे व सतत युक्त होऊन तुझ्या सगुण साकार स्वरूपाची उपासना करणारे या दोघांमध्ये योगवित्तम (श्रेष्ठ) कोण ?' यावर श्रीकृष्ण स्पष्ट उत्तर देतात ' अर्जुना! माझ्या स्वरूपी मन स्थिर करून नित्ययुक्त होत्साते, परमश्रद्धेने जे माझी उपासना करतात तेच युक्ततम (श्रेष्ठ) असे माझे मत आहे.' गीता १२– १, २.

इया परी जे भक्त । आपणपें मज देत ।
तेचि मी योगयुक्त । परम मानी ।। ३९ ।। ज्ञा. १२.

श्रीमहर्षी शांडिल्यांच्या भक्तिदर्शनातही दोन-तीन सूत्रांतून भक्तीचे श्रेष्ठत्व दिग्दर्शित केले आहे.

**अत एव फलानन्त्यम् ।। ८ ।। तद्वतः प्रपत्तिशब्दाच्च न ज्ञानं इतर प्रपत्तिवत् ।। ९ ।। सामुख्या इतरापेक्षितत्वात् ।। १० ।।**

( ती भक्ती ज्ञानादि साधनांप्रमाणे अनुष्ठानकर्त्याचे आधीन नाही– ) ' म्हणूनच भक्तीचे फल अनन्त आहे. ज्ञानीगणही शरणागत होतात व ज्ञानहीनालाही

भक्तीची प्राप्ती होऊ शकते. म्हणून ती भक्ती मुख्य आहे, अन्य साधनाना भक्तीची अपेक्षा असते.'

महाभारताच्या अनुशासन पर्वात धर्मराज व भीष्म यांचा संवाद आहे. त्यात धर्मराजाने भीष्मपितामहांना विचारले आहे की 'को धर्मः सर्वधर्माणा भवतः परमोमतः।' आपण मला आतापावेतो अनेक धर्मांचा विचार सांगितला यापैकी आपल्या मताप्रमाणे श्रेष्ठ धर्म कोणता ? यावर भीष्माचार्यांनी उत्तर दिले आहे,

**एष मे सर्वधर्माणां धर्मोऽधिकतमो मतः।**
**यद्भक्त्या पुंडरीकाक्षं स्तवैरर्चेन्नरः सदा ॥**

'हे धर्मराज ! सर्व धर्मात हाच धर्म श्रेष्ठ आहे असे मला वाटते. तो धर्म म्हणजे भक्तीने भगवंताचे स्तवन, अर्चन करावे.' याही कारणामुळे भक्ती ही गरीयसी श्रेष्ठ आहे.'

श्रीभागवतातील सहाव्या स्कंधात अजामिळाला नेण्याकरता आलेल्या विष्णुदूतानी अजामिळाच्या मृत्यूचे वेळी त्याला पाशबद्ध करून नेण्यास आलेल्या यमदूतांच्या हातून सोडविले, कारण मृत्यूचे वेळी अजामिळाच्या मुखातून नारायण नामाचा उच्चार झाला. तेव्हा ते दूत आपला स्वामी जो यमधर्म त्याचेकडे गेले व त्यांनी झालेला सर्व प्रकार सांगितला. तेव्हा यमधर्माने दूताना भगवन्नाममहात्म्य सांगितले व हा भक्तीधर्म किती श्रेष्ठ, सूक्ष्म, दुर्लभ आहे हे सांगितले,

**धर्मं तु साक्षाद्भगवत्प्रणीतं न वै विदुर्ऋषयो नापि देवाः।**
**न सिद्ध मुख्या असुरा मनुष्याः कुतश्च विद्याधर चारणादयः ॥**

भागवत ६-३-१९

यमधर्म म्हणतो, 'हा साक्षाद्भगवंताने निर्माण केलेला धर्म इतका दुर्बोध आहे की त्याला ऋषी, देवता, सिद्धगणही जाणू शकत नाहीत अशा स्थितीत मनुष्य विद्याधर, चारण आणि असुर हे कसे जाणू शकतील ?'

स्वयम्भुर्नारदः शम्भुः कुमारः कपिलो मनुः।
प्रल्हादो जनको भीष्मो बलिर्वैयासकिर्वयम् ॥ २० ॥
द्वादशैते विजानीमो धर्मं भागवतं भटाः।
गुह्यं विशुद्धं दुर्बोधं यं ज्ञात्वामृतमश्नुते ॥ २१ ॥ भागवत ६-३

'भगवंताच्या द्वारा निर्मित भागवतधर्म परमशुद्ध व गोपनीय आहे, त्याला जाणणे फार कठीण आहे. जो त्याला जाणतो तो भगवत्स्वरूपाला प्राप्त होतो. हे दूतांनो ! भागवत धर्मांचे भक्तीचे रहस्य आम्ही बाराजणच जाणतो. ब्रह्मदेव नारद, भगवान शंकर, सनत्कुमार, कपिलदेव, स्वायंभुवमनु, प्रल्हाद, जनक, भीष्म, बलि, शुकाचार्य आणि मी (यमधर्म).'

म्हणून या भक्तीधर्मास नारद द्विरुक्तीने भक्ती हीच श्रेष्ठ आहे, भक्ती हीच श्रेष्ठ आहे असे आदरपूर्वक सागतात.

## सूत्र ८२

**गुणमाहा-त्म्यासक्ति- रूपासक्ति- पूजासक्ति- स्मरणासक्ति- दास्यासक्ति- सख्यासक्ति- कान्तासक्ति- वात्सल्यासक्ति- आत्मनिवेदनासक्ति- तन्मयतासक्ति- परमविरहासक्तिरूपा- एकधाप्येकादशधा भवति ॥ ८२ ॥**

**अर्थ** :

ही प्रेमरूपिणी भक्ती मुळात एकस्वरूपा असली तरी (त्या त्या भक्ताच्या भिन्न भिन्न आसक्तीमुळे ) गुणमाहात्म्यासक्ती, रूपासक्ती, पूजासक्ती, स्मरणासक्ती, दास्यासक्ती, सख्यासक्ती, कांतासक्ती, वात्सल्यासक्ती आत्मनिवेदनासक्ती, तन्मयतासक्ती, परमविरहासक्ती, या रूपाने अकरा प्रकारची होते.

**विवरण** :

आतापावेतो प्रेमभक्तीचा अनेक अंगोपागाच्या द्वारे नारदानी विचार केला. प्रेम ही एक पराकाष्ठेची महत्त्वाची वृत्ती आहे. ही वृत्ती एका रूपाचीच नसते. त्यावृत्तीचा जो विषय असेल व त्याचे जे जे धर्म, गुण, स्वभाव असतील त्याचा त्याचा ती वृत्ती आपल्या रुचीप्रमाणे अवलंब करते. भगवद्वृत्ती निर्माण झाल्यानंतर सर्वच वृत्तीचा तो विषय असतो हे जरी खरे आहे तरी विशिष्ट रूपाने विशिष्ट भक्तांचे ठिकाणी भिन्न भिन्न रूपाने तिचा आविष्कार होत असतो. कोणी भक्त आपल्या प्रेमीच्या रूपावर, कोणी गुणावर, कोणी सेवेवर, पूजेवर आसक्त होतो. हा निसर्ग आहे. प्रेम प्रेमाश्रयाला कोणत्या तरी प्रेम विषयावर गुंतवीत असते. भृग पुष्पावर, चातक मेघावर, चकोर चंद्रावर, पतंग दीपावर आसक्त असतोच, संसारातही आसक्ती प्रधान आहे. आपण एखाद्या समोर आलेल्या कोणत्याही जड-चेतनवस्तूला अनुकूलबुद्धीने पाहिले, प्रसन्नताही प्राप्त झाली पण तेवढ्याने भक्ती होत नाही. आम्ही आकाशात नक्षत्राना पाहतो, पूर्ण चंद्राला पाहून प्रसन्नताही होते पण तेवढ्याने तेथे ममत्वभाव निर्माण होत नाही. एखादी सुंदर स्त्री पाहिली अथवा सुंदर बालक पाहिले तर पाहून तात्कालिक प्रसन्नता होईल पण आसक्ती

होणार नाही. आसक्तीकरिता त्या विषयाचा मोह, अतिशय ममत्व, निर्माण झाले पाहिजे. भक्तांना भगवंताचा मोह असतो, अतिशय ममत्व असते. ती ममत्ववृत्ति संस्कार, निमित्त, गुणश्रवण, स्वरूपदर्शन, संबंध इत्यादि अनेक रूपाने आसक्ती निर्माण करीत असते. संसारातील विषय अनित्य व परिणामी दुःखरूप तसेच अनेक दोषदूषित असल्यामुळे त्या त्या विषयाचे ममत्व अथवा आसक्ती बाळगणाऱ्यांना ती घातक होते. पण येथे तो भगवान सच्चिदानंदघन, अनंतकल्याणगुणनिधान, कोटिकंदर्पदर्पहर अशा लावण्याने युक्त असल्याने ती आसक्ती ही एक जीवनाच्या महानंदसमुद्राप्रमाणे असते. त्या आसक्तीत अखंड अवगाहन करीतच राहावे असे त्या भक्ताला वाटत असते त्या आसक्तीचे अकरा प्रकार नारदमहर्षींनी या सूत्रांत सांगितले आहेत.

जे प्रेमभक्तीचे अधिकारी असतात, त्यांचा असा काही नियम नसतो की ते एकच प्रकारची आसक्ती करीत असतात कित्येकाच्या ठिकाणी सर्वच भाव पूर्णतया प्रभावित झालेले दिसतात उदाहरण गोपिकांचेच. गुण, रूप, पूजा, स्मरण, दास्य, सख्य, कान्ताभाव, वात्सल्य, आत्मनिवेदन, तन्मयता, परमविरहादि सर्वच भावांचा यांच्या ठिकाणी पूर्ण आविष्कार झालेला दिसून येतो. तसे अनेक भक्ताचे ठिकाणी अनेक प्रकारे ही आसक्ती प्रगट झालेली दिसून येते. असे जरी आहे तरी प्रत्येकांचे काही वैशिष्टच प्रतीत होतच असते. सर्वच भाव समानरूपाने एका ठिकाणी राहू शकत नाहीत, तर त्यांत न्यूनअधिकरूपाने तारतम्य निर्माण होत असते. म्हणून एकेका भक्तामध्ये काही विशिष्ट भावनाच आसक्तिरूपाने वृद्धिगत झालेल्या दिसून येतात. या दृष्टीने मूळ जरी प्रेमाचे सर्वात समान आहे तरी त्या त्या भक्ताच्या आवडीप्रमाणे ते भाव आसक्तिरूपाने प्रगट होतात. वास्तविक 'आसक्ती' हा शब्द संसारात वापरला जातो. जसे विषयासक्ती, कामासक्ती, धनासक्ती, देहासक्ती इ० व तसे आसक्त असणे हे बंधनाला कारण मानले जाते. त्या आसक्तीला भक्ती मार्गात प्रीती, भावना, भक्ती असे म्हटले जाते. पण प्रल्हादाने भगवान नृसिंहाजवळ हीच भाषा वापरली आहे. त्याने संसारासक्तीलाही प्रीतीच म्हटले आहे. प्रल्हाद म्हणतो,

**या प्रीतिरविवेकानां विषयेष्वनपायिनी ।**
**त्वामनुस्मरतः सा मे हृदयान्मापसर्पतु ।। वि. पु.** १–२०–१९

हे भगवान ! अविवेकी पुरुषांची विषयापासून कधीही दूर न होणारी अव्यभिचारी प्रीती (आसक्ती) जशी असते तीच आसक्ती (प्रीती) तुझे सतत स्मरण करणारा जो मी त्या माझ्या अंतःकरणातून कधीही दूर न जावो म्हणजे तशीच आसक्ती तुझ्याठिकाणी माझी सतत असावी.'

कोणतेही विकार जर त्यांचा विषय चांगला असेल तर ते चांगलेच समजले

जातात. काम, भय, वैर, द्वेष इ० जर भगवंताचे ठिकाणीच ठेविले गेले तर तन्मयता प्राप्त होऊन त्याचा उद्धार होतो हे मागे सूत्र पासष्टमध्ये सांगितलेच आहे. म्हणून आसक्ती असा जरी शब्द येथे आला आहे तरी तो प्रीतीवाचकच घेतला पाहिजे.

ती प्रीति एकधा म्हणजे एक प्रकारची असली तरी तिचे अकरा प्रकार होतात असे सूत्रात म्हटले आहे. भक्तवर्य प्रल्हादाने भक्तीचे जे श्रवणकीर्तनादि नऊ प्रकार सागितले आहेत त्यांचा अंतर्भाव या अकरा प्रकारमध्ये होतो. भक्तिरसामृतसिंधूमध्ये-ही भक्तीचे चौसष्ट प्रकार, तसेच भक्तीरसायनात मधुसूदन सरस्वतींनी अकरा प्रकार, तसेच आपल्या श्रीभगवद्‌गीतेच्या टीकेच्या आरंभी एकविस प्रकार सांगितले आहेत. ते बरेच साधन भक्तीचे आहेत. काही पराभक्तीत प्रवेश केल्यानंतरचे आहेत. पण नारदमहर्षींनी येथे जे अकराप्रकार कल्पिले आहेत ते प्रेमभक्ती प्राप्त झालेल्या पुरुषाचेच आहेत असे दिसते. महात्म्यज्ञान असूनदेखिल त्यांची आसक्ती असलेली दिसून येते.

**गुणमाहात्म्यासक्ती :**

त्यात कित्येकांची आसक्ती गुणमहात्म्यासक्तीरूपा असते. वास्तविक आपला जो प्रियतम त्याचे रूप आवडते. पण रूप हाही एक गुणच आहे. जगात कित्येक रूपवान व्यक्तीचे ठिकाणी रूप या गुणाबरोबर दोषही असतात. उदाहरणार्थ चंद्राचे रूप आल्हादकारक असते पण तेथे कलङ्कही आहे, त्याच्या कलान्यून होतात इ० दोष त्यात आहेत. पण श्रीहरीचे अनंत गुण पुराणादिकात वर्णिले आहेत. पण त्या गुणांत दोषांचे मिश्रण नसते. भक्त हे स्वतः निर्दोष असतात व अनेक दैवी गुणाचा समन्वय त्यांच्या जीवनात झालेला असतो म्हणून ते भगवंताच्या अलौकिक गुणाकडे आकृष्ट होतात. श्रीकृष्ण भगवानच सांगतात,

कैसे माझ्या गुणी धाले । देशकाळाते विसरले ॥ ज्ञा० ९

तुकाराम महाराजांची गुणमाहात्म्यासक्ती पाहा.

गुणाची आवडी वाचेचा पसरू । पडिला विसरू सर्व रसा ॥
आवडी बैसली गुणाची अंतरी । करू धणीवरी सेवन ते ॥

मुळात 'गुणमाहात्म्य' असा शब्द आहे. एखाद्या पुरुषाजवळ काही गुण असतात. पण 'गुणमाहात्म्य नसते.' जे गुण अलौकिक असतात, ते अंतःकरण आपल्याकडे आकर्षून घेतात. त्या गुणश्रवणकीर्तनस्मरणापुढे सर्व भोगही तुच्छ वाटू लागतात. जो आत्मा महान असतो त्याच्याच गुणाच्या ठिकाणी माहात्म्य असते. हिमालयाची उंची, सागराची विशालता पाहून मन आश्चर्यमग्न होते. तसेच भगवंताचे अनंत असे श्रेष्ठ गुण पाहून भक्ताचे मन तेथे आसक्त होते. त्याचे औदार्य केवढे विशाल! शत्रूलाही मोक्ष, नाम घेणाऱ्यालाही मोक्ष, पापी दुराचाऱ्यालाही मोक्ष! पशू एक पुष्प समर्पण करतो तर त्याचा उद्धार! एका मुष्ठिभर पोह्याच्या मोबदल्यात तो सोन्याचा

गाव देतो. विष पाजण्यास आलेल्या राक्षसिणी पूतनेस मातेची गति. निंदा करणाऱ्या शिशूपालास सद्‌गति. किती म्हणून सांगावे? केवढे अलौकिक गुण! तसेच कृपा, क्षमा, दया या भगवद्‌गुण वर्णनांनी पुराणे भरली आहेत. भक्तरक्षण, भक्तप्रेमाबद्दल तर बोलावयासच नको. संतवाङमयातून, पुराणातून अनेक कथा मनाला मोह पाडतात. सौदर्यगुण तसाच, पाहिल्याबरोबर वेध लावणारा. एकदा ते रूप पाहिले म्हणजे कोणास आकृष्ट करून घेणार नाही ? शौर्य ही अतुलनीय. बाळपणातच अदानवी सृष्टि करण्याचे सामर्थ्य. महाबलाढ्य, त्रिभुवनाला अजिक्य अशा राक्षसांचाही क्षणात नाश करण्याची शक्ती ! तशीच त्याची दीनवत्सलता. किती गुणांचे वर्णन करावे ? हेच गुणमाहात्म्य. म्हणून कित्येक भक्ताचे मन या गुणमाहात्म्यातच अडकून पडते. श्रीशुकाचार्यासारख्या असंग व मुक्त पुरुषाचे वर्णन,

**हरेर्गुणाक्षिप्तमतिर्भगवान् बादरायणि:** । भा.१–७–११

'भगवंताच्या अलौकिक गुणांनी त्यांच्या बुद्धीला आपल्याकडे आकृष्ट केले आहे.' असे केले आहे.

गुणमाहात्म्यासक्तीचे अत्यत प्रभावशाली उदाहरण राजा परीक्षितीचे आहे. राजा परीक्षित श्रीशुकाचार्यांचे मुखाने गंगातीरावर सर्व राज्याचा लोभ सोडून भागवत श्रवण करण्यास बसले. त्यांनी अन्न-जलाचाही त्याग केला. चार दिवस कथाश्रवण झाले, चौथ्या दिवशी शुकाचार्यांनी म्हटले, 'राजा ! चार दिवस झाले तुम्हाला फार श्रम झाले, या चार दिवसांत तुम्ही थोडे जलही घेतले नाही. तरी तुम्ही थोडा आहार व जलपान करा, विश्रांती घ्या.' यावर परीक्षितीने उत्तर दिले ते फार महत्त्वाचे आहे.

**नैषातिदु:सहा क्षुन्मां त्यक्तोदमपि बाधते ।**
**पिबन्तं त्वन्मुखाम्भोजच्युतं हरिकथामृतम्** ।। भागवत १०–१–१३.

परीक्षित राजा म्हणतो, 'हे शुकाचार्य ! भूक तहान हे विकार किती बलवान आहेत याची मला कल्पना आहे, पण मी जलही टाकले आहे. ही क्षुधातृषा मला बाधा करीत नाही. कारण तुमच्या मुखकमलातून हरिकथामृताचे प्राशन मी करीत आहे, त्याचा हा परिणाम आहे.'

श्रीभक्तवर्य हनुमंताची गुणमहात्म्यासक्ती किती होती ते पाहा–

जेथे जेथे रामकथन । तेथे तेथे मस्तकाञ्जली पूर्ण । असावे माझे अधिष्ठान । हेचि वरदान मज द्यावे ।।९।। जिणयाचे फळ तत्त्वता । नित्य श्रवणी रामकथा । वाचेसी राम गुण वर्णिता । उसंत चित्ता नसावी ।।१०।। भावार्थरामायण, युद्धकांड ३६५.

कित्येक विधिनिषेधातीत झालेले, निर्गुण निराकार स्वरूपाचा अखंड अनुभव घेणारे मुनीदेखील श्रीहरीच्या गुणानुवादात रमून जातात असे श्रीशुकाचार्यांनी म्हटले आहे.

**प्रायेण मुनयो राजन् निवृत्ता विधिषेधतः ।**
**नैर्गुण्यस्था रमन्ते स्म गुणानुकथने हरेः** ।। भागवत.

आसक्ती हा शब्द महत्त्वाचा आहे. एखादा भक्त हातात माळ घेऊन जप करतो, एखादा भजन करतो वा पूजा करतो. पण ते करत असतां मन संसारात जात असते. याचा अर्थ त्यास ते कार्य बलपूर्वक करावे लागते. संसारात गोडी असल्याने मन पुन्हा तिकडेच धाव घेते. ज्याची ज्यात रुची आहे तो थोडासा अवसर प्राप्त झाला की तिकडे धावतो. लहान मुलाना स्वैर खेळण्यात गोडी असते. जबरदस्तीने अभ्यासास बसविले तरी थोडा अवसर मिळताच तो खेळण्यांकडे धावतो. त्याचे कारण आसक्ती. तशी भगवद्गुणात आसक्ति पाहिजे व संसारात आवश्यकतेप्रमाणे प्रयत्न पाहिजे. ज्ञानेश्वर महाराज आपले मन ‘ गोविंदाचे गुणी वेधले । ’ म्हणतात. हा वेध म्हणजेच आसक्ति. तुकाराम महाराज ‘ गुण गाईन आवडी ’ असे म्हणतात. ही आवड म्हणजे ती आसक्तीच आहे.

**रूपासक्ति :**

कित्येक भक्त भगवद्रूपावर मोहित असतात. याचे कारण त्या श्रीहरीचे सौंदर्य, अलौकिक लावण्य व त्या रूप धारण करणाऱ्या भगवंताची मोहक शक्ती हे होय. मात्र गुणमाहात्म्यासक्तीपेक्षा या रूपासक्त भक्ताचा अधिकार श्रेष्ठ मानावा लागतो. भगवान अद्यापि प्रत्यक्ष भेटला नाही, पुराणादिकातून अथवा साधुसंताच्या मुखाने त्याचे गुण श्रवण झाले, श्रद्धा जडली तर गुणमाहात्म्यासक्ति निर्माण होणे शक्य आहे. पण रूपासक्ती प्रत्यक्ष स्वरूपदर्शनाविना होणे अशक्य आहे. एकदा का ते रूप पाहिले की भाविकाच्या हृदयात ते ठसते.

पाहिलिया वेध लावी । बैस जीवी जडोनि ।।तु.

येथे ‘ रूप ’ असा सामान्य शब्द आहे. जगात बहुतेक पदार्थ रूपवान् आहेत, जीवही देहादि द्वारा रूपवान् असतो. त्यातही कित्येक सुंदर रूपे असतात. कित्येक सामान्य जीव त्यावरही लुब्ध होतात हे खरे. पण जीवाचे रूप हे भौतिक अदृष्ट जन्य, विकृत, सदोष असते. ते प्रतिक्षणी क्षीण होत जाणारे असते. ज्ञानेश्वर महाराजांच्या भाषेत सांगावयाचे तर ‘ काम कर्म अविद्या त्रिगुण पंचभुतांनी विणली रे । रक्तरेत दुर्गंधी जन्तू नरक मुतानी भरली रे ।। ’ अशी ही घोंगडी म्हणजे देह आहे. पण भगवंताचे स्वरूप कसे आहे ते सागतात ‘ स्वगत सच्चिदानंद मिळोनि शुद्ध सत्त्वगुणी विणली रे । षड्गुण गोंडे रत्नजडित तुज शामसुंदरा शोभली रे ।।’ यावरून त्यारूपाची अलौकिकता सिद्ध होते. प्रत्यक्ष ब्रह्मदेव स्तुती करीत असता म्हणतो–

**अस्यापि देव वपुषो मदनुग्रहस्य**
**स्वेच्छामयस्य न तु भूतमयस्य कोऽपि ।।**

**नेशे महित्ववसितुं मनसान्तरेण**
**साक्षात्तवैव किमुतात्मसुखानुभूतेः ।।**

' हे परमात्मन् ! आपला हा अलौकिक विग्रह भक्तजनाची अभिलाषा पूर्ण करणारा आहे. हा विग्रह आपल्या चिन्मयी इच्छेचे मूर्तिमान् स्वरूप आहे. हा माझ्यावर साक्षात् आपला कृपाप्रसाद आहे. कोण म्हणतो की हे पंचभूताचे कार्य आहे ? हा अप्राकृत शुद्धसत्त्वमय आहे. मी अथवा कोणीही समाधी लावूनही या सच्चिदानंद स्वरूपाचे माहात्म्य जाणू शकणार नाही. अशा स्थितीत आत्मानंदानुभवस्वरूप साक्षात् आपल्या अलौकिक महिम्यास कोणी एकाग्र मनानेही कसे जाणू शकेल ? '– भागवत १०–१४–२.

भगवद्रुपाचे माधुर्य अलौकिक आहे. ते स्वरूप चिन्मय आहे. ते लावण्य-सौंदर्यही अप्राकृत आहे, म्हणून मोठे ज्ञानीही तिकडे आकृष्ट होतात. श्रीज्ञानेश्वर महाराजांची रूपासक्ती किती होती हे त्याच्या अनेक अभंगावरून स्पष्ट होते. श्रीपाडुरंगाचे त्यांनी केलेले वर्णन पाहा.

पांडुरंग कांती दिव्य तेज झळकती रत्नकीळ फांकली प्रभा ।
अगणित लावण्य तेज पुजाळलें नवर्णवे तेथीची शोभा ।।
कानडा हो विठ्ठलु कर्नाटकु येणे मज लाविला वेधू ।।

तसेच श्रीकृष्ण स्वरूप वर्णनाचे त्यांचे अनेक अभंग आहेत.

तुझिये निडळी कोटी चंद्र प्रकाश । कमलनयन कमलवदन हासे ।।
हाल का रे कृष्णा डोल का रे । घडिये घडिये घडिये गुज बोल का रे ।।

ज्ञानेश्वरांच्या गाथ्यातून असे शेकडो अभंग सांपडतात.

तुकाराम महाराजांची रूपासक्ती पाहा.

लावण्यसुंदर मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया ।।१।।
कस्तुरी मळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठी वैजयंती ।।२।।

असे त्या स्वरूपाचे वर्णन करून त्याची आसक्ती दाखविली आहे.

आवडे हे रुप गोजिरें सगुण । पहातां लोचन सुखावले ।। १ ।।
आतां दृष्टीपुढे ऐसाचि तू राहे । जों मी तुज पाहें वेळोवेळा ।। २ ।।
लांचावलें मन लागलीसे गोडी । ते जीवें न सोडी ऐसें झालें ।। ३ ।।
तुका म्हणे आम्ही मागावें लडिवाळी । पुरवावी आळी मायबापें ।।४ ।।

अनेक अभंगातून त्यानी आपले रूपविषयक प्रेम प्रगट केले आहे. सर्वच संताच्या काव्यातून भगवद्रूपाचे अत्यंत हृदयस्पर्शी सुंदर वर्णन आढळून येते. रूपासक्तीत भक्तश्रेष्ठ भीष्माचार्यांचा अधिकार फार श्रेष्ठ होता. भीष्माचार्यांच्या निर्वाणप्रसंगी धर्मराज, अर्जुन, भगवान श्रीकृष्ण तेथे गेले तेव्हां त्यांनी जी स्तुती केली त्यांत श्रीकृष्ण स्वरूपाचेच वर्णन केले आहे व त्याच स्वरूपाचे ठिकाणी माझे

मन अखंड राहावे अपेक्षा प्रगट केली आहे. एका श्लोकात ते म्हणतात.

**त्रिभुवनकमनं तमालवर्णं रविकर गौरवराम्बरं दधाने ।**
**वपुरलककुलावृताननाब्जं विजयसखे रतिरस्तुमेऽनवद्या ।। ३३ ।।**

भागवत १–९

ज्याचे स्वरूप त्रिभुवनसुदर, तसेच तमालपत्राप्रमाणे श्यामवर्ण आहे व जे सूर्यकिरणाप्रमाणे प्रकाशमान पीताबर धारण करणारे आहे, कमलाप्रमाणे दिसणाऱ्या ज्या मुखावर सुदर असे कुरळे केश शोभत आहेत त्या अर्जुनसख्या श्रीकृष्णावर माझी निष्कपट प्रीती राहो ' श्रीजगद्‌गुरू शंकराचार्यानीही ' शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोक्षिविषय ' ' सर्वलोकाचा ईश्वर व शरण्य असा श्रीकृष्ण माझ्या नेत्राचा अखंड विषय होवो. ' अशीच आपली रूपासक्ति अनेक स्तोत्रातून प्रगट केली आहे. भक्तिमती गोपिकांच्या रूपासक्तीचे काय वर्णन करावे, गोपीगीतातील एका श्लोकात त्या श्रीकृष्णास उद्देशून म्हणतात, ' हे श्रीकृष्णा ! सकाळीच तुम्ही वनांत गाई चारावयास व विहार करावयास जाता, तेव्हां तुम्हाला पाहिल्याविना आमचा एक क्षण युगासारखा जातो संध्याकाळी तुम्ही परत येता तेव्हा कुरळचाकेसानी सुशोभित असे सुदर मुखारविद आम्ही पाहतो. त्यावेळी डोळयाच्या पापण्याची उघडझाप झालेलीही बरी वाटत नाही; असे वाटते की दृष्टीच्या आड येणाऱ्या या पापण्या बनवणारा विधाता मूर्ख आहे. ' (भागवत १०–३१–१५)

गोकुळातील गोपिकाच काय पण गाई, वत्स हे सर्वच श्रीकृष्ण स्वरूपावर मोहित झाले होते. भागवत दशमस्कंध अध्याय एकवीसमध्ये वेणुगीत या नावाने हा प्रकार विस्तृत रीतीने सागितला आहे.

रूपासक्तीमध्ये भक्तवर्य अर्जुनाचा अधिकारही श्रेष्ठ मानला पाहिजे. गीतेच्या अकराव्या अध्यायात श्रीकृष्ण भगवंताच्या व्यापक विश्वरूपाचे त्याला दर्शन घडले. त्याची श्रेष्ठता, दुर्लभता किती होती हे अर्जुनच सागतो. अर्जुन म्हणतो' ' देवा, ज्याच्या सकल्पाने ही लोकांची मालिका उत्पन्न होते व नाहीशी होते व ज्या स्थानास तू ' मी , असे म्हणतोस, जेथून ही दोन हाताची चार हाताची रूपे देवांचे कार्य करण्याच्या निमित्ताने वारंवार घेऊन येतोस ते तुझे मुद्दल (मूळ) स्वरूप होय. उपनिषदे ज्याचे वर्णन करतात, योगी लोक आपल्या हृदयात शिरून ज्याचा साक्षात्कार करून घेतात, ज्या स्वरूपाला सनकादिक संत मिठी मारून राहिले आहेत, असे अमर्याद असलेले तुझे विश्वरूप कानानी जे मी ऐकतो ते पाहण्याकरिता देवा, माझे चित्त फार उत्कंठित झाले आहे. ' ( ज्ञा० ११ ओ, ८२–८६ )

या अर्जुनाच्या प्रार्थनेनंतर श्रीकृष्णानी त्यास विश्वरूप दाखविले. तो सर्व प्रकार गीतेच्या अकराव्या अध्यायात विस्तारपूर्वक आहे. परंतु ते व्यापक विश्वरूप

पाहूनही अर्जुनास आनंद झाला नाही व पुन्हा त्याच चतुर्भुजरूपाच्या दर्शनाची तीव्र उत्कंठा प्रगट केली. त्याचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी फार सुदर केले आहे. अर्जुन म्हणतो,

कैसें नीलोत्पलातें रांवित । आकाशाही रंगु लावित । तेजाची वोज दावित । इंद्रनीळा ।। ६०० ।। जैसा परिमळ जाहला मरगजा । कां आनंदासीचि निघालिया भुजा । ज्याचे जानूवरी मकरध्वजा । जोडली बरव ।। ६०१ ।। मस्तकीं मुकुटातें ठेविलें । की मुकुटा मुकुट मस्तक झालें । श्रृंगारा लेणे लाधलें । आंगाचेनि जया ।। ६०२ ।। इंद्रधनुष्याचिये आडणी । माजी मेघ गगनरंगणी । तैसें आवरिलें शारदापाणी । वैजयंतिया ।। ६०३ ।। कवणी ते उदारगदा । असुरांदेत कैवल्य पदा । कैसें चक्र हन गोविंदा । सौम्य तेजें मिरवें ।। ६०४ ।। किंबहुना स्वामी । तें देखावया उत्कंठित पां मी । म्हणोनि आतां तुम्ही । तैसया होआवे ।। ६०५ ।। हे विश्वरूपाचे सोहळे । भोगूनि निवाले जी डोळे । आतां होताति आधले । कृष्ण मूर्ती लागी ।। ६०६ ।। हे साकार कृष्णरूपडे । वांचूनि पाहो नावडे । ते न देखता थोडे । मानितातो हे ।। ६०७ ।। आम्हां भोग मोक्षाचा ठायीं । श्रीमूर्ती वांचूनि नाहीं । म्हणोनि तैसाचि साकारू होई । हे सांवरी आता ।। ६०८ ।। ज्ञा० आ० ११

प्रत्यक्ष भगवान शंकरही श्रीकृष्णाच्या बालरूपाच्या आसक्तीने गोकुळात बैराग्याचे रूप घेऊन गेले होते अशी पुराणात कथा आहे.

अशी रूपासक्तीची अनेक उदाहरणे आहेत.

**पूजासक्ति :**

एकदा ज्या रूपावर प्रेम बसले त्याच्याविषयी परमावधीचा आदरभाव निर्माण झाला की तो आदर अनेक उपचारानिशी प्रगट करण्याची भावना हृदयात सहज प्रगट होते ती जी सक्रिय भावना सोपचार प्रगट केली जाते तिलाच पूजा असे म्हटले जाते. पूजेमध्ये पूज्य, पूजक व पूजन अशी त्रिपुटी असते. व्यवहारात-ही आपल्यापेक्षा जे श्रेष्ठ असे वाटतात त्यांची यथाशक्ती पूजा केलीच जाते. पण तिचे हेतू अनेक असतात. सत्यनारायणाची पूजा करणारे बहुतेक भाविक पूजक कोणती ना कोणती कामना ठेवूनच ती पूजा करीत असतात. कित्येक अग्नी, इंद्र, सूर्य, सोम इत्यादिक देवतांच्या उद्देशाने यज्ञरूपाने पूजा करणारे असतात. ते पार-लौकिक फल प्राप्ती करता ती पूजा करतात. त्यात पूज्यापेक्षा त्या पूजेपासून ज्या फलाची अपेक्षा असते त्या फलावरच खरी आसक्ती असते. फल प्राप्त झाले म्हणजे पुन्हा त्या देवतेकडे पाहतही नाहीत किंवा ते फल प्राप्त न झाले तरी पूजेचा त्याग होतोच ! येथे आसक्ती पद आहे. मागे सोळाव्या सूत्रात व्यासमहर्षींचे भक्तिप्रेम विषयक मत सांगताना ' पुजादिष्वनुराग ' असे म्हटले आहे. अनुराग या अर्थी या सूत्रात आसक्ती या पदाचा उपयोग केला आहे. सूत्राच्या आरंभी त्या

भक्तीचे स्वरूप 'सा न कामयमाना, निरोधरूपत्वात' असे सांगून निरोधाचे लक्षण 'लोकवेदव्यापारन्यास' हे सांगितले आहे. म्हणजे ही पूजासक्ती लोकवेदव्यापारात समाविष्ट होऊ शकत नाही त्याहून अतीत श्रेष्ठ आहे. पूजेचा प्रकार, उपचार, विधी इत्यादिक पुराणे व तंत्र इत्यादी ग्रंथातून विस्तृत रूपाने सांगितलेले आहेत. सोळाव्या सूत्रावरील विवेचनात त्या विषयाचा बराच विचार केला गेला आहे. त्या सूत्रातही 'अनुराग' हे पद आहे, अनेक प्रकारच्या कामनासिद्धीकरिता अथवा भयानेही देवदेवतांची पूजा केली जाते. पण त्यापूजेत अनुराग अथवा आसक्ती नसते. भक्तश्रेष्ठ उद्धवाच्या पूजासक्तीचे वर्णन भागवतामध्ये केले आहे. भक्तवर्य उद्धव ध्रुवप्रल्हादाप्रमाणे पाच वर्षांचा असतानाच भगवत्प्रेमाने युक्त होऊन भगवत्पूजेत रंगून जात असे,

**यः पञ्चहायनोमात्रा प्रातराशाय याचितः ।**
**तन्नैच्छद्रचयन् यस्य सपर्यां बाललीलया** ।। भाग. ३।२।२

'जेव्हा हा उद्धव पाच वर्षांचा होता तेव्हा बालकाप्रमाणे खेळत असता श्रीकृष्ण-मूर्ती बनवून तिच्या पूजेमध्ये इतका तन्मय होऊन जात असे की प्रातःकालच्या बालभोगाकरता त्याची आई त्याला सारखी बोलावीत असताही ती पूजा सोडून तो जाऊ इच्छित नव्हता.' यालाच पूजासक्ती म्हणतात, दुसरे उदाहरण अंबरीष राजाचे आहे. शुकाचार्य म्हणतात,

स वै मनः कृष्णपदारविंदयोर्वचांसि वैकुण्ठगुणानुवर्णने ।
करौ हरेर्मंदिरमार्जनादिषु श्रुतिं चकाराच्युतसत्कथोदये ।।
मुकुन्दलिङ्गालयदर्शनेदृशौ तद्भृत्यगात्रस्पर्शेऽङ्गसंगमः ।
घ्राणं च तत्पादसरोजसौरभे श्रीमत्तुलस्या रसनां तदर्पिते ।।
पादौ हरेः क्षेत्र पदानुसर्पणे शिरो हृषीकेशपदाभिवन्दने ।
कामं च दास्ये न तु कामकाम्यया यथोत्तमश्लोकजनाश्रया रतिः ।।
भागवत, स्कं० ९–४ श्लो० १८, १९, २०.

'त्या राजा अंबरीषाने आपल्या मनाला श्रीकृष्णाच्या चरणकमलाच्या ठिकाणी, वाणीस भगवद्गुण वर्णनात, हाताला हरीच्या मंदिरात झाडण्यात व अन्य सेवेत व आपल्या कानास त्या अच्युताच्या मंगलमय कथा श्रवणात लावून दिले होते.

'तसेच त्या अंबरीषाने भगवन्मंदिर व भगवत्स्वरूप दर्शनातच आपल्या नेत्राचा उपयोग केला होता. अंगसंग भगवद्भक्तांच्या स्पर्शात, नासिका भगवच्चरणावर सर्मपित तुलसीमकरंद सेवनात व रसनेला भगवदर्पित नैवेद्यप्रसाद सेवनात संलग्न केले होते.

'त्या अंबरीषाचे पाय भगवत्क्षेत्रादिकांच्या यात्रा करण्यातच उपयोगात आणले जात होते. मस्तक त्या हृषीकेशाचे अखंड पदाभिवंदन करीत असे. त्याने माला-

चंदन आदि सर्व भोगसामुग्रीला भगवंतालाच अर्पण केले होते, ते स्वतः भोगण्याच्या इच्छेने नाही तर जे पवित्रकीर्ती भगवंताच्या भक्तजनांचे ठिकाणी सततवास्तव्य करते ते प्रेम प्राप्त व्हावे म्हणून '

'पूजा' हा एक शब्द असला तरी पूजा या क्रियेत अनेक गोष्टींचा समावेश होत असतो, याचा मागे सोळाव्या सूत्राच्या विवरणात विचार आलाच आहे.

पंढरपूरसारख्या क्षेत्रात प्रात:काळी काकडारती, पंचामृतपूजा, आरतीचेवेळी शेकडो भक्त नित्यनियमाने स्नान करून भावभक्तीने येतात व पूजाविधी चालू असता प्रेमाने तो सर्व विधी पाहतात, तसेच कित्येक सायंकाळी धूपारतीचे वेळी नियमाने येतात तर कित्येक रात्री शयनारतीच्यावेळीही उपस्थित राहून तो सर्व विधी श्रद्धेने पाहून नंतर श्रीमूर्तीचे दर्शन घेऊन जातात. हाही एक पूजासक्तीचाच प्रकार म्हटला जाईल. पूजासक्तीमध्ये भक्तीच्या सर्वच अंगांचा समावेश होतो.' पूज्यस्वरूपाचे सच्चिदानंद स्वरूपाने ज्ञान, पूज्यस्वरूपाचे ध्यान, तसेच सर्वेंद्रियाच्या क्रियांचे समर्पण, पूजकाजवळ जे जे काही द्रव्यादिक साधन आहे त्याचा पूजोपचारात विनियोग. श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, वंदनादि नवविध भक्ती एका अर्चन भक्तीत होत असते. नारदमहर्षींचे 'तदर्पिताखिलाचारता' हे भक्तीचे लक्षण पूजासक्तीमध्ये सहज सिद्ध होते.

**स्मरणासक्ति :**

कित्येक भक्त केवळ स्मरणासक्त असतात. स्मरणासक्ती म्हणजेच श्रीनारदांनी सागितलेली 'तद्विस्मरणे परमव्याकुलता' ही स्थिती होय.

एखाद्या विषयाची स्मृति होण्यास सादृश्यज्ञान, संबंधिज्ञान व चिंतन हे कारण असते असे न्यायशास्त्राचे मत आहे. दोन बंधू सारखे असले म्हणजे एकाची भेट झाली की सादृश्यामुळे दुसऱ्याचे स्मरण होते. पिता-पुत्र यांच्यातील जन्यजनक भावसंबंधामुळे एकाचे दर्शन झाले की दुसऱ्याचे स्मरण होते. तसेच एखाद्या विषयाचे सतत चिंतन होऊ लागले की त्याचे स्मरण होते. पण हा नियम लौकिक व्यावहारिक पदार्थाचे बाबतीत आहे. साधकभक्तदशेत कदाचित विसर पडणे शक्य असते म्हणून स्मरणाकरिता अनेक भक्तांनी देवाची व संतांची प्रार्थना इत्यादी केलेली आढळून येते. पण नारदांनी सूत्रात सांगितल्याप्रमाणे 'तन्मयाः', 'यतस्तदीयाः' अथवा 'तत्प्राप्य तदेव अवलोकयति तदेव श्रृणोति तदेव भाष्यति तदेव चिंतयति' (सूत्र ५५) अशी अवस्था झाली आहे तेथे ते भगवत्स्मरण आपल्या उत्पत्तीकरिता अन्य साधनाची अपेक्षा कशी करील ? तेथे ध्यानी, मनी, जागृती, स्वप्नी पांडुरंगाचाच प्रत्यय येतो. प्रेमाच्या लक्षणात प्रतिक्षणवर्धमान, अविच्छिन्न अशी विशेषणे मागील चौपन्नाव्या सूत्रात दिली आहेत. स्मरण हा मनाचा धर्म आहे. ते मनच जर 'पांडुरंगी रंगले', त्याचेच गुणी वेधले गेले तर मग स्मरण

अन्याचे होईल कसे ? किंवा श्रीहरीचे विस्मरण तरी कसे होणार ?

बापरखुमादेवीवरू जीवींचा जिव्हाळा । कांही केल्या वेगळा नव्हे गे माये।।

वेधलें वो मन तयाचिये गुणी । क्षणभरीं न विसंबे विठ्ठलरुक्मिणी ।।

हे श्रीज्ञानेश्वर महाराजांचे उद्‌गार हेच सांगतात.

भाविकांना भगवत्स्मरण होतच असते, किंवा पुराणादिकांमध्ये स्मरणाचा विधी सांगितला आहे म्हणून तो स्मरण करीत असतो. पण अशा स्मरणात विस्मरण होण्याचा संभव असतो. पण येथे प्रत्येक क्रियेचे पुढे 'आसक्ती' हे पद आहे. ती आसक्ती कोणत्याही कारणाने विस्मरण होऊ देत नाही.

श्रीतुकाराममहाराजांचे चरित्रातील एक कथा प्रसिद्ध आहे. त्यांच्या मनात, ध्यानी-मनी, जागृतीं-स्वप्नी, पांडुरंग असे म्हणून मुखातही सदैव त्याचे नाव येतच असे. त्याला काळ वेळ निमित्ताचे बंधन नसे. एकदा महाराज बर्हिर्दिशेस गेले असताही त्यांचे मुखातून भगवन्नाम येत असलेले एका विद्वान ब्राह्मणाने ऐकले. त्याला ते योग्य वाटले नाही महाराज अलीकडे आल्यानंतर त्या ब्राह्मणाने त्यांना समजून सांगण्याचा प्रयत्न केला की देवाचे पवित्र नाव शुचिर्भूत अवस्थेतच घ्यावे, अशुचि अवस्थेत घेऊ नये. महाराजांनी ते ऐकले व म्हटले की, आपण म्हणता ते खरे पण 'नेघे नेघे नेघे माझी वाचा विसावा ।।' 'जिव्हे झाला चळ । नेघे अवसान ते पळ ।।' अशी माझी अवस्था आहे, ती जिव्हा ऐकत नाही मी काय करू ! पण हे त्याला पटले नाही. त्याने शास्त्रीय दृष्टीने पुन्हा महाराजांना आपले म्हणणे पटवून देण्याचा प्रयत्न केला. महाराजांनी त्या ब्राह्मणाचा आदर केला व 'आज आपण येथे राहा, वेळ बराच झाला आहे, अंधार पडत आहे' असे म्हणून त्याला ठेवून घेतले. ब्राह्मणाची संध्या इंद्रायणीवर आटोपली, महाराजांनी त्याच्या फराळाचीही व्यवस्था आपल्या घरी केली. रात्रीचे भजन, नित्यक्रम, देवाची शेजारती आटोपून दोघेही अंथरुणावर पहुडले. रात्री एक झोप झाल्यावर ब्राह्मण सहज जागा झाला शांतता होती. त्यात 'विठ्ठल विठ्ठल' असा भजनाचा मंजुळ ध्वनी त्याच्या कानावर पडला. पाहतो तो तुकारामबुवा जवळ गाढ निद्रेत आहेत. दुसरे कोणी तेथे नाही. तो मनात म्हणतो येथे आम्ही दोघेच आहो. मी भजन करीत नाही व बुवाही गाढ झोपी गेले आहेत मग हे नाम कोठून ऐकू येते. निरखून महाराजांचे मुखाकडे पाहतो तो त्यांच्या मुखातूनच ते नाम येत होते.

'जयाचे वाचेपुढां भोजें । अखंड नाम नाचत असे माझें ।।

जें जन्मसहस्रीं वोळगिजे । एक वेळ यावया ।। ज्ञा. ९

या ओवीची व तुकाराममहाराजांनी सांगितलेल्या आपल्या अनुभूतीची साक्ष पटली. त्याने महाराजांना उठवून त्यांची क्षमा मागितली. ज्यांच्या झोपेतही नाम

सुटत नाही त्यांना ते अमुक वेळी घ्यावे, अमुक वेळी घेऊ नये असे सांगणरा मी केवढा मूर्ख असे त्याला वाटले. ही खरी स्मरणासक्ति.

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।** गीता ८

या भगवदुक्तीप्रमाणे भक्ताचे अखंड भगवत्स्मरण होत असते.

वेदान्त शास्त्रात स्मृतिज्ञानास अप्रमा म्हटले आहे. जे ज्ञान योग्य प्रमाणापासून होत नाही त्याला अप्रमा म्हणतात. रज्जुसर्पज्ञान हे भ्रमरूप आहे. जरी नेत्राने ते होते तरी नेत्रात दोष असल्यामुळेच ते होते, निर्दोष नेत्राने होत नाही. स्मृतिज्ञान जरी प्रमा नाही तरी रज्जु सर्पाप्रमाणे भ्रमही नाही. कारण ते दोषजन्य नाही. मग अप्रमात्व का मानले आहे? विषयानुभवापासून झालेल्या संस्कारापासून स्मृतिज्ञानाची उत्पत्ती मानली आहे. प्रमाणापासून झालेल्या ज्ञानासच प्रमा म्हणजे यथार्थज्ञान म्हणतात, ते अबाधित असते. प्रमाणे प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ति, अनुपलब्धि, अशी सहाच मानली आहेत. स्मृति ही अनुभवापासून होते. यथार्थ अनुभवास प्रमा म्हणतात व प्रमेचे जे कारण म्हणजे साधन त्याला प्रमाण म्हटले जाते अनुभव हा प्रमा असल्यामुळे त्याला प्रमाणत्व नाही अनुभवाला प्रमाण म्हटले तर वरील सहा प्रमाणापेक्षा ते एक सातवे प्रमाण मानावे लागेल. पण तसे मानले नाही म्हणून स्मृतिज्ञान प्रमा नाही, स्मृतिज्ञानाला यथार्थ अप्रमा म्हटले जाते. कारण अनुभवाला फल आहे, तसे स्मरणाला फल नाही. साखर जिभेवर ठेवली तर गोडीचा अनुभव येतो पण केवळ स्मरण झाले तर तसा अनुभव येत नाही. मागे चौपन्नाव्या सूत्रात प्रेम हे अनुभवरूप आहे असे म्हटले आहे. अध्यात्मशास्त्रात स्मरणाची जी व्याख्या आहे ती बाह्य लौकिक विषयाच्या स्मरणाबाबत आहे. भगवत्स्मरणाची ती व्याख्या नाही. भगवत्स्मरण हे सफल आहे. महाभारतात श्रीविष्णुसहस्रनामाच्या आरंभी

**यस्य स्मरण मात्रेण जन्मसंसारबंधनात् ।**
**विमुच्यते नमस्तस्मै विष्णवे प्रभविष्णवे ॥**

असे स्पष्ट म्हटले आहे. भक्त ज्यावेळी भगवत्स्मरणासक्त असतो त्यावेळी तो भगवत्स्वरूपाशी तन्मयच असतो. तसेच,

करा विठ्ठल स्मरण । नामरूपी अनुसंधान ।
जाणोनि भक्तां भवलक्षण । जघन प्रमाण दावितो ॥

असे श्रीज्ञानेश्वरमहाराजही सांगतात. यावरून हे स्मृतिज्ञान अप्रमा नाही. हे स्मरण म्हणजे एकप्रकारची अनुभूतीच आहे.

ही स्मरणासक्ती नामस्मरण, रूपस्मरण, लीलास्मरण, गुणस्मरण, चरित्रस्मरण, कृपास्मरण, सेवास्मरण, इत्यादि अनेकविधस्वरूपाची असू शकते. कोणाच्या ठिकाणी केव्हा कोणती स्मरणासक्ती अभिव्यक्त होईल हे काही सांगता येत नाही.

येथे स्मरण, चिंतन, मनन, ध्यान हे एका अर्थानेच घ्यावेत.

**दास्यासक्ति** :

स्मरणासक्तीनंतर सूत्रकार दास्यासक्तीचा निर्देश करतात. ज्याचे अखंड चिंतन, स्मरण, ध्यान होऊ लागते तो भगवान त्या स्मरणप्रभावाने प्रगट झाला व त्याच्या अलौकिक दिव्य लावण्यमय स्वरूपाचे दर्शन झाले म्हणजे चित्तात जो आनंद होतो तोच भक्ताच्या सेवेच्याद्वारे प्रगट होतो. तीच दास्यासक्ती होय. आम्ही तुझ्या दासी का झालो, याचे गोपिकांनी श्रीकृष्णापुढेच कारण सागितले आहे. त्या म्हणतात,

**वीक्ष्यालकावृतमुखं तव कुंडलश्री**
**गण्डस्थलाधरसुधं हसितावलोकं ।**
**दत्ताभयं च भुजदंडयुगं विलोक्य**
**वक्षः श्रियैकरमणंच भवाम दास्यः** ॥ भागवत १०-२९-३९

'हे श्रीकृष्णा, तुझे हे कुरळ्या केसांनी शोभायमान श्रीमुख, या दिव्य कुंडलांनी मंडित कपोल, हे अमृताने भरलेले अधर, हे हास्ययुक्त अवलोकन, हे अभयप्रदान करणारे पुष्ट भुजदण्ड व हे लक्ष्मीचे निवासस्थान असलेले तुझे विशाल वक्षस्थल पाहून आम्ही तुझ्या दासी झालो आहोत.'

व्यवहारात दास्य केले जाते ते स्वार्थ, लोभ, जिविका, इत्यादी कारणाने होत असते. जर त्या दास्याने स्वार्थ, लोभ न साधले तर ते दास्य टाकलेही जाते. त्यात व्यभिचार निर्माण होतो. म्हणून येथे केवळ दास्य असा शब्द नसून 'दास्यासक्ती' म्हटले आहे चैतन्यसंप्रदायामध्ये यास दास्यरस असे संबोधले जाते. त्यांनी एकच भक्तीरस पाच प्रकारे परिणत होतो असे म्हटले आहे. शात, दास्य, सख्य, वात्सल्य आणि मधुर अशी त्याची पाच रूपे मानली आहेत. दास्यासक्तीसच ते दास्यरस म्हणतात.

या दास्यासक्तीचे दोन भेद होतात. एक सम्भ्रमजनित दास्य व दुसरे गौरवजनित दास्य. जेव्हा साधकभक्त भगवंताच्या अनंत ऐश्वर्य, प्रभाव, महत्त्व, शक्ती, प्रतिष्ठा इत्यादी गुणांचे आधिक्य तसेच अनंतलीलांचे अलौकिकत्व पाहून, जाणून केवल हा भगवानच एकमेव सेव्य आहे असे मानून त्याच्या सेवेत स्वतःस वाहून घेतो त्यास सम्भ्रमजनितदास्य म्हटले जाते. गौरवजनितदास्याचा प्रकार म्हणजे ज्यात भगवंताबरोबर काही गौरव संबंध असतो. जसे श्रीकृष्णपुत्र प्रद्युम्न, सांब, हे श्रीकृष्णाची सेवा गुरू (श्रेष्ठ) बुद्धीने करीत असत. तसेच लक्ष्मण, भरतादिकांचा बंधुत्वभाव असून त्यानी आजन्म प्रभुरामचंद्राची सेवा केली. या दास्यरसाचा आलम्बन (आश्रय) भगवान सगुण साकारच मानला गेला आहे. जरी निराकार ईश्वराच्या आज्ञापालनरूपाने वेदोक्त सदाचार व विश्वसेवा कार्याच्या द्वाराही

भगवद्दास्याचाच अनुभव घेतला जातो, किंवा या व्यक्त जगास भगवत्स्वरूप मानून त्याची सेवाही दास्यभक्तीत अंतर्भूत होऊ शकेल, तथापि प्रेमलक्षणा भक्तियुक्त ज्याचे चित्त आहे अशा भक्तांनी सगुणसाकार, अनंतऐश्वर्य संपन्न, द्विभुज-चतुर्भुज आदि आकारविशिष्ट भगवद्विग्रहालाच दास्यरसाचे आलम्बन मानले आहे. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात,

तुझी सेवा करीन मनोभावें वो । माझें मन गोविंदी रंगलें वो ॥

तुकाराम महाराजांचे उद्गारही प्रसिद्ध आहेत,

नको ब्रह्मज्ञान आत्मस्थिती भाव । मी भक्त तू देव ऐसे करी ॥१॥
दावी रूप मज गोपीकारमणा । ठेऊं दे चरणावरी माथा ॥२॥ तु.

या विषयात श्री मारुतिरायाचे वचन प्रमाण आहे.

**भवबन्धच्छिदे तस्यै स्पृहयामि न मुक्तये ।**
**भवान्प्रभुरहं दास इति यत्र विलुप्यते ॥**

मारुती म्हणतो, 'प्रभो, भवबंधाचा नाश करणाऱ्या मुक्तीची मी इच्छा करीत नाही कारण तिच्यात तू प्रभू व मी दास ही भावना नष्ट होते.'

भक्तिशास्त्रामध्ये या विषयाचा आणखीही विस्तारपूर्वक विचार केला आहे. भक्तिरसामृतसिंधूमध्ये दास्याचे लक्षण सांगितले आहे,

**दासास्तु प्रश्रितास्तस्य निदेश वशवर्तिनः ।**
**विश्वस्ता प्रभुताज्ञानविनम्रितधियश्च ते ॥२-१२॥**

'भगवंताचे दास त्याचे आश्रित असतात, भगवंतावर त्यांचा अखंड विश्वास असतो, ते सर्वरूपाने भगवदाज्ञेचे पालन करणारे असतात, तसेच भगवंताच्या अप्रतिहत ऐश्वर्य ज्ञानाने त्याचे संपूर्ण जीवन भगवच्चरणावर समर्पित झालेले तसेच विनम्रबुद्धीचे असते.' अशा दास्यासक्तांचे चार प्रकार सांगितले आहेत.

**चतुर्धाऽमी अधिकृताश्रित पारिषदानुगा.** ॥ भ. र. सिं. २-१३

अधिकृत, आश्रित, पारिषद (पार्षद) व अनुगामी अशी त्यांना संज्ञा दिली आहे. अधिकृत म्हणजे ज्यांना काही विशेष अधिकार अनादिकालापासून प्राप्त झाला आहे असे, शिव, ब्रह्मा, इंद्र, शक्ती, सूर्य इत्यादि देवतागण होत. हे ही भगवद्दास्याची, सेवेची, अपेक्षा करतात. त्यांची स्थाने जरी श्रेष्ठ आहेत तरी तत्त्वतः ते कर्माने त्या स्थानाला प्राप्त झालेले जीवच आहेत. 'म्हणोनि ब्रह्मेशाना परते । वाढणे नाही जीवाते ॥' (ज्ञा. १५-२०३) गीतेच्या अकराव्या अध्यायांत अर्जुनास विश्वरूप दाखविले ते पाहत असतां, रुद्र, आदित्य, वसु, साध्यदेव, अश्विनौदेव, मरुत्, गंधर्व, यक्ष, असुर, सिद्धसंघ सर्वच विस्मित होऊन त्या विश्वरूपास पाहत असलेले आणि त्याचे स्तवन करीत असलेले अर्जुनास दिसले.' असे गीतेत वर्णन आहे.

भक्तिरसामृतसिंधू या ग्रंथात एक प्रसंग वर्णिलेला आहे.

**का पर्य्येत्यम्बिकेयं हरिमवकलयन्कम्पते क: शिवोऽसौ ।**
**तं क: स्तौत्येषधाता प्रणमति विलुठन्क. क्षितौ वासवोऽयम् ।**
**क. स्तब्धो हस्यतेऽद्धा दनुजभिदनुजै: पूर्वजोऽयं ममेत्यं ।**
**कालिन्दी जाम्बवत्यां त्रिदशपरिचयं जालरन्ध्रात् व्यतानीत् ।।**

३-२-१४

भगवान श्रीकृष्ण द्वारकेत राज्य करीत असता त्यांच्या अष्टनायिकातील कालिंदी व जाम्बवती या एके दिवशी राजमंदिरातील गवाक्षातून पाहत असता तेथे अनेक देवता त्यांना दिसल्या. त्यांना पाहून जाम्बवती कालिंदीला त्यांच्याविषयी विचारीत आहे. एक तेजस्वी स्त्री प्रदक्षिणा करीत आहे हे पाहून ती म्हणते, 'ही प्रदक्षिणा कोण करीत आहे ?' कालिंदी म्हणाली, 'अग ! ही प्रत्यक्ष आदिशक्ती अम्बिका आहे,' 'भगवद्दर्शन करून थरथर कापत हात जोडून कोण उभे आहे ?' 'हे प्रत्यक्ष शिव आहेत' 'हा स्तुती करीत कोण उभा आहे ?' 'हा ब्रह्मदेव आहे' 'पृथ्वीवर पडून साष्टाग नमस्कार कोण करीत आहे ?' 'हे इंद्रमहाराज आहेत.' 'इतर देवतागण ज्यांची चेष्टा करीत आहेत ते हे स्तब्ध असे कोण उभे आहेत ?' कालिंदी म्हणते, 'अग ! हे माझे ज्येष्ठ बंधु प्रत्यक्ष यमराज आहेत.' यावरून स्पष्ट सिद्ध होत आहे की सर्व देव द्वारकेत येऊन भगवंताचे दास्य करतात. पुराणातून अशा अनेक कथा सापडतात.

आश्रित या वर्गातील जे दास आहेत त्यांचे तीन प्रकार कल्पिले आहेत. ते शरणागत, ज्ञानी आणि सेवानिष्ठ. जरासंधाच्या कैदेत असणारे अनेक राजे श्रीकृष्णास शरण आले. तसेच भगवदनुग्रहपात्र झालेला यमुनेच्या डोहामध्ये राहणारा कालिया नाग इत्यादी अनेक शरणागतदासांची उदाहरणे पुराणातून आढळतात. जे ज्ञान अथवा मोक्षाचाही त्याग करून केवल भगवत्स्वरूपाचाच आश्रय करणारे भक्त ते ज्ञानी होत. या श्रेणीमध्ये शौनकप्रमुख ऋषिगणाचा समावेश होतो.

जे अंत.करणातून भगवत्सेवेची अपेक्षा करतात, चारही प्रकारच्या मोक्षाची-ही उपेक्षा करून, सर्व भोगांचा त्याग करून प्रेमयुक्त चरणसेवेची इच्छा ज्यांची असते त्यांना सेवानिष्ठ आश्रित असे म्हटले आहे. पुराणात चंद्रध्वज, हर्यश्व, श्रुतदेव, बहुलाश्व इत्यादि भक्तांची सेवानिष्ठात गणना केली आहे.

यानंतर दासांचा जो तिसरा प्रकार तो पारिषद (पार्षद) होय. भगवंताच्या गोलोकवैकुंठादिलोकात होणाऱ्या नित्यलीलांमध्ये, तसेच वेळोवेळी अवतार घेऊन होणाऱ्या प्रगट लीलांमध्ये हे पार्षदगण राहतात. वैकुंठात जयविजय, विष्वक्सेन, आदि पार्षदगण नित्यसेवेत अनुरक्त असतात. तर द्वारकेतील लीलेमध्ये उद्धव, दारुक आदि पार्षदगण असतात. यद्यपि हे विशिष्ट कार्यात नियुक्त असतात. कोणी मंत्र्याचे

काम करतो, तर कोणी दारुकासारखा सारथ्याचे काम करतो, तरी अवसर प्राप्त झाला असता हे श्रीकृष्णाची सर्वप्रकारे सेवा करण्यास उद्युक्त असतात व त्या सेवेने स्वतःस धन्य समजतात. चवथा प्रकार अनुगांचा आहे. द्वारकेमध्ये सुचंद्र, मंडन, स्तम्ब, सुतम्ब इत्यादी भक्त छत्रचामर धारण करणे, तसेच अन्य सर्व सेवेचे कार्य, उल्हासपूर्वक करीत असतात. तसेच व्रजातही रक्त, पत्रक, मधुकण्ठ, मधुव्रत असे अनेक पार्षदगण सदैव श्रीकृष्णभगवंताबरोबर राहून त्याची सर्व प्रकारची सेवा करीत असत. भीष्म, विदुर, उद्धव, परीक्षित इत्यादिकांची गणनाही पार्षदगणात केली आहे.

**एतेषां प्रवरः श्रीमानुद्धवः प्रेम विक्लवः** । भ. र. सिं. २–२०

या सर्वांत अत्यंत प्रेमळ भक्त उद्धव श्रेष्ठ मानला आहे. वर सांगितलेल्या अधिकृत, आश्रित, परिषद आदि दास्यभक्तांचे नित्यसिद्ध, साधनसिद्ध व साधक असे तीन प्रकार सांगितले आहेत. या सर्वांच्या चित्तात अनुदिन दास्यरतीची अभिवृद्धी होत असते.

भक्तिशास्त्रात सेवकाच्या योग व अयोग अशा दोन अवस्था असतात असे सांगितले आहे. भगवत्संग न झाल्यामुळे सेवा न होणे, सेवेपासून वंचित राहणे, ही अयोग अवस्था होय. या अवस्थेत भक्ताचे मन भगवत्स्वरूपीच राहते, प्रायः ते भगवद्गुणांचे अनुसंधान व त्याच्या मीलनाच्या उपायांचे चिंतन करीत असते. भगवंताचे एकदाही दर्शन झाले नाही. तरी त्याच्या दर्शनाची तीव्र इच्छा भक्ताला राहते. त्याची जलावीण तळमळणाऱ्या मत्स्याप्रमाणे अवस्था होते. या अवस्थेत वियोगात निर्माण होणारे सर्वच भाव जागृत होतात. अशी अवस्था प्राप्त झाली असता प्रेमपरवश अशा भगवंताला भेट देणे भाग पडते. यासच योग अवस्था म्हटले जाते.

**कृष्णेन सङ्गमोयस्तु सयोग इति कीर्त्यते** ।। भ. र. सिं. २–५८

'जेव्हा श्रीकृष्ण संगम होतो त्या अवस्थेस योग अवस्था असे म्हटले जाते.

**योगोऽपि कथितः सिद्धिस्तुष्टिः स्थितिरिति त्रिधा ।।** भ० र० सि२.

या योगाच्या सिद्धी, तुष्टी, स्थिती अशा तीन अवस्था आहेत. उत्कंठित अवस्थेत भगवंताची जी प्राप्ती होते तिला सिद्धी असे म्हणतात. याचे उदाहरण भागवत दशमस्कंधात अक्रूराची उत्कंठा व त्याला श्रीकृष्णदर्शन झाले ते आहे भगवंताचे एकदा दर्शन होऊन पुन्हा वियोग झाला असता त्यानंतर दास्यासक्त भक्ताला भगवत्कृपेने पुन्हा दर्शन झाले, मीलन झाले तेव्हा जो आनंद होतो त्या अवस्थेस तुष्टी असे म्हटले आहे. द्वारकानगरीतील राजमंदिराच्या द्वारातून दारुकाने (सारथी) जेव्हा कृष्णमूर्ती पाहिली तेव्हा त्याला इतका आनंद झाला की तो हात जोडून त्या भगवंताला प्रणाम करण्याचेही विसरून गेला. त्याची अवस्था चित्रात

काढलेल्या मानवाच्या आकृतीप्रमाणे झाली. ही तुष्टि अवस्था होय. स्थिती अवस्था ती आहे की त्या सेवकास कधी भगवद्वियोग नच होणे. भाग्याने अखंड भगवत्सान्निध्य लाभणे.

**सहवासो मुकुन्देन स्थितिर्निगदिता बुधैः ।।** **भ० सिं०** २–६०

या स्थिती अवस्थेमध्ये भक्त प्रत्येक क्षण अत्यंत सावधान राहून अहर्निश भगवद्दास्यच करीत असतो. त्याला दास्याविना वांछनीय अन्य काहीच नसते. याचे प्रत्यक्ष उदाहरण श्री मारुतिरायाचे. 'दास्यत्व निकट हनुमंते पैं केलें।' असे तुकोबारायांनी त्यांचे वर्णन केले आहे.

दास्यासक्तीमध्ये बंधु लक्ष्मण व भरत यांचाही अधिकार फार श्रेष्ठ मानावा लागतो. चौदा वर्षे उपोषण व निद्रात्याग करून लक्ष्मणाने श्रीरामचंद्रसेवा केली हे प्रसिद्ध आहे. तसेच भारताने अयोध्येचे राज्य भोगावयास मिळाले असतानाही सर्वस्वी त्याचा त्याग करून, नंदिग्रामी राहून, श्रीरामचंद्राच्या पादुकांची अखंड सेवा करून, श्रीरामचंद्राच्या पुनरागमनाची वाट पाहत राहिला ही सामान्य गोष्ट नाही. हा एक दास्य भक्तीचाच प्रकार आहे.

भक्तिमार्गात दास्यासक्तीत भगवद्दास्याप्रमाणे संतदास्याचाही अंतर्भाव होतो. भगवद्भक्त सेवा ही महत्त्वाची मानली आहे भगवंतालाही आपल्या भक्तीपेक्षा आपल्या भक्तांची भक्ती करणारे अधिक प्रिय वाटतात. श्रीकृष्ण सांगतात,

**ये मे भक्तजना पार्थ न मे भक्ताश्च ते जनाः ।**
**मद्भक्तानां च ये भक्तास्ते मे भक्ततमा मताः ।।**

श्रीकृष्ण सांगतात, 'अर्जुना ! जे माझी भक्ती करतात ते खरे माझे भक्त नाहीत, तर माझ्या भक्तांचे जे भक्त आहेत ते भक्ततम असे मी मानतो.'

**सख्यासक्ति** :

कित्येक भक्त भगवंताला सखा, मित्र, सुहृद मानून त्याच्यावर प्रेम करतात, ही सख्यासक्ती होय. दास्यसक्तीपेक्षा या सख्य भक्ती करणाऱ्यांचा अधिकार मोठा आहे दास्यभक्तीत भगवान व भक्त यांच्यामध्ये उच्च-नीच-भावात्मक अंतर असते. ते सख्य भक्तीमध्ये राहात नाही. तो देवाच्या बरोबरीने राहातो. किंबहुना देवही त्याला आपल्या बरोबरीने मान देतो. जसे भक्तवर्य अर्जुनाला श्रीकृष्णानी गीताकथन प्रसंगी, 'भक्तोऽसि मे सखाचेति' (४–३), 'इष्टोऽसि मे दृढमिति' (गी. १८–६४), असे स्पष्ट म्हटले आहे. यावरील ज्ञानेश्वर महाराजांचे व्याख्यान पाहा,

हें जीवीचें निजगुज । परी केवीं राखो तुज ।
जे पढियेसी तू मज । म्हणऊनियां ।। २८ ।।

तू प्रेमाचा पुतळा । भक्तीचा जिव्हाळा ।
मैत्रियेची चित्कळा । धनुर्धरा ॥ २९ ॥ ज्ञा० ४

तसेच व्यासशिष्य संजय अर्जुनाच्या सख्यत्वाचे कीती वर्णन करीत आहे ते पाहण्यासारखे आहे. श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या मुखाने तो भाव ऐकू. ' सजय धृतराष्ट्रास म्हणतो, 'अहो महाराज, मला हाच विस्मय पुन:पुन्हा वाटतो की, लक्ष्मीपेक्षा कोणी भाग्यवान आहे काय ? अथवा खुणेने भगवद्वर्णन करण्यात श्रुतीपेक्षा कोण श्रेष्ठ आहे ? सेवकपण शेषाचे अंगी किती तरी आहे. योगीतर अष्टौप्रहर याचे ध्यान लावून बसलेले असतात. तसेच गरुडासारखा अखंड सेवा करणारा कोण आहे ? पण आज असा प्रकार आहे की हे सर्व देवापासून दूर सारले गेले. ज्या दिवसापासून पाडव आले तेव्हापासून सर्व कृष्णसुख त्याच्याच केंद्रात एकत्रित झाले आहे. त्यातल्या पाचातही श्रीकृष्ण अर्जुनाच्या एवढ्या ताब्यात गेला आहे की एखाद्या कामुकाला त्याची स्त्री जशी आपल्या पूर्ण ताब्यात ठेवते त्याप्रमाणे. जास्त काय सांगावे शिकविलेले पाखरूही एखाद्यावेळी बोल म्हटले तर बोलणार नाही, क्रीडामृगही चाल म्हटल्याबरोबर चालणार नाही, पण भगवान अर्जुनाच्या पूर्ण ताब्यात गेला आहे. आज संपूर्ण परब्रह्माचा आनंद भोगण्याचे भाग्य याच्या नेत्रास प्राप्त झाले आहे. अर्जुनाच्या मुखातून निघालेला प्रत्येक शब्द हा भगवान झेलत आहे. हा रागावला तरी तो राग श्रीकृष्ण सहन करतो, रुसला तर याला समजावण्याचा प्रयत्न करीत असतो. आश्चर्य हे की या देवाला अर्जुनाचे वेडच लागले आहे की काय असे वाटते. ' (ज्ञानेश्वरी अ. ११ ओ० १६५–७२ चा भावार्थ.)

सख्यासक्तीत उभयता मित्रामध्ये परस्पर आकर्षण असते, त्यात स्वार्थ, लोभ, मत्सर, इत्यादि विकाराना यत्किंचित थारा नसतो. तसेच एकमेकाकरिता एकमेक संपूर्ण त्यागास सिद्ध असतात श्रीकृष्ण अर्जुनास म्हणतात,

अर्जुना तुझेनि वेधे । मियां देवपणाची विरुदें ।
साडिली गा आधे । सगळेनि तुवां ॥ ज्ञा. १८

भारतीय युद्धात संपूर्ण यादवसेना कौरवाना देऊन श्रीकृष्ण आपण अर्जुनाचे सर्वप्रकारे रक्षण करण्याकरिता त्याच्या रथाचे सारथ्य करण्यास प्रवृत्त झाले, धर्मराजाच्या यज्ञात उष्ट्या पत्रावळी काढल्या, हे सख्यत्वाचे श्रेष्ठ उदाहरण होय.

अर्जुनाप्रमाणेच सख्यासक्तीमध्ये भक्तवर्य उद्धवाचाही अधिकार मोठा होता. भगवान श्रीकृष्ण प्रत्यक्ष उद्धवासच सागत आहेत.

**न तथा मे प्रियतम आत्मयोनिर्न शङ्करः ।**
**न चसङ्कर्षणो न श्रीर्नैवात्मा च यथा भवान्** ॥ भाग० ११–१४–१५

' हे उद्धवा ! तू जसा मला अतिशय आवडणारा आहेस, तेवढे प्रिय ब्रह्मदेव, शकर, बलराम, लक्ष्मी अधिक काय माझा आत्माही मला नाही. ' भागवत एकादश

स्कंधात उद्धवाने ही आपल्या व श्रीकृष्णाच्या सख्यत्वाचे अनेक स्थळी वर्णन केले आहे.

या सख्यासक्तीचे गोकुळातील गोपाळ हे उत्कृष्ट उदाहरण होय. ते सर्व श्रीकृष्णाबरोबर क्रीडा करणारे व ज्यांचे जीवन कृष्णमय झाले आहे असेच होते. श्रीकृष्णावर त्याचे निरतिशय प्रेम होते. श्रीकृष्णाशी बरोबरीच्या नात्याने ते अनेक खेळ यमुनेच्या वाळवंटात खेळत असत. ?देवावर डाव आला तर भांडून त्याला डाव देण्यास भाग पाडीत असत. कित्येक वेळा आपल्या गायीही त्याला राखावयास लावीत असत. 'आली द्यावी डाई। धांवे वळत्यासवे गाई ॥ तु०॥' प्रत्यक्ष ब्रह्मदेव त्या गोपालाच्या सख्यपूर्ण भाग्याचे वर्णन करतात,

**अहोभाग्यमहोभाग्यं नंदगोपव्रजौकसाम् ।**
**यन्मित्रं परमानंदं पूर्णं ब्रह्मसनातनम् ॥** भाग० १०–१४–३२

'पूर्णब्रह्मसनातन परमात्मा ज्याचा मित्र आहे त्या गोपबालकाचे भाग्य केवढे श्रेष्ठ आहे?' या गोपाळाचे श्रीकृष्णावर किती प्रेम होते त्याचे वर्णन होणे कठिण आहे. जेव्हा श्रीकृष्णानी आपल्या ऐश्वर्यमयरूपाने डाव्या हाताच्या करांगुलीवर गोवर्धन पर्वत धारण केला होता तेव्हाही त्या गोपाळांना हा आपला बालसखाच वाटत होता. ते कृष्णाजवळ गेले व त्याला काय म्हणाले, त्याचे वर्णन भक्तीरसामृतसिंधूत केले आहे.

**उन्निद्रस्य ययु स्तवात्र विरतिं सप्तक्षपास्तिष्ठतो ।**
**हन्त श्रान्त इवासि निक्षिप सखे श्रीदामपाणौ गिरिम् ॥**
**आधिर्विध्यति नस्त्वमर्पय करे किंवा क्षणं दक्षिणे ।**
**दोष्णस्ते करवाम काममधुना सव्यस्य संवाहनं ॥**

भ. र सि. प. ल. ९

गोपाळ श्रीकृष्णास म्हणतात, 'मित्रा! तू झोपेचाही त्याग करून सात दिवस सारखा उभा आहेस. तुला किती कष्ट होत असतील? तू थकल्यासारखा दिसतोस. आता परिश्रम करू नकोस. तो पर्वत श्रीदामाच्या हातावर ठेव किंवा आमच्या हातावर ठेव. तुला पाहून आम्हाला फार दुःख होत आहे. निदान थोड्या वेळाकरिता तो पर्वत उजव्या हातावर घे म्हणजे आम्ही तुझ्या दुखत असलेल्या डाव्या हाताचे संवाहन करू. म्हणजे त्याचे दुखणे थोडे कमी होईल.' केवढे प्रेम! केवढा मित्रभाव!'

गोकुळातील या सख्यासक्त भक्ताच्या चार श्रेणी कल्पिल्या आहेत.

सुहृदश्च सखायश्च तथा प्रियसखाः परे।
प्रियनर्मवयस्याश्चेत्युक्ता गोष्ठे चतुर्विधाः ॥ भ० र० सि० ३-१०

सुहृद्, सखा, प्रियसखा, प्रियनर्मसखा. जे श्रीकृष्णापेक्षा थोडे वयाने मोठे पण मित्रभावाने बरोबर राहणारे ते सुहृद् म्हटले जात. त्यांच्या ठिकाणी वात्सल्य-मिश्रित सख्य असते. ते श्रीकृष्णाचे रक्षण करण्यास सदैव तत्पर असत. या श्रेणीत सुभद्र, मंडलीभद्र, भद्रवर्धन, गोभट, इंद्रभट, भद्राग, वीरभद्र, विजय, बलभद्र इत्यादी गोपाळांची गणना केली जात असे. गाई घेऊन श्रीकृष्ण वनात निघाले म्हणजे यशोदेने याना सांगावयाचे की तुम्ही माझ्या कृष्णावर लक्ष ठेवा, त्याचे रक्षण करा. यांना सुहृत् संज्ञा आहे.

दुसरे सखा श्रेणीचे गोपाबालक श्रीकृष्णापेक्षा वयाने थोडे लहान असूनही सदैव बरोबर असत. विशाल, ओजस्वी, देवप्रस्थ, वरूथप, कुसुमापीड, मणिबंध करंधम इत्यादी त्याची काही नावे सागितली जातात. हे वनात तसेच गोकुळात बरोबर राहून श्रीकृष्णाच्या सेवेत सदैव तत्पर असतात. खेळातही बरोबर असतात. श्रीकृष्णसेवेचे सुख सतत प्राप्त व्हावे असे त्याना वाटते. यामध्ये देवप्रस्थ नामक गोपाळ हा श्रेष्ठ होता असे वर्णन आढळते.

प्रियसखा या श्रेणीत श्रीकृष्णाच्याच वयाचे व केवल विशुद्ध सख्यभावाने राहणारे श्रीदामा, वसुदामा, किकिणी, कृष्णांशु, भद्रसेन, पुडरीक, विटंकाक्ष, कलविंक इत्यादी होत. हे कृष्णाबरोबर कुस्ती खेळणे, प्रत्येक खेळात बरोबरीने अथवा वरचढ राहावे अशी इच्छा करणारे असत. यामध्ये श्रीदामा श्रेष्ठ होता. हे नेहमी श्रीकृष्णापुढे नाना प्रकारचे हावभाव, लीला करून त्याला संतुष्ट ठेवण्याचा प्रयत्न करीत असत.

प्रियनर्मसखा या श्रेणीचे सखे वरील प्रियसखा या श्रेणीतील गोपाळांपेक्षा अंतरंग असत. हे श्रीकृष्णाच्या अत्यन्त एकान्तिक रहस्यातही सम्मिलित राहणारे होते. या श्रेणीत सुबल, उज्ज्वल इत्यादिकाची गणना होते. ही गोपाळांची नावे भक्तिरसामृत सिंधु या ग्रंथात सांगितली आहेत.

या गोपाळांचा सख्यभाव पाहून आश्चर्य वाटते. यांचे श्रीकृष्णावर जीवा-पेक्षाही अधिक प्रेम असे. हृदय सदा स्नेहाने भरलेले असे, म्हणूनच प्रत्यक्ष ब्रह्मदेवा-सारखे यांच्या सख्य भक्तीचे वर्णन करतात. हा सख्यभाव फार दुर्लभ आहे, क्वचित् भाग्यवान भक्तांच्या वाट्याला येतो.

**कान्तासक्ति** :

कित्येक भक्त कान्तभावाने भगवंताची उपासना करीत असतात. नारदांनी मागे सूत्र सहासष्टमध्ये नित्यदास, नित्यकान्ताभावनेने प्रेम करावे असे म्हटलेच आहे. यासच मधुरभावात्मक रती असे म्हटले जाते. आपल्या अंगी स्त्रीभाव कल्पून भगवत्स्वरूपी पुरुष भावच केवळ नव्हे तर पतिभाव, कान्तभाव ठेवून जी प्रीती, भक्ती केली जाईल तिला कांतासक्ती असे म्हटले जाते. भगवत्स्वरूपात मोहित

होऊन अनेक प्रकारच्या स्त्रियानी पतिरूपाने याची प्राप्ती व्हावी अशी तीव्र इच्छा धारण करून कित्येकांनी पूर्व जन्मात घोर तपही केले, त्यानंतर भगवत्कृपेने त्यांना कृष्णावतारात तो लाभ मिळाला. अशा कथा पद्मपुराण, गर्गसंहिता इत्यादिकातून आढळतात. गर्गसंहिता गोलोकखंडप्रकरणामध्ये अशाप्रकारे कांतभावाचा अंगीकार करणाऱ्या श्रुतिरूपी गोपी, रामावतारावर मोहित झालेल्या मिथिलानगरवासी-स्त्रिया, कोशलनगरवासी स्त्रिया, अयोध्यावासी स्त्रिया, पंचवटीनिवासी भिल्लस्त्रिया, यज्ञसीतास्वरूपा गोपी, रमादेवीसहचरी, लक्ष्मीसख्या गोपी, देवताआज्ञापित कन्या, देवांगनारूपी गोपी, जालंदरनगरवासी स्त्रिया, बर्हिष्मती नगरवासी स्त्रिया, ऋषिस्वरूपा गोपी इत्यादिकांची संक्षिप्त माहिती सापडते. भक्तीशास्त्रात या मधुराररतीस म्हणजे कांतासक्तीस फार महत्त्वाचे स्थान आहे. कांतभावाने भक्ती करणाऱ्यांना भक्तिशास्त्रात ‘ हरिवल्लभा ’ असे म्हणतात. साहित्यशास्त्रात ‘ नायिका ’ असे म्हटले जाते. त्यांचे दोन प्रकार कल्पिले आहेत स्वकीया आणि परकीया. उज्ज्वलनीलमणि या भक्तिशास्त्रावरील ग्रंथात यांच्या खालीलप्रमाणे व्याख्या आहेत.

**करग्रहविधिं प्राप्ताः पत्युरादेशतत्पराः ।।**
**पातिव्रत्यादविचलाः स्वकीयाः कथिता इह ।।**

‘ ज्यांचा योग्य अशा पुरुषाशी पाणिग्रहणविधी शास्त्रमर्यादेनुसार झाला आहे, ज्या पतीच्या आदेशाप्रमाणे वागण्यात तत्पर असतात, पातिव्रत्यधर्मापासून मनानेही विचलित होत नाहीत अशाना ‘ स्वकीया ’ असे म्हटले जाते. उदाहरणार्थ सीतादेवी, रुक्मिणीदेवी, सत्यभामादि ज्या द्वारकेमध्ये श्रीकृष्णाच्या षोडशसहस्र स्त्रिया होत्या त्याना स्वकीया म्हणावे.

परकीया नायिकेचे खालीलप्रमाणे लक्षण केले आहे.

**रागेणैवार्पितात्मानो लोकयुग्मानपेक्षिणा ।**
**धर्मेणास्वीकृता यास्तु परकीया भवन्ति ताः ।।**
**कन्यकाश्च परोढाश्च परकीया द्विधा मताः । –उज्ज्वलनीलमणि**

‘ अंतःकरणातील प्रेमामुळे ज्यांनी आपला आत्मा त्याला समर्पण केला आहे लौकिकाची अपेक्षा न करणाऱ्या, विवाहादि संस्कारद्वारा ज्याचा स्वीकार केला गेला नाही त्यांना परकीया नायिका म्हणतात. त्यात कन्यका (अविवाहित) व परोढा दुसऱ्याशी ज्यांचा विवाह झाला आहे अशा द्विविध आहेत.’ साहित्यशास्त्रांत आणखीही त्यांचे अवांतर प्रकार सांगितले आहेत. वास्तविक भगवंतावर प्रेम करणाऱ्यांमध्ये हे प्रकार संभवणे शक्य नाही. कारण तो सर्वांचाच आत्मा, स्वकीय, आहे, त्याच्याहून वेगळे कोणास राहता येणे शक्य नाही. बिंबप्रतिबिंब भावाप्रमाणे

भगवंताचा व गोपिकांचा तादात्म्यभाव होता असे वर्णन आहे. भगवान श्रीकृष्णच ज्यांच्या विषयी,

**बल्लव्यो मे मदात्मिकाः** ।। भागवत १०-४६-६

असे उद्गार काढतो त्यांना परकीया कोण म्हणेल ? हे जरी सत्य आहे, तरी लौकिक दृष्टीने हा भेद कल्पिला आहे. ब्रह्मदेवानी जेव्हा गोकुळातील गोपाळ-वत्से चोरून एक वर्ष मायाशयानामध्ये ठेवली होती तेव्हा श्रीकृष्णच सर्वांचे वेष घेऊन होता. तेव्हां ज्यांनी कात्यायनी व्रत करून श्रीकृष्ण पती प्राप्त व्हावा असा वर मागितला होता त्या कन्यांची लग्ने त्या वर्षी ज्यांच्या ज्यांच्या बरोबर झाली ते सर्व गोपाळ कृष्णस्वरूपीच होते, म्हणजे श्रीकृष्णांबरोबरच त्यांचा विवाह झाला होता; म्हणून त्या सर्व परकीया नसून स्वकीयाच होत्या असेही भक्ति-शास्त्रीय ग्रंथात म्हटले आहे. स्वकीया-परकीया भेद वरवरचा आहे. त्या गोपिकांची कांतासक्ती फार श्रेष्ठ होती श्रीकृष्णाकरता त्यांनी सर्वस्वाचा त्याग केला होता. या विषयाचा विचार एकवीस-बाविसाव्या सूत्रविवरणात सविस्तर केला गेलाच आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज, नामदेवराय, तुकोबाराय इत्यादी सर्व संतांच्या अंबुला, सौरी, विरहिणीच्या अभंगातून ही कांतासक्ती पूर्णरूपाने आढळून येते. यात प्रेम-भक्तीची पराकाष्ठा असते.

**वात्सल्यासक्ति** :

ज्यांच्या महद्भाग्याने त्याच्या उदरी भगवंताने अवतार धारण केला अशा काही भाग्यवंताना हा आनंद प्राप्त झाला होता याकरिता त्यांनी अनंत वर्षे घोर तपश्चर्या केली होती. पुराणातून कश्यपअदिती, सुतपापृश्नि, मनुशतरूपा, दशरथ-कौसल्या, नंदयशोदा, वसुदेवदेवकी इत्यादिकांची नावे आढळतात. त्यातही गोकुळात यशोदा, नंद, रोहिणी, गोपिका यांना जो वात्सल्यरसाचा आनंद मिळाला तो फार अनिर्वचनीय होता. सर्व रसांनी परिप्लुत अनेक बाललीला श्रीकृष्णांनी केल्या त्याचा आनंद त्यांना मिळाला. नवनीतचौर्यलीला, मृद्‌भक्षणलीला, दामबंधन-लीला इत्यादिकांचे वर्णन शुकाचार्यांसारख्या मुक्तपुरुषांनी मुक्तकंठाने केले आहे. गोपीकांनी नाच म्हटले की त्यांच्या इच्छेप्रमाणे तो नृत्य करीत असे. कधी कधी भोळ्या बालकाप्रमाणे गा म्हटले की गात असे. काष्ठाच्या बाहुलीप्रमाणे तो त्यांच्या आधीन झाला होता. श्रीशुकाचार्य सांगतात की हा आनंद केवळ यशोदेलाच प्राप्त झाला. म्हणूनच 'धन्य ते यशोदा धन्य नंदराय ।' असे त्यांचे वर्णन संतांनी केले आहे. ही वात्सल्यासक्ति महान पुण्यात्म्यांच्याच वाट्यास येते.

**आत्मनिवेदनासक्ति** :

भक्तश्रेष्ठ प्रल्हादाने सांगितलेल्या नवविध भक्तीमध्ये आत्मनिवेदन ही शेवटची भक्ती आहे असे म्हटले आहे. 'आत्मनिवेदन' या शब्दातील आत्मा हा

शब्द महत्त्वाचा आहे. आत्मा शब्दाचे अनेक अर्थ केले जातात. गौण, मुख्य, मिथ्या-रूपाने आत्मा शब्द उपयोगात आणला जातो. कोणी अज्ञानी जीव देहालाच आत्मा म्हणणारे असतात. कोणी कर्तृत्वभोक्तृत्वादि धर्मयुक्त अंतःकरणासच आत्मा समजतात, कोणी क्षुधातृषादिधर्मवान प्राणासच आत्मा समजतात. बहुतेक जीवासच आत्मा समजणारे आहेत. देहादिकास आत्मा समजणारे त्या देहादिकांसच जीव समजणारे आहेत. पण कार्य, जड, परिच्छिन्न असा क्षणविनाशी संघात चेतन असा जीव कसा होईल ? गीतेमध्ये देही, शरीरी, जीव हा नित्य मानला आहे. असा हा जीवही स्वतंत्र नाही तोही परमात्म्याचा अंश आहे. अंश-अंशीचा तादात्म्यसंबंध असतो अंशास अधिष्ठान रूपाने सर्व पुरविणारा अंशीच असतो, म्हणून उभयतामध्ये उपास्य–उपासक–भाव असतो. पण अज्ञानामुळे जीव स्वतःस भोक्ता समजून हे सर्व माझे भोग्य आहे असे समजत असतो. एकदा तो स्वतःस भोक्ता, कर्ता समजू लागला की भोगसाधने देहेंद्रियादिकांचे ठिकाणी, त्यांच्या विषयाच्या ठिकाणी ममत्व बुद्धी ठेवतो. ते विषय प्राप्त होण्याकरिता अनेक शुभाशुभकर्मे करून पुन्हा त्यांची फले भोगण्याकरिता जन्ममरणात्मक संसाराचा अवलंब करीत असतो. मिठाचा खडा समुद्रापासून अलीकडे आला की त्याला सामान्य मोबदल्यात विकावे लागते, देशोदेशी हिंडावे लागते, दगडाखाली रगडून घ्यावे लागते अशी फजिती जीवाचीही होते तोच मिठाचा खडा पुन्हा समुद्रात जर आत्मसमर्पण करील तर त्याची दुर्गती करण्यास कोण समर्थ आहे ? ' सांडोनि मीठपणाचा लोभू ' मिठे सिंधुत्वाचा घेतला लाभू । तेवी अहं देऊनि मी शंभु । शांभवी झालो ।। (अनुभवामृत. प्र १) असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अनुभवामृतात म्हटले आहे आत्मनिवेदनाचे बीज या जाणिवेत आहे मागील सूत्रातून सर्वकर्मसमर्पण, सर्वकर्मत्याग, फलत्याग, द्वंद्वत्याग इत्यादी सांगितला आहे. पण कर्ता जीवही वेगळा राहिला तर अनन्यभक्ती संभवणार नाही. आत्मनिवेदन या पदातील निवेदन शब्दाचा समर्पण हा अर्थ आहे. आत्मसमर्पणात सर्व समर्पण येते. कारण सर्व जे काही असते ते आत्म्याकरिताच असते. आत्मा हा अंगी आहे व सर्व त्याचे अंग आहे हे ठरले म्हणजे मुख्य आत्माच समर्पित झाल्यास मग अन्य वेगळे राहील कसे ? ज्याची वस्तू त्याला देणे हा अर्पण शब्दाचा अर्थ आहे. भगवंताला सर्वस्व समर्पण करणे म्हणजे त्याच्याजवळ नाही म्हणून अथवा त्याला त्याची मोठी आवश्यकता आहे म्हणून नव्हे तर आपला आत्मा हाही त्याचाच अंश आहे, तो सच्चिदानंदघन आहे, त्याला आत्मार्पण करणे म्हणजे त्याच्याशी अनन्य होणे, आपणही आनंदरूप बनणे होय. या भावनेने आत्मार्पण होत असते. गंगा आपले सर्व जल समुद्राला समर्पण करते याचे कारण ते मुळातून सागरातूनच मेघाचेद्वारे आलेले असते, व त्याचे त्याला देण्यात मोठा लाभही हा असतो की तो समुद्र पुन्हा ते जल

गंगेला वर्षावाच्या निमित्ताने देत असतो. श्रीकृष्णभगवान अर्जुनास सांगतात,

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत**

**तत्प्रसादात्परां शांति स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम्** ॥ ६२॥

'अर्जुना ! मागील श्लोकात सर्वभूतमात्रांच्या हृदयात राहणारा जो ईश्वर त्यालाच सर्वभावाने शरण जा, त्याच्याच प्रसादाने परमशांती व शाश्वतस्थान प्राप्त करून घेशील ? (गीता. १८)

तया अहं वाचा चित्त अंग । देऊनिया शरण रिघ ।

महोदधी का गांग । रिघाले जैसे ॥ ज्ञा० १८–१३१९

आत्मनिवेदनरूप अनन्यशरणागती सांगणारा गीतेतील महत्त्वाचा श्लोक प्रसिद्ध आहे.

**सर्व धर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**

**अहं त्वा सर्व पापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः** ॥ ६६ ॥ गीता. १८

'अर्जुना ! सर्व धर्मांचा संपूर्ण त्याग करून मला एकट्याला शरण ये. मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन, शोक करू नकोस.' या श्लोकावरील महत्त्वपूर्ण व्याख्यानात श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.

पै आपलेनि भेदेविण । माझें जाणिजे जें एकपण ।

तयाची नांव शरण । मज येणें गा ॥ १३९८॥

जैसें घटाचेनि नाशें । गगनी गगन प्रवेशे ।

मज शरण येणें तैसें । ऐक्य करी ॥ १३९९ ॥

सुवर्णमणि सोनया । ये कल्लोळ जैसा पाणिया ।

तैसा मज धनंजया । शरण ये तू ॥ १४०० ॥ ज्ञा० १८

अशारूपाने जर अर्जुना तू मला शरण येशील तर भगवान म्हणतात,

जळीं पडिलिया लवणा । सर्वही जळ होय विचक्षणा ।

तुज मी अनन्यशरणा । होईन तैसा ॥ १४१४ ॥ ज्ञा० १८

या सर्व ओव्यांवरून आत्मसमर्पणरूप शरणागतीचे स्वरूप व माहात्म्य कळून यईल. खरा प्रेमीभक्त भगवंत हाच केवळ आपला आत्मा आहे त्याच्याविना माझे कोणत्याही प्रकारे अस्तित्वच नाही, मी किंवा माझे म्हणून जे आहे ते सर्व त्याचेच आहे म्हणून प्रसंगवशात सर्वस्व त्यालाच समर्पण करीत असतो. आत्मनिवेदन भक्तीकरिता भक्तश्रेष्ठ राजा बळीचा दृष्टांत दिला जातो. बळीने वामनास त्रिपादभूमीच्या निमित्ताने आत्मसमर्पण केले. पण त्याचा परिणाम वामनालाही बळीने प्रेमाने बांधून टाकले. त्यालाही बळीच्या द्वारावर द्वारपाळ म्हणून राहावे लागले. अनेक भक्तांनी आत्मनिवेदनभक्ती केली आहे, किंबहुना आत्मनिवेदनाविना खरी भक्ती होऊच शकत नाही.

**तन्मयतासक्ति :**

नारद महर्षींनी जे अकरा प्रकार दर्शविले आहेत त्यात तन्मयतासक्ति ही दहावी आहे. आत्मसमर्पणानंतर ज्या भगवत्स्वरूपी तो आत्मा सर्मपित केला गेला तत्स्वरूपी झाल्याविना तो राहील कसा ? 'तुका म्हणे लवण कळी । पडता जळीं ते ह्येये ॥'. मागे सत्तराव्या सूत्रात 'तन्मया:' असे नारदांनी सांगितलेच आहे. आत्मनिवेदनाचे पर्यवसान तन्मयतेत कसे होते हे श्रीकृष्ण भगवान उद्धवास सांगतात.

**मर्त्यो यदा त्यक्तसमस्तकर्मा निवेदितात्मा विचिकीर्षितो मे ।**
**तदाऽमृतत्वम्प्रतिपद्यमानो मयाऽऽत्मभूयाय च कल्पते वै ॥ ३४॥**

'मनुष्य जेव्हा समस्त कर्मांचा परित्याग करून मला आत्मनिवेदन (आत्मार्पण) करून टाकतो, तेव्हा माझ्याद्वारा सम्मानित होऊन अमृतत्वप्राप्तीपूर्वक माझ्याशी तादात्म्याला प्राप्त होतो.' ( भाग० ११-२९)

मागे पंचावन्नाव्या सूत्रामध्ये 'ते प्रेम प्राप्त झाल्यावर तो तेच पाहतो, तेच ऐकतो, तेच चिंतन करतो, तेच बोलतो, असे त्याच्या तन्मयतेचे स्वरूप सांगितले आहे. प्रमात तन्मयता कशी सहज सिद्ध होते हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी एका गौळणीच्या स्थितीवरून आपल्या अभंगातून सांगितले आहे.

दुडीवरी दुडी गौळणी साते निघाली । गौळणी गोरसु म्हणो विसरली ॥१॥
गोविंदु घ्या कोणी दामोदरु घ्या वो ॥ तव तव हासती मथुरेच्या वो ॥ २ ॥

तुकाराम महाराज याचाच अनुवाद करतात.

कोणी एक भुलली नारी । विकिता गोरसु घ्या म्हणे हरी ॥ १ ॥
देखिला डोळा बैसला मनी । तोचि वदनी उच्चारू ॥ २ ॥

ती गोपिका डोक्यावर दही, लोणी घेऊन मथुरेच्या बाजारास निघाली असता नंदाच्या अंगणात खेळत असलेल्या श्रीकृष्णास तिने पाहिले. तोच तिला तन्मयता प्राप्त झाली. कारण प्रेमाचा हा स्वभाव आहे. 'पाहिलिया वेध लावी । बैसे जीवी जडोनि ॥ तु० ॥' त्याचा परिणाम असा झाला की यमुनेच्या बाजारात जाऊन 'दही घ्या' 'लोणी घ्या' असे म्हणण्याऐवजी 'गोविंद घ्या दमोदर घ्या' असेच मोठमोठ्याने ओरडू लागली. ते ऐकून मथुरेच्या स्त्रिया हासावयास लागल्या. पण हिला त्याचे काय ?

भागवत दशमस्कंधामध्ये रासलीलाप्रसंगी श्रीकृष्ण अंतर्हित झाले तेव्हां गोपिकांना अत्यंत विरह झाला. वृक्षवल्लींना पशुपक्ष्यांना त्या विचारू लागल्या की तुम्ही श्रीकृष्णास पाहिले काय ? पण कोणीही त्यांना अनुकूल उत्तर देईना. अशा स्थितीत त्याला शोधत शोधत त्या दीन झाल्या. त्याच गाढ आवेशात भगवन्मय

होऊन त्या भगवल्लीलांचे अनुकरण करू लागल्या, असे वर्णन शुकाचार्यांनी विस्तृत केले आहे (भाग १०–३०). हा तन्मयतासक्तीचाच प्रकार होय.

निरखित निरखित गेलिये वो । पाहे तंव तन्मय झालिये वो ।।
उन्मनी मन निमाले वो । सावळें परब्रह्म भासले वो ।। ज्ञा. अ.

**परमविरहासक्ति** :

हा नारदोक्त अकरा प्रकारातील शेवटचा प्रकार आहे. सूत्र एकोणिसाव्यात नारदांनी स्वसंमत भक्तिलक्षण सांगतांना 'तद्विस्मरणे परमव्याकुलता' असेच म्हटले आहे. तसेच येथे 'परमविरहासक्ति' असे म्हणतात. भक्ताचा भगवंताशी संबंध आला की कोणत्याही अवस्थेत प्रेम असतेच. तो संबंध प्रेममयच असतो हे जरी खरे आहे तरी पूर्ण प्रेमाचा प्रकर्ष विरहातच असतो.

भक्तिशास्त्रांत भगवद्विषयक अनुराग मुख्यतः तीन प्रकारचा सांगितला आहे, पूर्वराग, मीलन, विरह. अनेक जन्मातील शुभकर्मांच्या संस्काराने, सत्संगतीने भगवत्कथा, लीलादिकांच्या श्रवणाने अंतःकरणात प्रेम निर्माण होते परमप्रेमास्पद भगवंताचा साक्षात्कार तर झाला नाही पण भेटीकरिता चित्त तळमळते आहे, अन्न पाणी विषयभोग काही आवडत नाही, रात्रंदिवस तेच ध्यान, चिंतन, तीच अहर्निश उत्कंठा लागली आहे या अवस्थेसच 'पूर्वराग' म्हणतात. अंतःकरणात अशी तळमळ निर्माण झाली असता तो भगवान दूर नाही. अंतःकरणाची अशी स्थिती झाली असता ज्यारूपाने त्याच्या भेटीची भक्ताने इच्छा केली त्या रूपाने भगवान तत्काल प्रगट होऊन भक्तास भेटतो. या अवस्थेस 'मीलन' असे म्हटले आहे. देवभक्तातील या मीलनाचे सुख अपूर्व असते. ते वर्णनातीत आहे. श्री तुकाराममहाराज आपल्या भगवद्दर्शनाचा, मीलनाचा, आनंद वर्णन करतात. 'माझे केले समाधान । रूप गोजिरे सगुण । निववीले मन । आलिंगन देऊनि ।।' 'भाग गेला शीण गेला । अवघा झाला आनंद ।।' सर्वच संताचे असे मीलनाच्या आनंदाच्या वर्णनाचे उद्‌गार आहेत. व्रजवासी गोपिकांच्या चरित्रातून भगवन्मीलनाचा परमोत्कर्ष पूर्णपणे दिसून येतो. रासलीला प्रसंगी गोपिकांना जे भगवत्सौख्य प्राप्त झाले तोच हा उत्कर्ष होय. प्रत्यक्ष श्रीकृष्णच त्या मीलनानंदाचे उद्धवापुढे वर्णन करून सांगत आहेत.

त्या गुह्याचे निजगुज । उद्धवा मी सांगेन तुज । महासुखाचे सुखभोज । मी अधोक्षज नाचिन्नलो ।। ते सुख गोपिका जाणती । की माझे मी जाणे श्रीपती । जे रासक्रीडेच्या राती । झाली सुखप्राप्ती सकळिकांसी ।। ते रासक्रीडेची राती । म्या ब्रह्मषण्मास केली होती । गोपिका अर्धक्षण मानिती । वेगीं का गभस्ती उगवला ।। जेथ माझा सुखकल्लोळ । तेथ कोण स्मरे काळवेळ । गोपिकांचे भाग्य प्रबळ । माझे सुख केवळ पावल्या ।। ए. भा, १२–१४४–६०.

हा मीलनाचा आनंद अनिर्वचनीय आहे हे स्वानुभवसौख्य भोगणारे धन्य होत.

तिसरा रागाचा प्रकार विरह हा आहे. हे प्रकार एक दुसऱ्याहून श्रेष्ठ आहेत. पूर्वरागाहून मीलन श्रेष्ठ व मीलनापेक्षाही प्रेमाची परिणती व पूर्णता विरहात असल्याने 'विरह' सर्वश्रेष्ठ मानला गेला आहे. वास्तविक ज्यांच्या निरातिशय प्रेमाने बांधला गेलेला भगवान तोही ज्यांच्या प्रेमाची अपेक्षा करीत असतो त्याचा आणि त्या प्रियभक्तांचा वियोग व्हावा कसा ? नारदपाञ्चारात्रागमात म्हटले आहे.

**नित्यमेव निमग्नस्ताः कृष्णप्रेमसमाधिषु ॥**
**न कदापि वियुज्यन्ते गोप्यो विरहभीरवः ॥**

'त्या गोपिका कृष्णप्रेमसमाधीत नित्य निमग्न अशा आहेत, त्या विरहाच्या भयाने केव्हाही श्रीकृष्णापासून वेगळ्या होत नाहीत.' विरह होण्यास वियोग कारण असतो. ज्यांची वृत्ती अखंड कृष्णाकार असते त्यांना वियोग होईलच कसा ? वियोग नाही तर विरह कसा होऊ शकेल ? अशी शंका कोणास येईल.

याचा विचार विदर्भातील प्रेमयोगी प्रज्ञाचक्षु साक्षात्कारी संत श्री गुलाबराव महाराज यानी आपल्या 'प्रेमनिकुञ्ज' नामक भगवत्प्रेमाचे श्रेष्ठत्व प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथात केला आहे. त्यानी वियोगाचे प्रथम काही प्रकार दर्शविले आहेत. स्वभावज वियोग. म्हणजे अनादिअविद्याप्रभावाने जीवास दृढ असे संसाराचे तादात्म्य होते त्यामुळे तो हृदयस्थ सच्चिदानंद स्वरूपाला विसरून संसारातच सुख मानून राहत असतो. या वियोगात वियोगाचे दुःखही जाणवत नाही. असा वियोग भक्तांना नसतो. त्यांची स्थिती 'तद्विस्मरणे परमव्याकुलतेति' या एकोणिसाव्या सूत्रात सांगितली आहे. हा नैमित्तिक वियोग म्हटला जातो. याचे सप्रेम व सापराध, असे दोन मुख्य प्रकार कल्पिले आहेत. गोकुळात श्रीकृष्ण गाईवत्स घेऊन वनात जात असत, त्या वेळी जो गोपिकांना वियोग तो सप्रेम म्हटला जातो. सायंकाळी श्रीकृष्ण परत येताच पुन्हा भगवद्दर्शनाचा आनंद त्यांना मिळत असे. सापराध वियोगात ते अपराध तीन प्रकारचे मानले आहेत. मानज, दैवज, प्रमादज. सत्यभामेने अभिमानाने श्रीकृष्णदान केले त्यामुळे श्रीकृष्ण नारदाबरोबर द्वारकेतून चालले. हा सापराध वियोग. अथवा रासलीला प्रसंगी त्या सर्व गोपिकांना मोठा अभिमान झाला असे शुकाचार्यांनीच म्हटले आहे.

एवं भगवतः कृष्णाल्लब्धमाना महात्मनः ।
आत्मानं मेनिरे स्त्रीणां मानिन्योऽप्यधिकं भुवि ॥ ४७ ॥

भाग १०-२९

'या प्रमाणे त्या रासलीला प्रसंगी भगवान् श्रीकृष्णाने त्या गोपींचे सर्व मनोरथ

त्यांच्या इच्छेप्रमाणे पूर्ण केले असता आपण आता या त्रिभुवनात सर्व स्त्रियांमध्ये श्रेष्ठ आहोत असा अभिमान त्या गोपींना झाला.' त्यांचा तो अभिमान दूर करून त्यांच्यावर अनुग्रह करण्याकरिता श्रीकृष्ण तेथेच गुप्त झाला असता अंतःकरण श्रीकृष्णप्रेमाने भरलेले असल्यामुळे त्यांना तो विरह सहन झाला नाही. यास 'मानज–अपराध' म्हटले आहे. दुसरा दैवज. दैवज अपराध म्हणजे देव वा ऋषी यांचा काही कारणामुळे कोप झाला असता त्यांच्या शापामुळे जो वियोग होतो तो. रुक्मिणीस दुर्वासशाप झाला होता की काही काळ तुला श्रीकृष्णवियोग होईल. तोही दैवज अपराध दोन प्रकारचा कल्पिला आहे. स्वापराध दैवप्रकोप आणि दैव-स्वभाव संकल्पामुळे होणारा कोप. रुक्मिणीचा अपराध नसताही किंवा अंबऋषीचा अपराध नसताही दुर्वासाच्या स्वभावामुळे त्यांचा कोप झाला व शाप दिला. यादवांना ऋषींनी शाप दिला तो त्या यादवांनी सांबाला स्त्रीवेष देऊन ऋषींना फसविण्याचा प्रयत्न केला त्यामुळे दिला. तो स्वापराध दैवप्रकोप म्हणावा. तिसरा प्रमादज. पुराणात वर्णन आढळते की कृष्णस्त्रियांचे मन कृष्णपुत्र सांबावर गेले. तेव्हा श्रीकृष्णानी त्यांना शाप दिला, तुम्हाला दुर्गती भोगावी लागेल. हाच प्रमादज अपराध होय. अशा अनेक कारणांनी भगवद्वियोग होऊ शकतो व अंतःकरणात प्रेम असल्यामुळे तो विरह दुःखास कारण होतो. हे सर्व अपराध भगवतकृपेने अथवा संतकृपेने दूर होतात. पण या वियोगजन्य विरहात प्रेम वाढतच असते. सूत्रामध्ये केवल विरहासक्ती न म्हणता 'परमविरहासक्ती' अशी शब्दयोजना आहे. त्याचेही तात्पर्य काय असावे हे पाहणे अवश्य आहे. विरहात तीव्रता असली तरी अनेक कारणांनी त्यात भेद उत्पन्न होतात असे श्री मधुसूदन सरस्वतीस्वामींनी आपल्या 'भक्तिरसायन' नामक ग्रंथात सांगितले आहे.

**विरहे यादृशं दुःखं तादृशी जायते रतिः ।**
**मृदुमध्याधिमात्रत्वाद् तत् विशेषोऽपि वक्ष्यते ॥ २–६० ॥**
**वैकुंठे द्वारकायां च श्रीमद्वृंदावने तथा ।**
**मृदुतीव्रा मध्यतीव्रा तीव्रतीव्राच सा क्रमात् २–६१ ॥**

'विरहात जसे दुःख प्रतीत होईल तशीच रती मानली जाते. त्याच्यात मृदु, मध्य व अधिकमात्रायुक्त असे भेद पडतात. वैकुंठ, द्वारका व वृंदावनामध्ये ही रती क्रमाने मृदुतीव्र, मध्यतीव्र व तीव्रतीव्र अशी अनुभवाला येते.

विरह हा केव्हाही दुःखोत्पादकच असतो तरी त्यात किंचित् तारतम्य असतेच. भक्तिशास्त्रकारांनी त्या विरहाचे ही भविष्यत्विरह, वर्तमानविरह, भूत-विरह असे तीन प्रकार कल्पिले आहेत. यामध्येही परस्पर उत्तरोत्तर उत्कृष्टता आहे. भावीविरह हा करुणोत्पादक असतो. त्यापेक्षा दुःखदायी वर्तमानविरह व भूतविरह हा तर सुखदुःखाच्या पराकाष्ठेच्या पलीकडे आहे. प्रथमतः आगामी

विरहाचा विचार करू. ज्याच्या संगतीत अगणित सुख भोगले, ज्याच्या संगतीचा कधीही वीट येणे शक्य नाही, ज्याच्यावर जीवापेक्षाही अधिक प्रेम केले त्याचा उद्या वियोग होणार ही कल्पना अंतःकरणात उत्पन्न झाल्याबरोबर हृदयांत जी एक-प्रकारची कालवाकालव, चिंता, खेद होतो या प्रकारास भावीविरह असे म्हटले जाते.

बळराम व श्रीकृष्ण यांना मथुरेस नेण्याकरिता अक्रूर गोकुळास आला आहे हे ऐकून सर्व गोपींना फारच दुःख झाले. त्याचे वर्णन शुकमुनी करतात की, 'काहींच्या हृदयाला या वृत्तामुळे धक्काच बसला. त्या दुःखाने सुस्कारे सोडू लागल्या, त्यांचे मुख म्लान झाले. काहीची तर कंकणे, वस्त्रे, वेण्याही गळून पडू लागल्या. कित्येक गोपी श्रीकृष्णध्यानात इतक्या मग्न झाल्या की त्यांच्या सर्व मनोवृत्ती नष्ट होऊन आत्मलोकी गेल्याप्रमाणे त्यांना या जगाचा विसर पडला (भाग. १०–३९). अशी अवस्था प्राप्त होणे हे भावीविरहाचे उदाहरण होय. प्रभू श्रीरामचंद्र वनवासास जाणार आहे हे ऐकल्याबरोबर अयोध्यावासी जनांची अशीच अवस्था झाली होती असे रामायणात वर्णन आहे.

वर्तमानविरह म्हणजे ज्याचा आतापावेतो समागम होता, ज्याच्या सान्निध्यात विविध प्रकारांनी सुख भोगले, जो प्राणापेक्षाही परमप्रिय आहे तो आपल्याला सोडून जाण्याकरता समोर उभा आहे, पुन्हा केव्हा भेट होईल हे निश्चित नाही अशावेळी जीवाची अवस्था कशी होईल ? डोंगर कोसळून तर पडत नाही ना ? शेकडो सुयाच कोणी टोचीत नाही ना ? अशा वेदना होतात. जलातून वेगळी करताना मासोळीची मरणासन्न स्थिती होते त्याप्रमाणे प्राण शरीरात आहे का नाही असा संशय निर्माण होतो, 'किंकर्तव्यमूढ' अशी अवस्था होते. हाच वर्तमानविरह होय. या नंतर भूतविरहाची अवस्था प्राप्त होते. प्रिय-तमाचा वियोग झाल्यानंतर त्याची आता पुन्हा भेट होईल का नाही, त्याच्याविना जगणेही कसे शक्य आहे, या अवस्थेस 'भूतविरह' म्हटले जाते. यांत आशानिराशा या दोहीचे संमिश्रण असते. जर पुन्हा त्याच्या भेटीची आशाच नसेल तर मग जगण्याची आवश्यकता तरी काय ? अशावेळी तो प्रेमी क्षणभरात आपल्या देहाचा त्यागही करून टाकील ! परंतु प्रियतमाच्या दर्शनाची आशा तर आहे, पण तो भेटत नाही. ती आशा केव्हा पूर्ण होईल किंवा नाही हेही निश्चित नाही. पण एक वेळ का होईना त्याची भेट अवश्य व्हावी याच एका तीव्र इच्छेने वियोगिनी आपले शरीर धारण करून राहिलेली असते. भगवान श्रीकृष्ण उद्धवास सांगतात,

**धारयन्त्यति कृच्छ्रेण प्रायः प्राणान्कथंचन ।**
**प्रत्यागमनसंदेशैर्बल्लव्यो मे मदात्मिकाः ॥** भाग. १०–४६–६

श्रीकृष्ण म्हणतात, 'उद्धवा ! त्या गोपी अतिशय कष्टाने आपले प्राण

धारण करीत आहेत. केवळ मी परत येऊन भेटणार आहे असे कळवल्यामुळेच त्या जिवंत आहेत. कारण त्यांचे अंत:करण केवळ माझ्याच ठिकाणी जडलेले आहे.'

हा भूतविरह अनेक प्रकारे क्लेशास कारण होतो. 'उज्ज्वलनीलमणि' या भक्तिशास्त्रावरील ग्रंथात या विरहाच्या मुख्य दहा अवस्था सांगितल्या आहेत.

**चिंताऽत्र जागरोद्वेगौ तानवं मलिनांगता ।**
**प्रलापो व्याधीरुन्मादः मोहो मृत्युर्दशा दश ।।**

चिंता, जागर, उद्वेग, कृशता, मलिनांगता, प्रलाप, व्याधी, उन्माद, मोह, मृत्यू या त्या दहा दशा विरहाच्या होत.

आपल्या प्रियतमाविषयीच आसनी, भोजनी, शयनी, सदैव चिंतन करीत राहणे, त्याविना अन्यविषयाला अंत:करणात स्थान न मिळणे या अवस्थेस चिंता म्हणतात श्री ज्ञानेश्वर महाराजांचे उद्‌गार पाहा,

पडले दूर देशी मज आठवे मानसी ।
नको नको हा वियोग कष्ट होताती जीवासी ।।
दिन तैसी रजनी झाली गे माय ।
अवस्था लाऊनी गेला अजुनी कां नये ।।

निद्रा ही नेत्रात येते. नेत्र जर श्रीमुख पाहण्यास सारखे टपलेले असले तर निद्रा येणार कोठून ? विरहात चित्त अस्वस्थ असते मग झोप येणार कशी ? याला जागर अवस्था म्हणतात. अशा अस्वस्थ स्थितीत एका गोपीचा थोडा डोळा लागला व तिला स्वप्न पडले. त्यात श्रीकृष्णच स्वप्नात आला, तो अनुभव एका सखीला ती सांगू लागली असता ती सखी म्हणते,

**याः पश्यन्ति प्रियं स्वप्ने धन्यास्ता सखि योषितः ।**
**अस्माकं तु गते कृष्णे गता निद्रापि वैरिणी ।।**

'त्या स्त्रिया धन्य आहेत की ज्यांना स्वप्नात का होईना आपल्या प्रियतमाचे दर्शन घडते, माझ्या भाग्यात तर तेही सुख नाही माझी वैरिणी निद्रा ही श्रीकृष्णाबरोबरच निघून गेली.' विरहदु:खात निद्रा येऊच शकत नाही. तुकाराम महाराज या अवस्थेचा अनुभव सांगतात,

स्वाद क्षीण देहभान निद्राखंडण । पडिले तटस्थ उन्मळित लोचन ।
अवघे विसाऊन उरले ते चरण । तुका म्हणे दर्शनापे आलें जीवन वो।।

याच्या पुढची पायरी उद्विग्नता ही आहे. हृदयात जे अत्यंत असमाधान म्हणजे कोणतीही भावना टिकून न राहणे, त्या स्थितीस उद्वेग म्हणतात.

तानव म्हणजे कृशता. विरहजन्य चिंता, उद्वेग यामुळे खाणेपिणे सहजच वर्ज होते. त्यामुळे शरीराची जी स्थिती होते तिला कृशता म्हणतात. सीतादेवींच्या या अवस्थेचे वर्णन एकनाथ महाराज करतात.

त्यजिले अन्नजीवन । त्यजिले फळ भोजन । त्यजिले भोग हवन । श्रीरघुनंदन वियोगे ।। त्यजिले वस्त्रालंकार । त्यजिले अभ्यंग परिकर । माथा वळला जटाभार । वल्कलांबर परिधान ।। रुधिर शोषिले समस्त । मांस आटिले जेथीचे तेथ । चर्म झाले अस्थिगत । श्रीरघुनाथवियोगे ।। –भावार्थ रामायण. यु. कां. ६७.

शरीराकडेच दुर्लक्ष झाल्याने किंवा देहाची शुद्धीही नसल्याने शरीरावर जे मालिन्य येते, त्यास मलिनांगता म्हटले जाते.

प्रलाप ही एक विरहप्रेमातील श्रेष्ठ भूमिका आहे. विरहजन्य शोकाच्या आवेशात आपला आणि इतरांचा विसर पडतो, चित्त एकाच भावनेने भरलेले असते. दुसरी भावनाच त्यांत नसते. म्हणून ' अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी ' या न्यायाने वाणीवाटे तेच शब्द निघू लागतात. चित्ताची स्थिरता नसल्यामुळे त्यात सुसंबद्धता नसते. एखाद्या भ्रमिष्ट व्यक्तीच्या भाषणात जसा एकसूत्रीपणा नसतो तशीच विरही व्यक्तीच्या बोलण्यातही सुसूत्रता नसते. या अवस्थेस प्रलाप म्हणतात. रासलीला प्रसंगी श्रीकृष्ण गुप्त झाल्यानंतर गोपिकांना जो विरह झाला त्यावेळी त्या वृक्ष, पशू, पक्षी याच्याशी बोलू लागल्या, त्यांना विचारू लागल्या तुम्ही कृष्ण कोठे पाहिला काय ? तुकाराम महाराज एका गोपीच्या प्रलापाचा अनुवाद करतात,

पडली भूली धांवती सैराट । छंद गोविंदाचा चोजवीती वाट ।
मार्गें सारूनि सकळ बोभाट । वंदी पदांबुज ठेऊनि ललाट वो ।।
कोणी सांगा या गोविंदाची शुद्धी । होता वाहिला लपाला आता खांदी
कोठे आड आली हे देहबुद्धि । धावा आळवी करुणा कृपानिधी वो ।।

शरीरात कोणत्याही कारणाने होणाऱ्या वेदनेस व्याधी असे म्हणतात. विरहात ही व्याधी होते, संताप होतो, म्हणून त्यास विरहज्वर असेही म्हटले जाते ' अभीष्टसंगमाभावाद्व्याधि: संतापलक्षण: ।' इच्छित विषयाचा लाभ न झाल्यामुळे जो संताप होतो त्यास येथे व्याधी म्हटले आहे. हा कोणत्याही सौम्य उपायाने दूर होत नाही. ज्ञानेश्वर महाराजांचे या भूमिकेवरील उद्‌गार पहा,

कृष्णें वेधिली विरहिणी बोले । चंद्रमा करितो उबारा गे माये ।। १ ।।
न लावा चंदनू न घाला विजणवारा । हरीवीण शून्य शेजारू गे माये ।। २ ।।
नंदनंदनू घडिघडि आणा । तयावीण न वजती प्राणा वो ।।
चंदनाची चोळी माझें सर्व अंग पोळी । कान्हो वनमाळी वेगीं भेटवा कां ।।

सर्वच संतांचे असे उद्‌गार सापडतात. श्री राधादेवी ललितेला आपल्या विरहज्वराचे वर्णन करून सांगत आहे,

**उत्तापी पुटपाकतोऽपि गरलग्रामादपि क्षोभणो ।**
**दम्भोलेरपि दु:सह: कटुरलं हृन्मग्न शल्यादपि ।**

**तीव्रः प्रौढविषूचिकानिचयतोऽप्युच्चैर्ममायं बली ।**
**मर्माण्यद्य भिनत्ति गोकुलपतेर्विश्लेषजन्मा ज्वरः ।।**

'जो विरहज्वर सुवर्णाच्या तप्तरसापेक्षाही अधिक तापकारी आहे, कालकूट विषापेक्षाही अधिक क्षुब्ध करणारा आहे, वज्रापेक्षाही अधिक दुःसह आहे, हृदयात शिरलेल्या तीक्ष्ण बाणापेक्षाही वेध करणारा आहे, उग्रविषूचिकासमूहापेक्षाही अधिक तीव्र आहे, तो हा श्रीकृष्णवियोगजन्यज्वर माझ्या मर्मस्थानाला वेध करीत आहे.'

याच्या पुढची अवस्था 'उन्माद' ही आहे. सर्वसामान्य व्यावहारिक क्रिया व्यवस्थितरूपाने ज्यावेळी होऊ शकत नाहीत त्या वेळी त्या विरह स्थितीत विरहिणीकडून अव्यवस्थित व विचित्र चेष्टा घडतात, त्यात सुसूत्रता नसते, परिणामाकडे दृष्टी नसते. या अवस्थेस उन्माद असे म्हणतात. याच अवस्थेचे वर्णन तुकाराम महाराज एका गोपीचा अनुवाद करून करतात,

विरहतापें फुंदे छंद करिते जाती । हा गे तो गे सावधान सर्वेचि दुश्चिती । न सांभाळुनि अंग लोटी पाहे भोंवती । वेगळीच पडों पाहे कुळाहूनि याति ।। खुंटलीसी जाली येथे अवघियाची गती । आपली परावी कोण नेणे भोंवती । त्यांची नांवें बोभे अहो अहो श्रीपती । नवलाव हा येरां वाटोनिया हासती ।। बाहेरीच धांवें रानां न धरीच घर । नकळे बंधना जाला तेणें संचार । विसरोनि गेली सासुरे की माहेर ।।

उन्मादाचे स्पष्टस्वरूप वरील अभंगावरून लक्षात येईल.

या उन्मादापुढची अवस्था मोह ही आहे. मोहाचे लक्षण खालीलप्रमाणे भक्तिरसामृतसिंधूमध्ये केले आहे.

**मोहो हृन्मूढता हर्षाद्विश्लेषाद्भयतस्तथा ।**
**विषादादेश्च तत्र स्याद्देहस्य पतनं भुवि ।।**
**शून्येंद्रियत्वं भ्रमणं तथा निश्चेष्टतामयः** ।।४-३९

'अंतःकरण कार्याकार्यविवेक शून्य मूढ बनणे म्हणजे मोह. तो हर्ष, विश्लेष, भय, विषादादिकांनी निर्माण होतो. देहपात होणे, इंद्रियव्यापार शून्य होणे, तशाच स्थितीत भ्रमण करणे, शेवटी निश्चेष्टता प्राप्त होणे ही मोहाची लक्षणे होत. विरहाच्या तीव्रतेत ही लक्षणे होतात, एक प्रकारे मूर्च्छा आल्यासारखी अवस्था होते.

विरहातील मृत्यू म्हणजे साक्षात् मृत्यू नसून मृत्युसदृश अवस्था प्राप्त होणे. अशा परमविरहात काही काल शरीर प्रेतवत् निश्चेष्ट बनून जाणे इतकेच नव्हे तर श्वासोच्छवासक्रियेतही प्रतिबंध होऊ शकतो. जिवंत असूनही मृतवत् स्थिती होते. अशा वेळी ज्याच्या वियोगामुळे ही अवस्था प्राप्त झाली. तोच येऊन स्पर्श करील

तर पुन्हा चेतना येते.

यांप्रमाणे विरहाच्या या प्रमुख दहा अवस्था आहेत. याचे पोटभेदही पुष्कळच आहेत, विस्तारभयास्तव ते देता आले नाहीत.

गोकुळवासी गोपिकाप्रमाणे वात्सल्यासक्त, दास्यासक्त, सख्यासक्त अशा गोकुळातील भक्तांनाही भगवान श्रीकृष्णाचा वियोग झाला होता व आजन्म त्यांनी तो विरह दु.ख सहन केला. भक्तवर्य उद्धवास श्रीकृष्णांनी गोकुळात संदेश देऊन पाठविले होते. गोपिकांची विरहव्यथा तर त्यांनी पाहिलीच पण श्रीकृष्णसखे गोपाळ, त्यांचीही अवस्था भगवद्विरहाने कशी शोचनीय झाली होती त्याचे वर्णन तेथून परत आल्यानंतर श्रीकृष्णाजवळ केले. रूप गोस्वामींच्या शब्दातून ते आपण ऐकू उद्धव सांगतो,

**प्रपन्नो भांडीरेऽप्यधिक शिशिरे चण्डिममरं ।**
**तुषारेऽपि प्रौढिं दिनकरसुता स्रोतसि गतः ।।**
**अपूर्वः कंसारे सुबलमुखमित्रावलिमसौ ।**
**बलीयानुत्तापस्तव विरहजन्मा ज्वलयति ।।**

' हे श्रीकृष्ण ! तुमच्या विरहाची भडकलेली अपूर्व ज्वाला तुमचे सखे सुबल आदि गोपालांना रात्रंदिवस जाळीत आहे. ते जेव्हा शीतल भांडीर वटवृक्षाच्या छायेत जातात तेव्हा ती ज्वाला अति उग्रतर रूप धारण करते, जेव्हा ते यमुनेच्या हिमशीतल धारेत प्रवेश करतात तेव्हा त्या ज्वालेचा चमत्कार आणखीही वाढतो, तेव्हा त्यांनी शांत होण्याला कोठे जावे ?

**त्वयि प्राप्ते कंसक्षितिपतिविमोक्षाय नगरीं**
**गभीरादाभीरावलितनुषु खेदादनुदिनम् ।**
**चतुर्णां भूतानामजनि तनिमा दानवरिपो**
**समीरस्य घ्राणाध्वनिपृथुलता केवलमभूत् ।।**

' श्रीकृष्णा ! तुम्ही तर कंसाच्या मोक्षाकरता आपल्या मित्रांना सोडून या मथुरानगरीत निघून आला. तिकडे गोकुळात त्यांची काय दशा आहे तिचा विचार केला आहे काय ? गोपाळांचे गंभीर दुःख त्यांच्या शरीराला खाऊन टाकीत आहे. पाहा तर खरे, आता त्यांच्या शरीरातील चार भूते, पृथ्वी-आप-तेज-आकाश, ही किती कमी झाली आहेत ? फक्त दिसतो तो प्राणवायु, जो नासिकामार्गाने फार वेगाने चालू लागला आहे. आता त्यांच्या मृत्यूला काही विलम्ब आहे असे वाटत नाही.'

**अनाश्रितपरिच्छदाः कृशविशीर्णरुक्षाङ्ककाः ।**
**सदा विफलवृत्तयो विरहिताश्छविच्छायया ।**

**विरायपरिर्वाजतास्तव मुकुन्द गोष्ठान्तरे ।**
**स्फुरन्ति सुहृदां गणः शिखरजातवृक्षा इव ।।**

' ज्यांच्या शरीरावर वस्त्र नाही, कृशातिकृश (रोड) झालेले, अस्ताव्यस्त, शरीरावर कांती राहिली नाही, तोंडातून एक शब्दही काढीत नाहीत, असे वाटते की पर्वतशिखरावर निष्कंप वृक्षच उभे आहेत. याचे कारण तुमचा विरह. त्यामुळेच हे जडप्राय झाले आहेत. ' शेवटी उद्धव सांगतो,

**कंसारे विरहज्वरोर्मिजलितज्वालावलीजर्जरा ।**
**गोपाः शैलतटे तथा शिथिलितश्वासाङ्कुराः शेरते ।**
**वारंवारमखर्वलोचनजलैराप्लाव्य तान्निश्चलान् ।**
**शोचन्त्यद्य यथा चिरं परिचयस्निग्धाः कुरंगा अपि ।।**

' हे कंसारे श्रीकृष्णा ! तुमच्या विरहतापाने उत्पन्न ज्वालांनी त्या गोपाळांना इतके जर्जर केले आहे की त्याच्या श्वासाचा अंकुरही आता क्षीण होत चालला आहे. ते पर्वताच्या खोलदऱ्यात निश्चेष्ट पडलेले आहेत. तसेच ते इतके निश्चल होऊ लागले आहेत की त्याचे चिरपरिचित हरिण वारंवार तेथे येऊन आपल्या नेत्रातील विपुल अश्रुधारांनी त्यांच्यावर सिंचन करूनही ते त्यांना उठवू शकत नाहीत तेव्हा ते हरिणही त्या गोपाळांकरिता शोक करीत असतात. '

हे परमविरहासक्तीरूप भक्तीचे चित्र होय. यात प्रेमचंद्राची पूर्णिमा गाठली जाते. कित्येक रागमार्गी भक्तांची तर ही भावना असते की, ते म्हणतात, प्रभूचा संगम म्हणजे संयोग आणि विरह यामध्ये तुलना केल्यास विरह हाच श्रेष्ठ वाटतो. कारण संयोगात आपला प्राणनाथ एकटाच प्रतीतीस येतो पण विरहात सर्व जगच तद्रूप होऊन जाते. हीच परमविरहासक्ति होय. या परमविरहासक्तीचा पूर्ण प्रकाश, भक्तिप्रेमाचे स्वरूप प्रदर्शित करण्याकरिता सूत्रकारानी ज्या व्रजगोपिकांचे उदाहरण घेतले आहे त्यांच्याच जीवनात, पडलेला दिसून येतो.

## सूत्र ८३

**इत्येवं वदन्ति जनजल्पनिर्भया एकमताः कुमारव्यासशुक-शाण्डिल्यगर्गविष्णुकौण्डिन्यशेषोद्धवारुणिबलिहनुमद्विभीषणादयो भक्त्याचार्याः ॥८३॥**

**अर्थ:**

लोकाच्या निंदास्तुतीच्या वल्गनेच्याबाबतीत निर्भय असणारे सनत्कुमार, व्यास, शुकमुनी, शाण्डिल्य, गर्गाचार्य, विष्णु, कौण्डिन्य, शेष, उद्धव, आरुणि, बलि, हनुमान, बिभीषण आदि भक्तिमार्गातील श्रेष्ठ आचार्यगण एकमताने असेच म्हणतात. (सूत्र एक्यांशीमध्ये सांगितल्याप्रमाणे भक्ती हीच श्रेष्ठ आहे, असेच म्हणतात.)

**विवरण :**

आपल्या भक्तिसिद्धान्ताच्या पुष्टीकरिता म्हणजे भक्तीच्या सर्वश्रेष्ठत्वाच्या सिद्धीकरिता पूर्वीच्या तसेच वर्तमानकालीन सर्व श्रेष्ठ श्रेष्ठ अशा भक्तिमार्गातील आचार्यांचे एकमत कसे आहे हे नामनिर्देशपूर्वक सागत आहेत. हे सांगत असता त्या भक्तीच्या आचार्यांना एक महत्त्वाचे विशेषण ' जनजल्पनिर्भयाः ' असे नारदानी सूत्रात दिले आहे. सहसा भक्तिमार्गाकडे प्रवृत्त होणारे क्वचितच असतात, कारण अंतःकरणातील विषयवासना नष्ट होत नाहीत. रजोगुण-तमोगुणाने मन व्यापल्यामुळे राजसतामस कर्माकडेच बहुतेकाची प्रवृत्ती असते. अनंत जन्मीच्या सुकृतानेच हरिभक्तीकडे मनुष्य वळतो. अशा भक्तिमार्गप्रवृत्तसाधकांचा उपहास करणारे लोक जगात पुष्कळ असतात. ते भक्ताचे जे उपास्य त्याचीही निंदा करतात. तसेच भक्तिमार्गाची, त्याग, वैराग्य इत्यादी साधनाचीही वितंडवादपूर्वक निंदा, उपहास करीत असतात. यासच नारदांनी ' जनजल्प ' असे म्हटले आहे. या जनजल्पाचा प्रकार एकनाथमहाराजांनी भागवताच्या टीकेत विस्ताराने सांगितला आहे.

यापरी अभिमानविदा । पापबुद्धीची दृढबाधा ।
सहजानुवादे सदा । साधुनिंदा अनुवादति ॥
जे कां हरीते आवडती । जे सदा करिती हरिभक्ती ।
त्यांते सदा उपहासिती । अनुवादती गुणदोष ॥
द्विज स्मरती हरिनाम । त्या नांव म्हणती अधर्म ।
ऐकोनिही नामसंकीर्तन सम्भ्रम । म्हणती हे परम महापाप ॥

ऐसा जो हरिनामाते निंदी । हरिकीर्तनी दुर्बुद्धी ।
तो खळ जाणावा त्रिशुद्धी । भजनापवादी दुर्जन ।।

ए. भा. ५. १०७–१०

तसेच दहाव्या अध्यायातही यांच्या मताचा अनुवाद केला आहे.

येथ ईश्वरूचि नाही फुडा । मा तो फळ देईल हा बोल कुढा ।
अद्वैतवादी मूर्ख गाढा । नागवी मूढा वैराग्ये ।।
गांव ठावो ना पदवी । तो मिथ्या ईश्वरू धरोनि जीवी ।
कर्मनैराश्य करवी । अथवा सांडवी कर्माते ।। ए. भा. १०–४०७,८

तसेच ज्ञानेश्वरीतही या तमोगुणीज्ञानयुक्त पुरुषाची वल्गना कशी असते याचा अनुवाद केला आहे.

ना ईश्वर पाहता आहे । तो भोगवी जरी हें होये ।
तरी देवचि खाये । विकोनिया ।।
गांवींचे देवळेश्वर । नियामकचि होती साचार ।
तरी देशींचे डोंगर । उगे का असती ।। ज्ञा. १८–५६९,७०

वाचकांस कल्पना यावी म्हणून जनजल्पाचा प्रकार कसा असतो तो दर्शविला आहे. तुकाराममहाराजांच्या अभंगातूनही लोकांच्या या वितंडवादाचा त्यांनाही कसा उपसर्ग होत असे हे त्यांनी पांडुरंगापुढेच सांगितले आहे.

कैसी करू आता साग तुझी सेवा । शब्दज्ञानें देवा नाश केला ।। आता तुझे वर्म न कळे अनंता । तुज न सांगता बुडू पाहे ।। स्नानसंध्या केली आचाराची नाशी । काय तयापाशीं म्हणती एक ।। बुडविली भक्ती म्हणती पाषाण । पिंडाचे पाळण स्थापोनिया ।। न करावी कथा म्हणती एकादशी । आचाराची नाशी मांडियली ।। न जावें देऊळां म्हणती देवघरीं । बुडविले या परी तुका म्हणे ।।

मागे त्रेसष्टाव्या सूत्रावरील विवरणात या लोकांची बडबड कशी असते, अनेक तर्क, कुतर्क, हेत्त्वाभास, वाक्याभास, युक्त्याभासाच्याद्वारा श्रद्धावान भाविकांचा बुद्धिभेद कसे करीत असतात हे सांगितले आहे. एवढेच नव्हे तर भक्तिमार्गाचे आचरण करणाऱ्याचा छळ, निंदा, उपहासही करतात. शक्य तो त्यांना त्या मार्गापासून परावृत्त करण्याचाही यथाशक्य प्रयत्न हे दुर्जन, अविश्वासी, पाखंडी, नास्तिके करीत असतात. एखादा सामान्य भाविक यांच्या या युक्तिवादाने कदाचित संशयात्माही होणे शक्य असते. पण श्रीनारद म्हणतात, खरे निष्ठावान अनन्यभक्त हे ‘जनजल्पनिर्भय’ असतात. म्हणजे आपल्या भक्तिप्रेमाचा यांचा अनुभव, ईश्वरभाव, एवढा प्रमाणसिद्ध असतो की ते अशा शुष्कतर्कवादाला, बडबडीला यत्किंचित भीत नाहीत.

भुंकती ती द्यावी भुंको । आपण त्यांचे नये शिको ।। १ ।।

भाविकांनी दुर्जनाचें । काही मानू नये साचें ।। २ ।। तु०

कित्येक भक्त याचेपासून दूर राहतात तर कित्येक यांच्या तर्काला तर्कानेच उत्तरे देऊन यांच्या नास्तिकमताचे सप्रमाण, सोपपत्तिक खंडण करून आपल्या प्रबल निष्ठेच्या जोरावर अशा नास्तिकांनाच आस्तिक, श्रद्धावान भक्त बनवू शकतात. संतचरित्रातून अशी अनेक उदाहरणे आपल्याला आढळतात. 'तुका म्हणे खळ। होती क्षणेचि निर्मळ।,' असा त्यांचा अधिकार असतो. ज्याची निष्ठा खरी आहे तो कोणालाही भीत नाही. तो निर्भय असतो.

आम्हां भयचिंता नाही धाक । जन्ममरण काहीं एक ।
झाला इहलोकी परलोक । आले सकळिक वैकुंठ ।। तु०

जेथे भक्त काळालाही भीत नाही तेथे या सामान्य जनजल्पाला, या क्षुद्रलोकांच्या तर्कदुष्ट बडबडीला कसा भिणार? म्हणून 'जनजल्पनिर्भयाः' असे नारद म्हणतात. तसेच निर्भयता हे दैवीसपत्तीचे पहिले लक्षण आहे. ते उपलक्षण मानून हे सर्व भक्त्याचार्य यावद्दैवी संपत्तीने युक्त असतात असेही म्हणता येते. गीतेच्या नवव्या अध्यायात महात्म्या पुरुषाचे तेराव्या श्लोकात जे वर्णन आहे त्यांत 'दैवी प्रकृति-माश्रिताः' असे स्पष्ट म्हटले आहे. श्रीनारद महर्षी त्यांच्या समकालीन अशा निर्भय भक्त्याचार्यांचा नामनिर्देश करून आतापावेतो ब्याऐंशी सूत्रात जे भक्ती-प्रेमाचे सिद्धान्त सागितले आहेत त्या विषयात सर्वांचे ऐकमत्य कसे आहे ते सागतात. कारण विद्वानांत मतैक्य होणे कठिण असते. त्यांच्यात स्वमतमंडण व परमतखंडणाची प्रवृत्ती बलवत्तर असते. भक्तामध्ये ही प्रवृत्ति नसते. 'एकमेका साह्य करूं । अवघे धरू सुपंथ ।। तु०' ही भक्ताची भावना असते. येथे 'भक्त्याचार्य' असे म्हटले आहे स्वोद्धाराकरिता भगवद्भक्ती करणारे, हेही भक्त म्हणविले जातील, पण आपण स्वत. तर आयुष्य मर्व भगवद्भक्तीत वेचलेच, पण बहुजन-समाजामध्ये 'पिटू भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा । तुका म्हणे करा । जयजयकार आनंदे ।।' म्हणून भगवद्भक्तीचा प्रचार करणारे, प्रसंग पडला तर भक्तीकरिता दिव्यही करण्याची तयारी ठेवणारे, समाजाच्या अध.पाताकडे पाहून ज्यांच्या हृदयाला अत्यंत द्रव फुटतो, दुष्ट दुर्जनांनी आक्रमण केले तरी त्याचा विचार न करता त्याचे कल्याणच करावे ही ज्याची दृढ भावना असते व आपल्या भक्तिबळावर पाप्यातील पापी असला तरी त्याला भक्त बनविण्याचे सामर्थ्य असते, ज्यांना निग्रहअनुग्रह शक्ती असते, प्रसंगविशेषी निसर्गावरही सत्ता गाजवून अलौकिक चमत्कारही जे घडवून आणू शकतात, इतकेच नव्हे तर देवाप्रमाणे ज्यांना स्वेच्छेने अवतार घेता येतो व,

जे पुरुषार्थसिद्धी चौथी । घेऊनि आपुले हाती ।
रिगाला भक्तिपंथी । जगा देत ।। ज्ञा० १२-२१९

असे ज्यांचे वर्णन संत करतात, त्यांना 'भक्त्याचार्य' असे म्हटले जाते. सामान्य भक्त व भक्त्याचार्य यांच्यातील हा विशेष मानावा लागतो.

अशा भक्त्याचार्यांपैकी काहींचा नामनिर्देशही सूत्रातून केला आहे. त्यात प्रथम कुमार म्हणजे सनत्कुमारांचा निर्देश आहे.

**कुमार :**

ब्रह्मदेवाने दिव्य सहस्रवर्षे तप केल्यानंतर हृदयात त्याला महाविष्णूचे दर्शन झाले, त्या महाविष्णूनीच ब्रह्मदेवास मूलभागवत सांगितले. नंतर त्याने भगवदाज्ञेने मानसिक सृष्टीची रचना करण्यास आरंभ केला. त्या वेळी त्याचे चित्त सत्त्वगुणयुक्त व अत्यंत प्रसन्न होते. सृष्टिरचनेचा संकल्प होताच हे चार कुमार प्रगट झाले. सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार ही त्यांची नावे होत. ते सर्व शुद्ध सत्त्वगुणाचे पुतळे होते. रजतमोगुणाचा लेशही त्यांचे ठिकाणी नव्हता म्हणून प्रमाद निद्रा, आलस्य, इत्यादी दोष त्यांच्या ठिकाणी नव्हते. ब्रह्मदेवाने त्यांना सृष्टी निर्माण करण्याची आज्ञा दिली पण त्यांची त्या कार्यात प्रवृत्ती नव्हती, त्यानी ती आज्ञा मानली नाही. या कुमारांची जन्मजात रुची भगवद्गुणलीलाकीर्तन-श्रवणातच होती. भगवंताला सोडून एक क्षणही अन्य विषयांत त्याचे चित्त जात नव्हते त्यांच्या मुखातून निरंतर 'हरिःशरणम्' हा मंत्र बाहेर पडत असे. त्यांच्यावर काळाचा प्रभाव पडत नव्हता. त्यांची कुमार अवस्था अखंड राहिली. सर्व लोकांत त्यांचा संचार होता. याचे अधिक वास्तव्य जनलोकातच असते. हे पंचवर्षीय दिगंबर अवस्थेत स्वेच्छेने जगदुद्धारार्थ संचार करीत असतात. छांदोग्य उपनिषदात यांनी नारदाला आत्मज्ञानाचा उपदेश केला व त्यांचा जन्ममरणात्मक संसाररूपी शोक दूर केला असे वर्णन आहे. महाराज पृथूस यांनीच तत्त्वज्ञानाचा उपदेश केला इतकेच नव्हे तर देवर्षिनारदांना भागवत यांनीच सांगितले असे भागवतमाहात्म्यात म्हटले आहे. तसेच हे निग्रहानुग्रह सामर्थ्यवान आहेत. भगवान विष्णूचे द्वारपाळ जयविजय यानी यांचा अपमान केल्यामुळे ते वैकुंठापासून च्युत झाले व तीन वेळां राक्षसयोनीत त्यांना जन्म घ्यावा लागला, ही कथा प्रसिद्ध आहे. भक्तिमार्गीत यांचा फार मोठा अधिकार होता म्हणून 'भक्त्याचार्यां'मध्ये यांचा प्रथम निर्देश केला आहे.

**व्यास :**

व्यासांचे चरित्र या ग्रंथाच्या आरंभी तसेच सोळाव्या सूत्रावरील विवरणात आले आहे. अठराही पुराणांतून त्यांनी भक्तियोगाचा संपूर्ण विचार केला आहे. अनंत भक्तांची चरित्रे व त्या त्या भक्तांची निष्ठा किती श्रेष्ठ होती इत्यादी विचार

विस्तारपूर्वक सांगितले आहेत. व्यास स्वतःही महान् भगवद्भक्त होते म्हणून त्यांना भक्त्याचार्य म्हणणे अत्यंत योग्य आहे.

**शुक :**

पुराणातून शुकाचार्यांच्या जन्माच्यासंबंधी अनेक कथा कल्पभेदाने प्रचलित आहेत. याची मातां वटिका व पिता व्यास यांनी आपल्याला भगवद्भक्त, धैर्यवान, तेजस्वी पुत्र प्राप्त व्हावा म्हणून सुमेरु पर्वतावर घोर तपश्चर्या केली, त्या तपश्चर्येने प्रसन्न होऊन श्रीभगवान शंकरांनी त्यांना तेजस्वी पुत्र प्राप्त होईल असा वर दिला. योग्य समयावर गर्भ राहिला शुक हे मातेच्या गर्भात बारा वर्षे राहिले. आपल्या योगशक्तीने अति लहान रूप घेऊन ते राहिल्यामुळे मातेला त्याचे क्लेश जाणवले नाहीत. त्यांना गर्भातून बाहेर येण्याकरिता व्यास व अन्य ऋषीनी फार आग्रह केला, पण ते गर्भातून हेच उत्तर देत असत की, जीव जोपावेतो गर्भात राहतो तोपावेतो त्याचे ज्ञान राहते. भक्ती, वैराग्य ही त्याच्या ठिकाणी असतात, गर्भातून बाहेर आल्यावर भगवंताची अचिंत्यशक्ती माया त्याला मोहित करते. त्याचे सर्व ज्ञान विस्मृत होते. तो मायामोहित होऊन दुःखरूप संसार व त्यातील विषयात आसक्त होऊन जातो. नाना पापकर्मे करून जन्ममरण चक्रात सापडतो, त्याची यातून सुटका होत नाही. म्हणून मी गर्भाच्या बाहेर येत नाही.

जेव्हा देवर्षि नारदांच्याद्वारा भगवान श्रीकृष्णाचे आश्वासन मिळाले की बाहेर आल्यावरही तुला मायेची बाधा होणार नाही तेव्हा ते अभयवचन ऐकून शुकदेव बाहेर आले. जन्मताच ते वनात निघून गेले. दिव्य, कांतिमान, तेजःपुंज, द्वादशवर्षात्मक ते बालक जन्मताच निघून जात आहे हे पाहून व्यासांचे मन फार व्याकुळ झाले. ते त्याच्यामागे धावू लागले व 'शुका' 'शुका' अशा मोठ्याने हाका मारू लागले, तेव्हा शुकांच्या सर्वात्मभावाचा प्रभाव एवढा की वृक्षातून 'ओ' 'ओ' असा ध्वनी येऊ लागला. व्यास शुकांच्यामागे धावतच होते. एका ठिकाणी त्या वनात त्यांनी पाहिले की काही देवांगना एका सरोवरात स्नान करीत होत्या. शुकाचार्य पुढे निघून गेले त्यांना पाहून त्या लाजल्या नाहीत पण व्यासांना पाहून त्यांना लज्जा उत्पन्न झाली व तत्काल त्यानी आपली वस्त्रे परिधान केली. याचे आश्चर्य वाटून व्यासानी त्यांना विचारले, 'मुलींनो माझा तरुण पुत्र पुढे गेला त्याला पाहून तुम्ही लाजला नाही व मला म्हाताऱ्याला पाहून तुम्हाला लाज वाटली याचे आश्चर्य वाटते. देवस्त्रिया म्हणाल्या, 'ऋषिवर्य ! आपण आम्हाला क्षमा करा. आपणास अद्यापि असे वाटते की मी पुरुष आहे व या स्त्रिया आहेत. पण आपल्या पुत्रात तर स्त्रीपुरुषभावही नाही. ते सर्वांकडे समान दृष्टीने पाहतात. त्यांच्यापुढे वस्त्र असणे, नसणे सारखेच आहे.' असो. मोठ्या प्रयत्नाने व्यासांनी शुकाला परत आणले. शुकांना श्रीमद्भागवत सांगितले. त्यांना

भक्तिप्रेमाची दीक्षा दिली.

राजा परीक्षितीला सात दिवसात तुझा मृत्यू होईल असा ब्रह्मशाप झा होता त्यावेळी तो अन्नपाणी वर्ज करून गंगेच्या काठी बसला असता श्रीशुक ते गेले. त्यानी सात दिवसांत त्याला भागवत ऐकविले व त्याचा उद्धार झाल नारदऋषीप्रमाणे श्रीशुक यांची कीर्तनभक्ती होती. शुकाचार्यांच्या कीर्तनाचे वण पुराणातून आढळते. शुकाचार्यांच्या जन्माच्या विविध कथा अनेक पुराणां वेगवेगळ्या आढळतात. भक्तिमार्गात यांचा अधिकार असामान्य होता हे सर्वमा आहे. यांनी सांगितलेले भागवत हेच भक्तिशास्त्र म्हटले जाते. म्हणून भक्त्याचार्य होत.

**शांडिल्य** :

महर्षि शाण्डिल्यांचे तसे चरित्र उपलब्ध नाही. मात्र त्यांनी भक्तिसू रचलेली प्रसिद्ध आहेत. नारदांनी अठराव्या सूत्रात त्यांचा उल्लेख केला आ तेथे त्यांची माहिती दिली आहेच.

**गर्ग** :

गर्गाचार्यांच्या चरित्राचा विचार सतराव्या सूत्रावरील विवरणात केला गेल आहे. यांचा गर्गसंहितानामक बारा हजार श्लोकांचा कृष्णभक्तिपर ग्रंथ उपलब आहे. प्रेमभक्तीचा उत्कृष्ट विचार त्या ग्रंथात आला आहे. इतरत्र न उपलब होणाऱ्या कृष्णकथा त्यांत सापडतात.

**विष्णु** :

भक्तपरंपरेत विष्णुचा उल्लेख कोठे सापडत नाही. एक स्मृतिकार म्हणू प्रसिद्ध आहेत. पद्मपुराण व स्कंद पुराणात विष्णुदासनामक ब्राह्मणभक्त श्रीरं अनंतशयनाचा उपासक होता. त्याचे अल्पचरित्र सापडते. पण भक्त्याचार्य म्हणू त्याचा उल्लेख नाही. कदाचित नरनारायण हे विष्णूचे अवतार खरे; पण त्यांन बदरिकाश्रमी घोर तप केले आणि भक्तिमार्गाचा प्रसार केला म्हणून विष्णु य रूपाने त्यांचा निर्देश केला असावा असे कित्येकांनी म्हटले आहे.

**कौंडिन्य** :

शांडिल्यऋषीचा हा शिष्य असे बृहदारण्य उपनिषदात सांगितले आ ‘ तन्मयतासक्ति ’ ही या कौडिन्याची भक्ती होती असे कित्येकांनी म्हटले आहे.

**शेष** :

कश्यपास कद्रूपासून झालेला मुलगा. हा प्रमुख नाग असून निरंतर पाताळा याचे वास्तव्य असते याने तपश्चर्या करून ब्रह्मदेवापासून पृथ्वी मस्तकावर धार करण्याचा वर मिळविला होता. हाच भगवत्सेवेकरिता क्षीरसागरात वास्तव्य करत व यावर महाविष्णु शयन करतात असे पुराणात वर्णन आहे. तसेच रात्रंदिव

आपल्या सहस्रमुखांनी भगवंताचे वर्णन करीत असतो. राम अवतारात लक्ष्मण हा शेषाचा अवतार समजला जातो. हा भगवत्सेवेचा महान आदर्श म्हणून भक्त्याचार्य म्हटले आहे.

**उद्धव :**

भगवद्‌भक्तांमध्ये उद्धवाचा अधिकार फार श्रेष्ठ होता हे प्रसिद्ध आहे. हा यादव कुळातील देवभागाचा पुत्र. याने बृहस्पतीपाशी नीतिशास्त्राचे अध्ययन केले होते असे वर्णन आहे. भगवान श्रीकृष्णाचा हा अंतरंग सखा होता. मागील सूत्रात त्याचा विचार केला गला आहे. द्वारकेहून प्रभास क्षेत्रास श्रीकृष्ण गेले हे समजल्यावर हाही तेथे गेला व मलाही तुमच्यासमागमे स्वधामास न्या म्हणाला. नंतर श्रीकृष्णांनी याला विस्तृतरूपाने अध्यात्म, भक्ती, योग, ज्ञान, धर्म यांचा उपदेश केला श्रीकृष्णांचा तो आवडता भक्त होता. भक्तिमार्गात उद्धवाची योग्यता श्रेष्ठ समजली जाते.

**आरुणि :**

आरुणीने हृदयात असणाऱ्या अष्टदलयुक्त कमलाच्या ठिकाणी ब्रह्मदृष्टी ठेवून उपासना केली होती असे ऐतरेय आरण्यकात वर्णन आहे कदाचित् नारदकालात त्यांना ज्ञात असणारा एखादा भक्त असावा. एका भक्तिसंप्रदायात निम्बार्काचार्य हे आरुणीचे अवतार मानले आहेत.

**बलि :**

राजा बलीचा अधिकार भक्तिमार्गात फार मोठा होता. त्याची आत्मनिवेदन भक्ती प्रसिद्ध आहे. भगवान हा त्याचा द्वारपाल झाला होता ही कथा प्रसिद्ध आहे.

**हनुमान :**

महारुद्र हनुमानाच्या भक्तीचे कोण वर्णन करू शकेल? 'काय भक्तीच्या त्या वाटा। मज दावाव्या सुभटा।' अशी तुकाराममहाराजांनी त्यांची प्रार्थना केली आहे. सेवाभक्तीचा परम आदर्श हनुमान होत. त्यांचे चरित्र सर्वजनप्रसिद्ध आहे. मागील सूत्रात दास्यासक्ती पदाचे व्याख्यानात त्याच्या भक्तीचा विचार केला गेला आहे.

**विभीषण :**

हा लंकाधिपती रावणाचा बंधू होता हे प्रसिद्ध आहे. याने उग्र तप करू ब्रह्मदेवास प्रसन्न करून घेतले व त्याचेपासून माझी बुद्धी नेहमी सद्धर्मरत असावी असा वर मागून घेतला. तेव्हा ब्रह्मदेवाने प्रसन्न होऊन यास अमरत्व व ब्रह्मास्त्र दिले (वाल्मिकी रामायण, उत्तरकांड १०). हा परम रामभक्त होता. राम-रावणयुद्धात याने रामाला फार साहाय्य केले होते हे प्रसिद्ध आहे. रावणासारख्या बलाढ्य भावाचा तिरस्कार करून श्रीरामचंद्राची कृपा संपादन केली.

लोकनिंदेची पर्वा न करता निर्भयतेने भगवद्‌भक्ती करणाऱ्या काही भक्त्याचार्यांचा नामनिर्देश या सूत्रात नारदांनी केला आहे. कोणाला वाटेल एवढेच भक्त आहेत,

की काय ? तर आणखीही अनंत भक्त झाले. सर्वांचा नामनिर्देश करणे शव नाही, पण सर्वांचा समावेश व्हावा म्हणून सूत्रात 'आदि' अशी शब्दयोजना आं त्याचे तात्पर्य भीष्म, प्रल्हाद, ध्रुव, विदुर, रंतिदेव, अम्बरीषादिक अनेक भक्तव होऊन गेले. त्यांचाही अधिकार श्रेष्ठ होता. यांचाही समावेश 'भक्ताचार्य' म्हणू करावा असा अर्थ 'आदि' पदातून ध्वनित होतो. स्वतः प्रेमभक्तीने युक्त असू निर्भयपणाने समाजामध्ये आपल्या दिव्य प्रभावाने भक्तीचा ज्यांनी ज्यांनी प्रचा केला ते सर्व भक्त्याचार्य या संज्ञेस पात्र आहेत.

## सूत्र ८४

## य इदं नारदप्रोक्तं शिवानुशासनं विश्वसिति श्रद्धत्ते स प्रेष्ठं लभते स प्रेष्ठं लभत इति ।।८४।।

**अर्थ :**

जो या नारदांनी सांगितलेल्या मंगलमय उपदेशावर विश्वास तसेच श्रद्ध ठेवतो तो आपल्या प्रियतमाचा लाभ मिळवतो, प्रियतमाचा लाभ मिळवतो.'

**विवरण**:

सूत्राच्या शेवटी 'इति' या अव्ययाचा प्रयोग केला आहे तो ग्रंथसमाप्त दाखविणारा आहे. आरंभाकरिता 'अथ' व समाप्तीकरितां 'इति' चा प्रयो करण्याची ग्रंथकाराची रूढ पद्धती आहे.

तसेच ग्रंथकार शेवटी आपला नामनिर्देश करीत असतो हीही रूढ पद्धती आहे. तिला अनुसरून 'नारदप्रोक्तं' नारदांनी सांगितलेले असे म्हटले आहे. भक्ति मार्गात नारदांचा अधिकार किती श्रेष्ठ होता याचा विचार ग्रंथारंभी केला गेला आहे. अशा या देवर्षि नारदमुनींनी सूत्ररूपाने सांगितलेला हा शिवानुशासन - मंगल मय उपदेश आहे.

शिव शब्दाचे श्रेयस् कल्याण, मंगल, शुभ, भद्र इत्यादी अनेक अर्थ संभवतात नारदांनी सांगितलेला हा प्रेमभक्तियोग जीवनात मांगल्य आणणारा, कल्याणरू असा आहे. हा शांतिरूप, आनंदरूप कसा आहे हे मागे साठाव्या सूत्रात सांगितले आहे.

अथवा शिवानुशासन म्हणजे प्रत्यक्ष शंकरानी नारदांना भक्तितत्त्वाचा उपदे केला होता असे पद्मपुराण व ब्रह्मवैवर्त पुराणात सांगितले आहे. तो प्रकार या ग्रंथाच्य

आरंभी आलाच आहे. यावरून हे प्रेमयोगदर्शन पंरपराप्राप्त आहे. यात भक्ति-योगाचा सर्व अंगाने विचार आला आहे.

जो याचे ठिकाणी विश्वास ठेवतो, श्रद्धा धारण करतो त्याला कोणता लाभ होतो तेही सांगिले आहे. विश्वास हा भक्तीचा पाया आहे. परमार्थाचे ते मुख्य भांडवल आहे. 'भांडवल गांठी तरी विश्वास।' असे तुकाराम महाराज म्हणतात. विश्वास हा परमार्थाचा श्वास आहे. विश्वास गेला म्हणजे श्वास-प्राण-गेला असेच म्हटले जाते. श्रीकृष्णांनी अर्जुनाने 'शिष्यस्ते ऽ हं शाधि मां त्वां प्रपन्नम्' मी तुझा शिष्य आहे, तुला शरण आलेल्या माझे उपदेशद्वारा रक्षण कर' असा विश्वास प्रगट केल्यावरच बोध दिला.

पुन्हा 'श्रद्धेत्ते' असे सांगतात. संत व सद्‌गुरुवचनावर जो सत्यत्वाचा भाव त्यास विश्वास म्हणावे आणि त्यात सागितलेल्या साधनांचे जे निष्ठेने आचरण केले जाते त्याकरिता श्रद्धा लागते. 'श्रद्धावान् लभते ज्ञानं' हे गीतावचन प्रसिद्धच आहे. त्या श्रद्धेला 'तत्पर. संयतेंद्रियः' ही दोन महत्त्वाची विशेषणे दिली आहेत. यालाच निष्ठा ही म्हणतात. ही अव्यभिचारी असते. ही श्रद्धा धारण केली तर ती प्रियतम जो भगवान त्याचा लाभ करून देते, असे द्विवार सागतात. या लाभाचे स्वरूप गीतेच्या सहाव्या अध्यायात सांगितले आहे. जो लाभ प्राप्त झाला असता अन्य कोणताही लाभ त्या भक्ताला श्रेष्ठ वाटत नाही, ज्या लाभात स्थित असणारा भक्त कोणत्याही मोठ्यातील मोठ्या दुःखाने विचलित होत नाही, त्या स्थितीला 'प्रेष्ठं लभते प्रष्ठं लभते' असे म्हटले आहे. 'प्रेष्ठं' चा अर्थ सर्वात प्रिय असणारा भगवान असाही होतो व या नारदोक्त भक्तिशास्त्राचा श्रद्धेने अवलंब करणाऱ्यास त्या प्रियतमाची प्राप्ती होते. सूत्र ग्रंथाचा असा संप्रदाय आहे की अध्यायाच्या शेवटच्या सूत्राचे उत्तरवाक्य द्विवार सांगितले जाते. त्याला अनुसरून 'प्रेष्ठं लभते प्रेष्ठं लभते' असे म्हटले असावे.

याप्रमाणे श्रीनारदांनी सूत्ररूपाने सांगितलेला भक्तीच्या स्वरूपाचा, तिच्या प्राप्तीच्या साधनांचा आणि तिने प्राप्त होणाऱ्या अपूर्व फलाचा विचार येथे पूर्ण झाला.

तो विचार आपल्या अंतःकरणात भावभक्तीचे बीज रूजवो व त्याला भगवत्प्रेमाची अमृतमधुर फळे येवोत ही प्रार्थना शेवटी आपण करू.

तथास्तु।

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | ११ | मत्रावरुणी | मैत्रावरुणी |
| ६ | २९ | स्पर्शेच्छाया | स्पर्शेच्छया |
| ७ | १६ | देवर्षय: | ते तु देवर्षय· |
| ७ | १८ | तू | तु |
| ११ | २ | संग्रहार्यं | संग्रहाय |
| १३ | ४ | पादारविंद | पादारविंद |
| १५ | ३ | गेले. | येथे गेले. |
| १५ | १७ | उडी | उडे |
| १९ | १६ | उभयतांना | उभयतांनी |
| २० | १७-१८ | योगांचाच | योगांगांचाच |
| २२ | १७ | दासानांमग्रणी | दासानामग्रणी |
| २३ | २८ | तद्पाति | तद्दाति |
| २५ | २२ | इतिहास | इतिहासं |
| २५ | २३ | सर्वं | सर्वं |
| २५ | २५ | सारभुतं | सारभूतं |
| २६ | ८ | संनिमंध्य | संनिमंध्य |
| २८ | १३ | संदिग्ध | संदिग्धं |
| २९ | ३१ | शास्त्राप्रमाणेच | शास्त्रप्रमाणानेच |
| ३१ | ४ | अंत: | अत: |
| ३१ | ४ | भक्ति | भक्ति |
| ३२ | १९ | सर्वजण सुलभ | सर्वजनसुलभ |
| ३२ | २८ | मानवांचा | मानवांना |
| ३४ | ४ | भूयसि | भूयसी |
| ३५ | १० | सात्वस्मिन्परम | सा त्वस्मिन्परम |
| ३५ | २५ | आमुचालाग | आमुचालागी |
| ३७ | २४ | परप्रेमास्पंदं | परप्रेमास्पदं |
| ३७ | २७ | ते न | तेन |
| ३९ | २६ | याचो | याची |
| ४१ | ११ | स्फुंदने | स्फुंदे |
| ४२ | २५ | त्वामृत मश्नुते | त्वामृतमश्नुते |
| ४२ | २५ | अमृतमश्रुते | अमृतमश्नुते |
| ४३ | ३२ | मर्त्यलोकि | मर्त्यलोकं |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४७ | ४ | भषज | भेषजं |
| ४७ | १८ | अमृतरूपाया | अमृतरूपा ज्या |
| ४७ | २८ | लब्ध्वानंद | लब्ध्वानंदी |
| ४७ | ३० | भगवन्नम | भगवन्नाम |
| ४९ | १० | कियाद्भि | कियद्भि |
| ५५ | १४ | ‘ अमृतरूपाचे ’ | , अमृतरूपा च ’ |
| ५५ | १६ | सतराव्या | सत्तराव्या |
| ५८ | १९ | माधुरी | मधुरो |
| ५९ | २६ | सावे | सावेव |
| ६१ | २५ | बव्ह | बह्व |
| ६४ | सूत्र | द्वाञ्छति | द्वाञ्च्छति |
| ६८ | २२ | द्वाञ्छिति | द्वाञ्च्छति |
| ७७ | २५ | खानिन्य | खानिव्य |
| ८० | ६ | नित्यद्रव | नित्यद्रव्य |
| ८१ | २४ | अङिगर | अङगिरा |
| ८३ | १० | रूपत्वात | रूपत्वात् |
| ८३ | ३३ | भोत्क्तृत्वा | भोक्तृत्वा |
| ८५ | ३२ | झाली | झाला |
| ९१ | सूत्र | नंन्यता | नन्यता |
| ९३ | ११ | होते. | होत. |
| ९३ | १४ | धर्माश्रयाचा | धर्माधर्माचा |
| ९३ | ३२ | ल भाने | लोभाने |
| ९६ | ३ | गर्भ गोळा | गर्भगोळ |
| ९६ | १९ | देवी | देवो |
| ९६ | २६ | पुढें | पढें |
| ९७ | ५ | मत्स्यक | मत्स्य |
| ९८ | १५ | निरोधनाच्या | निरोधाच्या |
| १०१ | १० | कार्पण्य | कार्पण्ये |
| १०३ | १४ | प्यकुष्ठ | प्यकुण्ठ |
| १०३ | १७ | भगत्स्मरण | भगवत्स्मरण |
| १०५ | १५ | भावदर्पण | भगवदर्पण |
| १०७ | ३० | तावत | तावत् |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १०८ | १९ | ‘ धारणाविधी ’ | ‘ धारणावधि ’ |
| १०८ | २९ | दाढर्यात | दाढर्यात् |
| १०८ | ३२ | निश्चय | (निश्चय |
| १०९ | ९-१० | कंस आहे तो काढून टाकणे. | |
| १११ | १५ | सख्येऽर्जून: | सख्येऽर्जुन: |
| ११३ | १८ | भगवंताचा | भागवताचा |
| ११९ | ८ | व्रतंधारणम् | व्रतधारणम् |
| ११९ | ११ | मंडलंवर्तनै: | मंडलवर्तनै: |
| १२४ | ७ | मृषम ते यशति | मृषभ ते यशसि |
| १२६ | ३० | पाहू. | काय हे पाहू. |
| १२८ | २४ | भक्तिशांडिल्यांचे | भक्ति. शांडिल्यांचे |
| १२९ | २४ | स्वरूपानुसंधानं | स्वस्वरूपानुसंधानं |
| १२९ | २४ | भक्तिरित्याभिधीयते | भक्तिरित्यभिधीयते |
| १३४ | ३१ | यन्मुहूर्तक्षणं | यन्मुहूर्तं क्षणं |
| १३६ | २६ | भक्तशास्त्रात | भक्तिशास्त्रात |
| १३८ | ७ | जन्म् | जन्म |
| १३८ | ७ | रभिषेजोकम् | रजोभिषेकम् |
| १४८ | २ | प्रवाही | प्रवाहो |
| १५० | ४ | षदवीं | पदवी |
| १५२ | २७ | जारं | जार |
| १५३ | १ | गोण्य: | गोप्य: |
| १५३ | २४ | सच्छिदानंदता | सच्चिदानंदता |
| १५९ | १६ | कृपी | कूपी |
| १६० | २३ | वटवधे | वाटवधें |
| १६१ | ९ | लब्ध । | लब्ध– |
| १६६ | ४ | नाट्टतष्मद | नादृत युष्मद |
| १६९ | ३२ | द्धरिरक्शा | द्धरिरवशा |
| १७१ | ७ | दवशिष्यतें | दवशिष्यते |
| १७१ | १८ | कीय | कोय |
| १७७ | ३ | भक्तप्रेमास | भक्तिप्रेमास |
| १८४ | २ | संकारो | संस्कारो |
| १८४ | २ | निवासी | निवासो |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १८४ | ५ | भक्ति दृढा | भक्तिर्दृढा |
| १८६ | १० | भगवत्प्रसाही | भगवत्प्रसादही |
| १८८ | १५ | स्त्रवे | स्रवे |
| १८९ | १२ | सूम्न | सूत्र |
| १९० | २३ | क्षुतत् शांतिः | क्षुत् शांतिः |
| १९० | २५ | आपल्याला पाहायला मिळत नाही | आपल्याला मिळत नाही |
| १९३ | ७ | वळघवले | वळघले |
| १९४ | १३ | नाति सक्ती | नातिसक्तो |
| १९७ | सूत्र | संगात्यागाच्च | संगत्यागाच्च |
| १९९ | २२ | जळे | जळ |
| २०१ | २१ | जात | जाण |
| २०२ | ४ | विरोध | विरोधी |
| २०२ | ८ | श्वान्यैः | श्चान्यैः |
| २०२ | ९ | –४– | –४७– |
| २०२ | २६ | कारणा | कारण |
| २०२ | ३० | संबधक | संबंध |
| २०२ | ३२ | चित्ताल | चित्ताला |
| २०३ | १ | अनिर्वचनीय रूप | अनिर्वचनीयस्वरूप |
| २०४ | २६ | भक्तमार्गात | भक्तिमार्गात |
| २०८ | २७ | 'भागवत्' | 'भगवत्' |
| २१३ | १५ | सशेरुहम् | सरोरुहम् |
| २१३ | २६ | शुक्राचार्या | शुकाचार्या |
| २१३ | ३१ | मुच्चैर्भीषा | मुच्चैर्भाषा |
| २१४ | १ | अजाधिलोपारख्यानात | अजामिलोपाख्यानात |
| २१६ | १३ | आचार्यगुण | आचार्यगण |
| २१६ | २६ | साधूने | साधू न |
| २१७ | २५ | तातः | ततः |
| २१७ | २९ | हृत्कणं | हृत्कर्णं |
| २१७ | ३० | श्वपगं वर्त्मनि | श्वपवर्गवर्त्मनि |
| २१८ | ६ | त्यनुमोदन्ति | ह्यनुमोदन्ति |
| २२३ | २ | कै. | कै |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २२३ | २७ | महा त्संग | महत्संग |
| २२४ | ६ | वृणोत | वृणीत |
| २२४ | १४ | तर्त्यच्युत | तर्ह्यच्युत |
| २३६ | ९ | बोधक | बाधक |
| २२६ | २३ | महात्संग | महत्संग |
| २३० | २४ | मार्गाते | मार्गौतें |
| २३२ | १० | देवाषीच | देवाशीच |
| २३२ | २४ | होणे ही | होणे हे |
| २३३ | सूत्र | साध्याताम् | साध्यताम् |
| २३६ | १ | बोल बोल | बोल बोले |
| २३६ | १३ | अश्वद्धावान् | अश्रद्धावान् |
| २४० | ३१ | जालधीनतितीर्यु | जलधीनतितीर्य |
| २४१ | २८ | शास्त्रचार्यो | शास्त्राचार्यो |
| २४३ | ११ | ध्यानात्पुंस: | ध्यासात्पुंस: |
| २४३ | १२ | त्संजायते | तत्र भवेत् |
| २४३ | १४ | जायते | ग्रस्यते |
| २४३ | १४ | द्रुतम | द्रुतम् |
| २४४ | २१ | धरावी | न धरावी |
| २४५ | सूत्र | त्समुद्रायन्ती | त्समुद्रायन्ति |
| २५६ | ३२ | या लोक बन्ध | यो लोकबन्ध |
| २५८ | ४ | पाणीकृतं | पणीकृतं |
| २५९ | २३ | सत्त्वबुद्धी | सत्त्ववृद्धी |
| २६२ | सूत्र | निर्द्वंद्वो | निर्द्वंद्वो |
| २६२ | २० | कर्माचौकी | कर्माचा की |
| २६४ | १४ | विहारदिक | विहारादिक |
| ६५ | ३० | मदर्पपुणम् | मदर्पणम् |
| ६७ | २ | विमुक्त: | विमुक्ता: |
| ६७ | ८ | इ. | इ. वर्णन आहे. |
| ७३ | २ | त्याचा | त्याच्या |
| ७७ | १ | अनुभही | अनुभवही |
| ७८ | ९ | यज्ञ | यत्न |
| ७८ | १५ | प्रमोन्मादात | प्रेमोन्मादात |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २७९ | ३ | शुकाचार्र | शुकाचार्य |
| २७९ | ५ | कोठीतून | कोटीतून |
| २८० | सूत्र | म्विमच्छिन्नं | मविच्छिन्न् |
| २८० | २७ | परमव्ययम | परमव्ययम् |
| २८१ | ३ | ती प्रकार | तीन प्रकार |
| २८१ | २६ | असे | गुणरहित असे |
| २८२ | ९ | न्हः | न्हीः |
| २८३ | ६ | नियोधरूप | निरोधरूप |
| २८३ | १७ | कामनारहिते | कामनारहितं |
| २८४ | २१ | धालया हीवरी । धनु | धालयाहीवरी । धेनु |
| २८६ | २२ | रोदीमै | रोदीर्मे |
| २८७ | ८ | नील : ॥ | निलः ॥ |
| २८७ | २७ | पाचाव | पाचवा |
| २९२ | ९ | अनुभवरूपातच कसे | अनुभवरूपता कशी |
| २९६ | ३१ | वर्णत | वर्णन |
| २९८ | २२ | भाष्यते | भाव्यते |
| २९९ | २३ | मतो | मता |
| ३०० | ३१ | अर्चत्यामेव | अर्चायामेव |
| ३०२ | १० | आत | आर्त |
| ३०३ | २३ | ज्ञातु | ज्ञातु |
| ३०४ | ५ | निजमानी | मिजमानसी |
| ३०४ | ११ | यच्छेय | यच्छ्रेय |
| ३०४ | २२ | वर्षात | वर्षात् |
| ३०४ | २३ | तर्षम | तर्षम् |
| ३१४ | १० | उपसगी | उपसर्गा |
| ३१५ | १७ | निवाराय | निवाराया |
| ३१६ | १० | सरव्युरशेष | सख्युरशेष |
| ३२३ | २६ | भावव्यूत्पत्त्या | भावव्युत्पत्त्या |
| ३२४ | ३१ | दुखग | दुरवग |
| ३२४ | ३२ | मपीश्चरते | मपीश्वर ते |
| ३२७ | ८ | अनाचारुषु | अनाचारु |
| ३३४ | १२ | साधन भक्ताची | साधकभक्ताची |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ३४२ | १० | साधन भिमान | साधनाभिमान |
| ३४६ | सूत्र | करणीयम | करणीयम् |
| ३५२ | ७ | तो | ते |
| ३५४ | ११ | तापम | तापम् |
| ३५४ | १२ | पत्र पं | पत्रपं |
| ३५४ | १३ | धामरात्म | धामभिरात्म |
| ३५४ | १४ | मनोभिरामे | मनोभिरामम् |
| ३५४ | १५ | पङ्करजः | पङ्कजरजः |
| ३५४ | १५ | मो–पहत्यै | मोपहत्यै |
| ३५४ | १६ | म्नुजाक्ष | म्बुजाक्ष |
| ३५४ | १६ | भवह्यत्प्रसादं | भवत्प्रसादं |
| ३५७ | १८ | सर्वसंभारे | सर्वभावसंभारे |
| ३५८ | २१ | निवृत्तिर्मिय | निवृत्तिर्मिथ |
| ३५८ | २७ | आचणा | आचरण |
| ३५८ | २८ | त्यांचर | त्यांच्या |
| ३६२ | २१ | अर्बुदाचले | अर्बुदाचल |
| ३६३ | १८ | तीर्थानी | तीर्थानि |
| ३६५ | ७ | योजिले | यजिले |
| २६५ | ११ | ग– | गा |
| ३६५ | १२ | येईजे। पापा | पापें येईजे । पापा– |
| ३६६ | २७ | अतीर्थीलाही | अतीर्थालाही |
| ३६७ | २६ | ध्येयाकरता | ध्येयाकारता |
| ३६८ | २३ | परिपूर्णता । | परिपूर्ण पूर्णता । |
| ३६९ | ४ | बाराव्या | गीतेच्या बाराव्या |
| ३७० | ७ | स्वनंदे | स्वानंदे |
| ३७२ | २५ | भोगतो | भोगते |
| ३७३ | ९ | भूमिर्द्दंप्त | भूमिर्दृप्त |
| ३७६ | ११ | विप्राद्धि | विप्राद्द्वि |
| ३७७ | १० | उद्धरिला | उद्धरिली |
| ३७७ | २६ | धम | धर्म |
| ३८० | ८ | अदृष्ट व शांत | अदृष्टवशात |
| ३८० | ११ | धनमाजी | धनमानी |

